# श्रीमन्महाभारत

या ग्रंथाचें

# मराठी सुरस भाषांतर.

पुस्तक आठवें



## हरिवंशपर्व.

पूर्वार्ध



हा ग्रंथ

रा. रा. महादेव हरी मोडक, बी. ए.

यांनीं लिहिला.

प्रकाशकः—गणेश विष्णु चिपळुणकर आणि मंडळी,
बुधवार पेठ, पुणें.

मुद्रकः—केशव रावजी गोंधळेकर, जगद्धितेच्छु छापखाना, पुणें.

शके १८३४ परिधावीनाम संवत्सरे.

हा ग्रंथ **गणेश विष्णु चिपळुणकर** आणि **मंडळीचे** व्यवस्थापक रा० **बाळकृष्ण पांडुरंग ठकार** यांनीं पुणें पेठ शनिवार येथील रा० रा० **केशव रावजी गोंधळेकर** यांच्या **जगद्धितेच्छु** छापखान्यांत छापवून पुणें पेठ बुधवार, घर नंबर १५९, येथें प्रसिद्ध केला.

---



वडोदाराज्याधिपति श्रीमत्सकलगुणैश्वर्यसंपन्न श्रीमन्महाराज सयाजीराव गायकवाड
सेनाखासखेल समशेर बहादुर.



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥

ज्या अखिलब्रह्मांडनायकाच्या लीलेनें या जगाचीं यच्चयावत्
कार्यें घडतात, ज्याच्या कृपेनें ह्या अनिवार मायामोहाचें
निरसन करितां येतें व अल्पशक्ति जीवांना परमपद
प्राप्त करून घेतां यावें म्हणून जो त्यांस
बुद्धिसामर्थ्य देतो, त्या

परमकारुणिक

**श्रीमन्नारायणाचे प्रेरणेनें**

सकलगुणैश्वर्यसंपन्न
श्रीमन्महाराजसाहेब
सयाजीराव गायकवाड यांनीं
"श्रीमन्महाभारताच्या भाषांतराचें"
निर्विघ्नपणें पूर्ण प्रकाशन व्हावें म्हणून
सर्वांच्या आधीं अत्यंत मोठा आश्रय देऊन हें
ग्रंथाच्या पूर्णतेचें श्रेय त्यांनींच संपादन केलें असल्यामुळें
प्रस्तुतचा हा भाग महाराजसाहेब यांची परवानगी घेऊन आम्ही

**भगवदंश श्रीमन्महाराजसाहेब यांचे चरणीं**

कृतज्ञतापूर्वक समर्पण केला आहे, त्याचा ते स्वीकार करोत.

श्री.

" श्रीमन्महाभारताचें मराठी सुरस भाषांतर " या ग्रंथापैकीं प्रस्तुत वाचकांचे हातीं असलेला हा आठवा भाग होय. यांत हरिवंशपर्वाचा पूर्वार्ध असून त्यांत हरिवंशमहात्म्य, हरिवंशपर्व, विष्णुपर्व इतका विषय आहे. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत अर्धवट महापर्वांत पुस्तक काढलें नव्हतें; पण या वेळीं हा ग्रंथ फार मोठा असल्यामुळें आजपर्यंतच्या नियमांविरुद्ध हें काम करावें लागलें. कारण, एकंदर ग्रंथाचीं पानें काम फार वाढल्यामुळें एक हजार होत आहेत. इतक्या पानाचें एकच पुस्तक करणें आम्हांस बांधणीच्या दृष्टीनें प्रशस्त न वाटल्यामुळें एकाच पुस्तकाचीं दोन पुस्तकें करणें भाग पडलें. पण या विचारानें कामांत सुबकपणा आला असला तरी-खर्चाच्या दृष्टीनें आमच्या आपत्तींत आणखी भरच पडली आहे. म्हणजे बांधणीचा खर्च दुपटीवर गेला. आणि तो थोडा थोडका नसून प्रती दुप्पट झाल्यामुळें सुमारें १६०० शें रुपये इतका खर्च वाढला आहे. तथापि कांहीं आश्रयदात्यांच्या सुचनेवरून दोन भागांत पुस्तक बांधण्याचें ठरवून तशी व्यवस्था केली आहे. यामुळें आतां एकंदर महाभारताचे आठ भाग होणार होते ते नऊ होतील.

हरिवंशपर्वाचें पूर्णपणें प्रकाशन झालें म्हणजे अखिल महाभारताचें प्रकाशन झालें. अशा वेळीं चिपळुणकर मंडळीनें आजपर्यंत अनुभविलेल्या परिस्थितीचें सिंव्हावलोकन करून स्वानुभव वाचकापुढें ठेवण्याचा उपक्रम केल्यास तो अस्थानीं होणार नाहीं. पण ती गोष्ट यावेळीं व्यक्त न करितां नवव्या भागाचे प्रस्तावनेंत करण्याचें योजिलें आहे.

या भागांत एकंदर आठ चित्रें आहेत. पैकीं तीन मागील भागांतील असून पांच आठव्या भागांतील आहेत. हीं चित्रें कोणी काढलेलीं आहेत, हें त्यावरील नांवावरून ध्यानांत येईलच. याही वेळीं श्रीमंतसरकार बाळासाहेब पंत प्रतिनिधी यांनीं आमचेकरितां जे श्रम घेतले आहेत त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहोंत.

या महत्कार्यास आजपर्यंत द्रव्यद्वारा ज्यांनीं साहाय्य केलें त्यांचीं नांवें मागील सर्व भागांत आलेलींच आहेत. पण त्यानंतर ज्यांचेकडून मदतीदाखल रकमा आल्या त्या उदारधी गृहस्थांचा नामनिर्देश करणें आमचें अत्युच्च कर्तव्य आहे. **श्रीमती महाराणी आजीसाहेब, कोल्हापूर; श्रीमंत सरदार अण्णासाहेब महाराज भोंसले, सातारा; श्रीमंत सरकार मुधोळकर, सं० मुधोळ; श्रीमंत सरदार भाउसाहेब पाटणकर, कोल्हापूर; रा० रा० शेट विष्णुसा बाळकृष्णसा सावजी, मलकापूर, वऱ्हाड; व मुंबई येथील डॉ. नानासाहेब देशमुख; बॅ. मुकुंदराव रामराव जयकर; रा. रा. कृष्णाजी पांडुरंग फडके; रा. रा. अण्णासाहेब नेने, प. वा. माजी ओरिएंटल ट्रान्सलेटर विनायक वासुदेव यांचे चिरंजीव बाळकृष्ण विनायक** वगैरेकडून यथाशक्ति आश्रयार्थ रकमा आल्या आहेत. या औदार्यानें या सर्व मंडळींनीं महाराष्ट्रवाचकवर्गास व मुख्यतः चिपळुणकर मंडळीस कायमचें ऋणि करून ठेविलें आहे.

वरील सर्व आश्रयदात्यांचे आभार मानणें हें आमचें कर्तव्य आहे, व तें आह्मीं बजाविलेंच आहे परंतु या सर्वांत **श्रीमंत महाराज सरकार सया-**

# अनुक्रमणिका.

## हरिवंश ( पूर्वार्ध ).

## विष्णुपर्व.

# चित्रांची सूचि.



## मागील भागांतील चित्रें.

### सभापर्व भाग १ ला.



### उद्योगपर्व भाग ३ रा.



### भीष्मपर्व भाग ४ था.



**टीप**—या भागांत आठ चित्रांची सूचि आहे पण यांतील खालील तीन चित्रें पूर्वीचे वर्गणीदारांस त्या त्या भागांत मिळालीं नसल्यामुळें तीं त्यांस या भागांत मिळतील अशी व्यवस्था केली आहे. यापुढें जे ग्राहक होतील त्यांस त्या त्या भागांत तीं मिळतील व त्यांना ८ वे भागांत वरील पांचच मिळतील.

# शुद्धिपत्र.

## हरिवंशपर्व

| अध्याय | पान | रकाना | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | १ | ३० | श्रवण केल्यावर वैशंपायनाला. | कथन केल्यावर त्याला जनमेजयानें |
| ” | ” | ” | ३४ | सौते, | वैशंपायना, |
| २१ | ९४ | १ | ३ | पुरूचा पुत्र हा | पुरूचा पुत्र जनमेजय हा |



# हरिवंशमाहात्म्य.

## अध्याय पहिला.

## श्रवणादिविधिकथन.

### मंगलाचरण.



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

( श्रीगणेशाला वंदन असो. ) ह्या अखिल ब्रह्मांडांतील यच्चयावत् स्थावर जंगम पदार्थांच्या ठिकाणीं चिदाभासरूपानें प्रत्ययास येणारा जो नरसंज्ञक जीवात्मा, नरसंज्ञक जीवात्म्यास सदासर्वकाळ आश्रय देणारा जो नारायण नामक कारणात्मा, आणि नारायणात्मक कार्यकारणसृष्टीहून पृथक् व श्रेष्ठ असा जो नरोत्तम—संज्ञक सच्चिदानंदरूप परमात्मा, त्या सर्वांस मी अभिवंदन करितों; तसेंच, नर, नारायण व नरोत्तम या तीन तत्त्वांचें यथार्थ ज्ञान करून देणारी जी देवी सरस्वती, तिलाही मी अभिवंदन करितों; आणि त्या परमकारुणिक जगन्मातेनें लोकहित करण्याविषयीं माझ्या अंतःकरणांत जी स्फूर्ति उत्पन्न केली आहे, तिचे साह्यानें या भवबंधविमोचक जय म्हणजे महाभारत ग्रंथास आरंभ करितों.

प्रत्येक धर्मशील पुरुषानें सर्वपुरुषार्थ प्रतिपादक अशा शास्त्राचें विवेचन करितांना प्रथम नर, नारायण आणि नरोत्तम ह्या भगवन्मूर्तींचें ध्यान करून नंतर प्रतिपाद्य विषयाचें निरूपण करण्यास प्रवृत्त व्हावें, हें सर्वथैव इष्ट होय. ज्याच्या मुखरूप कमलांतून स्रवणारें शब्दरूप अमृत अखिल जगत् पिऊन राहिलें

१ " हरिवंश " हा महाभारताचाच एक अंश असल्यानें महाभारताचेंच मंगलाचरण त्यालाही व्यासांनीं लागू केलें आहे.

आहे असा जो सत्यवतीच्या ( मातेच्या ) हृदयाला आनंद देणारा पराशरमुनीचा पुत्र व्यास त्याचा उत्कर्ष असो. अज्ञानरूप अंधकारानें लुप्त झालेली माझी दृष्टि ज्या श्रीगुरूनें ज्ञानरूपी अंजनाची सळई फिरवून खुली केली त्याला वंदन असो. ज्या दिव्य पदाचे योगानें हें अनंत वर्तुलाकार चराचरविश्व व्यापून गेलें आहे तें पद[1] ज्या सद्गुरूनें माझे प्रत्ययास आणून दिलें त्यास प्रणाम असो.

जनमेजय म्हणतोः—हे भगवन् ( वैशंपायना ), आपण मला सामान्यतः भारत श्रवण करण्याचा विधि ऐकविला, तथापि, भारतखंड जो हरिवंश याचे श्रवणाचा कांहीं विशिष्टविधि असेल तर तो मला ऐकवा.

वैशंपायन सांगतातः—(होय. हरिवंशाला विशिष्टविधि असणें अवश्यच आहे आणि अतएव तुझा प्रश्न समंजस आहे.) हे राजा, हरिवंश हा ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर या त्रिमूर्तींचें साक्षात् शरीरच आहे. हरिवंश हा सनातन असें जें शब्दब्रह्म तद्रूपच आहे, आणि प्रथम जेव्हां शब्दब्रह्मांत कोणताही पुरुष निष्णात होईल तेव्हांच त्याला परब्रह्मप्राप्ति होत असते, ( अर्थात् परब्रह्मप्राप्तीची हरिवंश ही पायरीच आहे ). हे राजश्रेष्ठा, हरिवंश श्रवण केल्यानें कायिक, वाचिक व मानसिक हीं त्रिविध पातकें सूर्योदयानें ज्याप्रमाणें अंधकार त्याप्रमाणें नष्ट होतात. अष्टादश पुराणें श्रवण केल्यानें जें कांहीं फल प्राप्त होत असेल तेंच फल हें हरिवंशरूप श्रीविष्णूचें यश जो कोणी भक्तीनें श्रवण करितो त्याला प्राप्त होतें; व श्रोता स्त्री असो किंवा पुरुष असो त्याला विष्णुपदप्राप्ति होते. हे राजा, कलियुगामध्यें या जंबुद्वीपांत असलें हें उत्तम पुराण ऐकणारांची संख्या मात्र फारच विरल होणार आहे हें मी तुला निःसंशय सांगतों. ज्या स्त्रियांना आपणांस पुत्र असावा अशी इच्छा असेल त्यांनीं हें हरिवंशरूप श्रीविष्णूचें यश अवश्य श्रवण करावें. ज्या पुरुषानें पूर्वजन्मीं कोणाचीं अर्भकें मारिलीं असतील अशाचीं अपत्यें या जन्मीं जगत नाहींत, तर अशा पुरुषानें ( हा दोष दूर होण्यासाठीं ) यथाविधी हरिवंशाचें स्मरण करावें. जो कोणी गुरू, चंद्र, अग्नि, किंवा सूर्य यांचे संमुख मूत्रोत्सर्ग किंवा रेतोत्सर्ग करितो त्याचें बीज टाकाऊ ( प्रजोत्पादनाविषयीं असमर्थ ) होतें. त्याचप्रमाणें जी स्त्री फलपुष्पांचा किंवा अर्भकांचा घात करिते किंवा फळें कापून टाकिते किंवा आईबापांची (त्यांच्या अपत्यांशीं ) ताडातोड करिते, किंवा अन्य स्त्रियांचे गर्भस्राव करविते किंवा गर्भांची हत्त्या करिते, अशा या पांचही प्रकारचीं कर्में करणाऱ्या स्त्रिया पातकी असल्यामुळें त्यांपैकीं कोणी पुष्परहित होतात ( त्यांना विटाळच येत नाहीं ), कोणाचीं पोरें उपजून उपजून मरतात, अथवा त्यांना एकच पोर होतें, किंवा पोरीच पोरी होतात, नाहीं तर त्यांस सदा धुपणी लागून गर्भच ठरत नाहीं, अशा या संततिहीन पातकी स्त्रीपुरुषांना उद्देशून हरिवंश गर्जना करून सांगतो कीं, माझें श्रवण करा, म्हणजे तुमचे हे सर्वही दोष तत्काळ नाहींसे होतील. जो पुरुष सुवर्ण, घृत व स्थल यांचें दान करून हा हरिवंश दहा वेळ श्रवण करील त्याचें बीज ( वर सांगितल्याप्रमाणें टाकाऊ न रहातां ) प्रजोत्पादनाविषयीं समर्थ होईल. ज्या स्त्रीला विटाळ येत नसेल तिनें याच्या दहा आवृत्ति ऐकाव्या; जिचीं पोरें मरत असतील तिनें सात; जिचा गर्भस्राव होत असेल तिनें पांच; जिला एकावर अपत्य होत नसेल तिनें तीन; व जिला सगळ्या पोरीच होत असतील तिनें एक ऐकावी. म्हणजे या पांचही वर्गांच्या

[1] ततः पदं तत्परिमार्गितव्यं । गीता, अ० १५.

स्त्रियांना पुत्र होतील. पूर्वजन्मार्जित सर्वच पातकें नष्ट व्हावीं अशी इच्छा असेल त्या स्त्रीनें आजन्म या ग्रंथाचें श्रवण करावें म्हणजे पुढील जन्मीं पुन्हा तिला अनपत्यत्वादि दुःखें प्राप्त होणार नाहींत. हरिवंशाचा अर्थासह पाठ करणें हा उत्तम पक्ष व अर्थावांचून नुसताच पाठ करणें हा मध्यम पक्ष. तथापि, अर्थावांचूनही कोणी बिनचूक पाठ केल्यास त्यालाही सार्थपाठाइतकें श्रेय आहे. या समग्र ग्रंथाचा नऊ दिवसांत पाठ करणें हा उत्तम पक्ष, एकवीस दिवसांत करणें हा मध्यम व एकतीस दिवसांत करणें हा कनिष्ठ होय. हे राजा, या कलियुगामध्यें कोणतीही इष्ट गोष्ट बहुत दिवसांनींच साधत असते. याकरितां ज्याला नियमित काळांत होत नसेल त्यानें आपले सोईप्रमाणें नित्य थोडें थोडें वाचून तरी या ग्रंथाचें पारायण करावें. पण, पारायणावांचून राहूं नये, असा व्यासनारायणाचा अभिप्राय आहे. हे राजा, कलियुगामध्यें वंध्यात्व दोष दूर करण्याचे कामीं या हरिवंशाचें नऊ, एकवीस किंवा एकतीस दिवसांत पारायण करणें हा एक यज्ञच आहे; व तो यज्ञ वंध्यात्व दूर करण्याविषयींचें आपलें सामर्थ्य गर्जून सांगतो आहे. हे राजा, हा ग्रंथ ऐकणें तर आरंभीं स्त्रीनें गोव्रत करावें व पुरुषाला ( पतीला ) घेऊन पारणा करावी. हे राजा, या ग्रंथाचा पाठ सुरू झाल्यापासून समाप्त होईपर्यंत शुभ असें मासव्रत करावें, व त्याचा विधि यथावत् मी तुला सांगतों तो ऐक. अशा स्त्रीनें त्या महिन्यांतील शुक्ल चतुर्थीच्या दिवशीं मोठ्या आनंदित मनानें प्रातःकालींच उठून अन्नपाणी न घेतां सूर्यास्त होईपर्यंत गोव्रत ( गाईची प्रतीक्षा ) करावें आणि सूर्यास्त होऊन गाय गांवांत परत आली म्हणजे तिचें यथाविधि पूजन करून तिला पुष्कळसे जवस खावयास घालून स्वतःही जवसाचेंच अन्न करून पारणा करावी. याप्रमाणें दर महिन्याच्या शुक्ल चतुर्थीस व्रत करावें. हे राजा, ज्याप्रमाण हें स्त्रियांचें गोव्रत मी तुला सांगितलें, त्याचप्रमाणें पुरुषांनींही करावें. हें व्रत केलें असतां करणाराला निश्चयानें सुपुत्र होईल.

---

## अध्याय दुसरा.

—:०:—

### श्रवणादि विधि.

वैशंपायन सांगतातः—हे राजा, आतां मी तुला नऊ दिवसांत हरिवंश ऐकण्याचा विधि सांगतों. हा विधि बहुधा अनेक प्रकारच्या साधनांची अनुकूलता असल्याशिवाय साधत नाहीं. असो; प्रथमारंभीं ज्योतिषाला बोलावून चांगला सुमुहूर्त निवडून देण्यास सांगावें, व लग्नसमयीं ज्याप्रमाणें जवळ पैशाची मुबलक तयारी लागते तशी सिद्ध ठेवावी; व ही कथा ऐकण्याला जो आरंभ करणें तो आषाढ, श्रावण, भाद्रपद, आश्विन, कार्तीक किंवा मार्गशीर्ष या महिन्यांत करावा. कारण, हे महिने आरंभकर्त्यांस इच्छित फलदाते आहेत. या व्रताचे कामीं असेच साह्यकर्ते निवडावे कीं, जे आळशी नसतील, उद्योगशील असतील. आपले घरीं हरिवंश कथा-पठण होणार आहे, तर कुटुंबवत्सल लोकांनीं ती ऐकण्यास अवश्य यावें, अशा आशयाच्या:बातम्या देशोदेशीं मुद्दाम पाठवाव्या. तसेंच बाहेरगांवीं जे जे विरक्त व किर्तनोत्सुक विष्णुभक्त असतील अशांनाच अशीं पत्रें पाठवावीं कीं, आपले घरीं कधीं न मिळणारा असा नऊ दिवसपर्यंत अपूर्व संतमेळा मिळणार आहे, तर वैष्णवांनीं अगत्य यावें. बाहेर देशांहून येणाऱ्या पाहुण्यांसाठीं बिऱ्हाडांच्या जागा तयार करून ठेवाव्या. हा श्रवण-

विधि एखाद्या पवित्र तीर्थाचे स्थलीं किंवा वनांत किंवा निदान गृहांत उक्त धरिला आहे. याकरितां या तिहींपैकीं साध्य असेल तें निवडून जेथें हजारों लोक बसूं शकतील असें एखादें विस्तीर्ण मैदान सन्निध पहावें. नंतर ती भूमी झाडून लोटून व सडासारवण करून शुद्ध करावी व धातूंनीं सुशोभित करावी. घरांतील भांडींकुंडीं असतील तीं सगळीं गोळा करून घरांतील एका कोंपऱ्यांत ठेवावीं. मग केळीचे खांब देऊन उंच असा मंडप उभारावा आणि त्या मंडपाच्या छताला सर्वभर फळें, पुष्पें व पल्लव टांगून शोभा आणावी. त्याच्या चारी दिशांना ध्वजा उभाराव्या, व त्याला तोरणही द्यावें. मग त्याचे वर सात लोक व खालीं सात लोक आहेत अशी कल्पना करून त्या ठिकाणीं विरक्त अशा ब्राह्मणांची समजूत घालून स्थापना करावी; व त्यांना आसनें देणें तीं त्यांच्या लोकांच्या अनुक्रमानें द्यावीं. तीं कल्पून झाल्यावर वक्त्यासाठीं एकदिव्य आसन तयार करावें. वक्त्यानें उदङ्मुख बसावें आणि श्रोत्यानें प्राङ्मुख बसावें किंवा वक्त्यानें प्राङ्मुख व्हावें आणि श्रोत्यानें उदङ्मुख बसावें. वक्ता नेमणें तो विरक्त वृत्तीचा, विष्णुभक्त, जातीचा ब्राह्मण, वेदशास्त्रांत निपुण, दृष्टांत देण्यांत कुशल, बुद्धिवान्, अस्खलित भाषण करणारा व दयाळू असा असावा. कारण, वेदवेदांताचीं तत्वें जाणणारे आणि ब्रह्मवादी अशा गुरूंनीं उपदेश केला असतां श्रोत्याला त्याचें तत्काल फल प्राप्त होतें. एरवीं चारचौघांसारखेच व केवळ नीति जाणणारे अशा गुरूंनीं उपदेश केल्यास फलसिद्धि कसली होणार ? अनेक प्रकारचीं धर्ममतें पाहून ज्यांचें चित्त भ्रमिष्ट झालें असून जे चोर व पाखंडवादी आहेत असे पुरुष धर्मशास्त्राचें कथन करण्यांत कितीजरी पंडीत असले तरी ते वर्ज्य करावेत. वक्त्याचे पाठीशीं त्याला साह्य करण्याकरितां लोकांचे संशय फेडून त्यांचे ठिकाणीं सद्बोध उमटविण्याविषयीं कुशल अशा एका दुसऱ्या पंडिताचीही स्थापना करावी. व्रत घेण्याचे आदले दिवशीं वक्त्यानें क्षौर करावें व श्रोत्या पुरुषानेंही करावें. नंतर, आरंभ करणें तो वक्त्याश्रोत्याला चन्द्रबल किंवा श्रोते दंपत्यांना नक्षत्रबल अनुकूल पाहून करावा. आरंभाचे दिवशीं यजमानानें अरुणोदयींच उठून शौचमुखमार्जन करून तत्काल स्नान करावें आणि नंतर नित्याचीं संध्यादि कर्मै थोडक्यांत आटपून घेऊन पुनरपि चांगले हातपाय धुऊन शुचिर्भूत व्हावें. नंतर स्वास्तिवाचनपूर्वक गाईचे शेणानें सारविलेल्या स्थलीं सर्वतोभद्र[१] नांवाचें मंडल काढावें. नंतर, आपल्या शक्तीप्रमाणें त्याचें सर्व पूजन करावें. नंतर कथेंत येणाऱ्या सर्व विघ्नांचा नाश व्हावा म्हणून गणनाथाचें पूजन करावें. नंतर, त्याच उद्देशानें देवपूजनपूर्वक पुत्रसहित लक्ष्मीसह श्रीगोपालकृष्णाची स्थापना करून त्याची पूजा करावी; आणि नंतर संकल्प करावा. त्या संकल्पांत प्रथम देशकालाचा उच्चार करून मी अमुक गोत्रांतील व अमुक प्रवरांतील अमुक नांवाचा मनुष्य जन्मोजन्मीं केलेल्या पापसंचयाचा नाश होऊन व त्या पातकानें या जन्मीं माझ्या संततीला होत असणाऱ्या अपायाचा परिहार होऊन मला आतां या जन्मीं पुत्रसंतान होऊन तें शतायुषी व्हावें व मलाही सकल सुखाची प्राप्ति होऊन व माझें इहलोकीं शरीर शुद्ध होऊन मरणोत्तर मला इंद्रादि लोक ओलांडून त्याचेही वर असणारें जें

१ हें एक चारी तोंडांनीं सारखेंच दिसणारें असें एक तऱ्हेचें रेखामंडल आहे. याचें वर्णन फार विस्तृत असल्यामुळें येथें देतां येत नाहीं. एखादे वैदिकास विचारावें.

श्रीवैकुंठ तेथें गमन होऊन भक्त्युत्कंठेमुळें कल्पावधी वर्षेंपर्यंत वसतीचा लाभ मिळून अंतीं विष्णुस्वरूप प्राप्ति व्हावी म्हणून आम्ही दोघे ( दंपत्य ) (आणि कर्ता एकटाच असल्यास) मी यजमान या नात्यानें हरिवंशाचें श्रवण करितों ( तें ) या प्रकारचा संकल्प करावा. नंतर, वेदाध्ययनसंपन्न अशा वक्त्याचें पूजन करून त्याची प्रार्थना करावी, आणि सुवर्ण मुद्रिका व विशेषतः सुवर्ण कुंडलें व पागोट्यासह उत्तरीय व नेसूंचें वस्त्र व पुष्पें, तांबुल, चौसष्टतोळे सोनें, सुपारी व अक्षता हातीं घेऊन संकल्प करावा. तो असाः—रीतीप्रमाणें अद्येत्यादि वगैरे म्हणून मग आम्ही अमुक गोत्राच्या व अमुक नांवाच्या ब्राह्मणाला तुला हीं चन्दन, तांबूल, सुवर्ण व वस्त्रें इत्यादि अर्पण करून आम्हीं उभयतांना हरिवंशाचें श्रवण घडावें याकरितां हरिवंशाचा वाचक म्हणून वरितों असें दंपतींनीं म्हटल्यावर त्या वक्त्यानें "बरें आहे, मी तुमचा झालों" असें उत्तर दिल्यावर "वृतेन दीक्षामाप्नोति" हा मंत्र म्हणून वक्त्याच्या उजव्या मनगटांत रक्षा—बंधन करावें व त्या वक्त्या ब्राह्मणानें उलट श्रोत्यांना रक्षाबंधन करावें. नंतर, श्रोत्यांनीं चंदनादि उपचार, वस्त्रें, पुष्पें, अक्षता, सुवर्णालंकार, सुपाऱ्या व त्या ऋतूंतील फळें यांचे योगानें पोथीचें षोडशोपचार पूजन करावें. याशिवाय कांहीं विद्वान् विद्वान् ब्राह्मणांचेंही पूजन करून श्रवणास आरंभ करावा, म्हणजे तें श्रवण फलदायक होतें असें म्हटलें आहे. याकरितां वर सांगितलेल्या सर्व गोष्टी यत्नपूर्वक करून श्रवण आरंभावें. श्रवणारंभीं

"नमस्ते भगवन् व्यास सर्वशास्त्रार्थकोविद ॥
ब्रह्माविष्णुमहेशानमूर्ते सत्यवतीसुत ॥ १ ॥"

( अर्थ ) हे त्रिमूर्तिस्वरूप, सर्व शास्त्रार्थज्ञ सत्यवतीपुत्र भगवन् व्यास आपणास नमस्कार असो. या मंत्रानें व्यासास वंदन करून प्रतिदिवशीं पवित्रस्थलीं दर्भासनावर बसून उल्हासवृत्तीनें भक्तिपूर्वक श्रवण करावें. श्रवण करितांना आपणास जर सुकृतप्राप्ति पाहिजे आहे तर पुराणिक पोरवय असो, बाप्या असो, जरठ असो किंवा दरिद्री आणि दुर्बल असो; तो सदा वंद्य आणि पूज्यच मानिला पाहिजे. कारण, ज्याअर्थी त्याचे मुखांतून येणारी वाणी जीवांना कामधेनूसारखी फलदात्री होणारी आहे त्या अर्थी पुराणिकाविषयीं केव्हांही नीच बुद्धि ठेवूं नये. लोकांमध्यें जन्मतः व गुणतः कांहीं पुरुष गुरु म्हणून मानिले असतात; परंतु, पुराणिक हा या सर्व गुरूंपेक्षांही श्रेष्ठ आहे. कारण, कोट्यवधी जन्मांत जो पुनःपुनः जीवांना उपदेश करून पुण्याकडे प्रवृत्त करितो, त्या ज्ञानदात्या पुराणिकापेक्षां अधिक श्रेष्ठ गुरु तो कोण असणार ? याप्रमाणें वक्त्याविषयीं श्रोत्यांनीं भावना ठेवावी; व वक्त्यानेंही एकंदरींत शान्त, दान्त, पवित्र, जितमत्सर, साधुशील, दयार्द्र व वाक्पटु असून सद्बुद्धीनें पुण्यकथा सांगाव्या; आणि जोंपर्यंत तो पुराणिक या नात्यानें व्यासपीठावर बसला आहे तोंपर्यंत त्यानें कोणासही नमस्कार करूं नये. जे कोणी धूर्त, दुर्वृत्त किंवा पुराणिकावर आपली सरशी करावी अशा प्रकारें कुटिलवृत्ति धारण करणारे असतील अशांपुढें त्यानें पुराण सांगूं नये. जेथें दुर्जन, शूद्र किंवा श्वापद यांची गर्दी आहे अशा प्रदेशांत किंवा अपवित्र गृहांत शहाण्यानें पुण्यकथा सांगूं नये. सज्जनांनीं भरलेल्या एखाद्या चांगल्या गांवांत, एखाद्या क्षेत्रांत, देवालयांत किंवा एखाद्या पवित्र नदीचे तीरीं त्यानें कथा सांगावी. हे राजा, आतांपर्यंत सांगितलेल्या सर्व अटी

पाळणारा जो वक्ता असेल अशाच्या मुखांतून कथा ऐकल्यास ती फलदात्री होते; व तिजपासून इहपरलोकीं कल्याण होऊन पुत्रादिप्राप्ति होते.

हें हरिवंशपुराण महापापनाशक आहे, व ज्यांना पुत्रादि कामना असेल त्यांनीं जितेन्द्रिय राहून तत्प्रीत्यर्थ याचा परिचय करावा; म्हणजे, पापनाशक आणि पुण्यप्रद असें हें पुराण पूर्णभक्तीनें ऐकावें.

## अध्याय तिसरा.

—:०:—

### श्रवणविधि.

वैशंपायन सांगतातः—ज्ञात्यांनीं जपाहूनही हरिवंशश्रवण विशेष सांगितलें आहे. पितरांचें संतर्पण करून शुद्धयर्थ प्रायश्चित्त करावें. चांगलें मंडल करून तेथें श्रीकृष्णाची स्थापना करावी, व प्रदक्षणा नमस्कारापर्यंत त्याची समंत्रक यथाविधि पूजा करावी; आणि पूजान्तीं प्रार्थना करावी कीं, हे करुणानिधे, मी दीन असून या संसारसागरांत बुडत आहें व तेथें कर्मरूपी नक्र मला आपल्या जबड्यांत धरीत आहे. तर अशा या भवार्णवांतून तूंच मला सोडव. अशी प्रार्थना करून श्रीहरिवंशग्रंथाची धूपदीपसह आस्थेनें षोडशोपचारविधीपूर्वक पूजा करावी. नंतर, पोथीपुढें नारळ ठेवून नमस्कार करावा; आणि प्रसन्न चित्तानें त्याची स्तुती करावी. ती अशीः—"हे समर्था, मी या भवसागरांत असतां मला पुत्र व्हावा म्हणून तुजकडे आलों आहें. तर तूं हा माझा मनोरथ निर्विघ्नपणें सिद्ध कर. कारण, हे केशवा, मी तुझा दास आहें." याप्रमाणें दीनपणें विनवणी करून नंतर वक्त्याची पूजा करावी; व त्याला वस्त्रानें सुभूषित करून नंतर पूजान्तीं त्याची स्तुति करावी कीं, 'हे व्यासरूपा, हे प्रबुद्धा, हे सर्वशास्त्रनिपुणा, आपण या कथेचें प्रकाशन करून माझे अज्ञानाचा ध्वंस करावा.' नंतर मोठ्या आनंदानें कांहीं तरी नियम करावा व आत्मकल्याणार्थ यथाशक्ति तोच नऊ दिवस पाळावा. कथेला भंग येऊं नये म्हणून पांच ब्राह्मण निवडून त्यांचेकडून यथाक्रम हरीचा द्वादशाक्षरी मंत्र, संतानगोपाल मंत्र, महारुद्र जप, पार्थीवपूजन व गणेशमंत्राचा जप करवावा. विष्णुभक्त—ब्राह्मण व अन्य कीर्तनकार यांचें नमनपूजन करून त्यांची आज्ञा घेऊन नंतर स्वतः आसनावर बसावें. श्रवणसमयीं मनांतील आप्तमित्र, धनदौलत, घरदार, इत्यादिकांचे सर्व विचार सोडून देऊन शुद्धचित्तानें जो केवळ कथेंतच गढून जाईल त्याला उत्तम फल मिळेल. श्रवण करणारें दंपत्य असल्यास उभयतांनींही सारखेंच शुद्धमनानें व श्रद्धाभक्तीनें श्रवण करावें. कारण, सर्व धार्मिक कृत्यांत श्रद्धा हीच मातेप्रमाणें कल्याणकर्ती आहे. मनुष्यांना उभयलोकीं सिद्धि देणारी श्रद्धाच आहे. मनुष्य श्रद्धेनें पूजन करील तर त्याला दगडही इष्टफल देईल. मूर्ख कां असेना, त्याचें कोणी भक्तिपूर्वक पूजन करील तर तोही ज्ञानदाता गुरु होईल. सामान्य कां मंत्र असेना, भक्तिपूर्वक जपानें तोही फलप्रद होतो. नीचानेंही श्रद्धापूर्वक पूजा केल्यास देव त्याला इष्टफल देतो. परंतु, अश्रद्धेनें केलेली पूजा, दान, व्रत, यज्ञ व तप हीं सर्व वंध्यवृक्षाच्या पुष्पाप्रमाणें निष्फल होतात. सर्वत्र संशयानें भरलेला श्रद्धाहीन व अतिचंचल पुरुष परमार्थापासून च्युत होऊन संसाराचे फेऱ्यांतून कधीं सुटत नाहीं. मंत्र, तीर्थ, द्विज, देव, दैवज्ञ, औषध व गुरु हीं ज्याची जशी भावना असेल तसें त्याला फल देतात. यावरून पहातां सर्व कांहीं भावनेवर अवलंबून आहे. पुण्य व पाप हे तरी भावनेचेच खेळ आहेत.

भावहीनाला यांतून कांहींच प्राप्त होत नाहीं. याकरितां, हे राजा, सर्वथा भक्तिश्रद्धा यांचा आश्रय करावा. सूर्योदयापासून दोनप्रहर भरेपर्यंत बुद्धिवान् वाचकानें गंभीर सुरानें नीटपणें कथा वाचावी. दोनप्रहर भरतांच दोन घटका विराम करावा. नंतर, दुसरीं कांहीं कीर्तनें त्या कथेस अनुसरून करावीं. याप्रकारें यथाविधि श्रवण केलें असतां श्रोत्याच्या सर्व इच्छा पुरतील.

## अध्याय चवथा.

—:o:—

### श्रोत्यांचे नियम व ब्राह्मणस्त्रीची कथा.

वैशंपायन सांगतातः—आतां हें नवाहव्रत धारणकर्त्या पुरुषांनीं कोणते नियम पाळावे ते ऐक. या श्रोत्यानें एक वेळ जेवावें, भुईवर निजावें व ग्रंथसमाप्तीपर्यंत ब्रह्मचर्यानें रहावें. हरिवंश चालला आहे तों उपास सोडतांना दरवेळीं पायस व चरू हींच भक्षावीं; कारण, मलमूत्रांचे जयाकरितां लघु आहार हितावह आहे. श्रोत्यानें एक तर एकवेळाच हविष्यान्न खावें किंवा शक्ति असेल तर नवरात्र उपोषणच करावें. तें न साधेल तर केवळ दूध किंवा तूप पिऊन अथवा फळें खाऊन रहावें. नाहीं तर एक-भुक्तच रहावें. हे अनेक मार्ग आहेत. यांतील सोईचा पडेल तो करून कथा श्रवण करावी. मी असें समजतों कीं, उपवासानें जर कथेकडे लक्ष धड रहात नसेल तर त्यापेक्षां स्वच्छ जेवण करून स्वस्थ मनानें कथा ऐकणें हेंच अधिक बरें. ज्याला श्रवण करणें त्यानें पवित्र व एकचित्त असावें. स्त्रीपुत्रांसह प्रातःस्नान करून कृष्णपूजनपूर्वक कथाश्रवण करावें. पुष्प, धूप, फल व योग्य प्रकारचे नैवेद्य हीं श्रद्धापूर्वक श्रीकृष्णाला अर्पण करून फलेच्छूनें गुरुशुश्रूषा करावी; व यथेच्छ श्रवण झाल्यावर पुण्यमार्गानें शौच करावें. सांयकाळीं गुरुश्रेष्ठांचा बांधवांसह संतोष करून आपल्या स्त्रीपुत्रादिकांत सुखानें निजावें. मात्र पाप घडूं नये म्हणून इन्द्रियें स्वाधीन ठेवावीं. सर्व काल विष्णूकडे चित्त ठेवून व्यवहार करावा व पवित्र आणि निष्कपट मनानें राहून पत्रावळीवर भोजन करावें; व तेंही व्रती—पुरुषानें कथाश्रवण संपल्यावर करावें. द्विदल धान्य, मध, तेल, जडान्न, दृष्टावलेलें किंवा शिळें अन्न हीं व्रतस्थ श्रोत्यानें वर्जावीं. त्याचप्रमाणें वांगें, कलिंगड, करपलेलें अन्न, मसुरा, पावटे, मांस, कांदा, लसूण, हिंग, मुळा, गाजर व कोहळा हींही खाऊं नये. काम, क्रोध, मद, मान, मत्सर, लोभ, दंभ, द्वेष व मोह, या सर्वांना दूर ठेवावें. वेद, विष्णुभक्त ब्राह्मण, गुरु, गाई, व्रती, स्त्रिया व महात्मे यांची निंदा व्रतस्थानें वर्ज्य करावी. रजस्वला, म्लेंच्छ किंवा पतितस्त्री, ब्रह्मद्वेष्टे व वेदबाह्य जाती यांशीं त्यानें भाषण करूं नये. सत्य, शौच, दया, मौन, आर्जव, विनय व उदारचित्तता यांचा अवलंब करावा. श्रद्धाभक्तीनें असणारे, अन्यकार्यांत मन न घालणारे, मौनी, शुचि व एकचित्त, अशा श्रोत्यांना पुण्यप्राप्ति होते. जे अधम मनुष्य अभक्तीनें असल्या पुण्यकथा ऐकतात, त्यांना पुण्य न लागतां जन्मोजन्मीं दुःख मात्र होतें. जे कोणी तांबूलादि सामुग्रीनें पुराणाची पूजा करून मग भक्तीनें श्रवण करितात, ते दरिद्री किंवा पापी रहात नाहींत. पण, कथा चालली असतां जे मध्येंच उठून जातात अशांची स्त्री व संपत्ति ऐनभोगाच्या रंगांत त्यांना हिसका देते. जे कोणी डोकीस पागोटें घालून असली पवित्र कथा ऐकतात ते अधम पातकी बगळ्याचे जन्मास जातात. जे कोणी विडा खात खात ही पवित्र कथा ऐकतात, त्यांजकडून यमकिंकर पुढें

त्यांचीच विष्ठा खाववितात---स्त्री जर तोंड रंगवून कथा ऐकेल तर तिचें मुख रजस्वलेच्या योनीसारखें होईल. जे दांभिक उच्चासनावर बसून ही कथा ऐकतात ते सदा नरक खाणारे कावळे होतात. जे कोणी वीरासनावर किंवा शय्यासनावर बसून कथा ऐकतात ते अर्जुन वृक्ष होतात. नमस्कार न करितां ऐकतात ते विषवृक्ष होतात. पासले पडून ऐकतात ते अजगर होतात. व्यासाचे बरोबरीच्या उच्चासनावर बसून जो कुटिल मनुष्य कथा ऐकेल त्याला गुरुस्त्रीशीं गेल्याचें पाप लागून तो नरकास जाईल. जे मनुष्य असल्या पापघ्न कथेची निंदा करितात ते शंभर जन्म कुत्रे होतात. कथा चालली असतां जे दुरुत्तर बोलतात ते प्रथम गर्दभ होऊन नंतर सरडे होतात; व जे असली पुण्यकथा कधींच ऐकत नाहींत ते घोर नरक भोगून शेवटीं रानडुकर होतात. जे पाजी लोक कथा चालली असतां विघ्न आणितात ते कोटवर्षें नरकांत राहून शेवटीं ग्रामडुकर होतात. कथेंत बोलूं नये, तशानें नरक मिळतो. कथा ऐकतांना पोरें खेळवूं नये, थट्टामस्करी करूं नये, स्त्रियांशीं बोलूं नये, त्यानें कथेचा विच्छेद होतो. हे मुनिश्रेष्ठा, विच्छेदकर्त्याला ब्रह्महत्त्येतुल्य पातक लागतें, म्हणून स्त्रियांनीं किंवा पुरुषांनीं मध्यें अन्य गोष्टी करूं नयेत; त्यानें नरक प्राप्त होतो. हे मानदा, या कामीं मी तुला एक जुनी गोष्ट सांगतों, ती ऐक. म्हणजे तीवरून कथा चालली असतां मध्यें कोणीच कां बोलूं नये, हें तुझे ध्यानीं येईल.

पूर्व कालीं जनस्थान क्षेत्रांत एक सदाचार-संपन्न वेदपारग व धर्मशास्त्रांत अति-निपुण असा ब्राह्मण रहात असे. तो नित्य गंगास्नान करून नंतर मध्याह्नपर्यंत आह्निक आटपून व देवपूजा करून नंतर पुराणश्रवण मोठ्या तत्परतेनें करीत असे. त्याची स्त्री मोठी दुष्ट, कर्कशा, भांडखोर, खोटें बोलण्यांत पटाईत व दुसऱ्याचा द्वेष करणारी अशी होती व ती पापिणी अमार्गानें नवऱ्याविरहित आपला स्वतंत्र द्रव्याचा कुणगा करीत असे व नवऱ्याला कोरडें अन्न वाढून आपण तेवढी बाजारांतून स्वतः दहीं, दूध, साखर, तूप, लोणी, इत्यादि आणून नित्य एकांतांत भक्षीत असे. ती मोठी हट्टी, दुष्ट मनाची, पतिनिंदक, मोठी पापाचरणी व खुशाल दुसऱ्याच्या घरांत जाऊन निजणारी अशी होती. बापडी कधीं बरें बोललीच नाहीं. नित्य नवें कुभांड लोकांवर घेण्याला तयार. पंक्तींत वाढावयाला आली तरी नित्य प्रतारणा करून कठोर भाषण बोलावयाची. अतिथीशीं तर तिचें सदा हाडवैर. याप्रकारें धर्मकृत्याचा नाश करणारी मोठी पटाईत होती. तिचा पति सज्जन, गुणी, सौम्य वृत्तीचा व सन्मान्य असा होता. परंतु, तो पुराणश्रवणाला बसला कीं, या बयानें बिनचूक तेथें जाऊन नित्य त्याची निंदा करावी कीं, तूं एखाद्या संन्याशाप्रमाणें सर्व उद्योग टाकून रिकामटेकडा कथा ऐकत बसलास, आणि मोठें व्यासाचें अनुकरण करितों असें समजतोस, पण, आला तो दिवस मला हीं तुझीं पोरें खाण्यासाठीं तोडतात, याला मीं काय करावें? त्यांच्या खाण्याची तजवीज मी कशी करावी सांग तरी? तुझ्या घरांत मूठभर अन्न नाहीं, वीतभर वस्त्र नाहीं किंवा दांतावर मारायला कवडी नाहीं. तेव्हां मीं करावें तरी काय आणि जावें तरी कोठें? त्या मेल्या दुष्टपापी ब्रह्मदेवानें माझ्या कपाळीं तुझेसारखा मूर्ख, आळसडा, दरिद्री, निष्ठुर, पोरांबाळांविषयीं ममताहीन असा असून कथा-

श्रवणांत मात्र गढलेला असा पति लिहिला तरी कसा! मला वाटतें, मजसारखी दुर्भागी या पृथ्वींत मी एकटीच असेन. कारण, मी या शतदरिद्र्याच्या घरीं आल्यापासून मला कधीं पोटभर अन्नसुद्धां मिळालें नाहीं. ज्यांचे पति उद्योगी असून धनधान्यादि संपत्तीनें शोभित असतील त्या स्त्रिया खचित धन्य होत. किती तरी पुरुष बायकांच्या आज्ञेंत राहातात, त्यांच्या पोरांचें संगोपन करितात व नित्य घरीं राहून आपल्या स्त्रियांना संतुष्ट ठेवितात, ते घरांत चांगलें चमचमीत खाणें खात असल्यानें चांगले पुष्ट असतात, आपल्या स्त्रियांचा शब्द झेलतात, इतकेंच नव्हे तर इतके बुद्धिवान् असतात कीं, आपल्या बायकांचा कामधंदा देखील उरकितात. नाहीं तर, मला मिळाला आहे हा मूर्ख व दळभद्या; घराकडे कसा तो मुळींच बघत नाहीं! आजच पहा कीं, माझे घरांत तेल नाहीं, सर्पण नाहीं, मिठाची चिमटी नाहीं. बरें, मूठभर भाजी नाहीं किंवा कसा तो धान्याचा दाणाही नाहीं; असला हा दादला मला मिळाला, आतां मीं करावें तरी कसें? खरें पाहातां घरांत धान्यादिक सर्व कांहीं असतांना ती मिथ्या भाषण करणारी कर्कशा, तिचा बिचारा सदाचरणी पति कथाश्रवणाला बसला असतां नेमानें रोज तेथें येऊन याप्रमाणें कथेला विघ्न आणीत असे. नंतर कांहीं काळानें ती दुष्टबुद्धि स्त्री मरण पावली तेव्हां यमदूतांनीं तिला बांधून यममंदिरीं नेलें, व तेथें यमाचे आज्ञेवरून दीर्घकालपर्यंत नरकांत ढकलून दिलें. नरकांतून सुटल्यावर ती एका भयाण व निर्जन अरण्यांत राक्षसी होऊन पडली, व तेथें पूर्व पापाच्या जोरानें तिला अन्नपाणी कांहींही मिळत नसे व ती भुकेतान्हेनें तडफड तडफड करी.

वैशंपायन म्हणतातः—हे राजा, या वरील स्त्रीचे इतिहासावरून मी तुला असें सांगतों कीं, पुरुष असो वा स्त्री असो; कोणीही हरिकथा श्रवण करीत असतां मध्यें विघ्न आणूं नये. कथाश्रवणाचा विघात किंवा अव्हेर करणारे पुरुष कितीही चतुर असले तरी या पापामुळें जन्मांतरीं ते माती खाणारे किडे, रेडे, हंस किंवा बक यांच्या वृत्तींचे, बोके, कावळे, लांडगे व चिखलांतील जळवा यांच्या सारखे अथवा सच्छिद्र कुंभ किंवा जलनिधींतील दगड, या प्रकारचे होतात. जो कोणी दरिद्री, क्षयी, रोगी, अभागी, पापी, अनपत्य किंवा मुमुक्षु असेल त्यानें ही कथा अवश्य ऐकावी. जी कोणी स्त्री पुष्पहीन, काकवंध्या, वंध्या, मृतार्भका किंवा स्रवद्गर्भा असेल तिनें तर ही कथा खटपट करून ऐकावी. कारण, ही श्रीहरीची कथा ऐकल्यास व्यासाचे वचनाप्रमाणें, हे राजा, त्या स्त्रीला सत्पुत्र होऊन इतरही सर्व तिच्या इच्छा पूर्ण होतील.

## अध्याय पांचवा.

—:०:—

### व्रतोद्यापनविधि.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें व्रतविधि झाल्यावर मग उद्यापन करावें. ज्यांना फलाकांक्षा असेल त्यांनीं व्रताप्रमाणेंच अत्यंत आस्थेनेंच हें उद्यापन करावें. ज्या भक्तांपाशीं द्रव्यसाह्य नसेल अशांनीं उद्यापन केलें पाहिजे, असा आग्रह नाहीं. नुसत्या श्रवणानेंच ते पवित्र होतात. कारण, ते विष्णुभक्त असून निष्काम असले म्हणजे पुरे. असो; वर सांगितलेला व्रतरूपी नऊ दिवसांचा यज्ञ पुरा झाला म्हणजे श्रोत्यांनीं वक्ता व पुस्तक यांचें अतिभक्तीनें पूजन करावें; आणि सर्व श्रोते मंडळीला प्रसादादाखल तुळशीमाळा वांटाव्या. नंतर तालमृदंगानें रंगलेलें असें उत्तम कीर्तन

करावें; कीर्तनांत जयशब्द, नमःशब्द व शंखशब्द यांचा गजर करावा. नंतर ब्राह्मण व याचक यांस द्रव्य व अन्न द्यावें; व श्रवणांतीं चार तोळे सोन्याची अंकावर लक्ष्मी घेतलेली अशी श्रीकृष्णाची मूर्ती द्यावी; व अखेरीस वाचकाला समारंभानें रेशमी वस्त्र द्यावें; ही गोष्ट ज्ञात्या मुनींनीं या स्थळीं विशेष म्हणून सांगितली आहे. नंतर, संहिता जाणणाऱ्या त्या पुराणिकानें सर्व अनुष्ठान संपून योग्य दिवशीं स्वतः शुभ्र वस्त्र नेसून व रेशमी अंगावर घेऊन व अलंकार घालून पवित्रपणें त्या संहिता पुस्तकाची पवित्र स्थानीं स्थापना करून गंधमाल्यादि भिन्न उपचारांनीं मन लावून पूजा करावी, व त्या ग्रंथापुढें नानाप्रकारचे सुंदर सुंदर घृतपक्व व इतर भक्ष्यभोज्य पदार्थ अर्पण करावे; व सुवर्ण आणि इतर द्रव्य यांची दक्षिणा द्यावी.

जे कोणी ही पुण्यपुराणकथा मनुष्यांस ऐकवितात ते साग्र—शतकोटि कल्पेंपर्यंत वैकुंठवास करितात. जे कोणी पुराणिकाच्या बैठकीसाठीं लोंकरीचें आसन, कृष्णाजिन वस्त्र किंवा चौकी किंवा पाट देतात, ते स्वर्गीं जाऊन मनसोक्त भोग भोगून नंतर ब्रह्मलोकीं राहून अखेर अक्षय पदास पोंचतात. जे पुराणिकाला कोरें सुती वस्त्र देतात, ते भाग्यवान् पुरुष जन्मोजन्मीं ज्ञानी होतात. जे कोणी पंच महापातकें किंवा क्षुद्र पातकें यांनीं युक्त असतात तेही श्रवणानेंच परमपदाला पोंचतात. जो कोणी हरिवंशाची पोथी लिहून वाचकाला देईल, त्याला भूमिदानाचें फल मिळेल. जो कोणी समग्र हरिवंश ऐकेल त्यानें, हे राजा, राजसूय आणि अश्वमेध यज्ञ करून सर्व प्रकारचीं दानें दिल्यासारखें होईल. राजसूय व अश्वमेध हे यज्ञ पूर्वयुगांत प्रत्यक्ष करणें भाग होतें. परंतु, कलियुगांत हरिवंशश्रवणानेंच यज्ञफल मिळतें. कोणीही श्रद्धालु, आस्तिक, व जितेंद्रिय असा पुरुष हरिवंशाला आरंभ करूं लागला म्हणजे त्याच्या पातकांना धाक पडतो व तीं त्याला विघ्नें आणितात. परंतु, या विघ्नांस न जुमानितां जो कोणी हा हरिवंश ग्रंथ आरंभून पल्ल्यास पोंचवितो, त्या पुरुषाच्या दर्शनस्पर्शनानें प्रत्यक्ष श्रीविष्णूचें दर्शनस्पर्शनाचें पुण्य लागतें, आणि, हे राजा, त्याच्या तीन जन्मांच्या पातकांचा तर निश्चयानेंच झाडा होतो. हरिवंशाची फलश्रुति ग्रंथसमाप्तीनंतर ऐकावी. पुरुषाला प्रथम भारत ऐकावेंसें वाटणें हीच त्याच्या पुण्याईची पहिली खूण आहे. कारण, भारताचे योगानें ओघानेंच त्याला हरिवंशश्रवण करण्याची इच्छा होते. महर्षि व्यासानें सर्व पुराणें, वेद व स्मृति यांचा सारांश हरिवंशांत बांधून टाकिला आहे. ( अशी या ग्रंथाची महती आहे ) व म्हणूनच, हे राजा, श्रुतिस्मृति व पुराणें, यांची निंदा करणारे पाप्यांना हा ग्रंथ वाचकांनीं ऐकवूं नये. असो; जे लोक हा ग्रंथ ऐकतील त्यांनीं प्रसन्न चित्तानें जितेंद्रिय, यशस्वी, मनोहर, शुद्ध व स्पष्ट असा अक्षरोच्चार करणारा, कायावाचामनानें शुद्ध, सदाचारी, शान्त व वादपराङ्मुख अशा वाचकाचें पूजन करून त्याला एखादा भरवस्तीचा गांव इनाम द्यावा. शिवाय कर्णभूषणें, पागोटें, माळा, पादुका, जोडा, छत्री व चांदवा किंवा मंडपी हीं विधीनें दान द्यावीं. खेरीज अनुकूल असल्यास मोठ्या आनंदानें सपत्नीक व कुटुंबवत्सल अशा त्या वाचकाला बैलगाडी, घोडा, हत्ती, रेशमी वस्त्र, रत्नखचित आसन, आगीसारख्या लाल तांब्याचीं भांडीं, कमळें व अजिनें हीं द्यावीं, व त्याला उत्तम वस्त्रें नेसवून व अलंकार घालून त्याचें व्यासस्वरूपानें ध्यान करून त्यास भक्तिपूर्वक नमस्कार करावा.

वाचक तुष्ट झाल्यानें सर्व देवता संतुष्ट होतात, यास्तव हरिवंशश्रवणाचें फल मिळावें अशी ज्यांना इच्छा असेल त्यांनीं या कामीं द्रव्य खर्चण्यांत आळस करूं नये. तोळा, दोन तोळे, चार तोळे सुवर्ण वर घालून एखादी शुभलक्षणी सवत्स गायही ब्राह्मणाला द्यावी. सारांश, कांहींतरी करून मोठ्या आस्थेनें वाचकाचा संतोष करावा. कारण, हे राजा, वाचक तुष्ट झाल्यानें सर्व देवता तुष्ट होतात व देवता तुष्ट झाल्यानें सर्व कार्यें सफल होतात. हरिवंशसमाप्तिनंतर वाचकाची पूजा करणारे पुरुष ऋणत्रयांतून मुक्त होऊन त्यांचे पितर, हे राजा, अक्षय्यलोक प्राप्त होऊन आनंदांत रहातात. हरिवंशाचा आरंभ करून ज्यानें तो निर्विघ्न संपविला असा पुरुष निष्पाप होऊन आपल्या पितरांसह इच्छित तें फल पावतो. शिवाय वर सांगितल्याप्रमाणें विधान केलें असतां मनुष्याला संतति, धन, आरोग्य, आयुष्य, सौभाग्य व गुणांचा गौरव हीं उत्तम प्रकारें प्राप्त होतात. या म्हणण्याच्या खरेपणाबद्दल कोणीही संशय घेऊं नये.

## अध्याय सहावा.

—:०:—

### दान व व्यासपूजन.

जनमेजय विचारितोः—हे मुनिश्रेष्ठा वैशंपायना, या अनुष्ठानाला प्रारंभ कसा करावा; याचा पूजाविधी कसकसा सांगितला आहे; व्यासाची बोळवण कशी करावी व कशाप्रकारें सर्वोत्तम फल मिळेल हें मला विस्तारून सांगा.

वैशंपायन सांगतातः—हे राजा, ऐक. मी तुला वंध्येस निश्चयानें संतति कोणत्या विधिनें होईल, ते सांगतों. वैशाख, माघ, कार्तिक, अथवा अशाच दुसऱ्या शुभ मासांतील शुक्ल पक्षांत पूर्णा[1], नंदा, भद्रा किंवा जया या तिथींना गुरु, शुक्र, चंद्र किंवा बुध यांतील कोणता तरी वार, व श्रवण, हस्त, पुष्य, मूल, पुनर्वसु, किंवा इंद्र, चंद्र व पूषा या ज्या नक्षत्रांच्या देवता आहेत अशांपैकीं म्हणजे ज्येष्ठा, मृग व रेवती यांपैकीं कोणतें तरी किंवा अश्विनी यांपैकीं एखाद्या नक्षत्रावर व सौभाग्यादि योगावर व विष्टिरहित करणावर[2] वक्ता व श्रोता या उभयतांना अनुकूल असे चंद्रबल पाहून पूर्वाह्णीं किंवा मध्याह्णी सूज्ञांनीं हरिवंशाला आरंभ करावा. प्रथम गणपतिपूजन करून नंतर कलशपूजन करावें व ग्रंथ समाप्त होईपर्यंत प्रति दिवशीं चंदन, अगरू, कापूर, केशर, यांचे सुवासिक लेप, कमल, चंपक जाती व इतर सुगंधी पुष्पें, तुळशी, बिल्वपत्रें, आंवळीचीं पानें, दुसरे नूतन पल्लव, नानाप्रकारचे धूपदीप, नारीकेलादिक फलें, तांबूलादि मुखवासनें, अखंड शुभ्र तंदुल, चामर, व्यजन व घंटानाद इत्यादिकांहीं देवतापूजन करावें; व व्यतिपातादि दोष नाहींत अशा एखाद्या शुभ वारीं पुराण ईश्वरार्पण करून पूजा करावी. व समाप्तीचे वेळीं आरंभाप्रमाणेंच चंदन, अगरू, कपुर, कुंकू इत्यादिक सुवासिक द्रव्यांनीं पूजा करून गायन, वादन, नर्तन यांच्या योगानें महोत्सव करावा. नंतर पोथीची पूजा करितांना दान कसकसें द्यावें तें ऐक.

---

१ प्रतिपदादितिथींना क्रमानें नंदा, भद्रा, जया, रिक्ता व पूर्णा, अशीं पुनःपुनः नांवें दिलीं आहेत. यांतील रिक्ता तिथी म्हणजे चतुर्थी, नवमी व चतुर्दशी या येथें वर्ज्य आहेत असें समजावें व अमावास्याही वर्ज्य समजावी.

२ पंचांगाचीं तिथि, वार, नक्षत्र, योग व करण हीं पाच अंगें आहेत. त्यांत करणें हीं सात असतात. त्यांचीं नांवें:—बव, बालव, कौलव, तैतिल, गर, वणिज, विष्टि;—हें शेवटलें वर्ज्य.

हे जनमेजया, उत्तम पक्ष म्हणजे अशा वेळीं पुराणिकांस अठराशें राजमुद्रा द्याव्या, बाराशें देणें हा मध्यम पक्ष, व सहाशें देणें हा कनिष्ठ पक्ष सांगितला आहे. यांपैकीं अनुकूलतेचे मानानें कोणता तो स्वीकारून व्यास व त्याची पत्नि या उभयतांना उंची कोरीं वस्त्रें देऊन प्रेमानें पूजावें म्हणजे उत्तम फल मिळतें. शिवाय परिधानार्थ इतर वस्त्रें, अलंकरणार्थ सुंदर कुंडलें, मुकूट, बाहुभूषणें, सलकडीं इत्यादी द्यावीं. पाडसें वासरूं बरोबर असलेल्या अशा गाभण्या कपिला गाई द्याव्या. अश्वादिक वाहनें, दासदासीही द्याव्या. हे पुरुषव्याघ्रा, याखेरीज आसन द्यावें. धूपदिपाचीं पात्रें द्यावीं. उशीसकट मृदु शय्या द्याव्या; आंत लाडू घालून स्थाली द्यावी. जलपात्र द्यावें. शिवाय बसण्यासाठीं पिढें द्यावें, पुष्कळसें अन्न ( धान्य ), तसेंच मीठ, तूप, तेल, हीं सर्व व्यासपीठावर बसलेल्या विप्रश्रेष्ठाला वर्षाच्या बेगमीचीं द्यावीं. नंतर, त्याचे मुखांतून अभीष्ट वर घेऊन त्याला प्रदक्षणा करावी. हे राजेंद्रा, पारण्याच्या शेवटीं रुद्रजप करणाऱ्या ब्राह्मणाला वस्त्रें व मुद्रांनीं अलंकृत करून नवीन शुभ्र कंबल व ताम्रपात्र द्यावें व प्रत्येक ब्राह्मणाला पुष्कळशी दक्षणा द्यावी. नंतर आपल्या पुरोहित गुरूस अभिषेकयुक्त पूजन करून वस्त्र व दक्षणादान देऊन संतुष्ट करावें. मग उरलेल्या सर्व ब्राह्मणांना दक्षणेनें संतुष्ट करावें. नंतर कर्मशांत्यर्थ हवन करावें. खीर, मध, तूप, तीळ व भात हीं सर्व एकत्र करून प्रति श्लोकास एक आहुती किंवा दर श्लोकास एक आहुती या मानानें गायत्री मंत्रानें हवन करावें.: कारण हें श्रेष्ठ पुराण तत्वदृष्टीनें पहातां गायत्रीमयच आहे. होमाचें सामर्थ्य नसल्यास ज्ञात्यानें त्याचे ऐवजीं सुवर्ण द्यावें, तरी तीच फलसिद्धी होईल. अनुष्ठानांत न्यूनातिरिक्तता, किंवा स्खलनादि दोष झाले असतील त्यांच्या शांत्यर्थ विष्णुसहस्रनामाचा पाठ करावा, त्यायोगानें सर्व कांहीं सफल होतें. कारण, सहस्रनामापेक्षां अधीक फलदायक असें कांहीं नाहीं. नंतर, आदरानें चोवीस मेहुणें जेवावयास घालावीं. नंतर ब्राह्मणांना गंधमाल्यांनीं भूषवून दक्षणा, सुवर्ण, धान्य, रत्न इत्यादिकांनीं संतुष्ट करावें. ब्राह्मणांचें जेवण झालें म्हणजे, हे भारतश्रेष्ठा, ग्रंथ वाचकालाही पत्नीसह भोजन देऊन वस्त्रालंकारांनीं संतुष्ट करावें. कारण, ज्यावर ब्राह्मण प्रसन्न त्यावर देवता प्रसन्न; व त्यांतही वाचक संतुष्ट झाल्यानें देवतांची अतिशयच प्रीति होते. व्रताच्या संपूर्णतेकरितां सुवर्ण व धेनु द्यावीं. अनुकूलता असेल तर बारातोळे सोन्याचा सिंह करून त्याचे पाठीवर सुंदर अक्षरांनीं लिहिलेला हरिवंशाचा ग्रंथ ठेवून त्याची आवाहानापासून दक्षिणेपर्यंत वस्त्रभूषणांसह सर्वोपचारांनीं पूजा करून सूज्ञानें तो ग्रंथ आचार्यांना अर्पण करून आपण भवबंधनांतून मुक्त व्हावें.

या प्रकारें विधान केलें असतां हें सर्वकामार्थ सिद्धि देणारें पुराण अखिल पाप निवारण करील. एवढेंच नव्हे पण, हे राजा, याप्रमाणें जो शेवटपर्यंत पुराणश्रवणाचा विधी करील त्याची स्त्री एका महिन्याचे आंतच गर्भवती होईल. हे राजा, आतां सांगितलेल्या विधीनें जो कोणी दान-मानानें व्यासाची पूजा करील त्याची स्त्रीही गर्भिणी होईल. मी जें तीन प्रकारचें पूजा विधान सांगितलें तें भक्तिपूर्वक केल्यानें कर्त्याच्या स्त्रीला सूर्यासारखा तेजस्वी पुत्र होईल, आणि वांझ असेल तिलाही गर्भ राहील, असें व्यासमुनींचेंच ह्मणणें आहे. जो कोणी ब्राह्मणाचें रत्न चोरितो त्याचें

निसंतान होतें. अशानें शुद्ध्यर्थ महारुद्र जपादि करावें.

नंतर जनमेजय राजा यानें श्रद्धायुक्त मनानें, सत्यभावनेनें व एकाग्रचित्तानें निश्चयपूर्वक हें हरिवंशपुराण दंभ व शठता सोडून श्रवण केलें, आणि भक्तीनें व्यासांचें पूजन करून पुष्कळसें दान दिलें व व्यासांचा आशिर्वाद मिळविला. आणि नंतर आनंदयुक्त मुद्रेनें आपले सुंदर स्त्रीशीं रममाण झाला. हे राजा, बहुधा या व्रताचे बलानें पूर्वजन्मार्जित पापाचा क्षय झाला म्हणजे त्या मनुष्याची स्त्री प्रथम ऋतूचे वेळींच गर्भ धारण करिते. पहिली वेळ हुकलीच तर दुसऱ्या, तिसऱ्या, चवथ्या, पांचव्या, सहाव्या, सातव्या, आठव्या, नवव्या निदान दहावे महिन्याचे आंत तिचे ठिकाणीं गर्भचिन्हें स्पष्ट दिसूं लागतात. या रीतीनें वंध्येला गर्भ राहाणें हें एक पुण्याचेंच लक्षण आहे असें व्यासांचें म्हणणें आहे.

जो पुरुष पुरातन भारत इतिहासासह हा हरिवंश ऐकतो त्याच्या पूर्वपश्चात् दहा पिढ्यांचा उद्धार होतो. हे नरश्रेष्ठा, ज्याचे केवल श्रवणानेंच मनुष्य पापमुक्त होतो तें हें माहात्म्य मीं तुला सांगितलें. या पुराणश्रवणानें निपुत्रिकास पुत्र होतो, निर्धनास धन मिळतें, इतकेंच नव्हे तर नरमेध व अश्वमेध यांपासून मिळणारें सर्व फल हरिवंशाच्या पुराणश्रवणानेंच प्राप्त होतें. ब्रह्महत्त्या, भ्रूणहत्त्या, गोहत्त्या, सुरापान व गुरुस्त्रीगमन असलीं महापातकें करणारा या पुराणाचें एकवार श्रवण केल्यानें शुद्ध होतो, हें ह्मणणें मिथ्या नव्हे.

मी तुला श्रीकृष्णाचें अपार व अद्भुत असें माहात्म्य सविस्तर सांगितलें. हें ऐकणारा व वाचणारा यांस या लोकीं तत्काल फल प्राप्त होत असून तें फल या लोकीं ( इतरांना ) अत्यंत दुर्लभ अशा प्रकारचें उंची असतें.





# हरिवंशपर्व.

## अध्याय पहिला.

## प्रस्तावना व आदिसर्गकथन.

### मंगलाचरण.



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

श्रीकृष्णद्वैपायन व्यास मुनींच्या ओष्ठपुटांतून निघालेलें, अद्भुत, धर्मवृद्धिकर, पावन, पापनाशक व सुखक असें हें भारत जो श्रवण करील, त्याला पुष्करादि पवित्र तीर्थांच्या स्नानानें अधिक लाभ तो काय होणार? ज्यांच्या मुखकमलांतून स्रवणारें अमृत सर्व जग पिऊन राहिलें आहे असे जे माता सत्यवतीच्या हृदयास आनंद देणारे पराशर पुत्र व्यास मुनि त्यांचा जयजयकार असो. बहुश्रुत व वेदवेत्त्या ब्राह्मणाला सुवर्णशृंगांनीं युक्त अशा शंभर गाई देणाऱ्याला जें फल मिळतें तेंच फल ही पवित्र भारतकथा श्रवण करणाराला मिळतें. व्यास महर्षींचें असें म्हणणें आहे कीं, शताश्वमेध किंवा इंद्रपदप्राप्त्यर्थ करावे लागणारे क्रतु किंवा अक्षय्य अन्नदान यांच्या योगानें जें फल प्राप्त होतें, त्याच्याही अनंतपट फल हरिवंशाचें पुस्तक दान करणाराला मिळतें. तसेंच वाजपेय किंवा राजसूय यज्ञ केल्यानें अथवा हत्तींचा रथ दान केल्यानें मिळणारें जें पारलौकिक फल, तें हरिवंशाचे योगानें मिळतें. याविषयीं व्यासमुनि व वाल्मीकि महर्षि या उभयतांचीं वचनें प्रमाण आहेत. जो कोणी तपस्वी यथाविधि हरिवंश ग्रंथाचें लेखन करील, तो रसलुब्ध भ्रमराप्रमाणें तत्काल श्रीहरीच्या चरणकमलाप्रत पावेल. पितामहा-

पासून सहावा, अनंत योगैश्वर्यानें युक्त, साक्षात् नारायणाचा अंशभूत व शुक मुनि हा ज्यांचा एकच पुत्र आहे, अशा व्यास महर्षींला मी ब्रह्मभावानें वंदन करितों.

नैमिषारण्याचे ठायीं परम धार्मिक, सर्वशास्त्रनिपुण, महामुनि, कुलपति शौनक हे चराचरगुरु, सर्वांचा आदिपुरुष, सर्वशक्तिमान् बहुनामयुक्त, अनेकांनीं स्तवन केलेला, सत्यस्वरूप, ॐकारपदवाच्य, व्यक्ताव्यक्त, सनातन, अनिर्वचनीय, सदसताहून पलीकडे असणारा, जीवेश्वराचा कर्ता, पुराण, पर, अव्यय, मंगलकारक, मंगल, व्यापक, भक्तप्रिय, निर्मल, पवित्र, सर्वेंद्रियांचा प्रवर्तक व सर्व पापांचा नाश करणारा जो परमात्मा, त्याला वंदन करून सौतीला विचारतातः—हे सौते, भरतकुलोत्पन्न व इतर राजे यांचा सविस्तर इतिहास तूं आम्हांस सांगितलास; तसेंच देव, दानव, गंधर्व, सर्प, राक्षस, दैत्य, सिद्ध व गुह्यक यांचीं अत्यद्भुत कर्में, पराक्रम, धर्मनिष्ठा, नानाप्रकारच्या कथा, अयोनिसंभवजन्म, इत्यादि जुन्या पवित्र अमृततुल्य गोष्टी ज्यांच्या श्रवणानें मनाला व कर्णाला आल्हाद होतो, अशा मनोहर वाणीनें सांगितल्यास, त्यांतच कुरूंचें जन्मही सविस्तर कथन केलेंस. परंतु सुप्रसिद्ध जे वृष्णि आणि अंधक, त्यांचा इतिहास सांगण्याचा राहून गेला आहे; तर तेवढा तूं कृपा करून आम्हांस सांग.

सौति म्हणालाः—शौनका, व्यासांचा धर्मज्ञ शिष्य वैशंपायन यानें भारतेतिहास सविस्तर श्रवण केल्यावर वैशंपायनाला वृष्णिकुलाविषयीं प्रश्न केला होता; तीच हकीकत मी तुला सांगतों.

जनमेजय विचारतोः—हे सौते, आतांपर्यंत आपण वेदांचा मतलब विस्तारून सांगणारें व अनेक अर्थांनीं युक्त असें महाभारत नांवाचें आख्यान मला सांगितलें, व मींही तें सविस्तर ऐकिलें. त्या आख्यानांत आपण वृष्णि आणि अंधक या दोन कुलांतील नामकर्मांनें प्रख्यात असे अनेक शूर महारथी यांचें वर्णन केलें. तशींच ठिकठिकाणीं त्यांचीं पवित्र अशीं कर्मेंही थोड्याबहुतानें आपण सांगितलीं. परंतु काय असेल तें असो, या जुन्या गोष्टी ऐकूं लागलें म्हणजे किती ऐकलें तरी माझी तृप्तीच होत नाहीं. माझ्या समजुतीनें वृष्णि आणि पांडव हे एकाच कुटुंबांतले वाटतात. आपण वंशांचे पुरे माहितगार असून विशेषतः या वृष्णि कुळाशीं आपला समक्षच परिचय आहे, याकरितां हे तपोधना, या कुलाची हकीकत मला विशेष विस्तारानें सांगा. या कुलांतलि ज्या ज्या शाखेंत जे जे कोणी विशिष्ट पुरुष झाले असतील त्यांची हकीकत मला सविस्तर सांगा व तशीच प्रजापतीपासून त्यांच्यापर्यंत ( वृष्णि कुलापर्यंत ) सर्व पूर्वजांचीही उत्पत्ती कथन करा. सौति म्हणाला, याप्रमाणें मोठ्या आदरानें प्रश्न केल्यामुळें तो महातपस्वी महात्मा वैशंपायन यानें यथाक्रम व सविस्तर असें वंशवृत्त सांगण्यास आरंभ केला.

वैशंपायन ह्मणतातः—हे राजा, पापापासून मुक्त करणारी, वेदालाही मान्य, अनेकार्थ युक्त, विचित्र, दिव्य व पुण्यकारक अशी कथा मी तुला सांगतों, ती श्रवण कर. या कथेचें सामर्थ्य असें आहे कीं, ही जो स्मरणरूपानें किंवा पुस्तक रूपानें आपल्यापाशीं ठेवील, किंवा वारंवार श्रवण करील त्याचा वंश इहलोकीं अखंड राहून स्वर्ग लोकांत त्याचा मोठा गौरव होईल. हे राजा, ज्याचा "हें" म्हणून अंगुली निर्देशानें किंवा शब्दांनीं बोध करितां येत नाहीं अशा प्रकारचें नित्य, अव्यक्त व सदसदात्मक जें मायाशबल ब्रह्म किंवा प्रकृति-

संवलित पुरुष, तें सृष्टीचें आदिकारण होय. त्यापासून हें ईश्वरात्मक जगत् उत्पन्न झालें. हा जो अव्यक्त संज्ञक अमित तेजस्वी पुरुष हाच ब्रह्मा होय; हाच सर्व भूतांचा उत्पत्तिकर्ता व नारायण जो विष्णु याचे तंत्रानें वागणारा असून महत्तत्वाचा (बुद्धीचा) अभिमानी होय. या महत्तत्वापासूनच अहंकार उत्पन्न झाला. अहंकारापासून आकाशादि महाभूतें व महाभूतांपासून जरायुज, स्वेदज, वगैरे सर्व भूतसृष्टि या क्रमानें हा सृष्टीचे उत्पत्तीचा ओघ अखंड चालू आहे. असो; तूं पवित्र व ऐकण्यास पात्र व मीही पवित्र असून वंशकीर्तनास समर्थ, असा योग जुळून आल्यामुळें वेदाज्ञेला न सोडतां माझे बुद्धिसामर्थ्यानुरूप सृष्टीच्या आदिपासून तों वृष्णिवंशाच्या आरंभापर्यंत अत्युत्तम जी भूतसृष्टि तिचें वर्णन अवयवशः विस्तरून मी तुला सांगतों. ह्या वर्णनांत ज्यांनीं ज्यांनीं पवित्र कर्में केलीं व अजरामर कीर्ति संपादिली अशा अनेक पुरुषांचे उल्लेख येणार आहेत व यामुळें हें वर्णन पूर्वजांची कीर्ति वाढविणारें, यशोदायक, शत्रूंचा निःपात करणारें, स्वर्ग देणारें, आयुष्य व संपत्ति वाढविणारें, असें आहे. याकरितां तें लक्ष देऊन ऐक.

भगवान् स्वयंभू यानें सूक्ष्मभूतांची अहंकारादि सृष्टि निर्माण केल्यावर नानातऱ्हेची स्थूल प्राणिसृष्टि निर्माण करण्याचा संकल्प करून प्रथम उदक निर्माण केलें, व त्या उदकाचे ठिकाणीं आपलें वीर्य सोडलें. आप म्हणजे उदक यालाच "नारा" अशी संज्ञा आहे. याचें कारण नर म्हणजे ईश्वर यापासून तें झालें; व ईश्वरालाच नारायण असें म्हणतात. याचें कारण नारा म्हणजे उदक हेंच त्याचें अयन म्हणजे आश्रयस्थान होय. असो, ईश्वरानें उदकांत वीर्य सोडल्यावर कांहीं कालानें तें सोन्याच्या वर्णाचें एक अंडें झालें. त्या अंड्यांतून ब्रह्मदेव आपण होऊनच उत्पन्न झाला; व म्हणूनच त्याला "स्वयंभू" म्हणतात, असें आमचे ऐकिवांत आहे. असो; भगवान् ब्रह्मदेवानें त्या अंडांत अनेक वर्षें वसती करून नंतर त्या अंडाचीं दोन शकलें केलीं. त्यांपैकीं एका शकलानें स्वर्ग व एकानें पृथ्वी बनविली आणि उभय लोकांमधील जो अवकाश त्यालाच त्यानें आकाश अशी संज्ञा दिली. पृथ्वी ही पाण्यावर तरती ठेवून तिचें ठिकाणीं दहा दिशा निर्माण केल्या. नंतर सृष्टिकर्ते प्रजापति निर्माण करावे असा संकल्प करून त्यांच्यापूर्वीं काल, मन, वाणी, काम, क्रोध, विषयप्रीति व ब्रह्मांडाच्या वर्तीवर पिण्ड-सृष्टि हीं निर्माण केलीं. एवढें झाल्यावर मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ असे सात मानसपुत्र उत्पन्न केले. यांचे पूर्वीं केवळ नारायणपरच ज्यांची वृत्ति आहे असे सनक, सनंदनप्रभृति ब्रह्मदेवाचे सात पुत्र होते. त्यांनीं जरी संसार मिथ्या आहे अशी या मरीच्यादिकांची कानउघाडणी केली तरी तिला न जुमानतां त्यांनीं कर्ममार्गच श्रेष्ठ मानून गृहस्थाश्रम स्वीकारला. आतां जे सनकादिक सात मरीच्यादिकांच्या पूर्वींचे ब्रह्मपुत्र म्हणून सांगितले त्या सर्वांत सनत्कुमार हा ज्येष्ठ होता. शिवाय या सातांत रुद्र म्हणून एक होता, तो ब्रह्मदेवानें आपल्या रोषापासून निर्माण केला होता.

हे जनमेजया, रुद्र व मरीच्यादि सात यांनीं पुढें सृष्टि उत्पन्न केली आणि स्कंद व सनत्कुमार हे आपलें तेज सृष्टिनिर्माणाचे कामीं खर्चीं न घालतां तसेंच राखून राहिले. वरील सात प्रजापतींचे सात दिव्य महावंश निर्माण झाले. या वंशांत यक्ष

पिशाचादि देवगण जन्मास आले, व ह्ने मोठे कर्ते व संततियुक्त निपजले. शिवाय याच वंशाला आदित्यादिक देव व कश्यपादि महर्षि हे अलंकृत करिते झाले. नंतर त्यानें विजा, वज्र, मेघ, सरळ व वक्र अशीं इंद्रधनुष्यें, पक्षी व पर्जन्य हीं उत्पन्न केलीं. त्याचप्रमाणें यज्ञाचे सोईकरितां ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद हे निर्माण केले. नंतर आपल्या मुखापासून देव व वक्षस्थलापासून पितर उत्पन्न केले. उपस्थापासून मनुष्य व जघनापासून असुर, साध्य व इतर देव निर्माण केले. त्याच्या इतर गात्रांपासून लहानथोर भूतसृष्टि उत्पन्न झाली. वसिष्ठसंज्ञक प्रजापति याचे मनांत प्रजावृद्धि करावी असें आलें. म्हणून त्यानें प्रथम कांहीं मानसप्रजा उत्पन्न केली; परंतु तीपासून जेव्हां पुढें पिढी चालू होईना तेव्हां त्यानें आपल्या देहाचे दोन भाग केले. पैकीं एका भागाचा पुरुष केला व दुसऱ्याची स्त्री बनविली. नंतर तिचे ठायीं पुरुषानें नानाविध प्रजा निर्माण केली. याप्रमाणें त्या पुरुषानें आपल्या महिम्यानें स्वर्ग व पृथ्वी, हीं भरून टाकलीं. भगवान् विष्णु यानें विराट् पुरुष निर्माण केला; त्यानें मनुनामक पुरुष उत्पन्न केला. या मनूचा जो काल त्याला मन्वंतर म्हणतात. याप्रमाणें मन्वंतर म्हणजे वसिष्ठ प्रजापतीची द्वितीय सृष्टि होय. याप्रमाणें या समर्थ विराट पुरुषानें प्रजा उत्पन्न केली व स्वतः तो नारायणापासून उत्पन्न झाला असल्यामुळें त्याची सृष्टि तीही अयोनिसंभव झाली.

याप्रमाणें सांगितलेली जी ही आद्यसृष्टि हिजप्रत जो पुरुष जाणतो त्याला दीर्घायुष्य, कीर्ति, धन्यता, संतती, विद्या व यथेच्छ लोकप्राप्ति हीं लाभतात.

## अध्याय दुसरा.

—:०:—

### दक्षोत्पत्तिकथन.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें प्रजा उत्पन्न केल्यावर त्या वसिष्ठ प्रजापतीला अयोनिसंभव अशी शतरूपा नामक स्त्री प्राप्त झाली. जनमेजया, हिला अयोनिसंभव म्हणण्याचें कारण ही स्वतेजानें स्वर्गालाही व्यापून राहाणारा जो वसिष्ठ प्रजापति त्याच्या योगप्रभावापासूनच उत्पन्न झाली होती. हिनें आपल्या उत्पत्तीबरोबर प्रथमतः अयुत वर्षेंपर्यंत परम दुश्चर अशी तपश्चर्या केली, व नंतर आपणास संतति व्हावी अशी जेव्हां तिला उत्कंठा झाली, तेव्हां ती महातेजस्वी जो वसिष्ठ प्रजापति त्याच्या सन्निध त्याला आपला पति मानून जाऊन राहिली.

हे जनमेजया, हा जो पुरुष याला स्वायंभुव मनु असें म्हणतात, व याचा काल एकाहत्तर युगें असतो. या वसिष्ठप्रजापतीपासून शतरूपेला वीर नामक पुत्र झाला. या वीराला कर्दम प्रजापतीची मुलगी काम्या नांवाची पत्नीत्वानें प्राप्त झाली. तिजपासून त्याला प्रियव्रत, व उत्तानपाद असे दोन पुत्र झाले. पुढें या कन्येला सम्राट्, कुक्षि, विराट व प्रभु असे चार पुत्र झाले. हे पुत्र तिला प्रियव्रत पतीपासून झाले. अत्रि नामक प्रजापतीनें वसिष्ठाच्या दोन पुत्रांपैकीं उत्तानपाद हा दत्तक घेतला. त्या घरीं उत्तानपादाला सूनृता नामक स्त्रीपासून चार पुत्र झाले. ही सूनृता म्हणजे धर्मप्रजापति यानें अश्वमेध केला असतां जी अति सुंदर कन्या निर्माण झाली तीच. हीच प्रसिद्ध भक्त ध्रुव याची माता होय. उत्तानपादाला सूनृतेपासून जे चार पुत्र झाले म्हणून सांगितले त्यांचीं नावें:—ध्रुव, कीर्तिमान्, आयुष्मान् आणि वसु हीं होत. या

शेवटल्या दोहोंच्या ऐवजीं कोठें कोठें शिव आणि आयस्वती अशींहि नांवें आढळतात. सूनृतेच्या ठिकाणीं उत्तानपादानें ध्रुव नामक जो पुत्र उत्पन्न केला म्हणून सांगितलें त्यानें तीन सहस्र दिव्य वर्षें तपश्चर्या केली. तपश्चर्येचा हेतु ब्रह्मप्राप्ति हा होता. असो; त्याच्या तपश्चर्येनें ब्रह्मदेव प्रसन्न होऊन, भूतलावर ज्याला उपमा नाहीं असें अढळस्थान सप्तऋषींच्या अग्रभागीं त्यानें त्याला दिलें. या तपाचे योगानें ध्रुवाची अतिशय वाढलेली कीर्ति व संमृद्धि पाहून देव आणि असुर यांना मान्य जे शुक्राचार्य यांनींही उद्गार काढिले कीं, 'काय हो या ध्रुवाच्या तपाचा प्रभाव? कोण तरी याचें तेज कीं सप्तर्षींना देखील याला आपला अग्रेसर पतकरून राहावें लागलें.' या ध्रुवाला श्लिष्टि, भव्य व शंभु असे तीन पुत्र झाले. यांपैकीं श्लिष्टीला सुच्छाया नामक स्त्रीचे ठिकाणीं निर्मळ असे पांच पुत्र झाले. त्यांचीं नांवें:— रिपु, रिपुंजय, पुण्य, वृकल व वृकतेजस् हीं होत. यांतील रिपूला बृहतीनामक पत्नीचें ठिकाणीं अत्यंत तेजस्वी चाक्षुष नामक पुत्र झाला. चाक्षुषाला वीरणप्रजापतीची कन्या पुष्करिणी नांवाची स्त्री मिळाली. हिचे ठायीं चाक्षुषानें मनुसंज्ञक पुत्र उत्पन्न केला. या मनूनें अरण्य प्रजापतीच्या नड्वला नामक कन्येचे ठायीं दहा पुत्र उत्पन्न केले. त्यांचीं नांवें: ऊरु, पुरु, शतद्युम्न, तपस्वी, सत्यवान्, कवि, अग्निष्टुत्, अतिरात्र, वसुद्युम्न हीं नऊ; व दहाव्याचें अभिमन्यु. यांपैकीं ऊरूला आग्नेयी नामक स्त्रीचे ठिकाणीं अंग, सुमनस्, ख्याति, क्रतु, अंगिरस् व गय असे सहा पुत्र झाले. यांपैकीं अंगाला सुनीथेपासून वेन नांवाचा एकच पुत्र झाला. हा वेन फार दुराचारी निघाल्यामुळें ऋषिजन फार क्षुब्ध झाले व त्यांनीं पुढील संततीसाठीं वेनाच्या उजव्या हाताचें मंथन केलें. त्या मंथनापासून पृथुनामक पुत्र उत्पन्न झाला. त्याला पाहतांच ऋषिजनांना फार आनंद होऊन ते म्हणाले, हा महातेजस्वी राजा आपल्या प्रजेला फार आनंद देईल व याचें यश फार वाढेल. ऋषींच्या या भाकिताप्रमाणें पृथु हा उपजतच धनुष्य, खड्ग व कवच धारणकर्ता असून तेजानें जाळतो कीं काय इतका उग्र असे. हा वैन्य पुत्र पृथु सर्व क्षत्रिय जातीचा प्रथम पुरुष असून राजसूय यज्ञाचे पायीं ज्यांना अभिषेक केला अशा भूमिपालांतही प्रथमच होय. यानें वेनाच्या दुराचारानें गांजलेल्या पृथ्वीचें रक्षण केलें. या पृथूमुळें राजयश गाण्यांत निपुण जे सूत मागध ते अस्तित्वांत आले. हे जनमेजया, आपल्या प्रजेला उपजीविकेला विपुल धान्य मिळावें म्हणून यानें देव, ऋषि, पितर, दानव, गंधर्व, अप्सरांसहित सर्प, यक्ष, वल्ली व पर्वत यांच्या साह्यानें पृथ्वीपासून धान्य रूपानें दूध काढलें. पृथ्वीनेंही ठिकठिकाणीं धान्यरूपी प्रचुर दुग्ध दिल्यामुळें प्रजाजनांचें अक्लेश प्राणधारण झालें. या पृथूला अंतर्धि व पालित असे दोन धर्मज्ञ पुत्र झाले. पैकीं अंतर्धीला शिखंडिनीपासून हविर्धान नामक पुत्र झाला. हविर्धानाला धिषणा नामक अग्निकन्येपासून सहा पुत्र झाले. त्यांचीं नांवें: प्राचीनबर्हि, शुक्ल, गय, कृष्ण, व्रज व अजिन. यांपैकीं प्राचीनबर्हि हा हविर्धानाचे पोटीं मोठाच पराक्रमी पुत्र निपजला. कारण त्यानें प्रजावृद्धि फारच केली.

हे जनमेजया, या प्रजापतीला प्राचीनबर्हि असें नांव पडण्याचें कारण असें होतें कीं, याचे यज्ञभूमीचे ठायीं जे बर्हि म्हणजे दर्भ वाढले होते त्या सर्वांचीं अग्रें

प्राची म्हणजे पूर्वदिशेकडे होतीं; व हे दर्भ इतके वाढले होते कीं, त्यांनीं सर्व पृथ्वीचें पृष्ठ आच्छादून गेलें. ह्या प्राचीनबर्हीनें प्रथम दीर्घकालपर्यंत अतिशय मोठें तप करून नंतर सवर्णा नामक समुद्रकन्येला आपली पत्नी केली. या सवर्णा नामक समुद्रकन्येला या प्राचीनबर्हीपासून दहा मुलगे झाले. हे सर्वही धनुर्विद्येंत मोठे निपुण असून त्या सर्वांनाही प्रचेतस् हेंच नांव होतें. तसेंच या दाही जणांचे आचारविचार एक जातीचेच असल्यामुळें त्या सर्वांनींच समुद्राच्या पाण्यांत राहून दहा सहस्र वर्षेंपर्यंत मोठें कडक तपाचरण केलें. हे सर्व प्रचेतस् बंधू तपाचरणांत गुंतले असतां पृथ्वीवर कोणी देवरेख करणारा नाहींसा झाल्यामुळें सर्व पृथ्वीवर वृक्ष इतके माजले कीं, सर्वच जंगलमय होऊन जाऊन धान्यादिक पिकेनासें झालें. आणि सर्वत्र आकाश अत्युच्चवृक्षांनीं व्यापून गेल्यामुळें वाऱ्याला राहाण्यास रीघ नाहींशी होऊन प्राण कोंडल्यामुळें प्रजा पटापट मरूं लागली; व दहा सहस्र वर्षेंपर्यंत प्रजेचे सर्व व्यापारच बंद पडल्यासारखे झाले. नंतर तपानें पूर्ण झालेले असे सर्व प्रचेते तप पुरें करून पृथ्वीवर आले व पृथ्वीची अवस्था पाहून त्यांना अत्यंत क्रोध आला. मग त्यांनीं आपले मुखापासून रागाचे आवेशांत वायु व अग्नि निर्माण केले. पैकीं वायूनें ते वाढलेले सर्व वृक्ष उलथून पाडून शुष्क करून टाकले. व अग्नीनें ते जाळून खाक केले. या रीतीनें वृक्षांचा बहुतेक फन्ना झाला. या प्रकारचा हा वृक्षक्षय चाललेला पाहून वृक्षांचा राजा जो सोमप्रजापति तो आतां कांहीं थोडेच वृक्ष राहिले आहेत असें पाहून, त्या प्रचेत्याकडे आला व म्हणाला, 'हे प्राचीनबर्हीच्या पुत्रांनों, आतां आपला क्रोध आंवरा; या अग्निवायूंनीं पृथ्वी बहुतेक वृक्षशून्य करून टाकली आहे, करितां आतां हे अग्नि व वायु शांत होऊं द्या; व पुढील भविष्य मला कळत असल्यामुळें मी ही रत्नासारखी दिव्य व अतिसुंदर अशीही मारिषा नांवाची वृक्षकन्या माझे गर्भात धारण करून ठेविली होती. ही मी तुम्हांला देतों; हिला तुम्ही आपली बायको करा, व हिजपासून सोमवंशाचा विस्तार होऊं द्या. या कन्येच्या ठिकाणीं अर्धे माझें व अर्धें तुमचें अशीं तेजें मिळून दक्ष नांवाचा अग्नितुल्य तेजस्वी पुत्र होईल व तुमच्या तपस्तेजानें बहुतेक जळून गेलेल्या या पृथ्वीला पुन्हा संजीवन करून प्रजावृद्धि करील.

सोमाची ही प्रार्थना ऐकून त्या प्रचेत्यांनीं वृक्षांवरील आपला राग आंवरून ती वृक्षकन्या मारिषा हिशीं धर्मविधीनें लग्न लावलें. नंतर दाही प्रचेत्यांनीं मिळून त्या मारिषेच्या ठिकाणीं आपल्या मनोबलानें गर्भ स्थापित केला. याच गर्भाचे ठिकाणीं सोमानेंही आपल्या तेजाचा अंश घातला. मग या उभय तेजांच्या संयोगानें दक्षप्रजापति नांवाचा महातेजस्वी पुत्र उत्पन्न झाला. यानें सोम वंशाची वृद्धि करण्यासाठीं नाना जातींची अनेक सृष्टि निर्माण केली. त्यानें केवळ संकल्पमात्रानें अनेक स्थावर वस्तु, जंगमवस्तु, द्विपाद व चतुष्पादही निर्माण केले व नंतर मनोबलानेंच त्या त्या जातीच्या स्त्रियाही निर्माण केल्या. या स्त्रियांपैकीं त्यानें दहाजणी धर्मऋषींना दिल्या; तेरा कश्यपाला दिल्या व उरल्या साऱ्या नक्षत्र नांवाच्या त्या सोमराजाला दिल्या. या कन्यांपासून देव, खग, नाग, गाई, दैत्य, दानव, गंधर्व, अप्सरा व अन्यही अनेक जाति निर्माण झाल्या; व ह्या वेळेपासून, हे राजा, स्त्रीपुरुषांच्या मैथुनसंबंधापासून प्रजा

उत्पन्न झाली. या वेळेपूर्वीची सृष्टि मात्र संकल्पापासून, दृष्टीपासून किंवा स्पर्शापासून उत्पन्न झालेली असे.

जनमेजय विचारतो:—आपण देव, दानव, गंधर्व, उरग, राक्षस, तसाच महात्मा दक्ष याची ही उत्पत्ति यापूर्वींच सांगितली. त्या वेळीं आपण असें सांगितलें कीं, दक्ष हा ब्रह्मदेवाच्या उजव्या अंगठ्यापासून निर्माण झाला. तशीच त्याची स्त्री ब्रह्मदेवाच्या डाव्या अंगठ्यापासून झाली. असें असून आतां आपण प्रचेत्यांपासून दक्ष झाला असेंही सांगतां, यामुळें मला मोठा घोटाळा पडला आहे. तरी हे ब्राह्मणश्रेष्ठा, ह्या माझ्या संशयाचा आपण उलगडा केला पाहिजे. दुसराही एक संशय आहे. तो असा कीं, हा दक्ष जर सोमानें स्वगर्भी धरलेल्या मारिषेचे ठिकाणीं निर्माण झाला म्हणजे अर्थातच सोमाचा हा दुहितृपुत्र किंवा नातु होता, तर त्या दक्षानेंच आपल्या नक्षत्र संज्ञक कन्या आपला आजा जो सोम त्याला देऊन त्याचा हा सासरा झाला या घोटाळ्याला काय म्हणावें ?

वैशंपायन उत्तर करितात:—हे राजा, अलीकडल्या नियमांप्रमाणें पाहातां तुझ्या शंका यथार्थ आहेत. कारण, सांप्रत उत्पत्तीचा नियम म्हटला म्हणजे पश्वादिक ज्या तिर्यक्योनि आहेत, त्यांत प्रजोत्पादनाचे कामीं सहज प्रवृत्तीपलीकडे दुसरा निर्बंध नाहीं. परंतु मनुष्यांमध्यें सपिंडांतील मुलगीचे ठिकाणीं उत्पत्ति करूं नये; असा शास्त्राचा निरोध आहे, व हा सदैव कायम राहावा हें इष्टच आहे. तथापि सृष्टीच्या आरंभीं जे ऋषि व ज्ञाते होऊन गेले त्यावेळीं त्यांना होईल तिकडून प्रजेची उत्पत्ति वाढविणें हीच गोष्ट मुख्य साध्य असल्यामुळें, प्रजा पुष्कळ वाढल्यानंतर ती अतिशय फाजील होऊं नये, या उद्देशानें मन्वादिकांनीं घातलेले जे सापिंड्यादि कृत्रिमप्रतिबंध ते त्यावेळीं नव्हते. व यामुळेंच ही गोष्ट वेडेपणाची किंवा चुकीची होती असा ऋषि किंवा ज्ञाते लोक तरी त्यांवर आरोप करीत नाहींत. हे राजा, हे दक्षादिक सारे दर युगारंभीं नवीन निर्माण होऊन अशीच प्रजा वाढवीत सुटतात व पुढें प्रजा अनावर वाढली म्हणजे तिला आळा घालण्यासाठीं प्रतिबंधक नियम केले जातात. याप्रमाणें या नियमांतलें रहस्य ज्ञात्याला ठाऊक असल्यामुळें तो त्याला भुलत नाहीं. त्याचप्रमाणें, हे राजा, सृष्टीच्या आरंभीं आरंभीं वडील धाकुट्पणाचा नियम हल्लींप्रमाणें वयावर अवलंबून नव्हता. जो तपानें किंवा प्रभावानें अधीक तोच वडील असा तेव्हांचा नियम असे.

असो; दक्षाचीही वर सांगितलेली चराचर सृष्टि कशी झाली हें जो जाणतो त्याचीं या लोकीं संकटें दूर होऊन त्याला पुष्कळ संतति होईल व स्वर्गलोकीं त्याचा बहुत गौरव होईल.

## अध्याय तिसरा.

—:०:—

### मरुतांची उत्पत्ति.

जनमेजय विचारतो:—हे वैशंपायना, देव, दानव, गंधर्व, सर्प, राक्षस, इत्यादिकांची उत्पत्ति विशेष विस्तारानें सांगा.

वैशंपायन सांगतात:—हे राजा, पूर्वीं ब्रह्मदेवानें दक्ष प्रजापतीला 'तूं आतां प्रजा निर्माण कर' अशी आज्ञा दिली असतां त्यानें कसकशी सृष्टि निर्माण केली, ती ऐक. त्या समर्थ दक्षानें ऋषि, देव, गंधर्व, असुर, राक्षस, यक्ष, भूत, पिशाच्च, पक्षी, पशु व सर्पादि हे सर्व मनापासूनच उत्पन्न केले; परंतु दक्षाचें व शंकराचें वांकडें असल्यामुळें

त्यानें ही प्रजा वाढूं नये असा संकल्प केल्यानें ही मानससृष्टि पुढें प्रजावृद्धि करूं शकेना; तेव्हां आतां प्रजावृद्धि कशी करावी अशा मोठ्या विवंचनेंत दक्ष पडला असतां मैथुनधर्मानें सृष्टि वाढविण्याची तोड त्याला सुचली. मग त्यानें वीरण प्रजापतीची कन्या असिक्नी नांवाची होती, तिला आपली पत्नी केली. ही असिक्नी विपुल प्रजा धारण करण्याविषयीं समर्थ अर्थात् अत्यंत सशक्त व मोठी तपस्विनी होती. दक्ष प्रजापतिही मोठा वीर्यवान् असल्यामुळें त्यानें स्वतःच असिक्नीचे ठिकाणीं पांच हजार पुत्र निर्माण केले. पुढें हे पांच सहस्र पुत्र दक्षाप्रमाणेंच प्रत्येकजण झपाट्यानें प्रजावृद्धि करणार असें पाहून बातमी देण्यांत कुशल देवर्षि नारद हा त्यांचा नाश करण्याकरितां व स्वतःला शापप्राप्ति करून घेण्यासाठींच कीं काय, त्यांना पुढीलप्रमाणें बोलला.

आतां हा नारद म्हटला म्हणजे दक्षाच्या शापभयास्तव मुनिश्रेष्ठ कश्यपानें दक्षाच्या असिक्नी नामक पत्नीची धाकटी बहिण जी वीरणी तिचे ठायीं पुन्हा उत्पन्न केलेला पुत्र होय. पुन्हा म्हणण्याचें कारण प्रथम नारद हा ब्रह्मदेवानें आपला मानसपुत्र म्हणून उत्पन्न केला होता. असो; या नारदानें हर्यश्व नांवानें प्रख्यात असलेले दक्षाचे सर्व पुत्र सशास्त्र युक्तीनें फसवून संसारांतून उठवून लाविले. ही गोष्ट नारदानेंच खास केली अशी बातमी जेव्हां अतुल पराक्रमी दक्षाला समजली, तेव्हां तो नारदाचा नाश करण्याविषयीं उद्युक्त झाला. हें कानीं येतांच परमेष्ठी म्हणजे ब्रह्मदेव हा बडी बडी ऋषिमंडळी मध्यस्थीकरितां बरोबर घेऊन दक्षाकडे आला; व त्यांचे मध्यस्थीनें दक्षाचा व ब्रह्मदेवाचा गोडीगुलाबीनें करार ठरला. तो असा कीं, दक्षानें आपली कन्या ब्रह्मदेवास द्यावी व ब्रह्मदेवानें तिचे ठायीं पुन्हा नारद उत्पन्न करावा. मग या करारा-प्रमाणें दक्षानें आपली एक कन्या ब्रह्मदेवाला दिली व ब्रह्मदेवानेंही दक्षाच्या शापभयास्तव पुन्हा तिचे ठिकाणीं नारद उत्पन्न केला.

जनमेजय विचारतोः—हे वैशंपायना, नारदानें दक्षप्रजापतीचे पुत्र संसारांतून फुकट घालविले म्हणून जें आपण वर सांगितलें, ते कसकशा रीतीनें तें मला सविस्तर सांगा.

वैशंपायन उत्तर करतातः—दक्षाचे महापराक्रमी पुत्र प्रजेची विशेष वृद्धि करण्याच्या नादांत आहेत अशांत त्यांची व नारदाची सहज गांठ पडली.

तेव्हां नारद त्यांना म्हणालाः—मला तुम्हीं फार मूर्ख दिसतां; कारण, तुम्हीं प्रजा वाढविण्याचें मनांत आणिलें खरें, परंतु ज्या या पृथ्वीवर राहून तुमच्या प्रजेला उदरभरण करावयाचें ती पृथ्वी किती विस्तृत आहे, खालीं वर चोहोंबाजूंनीं तिचा परिघ केवढा आहे, म्हणजे प्रजा फाजील झाली असतां तिचे धारणपोषणाला ही पृथ्वी समर्थ होईल कीं नाहीं, याचा अंदाज काढण्यापूर्वींच तुम्ही प्रजावृद्धि करूं पाहातां. नारदाचें हें बोलणें त्या दक्षपुत्रांना खरें वाटलें व त्याचे सूचनेचा अंगीकार करून पृथ्वीचें प्रमाण शोधण्याकरितां ते निरनिराळ्या दिशांकडे चालते झाले. ते आपल्या कामास इतक्या उत्कंठेनें लागले कीं, त्यांनीं अन्नपाणीही टाकलें. पुढें वायुभक्षणही सोडिलें; व अखेरीस समुद्र शोधूं गेलेल्या नदीप्रमाणें ते गेले ते परत आलेच नाहींत.

---

१ या श्लोकांचा चतुर्धरानें अध्यात्मपर अर्थ केला आहे व तोही उत्तम आहे; तो असाः—नारद त्या दक्षपुत्रांस म्हणाला कीं, तुम्ही संतानवृद्धि करूं निघालां खरें; पण हा प्रपंच किंवा हें तुमचें शरीर ज्याच्या

( पुढें चालू. )

पुत्रांची याप्रमाणें वाट झालेली पाहून दक्ष प्रजापतीनें आपल्या पहिल्या वीरणीसंज्ञक स्त्रीचे ठिकाणीं पुनरपि एक हजार मुलगे उत्पन्न केले. या सर्वांना शबलाश्व असें म्हणत. यांनाही नारदानें त्यांच्या वडील बंधूंप्रमाणेंच कानमंत्र सांगून संसारांतून उठवून लाविलें. नारदानें ज्या वेळीं त्यांना उपदेश केला त्या वेळेस त्यांनाही ती गोष्ट रुचून ते परस्परांत म्हणाले, "नारदाचें म्हणणें वाजवी आहे. पृथ्वीचें प्रमाण किती आहे व आपल्या वडील बंधूंची वार्ता काय झाली याचा आपण अगोदर शोध लावून येऊं, आणि मग खुशाल संतति वाढवीत बसूं." असा संकेत झाल्यावर तेही स्वस्थ मनानें व एकच मुद्दा डोळ्यांपुढें ठेवून क्रमाक्रमानें त्यांचे पूर्वज बंधु ज्या मार्गानें दाही दिशा फांकले होते त्याचप्रमाणें शोधार्थ गेले, व समुद्रास मिळालेल्या नदी- प्रमाणें पुन्हा परतले नाहींत. याप्रमाणें दुसऱ्याही पोरांची नारदानें वाट लावलेली पाहून दक्षानें संतापून नारदाला शाप दिला कीं, तुझा नाश होईल व तूं गर्भवासाच्या दुःखांत पडशील. (या शापबलामुळेंच नारदाला पुन्हा जन्म घ्यावे लागले, असें दिसतें.)

हे राजा, याप्रमाणें बंधूंच्या शोधार्थ गेलेले शबलाश्व परत आले नाहींत त्या दिवसा- पासून कोणीही बंधू आपल्या हरवलेल्या बंधूच्या शोधार्थ गेला असतां बहुधा तत्काळ मरतो व याकरितां शहाण्यानें असली गोष्ट करूं नये.

हे दुसऱ्या वेळीं उत्पन्न केलेले पुत्रही नायनाट झाले असें पाहातांच, आमचे असें ऐकिवांत आहे कीं, त्या दक्ष प्रजापतीनें पुनरपि आपल्या वीरणी स्त्रीचे ठिकाणींच साठ कन्या निर्माण केल्या; व, हे कुरुश्रेष्ठा, या साठही मुली कश्यप, सोम, धर्म व दुसरेही कांहीं महर्षि यांनीं वरल्या. त्यांची गणती येणेंप्रमाणें: दक्षानें त्यांतील दहा धर्मऋषीला दिल्या; तेरा कश्यपाला दिल्या; सत्तावीस सोमाला; चार अरिष्टनेमीला; दोन भृगुपुत्राला; दोन अंगि- रसाला; व दोन जो विद्वान् कृशाश्व त्याला. आतां या मुलींचीं नांवें मीं तुला सांगतों तीं ऐक. अरुंधती, वसु, यामी, लंबा, भानु, मरुत्वती, संकल्पा, मुहूर्ता, साध्या व विश्वा. याप्रमाणें या दहाजणी धर्मऋषींच्या पत्नी झाल्या. आतां या दहाजणींची संतति ऐक. विश्वेपासून विश्वेदेव झाले; साध्येपासून साध्य झाले; मरुत्वतीपासून मरुत्वंत झाले; वसूपासून वसू झाले; भानूपासून भानू झाले; मुहूर्तेपासून मुहूर्त झाले; घोष नांवाची जी मंत्राभिमानिनी देवता ती लंबेपासून झाली. नागवीथी नामक जी स्वर्गमार्गाभिमानिनी देवता ती यामीपासून झाली. अरुंधतीपासून पृथ्वीविषयक पशु, औषधि वगैरे झालीं. संकल्पेपासून सर्वांच्या मानसांत राहाणारा जो संकल्प तो झाला. यामीची कन्या जी नागवीथी तिजपासून वृषलंबा झाली. हे राजा, प्राचेतस् दक्षानें सोमाला ज्या नक्षत्र- संज्ञक सत्तावीस मुली दिल्या, त्यांचीं विशिष्ट नांवें (अश्विनी, भरणी, वगैरे) ज्योतिषशास्त्रांत प्रसिद्धच आहेत. आतां विशेष कीर्तिमान् व दीप्तिमान् जे आठ वसु म्हणून म्हटले आहेत त्यांचें मीच थोडेंसें विस्तारानें वर्णन सांगतों.

( मागील पानावरून पुढें चालू. )

बलावर उभें राहिलें आहे, त्याचा प्रथम तुम्हीं शोध केला काय? तुम्हास आंत, बाहेर, खालीं, वर व्यापून काय राहिलें आहे, हें शोधिलेंत काय? ह्या प्रश्नाबरोबर ते दशदिशा आत्मशोधनार्थ गेले, व तेथें पवनभक्षण देखील वर्ज करीतों तीव्र तपस्या करून परमात्मरूपांत मिळाल्यामुळें समुद्रास मिळालेल्या नदीप्रमाणें अद्यापि परतले नाहींत.

आप, ध्रुव, सोम, धर, अनिल, अनल, प्रत्यूष व प्रभास अशीं त्या आठांचीं नांवें आहेत. यांपैकीं आपाला वैतंडच्य, श्रम, शांत व मुनि; ध्रुवाचा पुत्र लोकध्वंसन करणारा भगवान् काल; सोमाचा पुत्र भगवान् वर्चा ( यापासून मनुष्य वर्चस्वी होतात ), यज्ञांतील हुतद्रव्य वाहून नेणारा जो द्रविण तो धराचा पुत्र. धरालाच मनोहरा म्हणून दुसरी स्त्री होती. तिजपासून शिशिर, प्राण व रमण झाले. अनिल वसूची भार्या शिवा नामक होती. तिजपासून मनोजव व अविज्ञातगती असे दोन पुत्र अनिलाला झाले. अग्निवसूचा पुत्र कुमार, हा मोठा तेजस्वी असून शर नामक तृणाच्या झुडुपांत जन्मास आला. त्याच्या पाठीवर शाख, विशाख व नैगमेय असे भाऊ झाले. एकूण हे चार अग्नीचे म्हणजे अनलवसूचे पुत्र. यांपैकीं या कुमारालाच कार्तिकेय असेंही नांव आहे. कारण हा सहा कृत्तिकांपासून ( एकेकीनें एक मुख व दोन हात याप्रमाणें देऊन ) झाला होता. यालाच स्कंद किंवा सनत्कुमार म्हणतात. हा अग्नीनें आपल्या तेजाच्या चतुर्थांशापासून उत्पन्न केला. प्रत्यूषाला देवल नामक ऋषि झाला, अशी प्रख्याति आहे. या देवलालाही मोठीं क्षमाशील व मोठीं तपस्वी अशीं दोन अपत्यें होतीं. एक पुत्र व एक कन्या. योग-सिद्धा नामक एक अत्यंत सुंदर व बहुतकाळ ब्रह्मचर्य वृत्तीनें राहाणारी बृहस्पतीची बहिण होती. ही विरक्त वृत्तीनें पृथ्वीपर्यटन करीत असतां वसूंतला आठवा जो प्रभास त्याची स्त्री झाली, व तिचे ठिकाणीं प्रभासानें विश्वकर्मा नांवाचा महाभाग्यवान् पुत्र उत्पन्न केला. हा विश्वकर्मा हजारों जातींच्या शिल्पांचा व भूषणांचा निर्माणकर्ता असून संपूर्ण शिल्पवेत्त्यांत वरिष्ठ होय. देवांचा कारागीर हाच, त्या सर्वांचीं विमानें त्यानेंच बनविलीं व या थोर कल्पक पुरुषानें निर्माण केलेल्या शिल्पशास्त्रावर अद्यापि अनेक मनुष्य पोट भरीत आहेत. आतां कश्यपाला दक्षानें ज्या तेरा मुली दिल्या त्यांपैकीं सुरभी नांवाची जी कन्या होती, ती तपाचरणानें अत्यंत शुद्ध झाली असून शिवाय शंकराची तिजवर पूर्ण कृपा असल्यामुळें तिचे ठिकाणीं कश्यपापासून एकादश रुद्र निर्माण झाले. त्यांचीं नांवें:—अजैकपात्, अहिर्बुध्न्य, पिनाकी, हर, बहुरूप, त्र्यंबक, अपराजित, वृषाकपी, शंभु, कपर्दी व रैवत. असे हे तिन्ही भुवनांवर सत्ता चालविणारे एकादश रुद्र सांगितले आहेत.

यांशिवाय मृगव्याध, सर्प, कपाली, इत्यादि इत्यादि मिळून शेकडों, हजारों रुद्र, जे चराचर सृष्टीला व्यापून राहिले आहेत, असे पुराणांत सांगितले आहेत.

हे भरतश्रेष्ठा, आतां कश्यपाच्या तेराही स्त्रियांचीं नांवें ऐक. अदिति, दिति, दनु, अरिष्टा, सुरसा, खशा, सुरभि, विनता, ताम्रा, क्रोधवशा, इरा, कद्रु व मुनि. आतां यांचीं अपत्यें ऐक. मागील मन्वंतरांत तुषित नांवाचे कोणी बारा देव होते. ते अत्यंत यशस्वी असें जें चाक्षुष मन्वंतर तें संपावयाचे सुमारास प्राणिमात्रांची हितबुद्धि मनांत धरून सर्वेजण एकत्र मिळून परस्परांस म्हणाले, "चला, आपण विलंब न करितां अदितीचे गर्भांत शिरूं व पुढील मन्वंतरांत जन्मास येऊं. यांतच आपलें कल्याण आहे."

वैशंपायन सांगतात:—याप्रमाणें चाक्षुष मन्वंतराचे अखेरीस संकेत करून ते बाराहीजण वैवस्वत मनु प्राप्त होतांच दक्षकन्या जी अदिति तिचे ठिकाणीं मरीचिपुत्र कश्यप याचे वीर्यानें द्वादशादित्य संज्ञेनें जन्मास आले. यांचीं नांवें:—विष्णु, इंद्र, अर्यमा, धाता, त्वष्टा, पूषा, विवस्वान्, सविता, मित्र, वरुण,

अंशु व अतितेजस्वी भग असे हे बारा. पूर्वी चाक्षुष मन्वंतरांत जे बारा तुषितसंज्ञक देव सांगितले तेच हे द्वादशादित्य हें वर सांगितलेंच आहे. आतां सोमाच्या ज्या पतिपरायण सत्तावीस तेजस्वी स्त्रिया सांगितल्या त्यांना त्यांच्याप्रमाणेंच अत्यंत तेजस्वी अनेक अपत्यें झालीं. अरिष्टनेमीच्या स्त्रियांना सोळा मुलें झालीं. बहुपुत्राला विद्युत्, अशनि, मेघ व इंद्रधनु अशीं चार अपत्यें झालीं. आपलें मूळचें अंगिरस कूळ सोडून अन्यत्र गेलेला जो शौनक त्यापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मऋषींलाही मान्य ज्या ऋचा त्या आणि कुशाश्व नामक राजर्षि यांच्या संयोगापासून देवांचीं आयुधें निर्माण झालीं.

बा जनमेजया, वर सांगितलेले हे सर्व देवगण सहस्रयुगांचे अंतीं पुनरपि याचप्रमाणें जन्मास येतात. यांपैकीं फक्त तेहतीस[१] देव मात्र आपखुषीनें जन्मास येतात. एवंच, या देव म्हणविणारांना देखील उत्पत्ति व लय हीं आहेतच. ज्याप्रमाणें इहलोकीं सूर्य नित्य उगवतो व मावळतो, त्याचप्रमाणें हे देवतांचे समुदाय युगायुगांचे आरंभीं उत्पन्न होतात व अंतीं लयास जातात.

आम्हीं असें ऐकितों कीं, हिरण्यकशिपु व हिरण्याक्ष असे दोन बलाढ्य पुत्र कश्यपापासून दितीला झाले. यांशिवाय तिला सिंहिका नांवाची कन्या होती व ती विप्रचित्तीला दिली होती. हिला सैंहिकेय नांवाचे महाबलिष्ठ पुत्र झाले, त्यांच्या अनुयायांसह त्यांची गणना केली असतां दहा हजार होती, असें सांगण्यांत येतें. या सैंहिकेयांचे पुत्रपौत्र यांची गणती करूं गेल्यास तीं शेंकडोंनीं, हजारोंनीं किंबहुना असंख्यातांनींच करावी लागेल. हिरण्यकश्यपूला महान् तेजस्वी चार पुत्र होते, त्यांचीं नांवें: अनुऱ्हाद, ऱ्हाद, प्रऱ्हाद ( जगत्प्रसिद्ध तोच ) व चवथा पुत्र संऱ्हाद. यांपैकीं ऱ्हादाला ऱ्हद नामक पुत्र होता; संऱ्हादाला सुंद व निसुंद असे दोघे होते; अनुऱ्हादाचे आयु, शिबी व काल असे तीन; प्रऱ्हादाला विरोचन नामक एकच पुत्र होता. विरोचनाला सर्व प्रख्यात बलि झाला. या बलीला, हे राजा, शंभर पुत्र होते. त्यांचीं नांवें:—धृतराष्ट्र, सूर्य, चंद्रमा, इंद्रतापन, कुंभनाभ, गर्दभाक्ष, कुक्षि, वगैरे, वगैरे. या सर्वांत जो वडील होता त्याचें नांव बाण. हा अत्यंत बलिष्ठ असून शंकराचा प्रिय भक्त होता. कारण, पूर्वकल्पांत या बाणानें उमापति जो शंकर त्याची कृपा संपादून असा वर मागून घेतला होता कीं, मी सदा आपल्या ( शंकराच्या ) पाठीशीं असावें.

या बाणाला लोहिता नामक स्त्रीपासून इंद्रदमन नांवाचा पुत्र झाला. हा इतका पराक्रमी झाला कीं, शेंकडों नव्हे लाखों असुर त्याचे अनुयायी बनले. हिरण्याक्षाला मोठे विद्वान् व बलाढ्य असे पांच पुत्र होते; त्यांचीं नांवें:—झर्झर, शकुनि, भूतसंतापन, महानाभ व कालनाभ. दनूला अत्यंत तीव्र पराक्रमी असे शंभर पुत्र झाले. हे सर्व तपस्वी व महाबलाढ्य होते; यांचीं नांवें यांच्या महत्वाच्या मानानें यथाक्रम सांगतों, तीं अशीं:—द्विमूर्धा, शकुनि, शंकुशिर, विभु, शंकुकर्ण, विराध, गवेष्ठी, दुंदुभी, अयोमुख, शंबर, कपिल, वामन, मरीचि, मघवा, इरा, शंकुशिरा, वृक, विक्षोभण, केतु, केतुवीर्य, शतऱ्हाद, इंद्रजित्, सत्यजित्, वज्रनाभ, महानाभ, विक्रांत, कालनाभ, एकचक्र, महाबाहु, तारक, महाबल, वैश्वानर, पुलोमा, विद्रावण, महासुर, स्वर्भानु,

---

[१] हे तहतीस म्हणजे आठ वसु, अकरा रुद्र, बारा आदित्य, एक इंद्र आणि एक प्रजापति. यांवरूनच तेहतीस कोटी देव असा लौकिकी समज झालेला दिसतो.

वृषपर्वा, तुहुंड, सूक्ष्म, निचंद्र, ऊर्णनाभ, महागिरी, असिलोमा, केशी, शठ, बलक, मद, गगनमूर्धा, बलाढ्य कुंभनाभ, प्रमद, मय, कुपथ, हयग्रीव, वैसृप, विरूपाक्ष, सुपथ, हर, अहर, हिरण्यकशिपु, शतमाय, शंबर, शरभ, शलभ, व वीर्यवान् विप्रचित्ति, इत्यादि, इत्यादि. हे सर्वहीजण कश्यपापासून दनु नामक स्त्रीला झाले. म्हणून यांस दानव म्हणतात. या सर्वांत विप्रचित्ति हा वरिष्ठ होता, बाकी सर्वच बलाढ्य होते. हे नरश्रेष्ठा, या शंभर बंधूंना झालेलीं मुलें व त्या मुलांचीं मुलें यांची गणना करण्याची सोयच नाहीं. तीं केवळ असंख्य होतीं असें समज. स्वर्भानूला प्रभा नांवाची मुलगी होती. पुलोमाला तीन मुली होत्या. हयशिराला उपदानवी व वृषपर्व्याला शर्मिष्ठा नामक कन्या होती.

वैश्वानराला पुलोमा व कालिका अशा दोन मुली होत्या. या फार बळकट असून यांना मुलेंही फार झालीं. या दोघी मरीचिपुत्र जो मारीचि याला दिल्या होत्या. हा मारीचि मोठा तपस्वी असल्यामुळें त्यानें या स्त्रियांपासून साठ हजार पुत्र निर्माण केले. यांशिवाय त्यानें दुसरे चवदाशें पुत्र निर्माण केले होते. यांतील कांहींना पौलोम ( पुलोमेचे पुत्र ) व बाकीच्यांना कालकेय ( कालिकेचे पुत्र ) अशी संज्ञा होती. हे सर्वच मोठे बलाढ्य असून त्यांनीं हिरण्यपुरांत वस्ती केली होती. शिवाय, ' देवतांपासून तुम्हांला मरण नाहीं ' असा ब्रह्मदेवांनीं त्यांना वर दिला होता. अखेरीस सव्यसाचीनें ( अर्जुनानें ) यांस युद्धांत मारिलें. प्रभेला नहुष नांवाचा पुत्र झाला. पुलोमेच्या मुलींतील शचि जी तिला सृंजय नामक पुत्र झाला. शर्मिष्ठेला पुरु व उपदानवीला दुष्यंत झाला. नंतर पूर्वीं सांगितलेली विप्रचित्ती दानवाची स्त्री जी सिंहिका तिला सैंहिकेय नांवाचे तेरा मुलगे झाले, म्हणून पूर्वीं सांगितलेंच आहे. आई दैत्य व बाप दानव अशा मिलाफापासून हे तेरा बंधु झाले असल्यानें हे मोठे बलाढ्य, तीव्र पराक्रमी व अतिदारुण असे निपजले. यांचीं नांवें:— व्यंश, शल्य, नभ, वातापि, नमुचि, इल्वल, खसृम, अंजिक, नरक, कालनाभ, शुक, पोतरण व बलाढ्य वज्रनाभ. चंद्रसूर्याला चिरडून टाकणारा जो सिंहिकापुत्र राहू[1] तो या सर्वांचा वडील बंधु. र्‍हादाला मूक व तुहुंड असे दोन पुत्र झाले. सुंदाला ताटकेच्या ठिकाणीं मारीच व केवळ देवतुल्य पराक्रमी असा शिवमाण नांवाचा दुसरा एक पुत्र झाला. हे राजा, दनूचा वंश वाढविणारे जे मुख्य मुख्य ते हे:— यांचे पुढें पुत्रपौत्र शेंकडों हजारोंच झाले. निवातकवच नांवाचे जे मोठे तपस्वी व आत्मज्ञानी दैत्य निर्माण झाले ते सर्व संर्‍हादाचे झाले. हे निवातकवच मणीमती नगरींत रहात असत. हे देवांनाही अजिंक्य असत. परंतु अर्जुनानें या सर्वांचा फडशा पाडला. यांना तीन कोट संतति झाली होती. ताम्रा नामक जी कश्यप स्त्री होती तिला मोठ्या सशक्त अशा सहा मुली झाल्या. त्यांचीं नांवें:——काकी, श्येनी, भासी, सुग्रीवी, शुचि व गृध्रिका. यांपैकीं काकीपासून काक ( कावळे ) झाले; उलूकीपासून उलूक ( दिवाभीत ); श्येनीपासून श्येन ( ससाणे ); भासीपासून भास ( कोंबडे ); गृध्रीपासून गृध्र ( गिधाड ); शुचीपासून पाण्यांतील पक्षी ( पाणपांखरें ), व सुग्रीवीपासून घोडे, उंट, गाढवें; याप्रमाणें ताम्रेचा वंश सांगितला आहे.

विनतेला अरुण व गरुड असे दोन पुत्र आरूण झाले. यांपैकीं गरुड हा सर्व पक्ष्यांत श्रेष्ठ असून त्याच्या पराक्रमाचा सर्वांना मोठा वचक

---

१ हिशोबानें पाहतां राहूचें नांव वरील तेरांत असावें, परंतु मुळांत तसें नाहीं; कदाचित् वरील नांवांपैकींच एखाद्याला नामान्तर असलें तर नकळे.

आहे. सुरसेला अत्यंत तेजस्वी व अनेक मस्तकांचे असे भुईवर सरपटणारे व आकाशांत भ्रमणारे सहस्र पुत्र झाले. तसेच अपरिमित तेजानें युक्त, मोठे बलवान्, अनेक मस्तकें धारण करणारे व गरुडाच्या ताब्यांत राहाणारे असे नागजातींचे सहस्र पुत्र कद्रूला झाले. यांतील प्रमुख प्रमुखांचीं नांवें:—शेष, वासुकि, तक्षक, ऐरावत, महापद्म, कंबल, अश्वतर, एलापत्र, शंख, कर्कोटक, धनंजय, महानील, महाकर्ण, धृतराष्ट्र, बलाहक, कुहर, पुष्पदंष्ट्र, दुर्मुख, सुमुख, शंख, शंखपाद, कपिल, वामन, नहुष, शंखरोमा, मणि, इत्यादि, इत्यादि. यांच्या पुत्रपौत्रांपैकीं क्रूर असे चौदा हजार नाग सर्पांवर उपजीविका करणाऱ्या गरुडानें लोळवून खाऊन फस्त केले, व यामुळें सर्व तीक्ष्ण दंतांनीं युक्त असे हे नाग गरुडावर जळफळत असतात. दंतयुक्त स्थलचर व पाण्यांतील पक्षी ही धरेची संतति समजावी. सुरभीनें गाई व म्हशी निर्माण केल्या. इरा नामक स्त्रीनें वृक्ष, वेली, लता व तृणाच्या सर्व जाती यांस जन्म दिला. खशेच्या पोटीं राक्षस, यक्ष, मुनि व अप्सरा जन्मलीं. अरिष्टेनें मोठे बलवान् व अमित तेजस्वी अशा गंधर्वांस जन्म दिला. याप्रमाणें कश्यपाच्या वीर्यांशानें झालेली सर्व स्थावरजंगम सृष्टि तुला सांगितली. हिजपासून पुढें जी पुत्रपौत्रादि संतति झाली ती असंख्यच.

हे जनमेजया, येथवर जी ही मीं तुला सर्व सृष्टि सांगितली ती सर्व स्वारोचिष मन्वंतरांतील होय. आतां वैवस्वतांतील सांगतों. या वैवस्वत मनूच्या आरंभीं वरुणानें दीर्घकालपर्यंत यज्ञ केला. त्यांत ब्रह्मदेवाला आर्त्विज्य दिलें होतें, त्या समयीं ब्रह्मदेवानें हवन केलें. त्या वेळेपुढची ब्रह्मदेवाची सृष्टि मी आतां तुला सांगतों. आरंभीं ब्रह्मदेवानें आपल्या मनापासून सात ब्रह्मऋषि निर्माण केले व तेच आपले पुत्र असे मानिले. हे जनमेनया, देवदानवांचा संगर होऊन सर्व दानव मारले गेले. त्यावेळीं कश्यपाची स्त्री दिति ही अपत्यहीन झाल्यामुळें पुन्हा आपला पति कश्यप याची तिनें आराधना चालविली. नंतर तिच्या सेवेनें कश्यप अतिशय संतुष्ट होऊन " तुला वाटेल तो वर मागून घे " म्हणून मोठ्या गोडीनें व लाडानें तिला म्हणाला. पतीची प्रसन्नता पाहून तिनेंही वर मागितला. तो असा कीं, इंद्राचा वध करण्यास सर्वथा समर्थ असा अत्यंत तेजस्वी पुत्र मला द्यावा. कश्यप ऋषि महातपस्वी असल्यामुळें असलाही वर देणें त्यांस अवघड न वाटतां, ते स्वस्थ मनानें तिला म्हणाले, " हे प्रिये, तूं मागते आहेस तसला म्हणजे इंद्राला मारणारा पुत्र तुला खचित होईल. परंतु या कामीं तुला दोन गोष्टी पाळाव्या लागतील. त्या अशाः—'एक तर तुला हा गर्भ शंभर वर्षेंपर्यंत पोटांत बाळगावा लागेल व दुसरी गोष्ट हा सारा वेळ तुला अनन्यवृत्तीनें व अत्यंत पवित्रतेनें व्रतस्थ राहावें लागेल.' भर्त्याच्या या शब्दांस तिनें तत्काल रुकार दिला; व हे राजा, त्या पवित्र स्त्रीला त्या महातपस्वी कश्यपानें तिचे इच्छेनुरूप गर्भ दिला. गर्भ स्थापन करण्याचे वेळीं कश्यपांनीं ज्याच्या तेजाला मिति नाहीं व जो सर्व गणांत वरिष्ठ व देवांनाही अमर अशा पुरुषाचें एकाग्रतेनें चिंतन करून त्याचें दुर्निवार्य असें तेज आपल्या वीर्यांत आणून तें तेज दितीचे गर्भांत स्थापन केलें. गर्भस्थापना होतांच तो कर्मठ ऋषि तपश्चर्येसाठीं पर्वतावर निघून गेला. इकडे पाकशत्रु जो इंद्र तो दिति

१ ही गोष्ट म्हणजे पौराणिक बाड नव्हे. ही सर्वथा शास्त्रयुक्त व अनुभव यांनीं प्रस्थापित आहे व प्रत्येक दंपत्यानें ध्यानांत ठेविल्यास खरोखर उंची संतति निपजेल.

भग्नव्रत केव्हां होते हें पाहाण्यासाठीं डोळ्यांत तेल घालून टपणीस बसला. बहुत वर्षें त्याला कोठेंच व्रतभंग दिसेना. परंतु शंभरावें वर्ष भरण्याच्या कांहींसें अगोदर त्याला तिच्या आचरणांत एक छिद्र सांपडलें. तें असें कीं, एक रात्रीं ती हातपाय न धुतां तशीच आंथरुणावर जाऊन निजली. एवढी फट सांपडतांच इंद्र तत्काल तिच्या कुशींत ( तिच्या पोटांत ) शिरला व तिला त्यानें अत्यंत गाढ अशी झोंप आणिली.

मग ती निद्रेचे भरांत बेशुद्ध असतां इंद्रानें आपल्या वज्रानें तिच्या एका गर्भाचे सात तुकडे केले. इंद्र जेव्हां त्या गर्भाचे तुकडे करूं लागला, तेव्हां तो गर्भ रडूं-ओरडूं लागला. त्या वेळीं इंद्र त्या गर्भाला गप बस, रडूं नको, म्हणून पुनःपुनः दरडावून सांगूं लागला, तों तों तो गर्भ अधिकच केकाटूं लागला. त्या वेळीं इंद्रानें संतापून आपल्या वज्रानें त्या पहिल्या सात खांडांपैकीं पुनः प्रत्येक गर्भाचीं सात सात खांडें म्हणजे एकूण मूळच्या एक गर्भाचे एकूणपन्नास गर्भ केले. पुढें हे एकूणपन्नास गर्भ मरुत या नांवानें प्रसिद्ध झाले. इंद्रानें त्यांस गर्भांत "मा रुद" म्हणजे रडूं नको, रडूं नको, असें म्हटलें होतें म्हणून यांस मरुत हें नांव पडलें, व हे सर्व इंद्राचे शत्रु न होतां उलट त्याचे साहाय्यकर्ते झाले.

सारांश, एकाचे एकूणपन्नास या श्रेढीनें जेव्हां प्रजा वाढत चालली, त्या वेळीं परमात्मा जो हरि यानें इंद्राला खूष करण्यासाठीं, लोकसंख्येचे पृथक् पृथक् विशिष्ट समूह करून एकेका समूहाला एकेक प्रजापालक म्हणजे राजा नेमून देऊन सर्वांचीं वेगळीं वेगळीं राज्यें स्थापन केलीं. या राजांत पृथु हा पहिला राजा होता. असो; याप्रमाणें प्रजेची व्यवस्था लावणारा जो हा हरि तोच परमपुरुष होय.

हे राजा, यालाच वीर, कृष्ण, जिष्णु, प्रजापति, पर्जन्य, सूर्य असेंही म्हणतात. किंबहुना हें साकार जगत् त्याचेंच किंवा तोच आहे.

हे भरतश्रेष्ठा, ही वर सांगितलेली प्राण्यांची उत्पत्ति व विशेषतः मरुत देवांचें शुभ जन्म हें जो श्रवण किंवा पठण करील अथवा यांचें सम्यक् ज्ञान करून घेईल त्याला पुनर्जन्माची देखील भीति नाहीं, मग परलोकाची कोठून असणार ?

## अध्याय चवथा.

—:०:—

### पृथूचें उपाख्यान.

हे राजा, पितामह ब्रह्मदेव यानें मागें सांगितल्याप्रमाणें वेनपुत्र पृथु याला सर्वांत श्रेष्ठ अशा राज्यावर अभिषिक्त करून त्याजकडे पूर्ण मालकी सोंपविल्यावर उरलेल्या भिन्न भिन्न भूतसमूहांच्या राज्यांवर अधिपति नेमण्याचा क्रम चालविला. तो असाः—पक्षि, लता, नक्षत्रें, ग्रह, यज्ञ व तप इतक्यांचें आधिपत्य सोमा[1]कडे दिलें. जलाचें आधिपत्य वरुणाकडे दिलें; यक्षांचें श्रेष्ठत्व कुबेरा[2]कडे दिलें; विश्वेदेवांचें स्वामित्व अंगिरस कुलोत्पन्न बृहस्पतीकडे दिलें व शुक्राचार्यांस भृगुकुलाचें आधिपत्य दिलें. द्वादशादित्यांत विष्णूला[3] श्रेष्ठत्व दिलें, व अष्टवसूंत पावकाला[4] मुख्य केलें, सर्व प्रजापतींचा मुख्य दक्ष प्रजापति केला, मरुद्गणांचें नायकत्व इंद्राकडे दिलें; अमित तेजस्वी जो प्रऱ्हाद[5] त्याला दैत्य व दानव या उभय कुलांचा

१ नक्षत्राणामहंशशी । गीता, १०-२१.

२ वित्तेशो यक्ष रक्षसां । गीता, अ. १०-२३.

३ आदित्यानामहं विष्णुः । गीता, १०-२१.

४ वसूनांपावकश्चास्मि । गीता, १०-२३.

५ प्रऱ्हादश्चास्मि दैत्यानाम् । गीता, १०-३०.

अधिपति केलें. पितरांचे राज्यावर सूर्यपुत्र यमधर्म याला स्थापिलें. अष्टमातृका[1], व्रतें, मंत्र, गाई, यक्ष, राक्षस व पृथ्वीपाल यांचें आधिपत्य नारायणाकडे दिलें. साध्य व रुद्र यांचें स्वामित्व वृषभध्वज जो शंकर[2] त्याजकडे दिलें. दानव समूहाचें नायकत्व विप्रचित्तीकडे दिलें. शूलपाणी शंकर यास भूतपिशाच्चांचा अधिपति नेमिलें. सर्व पर्वतांत हिमालयाला अग्रस्थान दिलें. नदांचें पतित्व सागराकडे ठेविलें. गंध, मरुद्गण, प्रेतादिक, ध्वनि, अंतरिक्ष व पृथ्वी यांवर बलिष्ठ वायूला अधीश नेमिलें. बलवान् चित्ररथाला[3] गंधर्वांत वरिष्ठ केलें, नागांत वासुकीला[4] व सर्पांत तक्षकाला स्वामित्व दिलें. हत्तींचें अग्रेसरत्व ऐरावताकडे[5], अश्वांचें उच्चैःश्रव्याकडे[6] व पक्ष्यांचें गरुडाकडे[7] प्रभुत्व दिलें; श्वापदांचें स्वामित्व सिंहाकडे व गाईंचें प्रभुत्व सांडाकडे[8] दिलें. वृक्षांत अश्वत्थाकडे[9] वर्चस्व ठेविलें; सागर, नद्या, वृष्टि आणि आदित्य यांच्या राज्यावर पर्जन्याला बसविलें. दंश करणाऱ्या प्राण्यांची मालकी शेषाकडे दिली; सरपटणारे जे सर्पादि त्यांचा तक्षक स्वामी नेमला; गंधर्व आणि अप्सरा यांची नायकी बलाढ्य जो मदन त्याकडे दिली; ऋतु, महिने, दिवस, पक्ष, रात्री, तिथि, पर्व, कला, काष्ठा, वगैरे कालमानें, अयनांच्या गति व योग (ग्रहयुति वगैरे), या सर्वांचें प्रभुत्व संवत्सराकडे दिलें.

याप्रमाणें राज्यांची वांटणी केल्यावर ब्रह्मदेवानें दिक्पाल नेमिले. वैराज प्रजापतीचा पुत्र जो सुधन्वा त्याला पूर्वेचा दिक्पाल केलें, दक्षिण दिशेचें पालकत्व कर्दमप्रजापतीचा पुत्र शंखपद याजकडे सोंपविलें, राजसपुत्र महात्मा केतुमान याला पश्चिम दिशेस नेमिलें; त्याचप्रमाणें पर्जन्य प्रजापतीचा अजिंक्य पुत्र जो हिरण्यरोमा त्याला उत्तर दिशा दिली. हे नेमिलेले दिक्पाल सप्तद्वीपांनीं व अनेक पर्वतांनीं युक्त जी ही विस्तीर्ण पृथ्वी तिचें आपआपल्या ठिकाणीं राहून धर्मानें आजपर्यंत परिपालन करीत आहेत. वर जे भिन्न भिन्न राज्यांचे राजे सांगितले, त्या सर्वांनीं मिळून एक राजसूय यज्ञ करून पृथूला वेदोक्त विधीनें आपणा सर्वांचा राजा म्हणजे चक्रवर्ती नेमिलें.

याप्रमाणें व्यवस्था होऊन अतितेजस्वी असें चाक्षुष मन्वंतर संपल्यावर पुढील मन्वंतराची मालकी ब्रह्मदेवानें वैवस्वत मनूकडे दिली. हे राजा, तुझी अनुकूलता असेल व तूं ऐकण्यास राजी असशील तर या मनूचें सविस्तर वर्णन सांगावें, असें माझ्या फार मनांत आहे. कारण पुराणांत याचें फल फार मोठें सांगितलेलें आहे. याचे श्रवणानें मानप्रतिष्ठा, धनधान्य, कीर्ति, आयुष्य व अंतीं स्वर्गवास, हीं सर्व प्राप्त होतात, असें सांगितलें आहे.

जनमेजय राजा म्हणतोः—फार नामी गोष्ट; तर, वैशंपायना, आरंभीं त्या महात्म्या पृथु राजानें या वसुंधरेचें दोहन कसकसें केलें; तसेंच त्यानंतर देव, पितर, ऋषि, दैत्य, नाग,

---

१ ब्राम्ही, माहेश्वरी, नारायणी, ऐंद्री, वाराही, कौमारी, नारसिंही, अपराजिता. या आठ मातृका किंवा देवशक्ति होत.

२ रुद्राणां शंकरश्चास्मि । गीता, १०–२३.

३ गंधर्वाणां चित्ररथः । गीता, १०–२६.

४ सर्पाणामस्मि वासुकिः । गीता, १०–२८.

५ ऐरावतं गजेंद्राणां । गीता, १०–२७.

६ उच्चैः श्रवसमश्वानां । गीता, १०–२७.

७ वैनतेयश्च पक्षिणां । गीता, १०–३०.

८ गाईकरितां राखून ठेवलेल्या बैलास सांड म्हणतात.

९ अश्वत्थः सर्व वृक्षाणां । गीता, १०—२६.

यक्ष, वृक्ष, पर्वत, पिशाच्च, गंधर्व, द्विजश्रेष्ठ, इत्यादि महासत्वांनींही तिचें दोहन कसकसें केलें; त्यावेळीं पात्रें कसलीं घेतलीं होतीं; वत्स कोणकोणते होते; कसकसल्या प्रकारचें दूध निघालें व दूध काढणारे कोण कोण होते, हें सर्व क्रमाक्रमानें मला सांगा. त्याचप्रमाणें पूर्वीचे महर्षींनीं वेन राजावर क्रुद्ध होऊन त्याचे हाताचें घुसळण कां केलें, तेंही मला सांगा.

वैशंपायन म्हणतातः—शाबास जनमेजया, तुझी तत्परता पाहून मला मोठा आनंद झाला आहे. मी तुला वेनपुत्र जो पृथु याचें वृत्त सविस्तर सांगतों व तूंही एकाग्र चित्तानें व पवित्रपणानें असाच ऐक. हे राजा, हें पृथूचें चरित्र अमंगळ, क्षुद्र मनाचा, व्रतहीन, कृतघ्न, दुष्ट व कुशिष्य अशाला सांगूं नये; याची योग्यता फार मोठी आहे. हें वेदाला मान्य असून स्वर्ग, यश, आयुष्य व धर्मप्राप्ति करून देणारें आहे; व ऋषींनीं ही मोठी एक गुप्त गोष्ट म्हणून सांगितलें आहे. तें मी तुला जशाचें तसेंच सांगतों, श्रवण कर. हे राजा, प्रथम ब्राह्मणांना नमस्कार करून जो कोणी हें वैन्य चरित्र सविस्तरपणें नित्य लोकांस कथन करील त्याला कृत व अकृत कर्मांमुळें घडलेल्या पापांबद्दल हाय हाय करीत बसण्याची वेळ येणार नाहीं.

## अध्याय पांचवा.

—:o:—

### वेन राजा.

वैशंपायन सांगतातः—पूर्वकाळीं अत्रि वंशांत उत्पन्न झालेला व अत्रीप्रमाणेंच पराक्रमी अंग नांवाचा प्रजापति धर्मपालक होता; याच्या पोटीं वेन नांवाचा एक पुत्र झाला. परंतु हा अत्यंत धर्मभ्रष्ट होता. याची आई सुनीथा नांवाची यमाची मुलगी होती व हा आपल्या आईच्या बापाच्या वळणावर गेल्यामुळें अर्थातच फार दुष्ट निपजला. धर्म वगैरे सर्व गुंडाळून ठेवून लोकांत मनसोक्त वागूं लागला. वेदधर्माची मर्यादा उल्लंघून अक्षयी अधर्मामध्यें स्वतः रत होऊन लोकांनाही धर्म-बाह्य वर्तनाचा त्यानें सक्तीनें कित्ता घालून दिला. अर्थातच त्याच्या राजवटींत कोठें वेदाध्ययन ऐकूं येईना, कोठें वषट्कार कानीं पडेना, देवतांना यज्ञांत हविर्भाग किंवा सोम-पान मिळेना. कारण त्याचे पुढें घडे भरावयाचे होते म्हणूनच कीं काय त्यानें आपल्या प्रजाजनांत असा कडक हुकूम फिरविला होता कीं, मला सोडून अन्य कोणाही देवतेचे उद्देशानें यज्ञ किंवा हवन करतां कामा नये; केल्यास कर्त्याला तीव्र शासन प्राप्त होईल. यज्ञस्वरूप मीच आहें; यष्टा मीच आहें; ईज्य मीच आहें. याकरितां कोणालाही यज्ञ करणें असेल तर मलाच देव मानून करावा; हवन करणें असेल तरी माझेंच उद्देशानें करावें. याप्रमाणें लोकांना सांगून व आपला ज्यांवर हक्क नाहीं असले यज्ञांतील हविर्भाग मागून त्यानें जेव्हां केवळ अमर्याद अंदाधुंदी मांडिली तेव्हां मरीचिप्रभृति महर्षि म्हणाले, "हे राजा, आम्हीं आतां बहुत वर्षें-पर्यंत यज्ञदीक्षा घेऊन व्रतस्थ राहाणार आहोंत; करितां तुला प्रार्थना एवढीच कीं, तूं असा धर्मलंडपणा करूं नको. आपली मागून चालत आलेली रीत ही नव्हे. तूं प्रजापति या संज्ञेनें या कुलांत उत्पन्न झालेला असून त्या संज्ञेला अनुरूप असें मी प्रजांचें पालन करीन, असा तूं करारही केलेला आहेस."

याप्रमाणें ते सर्व महर्षि बोलत असतां तो दुष्टबुद्धि व विपरीतार्थ करणारा वेन त्यांचा उपहास करून म्हणाला, 'ऋषीहो, तुम्ही

म्हणतां कीं, धर्ममर्यादा अशी नाहीं, तशी नाहीं, तर मजविरहित धर्मांचा उत्पत्तिकर्ता तरी कोण आहे व मीं ऐकावें तरी कोणाचें ? या भूतलावर मजसारखा कोण आहे ? अहो ! माझी विद्वत्ता, माझें वीर्य, माझें तप व माझी सत्यप्रीति, यांना भूलोकीं कोठें तुलना आहे काय ? मूर्खहो, तुमच्या अकला गेल्या कोठें ? मी सर्व प्राणिमात्रांचा व विशेषेंकरून सर्व धर्मांचा उगम आहें, हें तुम्हांला कसें कळत नाहीं ? माझी लहर लागेल तर ही पृथ्वी मी जाळून खाक करीन; मर्जीस आल्यास मी हिला पाण्यांत बुडवून टाकीन किंवा खुषी वाटल्यास आकाश व पृथ्वी हीं दोन्ही चोंदून टाकीन. यांत काडीचा संशय बाळगूं नका.'

याप्रमाणें प्रार्थना केली असतांही मोहामुळें व गर्वामुळें उन्मत्त झालेला वेन जेव्हां वाटेवर येईना, तेव्हां त्या महर्षींच्या पायांची आग मस्तकाला गेली व दर्पानें फूं फूं करीत असलेल्या त्या महाबलाढ्य वेनाला त्यांनीं जागच्या जागीं दडपून धरिला. रागाच्या झपाट्यांत त्याच्या उजव्या मांडीचें घुसळण चालविलें. तें घुसळण चाललें असतां एक अतिशय खुजा व काळाकुट्ट पुरुष त्या मांडींतून निघून कांपत कांपत ऋषींपुढें हात जोडून उभा राहिला. त्याची ती विव्हल स्थिति पाहून निषीद( खालीं बस )असें अत्रिऋषीनें त्याला सांगितलें. या शब्दावरून त्याला निषाद असें नांव पडलें; व तो पुढें निषादांच्या ( फांसेपारध्यांच्या ) कुळाचा मुख्य झाला. यानंतर वेनाच्या कल्मषापासून ( काळ्याकुट्ट पापापासून ) धीवर म्हणजे मच्छिमार कोळी उत्पन्न झाले. याशिवाय विंध्याद्रीवर राहाणारे भिल्ल, तुषार, तुंबर, वगैरे जाती व जे कोणी अधर्मप्रिय लोक ते वेनापासूनच झालेले असें समजावें. एवढें झालें तरी ऋषींचा कोप शांत होईना व मग त्यांनीं मांडी सोडून देऊन त्वेषानें वेनाच्या उजव्या हाताचें अरणीप्रमाणें[1] घुसळण मांडिलें. तेव्हां त्या हातापासून अग्नीप्रमाणें देदीप्यमान, नव्हे, साक्षात् अग्नीच असा पृथू नांवाचा पुरुष निर्माण झाला. पृथु जो उत्पन्न झाला तोच मोठा तेजस्वी व यशस्वी असून तो आजगव नांवाचें अतिश्रेष्ठ धनुष्य, दिव्यबाण व शरीररक्षणार्थ अंगांत खेळलेलें देदीप्यमान कवच, अशा सिद्धसामग्रीसहच उत्पन्न झाला. तो जन्मास येतांच सर्वत्र भूतमात्रांना आनंदीआनंद झाला; व त्याचा पिता वेन हा तत्काल स्वर्गास गेला. हे जनमेजया, असला दुष्ट वेन स्वर्गास कसा गेला म्हणशील तर त्याच्या पोटीं पृथूसारखा सत्पुत्र निपजल्यामुळें. कारण, पुत्र या शब्दाचा अर्थ पुम् नामक नरकापासून त्रायते म्हणजे पितरांना जो राखतो तो, असा आहे; व पृथु या अर्थाला अनुरूप असा सत्पुत्र असल्यामुळें त्याच्या बळानें त्याचा पातकीही पिता स्वर्गाला गेला. असो; पृथु जन्मतांच त्याला राज्याभिषेक करण्यासाठीं चारी दिशांकडून नद्या व समुद्र आपणांजवळील रत्नांचा उपहार घेऊन अंगीं येऊन उभे राहिले. त्याचप्रमाणें अंगिरसकुलोत्पन्न सर्व ऋषि व देव, तसेच स्थावरजंगम प्राणी यांसह ब्रह्मदेवांनीं स्वतः येऊन त्या महातेजस्वी पृथूला सर्व राजांचाही राजा म्हणून प्रजापालनाचे कामीं मूर्धाभिषेक केला. याप्रमाणें मोठमोठाल्या धर्मज्ञांनीं त्या वेनपुत्र पृथूची आदिराज्यावर स्थापना केली. तेव्हांपासून बापाचे कृतीनें प्रजाजन जे असंतुष्ट झाले होते ते या प्रतापी राजानें आपले अनुकूल वर्तनानें रंगवून म्हणजे खूष करून सोडले; व या त्याच्या प्रजारंजनानें लोक म्हणूं लागले कीं, याला

[1] अग्निहोत्रार्थ अग्नि पाडण्याकरितां घेतलेल्या लांकडांपैकीं खालचें.

राजा ही संज्ञा सर्वथा अन्वर्थक आहे. सर्व भूतें त्याच्याशीं इतक्या प्रेमानें व अनुकूलतेनें वागत कीं, तो समुद्रावरून प्रवास करूं निघाला असतां त्याला त्रास न पडावा म्हणून समुद्र आपसुखा बर्फासारखा घट्ट होऊन त्याला मार्ग देई. त्याचप्रमाणें पर्वतही दुभंग होऊन मधून वाट देत; ध्वजा उभारलेला त्याचा रथ रानावनांतून जाऊं लागला असतां मार्गांत आलेलीं वृक्षवल्ली आपोआप वाटेवेगळीं होत. परंतु त्याच्या ध्वजेचा कधींही भंग होऊं देत नसत. नांगरल्यावांचूनच भूमी पिके. नुसत्या संकल्पानें वाटेल त्या तऱ्हेचीं अन्नें सिद्ध होऊन पुढें येत. सर्वच गाई कामधेनूच्या किंमतीच्या झाल्या. वृक्षांवरील सर्व फुलांच्या पांकळ्या मधानें थबथबत होत्या. याप्रकारें भूतमात्र स्वानंदानें पृथूचें साहाय्य करीत असतां ब्रह्मदेवांनीं सोमयज्ञ आरंभिला. त्या यज्ञांत सूतीच्या दिवशीं म्हणजे ज्या दिवशीं सोमवल्ली कुटून तिचा अंगरस काढावयाचा असतो, त्या दिवशीं सूत नांवाचा पुरुष उत्पन्न झाला; व त्याच यज्ञांत पुढें मागध नांवाचा दुसरा एक मोठा ज्ञाता पुरुष उत्पन्न झाला. त्या वेळीं देव आणि ऋषि यांनीं त्या दोघां पुरुषांना बोलावून सांगितलें कीं, बुद्धिमंतांनों, तुम्ही दुसरें कांहीं करूं नका; केवळ या पृथुराजाची स्तुति करीत रहा, व त्याच्या पुण्यकर्माचें वर्णन गा. आम्ही तुम्हांला या राजाची स्तुति गावयास सांगतों. त्या स्तुतीस हा राजा सर्वथा पात्र आहे. हें ऐकून सूत-मागध ऋषींना म्हणाले कीं, आम्ही देव आणि ऋषि यांना स्तुतीनें खूष करण्यास तयार आहों. परंतु या राजाचें स्तवन कसें करावें, तें आम्हांला समजत नाहीं. कारण याचें लक्षण काय व यानें काय काय गोष्टी केल्या आहेत, कोणती कीर्ति मिळविली आहे, हें आम्हांला कांहींच समजत नाहीं. हें ऐकून ऋषि त्यांस म्हणाले कीं, तुमचें म्हणणें खरें आहे; तर याला अशी युक्ति करा कीं, या पृथूनें मागल्या कल्पांत जीं कृत्यें केलीं होतीं तींच याही जन्मांत तो करील, असें गृहीत धरूनच तुम्हीं त्याची स्तुति करावी, असें आमचें तुम्हांस सांगणें आहे. मागील कल्पीं हा कसा होता, यानें काय केलें, त्याची माहिती आम्ही तुम्हांला देतों, ती ऐका. हा पृथु पूर्व कल्पीं मोठा बलाढ्य, सत्यवक्ता, दानशील, सत्यप्रतिज्ञ, श्रीमान् , विजयी, क्षमाशील, पराक्रमी, दुष्टांना शासन करणारा, धर्मवेत्ता, दयाशील, प्रिय भाषण करणारा, लोकमान्य, इतरांचा सत्कार करणारा, यज्ञयाग करणारा, ब्राह्मणप्रिय, सत्यनिष्ठ, शमी, शांत, व्यवहारदक्ष व जीव लावून आपलें कर्तव्य करणारा, असा होता.

याप्रमाणें ऋषींनीं आज्ञा केल्यावरून त्या सूतमागधांनीं त्या पृथुराजाचें यथास्थित स्तोत्र केलें व त्या वेळेपासून कोणत्याही राजानें कांहीं स्तुत्य कृत्य केलें असतां सूत, मागध, बंदी, म्हणजे भाट लोक येऊन राजाचे गुण गातात व आशीर्वाद देऊन जयजयकार करितात. असो; त्या स्तुतिकुशल सूतमागधांची ती स्तुति ऐकून पृथुराजा अतिशयच खूष झाला; व त्यानें त्यांचे कामागिरीबद्दल सूताला अनूप नांवाचा देश, मगधाला मागध नांवाचा देश इनाम दिला. हें त्याचें कृत्य पाहून प्रजाजनही फार संतुष्ट झाले; व महर्षींही म्हणाले कीं, हा पृथु प्रजेला कायमचीं इनाम, वेतनें देऊन सुख देणारा होईल. ऋषींचा हा आशीर्वाद कानीं पडतांच अनेक प्रजाजन गोळा होऊन पृथूकडे आले व महर्षींच्या वचनाचा उल्लेख करून म्हणाले कीं, हे राजा, तूं आम्हांला

१ राजा या शब्दाचा अर्थ प्रजेचें रंजन म्हणजे प्रजेला संतोषित करणारा असा आहे.

पोटापाण्याची कायमची सोय लावण्यासाठीं कांहीं तरी इनाम, वतनें करून दे. याप्रमाणें सर्व प्रजाजनांनीं गराडा देऊन त्याला आग्रहाची विनंती केली, तेव्हां प्रजेचें चिरकल्याण करावयाचा हेतु मनांत धरून तो बलाढ्य पृथुराजा धनुष्यबाण घेऊन पृथ्वीच्या मागें लागला. त्याच्या पाठलागामुळें भूमी भयभीत झाली व निरुपाय झाला तेव्हां गाईचें रूप घेऊन सर्व धरणीभर सैरावैरा धांवत सुटली. पृथूही धनुष्य घेऊन तसाच तिचा पाठपुरावा घेत राहिला. अखेर त्याच्या भयानें ती ब्रह्मलोकीं गेली. पण पाहाते तों देवांनींही अजिंक्य असा मोठा बलाढ्य व मोठा करारी पृथुराजा, अति तीव्र व अग्नीप्रमाणें जाज्वल्य असें बाण लावलेलें धनुष्य घेऊन तेथेंही तिच्या पुढें उभाच. त्याचें तें तेज व त्याचा तो अढळ निश्चय हें पाहून पृथ्वीला असें वाटलें कीं, आतां याच्या तावडींतून आपणास अन्य कोणी सोडविणारा नाहीं. तेव्हां ती पृथ्वी स्वत: जरी त्रैलोक्याला पूज्य होती तरी आपला मोठेपणा बाजूस ठेवून हात जोडून पृथूलाच शरण येऊन म्हणाली कीं, हे राजा, तूं मला मारणार, पण स्त्रीवध हा धर्माला संमत नाहीं व तूं आपणास धर्मज्ञ म्हणवितोस त्या अर्थीं तुला हें करणें उचित नाहीं. दुसरें, मला नाहींशी करून तूं प्रजापालन कसें करणार ? कारण मजवरच लोक रहातात व मीच या जगताचें धारणपोषण करितें. तेव्हां माझा नाश केल्यास ज्यांचा कैवार घेऊन तूं उठला आहेस त्या प्रजांचाही सत्यानाश होईल हा उघडा हिशेब तुला कसा कळत नाहीं ? याकरितां तुला जर प्रजेच्या कल्याणाची इच्छा असेल तर माझा प्राण घेऊं नको. तूं आपल्याला प्रजेचा पालनवाला म्हणवितोस म्हणून तुला ही खरी गोष्ट समजून सांगितली, ती ऐक. बाबारे, अंगीं बळ असलें तरी सुमार न पाहातां अचरटपणा केल्यानें यश येत नसतें. कोणतेही गोष्टींत सिद्धि येणें तर सोईच्या रीतीनें व विचार पाहून आरंभ करावा लागतो. तेव्हां तूं जर प्रजारक्षणार्थ हा यत्न चालविला आहेस तर तें कशानें साधेल हें प्रथम मनाशीं पहा. मला ठार करून तर प्रजारक्षण होणें शक्यच नाहीं. हें जर खरें तर तुझाही हेतु सिद्ध होत नाहीं आणि माझाही नाश होतो, असें करण्यांत मतलब कोणता ? यापेक्षां तूं आपला क्रोध आंवरून धर आणि मी तुला अनुकूल होतें. बाबारे, मी गाय म्हणजे पशु असें तूं कदाचित् मानीत असलास तरी शास्त्रांत जो स्त्रीवधाचा निषेध सांगितला आहे तो केवळ मानवी स्त्रियांपुरता नसून पशुपक्ष्यादि नीच योनींच्या स्त्रियांपर्यंतही त्याची व्याप्ति आहे; शिवाय तूं आपणाला पृथ्वीपाल म्हणवितोस त्याअर्थीं तूं धर्मोल्लंघन करूं नयेस अशी माझी विनंति आहे.

याप्रमाणें अनेक प्रकारें गोरूप पृथ्वीनें केलेला बोध ऐकून तो थोर मनाचा व धर्मनिष्ठ राजा आपला क्रोध आंवरून पृथ्वीला जें काय म्हणाला, तें पुढील अध्यायीं आहे.

## अध्याय सहावा.

—:०:—

### पृथ्वीदोहन.

पृथु म्हणतो:—हे धरित्रि, तूं अधर्म होईल म्हणून मला सांगतेस, पण माझी समजूत या कामीं काय आहे, ती मी तुला सांगतों, ऐक. जो कोणी केवळ एका व्यक्तीच्या हितासाठीं—मग ती व्यक्ति तो स्वतः आपण असो किंवा अन्य कोणी असो—अनेक लोकांचा जीव घेईल त्याला पातक किंवा अधर्म लागेल. परंतु हे कल्याणि, ज्या एका दुष्टाला मारल्यानें

अनेक जीव सुखासमाधानानें नांदूं लागतील अशाचा वध करण्यापासून बारीक मोठें कसलेंच पातक लागत नाहीं; उलट दुष्टाच्या वधानें जर अनेक लोक सुखी होतील, तर असल्याच्या वधांत पुण्यसंग्रह आहे, असें मी समजतों; व याच न्यायानें मी माझ्या हजारों हजार प्रजांच्या कल्याणासाठीं तुला मारावयासच प्रवृत्त झालों आहें. मी केवळ माझ्या प्रजेच्या हितासाठीं जी गोष्ट करावयास तुला सांगेन ती न ऐकून जर तूं माझे आज्ञेला पराङ्मुख होशील तर तुला बाणानें अशीच ठार करीन. तूं मेल्यावर माझ्या प्रजा कोठें राहातील, हें तुला गूढ पडलें आहे, पण त्याचेंही उत्तर तुला सांगतों. मीच स्वतः तुझ्याऐवजीं सर्वभर विस्तीर्ण होऊन माझ्या अंगावर प्रजेचें धारण करीन. ती भ्रांति तुला नको. तेव्हां तुझ्या धमकीला मी कांहीं भीत नाहीं; पण तूंही ज्या अर्थीं आपणास धर्मज्ञ म्हणवितेस त्या अर्थीं मी तुला आज्ञा करितों, ती ऐक; व माझ्या प्रजेला उत्तम प्रकारें जीवन दे. हें काम करण्याला तूं समर्थही आहेस, म्हणून माझी आज्ञा अस्थानीं नाहीं. तुझ्या वधार्थ धनुष्याला लावलेला हा माझा उग्र बाण मी परत घ्यावा असें तुझें म्हणणें आहे तर तूं माझी कन्या होऊन माझे आज्ञेंत वाग म्हणजे मी हाच बाण आटपून ठेवितों.

पृथ्वी म्हणतेः—तूं सांगतोस त्या सर्व गोष्टी, हे वीरा, मी करीन, याबद्दल खातरी असूं दे. परंतु तूं कोणते युक्तीनें या प्रजांचें धारण करूं शकशील ती तोड काढ. शिवाय माझें दोहन करावयाचें म्हणतोस तर वत्साशिवाय मला पान्हा सोडतां येणार नाहीं, म्हणून दोहनकालीं तूं वत्स कोण लावणार तीही योजना कर. कारण मीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, कोणतीही गोष्ट करणें तर तिच्या सिद्धीचे योग्य उपाय प्रथम योजून मग आरंभ करावा, मग यश हटकून येतें. असो; तूं मजवर भरंवसा टाकिला आहेस, त्याअर्थीं, हे धार्मिकश्रेष्ठा, मीच तुला एक युक्ति सांगतें. ती ही कीं, तूं माझा पृष्ठभाग सम—विषम आहे तो सर्वत्र पाणसळींत येईल असा समतल कर म्हणजे माझ्या ओंटींतून दूध गळलें असतां तें भूमीच्या सर्व भागांकडे सारखें पोंचेल.[१]

वैशंपायन सांगतातः—पृथ्वीचें तें वचन ऐकून वेनपुत्र पृथुराजानें आपल्या धनुष्याचे अग्रानें भडाभड भूमीवरील उंचवटे उडवून एकावर एक रचले. त्यामुळें कांहीं टेंकडयांचे डोंगर झाले; व या युक्तीनें बाकीची पृथ्वी समतल झाली. यापूर्वींच्या मन्वंतरांत म्हणजे चाक्षुष मन्वंतराच्या अखेरपर्यंत भूमि ही मूळ सृष्टिधर्मानें जशी होती तशीच विषम म्हणजे ठिकठिकाणीं उंचसखल अशी होती, ( अर्थातच पाणी सर्वत्र पसरूं न शकल्यामुळें पिकाऊपणाही यथातथाच असणार. ) व या तिच्या विषमपणामुळेंच हल्लींच्यासारखीच शिस्तवार गांवांची किंवा शहरांची रचना पूर्वकल्पांत नव्हती. धान्यही पुरेसें नव्हतें. गुरचरणही तितपतच, शेतीही बेताचीच व व्यापारी दळणवळणही कृताकृतच असे. खऱ्याखोट्याचा विचार तितपतच होता. बरें, मनुष्याचे ठिकाणीं लोभ किंवा मत्सरही नव्हता. हे जनमेजया, परंतु सांप्रत हा वैवस्वत मनु लागल्यापासून व त्यांतही विशेषतः या पृथूची कारकीर्द सुरूं झाल्यापासून वर सांगितलेल्या सर्व गोष्टी अस्तित्वांत आल्या; कारण मधील उंचवटे काढून या पृथूनें जेव्हां कोसोगणित एकजात ताटा-

१ रूपक वजा केलें असतां डोंगराळ मुलूख साफ करून सपाट जमीन केली असतां पाणी सर्वभर पोंचून भूमी सुपीक होईल, हा भावार्थ दिसतो.

सारखी सपाट जमीन केली त्या वेळीं प्रजाजनांना आपण एकाच ठिकाणीं जमून एकवट वसति करावी, अशी सहजच बुद्धि उत्पन्न झाली; व तिचे योगानें समूहचे समूह एकत्र होऊन लहानमोठे ग्राम, शहरें, नगरें, हीं वसलीं. पृथूचे पूर्वी प्रजा कोठें रानांतील कंदमूलफलांवर कसाबसा गुजारा करी, असें आमचे ऐकिवांत आहे. परंतु पृथूनें स्वायंभुव मनूला वत्स कल्पून खुद्द आपले हातानें पृथ्वीची धार काढली व त्या योगानें पृथ्वीवर धान्यच धान्य पिकूं लागलें; तें इतकें कीं, अजून देखील प्रजा आला तो दिवस याच अन्नावर निर्वाह करते.

मी असें ऐकितों कीं, यानंतर ऋषींनींही एकदां या वसुंधरेचें दोहन केलें, त्यावेळीं सोमाला त्यांनीं वत्स केला व अंगिरस पुत्र जो बृहस्पति तो दोग्धा झाला. दूध काढण्याचें पात्र छंद म्हणजे वेद होते, व अशा रीतीनें जें दूध प्राप्त झालें तें केवळ अनुपमच होतें. तें कोणतें म्हणाल तर तप व शाश्वत ब्रह्म यांची प्राप्ति. त्यावर सर्व देवांनीं पुरंदर इंद्राला पुढें करून सोन्याचें भांडें घेऊन पुनरपि या महीचें दूध काढलें. त्यावेळीं इंद्र हा वत्स होता व शक्तिमान् सविता हा दूध पिळणारा होता. यावेळीं निघालेलें दूध फारच जोरकस होतें व त्यावरच देव अद्यापि जगले आहेत. तें दूध म्हणजे देवांचें अमृत होय. यापुढें अमित पराक्रमी जे पितर यांनीं रुप्याचें भांडें घेऊन या वसुंधरेपासून स्वधारूप दूध काढलें. यावेळीं सूर्यपुत्र प्रतापी यम हा वत्स होता व सर्व लोकांचा संहारकर्ता जो काल तो दूध काढणारा होता. यानंतर, मी असें ऐकितों कीं, तक्षकाला वत्स करून व पांढऱ्या भोंपळ्याचें भांडें करून नागांनीं व सर्पांनीं विषरूपी दूध काढिलें. यावेळीं ऐरावतकुलोत्पन्न प्रतापी धृतराष्ट्र हा दोग्धा होता. यावेळीं निघालेल्या दुधाच्या म्हणजे विषाच्या बळावरच हे नाग व सर्प इतकाले लठ्ठ पोसले आहेत व इतके भयंकर व उग्र झाले आहेत. यांचें अन्नही विष, यांचें वर्तनही विषारी, यांचें वीर्यही विषारी व विषाचेच बळावर ते जगतात. यापुढें असुरांनीं या वसुंधरेचें दोहन केलें असें ऐकितों. त्यावेळीं त्यांनीं लोहमय पात्र घेतलें होतें व शत्रूंचा विध्वंस करणारी जी माया ( कपटविद्या ) हेंच दूध त्यांनीं काढिलें. यावेळीं प्ऱ्हादपुत्र विरोचन हा त्यांचा वत्स होता व दैत्यांचा महाबलाढ्य ऋत्विज दोन डोक्यांचा जो मधु तो दोहनकर्ता होता. ते या मायेच्या बळावरच अद्यापिही मोठे ठकबाज, अतिबलाढ्य व अगाध चतुराईनें युक्त असे आहेत. वत्सा जनमेजया, पक्षांनींही या वसुंधरेचें दूध काढिलें, त्या वेळचें भांडें कच्च्या मातीचें होतें. व दुसऱ्याचे शरीरांत दडून बसणें म्हणजे परकायाप्रवेशादि गुप्त विद्या हेंच दूध त्यांनीं काढिलें. त्यावेळीं वैश्रवण हा वत्स होता व माणिवराचा पिता जो रजतनाभ तो दोहक[1] होता. हा रजतनाभ मोठा तेजस्वी तीन डोक्यांचा होता. यावेळीं संपादन केलेली जी ही अंतर्धानविद्या तिचे बळावर अद्यापिही यक्ष चालले आहेत. नंतर पिशाच्च व राक्षस यांनींही या पृथ्वीचें दूध काढिलें. त्यांचा हेतू आपल्या संततीचा संतोष करणें हा होता. यावेळीं प्रेताचे कपालास्थि हेंच पात्र होतें. दूध काढणारा रजतनाभच होता; वत्स सुमालि होता, व रक्त हेंच दूध. होतें या दुधाचे बळावर अद्यापि यक्ष, राक्षस, पिशाच्च, व इतर भूतें देवांप्रमा-

---

१ यक्षांचाही दोग्धा रजतनाभ म्हटलें आहे; परंतु मत्स्यपुराण ( अ० १० श्लो. २३ ) यांत प्रेतराक्षसांचे दोहनकालीं " रौप्यनाभ " हा दोग्धा दिला आहे, त्यानें पुनरुक्तीचा दोष टळतो.

णेंच चैनींत थाटांत राहातात. यापुढें अप्सरांचे ताफे बरोबर घेऊन गंधर्वांनीं कमलपत्रांत हिचें दूध काढिलें. त्यावेळीं चित्ररथगंधर्व हा वत्स होता, व नानाप्रकारचे मधुर सुगंध हेंच दूध काढलें. सूर्याप्रमाणें तेजस्वी, अपरिमित बलवान् महात्मा जो गंधर्वराज सुरुचि तो त्यांचा दोहनकर्ता होता. यासाठीं पर्वतांनीं हिचें दूध काढिलें. तें दूध कोणतें म्हणाल तर मूर्तिमान् औषधि व नानाविध रत्नें हेंच होय. यावेळीं हिमवान् हा वत्स होता. महागिरी मेरू हा दोहनकर्ता होता. त्यांचें पात्र शिलामयच होतें व या दोहनामुळें पर्वत अधिकच वाढले. हे राजा, असें ऐकितों कीं, याउत्तर वेलींनीं हिचें दूध काढिलें, त्या वेळीं पानांचेंच पात्र होतें; व दूध जें काढलें तें हेंच कीं, कोणतीही वल्ली जळली किंवा कापली असतां पुन्हा अंकुरित होण्याची तिचे ठिकाणीं शक्ति रहाणें. या वेळीं फुलांनीं भरलेला सालवृक्ष हा दोहनकर्ता असून प्लक्ष[1] वृक्ष हा वत्स होता.

याप्रमाणें ही वसुंधरा या चराचर भूतांची धारणकर्त्री, पोषणकर्त्री, पावनकर्त्री, आधार किंवा आश्रय, रत्नादिकांचें उत्पत्तिस्थान, कामधेनूप्रमाणें सर्व इच्छा पुरविणारी व सर्व प्रकारचें धान्य पिकविणारी अशी आहे. हिचा परिघ म्हणजे समुद्र होय. हिला मेदिनी असेंही एक सुप्रसिद्ध नांव आहे. हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, मधुकैटभ नांवाचे अतिबलाढ्य असे दोन दैत्य होते. त्यांचा मेद म्हणजे पोटांतील चर्बी यानें ही भरून गेली म्हणून ज्ञाते पुरुष तेव्हांपासून हिला मेदिनी असें म्हणूं लागले; व पृथु राजाजवळ केलेल्या कराराप्रमाणें या भूमीनें ज्यावेळीं त्याचें कन्यात्व पत्करिलें त्या वेळेपासून हिला पृथ्वी असें म्हणूं लागले.

१ पिंपरीचें झाड.

असो; पृथूनें याप्रमाणें ही पृथ्वी साफ करून तिचे भाग पाडल्या दिवसापासून तिच्यावर शेंकडों हजारों शहरनगरांच्या मालिकांच्या मालिका बसल्या. धान्य तर अमोज उत्पन्न होऊं लागलें, वस वैत्र आनंदानें ती फुलून गेली. हे जनमेजया, तो राजश्रेष्ठ पृथु असा असामान्य पराक्रमी होता. प्राणिमात्रानें याला नमस्कार करून याची पूजा केलीच पाहिजे. परंतु मोठमोठाले वेदवेदांगवेत्ते महाभाग जे ब्राह्मण यांनीं देखील याला नमस्कार केला पाहिजे; कारण हा विष्णुरूपच होय. ज्यांना ज्यांना आपली गादी कायम राहावी, अशी इच्छा असेल त्यांनीं देखील या प्रतापी पृथूला नमस्कार केलाच पाहिजे. कारण या भूमंडलावरील सर्व राजांत पहिला राजा तो होय. ज्या शूर योद्ध्यांना आपल्याला युद्धांत जय व्हावा अशी इच्छा असेल त्यांनीं देखील पृथूचेंच वंदन केलें पाहिजे. कारण योद्ध्यांतील देखील हा राजा पहिलाच योद्धा होता. हे राजा, या पृथूचें यश इतकें उज्ज्वल आहे कीं, जो कोणी योद्धा या पृथु राजाचें नामसंकीर्तन करून रणास जाईल तो कसलाही घोर संग्राम असला तरी त्यांतून सुखरूप पार पडून नांवालौकिकास चढेल. वाणिज्यावर उपजीविका करणारे जे मोठमोठे धनाढ्य वैश्यलोक असतील त्यांनीं देखील पृथूच्याच पायां पडावें. कारण पृथु हा महायशस्वी असून प्राणिमात्राला उपजीविकेचें साधन त्यानेंच दिलें आहे; त्याप्रमाणें वरील तीन वर्णांची सेवा करणें हाच ज्यांचा धर्म आहे व आपलें अत्युत्कृष्ट कल्याण व्हावें अशी ज्यांची इच्छा आहे, अशा शुद्ध शूद्रांनीं देखील यालाच दंडवत घालावें.

असो; या निरनिराळ्या दोहन-समयीं जे जे दोग्धे, जीं जीं दुग्धें व जीं जीं

होतीं तीं हीं सर्व मीं तुला सांगितलीं. आतां याहून आणखी मीं तुला काय सांगावें? जो कोणी हें पृथूचें चरित्र नित्य आरंभापासून श्रवण करील तो या भूमीवर मुलानातवंडांसह दीर्घकाल आनंदांतराहील.

## अध्याय सातवा.

—:०:—

### मनुवर्णन.

जनमेजय म्हणतो:--हे तपोधना वैशंपायना, मला आपण सर्वच मन्वंतरें. त्यांतील सृष्टीची उत्पत्ति व लय, सर्व मनूंचीं नांवें व प्रत्येक मनूची कालमर्यादा, हीं सर्व यथातथ्य ऐकवावीं, अशी माझी फार इच्छा आहे; करितां एवढीं आपण सविस्तर सांगा.

वैशंपायन म्हणतात:--बाबारे, तूं म्हणतोस खरें, परंतु सर्वही मन्वंतरांचें सविस्तर म्हणजे पुरापूर वर्णन सांगणें तर शेंकडों वर्षांनीं देखील सांगून पुरें होणार नाहीं; याकारितां तूं तें मजपासून संक्षेपानेंच ऐकण्यास तयार हो. पहिला मनु स्वायंभू, दुसरा स्वारोचिष, तिसरा उत्तम, चवथा तामस, पांचवा रैवत, सहावा चाक्षुष. हे सहा होऊन गेलेले मनु होत. हे कौरवेश्वरा, सांप्रत जो मनु चालू आहे, याला वैवस्तत अशी संज्ञा आहे. याचे पुढें येणारा तो सावर्णि मनु, त्याच्यापुढील भौत्य, त्याचे पुढील रौच्य व यांपुढील चारी मनूंना मेरूसावर्णी[1] असें सामान्य नांव आहे. हे राजा, मीं ज्याप्रमाणें ऐकलीं होतीं त्याप्रमाणें तुला हीं एकंदर चौदाही मनूंचीं नांवें सांगितलीं. म्हणजे यांत गेलेले सहा, येणारे सात व सांप्रतचा एक हे सर्व आले. आतां मी या सातही मनूंतील ऋषि, देवगण व मनूंची संतति हीं सर्व तुला सांगतों. मरीचि, भगवान् अत्रि, अंगिरस, पुलह, ऋतु, पुलस्त्य, व वसिष्ठ हे सातही ब्रह्मदेवाचे मानस पुत्र होते. हे राजा, यांशिवाय उत्तरेच्या दिशेला दुसरेही सात ऋषि होते. तसेच सत्वगुणी याम संज्ञक देव व त्यांचे उपजीवी दुसरे देव हे स्वायंभुवांत[1] होते आणि आग्निध्र, अग्निबाहु, मेधा, मेधातिथि, वसु, ज्योतिष्मान्, द्युतिमान्, हव्य, सवन व पुत्र असे हे मनूचे महातेजस्वी दहा पुत्र होते. हे राजा, याप्रमाणें तुला थोड्यांत प्रथम मन्वंतरांचें वर्णन सांगितलें. आतां वसिष्ठाचा पुत्र और्व, स्तंब, काश्यप, प्राण, बृहस्पति, दत्त व निश्चवन, असे हे सात महाव्रत सप्तर्षि[2] स्वारोचिष मन्वंतरांत होते, असें वायूचें म्हणणें आहे. तुषित नांवाचे या मनूंत देव होते. हविर्ध्र, सुकृति, ज्योति, आपमूर्ति, अयस्मय, प्रथित, नभस्य, नभ व ऊर्ज[3] हे महापराक्रमी व वीर्यवान् असे स्वारोचिष मनूचे पुत्र होते म्हणून सांगितलें आहे. याप्रमाणें मीं तुला दुसरें मन्वंतर सांगितलें. आतां मी तिसऱ्याचें वर्णन करतों तें ऐक. वासिष्ठ या संज्ञेनें प्रसिद्ध असलेले वसिष्ठाचे सात पुत्र हे उत्तम मन्वंतरांतील सप्तर्षि होत. आतां हे सात पूर्वीचे कोण म्हणशील तर पूर्वकल्पीं ऊर्ज नांवाचे अत्यंत तेजस्वी जे हिरण्यगर्भाचे पुत्र तेच या जन्मीं वसिष्ठाचे झाले. याप्रमाणें तुला या मन्वंतरांतले सप्तर्षि सांगितले. आतां उत्तम मनूचे दशपुत्र सांगतों. त्यांचीं नांवें:—ईष,

---

१ भागवतांत हीं नांवें सावर्णि, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि, धर्मसावर्णि, रुद्रसावर्णि, देवसावर्णि व इंद्रसावर्णि अशीं आहेत.

१ भागवतांत याच सातांना स्वायंभुव मनूंतील धर्मोपदेष्टे सप्तऋषि असें म्हटलें आहे.

२ बंगाली प्रतींत हीं नांवें और्व, स्तंब, प्राण, बृहस्पति, दत्त, अत्रि, व च्यवन अशीं दिलीं आहेत.

३ मत्स्यपुराणांत हीं पुढील चार नांवें आढळत नाहींत, त्यांत केवळ पहिलीं सातच आहेत.

ऊर्जे, तनूज, मधु, माधव, शुचि, शुक्र, सह, नभस्य व नभ, हे दहा. आतां या मन्वंतरांतील देव मानवसंज्ञक होते. याप्रमाणें तिसरें मन्वंतर सांगितलें. आतां चवथें मन्वंतर सांगतों, तें ऐक. काव्य, पृथु, अग्नि, जन्यु, धाता, कपीवान् व अकपीवान्, हे सात चवथ्या म्हणजे तामस मन्वंतरांतील सप्तर्षि. आतां या मनूचे पुत्रपौत्र पुराणांत सांगितले आहेत, त्यांपैकीं त्याच्या पुत्रांचीं नांवें तेवढीं तुला सांगतों. तीं हीं:--द्युति, तपस्य, सुतपा, तपोमूल, तपोधन, तपोरति, अकल्माष, तन्वी, धन्वी व परंतप; हीं सर्व नांवें अशीं वायूनीं सांगितलीं आहेत, तीं मीं तुला सांगितलीं. या मनूतील देवगण सत्यसंज्ञक होते. आतां पांचवें मन्वंतर सांगतों. या मन्वंतराचें नांव रैवत मन्वंतर. यांतील सप्तर्षींचीं नांवें:--वेदबाहु, यदुध्र, वेदशिरा, हिरण्यरोमा, पर्जन्य, सोमपुत्र--ऊध्वर्बाहु व अत्रिपुत्रसत्यनेत्र हे सात सप्तर्षि झाले. भूतरजस् नांवाचे या मनूतील मुख्य देव होते; व याच जातीचे रैभ्य व पारिप्लव संज्ञेचे विशेष देवतागण होते. आतां मी तुला त्यांच्या मुलांचीं नांवें सांगतों तीं ऐकः--धृतिमान्, अव्यय, युक्त, तत्त्वदर्शी, निरुत्सुक, अरण्य, प्रकाश, निर्मोह, सत्यवाक् व कवी; हे दहा. याप्रमाणें हें पांचवें मन्वंतर सरलें. आतां सहावें सांगतों तें ऐक. भृगु, नभ, विवस्वान्, सुधामा, विरजा, अतिनामा व सहिष्णु, हे सहाव्या म्हणजे चाक्षुष मन्वंतरांतील सप्तर्षि झाले. आतां या मन्वंतरांतील देवगण सांगतों. आद्य, प्रभूत, ऋभु, पृथग्भाव व लेख, हे पांच देवगण होते. हे पांचही महातेजस्वी महात्मे देवगण अंगिरस ऋषीचे पुत्र होत. हे राजा, या मनूचे ऊरुप्रभृति[1] दहा पुत्र होते व ते न ला नामक स्त्रीपासून झाले असल्यामुळें त्या सर्वांस नाड्वलेय अशी सामान्य संज्ञा होती. याप्रमाणें ही सहाव्या मन्वंतराची व्यवस्था झाली. आतां सातवा म्हणजे चालू मनु ऐक. या मनूचें नांव वैवस्वत, अत्रि, भगवान्--वासिष्ठ, महर्षिकश्यप, गौतम, भरद्वाज, विश्वामित्र व ऋचीक महर्षींचा पुत्र भगवान् जमदग्नि. हे सात चालू मन्वंतरांतील सप्तर्षि होत. साध्य, रुद्र, विश्वेदेव, मरुत, वसु, आदित्य व अश्विनौदेव असे हे वैवस्वत मनूतील देवगण होत, व इक्ष्वाकुप्रमुख[1] मनूचे दश पुत्र होते. हे राजा, या मन्वंतरांतील वर जे महातेजस्वी महर्षि सांगितले यांचे हजारों तेजस्वी पुत्रपौत्र या भूमंडलावर दाही दिशांना व्यापून आहेत. यांशिवाय वर जीं मन्वंतरें सांगितलीं त्यांपैकीं प्रत्येक मन्वंतरांत लोकांची व्यवस्था लावण्याकरितां व लोकांचें संरक्षण करण्याकरितां पूर्वीं सांगितलेले जे सात सप्तक म्हणजे एकूणपन्नास मरुद्गण ते विद्यमान असतात; व या सात सप्तकांपैकीं चार सप्तकें म्हणजे अठ्ठावीस मरुद्गण प्रतिमन्वंतराच्या अखेरीस आपल्या सत्कर्मबलानें मुक्त होऊन शाश्वत ब्रह्मपदाला जातात. ते वर गेले म्हणजे जे दुसरे कोणी तपाच्या परिपाकानें त्या योग्यतेला आलेले असतात, ते त्यांचे जागीं नेमले जाऊन एकूणपन्नास ही ठरीव संख्या पुरी केली जाते. याचप्रमाणें मागें गेलेल्या व सांप्रतच्या मनूंतही मरुद्गणांची पूर्तता होत असते. हे कौरवेश्वर, याप्रमाणें गेलेलीं हीं सात मन्वंतरें तुला सांगितलीं. आतां पुढें येणारीं तींही सर्व तुला सांगतों. येणाऱ्यांपैकीं पांच मनूंना सावर्ण अशीं सामान्य संज्ञा आहे. या पांचांपैकीं एक सूर्यपुत्र व दुसरे परमेष्ठी प्रजापतीचे

---

१ ऊरु, पुरु, शतद्युम्न, तपस्वी, सत्यवाक, हवि, अग्निष्टुत, अतिरात्र, सद्युम्न, व अभिमन्यु. ( मत्स्यपुराण. )

१ इक्ष्वाकु, नृग, शर्याति, दिष्ट, धृष्ट, करूपक, नरिष्यंत, पृषध्र, नभग व कवि ( भागवत नवमस्कंध अ० पहिला. ) मत्स्यपुराणांत ही. नांवें फरकानें आढळतात.

पुत्र. हे चौघे दक्षप्रजापतीचे नातू म्हणजे प्रिया नामक मुलीचे मुलगे. हे मोठे तेजस्वी असून मोठें तप करीत मेरुपृष्ठावर राहिले असल्यामुळें या चौघांस मेरुसावर्णी असें नांव पडलें आहे. रुचि प्रजापतीचा पुत्र रौच्य हा एक मनु व भूतिनामक दिव्य स्त्रीचे ठिकाणीं झालेला रुचीचा पुत्र भौत्य तो एक. याप्रमाणें हे पुढें येणारे सात—हे सर्वही मनु म्हणजे सावर्णीपासून पुढील सर्व मोठे तपस्वी असून त्यांचा काल येईपर्यंत ते स्वर्गांतच असतात. आतां यापुढील मनूंत होणाऱ्या सप्तर्षींचीं नांवें ऐक. राम, व्यास, अत्रिपुत्र—दीप्तिमान्, भरद्वाजकुलोत्पन्न द्रोणाचा पुत्र महातेजस्वी अश्वत्थामा, गौतमकुलोत्पन्न शरद्वानाचा पुत्र कृप, कुशिक-कुलोत्पन्न गालव व कश्यप-कुलोत्पन्न रुरु, हे सात मुनिश्रेष्ठ येत्या मनूंतील सप्तर्षि होत. हे सप्तर्षि केवळ ब्रह्मदेवाच्या तोडीचेच आहेत. सत्कुलोत्पत्ति, तपोबल, मंत्र-शास्त्र, व्याकरणशास्त्र, इत्यादिकांतील प्राविण्य या गोष्टींनीं ब्रह्मलोकांतही त्यांची प्रतिष्ठा आहे. हे फार निष्कलंक असून त्रिकालज्ञानी आहेत. यांची तपाविषयीं तर फारच ख्याती आहे. कारण सदा ते तपोनिरत असतात व ते मोठे मननशील आहेत. शिवाय मंत्रव्याक-रण व अणिमादियोगसिद्धीच्या बलानें त्यांना सर्व कांहीं दिसतें. हें सर्वांत पाहिले व धर्माचीं रहस्यें यांनीं प्रत्यक्ष अंगीं अनुभविलीं आहेत; शिवाय आपआपल्या नांवाच्या गोत्राचे ते प्रवर्तक किंवा मूळपुरुष होत. आतां हे जे एकंदर सप्तर्षि सांगितले हे कृतादि चतुर्युगां-मध्यें पुनःपुनः उत्पन्न होऊन सत्यधर्माचें स्वतः अतिआस्थेनें आचरण करून लोकांना वर्ण व आश्रम यांच्या वेळोवेळीं मर्यादा घालून देतात, व कालगतीनें जेव्हां जेव्हां धर्माला शैथिल्य येतें तेव्हां तेव्हां यांचेच वंशांत उत्पन्न झालेले संहिता ब्राह्मणादि वेदभागाचे द्रष्टे व कर्ते ऋषि पुनःपुनः धर्माचें कार्य उज्जीवित करतात. या निरनिराळ्या सप्तर्षींत कधीं कधीं पहिल्यापेक्षां मागील ऋषि वरादि देण्याविषयीं अधिक समर्थ आढळून येतात, त्या अर्थीं या ऋषींची योग्यता ठरविण्यांत काल किंवा वय याचा विचार कर-ण्यांत मुळींच अर्थ नाहीं; ते सर्वत्र सारखे, हाच याचा उलगडा.

हे राजा, याप्रमाणें सप्तर्षींचा विषय स्पष्ट करून सांगितला. आतां भावी सावर्णीमनूचे पुत्र तुला सांगतों ते ऐक. वरीयान्, अवरीयान्, संमत, धृतिमान्, वसु, चरिष्णु, अपि, अधृष्णु, वाज व सुमति हे दहा. आतां मेरुसावर्णींतील पहिल्याचे सप्तर्षि सांगतों ते ऐक. पौलस्त्य-कुलोत्पन्न मेधातिथि, काश्यपकुलोत्पन्न वसु, भृगुकुलोत्पन्न जोतिष्मान्, आंगिरसकुलोत्पन्न द्युतिमान्, वसिष्ठकुलोत्पन्न सवन, अत्रिकुलो-त्पन्न हव्यवाहन व पौलह, हे सात रोहितमन्वं-तरांतील ऋषि. हे राजा, या मनूमध्यें तीनच देवगण होते. या रोहितसावर्णी मनूचे म्हणजे दक्षपुत्राच्या पुत्राचे नऊ मुलगे होते. ते धृष्टकेतु, पंचहोत्र, निराकृति, पृथु,श्रवा, भूरि-द्युम्न, ऋचीक, बृहत, गय, हे नऊ. दहाव्या पर्यायामधील दुसऱ्या मनूंतील सप्तर्षि ऐक. पुलहाचा पुत्र[1] हविष्मान्, भृगुपुत्र सुकृति, अत्रिपुत्र आपोमूर्ति, वसिष्ठपुत्र अष्टम, पुलस्त्यपुत्र प्रामति, कश्यपपुत्र नभोग, अंगिरसकुलोत्पन्न नभस, हे सात. अर्चिमार्ग किंवा उत्तरमार्ग व धूममार्ग किंवा दक्षिणमार्ग यांचे रक्षणकर्ते असे मंत्रप्रतिपाद्य दोन देवतागण आहेत म्हणून मागें सांगितलें; ते गण या कालचे देव होत. मनुसुत, उत्तमौजा, निकुषंज, वीर्यवान्, शतानीक, निरामित्र, वृषसेन, जयद्रथ, भूरि-

१ पुत्र शब्द हा वंशज अशा अर्थीं पुष्कळदां वापरला जातो.

द्युम्न व सुवर्चा असे हे दहा या मनूंतील मनुपुत्र. आतां अकराव्या पर्यायांतील तिसऱ्या मनूचे सप्तर्षि मी सांगतों, ते मजपासून समजून घे. कश्यपकुलोत्पन्न हविष्मान्, भृगुकुलोत्पन्न हविष्मान्, अत्रिकुलोत्पन्न तरुण, वसिष्ठपुत्र अनघ, अंगिरसकुलोत्पन्न उदधिष्णा, पुलस्तीपुत्र निश्चर व पुलहपुत्र अग्नितेज; हे सात. या मनूंतील देवांचे तीन गण होते, व तिन्हीही गणांतील देव हे ब्रह्मदेवाचे पुत्र होते. संवर्तक, सुशर्मा, देवानीक, पुरूद्वह, क्षेमधन्वा, दृढायु, आदर्श पण्डक व मनु याप्रमाणें हे नऊजण तृतीयसावर्णीचे पुत्र; यापुढें चवथ्या सावर्णीचे सप्तर्षि ऐक. वसिष्ठपुत्र द्युति, अत्रिपुत्र सुतपा, अंगिरसपुत्र तपोमूर्ति, कश्यपपुत्र तपस्वी, पुलस्तीपुत्र तपोशन, पुलहपुत्र तपोरवि व भृगुपुत्र तपोधृति; हे सात. या मनूंत पांच देवगण होतील, व ते सर्वही ब्रह्मदेवाचे मानसपुत्र असतील. देववायु, अदूर, देवश्रेष्ठ, विदूरथ, मित्रवान्, मित्रदेव, मित्रसेन, मित्रकृत्, मित्रबाहु आणि सुवर्चा, हे बाराव्या मनूंतील मनुपुत्र होतील. यानंतर येणाऱ्या तेराव्या पर्यायांतील मनूचे सप्तर्षि ऐक. अंगिरापुत्र धृतिमान्, पुलस्तिपुत्र हव्यप, पुलहपुत्र तत्वदर्शी, भृगुपुत्र निरुत्सुक, अत्रिपुत्र निष्प्रकंप, कश्यपपुत्र निर्मोह व वसिष्ठपुत्र सुतपा; हे सात. या मनूंत देवतांचे तीनच गण होतील, असें ब्रह्मदेवानें सांगून ठेविलें आहे. या तेराव्या मनूंतील जे मनुपुत्र होतील, ते रुचीचे पुत्र असें समजावें. यांचीं नांवें:—चित्रसेन, विचित्र, नय, धर्मभृत, धृत, सुनेत्र, क्षत्रवृद्धि, सुतपा, निर्भय व दृढ; हे तेराव्या अथवा रौच्य मन्वंतरांतील मनुपुत्र. आतां चौदाव्या पर्यायांतील म्हणजे भौत्यमन्वंतरांतील सप्तर्षि. एक भृगुपुत्र अतिबाहु, अंगिरसपुत्र शुचि, अत्रिपुत्र युक्त, वसिष्ठपुत्र शुक्र, पुलहपुत्र अजित, कश्यपपुत्र अग्नीध्र व पुलस्त्यपुत्र भार्गव; हे अखेरचे सप्तर्षी समजावे.

जो कोणी प्रभातकाळीं उठून या सप्तर्षींचें —होऊन गेलेल्या व पुढें येणाऱ्या—नामसंकीर्तन करील त्याला सुख, यश व दीर्घायुष्य हीं प्राप्त होतील.

असो; जनमेजया, या शेवटल्या मनूंत देवतांचे गण पांच होतील; व तरंगभीरु, वप्र, तरस्वान्, उग्र, अभिमानी, प्रवीण, जिष्णु, संक्रंदन व सबल; हे भौत्य मनूंतील मनु-पुत्र. या भौत्यमनूचा म्हणजे चौदाव्या मनूचा अंमल संपला म्हणजे त्याबरोबरच कल्पाचाही शेवट होतो. याप्रमाणें होऊन[1] गेलेले व पुढें येणारे सर्व मनु मीं सांगितले.

हे राजा, या चौदा मनूंनीं आपल्या पुत्रपौत्रांसह मिळून ही अनेक ग्रामनगरांनीं भरलेली व समुद्रापर्यंत पसरलेली अफाट पृथ्वी हिचें पुरापूर सहस्र युगेंपर्यंत आपल्या तपोबलानें परिपालन करावें, व आपआपला काल पुरा झाला कीं, आपण लयास जावें, अशी परमेश्वराची कायमची योजना आहे.

## अध्याय आठवा.

—:०:—

### मन्वंतरगणना.

जमनेजय म्हणतो:—हे महाबुद्धिमंता वैशंपायना, मला आपण मन्वंतरें, युगें व ब्रह्मदेवाचा देव या सर्वांच्या कालगणनेचें प्रमाण कसकसें, तें कृपा करून सांगावें.

वैशंपायन सांगतात:—हे अरिमर्दना, लौकिकांत मनुष्यांचे कालगणनेचें अत्यंत श्रेष्ठ किंवा निर्विवाद माप किंवा मान म्हटलें म्हणजे

[1] मूळांत 'इत्येते नामतोतीताः' असा पाठ आहे, परंतु त्याचे ठिकाणीं 'इत्येतेऽनागतातीताः' असा पाठ पाहिजे. एरवीं समंजस अर्थ होत नाहीं.

सूर्याच्या नित्य गतागतानें उत्पन्न होणारा अहोरात्रीचा काल हें होय. हेंच सुप्रसिद्ध प्रमाण घेऊन मी तुला कल्प, युग, ब्रह्मदेवाचा दिवस या सर्वांचा हिशोब सांगतों. प्रथमारंभीं कालमापनाचें अत्यंत अल्प व सर्वांत सहज माप म्हटलें म्हणजे डोळ्याचे पापणीची उघडझांप होण्याला जो काल लागतो तो होय. या कालाला शास्त्रांत निमेष असें म्हणतात. तेव्हां निमेष हें कालमापनाचें लघुतमप्रमाण आपण घेऊं. या मापानें पाहातां अशा पंधरा मापांचा म्हणजे पंधरा[1] निमेषांचा जो काल त्याला एक काष्ठा असें म्हणतात. अशा तीस काष्ठांची एक कला होते. अशा तीस कलांचा एक मुहूर्त होतो व अशा तीस मुहूर्तांचें एक अहोरात्र होतें, असें ज्ञाते लोक मानतात. एक अहोरात्र म्हणजे चंद्रसूर्यांची दैनंदिन गतीची एक फेरी झाली. हें अहोरात्राचें कालमान विशेषतः मेरूच्या म्हणजे विषुववृत्ताच्या आसपासचे जे प्रदेश आहेत त्यांत लागू पडतें. अशीं पंधरा अहोरात्रें लोटलीं म्हणजे त्याला पक्ष म्हणतात. अशा दोन पक्षांच्या कालाला मास असें म्हणतात. असे दोन मास लोटले म्हणजे एक ऋतु होतो; तीन ऋतूंचें एक अयन होतें; व अशा दोन अयनांचें एक वर्ष होतें; आणि वर्षांतील या दोन अयनांपैकीं एकाला दक्षिणायन व दुसऱ्याला उत्तरायण अशी संज्ञा गणितशास्त्राचें रहस्य जाणणाऱ्यांनीं दिली आहे.

या वर दिलेल्या मानानें दोन पक्षांनीं युक्त जो एक मास म्हणजे महिना तें पितरांचें एक अहोरात्र; अथवा आपल्या माणसांचा एक महिना म्हणजे पितरांचा एक दिवस असें कालवेत्ते समजतात. या दोन पक्षांतील जो कृष्णपक्ष तो त्यांचा दिवस व आपला शुक्लपक्ष ती त्यांची रात्र; व म्हणूनच, हे राजा, पितृश्राद्धें ( महालयादि ) आपल्या कृष्णपक्षांत म्हणजे पितरांच्या दिवसकाळांतच करावे लागतात. आतां वर सांगितलेल्या मनुष्यांच्या कालगणतीनें जो एक संवत्सराचा काल तेवढ्यानें देवांचें एक अहोरात्र होतें. पैकीं उत्तरायण तो देवांचा दिवस व दक्षिणायन ती रात्र, असें कालाचें रहस्यजाणते जे ज्ञाते त्यांचें मत आहे. हें देवांच्या दिवसाचें मान सांगितलें. अशा मानानें देवांचीं दहा वर्षें झालीं म्हणजे मनूचें एक अहोरात्र होतें. अशीं दहा अहोरात्रें झालीं म्हणजे मनूचे मापाचा एक पक्ष झाला. असे दहा पक्ष झाले म्हणजे मनूच्या मापाचा एक मास होतो. असे बारा महिने झाले म्हणजे एक ऋतु होतो, असें तज्ज्ञांचें मत आहे. अशा तीन ऋतूंचें एक अयन होतें व अशा दोन अयनांचा एक संवत्सर होतो. या मानाचीं चार हजार वर्षें गेलीं म्हणजे कृतयुगाचा काल पूर्ण होतो, व अशा चारशें वर्षांचा संध्याकाल[1] होतो, व इतकींच म्हणजे चारशें वर्षें संध्यांश असतो. ही कृतयुगाची व्यवस्था झाली. त्रेतायुगाचा काल मनूच्या तीन सहस्रवर्षें असतो. या युगाचा संध्याकाल तीनशें वर्षेंपर्यंत व पुनः तितकींच वर्षें संध्यांश असतो. याच हिशोबानें दोन सहस्र वर्षांचें द्वापरयुग मानलें आहे. याचा संध्याकाल याच मानानें दोनशें वर्षांचा मानिला आहे व संध्यांश म्हणजे युगाचा अंतकाल

---

१ अमरकोशांत हें प्रमाण 'अष्टादशानिमेषास्तु काष्ठा' असें दिलें आहे; परंतु विष्णुपुराणांत "काष्ठा निमेषा दश पंचच" असेंच आहे.

२ असें म्हणण्याचें कारण ध्रुवांकडील दिवसरात्रीची मर्यादा फार दीर्घ आहे, हें सर्वश्रुतच आहे.

१ एक युग संपून दुसरें आरंभिण्याचे मध्यंतरीं होणारा जो काल त्याला संधिकाल अथवा संध्याकाल म्हणतात.

हा ही दोनशेंच वर्षें मानिला आहे. याच हिशोबानें कलीची मर्यादा ज्ञात्यांनीं एक सहस्र वर्षें गणिली आहे; व याचा संधिकाल या मानाच्या शंभर वर्षांचा असतो, व तितक्याच वर्षांचा संध्यांश असतो. याप्रमाणें हीं युगें मिळून एकंदरींत बाराहजार वर्षांची गणती सांगितली आहे. आतां ह्याच दिव्य म्हणजे देवांच्या कालमापनपद्धतीच्या हिशोबानें तुला युगांचें गणित सांगतों, तें ऐक. कृत, त्रेता, द्वापर व कलि या चार युगांचें एक युग किंवा महायुग होतें. अशा एका युगाची म्हणजे महायुगाची सत्तरपट्ट केली असतां जो काल होतो, तेवढ्याला गणितज्ञान्यांनीं मन्वंतर अशी संज्ञा दिली आहे. मागें जें अयन सांगितलें आहे तेंही याच मापाचें व अशीं अयनें दक्षिण व उत्तर मिळून दोन आहेत; व याला अयन असें माप पडण्याचें कारण, अयन या शब्दाचा मुख्यार्थ गमन किंवा गति असा आहे. यामुळें मनूचें एक अयन होणें म्हणजे मनूचा अंत किंवा लय होणें असाच आहे. एक मनु लय पावला म्हणजे दुसरा प्रकट होतो, तोही तितकाच काल राहातो. याप्रमाणें अनेक मनु लोटतात तेव्हां ब्रह्मदेवाचा एक संवत्सर होतो. आतां अनेक म्हणून जे मोघम सांगितले, त्यांचा बरोबर हिशोब दहा हजार मन्वंतरें म्हणजे एक अहोरात्र असा ज्ञात्यांनीं केला आहे. अर्थात् यांतील निम्मे काल दिवसाचा व निम्मे काल रात्रीचा. ब्रह्मदेवाचा जो दिवस म्हणून सांगितला त्यालाच कल्प अशी संज्ञा आहे. आतां सहस्रयुगांची जी ज्ञात्यांनीं रात्र सांगितली ती चालू झाली असतां ही पृथ्वी तिच्यावरील पर्वत, वृक्ष व अरण्यें, यांसह पाण्यांत बुडून रहाते. अशी सहस्र युगांची रात्र लोटली म्हणजे ब्रह्मदेवाचें एक अहोरात्र होतें व एका कल्पाचाही शेवट होतो. असल्या युगांचा समग्र इतिहास मीं तुला सांगितला. प्रत्येक मन्वंतरांत मागें सांगितलेलें कृतत्रेतादि युगचतुष्क यावयाचेंच. असले हे चौदा मनु मीं तुला सांगितले. यांच्या संकीर्तनानें यश वाढतें; कारण पुराणासहित वेदांतही हे सर्व मनु मोठे समर्थ प्रजापालक झाले व यांचे कीर्तनानें धन्यता प्राप्त होते, असें सांगितलें आहे. एका मन्वंतराची अखेर येऊं लागली म्हणजे सृष्टीचा संहार होऊं लागतो व संहार पूर्ण झाला म्हणजे कांहीं कालानें पुनरुत्पत्ति चालू होते. संहार व पुनरुत्पत्ति यांच्या मध्यें जो शांततेचा काल असतो त्यावेळीं सृष्टि ब्रह्मांत लीन असते व त्या ब्रह्माचें वर्णन मीं शंभर वर्षें मोडलीं तरी देखील माझे हातून होणें शक्य नाहीं. दर मनूला जी प्रजा म्हणजे जरायुजादि चतुर्विध सृष्टि उत्पन्न होते, तिचा संहार मन्वंतरांतच चालू असतो. मात्र त्या संहारांत त्या मन्वंतराचे रक्षक म्हणून जे देव व सप्तर्षि निर्माण केलेले असतात ते लय पावत नाहींत. ते आपल्या ब्रह्मचर्यानें, विद्वत्तेनें व तपोबलानें तसेच कायम रहातात. परंतु हजार युगें जेव्हां पुरीं होतात तेव्हां कल्पाचा निःशेष अंत होतो. या वेळीं म्हणजे कल्पांतीं चराचर सर्व भूतें द्वादश आदित्यांच्या तेजानें जळून खाक होऊन आदित्यांच्या रूपाला मिळतात, व ते आदित्य ब्रह्माला पुढें करून सर्व संहारकर्ता, शक्तिमान्, सर्वांतर्व्यापी कल्पाकल्पाला पुन्हा पुन्हा भूतसृष्टि निर्माण करणारा, अव्यक्त, सनातन व तेजोमय जो अखिलजगत्स्रष्टा परमात्मा नारायण त्यांत लीन होतात. नंतर सर्वत्र एकच जलमय होऊन जातें व रात्र सुरू होते. ही रात्र सुरू झाली म्हणजे हें अखिल ब्रह्मांड ब्रह्मदेवाचीं सहस्र वर्षेपर्यंत नारायणाच्या उदरांत झोंप घेत स्वस्थ पडतें. हा जो निद्रेचा काल यालाच रात्री अशी संज्ञा दिली आहे. या कालीं

पितामह ब्रह्मदेव योगनिद्रेंत गर्क असतात. मग अशीही सहस्रयुगमानाची रात्र संपली म्हणजे सर्व लोकांचे आजोबा जे भगवान् ब्रह्मदेव ते जागे होतात व पुन्हा सृष्टि करावी अशी त्यांचे मनांत इच्छा उत्पन्न होऊन ते पुन्हा सृष्टीच्या उद्योगाला लागतात. उद्योगाला लागले म्हणजे सृष्टि कोणत्या रीतीनें करावी वगैरे गोष्टींबद्दलची पूर्वकल्पांतील स्मृति त्यांना उपस्थित होते. पूर्वी काय काय गोष्टी घडल्या, आपण सृष्टीचे कामीं कसकसा यत्न केला होता, ब्रह्मांडांतील सूर्यादिदेव व पिंडांतील किंवा प्राणिमात्रांच्या देहांतील नेत्रादि इंद्रियगोल यांची योजना कसकशी व कोठें होती, या सर्व गोष्टींची त्याला आठवण होते, व ते पहिल्या नमुन्यावर सृष्टि रचूं[1] लागतात. मात्र वस्तूंच्या बाह्य स्वरूपांत कधीं कधीं थोडा फेर दिसण्यांत येतो. सृष्टीच्या उद्योगाला ब्रह्मदेव लागला म्हणजे पूर्वी कल्पांतीं द्वादशादित्यांच्या किरणांनीं जीं भूतें दग्ध झालीं होतीं म्हणून सांगितलें तीं सर्व देव, ऋषि, यक्ष, गंधर्व, पिशाच्च, उरग व राक्षस यांसह युगारंभाला जन्मास येतात. हेमंतादि सर्व ऋतूंचे शीतोष्णादि भाव त्या त्या ऋतूंत पूर्वीच्या ठरावाप्रमाणेंच पुन्हा उत्पन्न होतात, व ब्रह्मदेवाच्या रात्रींत म्हणजे लयकालांतही पूर्वकल्पांतील लयकालच्या स्वरूपानेंच वस्तुमात्र लीन असतें. रात्र सरली म्हणजे प्रजाकर्ता ब्रह्मदेव परमात्म्याच्या उदरांतून बाहेर येऊन वर सांगितल्याप्रमाणें सहस्रयुगांचा दिवस करून त्या अवकाशांत क्रमाक्रमानें पूर्ववत् सृष्टिरचना करितो; व कालाच्या संख्येचें व विभागाचें त्याला परिपूर्ण ज्ञान असल्यामुळें दिवसाची मर्यादा भरतांच सहस्रयुगांची रात्र निर्माण करून प्रजेचा पुन्हा संहार करतो. रात्र संपली कीं, पुनरुत्पत्ति करतो. हा चाळा पुनःपुन्हा चालूच आहे. मात्र, हे भरतश्रेष्ठा, प्रत्येक कल्पांत जे कोणी देव, मनुष्य किंवा ऋषि आपल्या शुद्धाचरणानें देहात्मबुद्धित्यागपूर्वक सनातन ब्रह्माशीं एकभाव पावतात, ते मात्र या पुनःसृष्टीच्या तडाक्यांत सांपडत नाहींत, ते कायमचे मुक्त होतात. सर्व देवाधिदेव, सर्व शक्तिमान्, सर्वात्मा हरि याचीं स्थूल आणि सूक्ष्म अशीं दोन रूपें आहेत. त्यांतील सांप्रत चालू असलेला वैवस्वत मनु हा त्याच्याच तेजाचा अंश स्थूल रूपानें प्रकट झाला असल्यामुळें व ज्या वृष्णिवंशांत सर्व असुरांचा नाश करून सर्व लोकांचें हित करण्याच्या संकल्पानें परमात्मा हरि स्वतः प्रकट झाला त्या वृष्णिकुलाची हकीकत तुझ्या प्रश्नास्तव मला सांगणें प्राप्त झालें असल्यानें व या वृष्णिकुलाची पूर्वपीठिका सांगण्याच्या संबंधांत प्रस्तुत चालू असलेल्या वैवस्वत मनूचा उल्लेख करण्याचें ओघास आल्यामुळें या वैवस्वत मनूचें वृत्त मी तुला थोडेंसें विस्तारानें सांगणार आहें.

## अध्याय नववा.

—०:—

### द्वादश आदित्यांची उत्पत्ति.

वैशंपायन सांगतातः—दक्षकन्या अदिति हिचे ठिकाणीं कश्यपापासून विवस्वान् हा उत्पन्न झाला. त्वष्ट्याची कन्या जी मोठी रागीट असून सर्व त्रैलोक्यांत सुरेणु या नांवानें प्रख्यात होती, ती या विवस्वानाची भार्या झाली. या कुळांत हिचें नांव संज्ञा असें ठेविलें होतें. ही संज्ञा जातीचीच मोठी रूपवान् व तपस्वी असून हल्लीं उमेदीचे भरांत असल्यामुळें तिला तो तापदायक पति रुचेना. कारण त्याच्या अत्यंत तेजामुळें त्या कोमल व सुंदर स्त्रीचे

१ सूर्याचंद्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत्. श्रुति.

अवयव ठिकाठिकाणीं भाजून तिच्या रूपाचा बिघाड होत चालला, यामुळें ती त्याच्यावर संतुष्ट नव्हती. या विवस्वानालाच मार्तंड असेंही नांव होतें. हें पडण्याचें कारण असें झालें कीं, याचे खेपेस याची आई अदिति ही गरोदर असतां बुध भिक्षेसाठीं तिचे दारांत आला. परंतु, गर्भभारानें तिचें पाऊल मंदावल्यामुळें तिला झपाट्यानें जाऊन भिक्षा घालतां आली नाहीं. त्यायोगानें बुधानें रागावून तिला शाप दिला कीं, ' हा तुझा " अण्ड " म्हणजे गर्भ मृत होईल.' त्यावरून अदितीला आपला अण्ड मृत आहे असें भासून त्या गर्भाला पुढें मृतांड म्हणजे मार्तंड असें नांव पडलें. शाप असून हा गर्भ जिवंत कसा उपजला म्हणशील तर अदितीचा भर्ता जो कश्यप त्यानें स्वस्त्रीला बुधानें दिलेला शाप ऐकतांच तिची दया येऊन आपल्या तपोबलानें तो शाप दूर केला, व हा अण्डांत मृत नाहीं असें प्रेमानें तिला म्हणाला; तेव्हांपासून त्या गर्भाचें मार्तंड हेंच नांव पडलें. असो; आपल्यापेक्षां अत्यंत तेजस्वी अशा त्या विवस्वानाची संगती त्या कोमल स्त्रीला अतीच असह्य होऊं लागली. कारण हा विवस्वान् म्हणजे तिन्ही लोकांना नित्य तापवून सोडणारा जो सूर्य तोच होय. तथापि अशाच्याही संगतींत त्या संज्ञेला तीन अपत्यें झालीं. त्यांपैकीं पहिले गर्भापासून वैवस्वत मनु हा जन्मला. यालाच प्रजापति, श्राद्धदेव असेंही म्हणतात, व दुसरे खेपेला जुळेंच झालें; त्यांत एक मुलगा व एक मुलगी अशीं अपत्यें होतीं. मुलाचें नांव यम व मुलीचें नांव यमुना. येथपर्यंत संज्ञेनें भर्त्याबरोबर कसेबसे दिवस काढले; परंतु जवळ जातांच भाजून काढणारें त्याचें तें द्वाड रूप तिला आवडेना व सोसेहीना. तेव्हां रूपानें हुबेहूब आपल्यासारखी अशी तिनें सवर्णा नांवाची आपली प्रतिच्छाया उत्पन्न केली. कारण ही संज्ञा जादूंत मोठी प्रवीण होती. निर्माण करतांच ती तिची छाया हात जोडून संज्ञेपुढें उभी राहून म्हणाली, ' शुचिस्मिते, मीं काय करावें हें मला सांग. हे सुंदरि, मी तुझ्या सर्वथा आज्ञेंत आहें; करितां मी तुझी काय कामगिरी करूं तें मला सांग. '

संज्ञा म्हणतेः—हे सवर्णे, देव तुझें कल्याण करो. मी आतां माझ्या बापाचे घरीं जातें व तूं ह्या माझे घरांत मनांत कांहीं एक किंतु न आणितां माझे जागीं रहा. हे दोन माझे मुलगे आहेत व सुरेखशी दिसते आहे, ही माझी मुलगी आहे. या तिन्ही मुलांना तूं माझेचप्रमाणें जीव लावून वागीव; व मीं योजिलेली युक्ति ही भगवान् मार्तंडाला कांहीं झालें तरी सांगूं नको.

छाया उत्तर करितेः—हे देवि, तूं खुशाल आपल्या बापाच्या घरीं जा. तुझ्या नवऱ्याला आपोआप संशय येऊन त्याच्या निरासार्थ माझ्या वेणीला आंसडा देऊन तो विचारीपर्यंत अथवा मला शापाची भीति घालीपर्यंत मी मिळून रहस्यभेद करणार नाहीं, ही खात्री ठेव.

वैशंपायन सांगतातः—छायेचें हें आश्वासन घेऊन व तिला जपून वागण्याविषयीं पुनः पुनरपि बजावलें असतां तुझ्या शब्दाबाहेर मी तिळभर जाणार नाहीं असें तिनें दिलेलें वचन घेऊन ती बिचारी संज्ञा लाजत लाजतच बापाकडे गेली. परंतु न बोलावितां नवऱ्याच्या घरून उठून ती आपले घरीं आली, हें पाहातांच बापानें तिची निर्भर्त्सना करून तूं आलीस तशी आपल्या नवऱ्याच्या घरीं चालती हो, म्हणून पुनःपुनः तिला निक्षून सांगितलें. बापाकडे डाळ शिजेना तेव्हां आपलें खरें रूप लपवून व घोडीचें कृत्रिम रूप घेऊन ती

सुंदरी उत्तर कुरुप्रदेशांत जाऊन तेथें गवत चरत राहिली.

इकडे तिनें आपले ठिकाणीं उभी करून ठेविलेली जी तिची छाया ती आपली पहिली स्त्री संज्ञाच आहे असें समजून तिच्याशीं आदित्य हा पूर्ववत् संबंध ठेवीत असतां त्याचेपासून तिला आदित्यासमान एक पुत्र झाला. हे जनमेजया, हा पुत्र याचा सापत्न वडील बंधु जो वैवस्वत मनु त्याच्याशीं दिसण्यांत हुबेहूब सारखा असल्यामुळें त्याला सावर्ण अशी संज्ञा पडली, व हाच पुढें सावर्णमनु या नांवानें मनु होईल. यानंतर त्या छायेला आदित्यापासून दुसरा एक पुत्र झाला. त्याचें नांव शनैश्वर. या छायारूप संज्ञेला जेव्हां स्वतःचे दोन पुत्र झाले तेव्हांपासून पहिल्या मुलांपेक्षां या मुलांवर ती अधिक प्रेम करूं लागली. ही गोष्ट पहिल्यांतील वडील जो वैवस्वतमनु त्यानें सहन केली; परंतु त्याचा धाकटा भाऊ जो यम, तो सहन करीना. कांहीं आंगचे पोरपणानें, कांहीं संतापानें व कांहीं पुढें मोठा अनर्थ ओढवावयाचा होता त्या योगानें यमाला तशी बुद्धि होऊन त्यानें या भेदभावाबद्दल संज्ञेची सडकून खरडपट्टी काढली, व तिला तंबीही दिली. पण हें संज्ञेला कसें खपावें व काय म्हणून खपावें? तें बोलणें तिचे जिवाला फारच झोंबलें व संतापून जाऊन तिनें यमाला तत्काल शाप दिला कीं, 'तूं जी ही मजवर मला लाथ मारण्यासाठीं तंगडी उचलली आहेस ही गळून पडेल,' असा तिनें जेव्हां ताडकन् शाप दिला. तेव्हां संज्ञेचा हा शाप ऐकून यमाचेंही मन फार उदास झालें, व तिचे ते शब्द त्याला सारखे टोंचीत राहिले. अशा स्थितींत तो बापाकडे जाऊन हात जोडून दीनवाणीनें झालेली सर्व हकीकत बापाला सांगून म्हणाला, 'आपण तरी कृपा करून हा आईनें दिलेला शाप दूर करा. मी आईला बोलूं नये; पण एका अर्थीं मी बोललों यांत माझा तरी अपराध काय? आपणच न्याय सांगा कीं, आई म्हटली म्हणजे तिनें सर्व मुलांशीं सारखे प्रेमानें वागावें कीं नाहीं? परंतु ही आमची आई आमचेकडे पाहातही नाहीं, पण आमचा जो धाकटा भाऊ आहे त्याचे सगळे थाटमाट करीत असते. ही गोष्ट आम्हांला कशी रुचावी. तेव्हां रागाचे तडाक्यांत मीं पाय उचलला खरा, नाहीं म्हणत नाहीं; परंतु, उचलला मात्र, तिच्या देहावर मारिला नाहीं. बाकी हेंही करणें योग्य नव्हे खरें, परंतु पोरपणानें किंवा मूर्खपणानें मजकडून ही गोष्ट झाली, इकडे लक्ष देऊन वास्तविक तिनें मला क्षमा केली पाहिजे होती. परंतु तें कांहीं न करितां ती मला म्हणाली, 'पोरा, मी तुझी आई अर्थात् मी तुला देवाप्रमाणें वंद्य असें असतां तूं आपली मर्यादा उल्लंघून ज्या अर्थीं हा मजवर पाय उचलिलास त्या अर्थीं हा गळून पडेल. यांत अंतर व्हायचें नाहीं.' तर बाबा, तुम्हींच सांगा कीं, एकवेळ पोर वाईट होऊं शकेल. कारण किती झालें तरी पोरच तें; परंतु माता कधीं कुमाता होईल काय? हे तपस्विश्रेष्ठा, परंतु माझ्या जन्मदात्रीनेंच मला शाप दिला आहे, ही गोष्ट आपण ध्यानांत घ्या, व आपल्या कृपाबलानें तरी हा माझा पाय गळून न पडेल असें करा.'

विवस्वान् ( सूर्य ) म्हणतोः—बेटा, तुझ्यासारख्या सत्यवादी व धर्मवेत्त्या मुलाला ज्या अर्थीं इतका क्रोध आला त्या अर्थीं या कामांत कांहीं तरी मोठेंच गूढ असलें पाहिजे. एरवीं आई मुलाला असा शाप देईल असें होणें नाहीं. आतां तूं शाप दूर व्हावा म्हणून म्हणतोस परंतु तुझ्या आईचे शब्द मला फिरवितां येत नाहींत. तथापि मी तिचे शब्दाला कायम राखून इतकीच तडजोड करितों

कीं, तिनें तुझा पाय गळून पडेल म्हणून म्हटलें आहे तो गळून म्हणजे हाडासकट सबंध तुटून भुईवर न पडतां त्याचें मांस किडे पडून सडून भुईवर पडेल. म्हणजे या युक्तीनें तुझे आईचा-ही शब्द खरा झालासा होऊन तुझाही कायमचा घात न होतां तूं सुखी होशील. म्हणजे तिचा शापही पुरा झाला व तूंही बचावलास. याप्रमाणें यमाची समजूत काढून आदित्य संज्ञेकडे गेला व तिला म्हणाला, "अग, सर्व मुलें तुझींच; खरें पाहातां तुझें साऱ्यांवर-च सारखें प्रेम असावें, परंतु पाहावें तों तुझे प्रेमांत वारंवार विषमपणा आढळून येतो, असें कां असावें तें मला फोडून सांग." सूर्यानें असें तिला खोदून विचारलें. परंतु, खरी गोष्ट सांगणें तिला इष्ट नसल्यामुळें ती टाळा-टाळ करूं लागली व खरें कांहीं सांगेना. अशी स्थिति झाली त्यावेळीं सूर्यानें समाधि लावली व योगबलानें खरा प्रकार काय आहे, तो ध्यानांत आणिला; आणि झालेली लबाडी ध्यानांत येतांच तिला शाप देऊन नाहींशी करण्याच्या बेतांत येऊन त्यानें त्वेषानें तिचा बुचडा धरिला. नवरा इतक्या बाणीवर आलेला पाहून व तो माझे केश धरी तों मी बोलणार नाहीं. असें आपण जें संज्ञेला वचन दिलें होतें त्याची मर्यादा झाली असें पाहून, छायेनें अधिक टाळाटाळ न करितां सूर्याला अक्षरशः कची हकीकत होती तशी सांगितली. तिचे मुखांतून ती हकीकत कानीं येतांच विवस्वान् क्रोधाचे आवेशांत तडक त्वष्टयाकडे चालता झाला. पण त्याला पाहातांच त्वष्टयानें तत्काल त्याच्या योग्यतेनुरूप त्याचें पूजन करून, व हा आतां संतापानें आपणास जाळून टाकणार असा रंग दिसतांच मोठ्या युक्ती-नें त्याची समजूत काढून त्याला शांत केलें. त्वष्टा म्हणाला, "हे विवस्वाना, तुला तसें वाटतें खरें, परंतु माझी मुलगी तुला सोडून गेली यांत तिचा तिळभरही दोष नाहीं. काय करील बिचारी! तुझें हें रूप म्हणजे नुसता आगीचा लोळ. हा एक तर तिचे डोळ्याला गोड दिसत नाहीं; दुसरें, तिच्या शरीराला तो सहन होत नाहीं. तेव्हां निरुपायास्तव तुला सोडून ती निघाली. पण निघाली म्हणून तिनें काडीभरही गैरवर्तन केलें नाहीं. आजच तुला तुझी ती स्त्री घोडीचें रूप घेऊन उत्तर कुरु-प्रदेशांतील हिरण्यागार कुरणांत फिरतांना दृष्टीस पडेल. तेथें तिची स्थिति पाहिली असतां तिचें आचरण फारच पवित्र असून ती सदैव तपश्च-र्येंत निमग्न आहे, असें तुला दिसेल. बापडी केवळ पिकलीं पानें खाऊन असल्यामुळें अत्यंत दीन व रोड होऊन गेली आहे; व तुजविरहित अन्य पुरुष तिला पाहाणें नसल्यामुळें माथ्यावर जटा वाढवून पूर्ण ब्रह्मचर्यानें ती रहात आहे. ऐनयौवनांत पतिविरह सोसावा लागल्यानें बिचारी हत्तीच्या सोंडेच्या तडाक्यांत सांपड-लेल्या सुकुमार पद्मिनीप्रमाणें हैराण होऊन गेली आहे, तथापि इतकी दशा झाली असतांही तिनें तिळभर अमार्गीं पाऊल ठेविलें नाहीं, यास्तव ती सर्वांच्या स्तुतीस पात्र आहे. तिनें आपलें वर्तन इतकें शुद्ध कसें राखलें म्हणशील तर, हे किरणनाथा, तिनें योगाचा आश्रय केला असून तिचें योगसामर्थ्यही फार वाढलें आहे. असो; एतावता माझी मुलगी तुझ्या संगतीं राहाण्यास धर्मतः नाकबूल नाहीं, परंतु तुझ्या या विक्राळ रूपापुढें तिचा उपाय चालत नाहीं. या कामीं मला एक उपाय सुचला आहे. त्याविषयीं तुझी जर कबुली असेल तर तो मी अमलांत आणतों. तो उपाय असा कीं, तुझें हें ओबडधोबड व वांकडें मुसकें आणि तेजाचा केवळ लोळ असलें भ्यासूर रूप मी बदलून माझ्या मनांत आहे त्या-

प्रमाणें याला अति मोहक आकार देतों." त्वष्टयाची ही गोष्ट सूर्याला रुचली, व सूचनेबद्दल त्याचे आभार मानून त्याला वाटेल तसें आपलें रूप फिरवावें अशी त्यानें त्वष्टयाला अनुज्ञा दिली. सूर्याचा हा कबूलजबाब पदरांत येतांच त्वष्टयानें सूर्याला चाकावर घालून त्याचे रूपांत जो ओबडधोबडपणा होता व तेजांत जो भ्यासूरपणा होता तो साफ कांतून काढिला. याप्रमाणें त्या कुशल त्वष्टयानें तें रूप कांतून काढिलें असतां चरकीं घरलेल्या भांड्याप्रमाणें तें फारच साफसूफ व सुबक दिसूं लागलें व त्या दिवसापासून सूर्याच्या मुखमंडलावर कायमची लाली चढूं लागली. त्वष्टयानें चरकावर घातल्यावेळीं त्या रूपावरील तेजाचा जो तास किंवा चुरा खालीं पडला त्यापासून तेजस्वी असे बारा आदित्य निर्माण झाले, त्यांचीं नांवें:—धाता, अर्यमा, मित्र, वरुण, अंश, भग, इंद्र, विवस्वान्, पूषा व पर्जन्य हा दहावा, त्याच्यापुढें त्वष्टा, व उत्पत्तिक्रमानें शेवटला परंतु महत्वानें सर्वांत वरिष्ठ असा बारावा विष्णु[1]. आपल्या देहापासून असले द्वादश आदित्य निर्माण झाले हें पाहून सूर्यदेवाला फारच आनंद झाला. असो; एवढें झाल्यावर त्वष्टयानें सूर्याची गंध, पुष्प, अलंकारांनीं पुनरपि पूजा करून त्याला एक देदीप्यमान मुकुट दिला, व प्रार्थना करून म्हणाला, "हे देवा, आपली भार्या वडवेचें म्हणजे घोडीचें रूप घेऊन उत्तर कुरुप्रदेशांतील हिरव्याचार कुरणांत फिरते आहे, तिजकडे आपण निःशंकपणें जा." त्वष्टयाचें हें वाक्य ऐकून सूर्यालाही मौज वाटली व आपल्या भार्येला गोड वाटण्याकरितां आपणही गमतीनें अश्वाचें रूप घेऊन अंतर्यामीं योगबलानें आपली स्त्री काय करीत आहे व कोठें आहे हें त्यानें न्याहाळलें. त्यावेळीं ती घोडीचें रूप घेऊन निर्भय संचार करीत आहे, व तिच्या व्रतस्थपणामुळें व तेजाच्या उग्रतेमुळें कोणीही प्राणी तिचे जवळ जाऊं शकत नाहीं, असें त्याचे दृष्टीस पडलें. मग तिचे वर्तनानें अंतर्यामीं खुष होऊन मोठ्या प्रेमानें तो तिजजवळ जाऊन भिडला व कामविव्हल होऊन तिला भोग देण्याच्या रंगांत आला, परंतु हा आपला पति हें तिच्या ध्यानांत आलें नसल्यानें त्याला परपुरुष समजून ती त्याची मैथुनेच्छा सिद्धीस जाऊं देईना व तडातड दुगाण्या झाडूं लागली. परंतु अशा वेळीं सूर्याला कामवेग अनावर झाल्यानें त्यानें तिच्या मुखांतच आपलें वीर्य सोडिलें, पण त्या पवित्र स्त्रीनें तें तेथेंही ठरूं न देतां फुर्‌दिशीं तें परत उडविलें. तें नेमकेंच त्या अश्वरूपधारी सूर्याच्या नाकपुड्यांत घुसलें; पण कोठेंही गेलें तरी देवाचें अमोघ वीर्य तें! तें फुकट जावयाचें नाहीं, यामुळें तेथेंच त्या वीर्यापासून वैद्यांमध्यें श्रेष्ठ असे दोन अश्विनौदेव निर्माण झाले; यांतील एकाचें नांव नासत्य व एकाचें दस्र. शिवाय अश्विनी म्हणजे घोडीपासून झाल्यामुळें या दोघांना अश्विनीकुमार असेंही म्हटलें आहे. सारांश, आठवा प्रजापति जो मार्तंडसूर्य[1] त्याचेपासून अश्विनीचें रूप धारण केलेली जी त्याची संज्ञा नामक भार्या तिचे ठिकाणीं हे अश्विनीकुमार निर्माण झाले. नंतर उभयतांनींही आपलीं पूर्वरूपें ग्रहण केलीं. त्यावेळीं संज्ञेला सूर्याचें रूप अतिशय मनोहर आहेसें दृष्टीस पडून फार आनंद झाला.

असो; आतां आपण यमाकडे वळूं. मागें सांगितलेंच आहे कीं, यमानें छायेची अवज्ञा केल्यामुळें तिनें त्याला शाप दिला. तो शाप बसल्यापासून यमै अंतर्यामीं फार कष्टी

१ आदित्याना मह्यंविष्णुः ॥ गीता, अ० १०.

१ येथें टीकाकारास 'मनु' । असा पाठ दिसतो. परंतु तो सोईकर नाहीं.

झाला व त्याचा पूर्वीचा सर्व द्वाडपणा जाऊन त्याची वृत्ति फार निवळली; मग त्यानें आपल्या प्रजांचें पालन फार धर्मनीतिपूर्वक —केवळ धर्मराजाप्रमाणें—केलें. या त्याच्या सत्कर्मानें तो फारच तेजास चढला, व त्याच गुणामुळें त्याला पितरांचें आधिपत्य व लोकपालकत्व असे दोन अधिकार मिळाले. इकडे त्याचा वडील भाऊ जो सावर्णमनु तो तपाच्या नादीं लागला व अजूनही मेरू पर्वतावर तो प्रभावशाली प्रजापति मोठें घोर तप करीत बसला आहे. या तपाच्या सामर्थ्यानें येत्या मन्वंतरांत त्याला सावर्णिक मनूचा अधिकार प्राप्त होणार आहे. असो; त्याचा भाऊ जो शनैश्चर त्याला तर नभोमंडलांत ग्रहरूपानें कायमची जागा मिळाली आहे. वर जे नासत्य म्हणजे जुळे अश्विनीकुमार सांगितले ते स्वर्गांतील वैद्य झाले आहेत. याप्रमाणें, हे राजा, सेवत (?) हाही अश्वांना शांति देणारा झाला. त्वष्ट्यानें सूर्याला चरकीं लावलें असतां जें त्याचें फाजील तेज कांतून पडलें होतें, त्या तेजापासून विष्णूच्या हातांत राहाणारें व युद्धामध्यें कधींही पराभव न पावणारें जें सुदर्शन चक्र तें निर्माण केलें. हें सुदर्शन चक्र करण्याचा मूळ हेतु दानवांचा साफ फडशा उडविणें हाच होता. यम व वैवस्वत मनु यांची जी धाकटी यमी नांवाची बहिण ती सर्व लोकांना पावन करणारी अशी यमुना नांवानें श्रेष्ठ नदी होऊन भूलोकांत वाहाते आहे. छायेचे जे दोन मुलगे त्यांतील पहिल्याला मनु असेंही म्हणतात, व सावर्ण असेंही म्हणतात. या मनूचा भाऊ म्हणजे छायेचा दुसरा पुत्र जो शनैश्चर हा सर्व लोकमान्य ग्रह होऊन आकाशांत जाऊन बसला, हें पूर्वींच सांगितलें आहे.

जो कोणी देवांचें हें जन्मवृत्त श्रवण करील किंवा त्याचें मनन करील, तो विपत्तीपासून मुक्त होऊन मोठ्या कीर्तीला चढेल.

# अध्याय दहावा.

—:०:—

## वैवस्वत मनूची संतति.

वैशंपायन सांगतातः—हे जनमेजया, वैवस्वत मनूला त्याच्याच तोडीचे नऊ पुत्र झाले, त्यांचीं नांवें:—इक्ष्वाकु, नाभाग, धृष्णु, शर्याति, नरिष्य, प्रांशु, नाभागारिष्ट, करूष व पृषध्र, असे हे नऊ. हे राजा, हे पुत्र होण्यापूर्वीं मनु प्रजापतीनें मित्रावरुण देवतांना उद्देशून पुत्र व्हावा या इच्छेनें एक इष्टि केली; ती इष्टि चालली असतां व नऊ पुत्र उत्पन्न होण्याच्या अगोदर मित्रावरुणांच्या अंशानें मनूनें आहुती दिली; ती आहुती देतांच देव, गंधर्व, मनुष्य व तपोधन मुनि या सर्वांसच परम संतोष होऊन ते म्हणाले, "शाबास, शाबास, काय तरी या मनूच्या तपाचें सामर्थ्य! केवढा तरी याचा वेदज्ञानासंबंधीं अधिकार." हे राजा, असें सांगतात कीं, देवादिक याप्रमाणें जों आनंदानें उद्गारत आहेत तोंच त्या इष्टींतून दिव्य वस्त्र धारण केलेली, दिव्य अलंकारांनीं शृंगारलेली व जिची अंगगठण मोठी दिव्य आहे अशी इला नांवाची एक स्त्री उत्पन्न झाली. तिला पाहातांच, राजा मनु म्हणाला कीं, हे कल्याणि, मजबरोबर चल. तें ऐकून आपणास पुत्र व्हावा अशी ज्याला इच्छा झाली होती त्या मनु प्रजापतीला ती इला पुढीलप्रमाणें धर्मयुक्त वाक्य बोलली. इला म्हणाली, 'हे वदान्यश्रेष्ठा, ज्याअर्थीं मी मित्रावरुणांच्या हविर्भागापासून उत्पन्न झालें आहें त्याअर्थीं मी त्यांचे सन्निध जातें; कारण असें न करीन तर मजकडून अधर्म होऊन माझा नाश होईल. करितां तूं माझे आड येऊं नको, असें म्हणून

ती सुंदरी मित्रावरुणासन्निध जाऊन उभी राहिली व हात जोडून म्हणाली, 'देवहो, मी तुमच्या अंशापासून उत्पन्न झालें आहें, त्या-अर्थीं मी आपली काय सेवा करावी तें मला सांगा. हा मनु तर मला म्हणतो आहे कीं, तूं मजबरोबर रहा. तर मी कसें करूं?' या-प्रमाणें ती धर्मनिष्ठ साध्वी इला विनंति करीत असतां मित्रावरुणांनीं तिला जें उत्तर दिलें तें ऐक:—ते म्हणाले, 'हे सुश्रोणि, तुझ्या या धर्म-निष्ठेनें, विनयानें, दमानें व सत्यानें आम्हीं फारच खूष झालों, तर तूं आमची कन्या म्हणून लोकांत प्रसिद्ध होशील व यानंतर तुला याच देहीं पुरुषत्व प्राप्त होऊन, हे त्रैलोक्यसुंदरी, तूं या मनूचा वंश चालविणारा सुद्युम्न नांवानें प्रख्यात पुत्र होशील. तूं सर्व प्रजाजनांला आवडता होशील, धर्मशील होशील व तुज-पासून मनुवंशाची वृद्धि होईल.' मित्रावरुणांचें हें वचन ऐकतांच ती आपला पिता मनु याकडे जावयाला निघाली. जात असतां वाटेंत ती बुधाचे दृष्टीस पडली, व त्यानें तिला 'भोग दे' म्हणून प्रार्थना केली. तीही तरुण असल्यानें त्याला वश झाली, व त्यांचे संयोगा पासून पुरूरवा नांवाचा प्रसिद्ध पुत्र तिला झाला. त्या पुत्राला जन्म दिल्यावर तिचा स्त्रीपणा जाऊन तिला पुरुषत्व प्राप्त झालें, व सुद्युम्न या नांवानें त्या रूपानें ती प्रसिद्ध झाली. त्या पुरुषरूपांत असतां त्याला उत्कल, गय व विनताश्व असे तीन पुत्र झाले. यांपैकीं उत्कलाला उत्कल देशाचें राज्य मिळालें; विन-ताश्वाला पश्चिम दिशेचें व गयाला पूर्वेकडील देशाचें राज्य मिळालें व त्या देशांतील गया-नगरी ही त्याची राजधानी झाली. असो; अरिंदमा, वैवस्वत मनु हा आपल्या मूळरूपांत म्हणजे सूर्यरूपांत लीन झाल्यावर त्याच्या दहा पुत्रांनीं त्याच्या ताब्यांत असलेल्या या पृथ्वीचे दहा वांटे केले. त्यांपैकीं यज्ञस्तंभांनीं व अरण्यें आणि रत्नें वगैरे यांच्या खाणी यांनीं चिन्हित असलेला जो मध्यदेश तो नऊ भावांतील ज्येष्ठ जो इक्ष्वाकु त्यानें घेतला. न्याय पाहातां हा वांटा सुद्युम्नाला मिळाला पाहिजे होता; परंतु तो मूळ कन्यारूप असल्यानें त्याला तें राज्य मिळालें नाहीं. वसिष्ठांनीं त्या धर्मनिष्ठ सुद्युम्नाची प्रतिष्ठान म्हणजे प्रयागप्रांतीं स्थापना केली. पुढें तें राज्य प्राप्त झाल्यावर सुद्युम्नानें तें आपला पुत्र पुरूरवा याजकडे दिलें. उत्क-लाला लोकविख्यात तीन पुत्र होते. त्यांचीं नांवें धृष्टक, अंबरीषः व दंड. तपस्वीलोकांना अतिशय सोईकर व सर्व लोकप्रसिद्ध जें दंड-कारण्य आहे, तें या दंड राजानेंच निर्माण केलें. या दंडकारण्याचें माहात्म्य असें आहे कीं, त्यांत पाऊल टाकतांच मनुष्य पापमुक्त होतो. स्त्री आणि पुरुष या उभयतांचींही लक्षणें ज्याचे ठिकाणीं आहेत असा जो सुद्युम्न किंवा इल (इला हिला पुरुषत्व आल्यावर इल असेंही म्हणत.) हा आपल्या ऐल नामक पुत्राच्या जन्मानंतर त्याला राज्य देऊन आपण स्वर्गीं गेला. नरिष्यन् याच्यापासून शक नांवाचे पुत्र झाले. नाभागापासून नृपश्रेष्ठ जो प्रसिद्ध अंबरीष तो झाला. धृष्णूपासून रणशूर असें धार्ष्टक संज्ञक क्षत्रिय कुल उत्पन्न झालें. करूषा-पासून मोठा पराक्रमी व रणमस्त असा कारूष नामक हजार क्षत्रियांचा समुदाय उत्पन्न झाला. नाभागारिष्टाला जे पुत्र झाले ते जन्मतः क्षत्रिय असतां कर्मदोषानें वैश्य झाले. प्रांशूला शर्याति नांवाचा सुप्रसिद्ध असा एकच पुत्र झाला, नरिष्यंताला दम नांवाचा

१ हा इल राजा एकदां शरवणांत गेला असतां पार्व-तीचे शापानें पुनः स्त्री झाला व नंतर शिवाचे कृपेनें एक महिना स्त्री व एक महिना पुरुष अशी त्याची व्यवस्था झाली.

एक मोठा शास्ता पुत्र झाला. शर्यातीला एक मुलगा व एक मुलगी, अशीं दोन अपत्यें झालीं. त्यांपैकीं मुलाचें नांव आनर्त व मुलीचें नांव सुकन्या; हीच पुढें च्यवन ऋषीची स्त्री झाली. आनर्ताला रेव नांवाचा मोठा तेजस्वी पुत्र झाला. आनर्ताच्या राज्याला आनर्त देश म्हणत असून कुशस्थली ही त्याची राजधानी होती. रेवाला एकंदर शंभर पुत्र झाले. त्यांपैकीं त्याचा ज्येष्ठ पुत्र ककुद्मी नांवाचा मोठा धार्मिक होता. यालाच रैवत असेंही म्हणत. बापापासून याला कुशस्थलीचें राज्य मिळालें. पुढें त्याला रेवती नांवाची कन्या झाली. ती उपवर झाली असतां तिला बरोबर घेऊन तो ब्रह्मलोकीं गेला. तेव्हां ब्रह्मदेव गात बसले होते. त्यामुळें तो तें गायन ऐकतच ब्रह्मदेवाचा एक मुहूर्तपर्यंत बसला. एक मुहूर्त झाल्यावर काय बोलावयाचें तें बोलून मृत्युलोकीं तरुणच्या तरूण परत आला. परंतु, तो आपल्या राजधानीस परत येऊन पाहातो तों तिचें सर्वच स्वरूप बदलून गेलें होतें. तिला अनेक द्वारें किंवा नगरवेशी बांधल्या असून यामुळेंच तिचें पूर्वीचें कुशस्थली हें नांव बदलून द्वारवती हें नांव पडलें होतें. एकंदरींत ती फार मनोहर झाली होती. वासुदेव म्हणजे कृष्णप्रभृति जे भोज, वृष्णि व अंधककुलोत्पन्न राजे यांचा तिजवर ताबा असून तींत यादवांचा फार भरणा होता. हे राजा, एक मुहूर्तांत एवढा फेरबदल झाला कसा म्हणून म्हणशील तर हा मुहूर्त ब्रह्मदेवाचा. अर्थातच आपलीं माणसांचीं किती तरी युगें एवढ्यांत लोटलीं व यामुळें सहजच अशी उलथापालथ झाली. असो; स्वनगरीस आल्यावर नगरीच्या स्थित्यंतराचें कारण काय तें सर्व खरें खरें समजून घेतल्यावर त्यानें आपली व्रतशील कन्या रेवती ही कृष्णाचा बंधु जो बलराम त्याला दिली, व आपण मेरुशिखरावर जाऊन तप करीत बसला. इकडे धर्मात्मा बलरामही त्या तरूण रेवतीशीं रममाण होऊन सुखांत राहिला.

## अध्याय अकरावा.

—:०:—

### धुंधुवधवर्णन.

जनमेजय विचारतोः—हे द्विजश्रेष्ठा, आतां आपण सांगितलें कीं, रैवत राजा ब्रह्मलोकाहून परत आला तों मानवांचीं युगेंच्या युगें लोटलीं, पण तो तरुणच्या तरूण परत आला. बरें, त्याची कन्या रेवती ही तेथें आल्यावर त्यानें बलरामास दिली; तेव्हां तीही तरूणच होती, हें उघडच झालें. तर मी असें विचारतों कीं, इतकीं युगें लोटलीं तरी रेवती किंवा तिचा बाप रैवत यांपैकीं कोणालाच वार्धक्य कसें आलें नाहीं? शिवाय संसार टाकून जर शर्यातीचा प्रपौत्र रैवत मेरूपृष्ठावर तपश्चर्येला गेला तर त्याची संतति अजून पृथ्वीवर चालू आहे हा चमत्कार काय, हें मला सर्व कृपा करून सांगावें.

वैशंपायन सांगतातः—बा जनमेजया, त्या ब्रह्मलोकांत तहान, भूक, वार्धक्य अथवा मृत्यु कांहींच नाहींत. इतकेंच नव्हे परंतु तेथें निरनिराळे ऋतुदेखील नाहींत (सर्वदा वसंतच असतो.) यामुळें, हीं दोघें तेथें गेलीं त्या वेळीं ज्या अवस्थेंत होतीं त्याच अवस्थेंत उघडच तीं परत आलीं. असो; ककुद्मी रैवत हा ब्रह्मलोकाला गेला, तेव्हां त्याच्या पश्चात् त्याची राजधानी जी कुशस्थली तिच्यावर राक्षस व पिशाच्च यांनीं हल्ला करून तिचा नाश मांडिला. त्यावेळीं त्या धार्मिक ककुद्मीचे मागें शंभर बंधु त्या नगरींत होते. ते राक्षसांच्या त्रासानें जीव घेऊन धडपणीं बारावाटा पळाले. ते ज्या ज्या

मुलखाला पळून गेले, त्या त्या मुलखांतील जे जे धर्मभोळे क्षत्रिय राजे होते ते ते त्यांना पाहून भयभीत झाले व आपली जागा सोडून पळाले व ठिकठिकाणीं पर्वताचा आश्रय धरून राहिले. मग त्यांच्या जागीं घुसलेले हे शंभर बंधु तेथेंच स्वस्थपणें नांदूं लागले; व त्या त्या जागीं त्यांचा मोठा वंशविस्तार झाला; आणि शार्यातनांवानें जे सुप्रसिद्ध योद्धे ऐकूं येतात ते सर्व त्यांचीच संतति. असो; मनूचा जो नाभागादिष्ट म्हणून पुत्र सांगितला त्याला दोन पुत्र ( आईच्या जातीमुळें ) वैश्य झाले; परंतु पुढें तपोबलानें ते ब्राह्मण्य पावले. करूषाला कारूष नांवाचे मोठे रणमस्त क्षत्रिय पुत्र झाले. आम्हीं असें ऐकतों कीं, प्रांशूला प्रजापति नामक एकच पुत्र होता, व पृषध्रानें आपल्या गुरूची गाय मारिली त्या पातकानें तो क्षत्रिय असतां शूद्रत्वाला पावला. हे भरतश्रेष्ठा जनमेजया, याप्रमाणें वैवस्वत मनूचे नऊ पुत्रांचा वृत्तांत तुला सांगितला. त्याला इक्ष्वाकु म्हणून जो पुत्र झाला त्याचे उत्पत्तीची कथा अशी आहेः मनूला एकवार शिंक आली व त्या शिंकेबरोबर हा पुत्र उभा राहिला व त्याला इक्ष्वाकु असें नांव दिलें. या इक्ष्वाकूला पुढें शंभर पुत्र झाले. हे सर्वही मोठे दानशूर होते. यांचा वडीलभाऊ विकुक्षी नांवाचा होता. याचे विकुक्षित्वामुळें ( ढेरपोटामुळें ) हा लढण्याला निरुपयोगी होता; व त्या कारणानें लढाईवर न जातां अयोध्येचें राज्यच करीत राहिला. हा मोठा धर्मज्ञ असून याला शकुनिप्रभृति बहुत पुत्र झाले. हे सर्व राजे झाले. त्यांपैकीं पन्नास उत्तरापथ देशाचें रक्षणकर्ते निघाले, व चाळीस आणि आठ यांनीं दक्षिण दिशा राखिली. या अठ्ठेचाळिसांना रक्षणाचे कामीं विकुक्षि ऊर्फ शशाद याचीही मदत असे. हे जनमेजया, तूं म्हणशील कीं, विकुक्षीला शशाद हें नांव कुठून आलें, तर ऐक. एकदां इक्ष्वाकूचे घरीं अष्टका[१] नांवाचें श्राद्ध होतें. या दिवशीं इक्ष्वाकूनें आपला पुत्र विकुक्षी याला सांगितलें कीं, तूं चांगला बलाढ्य आहेस तर रानांत जा आणि चांगली शिकार करून आजच्या श्राद्धासाठीं बरेंचसें मृगमांस घेऊन ये. पित्याचे आज्ञेप्रमाणें रानांत जाऊन विकुक्षीनें पुष्कळशी शिकार मारिली. परंतु, ती तशीच घरीं घेऊन येण्याच्या पूर्वीं शिकारीच्या श्रमानें त्याला अतिशय क्षुधा लागून त्यापैकीं त्यानें एक शश ( ससा ) तेथेंच खाल्ला. नंतर तें मांस घेऊन तो घरीं आला व बापापुढें तें त्यानें ठेविलें. परंतु, जवळ कुलगुरू त्रिकालज्ञ वसिष्ठमुनि होते, त्यांनीं सांगितलें कीं, मांस उच्छिष्ट आहे, हें श्राद्धाचे उपयोगीं नाहीं. त्यावरून प्रश्न करितां विकुक्षीनें खरी हकीकत सांगितली व त्यानें ससा खाल्ला म्हणून त्याला त्या वेळेपासून शशाद असें नांव पडलें; व त्याच्या अपराधाबद्दल पित्यानें त्याला राज्यांतून काढून लाविलें. तो बहुतकाळ तसाच परागंदा होता. पुढें त्याच्या बापाचें म्हणजे इक्ष्वाकूचें जेव्हां देहावसान झालें तेव्हां तो स्वनगरास परत येऊन तेथील राजा झाला. या शशादाला पुढें ककुत्स्थ नांवाचा मोठा वीर्यशाली पुत्र झाला. याला ककुत्स्थ हें नांव पडण्याचें कारण असें झालें कीं, पूर्वीं देव व असुर यांचें युद्ध चाललें असतां देवांनीं याला आपल्या साह्यार्थ बोलाविलें. तेव्हां तो म्हणाला कीं, मी इंद्राचे पाठीवर बसून युद्ध करीन. ही गोष्ट तुम्हांला कबूल असेल तर मी साह्यास येतों. देवांनीं निरुपायास्तव इंद्राला कबूल करविलें. त्या वेळीं इंद्रानें मोठ्या वृषभाचें रूप घेतलें.

[१] मार्गशीर्ष, पौष, माघ, फाल्गुन आणि भाद्रपद या महिन्यांतील वद्य अष्टमीस जें आहिताग्नि ( जे गृहस्थ धर्माप्रमाणें अग्नि राखतात. ) श्राद्ध करतात तें.

मग हा शशाद पुत्र त्या वृषभाच्या ककुद् म्हणजे वशिंडावर बसला. त्या वेळेपासून त्याला ककुत्स्थ असें नांव पडलें. या ककुत्स्थाला पुढें अनेना नांवाचा मुलगा झाला. अनेनाला पृथु नावांचा मुलगा झाला. या पृथूचा पुढें विष्टराश्व, विष्टराश्वाचा आर्द्र, आर्द्राचा युवनाश्व, व युवनाश्वाचा पुत्र श्रावस्त हा झाला. श्रावस्ती नामक जी प्रसिद्धपुरी ती याच राजानें बसविली. या श्रावस्ताला बृहदश्व नांवाचा मोठा लौकिकवान् पुत्र झाला. या बृहदश्वाला कुवलाश्व नांवाचा मोठा धार्मिक पुत्र झाला. या कुवलाश्वानें धुंधु नांवाच्या बलाढ्य राक्षसाला मारिलें, त्यामुळें त्याचें धुंधुमार असें नांव पडलें.

जनमेजय म्हणतोः—हे ब्रह्मन्, कुवलाश्वाला ज्याच्या वधामुळें धुंधुमार असें नांव पडलें त्या धुंधु राक्षसाच्या वधाचें सर्व वृत्त ऐकावें, असें मनांत आहे.

वैशंपायन सांगतातः—कुवलाश्वाला धनुर्विद्येंत अत्यंत निपुण, मोठे बलाढ्य, अजिंक्य, दानशूर, यागकर्ते व धार्मिक असे शंभर[1] पुत्र झाले. मुलाला मुलगे झाले असें पाहून राजा बृहदश्व कुवलाश्वावर राज्यकारभार सोंपवून आपण तपस्येसाठीं वनांत जावयास निघाला. तो तिकडे चालला असतां उत्तंक नांवाचा विप्रर्षि त्याला आडवा आला. उत्तंक म्हणाला कीं, हे राजा, तूं जातीचा क्षत्रिय, प्रजारक्षण करणें हेंच तुझें मुख्य कर्तव्य; ही कर्तव्यचिंता एकीकडे झुगारून देऊन तपाला निघून जाणें हें तुला न्यायानें करितां येणार नाहीं. घराबाहेर पडल्यानें तूं कदाचित् एकटा निश्चिंत होशील, परंतु तुजसारखा समर्थ पालक नाहींसा झाल्यामुळें शेंकडों प्रजा चिंताक्रांत होतील. याकरितां तूं अरण्यांत न जातां परत चल आणि प्रजांचें रक्षण कर. माझ्या आश्रमानजीक जो सपाट वैराण मुलूख आहे, तेथें कसलीही वस्ती नसून समुद्रांतील वाळूनें तो केवळ भरून गेला आहे. त्या वाळुकेच्या पोटांत जमिनीखालीं मधुराक्षसाचा पुत्र एक धुंधु नांवाचा मोठा विशाळ व बलाढ्य आणि देवतांनाही अवध्य असा भयंकर राक्षस दडी देऊन राहिला आहे, व लोकांचा संहार करण्याची आपल्या अंगीं शक्ति यावी या उद्देशानें तो संवत्सराच्या अखेरीस एकदां सुस्कारा टाकतो, पण त्या सुस्काऱ्याबरोबर पृष्ठावरील पर्वत, झाडें व अरण्यें यांसह सर्व पृथ्वी हादरून जाते, व त्याचे उच्छ्वासाबरोबर धुळीचे जे प्रचंड लोळ उडतात, त्यांनीं आकाशांतील सूर्याचा रस्ता आंखला जातो; त्याच्या उच्छ्वासाबरोबर भूमींतून धूर, ठिणग्या व निखारे यांचे सारखे फवारे वर उडत राहून सता दिवसपर्यंत भूकंप सुरू असतो, व या अनर्थामुळें, हे प्रजापालका, त्याच्या जवळच असलेल्या माझ्या आश्रमांत मला वस्ती करणें कठीण झालें आहे; तर त्या अगडबंब राक्षसाला जनहितबुद्धीनें तूं मार, म्हणजे सर्व लोक निर्भय व स्वस्थ होतील. या दुर्घट कर्माला, हे राजा, तूंच एक समर्थ दिसतो आहेस, व या कामीं तुला उपयोगीं पडेल असा श्रीविष्णूनें मला पूर्वयुगांत एक वर देऊन ठेविला आहे; तो असा कीं, "तूं ज्या कोणाकडून या महाबलाढ्य भयंकर राक्षसाला मारविशील त्या पुरुषाचें माझ्या या वरसामर्थ्यामुळें तुझे शब्दांनीं तेज अतिशय वाढेल" असें मला श्रीविष्णूंनीं सांगितलें आहे, व त्यांच्या वचनाचा विनियोग मी तुझे ठिकाणीं करणार आहें; कारण, हे पृथ्वीपाला, हा धुंधु म्हणजे सामान्य

---

१ भागवतांत याला एकवीस हजार पुत्र होते असे लिहिलें आहे; परंतु या स्थलीं मुळांत "शतं" असा शब्द आहे. हा अनेकार्थी घेतल्यास हजारों अर्थ करितां येईल, तथापि एकवीसच हा बोध शक्य नाहीं.

नव्हे. त्याची ताकद अशी कांहीं अचाट आहे कीं, देवांचाही शक तेथें चालत नाहीं, व त्याचें तेजही फार असल्यानें सामान्य तेजाचा मनुष्य शेंकडों वर्षे झटला तरी देखील त्याचा उच्छेद व्हावयाचा नाहीं, करितां तूं एवढें काम कर.

बृहदश्व म्हणाला:—आपली आज्ञा मला अमान्य नाहीं. परंतु मीं संकल्पपूर्वक शस्त्र खालीं ठेविलें असल्यामुळें मला तें परत घेतां येत नाहीं. तथापि आपल्या कार्यार्थ हा माझा पुत्र कुवलाश्व याला आज्ञा देतों व माझी खात्री आहे कीं, हा आपल्या हेतूप्रमाणें त्या धुंधूचा वध करील. असें म्हणून धुंधूच्या वधाविषयीं आपल्या पुत्राला आज्ञा देऊन तो दृढनिश्चयी राजर्षि तपश्चर्येसाठीं पर्वतावरच निघून गेला. इकडे आपले शंभर पुत्र बरोबर घेऊन कुवलाश्व उत्तंकासहित धुंधूच्या मुसक्या आवळण्यासाठीं गेला. तो धुंधुवधाला प्रवृत्त होणार असें पाहातांच उत्तंकाचे शब्दावरून जनहितास्तव परमात्मा भगवान् विष्णु यांनीं आपलें तेज त्या कुवलाश्वाचे ठिकाणीं घातलें. तें अजिंक्य तेज कुवलाश्वाचे देहांत शिरतांच आकाशांत मोठा गजर झाला कीं, हा श्रीमान् कुवलाश्व अवध्य झाला आहे. आज हा धुंधूला खास ठार मारील. असें म्हणून देवांनीं सर्वभर दिव्यपुष्पांची त्याजवर वृष्टि केली व आकाशांत देवांचे नगारेही आनंदानें झडूं लागले. मग आपल्या सर्व पुत्रांसह समुद्रभागीं जाऊन जो भाग कायमचा वाळुकेनें आच्छादून गेला होता तो त्या वीर्यवान् राजानें सर्व खणून काढविला. हे कौरवेश्वरा, तो कुवलाश्व जातीचाच बलाढ्य व तेजस्वी होता. तशांत साक्षात् नारायणाच्या तेज:प्रवेशानें त्याला अधिकच पुष्टि आली, मग त्याचें सामर्थ्य काय विचारावें ? त्याचे आज्ञेनें त्याचे पुत्र तें वाळवंट खणीत चालले असतां पश्चिम दिशेला झांकून राहिलेला तो जगड्वाळ धुंधु राक्षस त्यांना आढळला. ते त्याच्या नजीक ठेपतांच त्यानें सहज आंग हालविलें त्याबरोबर तळांतील समुद्राचें पाणी उसळून चंद्रोदयाबरोबर भरतीचा समुद्र ज्या वेगानें धांवतो त्या वेगानें बाहेर धाऊं लागलें; व तोंडांतून त्यानें क्रोधानें जे आगीचे भपकारे सोडिले त्यांबरोबर तो जगताची राख करितो असें वाटलें. निदान त्या खणणाऱ्या शंभर राजपुत्रांपैकीं तीन वजा करून बाकीचे सत्याण्णव तेथल्या तेथेंच जळून गेले. हे कौरवेश्वरा, पुत्रांची ती दशा पाहातांच आतां आपण स्वत:च सरसावलें पाहिजे असें मनांत आणून त्या महातेजस्वी राजानें त्या महाबलाढ्य धुंधूला गांठलें; अंगीं योगसामर्थ्य उत्कट असल्यानें तो राक्षस जें झपाट्यानें पाणी वर उसळवीत होता तें सर्व त्या कुवलाश्वानें पिऊन शोषून टाकिलें. व जल आणि योगसामर्थ्य यांच्या साहाय्यानें राक्षसाच्या तोंडांतून उठणारा अग्नि विझवून टाकिला. नंतर प्रत्यक्ष गांठ घालून आपल्या आंगचे ताकतीनें त्यानें त्या धडेल पाणराक्षसाला ठार करून आपण सांगितलेली कामगिरी मीं बजाविली अशा आशयाचा उत्तंकाला इषारा केला. त्याच्या त्या कर्तबगारीनें प्रसन्न होऊन उत्तंकानें त्याला वर दिला कीं, हे महात्म्या राजा, तुझे घरीं अखंड लक्ष्मी नांदेल; शत्रूंकडून तुझा केव्हांही पराजय होणार नाहीं; धर्मावर तुझें प्रेम राहून अंतीं तुला कायमचा स्वर्गवास मिळेल. शिवाय जे तुझे पुत्र या कामीं राक्षसानें मारिले आहेत त्यांनाही स्वर्गलोकांत कायमची वस्ती मिळेल.

## अध्याय बारावा.

—:०:—

### गालवोत्पत्तिवर्णन.

वैशंपायन सांगतात:—राक्षसानें मारून कुवलाश्वाचे जे तीन पुत्र उरले त्यांतील दृढाश्व हा ज्येष्ठ होता, असें सांगतात; व चंद्राश्व आणि कपिलाश्व हे दोघे कुमार त्याचे धाकटे भाऊ होते. धुंधुमाराचा जो हा दृढाश्वपुत्र त्याचा पुत्र हर्यश्व म्हणून झाला. या हर्यश्वाला निकुंभ नांवाचा पुत्र झाला. याला लढाईची फार आवड असे. या निकुंभालाही संहताश्व नांवाचा मोठा संग्रामशूर पुत्र झाला. या संहताश्वाचे अकृशाश्व व कृशाश्व असे दोन मुलगे झाले; या संहताश्वाची साधूंना मान्य व त्रैलोक्यांत विख्यात अशी दृषती नांवाची हिमवत् कन्या स्त्री होती. तिजपासून याला प्रसेनजित् नांवाचा पुत्र झाला. या प्रसेनजिताला गौरी नांवाची पतिनिष्ठ स्त्री मिळाली. परंतु पुढें भर्त्याच्या शापानें ही बाहुदा नांवानें प्रसिद्ध असणारी नदी झाली. या गौरीपासून प्रसेनजिताला युवनाश्व नांवाचा एक प्रतापी पुत्र झाला. या युवनाश्वाचे पोटीं त्रैलोक्यांत ज्याचा जयजयकार आहे असा मांधाता नामक प्रसिद्ध राजर्षि जन्मास आला. शशीबिंदूची कन्या चैत्ररथी ती या मांधात्याची स्त्री होती. तिलाच बिंदुमती असेंही नांव असे. ही अत्यंत पतिनिष्ठ असून मोठी सुशील होती व हिच्या रूपाची सर तर त्रिभुवनांत दुसऱ्या कोणत्याही स्त्रीला नव्हती. असल्या स्त्रीचे ठिकाणीं मांधात्यानें दोन पुत्र निर्माण केले. दोघेही मोठे धार्मिक असून एकाचें नांव पुरुकुत्स व दुसऱ्याचें मुचुकुंद असें होतें. या पुरुकुत्साला, राजा, त्रसद्दस्यु हा पुत्र झाला. या त्रसद्दस्यूला नर्मदा नामक स्त्रीचे ठिकाणीं संभूत नामक पुत्र झाला. संभूताचा पुत्र सुधन्वा नामक राजा. या सुधन्व्याला शत्रूंचें मर्दन करणारा असा त्रिधन्वा नामक पुत्र झाला. त्या त्रिधन्व्याला त्रय्यारुण नांवाचा पुत्र झाला. या त्रय्यारुणाला सत्यव्रत नांवाचा एक पुत्र झाला. हा सत्यव्रत मोठा दुष्ट बुद्धीचा असून हा एकदां लग्नांतील पाणिग्रहणमंत्रांच्या आड आला. यापूर्वीं यानें दुसऱ्याची लग्न लाविलेली बायको उपटून आणिली. हा मोठा पोरकट, हूड, कामी, मूर्ख व रंगेल होता; व यानें कामाधीन होऊन शहरांतील कोणा एका गृहस्थाची मुलगी हाताखालीं घातली होती. असला हा अधर्मी कारटा-नव्हे कांटाच-आपले पोटीं आला असें वाटून त्रय्यारुणाला फार दुःख झालें; व रागाचे झटक्यांत "कारट्या, मर, चालता हो" म्हणून त्यानें त्याला वारंवार सांगितलें. तेव्हां बापाला तो पुन्हा पुन्हा विचारूं लागला कीं, तुम्ही मला टाकतां तर मीं जावें कोठें ? बापानें उत्तर केलें, "जा, चांडाळांत जाऊन रहा. तुझ्यासारख्या कुलांगार कारट्याला पुत्र म्हणावें किंवा असला पुत्र मला असावा असली मुळीं इच्छा नाहीं." बापानें असें जेव्हां निक्षून सांगितलें तेव्हां तो शहर सोडून चालता झाला. त्यावेळीं कुलगुरु भगवान् वसिष्ठही त्याच्या आड आले नाहींत. तो सत्यव्रत मोठा छातीचा बेरड होता. तो न डगतां चांडाळांत जाऊन राहिला. इकडे त्याचा बाप त्रय्यारुणही उठून रानांत चालता झाला. सत्यव्रताच्या या अनाचारामुळें त्या देशांत बारा वर्षेपर्यंत पाऊस पडला नाहीं. त्या दुष्काळाच्या तडाक्यांत महातपस्वी विश्वामित्र आपले स्त्रीपुत्र त्या मुलखांत टाकून आपण समुद्रतीरीं तपश्चर्येकरितां गेला. पश्चात् त्याचे स्त्रीनें पोटाला अन्न नाहीं म्हणून आपल्या तीन पुत्रांपैकीं एक पुत्र गळ्याला दोरी लावून बाजारांत उभा केला व शंभर गाई मोल घेऊन विकावयास काढला. इतक्यामध्यें महर्षि विश्वा-

मित्राचा पुत्र गळ्याला दोरी बांधून पशूप्रमाणें विकला जात आहे असें पाहून बलाढ्य व दयाशील जो सत्यव्रत त्यानें विश्वामित्राचा संतोष व्हावा म्हणून व दयेस्तवही त्याला विकूं न देतां आपण त्याचें पोषण केलें. हा सोडविलेला मुलगा पुढें गालव नांवानें प्रसिद्ध असा कौशिक कुलांतला मोठा महर्षि झाला. याला गालव नांव पडण्याचें कारण गळ्याला बांधला होता हें.

## अध्याय तेरावा.

—:०:—

### त्रिशंकुचरित्र.

वैशंपायन सांगतातः—मागील अध्यायांत सांगितल्याप्रमाणें विश्वामित्रपुत्राची विक्री बंद केल्यापासून त्या सत्यव्रतानें विश्वामित्रावरील भक्ति, त्याच्या दीन कुटुंबाबद्दल ती अनुकंपा व वसिष्ठाचा इतउत्तर शिष्य न होण्याची प्रतिज्ञा; या तीन कारणांमुळें मोठ्या आस्थेनें व नम्रपणानें विश्वामित्राच्या कुटुंबपोषणाचा भार आपणावर घेतला. त्यानें रानांतील हरण, डुक्कर, रेडे मारून आणावे व त्यांचें मांस विश्वामित्राचीं मुलेंमाणसें ज्या झोंपडींत रहात होतीं त्या झोंपडीच्या नजीकच्या वृक्षाला टांगून ठेवावें. बाप निघून गेल्यापासून हा सत्यव्रत कोणाशीं न बोलतां मनांतल्यामनांत संकल्प करून बापाचे आज्ञेप्रमाणें बारा वर्षे व्रतस्थ रानांत राहिला. या काळांत अयोध्या नगरी, त्रय्यारुणाचें राज्य व त्याच्या अंतःपुरांतील सर्व स्त्रिया यांचें रक्षण कुलोपाध्याय या नात्यानें वसिष्ठ ऋषींनीं केलें. पोरपणामुळें म्हणून म्हणा किंवा पुढें कांहीं गोष्ट घडून यावयाची होती तिचे बळानें म्हणा, हा सत्यव्रत वसिष्ठाचा प्रथमपासूनच तिट्कारा करीत असे; त्यांतून बापानें त्याला रानांत हांकलून लाविते वेळीं वसिष्ठानें बापाचें निवारण केलें नाहीं; त्यावरून तर त्याचा त्यावर विशेषच राग झाला; परंतु निवारण न करण्यांत वसिष्ठाचा कांहीं विशेष हेतु होता. तो असा कीं, सत्यव्रतानें मागील अध्यायीं सांगितल्याप्रमाणें जरी दुसऱ्याची बायको हिरावून आणली होती, तरी तिचे पाणिग्रहणसमयीं सप्तपदीचे मंत्र पूर्ण होण्याचे पूर्वींच त्यानें ती हरण केली असल्यामुळें वसिष्ठांचे दृष्टीनें सत्यव्रत हा परस्त्रीहरणकर्ता नसून फक्त कन्याहरणकर्ताच होता[१]; व या कारणानें तो बारा वर्षे व्रतस्थ राहिल्यास निष्पाप होईल व नंतर त्याला घरांत परत घेतां येईल. ह्या मतलबास्तव वसिष्ठ त्याचे आड आले नाहींत; परंतु वसिष्ठांचा गूढभाव सत्यव्रताचे ध्यानीं न येऊन वसिष्ठ हे धर्मज्ञ असूनही आपलें परित्राण करीत नाहींत, असें भासून तो त्यांचा मनांत अधिकच राग करूं लागला. खरें पहातां भगवान् वसिष्ठांनीं त्याचें कल्याण व्हावें म्हणूनच असें केलें होतें; पण हें सत्यव्रताचे ध्यानांत न आल्यामुळें तो त्यांच्यावर रागावूनच वनांत चालता झाला. मागें त्याचे वर्तनानें त्याचे पित्याचे मनांत जो असंतोष उत्पन्न झाला होता, त्या दोषानें राज्यांत बारा वर्षे पाऊस पडला नाहीं. रानांत गेल्यावर जें हें तीव्र व्रत सत्यव्रतानें बारा वर्षेपर्यंत आचरण केलें, त्यामुळें त्याचे हातून त्याचें कुल शुद्ध होईल, ही गोष्ट वसिष्ठांचे ध्यानीं आल्यामुळें व बापानें हांकलून दिल्यामुळें ते त्याच्या आड आले नाहींत; शिवाय वसिष्ठांचा हेतु असा होता कीं, कारण पडल्यास सत्यव्रताचा पुत्र आपण गादीवर बसवूं. परंतु रानांत गेल्यापासून सत्यव्रतानें आपल्या श्रमानें विश्वामित्र ऋषींचें

१ सप्तपदीचे मंत्र पुरे होईपर्यंत कन्येला भार्यात्व येत नसतें, असें शास्त्रमत आहे.

दीन कुटुंब पोषण करण्याचें महद्व्रत एकनिष्ठेनें व बिनबोभाट बारा वर्षेंपर्यंत चालविलें. असें चाललें असतां एक दिवस सत्यव्रताला कोठेंही मांस म्हणून मिळेना. इतक्यांत मनास येईल ती वस्तु देणारी कामधेनु नांवाची वसिष्ठांची गाय सत्यव्रताचे दृष्टीस पडली. आधींच तो शिकार करून थकला होता, त्यांत भुकेनेंही पीडिला होता; शिवाय वसिष्ठांवर त्याचा रोख होताच; खेरीज त्याला भूलही पडली; अशा अनेक गोष्टी एकत्र होऊन त्यानें त्या कामधेनूचा वध केला. नंतर तिचें मांस त्यानें स्वतः खाल्लें व वसिष्ठांच्या मुलांसहीं खाऊं घातलें. ही गोष्ट वसिष्ठांच्या कानीं जातांच ते क्रुद्ध होऊन त्या राजपुत्राला म्हणाले, ' हे क्रूरा, ज्या अर्थीं पित्याचा रोष व उपाध्यायाच्या गाईचा वध असे दोन महत्पातकरूपी शंकु तुझ्या बोकांडीं बसलेलेच आहेत, त्या अर्थीं असंस्कृत मांस भक्षणरूप पातकाचा तिसराही शंकु मी तुझे बोकांडीं बसवितों !

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें त्या सत्यव्रताच्या गळ्यांत अडकलेले हे तीन महापातक रूप शंकु पाहून वसिष्ठ त्याला त्रिशंकु असें म्हणाले व तेव्हांपासून त्रिशंकु हेंच त्याचें नांव पडलें. असो; कांहीं काळानें विश्वामित्र तपश्चर्येहून परत आले, व आपल्या बायकामुलांचें उदरभरण सत्यव्रतानें केलें, हें ऐकून खूष होऊन त्याला म्हणाले, ' तुला वाटेल तो वर माग. तेव्हां ' मी सदेह स्वर्गास जावें,' असा वर त्यानें विश्वामित्राजवळ मागितला. इतक्यांत बारा वर्षांचें अवर्षण नाहींसें झालें; मग विश्वामित्रानें त्रिशंकूला त्याच्या बापाचे राज्यावर नेऊन बसविलें, व त्याजकडून एक मोठा यज्ञ आरंभिला; व सर्वदेवता व वसिष्ठ पहात असतां त्यांचे समक्ष त्या समर्थ विश्वामित्रानें त्रिशंकूला देहासकट स्वर्गावर[1] चढविलें. त्रिशंकूची कैकय वंशांतील सत्यरथानामक स्त्री होती, तिचे पोटीं हरिश्चंद्र नांवाचा अत्यंत निष्पाप असा एक पुत्र निपजला. या हरिश्चंद्राला त्रैशंकर असेंही म्हणत, व यानें राजसूय यज्ञ केल्यामुळें याला संम्राट् अशी पदवी मिळाली होती. हरिश्चंद्राला रोहित नांवाचा वीर्यवान् पुत्र झाला. या रोहितानें आपल्या सत्तेचा उत्कर्ष व्हावा म्हणून रोहितपुर म्हणून प्रसिद्ध नगर आहे, तें वसविलें. नंतर राजर्षी रोहितानें बहुत दिवस प्रजापालन करून राज्य भोगलें. भोगांतीं हा सर्व संसार असार आहे, असें त्याचे ध्यानीं येऊन त्यानें आपलें तें नगर ब्राह्मणांना देऊन टाकिलें. या रोहिताला हरित नांवाचा पुत्र होता. हरिताला चंचु नांवाचा पुत्र झाला. चंचूला पुढें विजय व सुदेव असे दोन पुत्र झाले. पहिल्याला विजय असें नांव पडण्याचें कारण त्यानें क्षत्रियमंडळावर जय मिळविला होता. या विजयाला अर्थशास्त्र व राजनीति यांत निपुण असा रुरुक नांवाचा पुत्र होता. रुरुकाला वृक नामक पुत्र झाला. वृकाला पुढें बाहुनामें पुत्र झाला. हा बाहु तसल्या धर्मयुगांत उत्पन्न झाला असूनही फारसा धार्मिक नव्हता. यामुळें शक, यवन, कांबोज, पारद व पल्हव यांचे साह्यानें हैहय व तालजंघ या क्षत्रियांनीं त्याला जिंकलें. बाहूला सगरनामें पुत्र झाला. याला सगर नांव पडण्याचें कारण असें झालें कीं, तो गर म्हणजे विषें[2] यासह जन्मास आला. विषप्रयोग केला असतां हा जिवंत कसा जन्मला याचें उत्तर

१ त्रिशंकूचा यावेळीं स्वर्गांत जाण्याचा हेतु कायमच स्वर्गवास करण्याचा नसून केवळ स्वर्गांतील मौजा पाहून परत येणें हाच होता.

२ याचे वेळीं याची आई गर्भार असतां तिच्या सवतीनें दुष्टाव्यानें तिला विष घातलें होतें.

असें आहे कीं, त्यावेळीं याची आई भृगुकुलोत्पन्न और्वऋषि याचे आश्रमांत गेली, व त्या ऋषीच्या कृपेनें ती व तिचा गर्भ दोन्हीही सुरक्षित राहिलीं. याच ऋषीपासून पुढें आग्नेयास्त्र प्राप्त होऊन त्याचे बळावर सगरानें सर्व पृथ्वी जिंकिली, हैहय व तालजंघ यांचा विध्वंस केला; व स्वतः धर्माभिमानी व धर्मवेत्ता असल्यामुळें शक, पल्हव व पारद यांचे धर्माचा उच्छेद केला.

## अध्याय चवदावा.

—:०:—

### सगरोत्पत्तिवर्णन.

जनमेजय विचारतोः—हे तपोधना, उदरांत विष गेलें असतां तो सगर त्या विषासह सजीव कसा जन्मला ? शकादिक हे क्षत्रिय असतांना व सगर हाही धर्मनिष्ठ असतांना त्यानें क्रोधावेशानें त्या क्षत्रियांचा धर्म म्हणजे एक प्रकारें स्वधर्मच उच्छिन्न केला हें कसें ? तें सर्व सविस्तर मला सांगा.

वैशंपायन सांगतातः—सगराचा बाप बाहूराजा हा फार व्यसनी निघाल्यामुळें, हे राजा, शकांच्या साहाय्यानें हैहय व तालजंघ यांनीं त्याचें राज्य हरण केलें. या कामांत यवन, पारद, कांबोज, पल्हव व खस, याही पांच गणांनीं हैहयाच्या साह्यार्थ शिपाईगिरी केली होती. राज्य हिरावल्यामुळें बाहूराजा रानांत चालता झाला. पाठोपाठ त्याची यादवी नांवाची गरोदर स्त्रीही चालत आली. हिला तिचे सवतीनें ती बाहेर पडण्याच्या अगोदरच विष घातलें होतें. ती पाठोपाठ आलेली पाहून राजाला अधिकच दुःख झालें; व त्या दुःखांत त्यानें प्राण सोडिले. तेव्हां देवी त्या वनांत भर्त्याची चिता रचून आपण चितेवर चढली. इतक्यांत भृगुकुलोत्पन्न और्वऋषि यांना दया येऊन त्यांनीं तिला फिरविलें व आपल्या आश्रमांत नेलें. तेथें ती प्रसूत होऊन त्यांचे कृपेनें तो गर्भ विषासहच सजीव उत्पन्न झाला. हाच तो महाबाहू सगर राजा. जन्म होतांच और्वानें त्याचें जातकर्मादि करून त्याला वेदशास्त्र पढविलें; आणि नंतर देवांना देखील असह्य असें महाघोर आग्नेयास्त्र दिलें. अगोदरच सगर जातीनें बलाढ्य होता व तशांत असल्या अस्त्राचें त्याला पाठबळ मिळालें. तेव्हां त्यानें संहारकर्ता रुद्र ज्याप्रमाणें जीवांना पटापट मारितो, त्याप्रमाणें रागाचे तडाक्यांत सर्व हैहयांस तत्काल मारून टाकिलें. त्यानें त्याची लोकांमध्यें फारच कीर्ति झाली. हैहयांना चीत केल्यावर यवन, कांबोज, पारद व पल्हव यांसह शकांचें निर्मूलन करण्याचे उद्योगास तो लागला. त्या महात्म्या वीरानें त्यांचेवर जेव्हां गहजब उडविला तेव्हां ते विवेकी वसिष्ठ मुनींना शरण येऊन त्यांचे पायां पडले. त्या वेळीं शरणागताचें रक्षण केलेंच पाहिजे, ही धर्ममर्यादा ध्यानीं आणून महातेजस्वी वसिष्ठांनीं त्यांना अभय दिलें, व सगराचें निवारण केलें. गुरूची आज्ञा व स्वतःची प्रतिज्ञा या दोन्ही सांभाळण्याची जेव्हां सगरावर पाळी आली, तेव्हां त्यानें शकादिकांचा नाश न करितां त्याऐवजीं त्यांचे धर्माचा नाश केला, व त्यांचेकडून वेषांतर करविलें तें असें. शकांचें अर्धें शीर मुंडून त्यांना सोडून दिलें व यवन आणि कांबोज यांचें सर्वच शीर मुंडून टाकिलें. पारदांकडून मोकळ्या जटा ठेवविल्या व पल्हवांकडून दाढ्या राखविल्या; व या सर्वांकडूनच वेदाध्ययन व वषट्कार हे हक्क काढून घेतले. त्याचप्रमाणें कोली, सर्प, माहिष, दीर्घ, चोल, केरल व शकादि पूर्वोक्त चार हे सर्व क्षत्रिय असतां वसिष्ठाचे सांगण्यावरून महात्म्या सगरानें त्यांचे धर्माचा उच्छेद केला. पुढें त्या धर्मविजयी राजानें खस, तुषार,

चोल, मद्र, किष्किंधक, कौंतल, वंग, साल्व व कौंकणक, या सर्वांस जिंकून अश्वमेधाची दीक्षा घेऊन अश्व मोकळा सोडिला. तो त्याचा मेधीय अश्व फिरत फिरत पूर्व-दक्षिण समुद्राच्या कांठाला पोंचला असतां कोणी पळविला, तो भूमीच्या तळाशीं नेला. तेव्हां त्या सगरानें आपले पुत्रांकडून ती जागा खणविली; व त्यांनीं जेव्हां समुद्रप्राय विशाळ असा अति खोल खड्डा खणिला तेव्हां ते शेवटीं अशा स्थळीं पोंचले कीं, तेथें सर्व सृष्टीचा पालक जो आदिपुरुष देवाधिदेव सर्वात्मा, ज्याला कृष्णही म्हणतात असा तो पुरुषोत्तम, कपिलाचे रूपानें निजलेला होता. यांचे खणण्याचे खडबडीमुळें तो जेव्हां जागृतीवर येऊन डोळे उघडूं लागला, तेव्हां त्याचे नेत्रांतून जें तेज उठलें त्या तेजानें चार वजा करून बाकीचे ते सर्वही ( साठ सहस्त्र ) सगरपुत्र जळून खाक झाले. चार उरले त्यांचीं नांवें:—बर्हकेतु, सुकेतु, धर्मरथ व शूरपंचजन. या चौघांनीं पुढें सगराचा वंश चालविला. सगर राजाला परमात्मा कपिलरूपी नारायणानें अनेक वर दिले, ते असेः—इक्ष्वाकूचा वंश अक्षय्य राहील, त्याच्या कीर्तीची पीछेहाट कधींही होणार नाहीं; प्रत्यक्ष समुद्र पुत्ररूपानें त्याच्या उदरीं जन्मेल; सगराला अक्षय्य स्वर्गवास मिळेल; त्याचप्रमाणें सगराचे जे पुत्र नेत्राच्या तेजामुळें भस्म झाले होते, त्यांनाही अखंड उत्तमलोकप्राप्ति होईल. इतके वर दिल्यावर समुद्रानें मूर्तिमान् होऊन त्या सगर राजाची अर्घ्यपूर्वक पूजा केली, व त्याबद्दल सगरानें त्याला आपलासा म्हणवून सागर असें नांव दिलें. नंतर समुद्राकडून त्याला त्याचा नाहींसा झालेला मेधीय अश्व परत मिळाला. नंतर त्या महायशस्वी सगरानें शंभर अश्वमेध केले. त्याच्या पुत्रांची संख्या साठ हजार होती, असें आमचे ऐकण्यांत आहे.

## अध्याय पंधरावा.

—:०:—

### सगरवंश चालू.

जनमेजय विचारतोः—हे वैशंपायना, सगराला शूर व पराक्रमी असे साठ हजार पुत्र झाले म्हणून आपण सांगितलें तर एकट्याला एवढी अतोनात संतति झाली तरी कशी ?

वैशंपायन सांगतातः—हे राजा, तपाचरणानें ज्यांचीं पातकें दग्ध झालीं होतीं अशा दोन स्त्रिया सगराला होत्या. त्यांपैकीं वडील ही विदर्भराजाची कन्या असून केशिनी[1] या नांवानें ती प्रख्यात होती. त्याची जी धाकटी स्त्री ती अरिष्टनेमी राजाची मुलगी असून ती अत्यंत धार्मिक होती, व रूपानें तर तिचे तोडीची दुसरी कोणी स्त्री पृथ्वींत नव्हती. हे जनपाला, और्वऋषीनें[2] या दोन्ही स्त्रियांना वर मागायला सांगितले, ते असे; एकीनें साठ हजार पुत्र घ्यावे व एकीनें वंश धारण करील असा एकच पुत्र घ्यावा. या दोहोंपैकीं आपले इच्छेप्रमाणें दोहों वरांतील कोणता तरी एक पतकरावा. असें और्वानें म्हटलें तेव्हां एक जी स्वभावाची लोभी होती ती म्हणाली, ‘ मला आपले शूर असे साठ हजारच पुत्र पाहिजेत;’ दुसरी म्हणाली, ‘ ज्याचे योगानें हा वंश अखंड राहणार आहे, असला तो एकच पुत्र मला पुरे .’ यावर और्वमुनींनीं तुमचे म्हणण्याप्रमाणें होईल, म्हणून त्यांना आशीर्वाद दिला. त्या गुणानें केशिनीला सगरापासून एकच पुत्र झाला, त्याचें नांव असमंजस असें ठेविलें होतें.

१ मत्स्यपुराणांत हीं नांवें भानुमती व प्रभा अशीं दिलीं आहेत.

२ म० पु० हा और्व अग्नि म्हटला आहे.

ह्याच पुढें पंचजन नांवानें मोठा प्रख्यात बलाढ्य राजा झाला. दुसरी[1] जी उरली, ती बियांनीं ठेंचलेला असा एक लांबचलांब दुधेभोपळा व्याली असें ऐकितों. या दुधेभोपळ्यांत तिळा-तिळाएवढे असे हे साठ हजार गर्भ होते. त्यांना सगरानें वेगळे वेगळे करून तुपाचे मडक्यांत घालून ठेविलें, व एकेका मडक्यावर एकेक याप्रकारें त्या गर्भांचे पोषणार्थ साठसहस्र दाया ठेविल्या. मग ते गर्भ वाढीस लागून क्रमाक्रमानें पूर्ण झाले, व दहा महिने भरतांच सर्व अवयव पूर्ण होऊन योग्य वेळीं घटांतून बाहेर आले. हे सर्वही दिसण्यांत मोठे फक्कड छोकरे होते व त्यांना पाहून सगरालाही प्रेमाचें मोठें भरतें आलें. हे राजा, याप्रमाणें भोपळ्याचे रूपानें गर्भ प्रकट होऊन त्यांतून हे इतके साठ सहस्र पुत्र निपजले; आतां समजलास? परंतु, मागें सांगितल्याप्रमाणें हे[2] कपिल-परमात्म्याच्या नेत्रतेजानें दग्ध झाले. तेव्हां केशिनीचा एकुलता एक जो असमंजस[3] किंवा पंचजन तोच राजा झाला. या पंचजनाला अंशुमान् नांवाचा वीर्यवान् पुत्र झाला. याला पुढें दिलीप नामक पुत्र झाला; या दिलीपाची खट्वांग या नांवानेंच जास्ती प्रसिद्धी आहे. हा खट्वांग राजा स्वर्गांतून[4] भूलोकीं आला व सूक्ष्मबुद्धि व ब्रह्मैक-भावना यांच्या बलानें चित्तैकाग्र्य करून एका मुहूर्तांत[5] स्वर्ग, मृत्यु, पाताल या तिन्ही लोकांचें ध्यानबलानें निरीक्षण करून हे सर्वही मिथ्या आहेत, खरें काय तें सर्व-व्यापि एक ब्रह्म आहे, असा निश्चय करून हा बुद्धिमान् राजा एका मुहूर्ताचे अवकाशांत मुक्त झाला. या दिलीपाला भगीरथ नांवाचा पुत्र झाला. हा मोठा कीर्तिमान्, भाग्यवान्, समर्थ व पराक्रमानें केवळ इंद्रतुल्य होता; यानें श्रीगंगेला स्वर्गांतून भूलोकीं आणून सागरास मिळविलें. या त्याच्या कृतीमुळें गंगा ही त्याची कन्या मानिली जाऊन त्या दिवसापासून तिला भागीरथी असें नांव वंशांचा इतिहास जाणणाऱ्या ज्ञात्यांनीं दिलें आहे. या भगीरथाला पुढें श्रुत नांवाचा पुत्र झाला; श्रुताला नाभाग नांवाचा मोठा धार्मिक पुत्र झाला, या नाभागाचे पोटीं अंबरीष जन्मला. हा अंबरीष सिंधुद्वीपाचा बाप झाला. सिंधुद्वीपाला पुढें अयुताजित् नामक पुत्र झाला; या वीर्यवान् अयुताजिताला ऋतुपर्ण नांवाचा मोठा यशस्वी मुलगा झाला. प्रसिद्ध नल राजाचा परममित्र व देवांच्या अक्षविद्येंत म्हणजे फांसे खेळण्यांत निपुण म्हणून जो ऋतुपर्ण तोच हा. या बलाढ्य ऋतुपर्णाला आर्तपार्णि नांवाचा पुत्र झाला. याचा मुलगा सुदास नामक झाला; हा सुदास इंद्राचा मोठा दोस्त होता. सुदासाला पुढें सौदास नामें पुत्र झाला, या सौदासालाच मित्रसह व कल्माषपाद[1] अशींही नांवें आहेत. या कल्माषपादाचा पुत्र सर्वकर्मा नांवानें विश्रुत आहे. सर्वकर्माला पुढें अनरण्य हा पुत्र झाला. अनरण्याचा पुत्र निघ्न. निघ्नाला अनमित्र व

---

१ दुसरी म्हणजे धाकटी, हिचें नांव ईलिनी होतें.

२ गताध्यायीं चार खेरीज बाकी दग्ध झाले असें लिहिलें आहे, परंतु येथें तसें नाहीं.

३ हा वृत्तीनें विरक्त असल्यानें मुद्दाम वेडे चाळे करी; म्हणून याला 'असमंजस' असें म्हणत.

४ देवांनीं याला युद्धांत साह्यार्थ स्वर्गास नेलें होतें, तेथून आल्यावर.

५ स्वर्गांत गेला असतां देवांना याचे साह्यानें जय मिळाला तेव्हां यानें मृत्युलोकीं माझें आयुष्य किती उरलें म्हणून पुसलें, तेव्हां एक मुहूर्त असें देव म्हणाले.

---

१ आपणास नरमांस वाढल्याबद्दल वसिष्ठ याला शाप देऊं लागले असतां आपला अपराध नाहीं असें पाहून यानेंही परत शापासाठीं आपलें ओंजळींत पाणी घेतलें होतें, पण तें त्याचे स्त्रीचे आड येण्यामुळें त्यानें शेवटीं आपलेच पायांवर टाकिलें, त्या योगानें त्याचे पाय काळे पडून त्याला 'कल्माषपाद' असें नांव पडलें.

रघु असे दोन राजर्षिश्रेष्ठ पुत्र होते. पैकीं अनमित्राला धर्मनिष्ठ व विद्वान् असा दुलिदुह नामक पुत्र झाला; या दुलिदुहाचा पुत्र दिलीप, हाच प्रसिद्ध श्रीरामचंद्राचा निपणजा. दिलीपाला रघु नांवाचा दीर्घबाहु पुत्र झाला; हा रघु मोठा बलाढ्य असून अयोध्येचा राजा झाला; रघूपासून अज झाला, अजापासून दशरथ, दशरथाचे पोटीं महायशस्वी धर्ममूर्ति श्रीरामचंद्र अवतरला; रामाला पुढें कुश पुत्र झाला. कुशापासून अतिथी, अतिथीपासून निषध, निषधाचा नल, नलाचा नभ, नभाचा पुंडरीक, त्याचे पुढें क्षेमधन्वा, क्षेमधन्व्याला प्रतापी देवानीक व देवानीकाला अहीनगु नामक बलाढ्य पुत्र झाला. या अहीनगूचा पुत्र सुधन्वा, सुधन्व्याचा अनल, अनलाचा धर्मनिष्ठ उक्थ. या उक्थाचा पुत्र वज्रनाभ, वज्रनाभाचा शंख. या शंखालाच ध्युषिताश्व अशी संज्ञा आहे. याचा पुत्र पुष्प, त्याचा अर्थसिद्धि, अर्थसिद्धीचा सुदर्शन, सुदर्शनापासून अग्निवर्ण, अग्निवर्णाला शीघ्र नामक पुत्र झाला. शीघ्राचा पुत्र मरु. हा मरु योगाभ्यासांत निमग्न होऊन कलापसंज्ञक द्वीपांत जाऊन राहिला. या मरूचा पुत्र सुप्रसिद्ध राजा बृहद्बल.

हे राजा, पुराणांत नल या नांवानें दोन राजे प्रसिद्ध आहेत. यांतील एक नल वीरसेनाचा पुत्र, व दुसरा नल तो इक्ष्वाकूचा वंश वाढविणारा. हे राजा, याप्रमाणें इक्ष्वाकु वंशांतले राजे प्राधान्यतः तुला सांगितले. विवस्वान् जो सूर्य त्याचे वंशांत हे अति तेजस्वी राजे होऊन गेले. प्रजेला पुष्टि देणारा जो भगवान् सूर्य त्याचा पुत्र जो वैवस्वत मनु ज्याला श्राद्धदेव असें म्हणतात, त्याची ही वंशावळ जो कोणी लक्षपूर्वक पठण करील त्याला संतति होऊन अंतीं विवस्वान् जो सूर्य त्याच्या रूपाला तो मिळेल; तसाच इहलोकींही तो निष्पाप सत्वसंपन्न व दीर्घायु होईल.

१ मुळांत प्रपितामह असा शब्द आहे, पण त्याचा अर्थ पणजा असा करून हिशोब जुळत नाहीं, कारण राम, दशरथ, अज, रघु व दिलीप या हिशोबानें दिलीप निपणजा होतो.

२ मत्स्य पु० अ० १२ श्लोक ४८ यांत रघु हा दिलीपाचा बाप म्हटला आहे.

## अध्याय सोळावा.

—:०:—

### पितृवर्णन.

जनमेजय विचारतोः—हे वैशंपायना, आपण मनुवंशानुकीर्तनें सांगत असतां विवस्वान् याला श्राद्धदेवही म्हणत असें सांगितलें; तर श्राद्धदेव ही संज्ञा विवस्वानाला कां प्राप्त झाली व श्राद्धाचा श्रेष्ठ विधि कोणता, हें, हे विप्रश्रेष्ठा, ऐकावयाची माझी इच्छा आहे; त्याचप्रमाणें पितर पितर म्हणतात ते कोण ? हे पहिल्याप्रथम कसे उत्पन्न झाले? त्याचप्रमाणें वेदवेत्ते ब्राह्मण, असें सांगतांना आम्हीं ऐकिलें आहे कीं, स्वर्गांत हे जे पितर म्हणून आहेत ते देवांचेही दैवत आहेत, हें कसें? तसेंच या पितरांचे कांहीं गण म्हणून सांगितले आहेत ते कोणचे ? या पितरांचें सामर्थ्य काय? आम्हीं येथें श्राद्ध करावें, त्यानें स्वर्गांत ते पितर कसे तृप्त होतात व तृप्त होऊन त्यांनीं तेथून आशिर्वाद दिले असतां त्या योगानें आमचें येथें कल्याण कसें होतें? हे सर्व प्रश्न व पितरांची एकूण उत्पत्ति या सर्वांचा उलगडा समजावा, असा हेतु आहे.

वैशंपायन म्हणतातः—बा जनमेजया, तुझा प्रश्न ऐकून मला फार आनंद झाला. ठीक आहे. तुला मीं पितरांची श्लाघ्य उत्पत्ति कशी झाली, आपण केलेल्या श्राद्धानें स्वर्गांत

पितर कसे संतुष्ट होतात व संतुष्ट झाल्यावर तेथून आमचें कल्याण कसें करितात, तें सांगतों ऐक. तूं जे हे कांहीं प्रश्न विचारतोस ते सर्व प्रश्न पितामह भीष्म शर-शय्येवर पडले असतां त्यांना धर्मराजानें विचारले होते. भीष्मांनींही तत्पूर्वी त्याच शंका मार्कंडेयाला विचारिल्या होत्या, व मार्कंडेयांचें त्याविषयीं समाधान सनत्कुमारांनीं केलें होतें, अशी या विषयाची परंपरा आहे; तेव्हां भीष्म-युधिष्ठिरांचा झालेला संवाद मी तुला सांगतों. युधिष्ठिरानें विचारिलें, 'हे भीष्मा, जर कोणाचे मनांत आपल्याला पुष्टी प्राप्त व्हावी असें असेल तर ती त्याला कशी प्राप्त व्हावी? व काय कर्म केलें असतां लोकांचा शोक दूर होईल, तें आपण मला सांगा; आपण धर्मज्ञ आहां, म्हणून मी आपल्याला विचारितों.' भीष्म म्हणतात, 'बा युधिष्ठिरा, पितरांचें श्राद्ध हें वाटेल तें तें फल देणारें एक अनुष्ठान आहे, म्हणून जो कोणी शुचिर्भूतपणानें व तत्परतेनें पितृश्राद्धें करून पितरांचा संतोष करितो तो श्राद्धकर्ता इहलोकीं व मरणोत्तर परलोकींही आनंदांत राहातो. हे राजा, ज्याला धर्मेच्छा असेल त्याला पितर धर्मबुद्धि देतात; ज्याला संततीची इच्छा असेल त्याला संतति देतात, व ज्याला पुष्टीची इच्छा असेल त्याला पुष्टि देतात.'

धर्मराज म्हणतोः—पितामहा, आपण हें म्हणतां खरें, पण जसें कर्म करावें तसें फल घ्यावें, हा कायदा सर्व प्राण्यांना सारख्याच नियमानें लागू असल्यामुळें कोणाचे पितर स्वर्गांत असतील तर कोणाचे नरकांतही असतील; मग जे स्वतःच नरकांत आहेत ते दुसऱ्याला पवित्र फल कोठून देणार? बरें, जो जो कोणी श्राद्ध करितो तो तो चांगल्याच फलाची इच्छा करितो व यासाठीं वारंवार श्राद्धकालीं लोक आपला पिता, पितामह व प्रपितामह या त्रयीच्या उद्देशानें पिण्ड देऊन श्राद्धें करीत असतात. हीं श्राद्धें पितरांना कशीं पोंचतात, व त्यांतील जर कांहीं नरकांत असले तर तेथून ते आपणास सत्फल कसें देऊं शकतात? ज्या वेळीं केव्हां पितर नरकांत असतील त्या वेळीं जें आपण यजन करितों तें अशाच पितरांचें किंवा त्यांऐवजीं दुसऱ्याच कोणाचें? शिवाय स्वर्गांतील देवही पितरांचें यजन करितात म्हणून आम्ही ऐकतों हें कसें? हे भीष्मा, आपण अत्यंत तेजस्वी आहां, करितां माझे हे सर्व प्रश्न पुरापूर उलगडून सांगा. आपली बुद्धि केवळ अलोट आहे, यास्तव येथें पितरांचे उद्देशानें केलेल्या श्राद्धानें इहलोकीं आपला बचाव कसा होतो?

भीष्म उत्तर करितातः—हे अरिमर्दना, पितर ते कोण, आपण ज्यांची पुजा करितों ते शिवाय कोण? या गोष्टींचा उलगडा पूर्वी एक वेळीं मी माझे परलोकनिवासी पित्याला श्राद्धसमयीं पिण्ड देण्यास उद्युक्त झालों असतां माझे पित्यानें समक्ष येऊन मला सांगितला आहे तो मी तसाचे तसाच तुला सांगतों; ऐक. चमत्कार असा झाला कीं, मी आपल्या सूत्र-ग्रंथांत सांगितल्या विधीप्रमाणें भूमीवर दर्भ आंथरून तेथें माझे पित्याचे उद्देशानें पिण्ड ठेवीत असतां एकाएकीं तेथील भूमि उकलली, व तींतून आमचे बाबा पूर्वी जिवंत असतां त्यांचा जसा बाहुभूषणें वगैरेनीं अलंकृत व रक्तवर्ण अंगुली व तल यांनीं युक्त सुंदर हस्त असे तसाचे तसा हात बाहेर आला, व 'या माझे हातावर पिण्ड दे' असे पित्याचे शब्द माझे कानीं आले. ते ऐकून मी चपापून म्हटलें, 'अरेरे, मी विचार न करितां दर्भावरच पिण्ड ठेवीत होतों' ही मोठी चूक होत होती. बाकी तेथें माझा तरी काय इलाज? बौधायन सूत्रांत जो

श्राद्धविधि सांगितला आहे त्यांत असा प्रत्यक्ष हात येतो असें कोठेंही सांगितलें नाहीं. असो, माझे हे बोल ऐकून व मीं दिलेला पिण्ड घेऊन माझा पिता प्रसन्न होऊन बहुत गोड शब्दांनीं मला म्हणाला, कीं, बाबारे, तुझेसारखा धर्मज्ञ व ज्ञाता सत्पुत्र माझे पोटीं आल्यानें मी इहपरलोकीं कृतार्थ झालों आहें. हे निष्पापा, तूं मोठा दृढव्रत आहेस असें पाहून या लोकांत (तुझे द्वारें) धर्माचे कामीं व्यवस्था लावावी म्हणून तूं जे आतां मला प्रश्न विचारिलेस ते प्रश्न विचारण्याची बुद्धि मींच तुझे ठिकाणीं उत्पन्न केली; कारण एक तर धर्माचे बाबतींत राजा जी गोष्ट प्रमाण धरून चालतो, तीच प्रमाण धरून प्रजाही राजाचें अनुकरण करितात; शिवाय जो कोणी धर्माचें रक्षण करितो त्याला प्रजांच्या सत्क्रियांचें चतुर्थांश फल मिळतें. त्याचे उलट जो मूर्ख राजा प्रजांचें धर्मरक्षण करीत नाहीं त्याला त्यांच्या पापाचा चतुर्थांश भोगावा लागतो; परंतु, हे भीष्मा, तूं अनादिसिद्ध चालत आलेले जे वेदधर्म तेच प्रमाण धरून चालला आहेस, हें पाहून मला तुजविषयीं निरुपम प्रेम उत्पन्न झालें आहे, व यामुळें मी तुजवर प्रसन्न होऊन केवळ आपखुषीनें तुला त्रैलोक्यांतही अन्यत्र न मिळणारा असा वर देतों, तो ऐक. 'तुझे मनांत जावत्काल जगावें असें असेल तावत्काल मृत्यूचा अंमल तुजवर चालणार नाहीं, तुझी जेव्हां परवानगी मिळेल तेव्हां मग मृत्यूचा शक तुझेवर चालू होईल, याशिवाय तुला आणखी कांहीं मागावयाचें असलें तर, हे भरतश्रेष्ठा, तुझे मनांत असेल तें निःशंक माग, मी द्यावयास तयार आहें.'

भीष्म म्हणतात:—हे युधिष्ठिरा, याप्रमाणें बाबा बोलले असतां मी त्यांस अभिवादन करून हात जोडून म्हटलें कीं, आपली अशी मजवर कृपा झाली त्या अर्थीं, हे पुरुषश्रेष्ठा, मी आज कृतकृत्य झालों; तथापि, मी आणखीही आपणापासून कांहीं मागून घेण्यास पात्र आहें असें ज्या अर्थीं आपण म्हणतां त्या अर्थीं आपण होऊनच मघाशीं ज्याचा अंशतः निर्देश केला होता तो प्रश्न मी आपणास सविस्तर पुसणार आहें. तेव्हां माझा धर्मनिष्ठ पिता मला म्हणाला, 'तुझ्या मनांत येईल तो प्रश्न मला खुशाल विचार, तूं वाटेल ती शंका काढ, तिचा उलगडा करण्यास मी समर्थ आहें.'

भीष्म म्हणतात:—बाबांचें हें बोलणें भूमीचे पोटांतूनच चाललें होतें. आपले बाबा पुण्यबलानें उत्तम लोकाला गेलेले आहेत, तेव्हां अशांच्या मुखांतून निर्णय ऐकण्याची संधी पुन्हा येणारी नाहीं असें वाटून मी मोठ्या कौतुकानें माझे बाबा भूमीचे आड असतां तशा स्थितींतच त्यांना प्रश्न केला. मीं म्हटलें 'आम्ही असें ऐकितों कीं, पितर हे देव आहेत व ते देवांनाही पूज्य आहेत, तेव्हां आम्ही जी श्राद्धकालीं पूजा करितों ती देवांची कीं पितरांची, कीं आणखी कोणाची? आम्ही येथें श्राद्ध करावें त्यानें परलोकीं गेलेले पितर तृप्त कसे होतात, किंवा श्राद्धाचें फल तरी काय? देव, मनुष्य, दानव, यक्ष, उरग, गंधर्व, किन्नर व नाग हे सर्वच पितृश्राद्ध करितात, तेव्हां हे कोणाची पूजा करितात म्हणावें? या बाबतींत मला मोठा जबरदस्त संशय आहे व तो निवृत्त करून घेण्याची उत्कंठाही अतिशय आहे. बाबा, माझे मतानें आपण धर्मज्ञ, नव्हे सर्वज्ञच आहां; याकरितां हा माझा संशय दूर करा.'

हें भीष्माचें वाक्य ऐकून त्याचा पिता शंतनु म्हणाला, 'हे वत्सा, पितर मूळ कसे उत्पन्न झाले, श्राद्धांत त्यांना दिलेल्या अन्नाचें फळ आपणास कसें मिळतें व पितरांचें श्राद्ध करण्याचें कारण काय? इत्यादि जे प्रश्न तूं मला

केले आहेस त्यांचें थोड्यांत उत्तर देतों तें स्वस्थ मनानें ऐक. ( हे जे पितर म्हणून म्हणतात ते मृत्युलोकीं मरण पावून परलोकीं गेल्यावर किंमतीस चढलेले लोक असा तला अर्थ नव्हे. ) हे पितर म्हणजे आदिदेव जो ब्रह्मदेव त्याचे पुत्रच होत; व यांची याच उद्देशानें स्वतंत्र सृष्टि व यांचा स्वर्गांतही मान मोठा आहे; कारण तेथेंही यांस देवता म्हणून समजतात; व देव, असुर, मनुष्य, यक्ष, सर्प, गंधर्व, किन्नर, नाग, इत्यादि सर्व लोक ज्यांचें यजन करितात, ते हेच पितर. श्राद्धकालीं अन्नादि दानानें यांचें आप्यायन झालें म्हणजे ते उलट जगताला आप्यायित (संतुष्ट) करतात, अशी खुद्द ब्रह्मदेवाची सांगी आहे. यास्तव, हे महाभागा, असे जे हे पितर त्यांचें तूं निरलसपणें उत्कृष्ट श्राद्धविधीनें यजन कर. म्हणजे ते तुझें वाटेल त्या रीतीनें कल्याण करितील. कारण जो जें इच्छील तें फल देण्याचें त्यांचे अंगीं सामर्थ्य आहे. आमचे विशिष्ट नामगोत्रादिकांचा उच्चार करून तूं या पितरांचें आराधन केलेंस म्हणजे आम्हीं स्वर्गांतही असलों तरी ते पितर तेथें आमचें संतर्पण करितील; एवढें मीं तुला सांगितलें. आतां उरलेलें सारें, आज येथें श्राद्धासाठीं बोलाविलेले हे मार्कंडेयऋषि तुला सांगतील. हे मार्कंडेयऋषि मोठे पितृभक्त असून आत्मज्ञानी आहेत, व यांनीं आज जें आपल्या येथें श्राद्धाचें आमंत्रण घेतलें तें मजवर अनुग्रह करण्यासाठींच, असें मी समजतों; याकरितां तुला जें कांहीं विचारणें असेल तें या समर्थांना विचार.' असें सांगून आमचे बाबा तेथेंच गुप्त झाले.

~~~~~~~~~~



# अध्याय सतरावा.

—:०:—

## पितृभक्तिवर्णन.

भीष्म सांगतातः—नंतर बाबांच्या या आज्ञेवरून मीं पूर्वीं खुद्द बाबांना जे प्रश्न विचारले होते, तेच प्रश्न एकाग्रचित्त करून मार्कंडेयांना विचारले; तेव्हां ते महातपस्वी व धर्मात्मा मार्कंडेय मला म्हणाले, 'बा भीष्मा, तूं निष्पापच आहेस, तरीही विशेष शुद्धचित्त ठेवून ऐक म्हणजे तुझ्या शंकांचीं सविस्तर उत्तरें सांगतों. बाबारे, मी अत्यंत दीर्घायु[1] आहें, पण हें दीर्घायुत्व मला पितरांचे प्रसादानेंच मिळालें आहे व आजपर्यंत माझा जो जगतांत एवढा मोठा लौकिक झाला, त्याचेंही मूळ पितृभक्तिच होय. आतां मला पितरांच्या उत्पत्तीचें ज्ञान कोठून झालें तें ऐक. सहस्रावधि वर्षें चालणारा जो युगांतकाल त्या समयीं मी मेरु पर्वतावर राहून अत्यंत दुश्चर असें तप करीत होतों. तप करितां करितां एक दिवस असा चमत्कार झाला कीं, मेरु पर्वताचे उत्तर बाजूनें ज्याच्या तेजानें दाही दिशा उजळून गेल्या आहेत असें एक अत्यंत विस्तीर्ण दिव्य विमान पर्वतावर येऊन उतरलें. त्या विमानांत एक पलंग टाकलेला होता व त्या पलंगावर केवळ सूर्याप्रमाणें जाज्वल्य असा एक उग्र तेजाचा पुरुष मीं निजलेला पाहिला. आकारानें हा पुरुष फार मोठा नव्हता, तर केवळ आंगठ्याएवढा होता; पण त्याचें तेज इतकें गाढ होतें कीं, तो केवळ आगीची ज्योतच दिसे व तसल्या तेजस्वी विमानांत असला पुरुष म्हणजे अग्नीचे ठिकाणींच अग्नि ठेविल्याप्रमाणें दिसत होता. असो; मीं विमानांत बसलेल्या त्या समर्थ पुरुषाला शिरसाष्टांग वंदन करून प्रश्न केला कीं,

[1] मार्कंडेयाला मूळ सोळा वर्षेंच आयुष्य होतें, परंतु तो पुढें दीर्घायु झाला, हें सर्वांस माहीतच आहे.
~~~~~~~~~~

'हे विभो, आपल्याकडे आमची नजर देखील आपले तेजामुळें धजत नाहीं; तर आपल्या स्वरूपाचें सम्यक्ज्ञान आह्मांस कसें व्हावें? माझे अल्पमतीला असें वाटतें कीं, 'आपण तपोबलानें निर्माण झालेले केवळ शुद्धसत्त्वात्मक देवांचेंही दैवत आहां.' हे माझे शद्ब ऐकून हंसून ते धर्मात्मे म्हणाले, 'बाबारे, तूं निर्मळ आहेस खरा; तथापि ज्या अर्थी माझे स्वरूपाचा सम्यक्बोध होत नाहीं, त्या अर्थी तूं तपश्चर्या चांगले प्रकारें केली नाहींस.' असें बोलून त्यांनीं तत्क्षणीं आपलें रूप बदललें, व असा कांहीं अत्युत्तम पुरुषाचा आकार घेतला कीं, तशा आकाराचा सुंदर पुरुष मीं पूर्वी कधींही पाहिला नव्हता.

सनत्कुमार (हा पुरुष म्हणजेच सनत्कुमार) म्हणाले, "बाबारे, सर्वशक्तिमान् जो ब्रह्मदेव त्याचा मी फार जुनाट मानसपुत्र आहें. तूं तर्क केलास त्याप्रमाणें मीही तपोबलानेंच निर्माण झालों असून शुद्धसत्वात्मक आहें. हे भार्गवा, पूर्वीपासून देवमंडळांत सनत्कुमार म्हणून ज्याचें नांव कानीं येत असतें तोच मी आहें. वत्सा, तझें कल्याण असो. तुझी कोणती इच्छा मीं पूर्ण करावी हें सांग. ब्रह्मदेवाचे जे दुसरे सात दुर्धर्षपुत्र आहेत ते सर्व माझे धाकटे भाऊ. त्यांचे वंश सृष्टींत चालू आहेत. त्यांचीं नांवें ऋतु, वासिष्ठ, पुलह, पुलस्त्य, अत्रि, अंगिरा व मरीची. या सर्वांचें देवगंधर्वही पूजनसेवन करितात, व हे सातजण आपले तपोबलानें त्रैलोक्याचें रक्षण करितात. मी या भानगडींत पडत नाहीं. मीं प्रजोत्पादन व ऐहिक इच्छा यांना फांटा देऊन यतिधर्म स्वीकारिला आहे; व चित्ताचा आत्मरूपाचे ठिकाणीं लय करून सर्वदा स्वरूपीं रममाण असतों. मी उत्पन्न झालों तेव्हां शरीरानें व मनानें जसा बाल किंवा कुमाररूप होतों तसाच इतकीं युगें लोटलीं तरी अजून आहें. व या कारणानें मला सनत् म्हणजे निरंतर कुमार म्हणजे बालरूप, या अर्थानें सनत्कुमार हेंच नांव पडलें आहे. माझें दर्शन व्हावें या इच्छेनें तूं भक्तिपूर्वक माझें आराधन केलेंस, त्या योगानें हा मी तुझ्या दृष्टीस पडलों आहें. 'तुझा कोणता हेतु मी पूर्ण करूं तें सांग.' हे भीष्मा, याप्रमाणें सनत्कुमारांनीं मला आज्ञा केली असतां, पितरांची उत्पत्ति व श्राद्धाचें फल, यांसंबधीं तूं जे आज मला प्रश्न केलेस तेच मीं प्रसन्न झालेल्या त्या भगवंताला केले, व त्या दिव्य पुरुषानें माझे संशय दूर केले. त्याचा माझा संवाद बहुत वर्षे झाल्यानंतर सनत्कुमार मला म्हणाले कीं, हे विप्रर्षे, तुझ्या प्रश्नानें मी फार संतुष्ट झालों आहें, तेव्हां या पितरांच्या संबंधीं मूळपासूनची कच्ची हकीकत मी तुला सांगतों ऐक. हे आपलें ( ब्रह्मदेवाचें ) आराधन करितील या संकल्पानें ब्रह्मदेवानें देव निर्माण केले. परंतु ब्रह्मदेवाला एका बाजूला सोडून ते लोभी देव आपल्यालाच फल मिळावें, या उद्देशानें यजन करूं लागले. तें पाहून ब्रह्मदेवानें त्यांस शाप दिला. त्यामुळें त्या सर्व देवांची अक्कल नाहींशी होऊन ते केवळ मूर्ख बनले. त्यांना जेव्हां कांहीं कळेना कीं वळेना, तेव्हां त्यांचें अनुकरण करणारे लोकही मूढ झाले. शेवटीं शापाचे तडाक्यांत सांपडलेले ते सर्व देव पितामहाला वारंवार नमन करून लोकानुग्रहार्थ विनवूं लागले. तेव्हां ब्रह्मदेव त्यांना म्हणाला, 'तुम्ही माझी पूजा न करितां आपलीच पूजा चालविली हा तुम्हांकडून मोठा व्यभिचार झाला आहे; याकरितां तुम्हाला प्रायश्चित्त केलें पाहिजे. तें प्रायश्चित्त इतकेंच कीं, तुम्ही आपल्या पुत्रांची प्रार्थना करा म्हणजे ते

१ मार्कंडेय हा भृगुकलोत्पन्नच होता.

तुम्हाला अक्कल शिकवितील आणि तुम्ही शुद्धीवर याल. ब्रह्मदेवानें जेव्हां याप्रमाणें त्यांना निक्षून सांगितलें तेव्हां त्या लघुत्वामुळें ते अंतर्यामीं व्यथित झाले; परंतु निरुपायामुळें ते ब्रह्मदेवाचे आज्ञेप्रमाणें कृतदोषाचे प्रायश्चित्तार्थ म्हणून, दीन होऊन, आपले पुत्रांस उपाय पुसते झाले. त्या वेळीं पुत्रांनीं चित्तनिरोध करून ध्यानपूर्वक अंतर्यामीं शोध केला व त्यांना सांगितलें कीं, "बापहो, प्रायश्चित्तें एकच प्रकारचीं नाहींत. धर्मरहस्यांत जे निपुण आहेत, ते काया, वाचा आणि मन या तीनही साधनांनीं नित्य प्रायश्चित्तें केलीं पाहिजेत, असें सांगतात; व स्वतःही ते याप्रमाणेंच नित्य करीत आले आहेत." याप्रमाणें पुत्रांनीं कानउघाडणी करून प्रायश्चित्तांचें महत्व व रहस्य सांगतांच त्या देवमंडळीची अक्कल ताळ्यावर आली. त्या वेळीं त्यांचे पुत्रांनीं त्यांना "बरें आहे; तुमचें काम झालें, त्या अर्थीं 'पुत्रहो' तुम्ही आलेत तसे परत जा" असा निरोप दिला. तेव्हां आपले पोरगे उलट आपणासच 'पुत्रहो' म्हणून (एखाद्या उन्मत्ताप्रमाणें) बोलले, हा प्रकार काय ? हा आपला अपमानच नव्हे काय ? ह्याचा उलगडा करून घ्यावा, अशा बुद्धीनें ते पुनः ब्रह्मदेवाकडे आले. त्यांचें गाऱ्हाणें ऐकून ब्रह्मदेवानें उत्तर केलें, 'तुमचे पोरगे तुम्हाला पुत्रहो म्हणाले तें हिशोबीच म्हणाले. हें तुम्ही आपणांस ब्रह्मवादी म्हणजे श्रुतिज्ञ म्हणवीत असून तुम्हाला कसें कळत नाहीं? "यस्तानि विजानात्सपितुः पिता सत्" अशी एक श्रुति आहे, ती तुम्हाला माहीत आहेना ? तिचा अर्थ काय बरें ? ज्ञानी पुत्र हा आपल्या पित्याचाही पिता आहे. तुम्ही त्यांना शरीर दिलें या कारणानें तुम्ही त्यांचे पिते व ते तुमचे पुत्र हा न्याय जसा खरा आहे, तसाच, त्यांनीं तुम्हांला ज्ञान दिलें यामुळें ते तुमचे बाप व तुम्ही त्यांचे पुत्र, हाही न्याय तसाच खरा आहे. सारांश, तुम्ही एकमेकांचे बाप व एकमेकांचे पुत्रही आहांच आणि म्हणून तुमचे पोरांनीं तुम्हांला "पुत्र हो" म्हणून म्हणण्यांत अन्याय किंवा अपमान कोठेंच नाहीं."

याप्रमाणें ब्रह्मदेवानें समजूत घालतांच ते स्वर्गवासी देव आपले पुत्रांकडे परत जाऊन त्यांस मोठ्या प्रेमानें म्हणाले, "बापहो, ब्रह्मदेवानें आमची समजूत घातली; तीवरून तुम्ही आमचे ज्ञानदाते अतएव एका अर्थीं आमचे बापच आहां. हा न्याय आम्हांस पटला व आमचा सर्व राग जाऊन, हे धर्मज्ञहो, आम्ही प्रसन्न झालों आहों, तर तुमची काय इच्छा आहे, आम्ही तुम्हांस कोणता वर द्यावा तें सांगा. तुम्ही आम्हाला जें 'पुत्रहो' म्हणून संबोधिलें तें यथार्थ आहे. त्यांत कांहीं चूक नाहीं. आतां तुम्ही ज्या अर्थीं आम्हांला 'पुत्र' म्हणून म्हटलें आहे त्या अर्थीं आम्ही आतां तुम्हास "पितर" ही कायमची संज्ञा देतों. नाग, दानव, राक्षस, इत्यादिकांपैकीं कोणीही श्राद्धकालीं आपल्या गत पितरांच्या उद्देशानें ज्या ज्या क्रिया करील, त्या त्या फलद्रूप होतील. त्या अशा कीं, श्राद्धीय अन्नादिकानें तुम्ही प्रथम संतुष्ट झालां म्हणजे तुमचे द्वारानें श्राद्धकर्त्याचे पितर तृप्ति पावतील व त्या पितरांचे द्वारें पितरांची शाश्वत देवता जी सोम (चंद्र) त्याला पुष्टि येईल. याप्रकारें श्राद्धक्रियांनीं सोम पुष्ट झाला म्हणजे तो स्थावरजंगम वस्तूंनीं व्यापलेलें हें समुद्रारण्यपर्वतमय जें जगत् त्याला (आपल्या किरणांनीं) पुष्टि देईल. आपणास पुष्टि प्राप्त व्हावी, या उद्देशानें जे कोणी गृहस्थ पितृश्राद्धें करितील त्यांस पितर (तुम्ही) सदैव संतति व पुष्टि देतील. त्याचप्रमाणें जो कोणी आपल्या स्वतःचे पित-

रांच्या नामगोत्राचा स्पष्ट उच्चार करून श्राद्ध-कालीं तीन पिंड देईल, त्याचे पितर आपल्या कर्मगतीमुळें कोणत्याही योनींत व कोणत्याही स्थळीं असले तरी तुम्ही त्या श्राद्धकर्त्यानें केलेल्या दानानें प्रसन्न होऊन त्याचे तीन पूर्वजांस संतुष्ट कराल." ही कामगिरी तुम्हीं करावी, अशी परमेष्ठी ब्रह्मदेवानें पूर्वींच आज्ञा दिली होती, ती आज तुम्हांस कळविली आहे. तर हे देवहो, ती तुम्हीं खरी करावी, व आपण इत-उत्तर परस्परांचे बापही आहों व लेंकही आहों, असें मानून प्रेमानें चालूं.

सनत्कुमार म्हणतातः—आतां ते देवच पितर कसे व पितरच देव कसे आणि परस्पर तेच पितर कसे, पितर आणि देवही कसे, हें कोडें उलगडलें ना ?

## अध्याय अठरावा.

—:०:—

### श्राद्धफलकथन.

मार्कंडेय म्हणतातः—हे भीष्मा, अत्यंत तेजस्वी, केवळ देवांचाही देव शोभेल अशा सनत्कुमारानें आतां सांगितल्याप्रमाणें पितरांचा इतिहास मला समजाविला असतां मला पुनरपि कांहीं शंका आल्या त्या मीं अरिनिहंत्या चिरंजीवी भगवान् सनत्कुमारापासून पुनरपि उलगडून घेतल्या; त्यांची हकीकत, हे गंगापुत्रा, मी तुला मुळापासून सर्व सांगतों, ती समजून घे. मीं त्या सनत्कुमारास विचारलें कीं, आपण मला देव हेच पितर व पितर हेच देव होत व ते पितर सोमाला पुष्टि देतात, इत्यादि सांगितलें; पण असे हे जे पितृगण त्यांची संख्या किती आहे व ते कोणते लोकांत राहातात तें मला सांगावें. या प्रश्नावर सनत्कुमारांनीं उत्तर केलें कीं, हे याजकश्रेष्ठा, स्वर्गांत राहाणाऱ्या या पितरांचे गण आहेत; त्यांपैकीं चौघे[1] मूर्तिमान् म्हणजे शरीरी आहेत व तीनें[2] अमूर्तिमान् म्हणजे अशरीरी आहेत. हे तपोधना, त्यांचें वसति-स्थान, त्यांची उत्पत्ति, पराक्रम व महत्व हीं सविस्तर सांगतों तीं ऐक. या सातांपैकीं जे अमूर्त म्हणून पितृगण सांगितले त्यांचे वसति-स्थानाला सनातनलोक असें म्हणतात. हे पितृ-गण मोठे देदीप्यमान असून ते सर्व प्रजापतीचे पुत्र होत. या गणांतील वैराज नांवाचे जे पितृगण आहेत ते विराज प्रजापतीचे पुत्र म्हणून प्रख्यात आहेत. यांचें देवगण शास्त्र-विहित कर्मानें आराधन करीत असतात. हे पितर म्हणजे प्रथम योगभ्रष्ट तपस्वी असतात. योगाची पूर्णता न झाल्यामुळें हे मुक्तीस न जातां केवळ सनातन ब्रह्मलोकास मात्र जातात. तेथें एक सहस्र युगेंपर्यंत प्रजाप्रतीसह वास करून पुढील कल्पाचे आरंभीं सनकादिक रूपानें ब्रह्मदेवापासूनच उत्पन्न होतात. मग यांस पूर्व-जन्मांतील स्मृति प्राप्त होऊन पूर्वजन्मीं अपूर्ण स्थितींत राहिलेल्या अप्रतिम सांख्य योगाच्या अभ्यासाला ते लागतात, व अखेरीस त्यांचा योग पूर्णतेस जाऊन ते सिद्ध ब्रह्मज्ञानी होतात व नंतर जेथून पुनरावृत्ति नाहीं अशा शाश्वत-पदाला पोंचतात. हे मार्कंडेया, हे पितृगण इहलोकीं जे कोणी नवीन उमेदवार योगाभ्यासा-विषयीं यत्न करीत असतात त्यांच्या योग-सिद्धीला हे साहाय्य करितात, व हेच आपल्या योगबलानें प्रथम सोमाला पुष्टि आणीत असतात. याकरितां हे जे योगी पितृगण यांचे उद्देशानें विशेषेंकरून श्राद्धें केलीं पाहिजेत. सोमाची

---

१ सुकाल, आंगिरस, सुस्वधा व सोमप हे चौघे, यांना कर्मप्रभावानें दिव्य देह मिळालेले आहेत.

२ वैराज, अग्निष्वात्त व बर्हिषद हे तीन गण अमूर्त आहेत, त्यांना निश्चितसें रूप नाहीं. जेव्हां जें वाटेल तें रूप ते घेऊं शकतात.

वृद्धि करणारे जे महात्मे त्यांची ही पहिली पिढी होय. यांना मेना नांवाची एक मानस-कन्या झाली. ही गिरिश्रेष्ठ जो हिमालय त्याची पत्नी. हिला हिमवानापासून झालेल्या पुत्रास मैनाक असें म्हणतात. त्या मैनाकाचा पुत्र मोठा शोभिवंत व नानारत्नांनीं युक्त असा क्रौंच नांवाचा महापर्वत होय. मैनाक पुत्राशिवाय शैलराजा जो हिमालय त्यानें आपल्या मेना स्त्रीचे ठिकाणीं अपर्णा, एकपर्णा व एकपाटला या नांवांच्या तीन कन्या उत्पन्न केल्या. या तिन्ही कन्यांनीं देव व दानव यांनाही दुश्चर असें घोर तप करून त्रैलोक्यांतील स्थावर-जंगम सृष्टीस त्राही त्राही करून सोडिलें. यांपैकीं एकपर्णा नांवाची जी कन्या होती ती वनस्पतीचें एकच पर्ण भक्षण करून रहात असे. दुसरी एकपाटला ही पाटल वृक्षाचें एक पुष्प खाऊन राही. तिसरी जी अपर्णा ती मात्र कधींही खात नसे. तो तिचा तीव्र नियम पाहून तिची आई जी मेना तिचें मातृप्रेमामुळें आंतडें पिळे व ती आपल्या घोर तप करणाऱ्या मुलीला 'उ मा' म्हणजे अगे असें करूं नको म्हणून वारंवार निवृत्त करण्याविषयीं यत्न करी. पुढें आईच्या 'उमा' 'उमा' अशा वारंवार शब्दोच्चारामुळें त्या सुंदर मुलीला त्रैलोक्यांत उमा असेंच म्हणूं लागले व हिची योगनिष्ठेविषयींही सर्वत्र फार ख्याति झाली. हे भार्गवा, या जगतांत या तीन कुमारी सदैव राहावयाच्याच. या सर्वही बहिणी आपलें शरीर सर्वदा तपश्चर्येच्या कामीं लावणाऱ्या, योगबलानें युक्त व ब्रह्मवेत्त्या असून सर्वही ऊर्ध्वरेत्या[1] आहेत. या तीन बहिणींपैकीं वयानें वडील, योग्यतेनें श्रेष्ठ, रूपकांतीनें अप्रतिम व योगबलानें वरिष्ठ अशी जी उमा ती देवाधिदेव जो शंकर त्याचे पदरीं पडली. दुसरी जी एकपर्णा ती बुद्धिमान् महात्मा, योगाचार्य, जो असितकुलोत्पन्न देवल त्याला दिली, व एकपाटला ही जैगीषव्याला दिली. उमेच्या या दोघीही बहिणी तिचेप्रमाणेंच महा भाग्यवान् असून योगनिष्ठांच्याच पदरीं पडल्या.

मरीचिप्रजापतीचे पुत्र जे अग्निष्वात्त[1] नांवाचे पितर आहेत ते सोमपद या नांवानें प्रसिद्ध असलेल्या लोकांत राहातात. हे सर्वही अपारतेजस्वी आहेत. देवही यांचें संतर्पण करितात. यांना अच्छोदा नदी ही मानसकन्या होती. हिजपासूनच अच्छोद[2] नांवाचें जें परम रमणीय विख्यात सरोवर आहे तें निर्माण झालें. हिनें आपले पितर पूर्वीं कधींही पाहिले नव्हते आणि यामुळें पुढें जेव्हां ते अमूर्त स्थितींत तिच्या दिव्यदृष्टीला आढळले तेव्हां आपण ज्यांच्या मनोबलानें उत्पन्न झालों तेच हे म्हणजे हे आपले पितर हें त्या शुचिस्मितेच्या लक्षांत आलें नाहीं व यामुळें ती सुंदरी

१ वीर्यबिंदूचा निरोध करणाऱ्या. योगशास्त्रांत वज्रोली या नांवाची एक मुद्रा सांगितली आहे, त्या मुद्रेच्या अभ्यासानें स्त्री किंवा पुरुष हीं रतिकालीं आपआपल्या वीर्याचें पतनापूर्वींच आकर्षण करून टाकतात व प्रतिपक्षानें कितीही यत्न केला तरी आपला बिंदुपात होऊं देत नाहींत व कदाचित् चुकून झालाच तर प्रतिपक्ष्याच्या इंद्रियांतून तो आकर्षण करून पुन्हा ठिकाणीं स्थापूं शकतात. वज्रोली-मुद्रेचा अभ्यास करणाऱ्या योग्याच्या शरीराला उत्तम सुवास येऊं लागतो, व त्याला जरा-मृत्यूचें भय उरत नाहीं. योगनिपुण स्त्रियाही या मुद्रेच्या बलानें आपलें रज पुरुषाला खेंचूं देत नाहींत. सारांश, स्त्री व पुरुष हीं दोघेंही ऊर्ध्वरेता होऊं शकतात. ऊर्ध्वरेत्या स्त्रीपुरुषांना पुराणकालीं किती मान असे याची साक्ष तर्पणांतील "ऊर्ध्वरेतसस्तर्पयामि" या शब्दांकडे लक्ष दिलें असतां कळून येईल.

१ म्हणजे अग्नीनें साध्य जीं पित्र्यादि इष्टिकर्में त्यांत ज्यांचें ग्रहण केलें जातें ते.

२ या सरोवराचें नांव बाणभट्टानें आपले कादंबरींत घेतलें आहे.

खुद्द आपल्या पितरांना पाहात असूनही अज्ञानामुळें त्यांना परपुरुषाप्रमाणें लाजली, व अद्रिका नामक अप्सरेला बरोबर घेऊन विमानांत बसून स्वर्गलोकांत फिरत असणाऱ्या अमावसु नांवाच्या आयूच्या यशस्वी पुत्राला पाहून मोहित झाली. खरें पाहातां हा वसु किंवा अमावसु आकाशगामी पितरांपैकीं एक असतां हिनें त्यावर लोलुप होऊन त्याजविषयीं कामवासना धरिली; व या पातकामुळें म्हणजे भलत्याचीच कामार्थ प्रार्थना केल्यामुळें ती योगापासून भ्रष्ट होऊन स्वर्गांतून पतन पावली. खालीं पडतां पडतां वाटेंत तिला परमाणूहूनही सूक्ष्म आकाराचीं अशीं तीन विमानें दिसलीं; व त्यांत अग्नींत असलेल्या विस्तवाचे ठिणगीप्रमाणें अव्यक्त व अत्यंत सूक्ष्म अशा स्वरूपाचे तिचे खरे पितर तिच्या दृष्टीस पडले. तेव्हां लज्जेनें खालीं मान घालून दु:खित होत्साती ‘ मला तारा, मला तारा ’ असें म्हणूं लागली. त्या वेळीं तूं ‘ भिऊं नको, भिऊं नको ’ अशा शब्दांनीं तिला आश्वासन दिल्यामुळें ती तशीच आकाशांत थबकून राहिली. नंतर मोठ्या दीनवाणीनें तिनें पितरांची प्रार्थना करून त्यांना प्रसन्न करून घेतलें, तेव्हां ते मर्यादोल्लंघन केल्यामुळें ऐश्वर्यापासून भ्रष्ट झालेल्या स्वकन्येला म्हणाले, ‘ हे शुचिस्मिते, तूं ज्याअर्थीं स्वदोषामुळें ऐश्वर्यभ्रष्ट झाली आहेस त्या अर्थीं तुला मृत्युलोकीं गेलेंच पाहिजे. कारण असा नियम आहे कीं, स्वर्गांत राहाणारे जे देव त्यांचे कर्मांचीं फळें त्यांना तत्काल व त्याच शरीरांत म्हणजे ज्या शरीरांकडून तीं कर्में केलीं गेलीं असतील त्या शरीरांतच मिळतात. परंतु, मनुष्यलोकांतील नियम वेगळा आहे. त्या लोकांत केलेल्या कर्मांचीं फळें मरणोत्तर प्राप्त होतात. यासाठीं, हे कन्ये, तूं आतां मृत्युलोकीं जाऊन तेथें तपश्चर्या करून नंतर मरण पावशील. तेव्हां पुन्हा येथें येऊन तुला तपाचें फल भोगावयास मिळेल. करितां तूं संतोषानें मृत्युलोकीं जा. याप्रमाणें पितरांनीं सांगितलेली गोष्ट ऐकून तिनें संतोष पावून त्यांची कृपा संपादिली. तेव्हां ते सर्व दयार्द्र होऊन त्यांनीं ध्यानस्थितींत पुढें अवश्य होणारी गोष्ट कोणती ती ध्यानीं घेऊन मोठ्या प्रसन्न चित्तानें तिला म्हणाले कीं, हे मुली, तुझें ज्यावर मन गेलें होतें तो महात्मा अमावसु पृथ्वीवर मनुष्ययोनींत राजकुलांत उत्पन्न झाला आहे. त्याची तूं कन्या होशील व तो जन्म पुरा झाला म्हणजे पुन्हा या दुर्लभ लोकाला प्राप्त होशील. मृत्युलोकांत असतां तूं पराशर मुनींचा वारस असा एक पुत्र प्रसवशील. तो मोठा ब्रह्मर्षी होईल व आजकाल जो एकच एक अखंड वेद आहे त्याचे तो भाग करून चार वेद करील. पराशराला अशा लक्षणांचा पुत्र देऊन नंतर तूं पूर्वजन्मींचा जो महाभिष नांवाचा राजा तो सांप्रत मृत्युलोकीं, शंतनु नांवाचा राजा झाला आहे. त्याची तूं स्त्री होऊन त्याला विचित्रवीर्य नांवाचा एक धर्मनिष्ठ पुत्र व चित्रांगद नांवाचा आणखी एक सुलक्षणी पुत्र, असे दोन पुत्र देऊन नंतर तूं पुन्हा या लोकास येशील. तूं पितरांची अमर्यादा केलीस यास्तव तुला वाईट जन्म प्राप्त होईल. तूं अमावसूचीच कन्या होशील व तीही अद्रिका नामक जी अप्सरा त्याजबरोबर होती, तिच्याच पोटीं येशील; व तूं अठ्ठाविसाव्या चौकडींत जें द्वापरयुग त्या युगांत एका मत्स्याच्या उदरांतून बाहेर येशील. पितरांनीं याप्रमाणें तिला सांगितल्यावर ती अच्छोदा मत्स्यीच्या पोटीं येऊन धीवरकुलांत प्रगट झाल्यानें ती लोकांत धीवरकन्या म्हटली गेली; व पुढें त्या धीवरानें ती वसुराजाला नजर केल्यामुळें ती त्याही राजाची कन्या मानली गेली.

बर्हिषद् नांवानें स्वर्गांत प्रसिद्ध असलेले पितृगण स्वर्गाच्या ज्या रमणीय प्रदेशांत राहातात त्या प्रदेशाला वैभ्राज असें नांव आहे. हे पितृगणही अमित तेजस्वी आहेत. हे मोठे तपस्वी, महाभाग व महात्मे पुलस्त्य नामक प्रजापतीचे पुत्र आहेत. सर्व देव, यक्ष, गंधर्व, राक्षस, नाग, सर्प व सुपर्ण हेही यांचा फार मान राखतात. यांची जी मानसकन्या ती पीवरी नांवानें विख्यात आहे. ती स्वतः योगनिष्ठ असून योग्याची स्त्री व योग्याचीच माता होणार आहे. ही गोष्ट येत्या द्वापरयुगांत होणार. हे धर्मनिष्ठा, त्या काळीं पराशराच्या कुलांत शुक नांवाचा महातपस्वी योगी उत्पन्न होईल. तो व्यासमुनीपासून अरणीचे ठिकाणीं उत्पन्न होईल, व तो तेजानें निर्धूम अग्नीप्रमाणें जाज्वल्य असेल. हा शुकमुनि वर सांगितलेली पीवरी नांवाची जी बर्हिषद् नांवाची कन्या तिचे ठिकाणीं मोठे बलिष्ठ व योगाचे केवळ आचार्य असे चार पुत्र व एक कन्या निर्माण करील. या पुत्रांचीं नांवें:—कृष्ण, गौर, प्रभु व शंभू हीं असतील व कन्येचें नांव कृत्वी. ही अणुह राजाची राणी होऊन ब्रह्मदत्ताची जननी होईल. याप्रमाणें असले योगनिष्ठ व महाव्रत पुत्र निर्माण करून व आपला पिता जो व्यास यापासून धर्माचीं विविध स्वरूपें ऐकून घेऊन तो धर्मनिष्ठ महायोगी शुक जेथून पुनरावृत्ति नाहीं अशा पदाला जाईल. हें पद म्हणजे दुःखशोकरहित अव्यय व शाश्वत असें ब्रह्मच होय.

आतां जे अमूर्त पितर सांगितले त्यांपैकीं सुकालसंज्ञक पितर वसिष्ठप्रजापतीपासून उत्पन्न झाले असून ते मोठे तेजस्वी व मूर्तिमान् धर्म असे आहेत. ते ज्योतींनीं भासमान असणाऱ्या स्वर्गाच्या भागांत आवडीनें राहातात. हा भाग सर्व इच्छित वस्तूंनीं सुसंपन्न असा आहे. यांचेपासूनच वृष्णि व अंधक वंशासंबंधीं कथेला उद्भव होतो. हेही पितर महामान्य असून ब्राह्मण त्यांचें तर्पण करीत असतात. यांची जी मानसकन्या आहे ती गौ या नांवानें स्वर्गांत प्रसिद्ध आहे. हे मार्कंडेया, ही तुझ्याच वंशांत दिली जाऊन शुकाची प्रिय राणी होईल. या गौ नामक कन्येलाच एकशृंगा असें वहिवाटींत म्हणतात. ही गौ साध्यनामक जे देवगण त्यांचें भूषणस्थान आहे.

सूर्यमंडलांत मरीचिगर्भ नांवाचे लोक आहेत, तेथें अंगिरसाचे पुत्र ( जे हविष्मंत नांवाचे पितर ) ते राहातात. यांना साध्यनामक देवांनीं पूर्वीं वाढविलें, अशी कथा आहे. ज्या क्षत्रियांना स्वर्गादिक फलांची इच्छा असेल ते या पितरांचें पूजन करितात. या पितरांची यशोदा नामक कन्या विश्रुत आहे. ही विश्वमहताची स्त्री, वृद्धशर्म्याची सून व राजर्षि महात्मा दिलीप याची आई. हा दिलीप मोठाच कीर्तिशाली झाला. हे मार्कंडेया, त्यानें देवांच्या युगांत एक सुप्रसिद्ध असा अश्वमेध नांवाचा महायज्ञ केला. त्या यज्ञांत शांडिल्यनामक सुप्रसिद्ध वंशांत जन्म घेणारा अग्नि प्रकट झाला. त्या वेळीं यज्ञार्थ तेथें आलेल्या अनेक महर्षींनीं दिलीपाचें तें सामर्थ्य पाहून प्रेमाचे भरांत अनेक गाथा गाइल्या. त्यांचा सारांश हा कीं, जे कोणी एकाग्रचित्तानें सत्यनिष्ठ व महोदार अशा दिलीपराजाचें यज्ञसमयीं अवलोकन करितील त्या प्रेक्षकांनाही स्वर्ग प्राप्त होईल.

पुलह महर्षीपासून सुस्वधा नामक द्विजश्रेष्ठ उत्पन्न झाले. हे कर्दम प्रजापतीचे पितर

---

१ मत्स्यपु० अ. १५ श्लोक १४ यांत " पादज " म्ह० शूद्र यांचें संतर्पण करितात, असें सांगितलें आहे.

२ या ठिकाणीं मत्स्यपुराणांत ( अ० १५ श्लोक १५ ) शुक्रैस्य दैता पत्नि—असा पाठ आहे

होत. हे स्वर्गीतील कामगसंज्ञक लोकांत रहातात; व आकाशांत यांना अनियंत्रित गति असल्यामुळें हे पक्षीरूपानें संचार करितात. हे मार्कंडेया, यांची उपासना फलार्थी वैश्यगण करितात. यांच्या मानसकन्येचें नांव विरजा हें आहे. हे ऋषे, ही ययातीची आई व नहुषाची पट्टराणी. याप्रमाणें मीं तुला हे तीन पितृगण सांगितले; आतां हा चौथा समजून घे. या चौथ्या गणांतील पितरांना 'सोमप' अशी संज्ञा आहे. हे कवीची कन्या जी स्वधा तिचे ठिकाणीं हिरण्यगर्भ जो अग्नि त्यापासून उत्पन्न झाले. शूद्र लोक यांची पूजा करितात. स्वर्गीतील ज्या लोकांत ते रहातात त्यांस 'मानस' अशी संज्ञा आहे. नर्मदा नांवाची जी सुप्रसिद्ध श्रेष्ठ नदी ती यांची मानसकन्या. ही नदी उगमापुढें कांहीं अंतरापर्यंत दक्षिणमार्गानें वाहात जात असून आपल्या स्पर्शानें प्राणिमात्राला पावन करिते. ही पुरुकुच्छाची स्त्री व त्रसद्दस्यूची आई. याप्रमाणें ही सात पितरांची हकीकत झाली. हे मार्कंडेया, युगायुगाचे ठायीं जेव्हां जेव्हां धर्माचा ऱ्हास होतो त्या त्या वेळीं प्रजापालक जो मनु तो या सप्तपितरांची ज्यांत विशेष पूजा केली जाते अशा प्रकारचीं श्राद्धें लोकांत प्रवृत्त करतो. हे द्विजश्रेष्ठा, या सातही पितृगणांत यम हा प्रथम उत्पन्न झाला असल्यामुळें वेदांत त्याला पितृपति अशीच संज्ञा दिली आहे, व त्याचा हा अग्रमान ध्यानांत आणून त्यालाच 'श्राद्धदेव' असेंहि म्हणतात.

१ मत्स्यपुराण अ० १५ । श्लो० १९ यांत "दुघ" असें नांव दिलें आहे.

२ यदवधि तव तीरं पातकी नैति गंगे।
तदवधि भवजालैर्नैवमुक्तः कदास्यात्।
तवजलकणिकालं पापिनां पापशुध्यै।
नर्मदाष्टक.

हे मार्कंडेया, आतां श्राद्धाचें विधान सांगतों तें ऐक. सर्व पितृश्राद्धांत पात्रें रुप्याचीं किंवा निदान रुप्यानें मढविलेलीं तरी असावींत. कारण रुपें हें पितरांना फार प्रिय आहे. असल्या रजत पात्रांत वाढलेलें श्राद्धान्न स्वधाशब्दपूर्वक अर्पण केल्यानें पितर फार संतुष्ट होतात. श्राद्धकालीं प्रथम सोम, अग्नि व यम यांचें अग्नींत आहुती देऊन संतर्पण करावें. अग्नि नसल्यास जलांत देणें. याप्रकारें जो भक्तिपूर्वक पितरांचा संतोष करितो, त्याला पितरही संतुष्ट करितात. पितर त्याला शरीर, पुष्टि व विपुल संतति देतात. त्याचप्रमाणें स्वर्ग देतात, आरोग्य देतात. फार काय सांगावें तो जें कांहीं इतर इच्छील तेंही सर्व देतात. हे मुने, पितृकार्याचें महत्व देवकार्यापेक्षांही विशिष्ट आहे. कारण, देव हे मोठे चेंगट व प्रसन्न होण्याला कठीण. पितर बिचारे अक्रोध म्हणजे शांत व त्वरित कृपा करणारे असे आहेत. म्हणून स्मृत्यादिकांत देवांपेक्षांही पितरांचा संतोष प्रथम करण्याकडे विशेष कटाक्ष आहे. पितरांपासून लोकांचें फारच श्रेष्ठ कल्याण होतें. शिवाय पितरांचा प्रसाद सदा स्थिर आहे म्हणजे त्यांची पूजा केली आणि ते अमुक वेळीं प्रसन्न झाले नाहींत, असें कधीं घडतच नाहीं. यास्तव, हे भृगुकुलोत्पन्ना मार्कंडेया, अशा पितरांना तूं नमस्कार कर. ही गोष्ट तुला विशेष आग्रहानें सांगण्याचें कारण असें आहे कीं, तूं मोठा पितृभक्त आहेस व त्यांतूनही, हे ब्राह्मणा, तुझी मजवर विशेषच भक्ती आहे. आज मी तुझें कल्याण करणार आहें व तें कसें तें तुला प्रत्यक्ष पाहातां यावें म्हणून मी तुला दिव्य दृष्टि व अनुभवाचें

१ सोमाय पितृमते, अग्नये कव्यवाहनाय, यमायांगिरसे स्वधा नमः, या शब्दांनीं आहुती देणें.

२ ही सवलत फक्त तीर्थांचे ठिकाणीं आहे.

सामर्थ्य, हीं दोन्हीही देतों. हे निष्पापा मार्कंडेया, मी जो मार्ग सांगतों, तो फार सावधचित्तानें ध्यानांत घे. वास्तविक पहातां तूं कांहीं सामान्य पुरुष नव्हस. तूं मोठा सिद्ध आहेस. तथापि देवांची योगगति व पितरांची श्राद्धफलरूपी परागति चर्मचक्षूनें तुला दिसणार नाहीं. असें बोलून तो देवश्रेष्ठ त्याच्या जवळच बसलेल्या मला देवांनाही दुर्लभ अशी विज्ञान सहित दिव्यदृष्टि देऊन त्याला इष्ट त्या मार्गाला गेला. जातांना तो जळत्या आहवनीय अग्नीसारखा झळकत होता.

हे कुरुश्रेष्ठा, त्या सनत्कुमार देवाच्या प्रसादानें मला जें ज्ञान प्राप्त झालें तें या मृत्युलोकांत मनुष्यांना प्राप्त होणें फार कठीण आहे. याकरितां तूं तें नीट समजून घे.

## अध्याय एकोणिसावा.

—:०:—

### पितृकल्पवर्णन.

मार्कंडेय सांगतातः—हे भीष्मा, सनत्कुमारांनीं मला सांगितलें कीं, पूर्वयुगीं भरद्वाज वंशांतले कांहीं ब्राह्मण होते. हे योगाभ्यास करीत असतां मध्येंच दुराचरण करूं लागल्यामुळें योगापासून भ्रष्ट झाले. त्या भ्रष्ट स्थितींत ते मानस नांवाचें जें विशाल सरोवर त्याचे पैलतीरीं वेडे होऊन पडले, आणि एखाद्याची वस्तु पाण्यांत पडली असतां तो जसा धुंडीत बसतो, त्याप्रमाणें दुराचरणानें गमाविलेल्या योगसिद्धीची त्यांना हळहळ लागून मूढाप्रमाणें ते तसे हळहळतच राहिले व अखेरीस योगसिद्धि प्राप्त झाल्यावांचूनच कालानें त्यांना गांठिलें. नंतर, ते योगभ्रष्ट ब्राह्मण मरणोत्तर दीर्घकालपर्यंत देवलोकांत राहून पुढें कुरुक्षेत्रांत कौशिक कुलांत उत्पन्न होतील. तेथें ते नरश्रेष्ठ पितरांच्या उद्देशानें धर्मकार्यार्थ म्हणून पश्वादिकांची हिंसा करीत फिरतील. नंतर त्या भ्रष्टांना पुन्हा नीच योनींत जन्म येईल; मात्र त्यांनीं पूर्वजन्मीं पितरांचें आराधन करून मिळविलेल्या प्रसादबलानें ते नीच योनींत असतांही त्यांची पूर्वस्मृति कायम राहील, व तीमुळें त्यांची बुद्धि ताळ्यावर येऊन त्यांची धर्माकडे प्रवृत्ति होत जाईल. नंतर स्वकर्माच्या सामर्थ्यानें पुनरपि ब्राह्मणजन्म प्राप्त होईल. त्या ब्राह्मणजन्मांत त्यांनीं प्रथम जन्मांत अर्धवट सोडलेला जो योगाभ्यास तो त्यांना पुन्हा साध्य होईल, व त्या अभ्यासबलानें ते शाश्वत पदाला पावतील.

हे मार्कंडेया, या गोष्टीवरून तुझ्या ध्यानांत येईल कीं, सद्धर्माचरण हें कधींही नाश पावत नाहीं. मध्यें कितीही अडथळे आले तथापि ते पुनरपि कर्त्याचे बुद्धीला सन्मार्गाकडे ओढीत नेतात. याकरितां तुझी मति वारंवार धर्माकडे लागूं दे. विशेषतः योगाचरणाकडे मति लागली असतां ती दिवसेंदिवस फारच उत्तम होत जाईल. पण, बाबा, योग कांहीं वाटेवर पडला नाहीं. अल्पबुद्धीच्या लोकांना हा कधींच प्राप्त होत नाहीं. कदाचित् मोठ्या कष्टानें प्राप्त झालाच तरी हे मूर्ख लोक मृगयादि नाना क्रूर व्यसनांच्या नादीं लागून प्राप्त झालेल्याची नासाडी करितात व स्वतः सदा अधर्मानेंच राहातात आणि आपल्या गुरूंचाही द्रोह करितात; अशांच्या हातीं योग लागत नाहीं, तर तो कोणाच्या हातीं लागतो तें ऐक.

जे लोक न मागण्याजोग्या ज्या वस्तु आहेत त्या कधींही मागत नाहींत; शरण आलेल्यांचें रक्षण करितात; दुर्बलांची अवहेलना करीत नाहींत; पैशाच्या उबेमुळें उन्मत्त होत नाहींत; ज्यांचे आहारविहार व स्वकर्तव्यासंबंधीं सर्व व्यापार हिशोबी व नेमस्त असतात; जे सदा ध्यान व अध्ययन यांत निरत असतात; नाय-

नाट झालेल्या वस्तूसाठीं सोधण्या घालीत बसत नाहींत; केव्हांही विषयोपभोगांत गढून पडत नाहींत; मद्यमांस भक्षण करीत नाहींत; स्त्रीशीं विलास करण्यांत आला तो दिवस घालवीत नाहींत; ब्राह्मणसेवेविषयीं अदक्ष असत नाहींत; हलकट गोष्टींत मन घालीत नाहींत; आळसानें ज्यांना गिळलें नाहीं; मान-सन्मानाची ज्यांना विशेष चाड नाहीं; व जे आत्मप्रशंसेंत फारसे पडत नाहींत; जे वृत्तीनें अति शांत; ज्यांनीं क्रोध जिंकला आहे; ज्यांना बढाई व मीपणा यांचा विटाळही नाहीं; व जे सदा पुण्यमय विचारानें भरलेले असतात, अशांनाच योग प्राप्त होतो. योग ही चीज मृत्युलोकांत फार दुर्मिळ आहे. भाग्यवान् असतील तेच व्रताचरण करितात. पूर्वकाळचे ब्राह्मण असे असत. प्रसंगीं त्यांचे हातून चुकीनें दोष घडलाच तर त्याची पुरी आठवण ठेवून ते आपला रस्ता सुधारीत व ध्यान आणि अध्ययन यांत गर्क राहून शांतीचे मार्गाला लागत.

हे धर्मज्ञा मार्कंडेया, योगधर्माहून अधिक महत्वाचा असा दुसरा कोणताही धर्म नाहीं. हा धर्म सर्वही धर्मांत वरिष्ठ आहे. यासाठीं, हे भृगुकुलोत्पन्ना, त्याचीच कांस धर. तूं जर अल्पाहार करणारा, जितेंद्रिय, तत्पर, पवित्र व श्रद्धावान् होशील तर तुला आस्ते आस्ते कालगतीनें योगसिद्धि प्राप्त होईल.

असें बोलून भगवान् सनत्कुमार जागचे जागीं अदृश्य झाले. ते गेल्यापासून मी त्यांची उपासना करण्यांत एकसारखा अठरा वर्षेंपर्यंत निमग्न होतों; परंतु तीं अठरा वर्षें मला केवळ एका दिवसासारखीं वाटलीं; किंवा मला कालाचें कसें तें भानच उरलें नाहीं. मी जेव्हां शुद्धीवर आलों, तेव्हां शिष्याजवळ पूसतपास केली, त्यावरून मला अठरा वर्षें लोटलीं असें कळलें. हे भीष्मा, त्या देवाच्या कृपेचा प्रभाव केवढा म्हणून सांगूं? त्या अठरा वर्षांत मला तहान लागली नाहीं; भूक लागली नाहीं; किंवा अन्नपाणी नाहीं म्हणून मी यत्किंचितही कोमेजलों किंवा थकलों नाहीं.

## अध्याय विसावा.

—:०:—

### चटकोपाख्यान.

मार्कंडेय म्हणतातः—हे भीष्मा, आतां सांगितल्याप्रमाणें सनत्कुमार देव अंतर्धान पावल्यावर त्यांच्या वचनप्रभावानें दिव्यदृष्टि व विज्ञान हीं तत्काल माझे ठायीं प्रकट झालीं; व त्यांच्या योगानें, हे गांगेया, सनत्कुमारांनीं कुरुक्षेत्रांत कौशिक कुलांत जे सात पुत्र आले म्हणून मला सांगितलें होतें ते मला प्रत्यक्ष दिसूं लागले. या साताभावांपैकीं ब्रह्मदत्त नांवाचा जो सातवा भाऊ होता तो राजा झाला. याचा स्वभाव व आचरण यांवरून हा ब्रह्मदत्त पितृवर्ती[1] या नांवानें विशेष प्रख्यात होता. हा कांपिल्य नामक श्रेष्ठ नगरींत राहाणारा जो पृथ्वीपति अणुह त्यापासून त्याची स्त्री जी शुककन्या कृत्वी तिचे ठायीं जन्मला.

भीष्म म्हणतातः—हे युधिष्ठिरा, महातपस्वी महाभाग मार्कंडेय यांनीं या अणुह राजाची वंशावळ मला जशी सांगितली तशीच ती मी तुला सांगतों ऐक.

युधिष्ठिर म्हणतोः—ताता, आपण एकुण वंशावळ सांगणारच आहांत, पण प्रथम विशेषतः अणुह राजा, हा कोणाचा पुत्र होता, हा कोणत्या काळीं होता, व राजा ब्रह्मदत्तासारखा महायशस्वी व धर्मनिष्ठ पुत्र ज्याचे पोटीं जन्मला त्याची वीर्यवत्ता तरी कसल्या प्रकारची होती

[1] यांचीं नांवें—१ स्वसृप, २ क्रोधन, ३ हिंस्र, ४ पिशुन, ५ कवि, ६ वाग्दुष्ट, ७ पितृवर्ती ( ब्रह्मदत्त ).

व त्या सात भावांपैकीं ब्रह्मदत्त हा कनिष्ठ असून राजा कां व कसा झाला, हें मला सांगावें. या ब्रह्मदत्ताचें चरित्र मी जें विशेष विस्तारानें ऐकूं इच्छितों याचें कारण, हे द्युतिमंता, असें आहे कीं, भगवान् शुकासारखा लोकपूज्य ऋषि आपली कृत्वी नामक कीर्तिमान् कन्या भलत्याच पोंचट माणसाला देणार नाहीं. अर्थात् तो तसाच कांहीं वीर्यवान् असला पाहिजे. याकरितां आपण त्याचें वृत्त मला सांगा. शिवाय त्याचे ते मार्कंडेयांनीं सांगितलेले बाकीचे भाऊ संसारांत कसे वागत होते, तें मला सांगा.

भीष्म म्हणतातः—हे धर्मा, माझा आजा जो राजर्षि प्रतीप त्याचा हा ब्रह्मदत्त राजा समकालीन होता, असें माझें ऐकिवांत आहे. हा मोठा भाग्यवान्, योगी, प्राणिमात्राचें कल्याण करण्यांत तत्पर व प्राणिमात्राची[1] भाषा जाणणारा होता; व ज्यानें तपोबलानें शिक्षानामक वेदांग निर्माण करून संहितेचा पदपाठ व एकंदर वेदांगांचा क्रम प्रचारांत आणिला; व योग शिकविण्यांत अत्यंत निपुण असल्यानें ज्याला योगाचार्य अशी संज्ञा आहे तो गालव ऋषि याचा मित्र होता; व योगिश्रेष्ठ कंडरीक हा त्याचा सचिव होता. महाभाग[1] मार्कंडेय ऋषींच्या सांगण्याप्रमाणें पाहातां ब्रह्मदत्तादि सातही बंधु पूर्वजन्मीं निरनिराळ्या जातींत जन्मले असून परस्पर अत्यंत प्रेमळ मित्र होते; व अखेर या जन्मीं ते सहोदरच झाले.

हे राजा युधिष्ठिरा, पुरुकुलोत्पन्न जो महात्मा ब्रह्मदत्त त्याच्या अति जुनाट वंशाचा वृत्तांत मी तुला सांगतों, तो ऐक. पुरुकुलांत बृहत्क्षत्र नांवाचा जो राजा झाला त्याला सुहोत्र नामक परम धार्मिक पुत्र झाला. त्या सुहोत्राला हस्ति नामक पुत्र होता. प्रसिद्ध जें हस्तिनापुर (हल्लींची दिल्ली) हें प्रथम यानेंच वसविलें. या हस्तीला अजमीढ, द्विजमीढ व पुरुमीढ असे तीन पुत्र होते. पैकीं अजमीढाला धूमिनी नामक स्त्रीचे ठिकाणीं बृहदिषु हा पुत्र झाला. हे राजा, या बृहदिषूचे पोटीं महायशस्वी बृहद्धनु हा पुत्र झाला. हा मोठा धार्मिक असल्यामुळें याला बृहद्धर्मा असें म्हणत. याला पुढें सत्यजित् हा झाला. त्याचा विश्वजित्, विश्वजिताचा पुढें राजा सेनजित् झाला. या सेनजिताला लोकविख्यात असे चार पुत्र झाले. यांचीं नांवें:—रुचिर, श्वेतकेतु, महिम्नार व वत्स. यांपैकीं वत्स हा अवंतीचा राजा होता; व रुचिराला पृथुसेन नांवाचा महायशस्वी पुत्र होता. पृथुसेनापासून पार झाला. पारापासून नीप. नीपाला मात्र अत्यंत तेजस्वी, शूर व बाहुशाली असे महारथि शंभर पुत्र होते; व हे सर्वही राजे झाले; व या सर्वांनाही नीपच म्हणत. या नीपांचा वंश वाढविणारा समर नांवाचा जो पुत्र तो कांपिल्य नगरींत राहात असे व याला नांवाप्रमाणेंच समराची फार आवड असे. या समराला पर, पार व सदश्व असे तीन मोठे धर्मज्ञ पुत्र होते. पैकीं पराला पृथु नांवाचा पुत्र झाला. पृथूला सुकृत नामक पुत्र झाला व तो आपल्या सदाचरणानें सर्वगुणसंपन्न झाला. याला पुढें

---

१ या ठिकाणीं लक्ष्मीवेंकटेश छापखान्यांतील छापील प्रतींत "ऋतज्ञः सर्व भूतानां" असा पाठ आहे, बंगालींत "कृतज्ञः" असा पाठ आहे. परंतु या दोन्ही पाठांपेक्षां आमचे जवळील लेखी प्रतींत "रुतज्ञः" असा पाठ आहे व त्याला मत्स्यपुराणांतील "योगवित् सर्व जंतूनां रुतवेत्ता भवत्तदा" (अ० २०, श्लो० २५) या श्लोकाचा दुजोरा आहे. यासाठीं आम्हीं तोच पाठ धरला हे.

१ जीवांचे (शत्रु) मित्रभाव जन्मजन्मांतरीं कसे दृढावत जातात व विशिष्ट कुटुंबांत विशिष्ट प्रवृत्तींचींच माणसें कां जन्मतात, याचा अंशतः निवाडा यांत आहे.

बिभ्राज झाला. बिभ्राजाचा पुत्र कृत्वीचा नवरा व शुक्राचार्यांचा जांवई जो सुप्रसिद्ध अणुह तो होय. अणुहाचा पुत्र बलवान् राजर्षी ब्रह्मदत्त हा झाला. त्याला योगनिष्ठ व शत्रुमर्दन असा विश्वक्सेन नामक पुत्र झाला. हा जो विश्वक्सेन हा खरें पाहातां ब्रह्मदत्ताचा पूर्वज म्हणजे आजा जो बिभ्राज तोच कांहीं कर्मगतीनें ब्रह्मदत्ताचे पोटीं पुनः जन्मास आला होता. ब्रह्मदत्ताला याशिवाय सर्वसेन या नांवाचा पुत्र होता. ब्रह्मदत्ताचे घरांत बहुत कालपर्यंत पूजनी या नांवाची एक चिमणी राहात असे. तिनें या सर्वसेनाचे डोळे[1] फोडले. आतां या ब्रह्मदत्ताचा विश्वक्सेन म्हणून जो वर महापराक्रमी पुत्र सांगितला, त्याला राजा दंडसेन नामक पुत्र झाला. या दंडसेनाला भल्लाटसंज्ञक पुत्र होता, याला कर्णानें युद्धांत मारिलें आहे. हा भल्लाट मोठा शूर व वंशोद्धार करणारा होता. मात्र याचे पोटीं जो पुत्र आला तो मोठा वाईट निपजला. कारण, याच्या एकट्याच्या दुष्कृतीमुळें उग्रायुधराजानें मागें सांगितलेले जे याचे नीपसंज्ञक पूर्वज त्यांच्या एकंदर वंशविस्ताराचा पूर्ण उच्छेद करून टाकिला. एवंच, हा दुर्बुद्धि मोठा कुलांगार निपजला. नीपांचा नायनाट करणाऱ्या त्या उग्रायुधाला जेव्हां अत्यंत गर्व झाला व मोठी घमेंड चढली त्या वेळेस, हे युधिष्ठिरा, मीं त्याला युद्धांत चीत केला.

धर्मराज म्हणतोः—महाराज, हा उग्रायुध कोणाचा पुत्र, कोणच्या कुळांत जन्मला व आपण त्याला युद्धांत काय म्हणून मारिलें, हें सर्व मला सांगा.

भीष्म सांगतातः—बाबारे, मागें जो अजमीढ राजा सांगितला, त्याला यवीनर नांवाचा एक विद्वान् पुत्र होता; यवीनराचे पोटीं धृतिमान् झाला; धृतिमानाचा पुत्र सत्यधृति, सत्यधृतीचे उदरीं प्रतापशाली दृढनेमी हा जन्मला. पुढें राजा सुधर्मा हा दृढनेमीचा पुत्र झाला. सुधर्म्याला पुढें सार्वभौम राजा हा पुत्र झाला. याला सार्वभौम म्हणण्याचें कारण खरोखरच तो सर्व पृथ्वीचा मालक झाला होता. याच्या सुप्रसिद्ध वंशांत पुढें पौरवांना आनंद देणारा महान् नांवाचा राजा झाला; पुढें महानाला रुक्मरथ झाला, असें लिहिलें आहे. रुक्मरथाचा पुत्र सुपार्श्व, सुपार्श्वाचा पुत्र सुमति हा मोठा धार्मिक होता. सुमतीला सन्नति नांवाचा मोठा वीर्यवान् पुत्र झाला. याचा पुढें मोठा बलाढ्य कृत नांवाचा पुत्र झाला. हा कृत कोशल देशांतील इक्ष्वाकु कुलोत्पन्न राजा जो महात्मा हिरण्यनाभ त्याचा शिष्य होता. यानें सामवेदाची संहिता चोवीस निरनिराळ्या रीतींनीं गाण्याची पद्धत काढिली, व यामुळें याच्या पद्धतीप्रमाणें जे साम पढणारे आहेत त्यांना कार्तय ( कृताचे अनुयायी ) असें म्हणतात, व त्या सामांना प्राच्यसाम असें म्हणतात. या कृताला पुरुकुलांतील मोठा पराक्रमी असा वर सांगितलेला उग्रायुध हा झाला. याच्या पराक्रमानें पृषत राजाचा आजा जो पांचालाधिपति राजा नीप हा गतप्राण झाला. या उग्रायुधाला क्षेम्य नांवाचा मोठा लौकिकवान् पुत्र झाला. क्षेम्याला पुढें सुवीर, सुवीराला पुढें नृपंजय व नृपंजयाला बहुरथ. हे सर्व राजे पुरुकुलोत्पन्न होत. असो; हा उग्रायुध जेव्हां अति माजला, तेव्हां त्याला वाईट वाईट बुद्धि सुचूं लागली; त्यानें आपलें सैन्य वाढवून नीप-कुलाचा व इतर अनेक राजांचा धुव्वा उडविला; इतकेंच करून न थांबतां आमचे बाबा वारल्यावर त्यानें मस्तींत येऊन मला एक फारच वाईट गोष्ट ऐकविली; तो वृत्तांत असाः मी बाबा मेल्यावर एक दिवस माझे सोबत्यांना भोंवतालीं घेऊन सहज

[1] ही कथा लवकरच पुढें येणार आहे.

धरणीवर निजलों असतां एकाएकीं या उग्रायुधाचा दूत आंत येऊन त्यानें आपल्या धन्याचा निरोप मला कळविला; तो हाः—" हे भीष्मा, तुझा बाप मेला आहे, तुझी आई जी गंधकाली (सत्यवती) हिचा रूपाविषयीं मोठा लौकिक आहे. स्त्रियांमध्यें ती केवळ रत्नच आहे. तेव्हां अशीला आपली भार्या करावी अशी अस्मादिकांची तबियत लागली आहे. तरी, हे कुरुश्रेष्ठा, तुमच्या आईला या कामासाठीं मजकडे पाठवून द्यावी. असें सांगण्याचा माझा हक्क काय म्हणशील तर आजकाल या धरणीतलावर जीं जीं रत्नें म्हणून आहेत त्यांचा वांटेकरी मीच आहें; करितां हें स्त्रीरत्नही मलाच योग्य आहे. इतकी माझी मागणी तूं मान्य केलीस म्हणजे तुला कांहीं कमी नाहीं. तूं ढेंकर देशील इतकी पुष्कळ दौलत व वाटेल तितकें विस्तीर्ण राज्य हीं मी तुला खुषीनें देईन, ही खात्री ठेव. मला आजकाल दुर्घट असें कांहींच नाहीं. माझ्या हातीं जें हें प्रज्वलित चक्र आहे हें इतकें अजिंक्य आहे कीं, रणांगणीं तें दृष्टीस पडतांच शत्रू सैरावैरा पळूं लागतात, ही गोष्ट तूं ध्यानांत घे; आणि तुझें राष्ट्र, तुझे प्राण व तुझें कुल हीं सुरक्षित राहावीं अशी जर तुझी इच्छा असेल तर मुकाट्यानें माझ्या आज्ञेंत तूं वाग; असें न करशील तर तुला शांति मिळून कशी ती मिळूं देणार नाहीं. "

हे धर्मा, मी भूमीवर दर्भासनावर लकटलों असतां त्या उग्रायुधानें आपल्या त्या दूताला मध्यें करून अग्नीच्या ज्वालेप्रमाणें तीव्र असे हे शब्द माझ्या कानीं पाडिले. हे धर्मनिष्ठा, त्या वेळीं मीं त्या नीचाचा अभिप्राय काय तो ध्यानीं आणून युद्धार्थ सज्ज होण्याविषयीं माझ्या सर्व सेनाधीशांना आज्ञा केली. मला इतक्या चिडीला येण्याला असें कारण झालें कीं, माझ्या मातेचा[१] पुत्र जो विचित्रवीर्य तो अद्यापि केवळ लहान असून सर्वथा माझ्या आश्रयावर अवलंबून होता. त्याकडे पाहून मला त्या हलकटाचा ( उग्रायुधाचा ) इतका संताप आला कीं, युद्ध करून त्याचीं हाडें मोडावीं, यापलीकडे मला दुसरी कोणतीही गोष्ट सुचेना. परंतु, त्या वेळीं माझे भोंवतीं सल्लामसलतींत कुशल असे माझे सचिव बसले होते, तसेच साक्षात् वेदस्वरूप असे माझे ऋत्विज बसले होते, व माझें खरें हित कशांत आहे तें जाणणारे माझे जिव्हाळ्याचे स्नेही बसले होते. त्या सर्वांनीं मला युद्धापासून निवृत्त होण्याविषयींचा आग्रह केला. ते सर्वच शास्त्रज्ञ असून माझ्या प्रेमांतले असल्यानें मला त्यांचें ऐकावें लागलें. शिवाय त्यांनीं आपल्या म्हणण्याला सयुक्तिक कारणें काय तींही मला ऐकविलीं. माझे मंत्री म्हणाले, हा पापी उग्रायुध सैन्य घेऊन ठेपला, ही गोष्ट खरी; आपण अजून वडिलांचे सुतकांतच आहां, मोकळे झालां नाहीं. शिवाय घे म्हणल्या युद्धाला उठणें ही राजकारणी पुरुषांच्या दृष्टीनें कांहीं अव्वलप्रत मसलत नव्हे. साम, दान, भेद, इत्यादि युद्धेतर सौम्य उपाय आहेत ते आम्ही प्रथम चालवून पाहातों. तोंपर्यंत आपणही सुतक फिटून शुद्ध व्हाल. मग देवतांना वंदन करून, स्वस्तिवाचन करून, ब्राह्मणांकडून अग्नींत होम देऊन, ब्राह्मणांची पूजा करून व त्यांची आज्ञा संपादून आपण विजयार्थ बाहेर पडावें. कारण, जोंपर्यंत कोणाही राजाला अशौच आहे तोंपर्यंत त्यानें रणांत शिरूं नये किंवा अस्त्रप्रयोगही करूं नये, अशी वृद्धांची आज्ञा आहे. आमच्या मतें आपण प्रथम सामानें किंवा

[१] भीष्म हे सत्यवतीचे सापत्न पुत्र व विचित्रवीर्य व चित्रांगद हे तिचे शंतनूच्या घरांत आल्यावर सख्खे पुत्र.

दानानेंच त्याला गप्प कराल. तितकेंच न साधलें तर भेदानें, आणि हे सारेच उपाय हुकले तर पराक्रम करून मारणें हेंही आपणाला कठीण नाहीं. इंद्रानें शंबराला ज्याप्रमाणें तेव्हांच चिरडून टाकलें त्याप्रमाणें आपणही यास केव्हांच चिरडाल. त्याची कथा काय!

भीष्म म्हणाले:—हे राजा युधिष्ठिरा, असें आहे कीं, आणीबाणीचे प्रसंगीं विशेष जाणत्या लोकांचा व त्यांतूनही वयोवृद्धांचा उपदेश ऐकावा. तेव्हां हें तत्त्व ध्यानांत आणून मीं माझ्या मंत्र्यांचे सांगीप्रमाणें युद्धाचा विचार तूर्त सोडून दिला. माझे मंत्री राजकार्यकुशलच होते. त्यांनीं तत्काल उत्तम उत्तम उपाय चालू केले. प्रथम शहाण्या शहाण्यांच्या विचारास आलें त्या त्या रीतींनीं साम, दाम, इत्यादिकांचीं बोलणीं लावून त्या उग्रायुधाला वाटेवर आणण्याचा उपाय केला. परंतु, खराखुराच नीचबुद्धि तो ! तो असल्या उपायांनीं कशाचा वळणावर येणार? त्यानें कांहीं न ऐकतां घमेंडींतच आपल्या हातांत असलेलें सुदर्शनासारखें तें जाज्वल्य चक्र आम्हांवर फेकलें. परंतु, चमत्कार काय सांगावा कीं, तें तत्काल परत फिरलें. कारण, त्या पातक्यानें दुसऱ्याची स्त्री हरण करण्यासारख्या नीच हेतूनें तें सोडलें असतां, तें चालावें कसें? बाकी त्याचें तें चक्र त्यानें गुरूनें सांगितलेली मर्यादा सोडून जेव्हां भलत्याच कामीं सोडलें तेव्हांच तें फुकट गेलें, असें मी समजून चुकलों होतों. तसेंच भल्याभल्यांनीं त्या दुष्टाची त्याच्या या कृतीबद्दल निंदा केली असल्यामुळें तो आपले कर्मानेंच मेला आहे, हेंही मी समजून होतों. तथापि, लोकाचाराप्रमाणें माझें सुतक फिटल्यावर मीं विप्रांकडून आशीर्वाद संपादून धनुष्यबाण घेऊन रथांत बसून शहराबाहेर पडून शत्रूंशीं भिडलों. नंतर हातझोंबीला येऊन एखाद्या बेहोष झालेल्या माणसाप्रमाणें शत्रूचा व माझा सतत तीन दिवस अंगबल व अस्त्रबल यांचा झगडा सुरू राहिला. तो इतका भयंकर कीं, त्याला एक देवासुरांचेच युद्धाची उपमा योग्य. अखेरीस मीं माझ्या अस्त्रतेजानें अगदीं भाजून काढिला, तेव्हां, हे धर्मा, तो इतका शूर खरा, तथापि, प्राण सोडून माझ्या समोरच तेथल्यातेथेंच रणांगणांत पडला. इतक्या अवकाशांत म्हणजे नीप राजा व हा उग्रायुध हे नाहींसे होत आहेत तों पृषत राजा हा कांपिल्य नगरीला येऊन पोंचला; व त्यानें आपलें वडिलार्जित जें अहिछत्र नगरीचें आसपासचें राज्य तें सर्व काबीज केलें. हा पृषत म्हणजे द्रुपदाचा बाप. हा तेव्हां माझ्या तंत्रानें वागत असे. याचें हें राज्य पुढें अर्थातच द्रुपदाकडे आलें. परंतु, कांहीं कालानें अर्जुनानें बाहुबलानें द्रुपदाला रणांत जिंकून कांपिल्य नगरीसकट तो सर्व अहिछत्र प्रांत द्रोणाला अर्पण केला. विजयी द्रोणांनीं शिष्याच्या त्या देणगीचा सादर स्वीकार तर केलाच; पण, त्यांतून कांपिल्यनगरी त्यानें द्रुपदाला परत दिली, ही गोष्ट तुला ठाऊकच आहे. हे धर्मा, याप्रमाणें मीं तुला ब्रह्मदत्त, द्रुपद व वीर उग्रायुध यांच्या वंशांची सविस्तर हकीकत सांगितली.

धर्मराजा विचारतो, 'हे गांगेया; तुम्ही पूजनीया म्हणून जी पक्षिणी सांगितली ती बहुत दिवस ब्रह्मदत्ताच्या घरांत राहात असून असल्या थोर राजाच्या ज्येष्ठ पुत्राचे डोळे फोडून त्याला आंधळें करणें असलें वाईट काम तिनें कशासाठीं केलें? तसेंच पांखराचा तो एवढा स्नेह राजाशीं कसा पडावा, हेंही मला एक गूढच आहे. तेव्हां या कामीं सर्व कच्ची हकीकत सांगून आपण माझा संशय दूर करा.

भीष्म म्हणतात:—ठीक आहे. यासंबंधांत ब्रह्मदत्ताचे घरीं कोणकोणत्या गोष्टी कसकशा

घडल्या, तें सर्व मी तुला सांगतों तें ऐक. हे राजा, ब्रह्मदत्ताच्या घरांत एक चिमणी बहुत दिवस घरटें करून होती. ही चिमणी मोठी देखणी होती; हिचे पंख शुभ्र असून हिचें डोकें लाल होतें व पाठ आणि पोट यांचा रंग कबरा होता. हिची आणि ब्रह्मदत्ताची फारच गट्टी जमली. ती इतकी कीं, ती त्याची एकजातीची प्रियसखीच म्हणावी. राजवाड्या-सारख्या उत्तम स्थळीं तिनें घरटें केलें होतें. तेथून ती रोज दिवसास बाहेर जाऊन समुद्र-तीर, डबकीं, सरोवरें, नद्या, पर्वत, लताकुंज, बनें, बागा, कल्हारपुष्पांच्या सुवासानें भरून गेलेले, प्रसन्न दिसणारे, कमोद, कमळें इत्या-दिकांचे पराग उडून ज्यांचे आसपासची हवा सुगंधमय झाली आहे, व जेथें कारंडव पक्षी ओरडत आहेत व हंस आणि पाणबदकें यांचे शब्द चालू आहेत अशा तलावांचे कांठीं चरून फिरून रात्र पडण्याचे वेळेस कांपिल्य नगरींत ज्ञात्या ब्रह्मदत्त राजाच्या राजमंदिरास परत येई. आल्यावर रात्रीं मग स्वस्थपणीं आपण दिवसास फिरावयास गेलेल्या नानास्थलीं ज्या ज्या आश्चर्यकारक वस्तु पाहिल्या असतील किंवा गोष्टी अवलोकनांत आल्या असतील त्यां-संबंधीं ही चिमणूबाई राजाशीं चटामटा गोष्टी करीत बसे. असा क्रम चालला असतां त्या ब्रह्मदत्त राजाला, हे राजव्याघ्रा, एक पुत्र झाला. याचें नांव सर्वसेन असें ठेविलें होतें. याच सुमारास त्या पूजनीयेनेंही एक अंडें घातलें व तत्पूर्वीं तिनें आपल्या कोठ्यांत एक घालून ठेविलें होतें, तें या वेळीं फुटलें. फुटतांच त्यांतून एक मांसाचा लोळा बाहेर आला. या लोळ्याला हात, पाय व चोंच इतके अवयव आले होते. चोंचीचा वर्ण पिंगट होता. अजून डोळे नव्हते ( उघडले नव्हते ), मग पुढें कांहीं दिवसांनीं त्याला डोळे आले व नंतर थोड्या थोड्या पांखरड्या फुटूं लागल्या. राज-पुत्रही दिवसेंदिवस वाढूं लागला. चिमणीही आपलें पिलूं व राजाचा पुत्र यांवर सारखीच प्रीति करूं लागली. रोज संध्याकाळीं चरून परत येतांना ती आपला पुत्र व राजपुत्र ह्यांसाठीं म्हणून दोन अमृततुल्य मधुर फळें चोंचींत धरून घेऊन येत असे. तीं फळें खाऊन दोघेही छोकरे खूष होऊन जात. त्या पोरांना तीं फळें खाण्याची चटकच लागून गेली. चिमणी बाहेर उडून गेली म्हणजे राज-पुत्राची जी दाई असे ती त्या चिमणीच्या पिलाला बाहेर घेऊन राजपुत्राला त्याशीं खेळ-वीत असे. एक दिवस दाईच्या नजरेआड राजपुत्रानें खेळ खेळतां तें चिमणीचें पिलूं मानेला बळकट आंवळून धरिलें. राजपुत्राची चिकाटी मोटी बळकट, कांहीं केल्या सुटेना. मोठ्या मुष्किलीनें त्याची ती मूठ उकलावी लागली. बाकी उकलून कांहीं फळ झालें नाहीं. चिमणीच्या पोरानें अगोदरच प्राण सोडले होते, मग तें आ वांसून व गतप्राण होऊन पडलेलें चिमणीचें पोर पाहून राजाला फार दुःख झालें. विशेषतः आपल्या मुलाचे हातून असली गोष्ट झाली, हें ध्यानांत येऊन त्यानें ढळढळ अश्रु ढाळिले; व जिच्या उपेक्षेमुळें राजपुत्राचे हातून असलें कृत्य झालें त्या दाईची त्यानें यथास्थितच खरड काढिली. तथापि झाली गोष्ट ती झालीच. राजा त्या दिवशीं सायंकाळ-पर्यंत त्या पोराबद्दल विलाप करीतच राहिला. इतक्यांत ती बिचारी चिमणी रानभर फिरून नित्याप्रमाणें दोन फळें घेऊन ब्रह्मदत्ताचे घरीं आली. घरीं येऊन पाहाते तों आपला पोटचा गोळा पंचमहाभूतांनीं सोडल्यामुळें (मेल्यामुळें) मोठ्या शोचनीय स्थितींत पडला आहे. त्याला

१ याला सर्व प्राण्यांची भाषा समजत होती, हें पूर्वीं सांगितलेंच आहे.

पाहातांच प्रथम तिला मूर्छा आली. नंतर कांहीं वेळानें शुद्धीवर आल्यावर बापडी अतीच विलाप करूं लागली. ती म्हणाली, ' बाळ, कायरे हें ! मी आज बाहेरून आलें व तुला साद घातली तथापि तूं आपल्या गोड व अस्फुट वाणीनें लाडके लाडके चिंव चिंव शब्द करीत करीत मजभोंवतीं रांगत रांगत कसारे येत नाहींस ? रोजचा पाठ म्हटला म्हणजे मी घरीं येतें आहें तों तुला भूक लागली असल्यामुळें तूं आपलें तें पिंवळें पिंवळें चंचुपुट आंतील लाल टाळें दृष्टीस पडे इतकें ताणून भक्ष्यग्रहणार्थ मज-पाशीं यावयाचा, परंतु, आज इतका वेळ जाऊ-नही कसा येईनास ? मी रोज बाहेरून आलें म्हणजे तूं चिंवचिंव करीत मजकडे आलास म्हणजे तुला पंखांखालीं घेऊन मी प्रेमभरानें ओरडत असें, पण आज मुळींच तुझें तें गोड चिंवचिंवणेंच ऐकूं येत नाहीं, हें काय ? बाळरे, आज मी रानांतून परत निघालें तेव्हां मला आशा वाटत होती कीं, मी येतें तों आपले पंख हालवीत आपलें तोंड उघडून "आई मला तहान लागली पाणी दे" म्हणून तूं मजपुढें येशील; परंतु, ती माझी आशा सर्वथा विफल झाली. कारण, तूं मुळींच रस्ता धरिलास ! आतां काय करूं ? '

याप्रमाणें बहुत प्रकारें विलाप करून ती राजाला म्हणाली, 'हे राजा, तूं यथाशास्त्र अभिषेक करून गादीवर आलेला राजा आहेस, कोणीतरी नव्हस. अर्थात् तुला आपल्या सनातन धर्माची चांगलीच माहिती असली पाहिजे, असें असून आपल्या दाईच्या हातीं माझ्या पोराचा घात करविलास हें काय ? तुझ्या पोरट्यानें माझें लेंकरूं मान मुरगळून मारिलें. ही गोष्ट हे क्षत्रियाधमा, तुझ्या घरांत संभवली कशी, हें मला नीट सांग. तूं एवढा मोठा शहाणा म्हणवितोस तर " शरण आलेला, भुकेलेला, शत्रूंनीं वेढलेला व बहुत दिवस आपल्या घरीं राहिलेला अशांचें रक्षणच केलें पाहिजे; जे न करितील ते निःसंशय कुंभिपाक नरकाला जातील. " अशा अर्थाची जी अंगि-रसाची श्रुति आहे ती तुझ्या कानीं नाहीं काय ? अरे, असल्यांची उपेक्षा करणारे अधमाचे हातून देवांनीं हविर्भाग कसा घ्यावा, किंवा पितरांनीं स्वधाकार तरी कसा घ्यावा ? " हे राजा, याप्रमाणें राजाशीं बोलून ती चिमणी अतिशोकानें केवळ अविचारी बनली; व त्या तडाक्यांत तिनें त्या अल्पवयी राजकुमाराचे डोळे आपल्या पायाच्या नख्यांनीं ओरबाडिले. पुढें ते डोळे फुटले. याप्रमाणें राजपुत्राला आंधळा करून ही चिमणी आकाशांत उडून जाऊं लागली. इतक्यांत राजानें आपल्या पुत्राची झालेली स्थिति पाहून तिला म्हटलें कीं, हे कल्याणि, माझ्या पुत्राचे तूं डोळे फोडलेस, फार चांगलें केलेंस, आतां भिऊं नको. आतां तर तुझें दुःख दूर झालेंना ? मग आतां कां येथून जातेस ? जाऊं नको. तुझें मन शांत झालें; तर आतां परत फीर. आपली मैत्री पूर्वीं होती तशीच चालूं दे, तिचा नाश होऊं देऊं नको; पूर्वीं जशी होतीस तशीच सुखानें माझे घरांत रहा. चल परत फीर, आणि चैनींत अस. माझ्या पोराला तूं क्लेश दिलेस म्हणून माझा कांहीं तुझ्यावर राग नाहीं. तूं माझी मैत्रीण आहेस. देव तुझें कल्याण करो. तूं माझ्या पोराचे डोळे फोडलेस खरे, पण त्यांत जें ओघाला आलें तेंच तूं केलेंस; त्यांत तुझ्या-कडे काय दोष ?

पूजनीया म्हणाली:—हे राजसिंहा, तूं जरी किती शांतीच्या गोष्टी सांगितल्यास तरी आपलेवरून जग ओळखावें, अशी म्हण आहे त्याप्रमाणें मला नुकताच पुत्रशोकाचा अनुभव आला आहे, त्यावरून तुझ्या प्रिय पुत्राच्या

स्थितीबद्दल तुला किती दुःख होत असेल, याची कल्पना मला तूं न सांगतांही पुरापूर आहे. याकरितां तुझ्या पुत्राचे डोळे फोडण्यासारखें दुष्कृत्य करून पुन्हा मी तुझ्याच घरांत दृष्टीसमोर राहावें, ही गोष्ट मला संमत नाहीं, शिवाय मी जें म्हणतें या म्हणण्याला शुक्राचार्यांच्या नीतींतील वचनांचा आधार आहे. तीं वचनें मी म्हणून दाखवितें तीं ऐक. तीं अशीं:—

१ कुमित्र, कुदेश, कुराजा, कुमैत्री, कुपुत्र व कुभार्या यांस दुरूनच टाळावीं. कारण, कुमित्राचे ठिकाणीं खरा स्नेह होत नाहीं; कुभार्येचे ठिकाणीं सुखभोग होत नाहीं; कुपुत्राचे हातून पिंड मिळत नाहीं; कुराजाच्या अमलांत सत्याला थारा नाहींसा होतो. जेथें खोटच्या माणसाशीं स्नेह आहे तेथें खऱ्या विश्वासाला आधार नसतो; कुदेशांत उपजीविकेची मारामार पडते; राजा दुष्ट असला म्हणजे प्रजेच्या जीवाला सदा धाकधूक असते; व पोटचा पोर वाईट निघाला म्हणजे आईबापांना सर्व बाजूंनींच सुखाचा अभाव होतो.

२ जो नीच मनुष्य आपल्यावर अपकार करणाऱ्याही मनुष्यावर एखाद्या अनाथ दुबळ्याप्रमाणें भार टाकतो, त्याचा लौकरच नाश होतो.

३ ज्याचा आपल्या ठिकाणीं विश्वास नाहीं त्यावर मुळींच विश्वास ठेवूं नये; व ज्याचा विश्वास आहे अशावर तरी फाजील विश्वास टाकूं नये. कारण, प्रसंगवशात् विश्वासू माणसालाच दगा करण्याची बुद्धि झाली तर तो आपणास मुळापाळांसकट[1] उखडून काढील.

४ जो मूर्ख मनुष्य राजाचे सेवक किंवा ज्याचे बीजाविषयीं घोंटाळा आहे, असल्या जातीवर विश्वास ठेवून वागतो त्याचा जीव धोक्यांत आहे, असें समजावें.

५ मी राजाचे मर्जीतला आहें, मला कसलें भय आहे, असें कोणीही मानूं नये. कारण राजेसाहेबांची मर्जी खप्पा होऊन मनुष्य मुंगळ्यासारखा केव्हां चिरडला जाईल याचा कांहीं विश्वास नसतो.

६ शहाण्या मनुष्याची गोष्ट अशी आहे कीं, ज्याप्रमाणें एखादी कोमल अल्पवल्ली एखाद्या महावृक्षाच्या कवेंत राहूनच त्याला पाडिते, त्याप्रमाणें तो वरून नरमपणा दाखवून व अंग चोरून वागूनच शत्रूला पालथा पाडितो.

७ ज्याप्रमाणें मुंग्यांचें वारूळ प्रथम झाडाचे बुडांत उत्पन्न होतें, तेव्हां तें मऊ, ओलें व अल्प असतें, परंतु पुढें त्या वृक्षाचीं मुळें खाऊन टाकितें; त्याप्रमाणें लबाड शत्रु प्रथम बाह्यांगीं, मोठा दुर्बळ, मृदु व आर्द्र (स्नेहल) असा दिसून हळूहळू आपल्या पोटांत शिरतो आणि अखेरीस आपला घात करितो. हे राजा, राजकीय विषयांत भले भले दगलबाजी करितात. याचें प्रसिद्ध उदाहरण म्हणजे इंद्राचें. यानें मुनींच्या समक्ष, मी तुझा नाश करीत नाहीं, असा नमूचीला विश्वास देऊन अखेर पाण्याच्या फेंसाखालीं आपलें वज्र दडवून त्याला नुसतें फेंसानें ठार केलें. सारांश, वैरी म्हटला म्हणजे तो, मनुष्य निद्रिस्त आहे हें पाहात नाहीं. तो निशंत आहे किंवा गैरसावध आहे, हें पाहात नाहीं; आणि वाटेल त्या उपायांनीं—विषप्रयोगानें म्हणा, आग घालून म्हणा, किंवा साधल्यास शस्त्रानें किंवा ठकबाजीनें—त्याचा घात करितो, व त्याची मुळी शिल्लक राहिल्यास अंकुरित होऊन पुन्हा आपणास त्रास देईल, यास्तव त्याचा उच्छेद करितो, कांहींही शिल्लक उरूं देत

[1] ओळखीचा चोर जिवानिशीं मारी किंवा जिवंत सोडीना, ही म्हण याच अर्थाची आहे.

नाहीं. कारण, शत्रुशेष, ऋणशेष व अग्निशेष हीं पुनरपि वाढतात. यास्तव शहाण्यानें तीं शिल्लक ठेवूं नयेत, हा दाखला त्यांचे ध्यानांत असतो. लबाड शत्रु आपले बरोबर हंसतो, अघळपघळ बोलतो, एका बैठकीवर बसतो व एका ताटांत जेवतो देखील. पण हें सर्व करितांना त्याची पापबुद्धि कायम असते. एकदां शत्रुत्व उत्पन्न झालें म्हणजे मग तो शत्रु आपला शरीरसंबंधी असला तरीही त्यावर विसंबूं नये. कारण, इंद्रानें लढाईंत प्रत्यक्ष आपला सासरा म्हणजे बायकोचा बाप जो पुलोमा त्याला ठार केलें.

८ मनांत वैरभाव ठेवून जो मनुष्य वरवर गोड बोलतो त्याच्याजवळ जाणें म्हणजे हरिणानें फांसेपारध्याजवळ जाण्यापैकींच आहे. ज्याच्या मनांत आपल्याविषयीं काळें आलें असल्या बलाढ्य शत्रूच्या आश्रयाला कधींही राहूं नये. कारण, नदीचा वेगवान् ओघ कांठाच्या वृक्षाला ज्याप्रमाणें खणून काढितो त्याप्रमाणें तो आपला नाश करितो. शत्रूपासून जरी आपण उदयास आलों असलों तरी त्यावर भरंवसा ठेवूं नये. कारण, ज्याप्रमाणें एखादा किडा पंख फुटल्याच्या आनंदानें वर उडी मारावयास जातो, परंतु इतक्यांत पक्ष्यांची नजर त्याजवर जाऊन ते त्याला ठार मारतात, त्याप्रमाणें अवस्था होते.

याप्रमाणें शुक्राचार्यांनीं आपल्या नीतींत हीं जीं अनेक बोध-वाक्यें लिहिलीं आहेत, तीं, हे भूपाला, ज्या सुज्ञ पुरुषाला आपण सुरक्षित नांदावें अशी इच्छा असेल त्यानें मनांत धरावीं. मी तर तुझ्या साक्षात् पुत्राचे डोळे फोडण्यासारखें अतिदारुण पाप केलें आहे, तेव्हां आतां तुझ्यावर विश्वास ठेवून तूं म्हणतोस तसें तुझ्या घरांत स्वस्थ राहाणें माझ्या हातून होणार नाहीं. " असें म्हणून ती चिमणी आकाशांत उडून गेली.

भीष्म म्हणतात:—हे युधिष्ठिरा, राजा ब्रह्मदत्त व पूजनिया चिमणी यांचा घडलेला वृत्तांत मीं तुला सांगितला. आतां तुला श्राद्धाची माहिती पाहिजे आहे तर तिजसाठीं पूर्वीं सनत्कुमारांनीं मार्कंडेयाचे प्रश्नावरून त्याला एक जुनाट इतिहास सांगितला होता, तो मी तुला सांगतों. आपले हातून पुण्य घडावें व आपणांस श्राद्धाचें फल मिळावें, अशा उद्देशानें वागणारे योगनिष्ठ ब्रह्मचारी जे गालव, कंडरीक व ब्रह्मदत्त, या तिघांचे सातवे जन्मांत हा इतिहास घडलेला आहे.

## अध्याय एकविसावा.

—:०:—

### श्राद्धमाहात्म्य.

मार्कंडेय म्हणतात:—हे भीष्मा, श्राद्धाचें माहात्म्य तुला किती म्हणून सांगूं? अरे, इहलोकीं विद्या, धन, कुल, सत्पुत्र, पशु, आदिकरून जीं सुखस्थितीचीं साधनें आहेत तीं तर श्राद्ध केल्यानें प्राप्त होतातच. पण, त्याहूनही अधिक श्रेष्ठ जो मोक्ष किंवा ब्रह्मैक्य तेंही या श्राद्धविधीनें प्राप्त होतें. असें या श्राद्धाचें अनुत्तम फल आहे व तें ब्रह्मदत्ताला सात जन्मांत मिळत गेलें. त्या योगानेंच त्याची बुद्धि दुर्मार्गापासून हळूहळू आपोआप परावृत्त होऊन सन्मार्गाकडे लागली व इतरांचीही लागते. याकरितां मी तुला श्राद्धाचा विधि सर्व सांगतों. हे निष्पापा, पूर्वकालीं कांहीं ब्राह्मणांनीं इतर धर्मविधींना धाब्यावर बसवून गोहत्यादि करून केवळ श्राद्ध मात्र केलें होतें, पण तेवढ्यानेंच त्यांना अत्युत्तम फळ प्राप्त झालें. तें कसें, तें सर्व तुला सांगतों ऐक.

मागें भगवान् सनत्कुमार मला दिव्य दृष्टि देऊन अंतर्धान पावले, हें मीं सांगितलेंच आहे. ते गेल्यावर या दृष्टीच्या बलानें मीं सनत्कुमारांनीं पूर्वी निर्दिष्ट केलेले सात ब्राह्मण कुरुक्षेत्रांत धर्मश्रद्धेनें पितृश्राद्ध करीत आहेत, असें प्रत्यक्ष पाहिलें. या सातांचीं नांवें:—वाग्दुष्ट, क्रोधन, हिंस्र, पिशुन, कवि, खसृम व पितृवर्ति, अशीं होतीं; व या नामांनुरूपच त्यांची कृति होती. हे सर्व कौशिक विश्वामित्राचे पुत्र होते, व गार्ग्यमुनीचे शिष्य होते. त्यांचा पिता विश्वामित्र त्यांना शाप देऊन वेगळा सरला, तेव्हां ते सातही बंधु गार्ग्याच्या घरीं जाऊन शिष्यवृत्ति पतकरून ब्रह्मचर्यव्रतानें राहिले. तेथें असतां त्यांच्या गुरूची न्यायानें संपादिलेली अशी एक सुंदर दुभती एकरंगी गाय होती; तिला गुरूच्या आज्ञेवरून एक दिवस ते वनांत घेऊन चालले होते. या गाईचें वांसरूंही तिचेसारखेंच एकवर्णी होतें. या धेनुवत्सांना घेऊन जात असतां वाटेंत त्यांना अतिशय भूक लागली व पोरवय आणि अज्ञान यांमुळें या गाईवरच आपली भूक भागवावी, अशी दुष्टबुद्धि त्यांचे मनांत उपजली. त्यावेळीं कवी[1] व खसृम[2] या दोघांनीं 'असें करूं नका' म्हणून आपल्या बंधूंशीं याचना केली. परंतु, ते निवृत्त होतना. त्या वेळीं त्यांतील पितृवर्ति[3] म्हणून जो भाऊ होता तो नित्य श्राद्ध करणारा होता. तो धर्माचे ठिकाणीं स्थिरबुद्धि असल्यानें रागानें आपल्या बंधूंस म्हणाला, 'बाबांनो, या सुंदर गाईला अवश्य मारावयाचीच असें ठरत असेल तर त्यांत माझी एक गोष्ट तरी लक्षपूर्वक ऐका. ती ही कीं, गाय मारणेंच तर ती पितृश्राद्धार्थ म्हणून मारावी. असें केलें असतां या गाईचाही धर्मकार्यांत विनियोग होऊन तिला सद्गति मिळेल व आपणही पित्रार्चन केल्यानें अधर्म केल्यासारखें होणार नाहीं.'

ही त्याची मसलत सर्वांना पटली. मग त्यांनीं गाईचें प्रोक्षन (वध) करून व ती पितरांना अर्पण करून मग तिजवर यथास्थित ताव मारिला. नंतर, तळिराम गार करून गुरुगृहीं परतले व तिचें तें वांसरूं पुढें करून गुरूला म्हणाले, "गाय वाघानें खाल्ली; वांसरूं तेवढें राहिलें आहे, हें संभाळा." गुरु बिचारा निष्कपट होता. त्याला ती गोष्ट खरी वाटली व त्यानें 'बरें आहे,' म्हणून तो वत्स आपले ताब्यांत घेतला.

याप्रमाणें त्या सर्व ब्राह्मणांनीं आपल्या गुरूला खोटीच गोष्ट सांगून ठकविलें. पुढें ते सर्वहीजण आयुष्य संपतांच मेले. मेल्यानंतर पुढील जन्मीं ते सातहीजण पूर्वजन्मींच्या क्रूरकर्मामुळें हिंस्र, आपल्या गुरूशीं नीचपणा केल्यामुळें उग्र व हिंसादिकर्मांत आनंद मानणारे असे होऊन पारध्याचे पोटीं जन्मास आले. ते मोठे बळकट व दिलदार होते. पूर्वजन्मीं त्यांनीं पितरांचें धर्मबुद्धीनें अर्चन केलें व गोवधही पितरांचेच उद्देशानें केला होता. यामुळें त्यांस चालू जन्मांत पूर्वजन्मींची स्मृति राहिली होती. यामुळें ते जरी दशार्ण देशांत या जन्मीं व्याधासारख्या क्रूर कुलांत उत्पन्न झाले होते तरी ते मोठे धर्मनिपुण असून निर्लोभ व सत्यप्रिय होते. ज्या कुळांत आले तेथील कर्म[1] ते करीत खरें, पण तें केवळ प्राणरक्षणापुरतेंच तेवढें केलें म्हणजे बाकीचा काल ते आत्मानुसंधानांत घालवीत असत. या जन्मीं त्यांचीं नांवें पुढीलप्रमाणें होतीं. तीं:—निर्वैर, निर्वृत्ति, शांत, निर्मन्यु, कृति, वैधस व मातृवर्ती. त्यांचीं कर्में या संज्ञांनुरूपच होतीं, एकंदरींत ते व्याध होऊन परमधार्मिक होते.

---

१ म्हणजे परलोकाची भीति मानणारा. २ म्हणजे स्वर्गेच्छा करणारा. ३ म्हणजे पितृनिष्ठ.

१ सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् । (अ. १८, श्लो. ४८.)

जातीचें हिंसाकर्म ते करीत खरें, पण बाकीचा वेळ आपल्या वृद्ध मातापितरांचे पूजनांत व संतोषांत घालवीत. पुढें त्यांचीं मातापितरें यथाकाल मरण पावली, त्या वेळीं त्यांनीं आपल्या हातांतलीं शिकारीचीं धनुष्यें टाकून देऊन वनांतच देहत्याग केला.

पुढील जन्मीं ते रम्य कालंजर पर्वतावर मृगयोनींत उत्पन्न झाले. मृगयोनींत उत्पन्न होण्याचें कारण ते व्याधयोनींत असतांना श्वापदांच्या अंतःकरणांत भय उत्पन्न करणारें कर्म करीत असल्यानें जेथें चित्तांत सदा धसधस राहील असला हळू वृत्तीचा जन्म त्यांस प्राप्त झाला. परंतु, त्यांनीं पितृपूजनादि शुभकर्में केलीं असल्यामुळें याही जन्मीं त्यांना पूर्वजन्माचें स्मरण होतें. या जन्मीं त्या मृगांचीं नांवें उन्मुख, नित्यवित्रस्त, स्तब्धकर्ण, विलोचन, पंण्डित, घस्मर व नादी, अशीं होतीं. ते जरी पशूंच्या जन्मास आले होते, तथापि आपण पूर्वीं कोण होतों व या नीच योनीला कां आलों, ही गोष्ट सतत त्यांच्या डोळ्यांसमोर असल्यानें ते या जन्मांत क्षमाशील, निर्वैर व निर्भीक होते. त्या सर्वांची राहाणी एक तऱ्हेचीच होती. ते कधीं गैरकर्म करीत नसत व केवळ योग्यांप्रमाणें अंतर्निष्ठ राहून वनांत विहार करीत. ते फक्त पोटाला अल्पसें भक्ष्य देत व पाणी मुळींच पीत नसत. या प्रकारची त्यांनीं कडक तपश्चर्या चालविली. या स्थितींत असतांना त्यांचीं जीं पावलें भुईवर उमटलीं, तीं, हे राजा, कालंजर गिरीवर अद्यापि तशींच्या तशींच दृष्टीस पडतात.

याप्रमाणें शुभ कर्म करीत असल्यामुळें व अशुभ कर्मांचा सर्वथा त्याग केल्यानें त्यांना अधिक शुभ योनीची योग्यता प्राप्त झाली व पुढील जन्मीं ते शरद्वीप नामक शुभ देशांत सातहीजण जलांत राहाणारे चक्रवाक पक्षी झाले. चक्रवाक पक्षाची कामित्वाविषयीं मोठी ख्याति आहे. तो आपल्या मादीला सोडून क्षणभरही राहाण्याची वेळ आल्यास व्याकूळ होतो. पण हे बंधु अशा योनींत येऊनही त्यांनीं मैथुनाचा मार्ग मुळींच न पतकरितां केवळ ब्रह्मचर्यच पतकरलें. ते एखाद्या ऋषीप्रमाणें आपला वेळ मननांत घालवीत. या पक्षियोनींत त्यांचीं नांवें:—निस्पृह, निर्मम, क्षांत, निर्द्वंद्व, निष्परिग्रह, निर्वृत्ति व निभृत, अशीं होतीं. ते सर्वही पक्षी मोठे शुभलक्षणी व धर्मानें चालणारे होते. शेवटीं त्यांनीं आहार वर्ज करून तपाचरणानें नदीकांठीं प्राण सोडले.

पुढील योनींत ते सातहीजण मानससरोवरांत फिरणारे असे हंस झाले. ते सर्वही एकाच जोडप्यापासून झाले. त्या सर्वांनाही पूर्वस्मरण होतेंच. येथेंही ते मोठे धर्मनिष्ठ व ब्रह्मचारीच होते. पूर्वीं ब्राह्मणजन्मांत आपल्या प्रत्यक्ष गुरूला त्यांनीं ठकविलें असल्यामुळें त्या दोषानें ते अनेक जन्मांच्या गिर्कींत सांपडून नीच योनींत उत्पन्न झाले. तसेंच त्यांनीं आपल्या पोटासाठीं तर खरीच, तथापि, पितृश्राद्धाचें नांव करून हिंसा केली होती, एवढ्यानें त्यांना पूर्वजन्मींचें[1] ज्ञान राहिलें व जन्महीं तिर्यग्योनींतच पण एकाहून एक अधिक उंची अशा योनींत आले. या हंसयोनींत त्यांचीं नांवें—सुमना, शुचिवाक्, शुद्ध, पंचम, छिद्रदर्शन, सुनेत्र व स्वतंत्र.

यांपैकीं पांचवा म्हणजे प्रथम जन्मीं जो कवि नामक होता, तो सातव्या जन्मांत पांचिक ही संज्ञा पावला; सहावा जो खसृम

---

१ पश्वादि योनींत पूर्वजन्माची पुष्कळांना स्मृति असते. याचीं उदाहरणें अजून दृष्टीस पडतात. पुष्कळदां सर्प हे अंगांत संचारून मी ब्राह्मण होतों, मी शूद्र होतो, असें स्पष्ट बोलतात. किलेक कुत्रे शनवार व एकादशीचे उपास करतांना माहाण्यांत आहेत.

तो कंण्डरीक नांवानें प्रसिद्ध झाला; व सातवा ब्रह्मदत्त या नांवानें. त्यांनीं साती जन्मांत जें तपाचरण केलें, जो योगाभ्यास केला, त्यांना कल्याणकारक अशी जी पूर्वजन्मींची स्मृति होती व अगदीं पहिल्या जन्मीं गुरुगृहीं त्यांनीं जें वेदाध्ययन केलें होतें त्याचा संस्कार, या सर्व संस्कारांच्या प्रभावानें ते जरी संसारांत पडले होते तरी ते सर्वही पक्षी अंतरीं ब्रह्मवेत्ते असून ब्रह्मचर्यानेंच राहात व योगस्थ वृत्तीनें वनांत विहार करीत. एकदां ते सर्वही हंस जुटीनें एकत्र फिरत असतां पुरुकुलोत्पन्न नीपांचा राजा बिभ्राज हा तेथें आला. हा शरीरानें मोठा शोभायमान्, पराक्रमी व श्रीमंत होता. तो आपल्या स्त्रियांस बरोबर घेऊन त्या वनांत शिरला. तो राजा असल्या थाटानें व वैभवानें आलेला पाहून त्या सातांपैकीं स्वतंत्र नांवाचा जो हंस होता, त्याला आपण या राजासारखें व्हावें, अशी इच्छा उत्पन्न झाली. तो म्हणाला, 'मी आजपर्यंत उपास कर करून अगदीं थकलों व इतकी तपश्चर्या केली, पण कांहीं फळ मिळालें नाहीं. तर माझ्या पदरीं तपाच्या किंवा नियमांच्या योगानें सांचलेलें जर कांहीं पुण्य असेल तर त्याच्या बळानें मला या राजासारखी सुखस्थिति प्राप्त व्हावी, असें मी इच्छितों.'

## अध्याय बाविसावा.

—:०:—

### चक्रवाकवर्णन.

मार्कंडेय सांगतातः—भीष्मा, एकानें आपली राजा होण्याची इच्छा प्रदर्शित करितांच त्याच्या जोडीनें फिरणारांपैकीं दुसरे दोन म्हणाले कीं, फार ठीक आहे. तूं राजा होशील तर आम्ही तुझे हितचिंतक सचिव होऊं. त्यानें "बहुत बरें" असें म्हणून आपली वृत्ति योगपर केली, व तिघांनींही पुढील संकेताविषयीं परस्पर ठराव केले. तें पाहून शुचिवाक् नांवाचा त्यांचा बंधु स्वतंत्राला म्हणाला, 'तूं ज्याअर्थीं योगाभ्यास सोडून विशेषतः कामवासनेनें प्रेरित होऊन राजा होण्याची इच्छा करितोस, त्या अर्थीं मी काय बोलतों तें ऐकून घे. तुझ्या इच्छेप्रमाणें तूं कांपिल्य नगरीचा खुशाल राजा हो आणि होशीलही, यांत संशय नाहीं. आणि हे दोघे तुझे बंधु तुझे सचिव होतीलच. पण ज्या अर्थीं तुम्ही राज्यलोभानें योगाचरणांत व्यभिचार केलात त्या अर्थीं तुम्हां तिघांना आमचा शाप आहे व तुमच्याशीं आम्हीं भाषण करणें सोडून दिलें आहे.'

भावांनीं याप्रमाणें शाप देतांच ते तिघेही तत्काल योगभ्रष्ट होऊन गडबडून गेले; व पुन्हा आपल्या भावांची विनवणी करून त्यांनीं त्यांचा प्रसाद संपादन केला. तेव्हां त्या चौघांचेही संमतीनें सुमना नांवाचा बंधु त्यांना प्रसादयुक्त वचन बोलला कीं, आमचा शाप निरवधि नाहीं, तो लवकरच संपेल, हा विश्वास ठेवा. या जन्मांतून दूर झालां म्हणजे तुम्हांला पुन्हा मनुष्यजन्म प्राप्त होऊन योगाभ्यासाकडे तुमचें लक्ष लागेल. पैकीं या स्वतंत्राला प्राणिमात्राच्या भाषेचें ज्ञान होईल. आपण सर्वजण त्याचे फार आभारी आहों. कारण, याच्या कृतीमुळेंच आपण पितरांच्या उद्देशानें प्रथम गाईचा वध करून मग तिचा स्वीकार केला. या कृतीनें आपले पितर तृप्त होऊन त्यांच्या प्रसादानें आपणाला योगाच्या साधनानें प्राप्त होणारें ज्ञान मिळालें. यासाठीं तुम्हां सर्वांचा शाप कांहीं काळानें पुरा होईल; व "सप्तव्याधा इत्यादि" जन्मांतरचे वृत्तांताचा ज्यांत

---

१ कौशिक पुत्रांच्या या चक्रवाकादि जन्मांची कथा ज्यांत संगृहित केली आहे असे श्लोक श्राद्धसमयीं म्हटले जातात, ते हेः—

( पुढें चालू. )

उल्लेख आहे असलीं वाक्यें तुमच्या कानीं पडून तुम्हांस पूर्ववत् योगसिद्धि प्राप्त होईल.

## अध्याय तेविसावा.

—:०:—

### हंसवर्णन.

मार्कंडेय सांगतातः—ते मानससरोवराचे तीरीं विहार करणारे पद्मगर्भ, अरविंदाक्ष, क्षीरगर्भ, सुलोचन, उरुबिंदु, सुबिंदु व हेमगर्भ, अशीं नांवें असलेले सातही हंस, जल आणि वायु भक्षण करून योगाभ्यासानें आपलें शरीर शुष्क करीत होते. राजा बिभ्राज याची स्थिति थेट उलट होती. तो शरीरानें गलेलठ्ठ असून कामुक होता, व आपल्या स्त्रिया व भोगांगना बरोबर घेऊन इंद्र जसा नंदनवनांत शिरतो, त्याप्रमाणें मानससरोवरावरील वनांत शिरला, व तेथें हे पक्षी योगाभ्यास करण्यांत गुंतले आहेत असें त्यानें पाहिलें. हे पक्षी होऊन जर योगाभ्यास करितात, तर मी मनुष्य होऊन विषयासक्त राहाणें हें मोठेंच लज्जाकर आहे, असें वाटून हीच गोष्ट मनांत घोळीत घोळीत तो आपल्या नगरास परत फिरला. त्याला अणुह नांवाचा एक धार्मिक पुत्र होता. याला अणुह नांव पडण्याचें कारण अणु म्हणजे अत्यंत सूक्ष्म असेही धर्माचार साधण्याविषयीं तो परम तत्पर असे, हें होय. याला जी स्त्री मिळाली होती तीही मोठी योगनिष्ठ, सद्गुणी, सत्यशील व सर्वथा पूज्यलक्षणांनीं युक्त अशी होती. ही स्त्री म्हणजे शुकाचार्यांची कन्या जी कृत्वी ती. हे भीष्मा, ही कृत्वी म्हणजे बर्हिषद पितरांची कन्या जी पीवरी म्हणून पूर्वीं सनत्कुमारांनीं मला सांगितली होती तीच; व त्या वेळींही ही मोठी सत्यपरायण, अजितेंद्रियांना अगम्य व स्वतः योगनिष्ठ असून योगनिष्ठाचीच माता व योगनिष्ठाचीच पत्नी होईल म्हणून मी सनत्कुमारांच्या तोंडची पितृकल्पाची हकीकत सांगत असतां बोललोंच आहें; व त्याप्रमाणेंच ती झाली. असो; बिभ्राज राजा घरीं येतांच त्यानें आपले प्रजाजन व ब्राह्मण यांस बोलावून स्वस्तिवाचन वगैरे करवून मोठ्या आनंदानें आपला पुत्र अणुह यास राज्यावर बसविलें; व स्वतः ते सहचारी हंसपक्षी मानससरोवराचे कांठीं जेथें आढळले होते तेथेंच तपश्चर्येसाठीं गमन केलें. तेथें गेल्यावर त्या सरोवराचे शेजारींच मोठी तीव्र तपश्चर्या आरंभिली. त्यानें सर्व विषयवासना सोडून दिल्या, व अन्नपाणीही सोडून केवळ वायुभक्षण चालू ठेविलें. ही तीव्र तपश्चर्या करण्यांत त्याचा गूढ हेतु असा होता कीं, आपण या जन्मीं दृढ संकल्प करून त्याचे बळावर पुढील जन्मीं हे जे योगनिष्णात हंसबंधु आहेत यांपैकीं एकाच्या उदरीं येऊं. म्हणजे आपणांस अनायासेंच योगप्राप्ति होईल.[1] ही गोष्ट मनांत घेऊन त्यानें मोठ्या नेटानें तपश्चर्या आरंभिली, व आपलें तपस्तेज इतकें वाढविलें कीं, पाहाणाराला तो सूर्यासारखा देदीप्यमान दिसूं लागला; व त्यानें प्रकाशित केल्यामुळें त्या वनाला व त्या सरोवरालाही तेव्हांपासून बैभ्राज असेंच नांव पडलें. इकडे त्या सात पक्ष्यांपैकीं जे अखंड योगनिष्ठ होते, ते चार व जे पूर्वीं सांगितल्याप्रमाणें योगभ्रष्ट होते ते तीन

( मागील पानावरून पुढें चालू. )
सप्तव्याधा दशारण्ये मृगाः कालंजरे गिरौ ॥ चक्रवाकाः सरोद्वीपे हंसाःसरसिमानसे ॥ तेपिजाताःकुरुक्षेत्रे ब्राह्मणा वेदपारगाः॥ प्रस्थितादीर्घमध्वानं यूयंकिमवसीदथ॥ अमूर्तानांच मूर्तानां पितॄणाम् सीप्ततेजसाम् ॥ नमस्यामि सदा तेषाम् ध्यायिनाम् योगचक्षुषाम् ॥ ३ ॥

1 अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् । भ. गी. योग्याचा पुत्र योगी व्हावा हें असंभाव्य नव्हे; गवयाचें पोर रडलें तरी सुरावर रडतें, या लौकिक म्हणींत हेंच तत्त्व संगृहित आहे.

हे सर्वही तपानें निष्पाप होऊन कांपिल्यनगरींत जन्मास आले. यांपैकीं ब्रह्मदत्त हा धुरीण होता. यांपैकीं जे चौघे पूर्वजन्मीं अखंड योगनिष्ठ होते ते या जन्मीं ज्ञान, ध्यान, तप, पूजा, वेद, वेदांग, यांत निष्णात असून पूर्वजन्मींचें त्यांना स्मरण होतेंच; आणि बाकीचे जे तीन त्यांना मात्र भूल पडली. यांपैकीं पूर्वींचा जो स्वतंत्र तो ब्रह्मदत्त नांवानें अणुहाचे पोटीं उत्पन्न झाला. कारण, पूर्वीं पक्षियोनींत असतां असाच जन्म आपणास व्हावा असा त्याचा संकल्पच होता. हा ब्रह्मदत्तही या जन्मीं ज्ञान, ध्यान, तप, इत्यादिकांनीं पवित्र असून मोठा यशस्वी व वेदवेदांगनिपुण होता. छिद्रदर्शी व सुनेत्र हे जे उरलेले दोघे बंधु ते या जन्मीं वत्स व बाभ्रव्य वंशांत उत्पन्न झाले. हेही मोठे कर्मनिष्ठ व वेदवेदांगप्रवीण होते; व पूर्वजन्मापासून एकत्र राहिले असल्यामुळें या जन्मीं ब्रह्मदत्ताचे सोबती झाले. या जन्मीं त्यांना पांचाल व कण्डरीक अशीं नांवें होतीं. पैकीं पांचाल हा ऋग्वेदामध्यें प्रवीण होता, व यामुळें त्यानें आचार्यत्व स्वीकारिलें. कण्डरीक हा सामवेद व यजुर्वेद यांत निष्णात असल्यानें त्यानें छंदोगत्व व अध्वर्युत्व पतकरिलें. राजा ब्रह्मदत्त हा सर्व प्राण्यांचे शब्द समजण्यांत निपुण होता. त्याची ह्या पांचालकण्डरीकांशीं मोठी गट्टी जमली. हे तिघेही पूर्वजन्मींच्या वासनेप्रमाणें कामलोलुप होऊन मैथुनादि कर्मांत जरी आसक्त होते तरी पूर्वसंस्कारांमुळें त्यांना धर्म, अर्थ, काम या तिन्ही शास्त्रांची माहिती पुरापूर होती. असो; निर्मळ ब्रह्मदत्ताला राज्यावर बसवून अणुह जो तपश्चर्येला गेला तो पूर्ण योगनिष्ठ होऊन परमगतीला पोंचला. ब्रह्मदत्ताला जी बायको मिळाली ती असितकुलोत्पन्न जो देवलऋषि त्याची मुलगी होती. हिचें नांव सन्नति असें होतें. हिच्या नांवाप्रमाणेंच ही सन्नतिमान् म्हणजे सज्जनांशीं नम्रपणें वागणारी किंवा सत् म्हणजे जें ब्रह्म त्याचे ठिकाणीं जिची मति लीन आहे अशी होती. सौंदर्यानेंही फार उत्तमच होती. हिचें तेज मोठें उग्र असे व हिला योगाचा नाद असल्यामुळें ब्रह्मदत्ताच्या व हिच्या समजुतीचा एकमेळ होता; व हें पाहूनच ब्रह्मदत्तानें तिला देवलापासून भार्यात्वासाठीं मागून घेतली.

हे राजा, पूर्वजन्मींचा जो पांचिक तो या सातव्या जन्मींही पांचवाच होता. सहावा जो खसृम तो कण्डरीक झाला, व सातवा तो ब्रह्मदत्त झाला, हें मागें सांगितलेंच आहे. उरले जे चार पक्षी तेही कांपिल्य नगरींतच एका वेदवेत्त्या दरिद्री ब्राह्मणाचे पोटीं येऊन सख्खे भाऊ झाले. त्यांचीं नांवें:—धृतिमान्, सुमना, विद्वान् व सत्यदर्शी अशीं होतीं. हे चौघेही वेदाध्ययनांत मोठे निपुण असून त्यांचें मुक्तिमार्गाकडे सदैव लक्ष असे. कारण, पूर्वसंस्कारामुळें त्यांचे ठिकाणीं तसलेंच ज्ञान उत्पन्न झालें होतें; यामुळें ते याही जन्मीं सदैव योगनिरत राहून आपण आतां सिद्ध झालों असें त्यांना वाटतांच ते हा लोक सोडून जाण्याच्या खटपटीस लागले. जातांना आम्ही येतों म्हणून त्यांनीं आपल्या बापाचा निरोप विचारिला. तेव्हां तो म्हणाला कीं, बाबांनो, तुम्हीं पुत्रांनीं अशा स्थितींत मला सोडून जाणें हा निव्वळ अधर्म आहे. कारण, माझ्या पोटीं जन्मून माझें दरिद्र तुम्हीं विच्छिन्न केलें नाहीं, किंवा संतति करून वंशवृद्धि केली नाहीं. माझे पश्चात् राहून माझें गयावर्जनादि करणें हें तर लांबच राहिलें, पण, माझी या वृद्ध वयांत सेवाचाकरीही केली नाहीं असें असून मला तुम्हीं सोडून चाललां, हें तुम्हांला शोभत नाहीं.

हें बापाचें भाषण श्रवण करून ते सर्व ब्राह्मण बापाला म्हणाले कीं, तुम्हाला आत्मोद्धारार्थ संततीची गरज नाहीं. आम्ही ब्रह्मवेत्ते असल्यामुळें तुमचा उद्धार झालेलाच आहे; आतां प्रश्न उरला उपजीविकेचा. त्याची तोड तुम्हाला सांगतों. आपला ब्रह्मदत्त राजा हा मोठा पुण्यवान् आहे, तो आपल्या मंत्र्यांसह बसला असेल अशी वेळ साधून त्याकडे जा आणि "सप्तव्याधा" हे श्लोक[1] त्याचे पुढें म्हणा. या श्लोकांत फार गूढार्थ आहे, तो जाणून ब्रह्मदत्त तुम्हावर प्रसन्न होईल व तुम्हाला गांवशीव इनाम देईल, वाटतील तसले भोग्य पदार्थ देईल, फार काय तुमची जी इच्छा असेल ती तृप्त करील. करितां तुम्हीं निश्चिंत असा.

याप्रमाणें पित्याला सांगून व त्याची पूजा करून ते पुन्हा योगधारणा धरून परम शांतीला पोंचले.

~~~~~~~~~~

## अध्याय चोविसावा.

—:०:—

### ब्रह्मदत्ताचा वृत्तांत.

मार्कंडेय सांगतातः—मागें वैभ्राज राजा त्या सात हंसांपैकीं एकाचे उदरीं यावें म्हणजे आपणास अनायासें योगसिद्धि होईल, अशा संकल्पानें तप करून देह ठेविता झाला म्हणून सांगितलें; त्या संकल्पानुरूप तो तपस्वी व योगनिष्ठ वैभ्राज विष्वक्सेन या नांवानें जन्मास आला. पुढें एके दिवशीं ब्रह्मदत्त हा आपली भार्या सन्नति हिला बरोबर घेऊन मोठ्या आनंदानें इंद्राणीसहित रमणाऱ्या इंद्राप्रमाणें वनांत विहार करीत होता, आणि विहार करीत असतां एक मुंगळा कामवश होऊन आपल्या प्रियेची कामदानाविषयीं काकुळती येऊन याचना करीत होता, तें त्यानें ऐकिलें, व तो मुंगळा प्रार्थना करीत असतां ती इवलिशी मुंगी त्याच्या चारगटपणानें त्याचेवर संतापली आहे, असें त्यानें पाहिलें. त्याला त्यांची भाषा समजत होतीच; त्यामुळें तो प्रकार ध्यानीं येतांच ब्रह्मदत्त एकाएकीं खदखदां हंसला. जवळ त्याची स्त्री सन्नति होती, तिला पति कां हंसला, याचें कारण बरोबर न कळल्यामुळें हा आपणासच हंसला असा संशय येऊन ती लाजल्यासारखी झाली व तिचा नूर अगदीं उतरून गेला. त्या सुंदरीच्या हृदयाला ती गोष्ट इतकी लागली कीं, तिनें बहुत दिवस अन्नपाणी सोडलें. नवरा जेव्हां तिची विनवणी करून, "प्रसन्न हो, रुसलीस कां?" म्हणून म्हणूं लागला, तेव्हां ती मनोहर हास्य करून म्हणाली, "तुम्हीच माझा उपहास करून मला कारण विचारितां? मला मुळींच आतां अशा जगण्याचा कंटाळा आला आहे." तें ऐकून त्यानें हंसण्याचें खरें कारण काय होतें तें तिला सांगितलें, पण तिचा विश्वास बसेना. ती घुश्शांतच त्याला म्हणाली कीं, तुम्ही म्हणतां पण ही गोष्ट माणसांचे अंगीं वसत नाहीं. हे राजा, एक तर देवाची कृपा किंवा पूर्वजन्मींचें तपोबल, किंवा योगबल यांच्या साहाय्याशिवाय मुंग्यांची भाषा समजेल असा कोण मनुष्य आहे बरें? तें कशाला, आपणच सर्व प्राण्यांची भाषा जाणतां ना? तर जेणेंकरून ही गोष्ट माझे समजुतींत येईल त्या प्रकारें माझी समजूत करा, नाहीं तर मी प्राणत्याग करीन. हें माझें बोलणें थट्टेचें नव्हे; खरेंखुरें आहे.

राणीचें हें कठोर भाषण ऐकून राजा मोठ्या विचारांत पडला, व संकटनिवारणार्थ आहार वर्ज करून सर्व भूतपति व शरणा-

[1] हे श्लोक मागें टीपेंत आहेत.
~~~~~~~~~~

गतांचा पालक जो परमात्मा नारायण त्याला अनन्यभावानें व एकाग्रचित्तानें शरण गेला. त्यावेळीं सहाव्या रात्रीं भूतमात्राविषयीं दयार्द्र असणारा भगवान् नारायण प्रभु त्याला प्रत्यक्ष दर्शन देऊन म्हणाला, 'उदईक तूं सुखी होशील' असें म्हणून देव तेथेंच दिसेनासा झाला.

इकडे मागें त्या चार ब्राह्मणांचा जो दरिद्री पिता सांगितला तो आपल्या मुलांपासून ते श्लोक शिकून घेऊन आपण कृतकृत्य झालों असें मानूं लागला. तथापि, त्याला ते श्लोक मंत्र्यांसह राजाला गांठून त्याचे कानीं घालण्याला अवसर सांपडेना, म्हणून तो विवंचनेंत होता. इतक्यांत राजा ब्रह्मदत्त नारायणाचा वर प्राप्त झाल्यामुळें हर्षित होऊन सरोवरांत स्नान करून मोठ्या आनंदानें आपल्या कांचनमय रथांत बसून नगराकडे चालला. त्या वेळीं त्याचा स्नेही द्विजश्रेष्ठ कण्डरीक यानें रथाच्या पागा धरिल्या होत्या; व दुसरा स्नेही पांचाल हा चवरी व व्यजन ढाळीत होता. आपले श्लोक कानीं घालण्याला हीच संधी योग्य आहे असें मनांत आणून त्या ब्राह्मणानें तो राजा व त्याचे ते दोघे सचिव यांचे कानीं ते दोन्हीं श्लोक घातले. ते श्लोक असेः—

सप्तव्याधादशार्णेषु
मृगाः कालिंजरे गिरौ ॥
चक्रवाका शरद्वीपे
हंसाः सरसि मानसे ॥ १ ॥
तेभिजाता कुरुक्षेत्रे
ब्राह्मणाः वेदपारगाः ॥
प्रस्थिता दीर्घमध्वानं
यूयं किमवसीदथ ॥ २ ॥

**यांचा अर्थः**— दशार्ण देशांत सातजण व्याध होते. पुढें कालिंजर गिरीवर ते मृग झाले. नंतर शरद्वीपांत चक्रवाक झाले व मानससरोवरांत हंस झाले. अखेरीस त्यांपैकीं आम्हीं चौघे कुरुक्षेत्रांत वेदपारग असे ब्राह्मण होऊन मोक्षमार्गाला गेलों आणि मग तुम्हींच तेवढे कां फसून पडलां?

याप्रमाणें हे श्लोक कानीं पडतांच राजा ब्रह्मदत्त मूर्च्छा येऊन पडला; व त्याचे सचिव पांचाल्य व कण्डरीक यांच्या हातून रथाच्या पागा व चाबूक आणि चामर-व्यजन हीं गळून पडलीं. हा प्रकार पाहून राजाचे मित्र व नागरीक गडबडून गेले. राजा आपले सचिवांसह तसा रथांतच मूर्च्छित पडला होता. नंतर शुद्धीवर येऊन ते सर्व नगरास परत आले.

परत आल्यापासून त्यांचे डोळ्यांपुढें तें सरोवर सारखें दिसूं लागलें व त्यांनीं पूर्वजन्मीं जो योगाभ्यास अर्धवट सोडला होता त्याची त्यांना उपस्थिति झाली. नंतर राजानें ब्राह्मणांना विपुल द्रव्य व भोग्य वस्तु देऊन आपल्या राज्यावर आपल्या पराक्रमी पुत्रास-विश्वक्सेनास बसविलें व आपण स्वस्त्रीसह वनाची वाट धरिली. त्या वेळीं त्याची स्त्री म्हणजे देवलाची शहाणी कन्या सन्नति ही आपला नवरा योगाभ्यासार्थ वनांत चालला हें पाहून बहुत खूष होऊन त्याला म्हणाली कीं, महाराज, आपणास मुंग्यांची भाषा कळते हें मला माहीत नव्हतें असें नाहीं; परंतु, आपण योगाभ्यास सोडून कामासक्त झालां हें पाहून तुम्हांस पुन्हा योगाकडे प्रवृत्त करावें व तुमचें मन विषयांतून उडवावें म्हणूनच मीं मुद्दाम तुमच्यावर कोप केला. आतां तुम्ही शुद्धीवर आलां, आतां जिच्याहून दुसरी वरिष्ठ गति नाहीं व जी प्राणिमात्राचें अंतिम इष्ट आहे, त्या गतीला आपण जाऊं. तुम्ही पूर्वींचेच योगाभ्यासी आहांत, पण, योगायोगानें तो क्रम मध्यें बंद पडला होता म्हणून मीं तुम्हाला या युक्तीनें जागें केलें. पत्नीचें तें बोलणें ऐकून राजाला आपल्या स्त्रीविषयीं फारच प्रेमा

उत्पन्न झाला; व मग तीं दोघें वनांत जाऊन त्यानें मोठ्या नेटानें योगाभ्यास आरंभिला व अत्यंत दुर्लभ अशा गतीला तो गेला. कंण्डरीकही योगाभ्यासाला लागला, व त्यानें सांख्ययोगसाधन करून व त्या बलानें पापरहित होऊन सिद्धस्थिति कमविली. पांचाल्यानें तर दोघांहूनही अधिक मोठी कर्तबगारी केली. त्यानें तीव्र तपश्चर्या तर केलीच, पण त्याशिवाय वेदाचा क्रम लावून देऊन शिक्षा नामक ग्रंथ निर्माण करून योगाचार्य ही पदवी मिळविली. हे गंगापुत्रा, या सर्व गोष्टी पूर्वीं माझ्या डोळ्यांदेखत झाल्या. यावरून श्राद्ध करण्याचें माहात्म्य केवढें आहे, हें तुझ्या लक्षांत आलेंच असेल. तर आतां हें नीट मनांत वागीव, व त्याप्रमाणें चाल म्हणजे तुझेंही कल्याण होईल. तुजशिवाय इतरही जे कोणी या सप्त बंधूंचें उत्तम चरित्र ध्यानांत वागवतील त्यांनाही पश्वादि नीच योनी कधीं प्राप्त होणार नाहींत. हे भारता, ह्या उपाख्यानांत फार खोल अर्थ भरला आहे, यासाठीं हें ज्याच्या मनांत घोळत राहील त्याचे ठिकाणीं आपोआपच योगप्रवृत्ति होऊन तो थोरांच्या मार्गाला लागेल. याच आख्यानाच्या नादांत जो राहील त्याला त्या नादानादानें शांति प्राप्त होऊन अखेर भूलोकांत दुर्लभ अशी शुद्ध योगगति प्राप्त होईल.

वैशंपायन सांगतात:—हे जनमेजया, बुद्धिवान् मार्कंडेय ऋषि यांनीं श्राद्धाचे फलासंबंधानें पूर्वीं हा असा इतिहास सांगितला. हा सांगण्यांत त्यांचा उद्देश सोमाचें आप्यायन व्हावें, असा होता. सोमाचें आप्यायन इच्छिण्याचें कारण, सोमाच्या योगानें पितरांची व लोकांची तृप्ति होते. कारण, भगवान् सोम हा दिव्य औषधिद्वारा भूमिस्थानचें संतर्पण करितो व सोमापासूनच पितरांचीही तृप्ति होते, इतकें सोमाचें माहात्म्य आहे. याजसाठीं ह्या वृष्णिवंशकथनाचे ओघांतच मी तुला सोमाचे वंशाचेंही वर्णन सांगतों, तें ऐक.

## अध्याय पंचविसावा.

—०:—

### सोमोत्पत्तिवर्णन.

वैशंपायन सांगतात:—पूर्वकालीं ब्रह्मदेवानें प्रजा निर्माण करण्याचा जेव्हां संकल्प केला, त्या वेळीं त्याच्या मानसापासून भगवान् अत्रि ऋषि हे उत्पन्न झाले. हेच सोमाचे जनक. त्या काळीं अत्रिऋषींनींही प्रजावृद्धि करावयाची, असा ब्रह्मदेवाप्रमाणेंच दृढ निश्चय केल्यामुळें आपल्या पुत्रांसह कर्म, मन आणि वाणी यांहीं जगत्कल्याणाचेंच आचरण चालविलें. धर्मनिष्ठा, तीव्र नियम, भूतमात्राविषयीं अहिंसा, काष्ठ, भिंति किंवा शिला यांप्रमाणें निश्चल स्थिति व ऊर्ध्वबाहुत्व यांचा अंगीकार करून त्या महातेजस्वी अत्रिऋषींनीं तीन सहस्र दिव्यवर्षेंपर्यंत "अनुत्तर[1]" नामाचें अत्यंत तीव्र असें तप केलें, असें आमचे ऐकिवांत आहे. त्या तपकालांत अत्रिऋषि अनिमेष[2] व ऊर्ध्वरेते[3] अशा स्थितींत सदैव राहिल्यानें त्यांच्या हृदयांत शुद्धसत्त्वगुणाची अत्यंत वृद्धि होऊन त्यांचें सर्व शरीरच अंतर्बाह्य शांत व शुद्ध सत्त्वमय बनलें असल्यामुळें तें सात्विक तेज अखेरीस त्यांच्या उभय नेत्रांच्या वाटे जलाचे रूपानें बाहेर पडलें. त्यांचें तेज इतकें अलौकिक होतें कीं, त्याचे योगानें दाही दिशा चमकूं लागल्या व दशादिशांच्या ज्या अभि-

---

१ या तपांत सर्वेंद्रियांचेंच मौन म्हणजे निग्रह असतो; केवळ वाणीचाच निग्रह नव्हे.

२ योगाभ्यासांत बाहेरील कोणत्याही पदार्थावर चित्ताची धारणा स्थिर करून बसतांना पापण्या हालविणें बंद पडतें, तिला अनिमेष स्थिति असें म्हणतात.

३ पुरुष बद्धवीर्य असला म्हणजे त्याचे ठिकाणीं सहजच तेजोवृद्धि होते.

मानिनी देवता त्यांना त्या तेजाविषयीं लोभ उत्पन्न होऊन सर्वजणींनीं मिळून आपल्या गर्भांचे ठिकाणीं तें तेज मोठ्या आनंदानें धारण केलें. परंतु, तें त्यांना सहन होईना; व शेवटीं त्या दिशांच्या उदरांतून एकाएकीं मोठा देदीप्यमान गर्भाचा गोळा पटकन् खालीं पडला. पडतां पडतां त्यानें सर्व लोक प्रकाशानें भरून टाकिले. हा जो पडलेला गर्भ तोच शीत किरणांचा सोम किंवा चंद्र होय. हा सोम औषधिद्वारा जीवमात्रांना पुष्टि देणारा आहे. ज्या वेळीं त्या दिशांना तो अति तेजस्वी गर्भ सहन होईना त्या वेळीं तो त्यांसकटच धरणीवर पडला. त्या वेळीं लोकांचा पितामह जो ब्रह्मदेव यानें सोम हा धरणीवर पडला असें पाहून लोकांचे हितासाठीं त्याला उचलून पटकन् रथावर बसविलें. हा रथ धर्मस्वरूप असून चार वेद हे त्या रथाची पिंजरी होती. सत्यरूप त्याच्या दोऱ्या (पागा) होत्या, व एकजात शुभ्र असे मंत्रात्मक[१] सहस्र अश्व त्याला जोडले होते. हा अत्रिपुत्र परमात्मस्वरूपी सोम धरणीतलावर आलासें पाहून ब्रह्मदेवाचे जे सात मानसपुत्र त्यांना अतिशय आनंद झाला, व अंगिरसकुलोत्पन्न भृगुऋषि यांनीं आपल्या पुत्रांसह ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद व आंगिरस, इत्यादि मंत्रांनीं स्तुति केली; त्या वेळीं त्या तेजस्वी सोमाचें तेज तिन्ही लोकांना पुष्टि देऊन शिवाय सर्वत्र फांकून राहिलें. मग ब्रह्मदेवानें त्या सोमाला तसल्या वेदरूप श्रेष्ठ रथावर बसविल्यावर समुद्रवलयांकित पृथ्वीच्या एकवीस प्रदक्षिणा केल्या. त्या वेळीं रथाच्या वेगानें धक्के बसून त्या सोमापैकीं जें तेज उसळून इकडे तिकडे धरणीवर पडलें त्यापासून औषधी वनस्पति उत्पन्न झाल्या व त्या अद्यापिही तेजानें चमकत[१] असतात. हे राजा, या दिव्यौषधींची कामगिरी देव, भूत व पितर हे तीन लोक व मनुष्य, पशु, पक्षी व सर्पादि ही चतुर्विध प्राणिसृष्टि, यांचें पोषण करणें ही आहे, आणि या औषधींना भगवान् सोम यानें पुष्टि[२] द्यावी अशी योजना आहे. ऋषींनीं केलेल्या त्या मंत्ररूप स्तवांनीं व संस्कारांनीं अधिकच तेजास चढून सोमानें दहा शेंकडे म्हणजे सहस्र वर्षेंपर्यंत तप केलें; व या तपाचे योगानें त्याची कीर्ति झाली. तेव्हां हिरण्यवर्ण[३] ज्या जलरूपि देवता त्यांचा तो निधि बनला, व ब्रह्मवेत्त्यांत वरिष्ठ जो पितामह ब्रह्मदेव त्यानें, हे जनमेजया, त्या सोमाला बीजें, औषधी, ब्राह्मण व जल यांचें प्रभुत्व दिलें.

हे राजा, ब्रह्मदेवानें साम्राज्यविधीनें सोमाला राज्यावर बसविल्यापासून तो आधींच अत्यंत तेजस्वी असल्यानें तत्काल तिन्ही लोकांना आपल्या तेजानें प्रकाशमान् करूं लागला. प्रचेतस प्रजापतीचा पुत्र जो दक्षप्रजापति याला मोठ्या व्रतशील अशा सत्तावीस मुली होत्या. त्या त्यानें या सोमाला दिल्या. या सत्तावीस कन्या म्हणजे अश्विनीभरणीप्रभृति जीं सत्तावीस नक्षत्रें तींच होत. याप्रमाणें राज्य मिळालें, सुंदर स्त्रिया मिळाल्या, तेव्हां, पितरांचा पालक जो सोमराजा त्यानें

१ सोमयागांत जी सोम नामक वल्ली असते ती रथांत घालून वेदमंत्रांनीं आणावयाची असते, त्या प्रकारास अनुलक्षून हें रूपक आहे. ही सोमवल्लि हें धरणीवर पडलेल्या सोमाचेंच रूप मानिलें आहे.

१ कवितिलक कालिदास यानें औषधी तेजानें रात्रीं चमकतात, ही कल्पना आपल्या कुमारसंभव काव्यांत घेतली आहे.

२ पुष्णामिचौषधीः सर्वाः सोमोभूत्वारसात्मकः । ( गीता, अ० १५. )

३ हिरण्यवर्णाः शुचयः पावकाः यासुजातः कश्यपः । इत्यादि मंत्रांत जलाचें हिरण्यवर्णत्व वर्णिलें आहे.

राजसूय यज्ञ आरंभिला. त्या यज्ञांत त्यानें सहस्र शेंकडे गाई दक्षिणार्थ दिल्या. त्या यज्ञांत भगवान् अत्रिऋषि यांनीं त्याचें होतृत्व पतकरिलें होतें. भगवान् भृगु हे अध्वर्यु झाले; भगवान् अंगिरा यांनीं उद्गातृत्व स्वीकारिलें; स्वतः ब्रह्मदेव हे ब्रह्मा झाले; आणि भगवान् नारायण हरि हे सदस्य झाले. याशिवाय सनत्कुमार प्रभृति जे आद्य ब्रह्मर्षि हेही त्याचे भोंवतीं जमलेच होते. अशा थाटांत यज्ञ चालला असतां आम्ही असें ऐकितों कीं, त्या सोमराजानें तिन्ही लोकांत जे जे निवडक ब्राह्मण होते त्यांना त्यांना, ब्रह्मर्षींना व सदस्यांनाही यथेच्छ दक्षिणा दिली. त्या समयीं सिनि, कुहू, द्युति, पुष्टि, प्रभा, वसु, कीर्ति, धृति व लक्ष्मी, या नऊ देवी त्याच्या सेवेंत तत्पर होत्या. सर्व यज्ञ निर्विघ्न पार पडून सोमानें शेवटीं स्वस्थ चित्तानें अवभृथ म्हणजे यज्ञांतींचें स्नानही उरकिलें. या त्याच्या महत्कृत्याबद्दल सर्व देव व ऋषि यांनींही त्याचा फार गौरव केला. मग तो राजाधिराज होऊन दाही दिशा प्रकाशवूं लागला. ( पण, हे राजा, ऐश्वर्य ही वस्तु मोठी मादक आहे.) कोणालाही न मिळणारें असें असामान्य ऐश्वर्य व ऋषिजनांसारख्यांकडून सत्कार, हीं जेव्हां त्या सोमाला प्राप्त झालीं, तेव्हां त्याचे मतीला भ्रम पडला. पहिलें तें त्याचें मर्यादशील व नम्रवर्तन सुटलें, व त्याच्या मनाला अन्यायाचे चाळे सुचूं लागले. त्यानें देवगुरु जो बृहस्पति त्याची यशस्विनी भार्या जी तारा तिला बृहस्पतीला न जुमानितां बलात्कारानें हिरावून आणिली. या कामीं देव व मोठमोठे देवर्षि यांनीं पुष्कळ रदबदली केली. परंतु, तो ज्याचें नांव तें ऐकेना व बृहस्पतीला तारा परत देईना. हें पाहून देवाचार्य बृहस्पति सोमावर फार खवळला व रथांत बसून त्याजबरोबर युद्ध करण्यास निघाला. त्या वेळीं त्या युद्धांत दैत्यगुरु शुक्राचार्य[1] हे चंद्राच्या बाजूला झाले, व बृहस्पतीचा पिता जो अंगिरस ऋषि त्याचा महातेजस्वी शिष्य जो भगवान् रुद्र तो गुरुपुत्राच्या स्नेहास्तव आपलें आजगव[2] नांवाचें धनुष्य घेऊन बृहस्पतीच्या बाजूला झाला, व त्यानें दैत्यांवर रोंख धरून ब्रह्मशिर नांवाचें परमास्त्र सोडिलें. त्या योगेंकरून दैत्यांची अब्रू खलास झाली.

असो; तारेच्या निमित्तानें जें हें देव व असुर यांचें युद्ध झालें तें फारच तुंबळ झालें. त्यामध्यें लोकांचा फारच फन्ना उडाला. हा अनर्थ टळावा म्हणून बृहस्पतीच्या बाजूला असणारे सर्वही सात्त्विक देवगण, तसेच गुरुस्त्री हरण करणाऱ्या पापी सोमाची साथ करणारे तुषितसंज्ञक देवगणही सनातन आदिदेव जो ब्रह्मा त्याकडे आश्रयार्थ गेले. त्या वेळीं ब्रह्मदेवानें एकादश रुद्रांतील ज्येष्ठ जो शंकर त्याला व शुक्राचार्यालाही युद्धापासून विनिवृत्त करून आपल्या हातीं देवी तारा बृहस्पतीच्या स्वाधीन केली. परंतु, बृहस्पति पाहातो तों तारेला सोमापासून गर्भ राहिला असून ती प्रसूतीच्या रंगांत आली होती. तें पाहून बृहस्पति म्हणाला कीं, वास्तविक पाहातां ही तुझी योनि माझे मालकीची असून तूं हिचे ठिकाणीं अन्यापासून गर्भ धारण केलास, यासाठीं तूं माझे घरांत येऊन प्रसूत होऊं नको. तेव्हां ती बिचारी तारा भलत्याच ठिकाणीं प्रसूत झाली. तें ठिकाण म्हणजे कसाड नांवाचें जें उंच गवत असतें त्याचें बेट, त्यांत ती प्रसूत

---

१ शुक्राचार्य हे दैत्यगुरु असतां चंद्रास साहाय्य करण्याचें कारण यासमयीं दुराचारामुळें चंद्र हा असुरच समजला जात होता.

२ अज म्हणजे बोकड व गो म्हणजे बैल या दोघांचीं शिंगें मिळून तें केलें होतें.

झाली. तिला जो पुत्र झाला तो अग्नीसारखा देदीप्यमान असून चोरट्यांचा केवळ काळ होता. तो उपजतांच इतका तेजस्वी होता कीं, त्यानें आपल्या तेजानें देवसुद्धां झांकून टाकिले. असला हा तेजस्वी पुत्र असावा तरी कोणाच्या पोटचा? ही शंका येऊन देव तिला पुसूं लागले. ते म्हणाले, 'हे तारे, खरें सांग. हा कोणाच्या पोटचा? सोमाच्या कीं बृहस्पतीच्या?' याप्रमाणें देवांनीं प्रश्न केला. पण ती लाजेमुळें एक बोलेना नी दोन बोलेना. तेव्हां, तिचा झालेला पुत्र तिला शाप देऊं लागला. परंतु ब्रह्मदेवानें त्याचें निवारण करून स्वतः तारेला प्रश्न केला. ते म्हणाले, 'तारे, तूं लाजूं नको, भिऊं नको (आम्ही जाणत आहों. कसेंही असलें तरी तुझा अबलेचा त्यांत कांहीं उपाय नाहीं); करितां खरें खरें असेल तें स्वच्छ सांग. हा मुलगा कोणाचा?' याप्रमाणें वरदात्या प्रभु ब्रह्मदेवानेंच जेव्हां विचारिलें तेव्हां ती नम्रपणें हात जोडून म्हणाली, "महाराज, हा सोमाचा." ते शब्द ऐकून सोमानें त्या पराक्रमी कुमाराला पुढें घेऊन त्याची टाळू हुंगली, व त्याची चलाख बुद्धि पाहून त्याला बुध असें नांव ठेविलें. हा बुध आकाशांत नेहमीं सूर्यसान्निध्यामुळें लुप्तच असतो, कदाचित् व्यक्त दिसलाच तर कांहीं तरी उत्पात वगैरे जनांला प्रतिकूल गोष्टी उत्पन्न करितो. या बुधापासून वैराज मनूची कन्या जी ईला, हिनें ऐल किंवा पुरूरवा हा पुत्र उत्पन्न करविला. पुढें या पुरूरव्याला उर्वशीचे ठिकाणीं सात पुत्र झाले. इकडे सोमानें दांडगाईनें गुरुस्त्री भ्रष्ट केली होती, या त्याच्या पापाबद्दल त्याला राजयक्ष्मा नांवाचा रोग जडला. त्या रोगापासून सोम क्षीण होऊं लागला. तेव्हां तो आपला पिता अत्रि ऋषि यांसच शरण गेला. त्या वेळीं महातपस्वी अत्रि ऋषींनीं त्याचें तें दुःख दूर केलें. मग सोम हा राजयक्ष्मा व्याधीपासून मुक्त होऊन पूर्ववत् तेजानें तपूं लागला.

हे महाराजा, याप्रमाणें यश वाढविणारें असें हें सोमाचें जन्म मीं तुला सांगितलें. या जन्माच्या श्रवणानें धनधान्य, आरोग्य, आयुष्य, पुण्य, पापमुक्ति व सुविचारपूर्ती हीं प्राप्त होतात. आतां या सोमाच्या पुढील वंशाचें वृत्त तुला सांगतों.

## अध्याय सव्विसावा.

—:०:—

### एलोत्पत्तिवर्णन.

वैशंपायन सांगतात:—हे जनमेजया, बुधाला जो पुरूरवा म्हणून पुत्र झाला म्हणून सांगितलें, तो मोठा विद्वान्, तेजस्वी, दानशील, याग करून विपुल दक्षिणा देणारा, ब्रह्मवादी, पराक्रमी, युद्धांत शत्रूंना अजिंक्य, अग्निहोत्र ठेवणारा, यज्ञकर्ता, सत्यवादी, पवित्र बुद्धीचा, स्त्रियांना मोह पडेल इतका सुंदर असून एकांतांत पडद्याआडच कामचेष्टा करणारा असा होता. फार काय सांगावें? त्या काळीं तिन्ही लोकांत यशानें त्याची बरोबरी करणारा असा कोणी नव्हता. असा तो ब्रह्मवादी, क्षमाशील, धर्मज्ञ व सत्यनिष्ठ पाहून मोठी नांवाजलेली जी उर्वशी नांवाची अप्सरा, ती आपले दिव्यपणाचा गर्व बाजूला ठेवून त्याला वरती झाली. हे राजा, मग तो पुरूरवा त्या दिव्य सुंदरीसह चैत्ररथ

---

१ मन जाणें पापा व आई जाणें लेंकाच्या बापा. चतुर्धर म्हणतात, गर्भ कोणी स्थापला ही गोष्ट आईवांचून ब्रह्मदेवालाही कळत नाहीं.

२ कारण, त्याला निबाप्या किंवा दुबाप्या म्हणवून घेण्याची वेळ येणार.

३ हा मूळ पुरुष असून, शरवणांत गेल्यानें स्त्री झाला, व त्या कालांत बुधापासून पुरूरवा नांवाचा पुत्र झाला.

नामक रमणीय वनांत दहा वर्षें, मंदाकिनीच्या तीरीं पांच वर्षें, अलकानगरींत पांचवर्षें, बदरिकारण्यांत सहा वर्षें, नंदन नामक सर्वोत्कृष्ट वनांत सात वर्षें, वाटेल त्या वेळीं जेथें वृक्ष फल देतात, अशा उत्तर कुरूंत आठ वर्षें, गंधमादन पर्वताच्या पायथ्याशीं दहा वर्षें आणि उत्तर मेरूच्या पृष्ठभागावर आठ वर्षें, याप्रमाणें प्रत्यक्ष देवही जेथें विहारासाठीं येतात असल्या या उंची उंची वनांत मोठ्या चैनींत व रासरंगांत राहिला. त्यानें राजा या नात्यानें, मोठमोठाल्या ऋषींनीं ज्याची प्रशंसा केली आहे, अशा प्रयाग प्रांतावर राज्य केलें. उर्वशीपासून त्याला सात[1] मुलगे झाले. ते सर्वही स्वर्गांत जन्म पावलेल्या देवकुमारांप्रमाणें उदार व सुंदर होते. त्यांचीं नांवें: आयु, अमावसु, विश्वायु, श्रुतायु, दृढायु, वनायु व शतायु.

जनमेजय विचारतो:—हे वैशंपायना, आपण बहुश्रुत आहां तेव्हां मला हें सांगा कीं, उर्वशी ही अप्सरा म्हणजे स्वर्गांत रहाणारी व गंधर्वादि देवांनीं उपभोग्य असें असतां ती देवांस सोडून पुरूरव्यासारख्या मानवी राजास कशी भाळली ?

वैशंपायन सांगतातः—तुझ्या शंकेचें समाधान असें आहे कीं, या उर्वशीला ब्रह्मदेवाचा शाप झाला होता, त्यामुळें ती मनुष्याचे हातीं लागली; व तो शाप नियमित कालपर्यंतचा असल्यानें तिनें त्या शापांतून मुक्त होण्यासाठीं पुरूरव्याला अंगीकारितांना त्याच्या जवळ कांहीं करार केले; व मग ती त्याच्या स्वाधीन झाली. ते करार असे. ती सुंदरी म्हणाली, ‘ हे राजा, मी तुला वश होतें; परंतु तूं केव्हांही माझ्या दृष्टीस नग्न पडतां कामा नये. शिवाय तुझी लहर लागेल तेव्हां मीं तुला भोग देणार नाहीं, तर जेव्हां मला कामचेतना होईल तेव्हांच तूं मैथुन करावें. शिवाय दिवसभर तूं थोडेंसें तूप खाऊनच रहावें, दुसरें कांहीं खाऊं नये; व आपल्या निजावयाचे बिछान्याजवळ दोन मस्त मेंढे सदासर्वदा बांधून ठेविलेले पाहिजेत. हे राजा, हा करार जर तुला कबूल असेल तर मी तुझी होतें. ती तरी तूं जोंपर्यंत हा करार अक्षरशः पाळशील तोंपर्यंतच मी राहीन. त्यांत काडीमात्र ढिलाई झाली कीं, मी चालती होईन. तेव्हां काय तें बोल. माझ्या सर्व शर्ती तुला पटल्या ?’

राजा म्हणालाः—“ पटल्या, पटल्या. मी त्या सर्व नीट पाळीन;” हे जनमेजया, पुरूरव्याला त्या तबियतखोर उर्वशीनें इतकें जखडून घेतलें तेव्हां कुठें ती त्याच्याजवळ राहिली. ती तरी शापप्रभावामुळें थोडीशी मूढबुद्धि बनली होती म्हणून टिकली. तिनें त्या राजाजवळ एकंदर एकूणसाठ वर्षें काढिलीं.

इकडे उर्वशी ही स्वर्गांतली वस्तु होऊन मनुष्याच्या हातीं लागली, ही गोष्ट गंधर्वांना चैन पडूं देईना. ते परस्परांत खलबतें करूं लागले. ते म्हणाले कीं, उर्वशीसारखी निवडक स्त्री जी केवळ स्वर्गालाही भूषण आहे ती माणसाच्या हातीं रहावी हें कांहीं ठीक नव्हे. तर गडेहो, जिकडून ती पुनरपि देवांच्या हातीं येईल असली कोणी तरी शक्कल योजा. त्या वेळीं त्या बैठकींत विश्वावसु नांवाचा एक मोठा बोलका गंधर्व होता. तो पुढें होऊन म्हणाला, ‘ उर्वशी व पुरूरवा यांचे ज्या वेळीं पूर्वीं करारमदार ठरले त्यावेळीं मीं ते ऐकले आहेत. त्यांचा सारांश असा आहे कीं, तिनें दिलेल्या शर्ती पाळण्यांत काडीमात्रही चूक

[1] या मुलांची संख्या व यांचीं नांवें यांचा मेळ नाहीं. भारत शांतिपर्वांत ही संख्या सहा असून त्यांत आयु व श्रुतायु हीं दोनच नांवें मिळतीं आहेत. मत्स्यपुराणांत ही संख्या आठ असून आयु, दृढायु व शतायु हीं तीनच नांवें मिळतीं आहेत, बाकी भिन्न आहेत.

राजानें केली कीं तिनें त्याला रामराम ठोकलाच. अशी हडसून खडसून बोली झालेली आहे; आणि राजाच्या हातून करार कसा मोडला जाईल त्याची हिकमत मला पुरी माहीत आहे. याकरितां हे गंधर्वहो, तुमच्या कार्यसिद्धीसाठीं मीच जातों, मात्र माझे मदतीला कांहीं मंडळी पाहिजेत; असें म्हणून तो यशस्वी विश्वावसु प्रयाग नगरीला गेला. तेथें त्यानें राजाच्या शय्यागारांत शिरून त्या दोन मेंढ्यांपैकीं एक मेंढा चोरून नेला. गंधर्व येऊन गेला व आपला शाप संपण्याचीही वेळ भरली, हें मनांत आणून ती चारुहासिनी ( गोडगोड हंसणारी ) राजाला म्हणाली कीं, माझ्या मुलांपैकीं एक आज येथें दिसत नाहीं. तो कोणी नेला, याचा शोध करा. ( मला चैन पडत नाहीं. ) कारण, या मेंढ्यांवर मी आईप्रमाणें जीवप्राण करतें हें तुम्हीं नित्य पाहातांच. उर्वशीनें याप्रमाणें राजाला ज्या वेळीं हटकलें त्या वेळीं तो नग्न स्थितींत असल्यानें तो उत्तर द्यायला पुढें होईना. कारण, त्याच्या पोटांत उभें राहिलें कीं, आपण उर्वशीच्या दृष्टीस नागवे पडलों कीं, करार मोडला असें होईल. या कारणास्तव तो जागच्याजागींच पडून राहिला. इतक्यांत गंधर्व मंडळींनीं दुसराही मेंढा लांबविला. त्या वेळीं देवी उर्वशी राजाला म्हणाली कीं, 'अहो, हें काय, हें काय; तुम्हीं प्रभु म्हणवीत असतां माझा दुसराही पोरगा हालोहाल कोणीं येथून उठविला ? आणि मी बापडी अनाथासारखी बसलें आहें. याची कांहीं तरी शंका बाळगा.' इतकें जेव्हां खोंचून उर्वशी बोलली, तेव्हां त्या झटक्यांत आपण नग्न आहोंत ही शंका मनांत न ठेवितां राजा त्या एडक्यांचा माग काढीत धांवूं लागला. गंधर्व वाटच पहात होते. त्यांनीं तत्काळ अशी कांहीं विद्युल्लता तेथें उत्पन्न केली कीं, तिच्या तेजानें त्या सर्व अंतःपुरांत लखलखाटच होऊन राहिला. राजेसाहेब दिगंबरच होते, ते उर्वशीच्या तसेच नजरेस पडले. तिला तेंच हवें होतें. मूळची अप्सरा ती ! वाटेल तसलें रूप घेण्याची विद्या तिला अवगतच होती, तेव्हां ती तेथल्या तेथेंच दिसेनाशी झाली.

इतक्यांत राजा उधळलेले मेंढे गांठून घेऊन परत घरांत आला, आणि पहातो तों उर्वशी नाहीं. तेव्हां हंबरडा फोडून रडूं लागला; नंतर वेडा होऊन तिला धुंडाळण्यांत इकडे तिकडे भटकून त्यानें सर्व पृथ्वी पालथी घातली. शेवटीं कुरुक्षेत्रांत प्लक्षतीर्थावर सुवर्णकमलांनीं युक्त अशी एक पुष्करणी होती, तींत ती सुंदरी, दुसऱ्या पांच अप्सरांसह क्रीडत बसलेली त्याच्या दृष्टीस पडली. एवढा बलाढ्य राजा, पण उर्वशीला पाहातांच त्यानें मोठाच गळा काढिला. उर्वशीनेंही राजा जवळ येऊन ठेपला असें पाहून आपल्या संवगडीनींना म्हटलें कीं, मी ज्याजवळ राहिलें होतें तोच हा राजा, असें म्हणून तिनें राजाकडे बोट दाखविलें. तेव्हां ही आतां पुन्हा या राजाबरोबर निघून जाते किंवा काय अशी शंका येऊन तिच्या सख्या गोंधळून गेल्या. इतक्यांत राजा उर्वशीला मिनतवारीनें म्हणूं लागला, 'हे सुंदरी, तुला वाटेल तर मन मानेल तसें मला तडातड टाकून बोल, कठोरपणानें वागव; परंतु, आतांपर्यंत तूं माझी जाया ( जिचे ठिकाणीं पुत्ररूपानें पति जन्म घेतो अशी स्त्री ) या नात्यानें मजपाशीं वागत होतीस, तेंच नातें कायम मनांत वागवून मजपाशीं राहा, दुसरें माझें कांहीं म्हणणें नाहीं.' याप्रमाणें तिच्याशीं गुळचट गोष्टी करीत राजा बसला. उर्वशीनेंही त्याला त्या वेळीं गोडसेंच उत्तर दिलें. ती म्हणाली, 'हे प्रभो, माझ्या जायात्वाप्रमाणें तुजपासूनच माझे ठिकाणीं गर्भ राहिला आहे.

याकरितां तूर्त मी तुजकडे येत नाहीं. आजपासून एक संवत्सरानें मी प्रसूत होईन, आणि तुला पुत्रच होतील. ही गोष्ट झाल्यावर एकदां एक रात्र तुला मजबरोबर राहावयास मिळेल, जास्ती कांहीं नाहीं.' उर्वशीचे हे शब्द ऐकून तेवढ्यानेंच राजाला किती तरी आनंद झाला; आणि त्या आनंदांतच तो आपल्या नगरीला परत गेला. मग एक संवत्सर भरतांच उर्वशी संकेताप्रमाणें त्याकडे आली. राजानेंही तिजबरोबर ठरल्याप्रमाणें एक रात्र घालविली. नंतर उर्वशी पुरूरव्याला म्हणाली, 'हे राजा, हे माझे गंधर्वगण तुला वर देण्याला तयार आहेत. याकरितां तूंच होऊन त्यांजपासून वाटेल तो वर मागून घे. मुख्यतः आपण गंधर्वतुल्यच व्हावें हें तूं माग.' राजा म्हणाला, 'फार बरें.' व त्यानें त्याप्रमाणें गंधर्वांपाशीं वर मागितला व त्यांनीं तुझ्या इच्छेप्रमाणें होईल म्हणून वर दिला, व अग्नीनें भरलेली एक स्थाली त्याच्या स्वाधीन करून गंधर्व त्याला म्हणाले कीं, हे राजा, हा अग्नि घेऊन तूं यज्ञ कर म्हणजे आमच्या लोकाला येशील. मग तो अग्नि व उर्वशीनें दिलेले आपले पुत्र बरोबर घेऊन राजा नगराकडे जावयास निघाला. जातांना त्यानें तो अग्नि वाटेंत अरण्यांतच टाकिला, व केवळ पुत्रांसह नगरप्रवेश केला. नगरांत शिरतांना त्यानें पूर्वीं प्रवासाचे वेळीं वेशीबाहेर स्थापित केलेला अग्नि त्याला आढळला नाहीं. परंतु, त्या अग्नीच्या ऐवजीं शमीच्या झाडांत उत्पन्न झालेला अश्वत्थ दृष्टीस पडला. त्या वेळीं त्यानें अग्नि नाहींसा झाला, ही गोष्ट गंधर्वांना सांगितली. गंधर्वांनीं त्याची ती तक्रार ऐकून त्याला सांगितलें कीं, या अश्वत्थ वृक्षाचीं दोन काष्ठें घेऊन त्यांपासून मंथा व अरणी करून मंथून अग्नि निर्माण करावा. मग राजानें त्याप्रमाणें अश्वत्थकाष्ठाचा अरणि करून यथाविधि मंथन करून अग्नि काढिला; व त्याच अग्नीचे दक्षिण, आहवनीय व गार्हपत्य असे तीन विभाग करून अनेक यज्ञ केले. त्यापूर्वीं एकच अग्नि होता. पण पुरूरव्यानें हे तीन वर्ग केले. असला तो समर्थ राजा होता. यज्ञाच्या पुण्यानें त्याला गंधर्वांचें सालोक्यही मिळालें.

हे राजा, याप्रमाणें गंगा नदीच्या उत्तरतीरावर असणाऱ्या अत्यंत पवित्र व महर्षींनीं प्रशंसा केलेल्या प्रयाग नामक प्रांतांत असला हा महायशस्वी राजा राज्य करून गेला.

## अध्याय सत्ताविसावा.

—:०:—

### अमावसुवंशवर्णन.

वैशंपायन सांगतातः—उर्वशीपासून ऐल म्हणजे पुरूरवा याला जे पुत्र झाले ते सर्वच स्वर्गलोकांत जन्मांत येणाऱ्या देवपुत्रांप्रमाणें मोठे उदार व दिव्यस्वरूप होते. त्यांचीं नांवें: आयु, बुद्धिमान् अमावसु, धर्मात्मा विश्वायु, श्रुतायु, तसाच आणखी दृढायु, वनायु व शतायु. अमावसूला भीम आणि राजा नग्नजित् असे दोन मुलगे होते. पैकीं राजा भीम याला कांचनप्रभ नांवाचा मोठा देखणा मुलगा होता. कांचनाला मोठा विद्वान् व बलिष्ठ असा सुहोत्र नांवाचा पुत्र होता. या सुहोत्रानें केशिनीच्या पोटीं जन्हु नामक पुत्र उत्पन्न केला. या जन्हूनें सर्वमेध नांवाचा फार मोठा यज्ञ केला. या समयीं याला गंगा मोहित होऊन माझा पति हो म्हणून प्रार्थना करीत आपण होऊन त्याजकडे आली. परंतु तो तिच्या इच्छेला अनुसरेना. तेव्हां त्या गंगेनें त्याचा तो सर्व यज्ञमंडप जळांत बुडवून टाकिला. सर्व यज्ञभूमी गंगेनें याप्रमाणें बुडवून टाकलेली पाहातांच जन्हु संतापून गंगेला म्हणाला कीं, हे गंगे,

तूं हे व्यर्थ श्रम कशाला करितेस? तूं आपल्याकडून एवढा जरी जलप्रलय केला आहेस तरी मला त्याचें कांहीं नाहीं. मी हें सर्व पाणी पिऊन टाकून तुझा यत्न फुकट घालवीन. मात्र तूं जी ही दांडगाई केलीस तिचें प्रायश्चित्त तुला या हातींच देतों बघ. असें म्हणून जन्हूनें तत्काळ सर्व गंगा पिऊन टाकिली. पुढें महर्षींनीं गंगेची अशी स्थिति झालेली पाहून जन्हूची प्रार्थना केली. तेव्हां त्यानें तिला सोडून दिली. परंतु, ती जन्हूच्या पोटांतून आली ही कल्पना घेऊन ऋषिगण त्या दिवसापासून तिला जान्हवी म्हणजे जन्हूची कन्या असें म्हणूं लागले. गंगेला जन्हूची कन्या ठरविल्यावर त्याला पति करण्याचा तिचा संकल्प सहजच फिका पडला. तथापि, अंतर्यामीं तिची ती वासना नष्ट झाली नव्हती; व तिनें ती वासना अन्य रूपानें पूर्ण करून घेतली. तो प्रकार असा.

युवनाश्वानें पूर्वीं कांहीं कारणानें गंगेला तूं मनुष्ययोनी पावशील म्हणून शाप दिला होता. त्या शापबलानें गंगा ही आपल्या अर्धभागानें युवनाश्वाचेच पोटीं येऊन तेथें सरिच्छ्रेष्ठ कावेरी असें नांव पावली; व ही युवनाश्वकन्या कावेरी हिशीं जन्हूनें लग्न लाविलें. ( अर्थातच जन्हूला पति करण्याचा गंगेचा हेतु कावेरी रूपानें सिद्ध झाला. ) कावेरीरूपानें जन्हूच्या घरांत आल्यावर तिचें ( गंगेचें ) वर्तन अनिंदित होतें. असो; कावेरीचे ठिकाणीं जन्हूनें सुनह नामक पुत्र उत्पन्न केला. हा बापाचा फार लाडका असून फार धार्मिक होता. या सुनहाला पुढें अजक हा मुलगा झाला. अजकाचे पोटीं राजा बलाकाश्व हा आला. या राजाला शिकारीचा फार नाद असे. याला कुश नांवाचा पुत्र झाला. कुशाला पुढें देवांसारखे तेजस्वी असे चार पुत्र झाले. त्यांचीं नांवें:—कुशिक, कुशनाभ, कुशांब आणि मूर्तिमान्. हा कुशिक राजा पल्हव नांवाचे जे रानटी लोक आहेत त्यांच्या सोबतीनें असे. एकदां या कुशिकाचे मनांत असें आलें कीं, आपणास इंद्राच्या तोडीचा तेजस्वी असा पुत्र व्हावा. ही गोष्ट मनांत आल्यावर त्यानें तिच्या सिध्यर्थ अत्युग्र तप आरंभिलें, व तें तप त्यानें सतत एक सहस्र वर्षेंपर्यंत चालविलें. सहस्र वर्षें पूर्ण झालीं, तेव्हां सहस्राक्ष जो पुरंदर इंद्र त्याचे लक्षांत असें आलें कीं, हा कुशिक आपल्या तोडीचा पुत्र निर्माण करण्यास खचितच समर्थ आहे. पण यानें असला पुत्र निर्माण केल्यास आपलें महत्व कमी पडेल, याकरितां आपणच याच्या पोटीं जावें; असा संकल्प करून देवश्रेष्ठ इंद्र यानें आपल्या तेजाचा अंश कुशिकाच्या वीर्यांत मिसळून दिला; व त्या वीर्यापासून कुशिकाला पुढें गाधी नांवाचा पुत्र झाला. हा कुशिकपुत्र म्हणजे प्रत्यक्ष इंद्रच, हें निराळें सांगावयास नको. हा गाधी कुशिकाच्या ज्या स्त्रीचे पोटीं जन्मला, ती पुरुकुत्स नांवाच्या राजाची कन्या होती व तिला पौरुकुत्सी असें म्हणत. या गाधीला सत्यवती नांवाची मोठी थोर व शुभलक्षणी कन्या झाली. ही कन्या गाधी राजानें भृगुपुत्र जो ऋचीक त्यास दिली. ऋचीकाचें हिच्यावर फारच प्रेम बसलें. तेव्हां हिला पुत्र द्यावा व हिच्या बापालाही द्यावा म्हणून ऋचीकानें तिजकडून तिजकरितां एक व तिचे आईकरितां एक चरू तयार करविला, व तिला म्हणाला कीं, हे प्रिये, हा चरू तूं खा; आणि हा जो दुसरा आहे तो तुझ्या आईनें खावा. हा खाल्ल्यानें तुझ्या आईला, बड्या बड्या क्षत्रियांना चीत करणारा, क्षत्रियमंडळांत केवळ अजिंक्य असा एक मोठा दीप्तिमान् अस्सल क्षत्रियपुत्र होईल; व तुलाही, हे कल्याणि, मोठा शहाणा, शमशील व

तपोनिष्ठ असा अस्सल ब्राह्मणपुत्र या चरूच्या प्रभावानें होईल.

याप्रमाणें स्वस्त्रीला चरूंची व्यवस्था सांगून भृगुपुत्र ऋचीक याचा सदैव तपाकडे ओढा असल्यामुळें स्वस्त्रीला घेऊन तपश्चर्येसाठीं अरण्यांतच गेला. इकडे त्याचा सासरा गाधिराजा हा सहकुटुंब तीर्थयात्रेला निघाला होता. तो आपल्या मुलीला भेटावें म्हणून ऋचीक जेथें वनांत होता तेथें आला. तेव्हां आईला पाहून सत्यवतीला चरूची आठवण झाली. तिनें ते दोन्ही चरू ऋचीकापासून मागून घेऊन आपल्या आईपुढें ठेविले, व या चरूंचें सामर्थ्य असें असें आहे म्हणून तिनें आपल्या आईला भरवून सांगितलें. पुढें आईनें दुर्दैवबळानें भूल पडून अशी चूक केली कीं, आपला चरू मुलीला दिला व तिचा होता तो आपण खाल्ला. या चुकीचा परिणाम असा झाला कीं, सत्यवतीचे ठिकाणीं दिसण्यांत मोठा उग्र, कांतीनें जाज्वल्य व क्षत्रियांचा केवळ काळ असा गर्भ राहिला, व ऋचीक ऋषि ध्यानस्थ असतां ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत आली; आणि ते स्वस्त्रीला म्हणाले, 'हे कल्याणि, हे सुंदरि, तुझ्या आईनें चरूंची उलट पालट करून मोठी फसगत केली! कारण, तुझ्या पोटीं (शांत असा ब्राह्मण न येतां) अति दारुण व क्रूरकर्मी असा क्षत्रिय निपजेल, व जो भाऊ होईल तो मोठा तपोधन व प्रत्यक्ष वेदमूर्तीच होईल. कारण, तुला काय सांगूं? माझें तपोबल खर्चून अखिल वेद त्या चरूचे ठिकाणीं ओतला होता.' तें ऐकून सत्यवती आपल्या पतीची मनधरणी करून म्हणाली, 'असला क्रूर ब्राह्मणाधम पुत्र मला न व्हावा.' तेव्हां ऋचीक म्हणाला, 'हे कल्याणि, असला क्रूर पुत्र व्हावा म्हणून माझाही कोठें संकल्प होता; (मी जर ब्राह्मण आहें तर क्रूरकर्मी पुत्राची इच्छा कां करूं?) पोटीं उग्र पुत्र होणें हें आईबापांच्या वृत्तीचें फळ असतें. यावर सत्यवती पुन्हा म्हणाली, 'हें उत्तर कोणाला सांगावें? आपण मनांत आणाल तर नवी सृष्टि निर्माण कराल; मग माझ्या मनाजोगा पुत्र द्याल यांत संशय काय? तर मला सरळ बुद्धीचा व शमशील असा पुत्र आपण दिलाच पाहिजे. तथापि, हे द्विजश्रेष्ठा, जर झाली गोष्ट अन्यथा करतां येतच नाहीं असें असेल तर मी ज्या लक्षणांचा पुत्र मागतें आहें त्या लक्षणांचा मला व आपणाला निदान पुत्र म्हणजे नातु तरी व्हावा.' हे सत्यवतीचे शब्द ऐकून ऋचीक प्रसन्न होऊन म्हणाला, 'हे सुंदरि, हे कल्याणि, देणेंच झालें तर मला पौत्र देणें आणि पुत्र देणें यांत कांहीं अंतर नाहीं. मी माझ्या तपोबलानें कोणताही देऊं शकेन. आणि तुला जर असल्या पुत्राचीच हौस आहे तर तुझ्या मनाप्रमाणेंच होईल जा.'

ह्या आशीर्वादानंतर अल्पकालानेंच सत्यवतीला जमदग्नि नांवाचा मोठा शांत, दांत व तपोनिरत असा पुत्र झाला. ऋचीकानें चरूसंबंधें केलेल्या मूळच्या योजनेंत विपर्यास झाल्यामुळें त्या चरूचे ठिकाणीं स्थापलेल्या रुद्र व विष्णु यांच्या अंशांची अदलाबदल झाली होती. तथापि, ऋचीकानें देवताराधन केल्यामुळें जमदग्नि हा विष्णूच्या शांत अंशानेंच जन्मास आला. असो; ती सत्यधर्मपरायण व पुण्यशील अशी ऋचीकपत्नि जी सत्यवती तीच पुढें हल्लीं कौशिका या नांवानें लोकांत प्रसिद्ध असलेली महानदी झाली.

इक्ष्वाकु वंशांत रेणु नांवाचा कोणी राजा होता. याला कामली नांवाची एक कन्या होती. हिला कामली रेणुका असेंही म्हणत. या

१ या ग्रंथांत, या मुलीचें 'कामली' हें मुख्य नाम किंवा विशेषनाम व रेणुका हें एक प्रकारचें पैतृकनाम असें धरिलें आहे. तथापि, जगांत तिची प्रसिद्धी रेणुका याच नामानें आहे.

रेणुकेचे ठिकाणीं ऋचीकपुत्र जमदग्नि यानें सर्व विद्यांत निपुण, धनुर्वेदांत पारंगत, क्षत्रियांचा काळ व तेजानें केवळ चेतलेला अग्नि अशा प्रकारचा अत्यंत दारुण पुत्र उत्पन्न केला. याला जामदग्न्यराम असें म्हणतात. याप्रमाणें और्व ऋषीचा पुत्र ऋचीक याच्या तपोवीर्यानें ब्रह्मवेत्त्यांत वरिष्ठ व मोठा यशस्वी, असा जमदग्नि हा पुत्र सत्यवतीच्या पोटीं आला. त्याचा मधला भाऊ शुनःशेप हा झाला, व शुनःपुच्छ हा कनिष्ठ; असे हे तिघे भाऊ. इकडे कुशिकपुत्र गाधि यानें तप, विद्या व शम यांनीं युक्त असा विश्वामित्र हा पुत्र उत्पन्न केला. हा मोठाच पराक्रमी झाला. यानें ( क्षत्रिय असून ) ब्रह्मर्षींचें साम्य संपादून सप्तर्षींच्या मालिकेंत जागा पटकाविली. या धर्मनिष्ठ विश्वामित्राला कोणी विश्वरथही म्हणत. हा कौशिकाचें वंशवर्धन करणारा पुत्र कौशिकाला भृगूच्याच ( ऋचीकाच्या ) प्रसादानें झाला. या विश्वामित्राला तिन्ही लोकांत विख्यात असे देवरात-प्रभृति बरेच पुत्र झाले. हे राजा, मी त्यांचीं नांवें सांगतों तीं ऐक. शालावतीनामक स्त्रीचे ठिकाणीं त्यानें हिरण्याक्ष, देवश्रवा व ज्याचे संततीला पुढें कात्यायन असें नांव पडलें तो कति, असे हे तीन पुत्र उत्पन्न केले. रेणुसंज्ञक स्त्रीचे ठिकाणीं रेणुमान्, सांकृति, गालव, मुद्गल, मधुच्छंद, जय व देवल; व अष्टक, कच्छप आणि हारित असे तिघे दृषद्वतीचे ठिकाणीं. हे सारेही विश्वामित्राचे पुत्र. हे सर्वच कुशिककुलांत मोठे विख्यात पुरुष जन्मले. यांची पुढील संततिही मोठी इतिहासप्रसिद्धच आहे. पाणीन, बभ्रूव, करजप्य, देवरात, शालंकायन बाष्कल, लोहित, यामदूत, कारीषव, सौश्रुत, कौशिक, तसेच आणखी सैंधवायन–अशीं हीं बारा कुळें देवराताच्या वंशांत उदयास आलीं. देवल व रेणव हीं रेणूच्या वंशांत; याज्ञवल्क्य, अघमर्षण, औदुंबर, अभिष्णात, तारकायन व चुंचुल, हे सहा शालावतीचे पौत्र व हिरण्याक्षाचे पुत्र. सांकृत्य, गालव, बादरायणी हेही यांशिवाय विश्वामित्राचीच संतति होत. शिवाय प्रवरभेदानें ज्यांचा इतरांशीं विवाह होऊं शकतो असे या कौशिक कुलांत किति तरी पुरुष उत्पन्न झाले. हे इतके प्रतिष्ठित होते कीं, यांचा एकीकडे पौरवकुलाशीं व एकीकडे वसिष्ठ ब्रह्मर्षींच्या कुळाशीं—याप्रमाणें ब्राह्मण व क्षत्रियांचा मिसळीचा संबंध झाला, ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. विश्वामित्राच्या सर्व मुलांत शुनःशेफ हाच वडील समजला जातो. हा वास्तविक पाहातां जमदग्नीचा कनिष्ठ भ्राता, या नात्यानें भृगुकुलांत असतां पुढें तो कौशिक कुलांत आला. हा शुनःशेफ हरिश्चंद्राच्या यज्ञांत पशूच्या ऐवजीं योजिला जाणार होता. परंतु देवांनीं त्याला उचलून विश्वामित्राच्या हवालीं केला. तेव्हां देवांनीं दिला, अशा समजुतीनें त्याला इतउत्तर देवरात असें म्हणूं लागले. असो; हे देवरातप्रभृति सात बंधु विश्वामित्राचे पुत्र असून त्यांशिवाय विश्वामित्राला दृषद्वतीपासून अष्टक नांवाचा एक आठवाही पुत्र होता. या अष्टकाला लौहि नांवाचा पुत्र झाला.

याप्रमाणें येथवर मीं तुला जन्हूचा वंश सांगितला. आतां यापुढें आयूचा वंश सांगतों.

## अध्याय अठ्ठाविसावा.

—:०:—

### आयुवंशकथन.

वैशंपायन सांगतात:–महात्म्या आयूचे पुत्र पांच होते. हे सर्वही मोठे शूर असून महारथी होते. स्वर्भानु जो राहु त्याची कन्या प्रभा तिजपासून हे झाले. हे राजा, यांपैकीं नहुष प्रथम जन्मला. नंतर वृद्धशर्मा, रंभ, रजि व अनेना. हे सर्वही त्रैलोक्यांत विख्यात

होते. यांपैकीं रजीनें पांचशें पुत्र उत्पन्न केले. हे सर्वही राजेय या नांवानें विख्यात असून त्यांचें प्रत्यक्ष इंद्रालाही भय पाडणारें असें एक विख्यात क्षत्रियमंडळच बनलें. पुढें एकदां देव व दानव यांमध्यें एक भयंकर लढाई उत्पन्न झाली. त्या वेळीं देव व असुर हे दोघेही ब्रह्मदेवाकडे येऊन म्हणाले, 'हे भगवन्, आम्हां दोघांपैकीं या युद्धांत विजयी कोण होईल तें ऐकण्याची आमची इच्छा आहे. आपण सर्व देवांत श्रेष्ठ असें समजून आम्ही आपणास प्रश्न करीत आहों, तरी आपला अभिप्राय काय तो सांगावा.'

ब्रह्मदेव म्हणाले:—बाबाहो, खरी गोष्ट अशी आहे कीं, आयु:पुत्र रजि हा तुम्हां दोघांपैकीं ज्यांच्या बाजूनें शस्त्र घेऊन युद्धास उभा राहील त्यांची बाजू त्रिभुवनांत विजयी होईल यांत संदेह नाहीं. तुम्ही हें खास समजा कीं, जेथें रजि तेथेंच धैर्य, व जेथें धैर्य तेथेंच संपत्ति, व जेथें धैर्य आणि संपत्ति तेथेंच धर्म, आणि धर्म तेथेंच जय हें उघडच आहे.

ब्रह्मदेवांचें हें भाषण ऐकून देव व दानव या दोघांनाही मोठा आनंद झाला, व आपल्या पक्षाचा जय व्हावा, अशी दोघांचीही इच्छा असल्यामुळें दोघेही आपल्या पक्षाचें सेनानायकत्व रजीनें पतकरावें म्हणून रजीची प्रार्थना करण्याकरितां त्याकडे आले. दोघांनाही आपला त्याजवर हक्क आहे असें वाटत होतें. कारण, हा परम तेजस्वी रजि हा एका बाजूनें सोमवंशीय होता, तर मातृपक्षानें तो असुरपक्षीयच होता. कारण, राहूची कन्या जी प्रभा तिचा तो मुलगा, व म्हणून राहूचा नातु; यामुळें देव व दानव हे दोघेही मोठ्या उत्सुकतेनें रजीकडे गेले, व दोघेही आपआपल्यापरी 'आमच्या पक्षाचा जय व्हावा म्हणून तूं आपलें श्रेष्ठ धनुष्य घेऊन आमचे बाजूनें उभा रहा,' असें त्याला म्हणूं लागले. रजीनें पाहिलें कीं, हे देव व दैत्य हे दोघेही आपआपल्या मतलबासाठीं भांडत आहेत. तर आपणही कां कमी करा? आपणही या वेळीं युद्ध करणेंच तर लौकिक संपादून शिवाय आपला मतलबही साधून घ्यावा. असें मनांत आणून तो प्रथम इंद्रप्रभृति देवांना म्हणाला, 'हे देवहो, मी तुम्हांस साहाय्य करावें असें असेल तर मीं तुमच्या बाजूस उभा राहून युद्धांत सर्व दैत्यगणांस जिंकिलें असतां तुम्हीं मला हक्कानें इंद्राचें पद दिलें पाहिजे. ही गोष्ट कबूल असेल तर मी तुमचा.' देवांच्या हे शब्द प्रथम कानीं पडतांच त्यांना फार आनंद होऊन ते त्या भरांत रजीला म्हणाले, "हे राजा, फार ठीक आहे; तुझ्या मनांत जशी इच्छा असेल तशी ती पुरी होऊं दे. आमची तयारी आहे."

याप्रमाणें देवांचें उत्तर मिळाल्यावर रजीनें जो देवांना प्रश्न केला होता, तोच तेथें आलेल्या मुख्य असुरांना केला. परंतु, असुर पडले गर्विष्ठ, त्यांना केवळ स्वार्थापुरतें पहाणें. (रजीला इंद्रत्व देणें हें त्यांना कोठून खपणार?) म्हणून ते कुर्यांतच त्याला म्हणाले, "हें कसें घडावें; आमचा इंद्र प्रऱ्हाद हा ठरलेलाच आहे; व त्याला विजय मिळवून देण्यासाठीं तर ही सारी आमची खटपट आहे. तेव्हां तुझें म्हणणें आम्हांला मान्य नाहीं. तूं आपला खुशाल देवांचा करार पतकरून त्यांनाच साह्य हो. आम्हांला भलत्याच अटीवर तुझी गरज नाहीं.'

रजीनें म्हटलें, 'फार बरें.' त्याबरोबर देव पुन्हा पुढें सरून म्हणाले, "हे राजा, तुझ्या इच्छेप्रमाणें आम्ही तुला इंद्र करितों. तूं आतां आमच्या बाजूनें उभा रहा." याप्रमाणें दैत्यांनीं नेमणूक करितांच रजीनें तडाका लाविला; व वज्रपाणि इंद्रालाही जे

दानव अजिंक्य झाले होते त्या सर्वांचा फडशा पाडला. त्या मोठ्या पाणीदार व जितेंद्रिय अशा समर्थ योद्ध्यानें देवांची जी सर्व संपत्ति विनष्ट झाली होती ती दैत्यांना ठार करून सगळीच्या सगळी परत आणिली. याप्रमाणें रजीनें अंगीकारिलेली कामगिरी पुरी केलीसें पाहून इंद्रासहित देव त्याचा गौरव करण्यासाठीं पुढें आले; व इंद्र त्याला म्हणाला, हे बाबा रजिराजा, येथें असलेल्या आम्हां सर्व देवांचा तूं इंद्र झालास, ही गोष्ट निर्विवाद आहे. मला तर यांत मोठाच आनंद झाला आहे. कारण मी आजपासून तुला माझा पिता समजून मी आपल्याला तुझा पुत्र म्हणविणार. कारण, असें केल्यानें मी जास्तीच अब्रूला चढेन, असा माझा भरंवसा आहे.' इंद्राचें हें वचन खरें पहातां लबाडीचें होतें, व तें रजीला रुचावयास नको होतें; पण इंद्रानें तशीच माया पसरल्यामुळें असल्या वस्ताद राजाला देखील भूल पडली, व इंद्राचें कपट ध्यानीं न येतां तो मोठ्या प्रसन्न मनानें इंद्राला म्हणाला कीं, ठीक आहे. तूं माझें पुत्रत्व कबूल केलेंस यांत सर्व आलें. ( आणखी इंद्राची निराळी गादीच मला काय करावयाची आहे? ) याप्रमाणें रजीची समजूत पडून जिकडच्या तिकडे झालें.

पुढें कालगतीनें तो देवतुल्य रजीराजा इहलोक सोडून स्वर्गीं गेला. त्याच्या पश्चात् त्याचे सर्वही पांचशें पुत्र हे इंद्राकडे म्हणजे स्वर्गलोकांत आले, व त्याला म्हणाले कीं, तूं आमच्या बापाचा जर पुत्र म्हणवितोस तर आमचा भाऊ झालास. तेव्हां, तूंच एकटा हें स्वर्गाचें राज्य भोगणार कोण? आमचे हिस्से टाक. असें म्हणून त्यांनीं इंद्रावर मोठी गर्दी केली. तेव्हां इंद्रानें निरुपायास्तव त्यांना वांटे दिले. याप्रमाणें रजीपुत्रांनीं आपआपले हिस्से बळकावून इंद्र हा राज्याला व यज्ञांतील हविर्भागाला बहुतेक मुकल्यासारखा होऊन बराच वेळ झाल्यावर गुरु बृहस्पतीकडे जाऊन त्याला म्हणाला, 'गुरो, हे ब्रह्मर्षे, हे प्रभो, पहा बरें माझी कोण दशा झाली आहे? या रजीपुत्रांनीं माझें सर्व राज्य घेऊन मला कसें निस्तेज, दुर्बळ व मूढ करून सोडलें आहे? मला पुरेसें पोटाला देखील मिळत नाहीं व त्यामुळें हीं माझीं हाडें निघालीं आहेत, हीं आपण पाहातच आहां. काय सांगूं? मी मनांत अगदीं खिन्न झालों आहें. आतां आपणच कांहीं कृपा कराल तर बरें.'

इंद्राचें हें वचन ऐकून बृहस्पति म्हणाला, 'हे इंद्रा, तूं जर अशी गोष्ट मला पूर्वीं कळवितास तर तुझ्या कल्याणासाठीं मला जी एक भलतीच गोष्ट करावी लागली ती करावी लागतीना. तथापि, तूं मजकडे आलाच आहेस त्या अर्थीं, हे देवेंद्रा, जेणेंकरून तुझें राज्य व हविर्भाग तुला त्वरित परत मिळेल तसला यत्न मी करीन; यांत संशय मानूं नको. हे बेटा, तूं कांहीं खेद करूं नको, आणि कष्टी होऊं नको. मी बोललों आहें असें करीन, जा.'

याप्रमाणें इंद्राला आश्वासन दिल्यावर बृहस्पतींनीं इंद्राचें जेणेंकरून तेज वाढेल असलें कांहींएक कृत्य केलें; व त्याचे उलट त्या रजिपुत्रांच्या बुद्धीला मोह पडेल अशीही एक युक्ति केली. ती युक्ति हीच कीं, धर्माला अत्यंत विरुद्ध, तर्कटांत ( तर्कशास्त्रांत ) पहिली प्रत, व खोट्या लोकांना अनुकूल, अशा तऱ्हेचें एक नास्तिक शास्त्र ( ज्यांत धर्म नाहीं, ईश्वर नाहीं, असें प्रतिपादन केलें आहे ) बृहस्पतीसारख्या सत्ब्राह्मणानें रचिलें. हें शास्त्र कानीं पडतांच जे विशेष धार्मिकबुद्धीचे लोक आहेत त्यांच्या कपाळाची शीरच उठते. त्यांना तें ऐकावेंसेंही वाटत नाहीं. परंतु, रजीचे ते पांचशें पुत्र बेटे ते अल्पमतीच होते, त्यांना

हें बृहस्पतीचें नवीन शास्त्र पटलें. वास्तविक पाहातां त्या शास्त्रांतील सिद्धांत न्यायाला सोडून होते, पण त्यांचा कर्ता बृहस्पति, त्याची बोलण्याची सफाई त्याची त्यालाच. त्यानें ते सिद्धांत असे कांहीं सजवून मांडले होते कीं, त्यांची त्या मूर्खांवर तेव्हांच छाप बसली, व तेच सिद्धांत प्रमाण मानून ते चालत आलेल्या सनातन धर्मशास्त्राचे द्वेष्टे बनले, व त्यामुळें हातून अधर्म घडून ते सर्वही पातकी क्षयाच्या पंथाला लागले. या नव्या मतानें त्यांच्या बुद्धीला पक्कीच भूल पडली. ते ब्राह्मणांचा द्वेष करूं लागले, विषयासक्त होऊन उन्मत्त झाले; व काम आणि क्रोध यांच्या तडाक्यांत सांपडून धर्मभ्रष्ट झाले; अखेर निर्वीर्य व पराक्रमहीन झाले. त्यांची अशी दशा झाली, तेव्हां इंद्रानें संधी साधून त्यांना पुट्दिशीं मारून टाकिलें व पुनरपि आपली देवमुख्याची गादी मिळविली. याप्रमाणें एकवार त्याला जें राज्य दुष्प्राप्य वाटत होतें तें पुन्हा प्राप्त होऊन देवेंद्र अति सुखी झाला.

जे कोणी इंद्राचें हें स्वस्थानापासून भ्रंश पावणें व पुन्हा स्थानारूढ होणें श्रवण करतील किंवा मनन करितील, त्यांना कधींही दुष्टांपासून त्रास होणार नाहीं.

## अध्याय एकुणतिसावा.

—:०:—

### काश्यवर्णन.

वैशंपायन सांगतातः—हे राजा, (रजीचा वंश सांगितला, आतां रंभाचा सांगावयाचा परंतु ) रंभाला अपत्यच नव्हतें, म्हणून आतां मी अनेनाचा वंश सांगतों. या अनेनाला मोठा विख्यात असा प्रतिक्षत्र हा पुत्र झाला. प्रतिक्षत्राचा पुत्र सृंजय नांवानें प्रसिद्ध झाला. सृंजयाचा पुढें जय; आणि जयाचा पुढें विजय. विजयाला कृति हा पुत्र झाला; व कृतीला हर्यश्व झाला. या हर्यश्वाच्या पोटीं प्रतापी राजा सहदेव जन्मला. सहदेवाला पुढें नदीन नांवाचा मोठा धार्मिक पुत्र झाला. या नदीनापासून जयत्सेन व जयत्सेनापासून संकृति. संकृतीला मोठा यशस्वी व धर्मनिष्ठ असा क्षत्रधर्मा हा पुत्र झाला. याप्रमाणें हा अनेनाचा वंश झाला. आतां ज्याला कधीं कधीं वृद्धशर्मा असेंही म्हणत, त्या क्षत्रवृद्धाचा वंश ऐक. या क्षत्रवृद्धाला सुनेत्र नांवाचा मोठा लौकिकवान् पुत्र झाला. सुनेत्राला पुढें मोठे धार्मिक असे तीन पुत्र झाले. काल व शल हे दोघे, आणि तिसरा राजा गृत्समद. गृत्समदाला पुढें शुनक झाला. या शुनकाला ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारी वर्णांची संतति झाली. ती सर्वही शौनक या नांवानेंच मोडत होती. असो; या गृत्समदाचा जो शल नामक बंधु सांगितला त्याचे पोटीं आर्ष्टिषेण हा आला. आर्ष्टिषेणाचा पुत्र काशक. काशकाचा काश्य आणि दीर्घतप. पैकीं दीर्घतपाला धन्व नामक पुत्र झाला; व हाच पुढें धन्वंतरी नांवानें विख्यात झाला. याचा इतिहास असा आहे कीं, हा धन्वंतरी प्रथम समुद्रमंथनाचे वेळीं देवयोनींत निर्माण झाला होता; परंतु, पुढें या दीर्घतप राजानें बहुत कालपर्यंत बुद्धिपुरःसर पुत्रप्राप्त्यर्थ जेव्हां मोठेंच तप केलें, तेव्हां तोच धन्वंतरी मनुष्यरूपानें त्या दीर्घतपाचे पोटीं आला.

जनमेजय विचारितोः—धन्वंतरी हा देव असून या मर्त्यलोकीं मनुष्यकोटींत जन्मास कां आला हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. याकरितां, हे वैशंपायना, मला त्याचें जन्मवृत्त जसेंच्या तसेंच सांगा.

वैशंपायन सांगतातः—हे भरतश्रेष्ठा, ऐक. मी धन्वंतरीची उत्पत्ति तुला सांगतों. पूर्वीं ज्या वेळीं अमृतप्राप्तीसाठीं ( देवासुरांनीं ) समुद्रमंथन केलें त्या वेळीं धन्वंतरी हा समुद्रां-

तून उत्पन्न झाला. तो जों समुद्राबाहेर आला, तोंच श्रीविष्णु त्याचे दृष्टीस पडल्यामुळें कांहीं इष्टकार्य सिद्ध व्हावें,हा हेतु मनांत धरून विष्णूचें ध्यान करीत उभा राहिला. तो जन्मतःच सर्वांगसुंदर असून त्याचे भोंवतीं एक तऱ्हेची शोभा पसरली होती. हा समुद्राच्या जलांतून उत्पन्न झाला, ही गोष्ट ध्यानांत आणून श्रीविष्णूंनीं त्याला तूं अब्ज ( अप् म्हणजे पाणी त्यापासून ज म्हणजे जन्मलेला ) आहेस, असें म्हटलें; व तेव्हांपासून त्याचें अब्ज हेंच नांव पडलें. मग तो अब्ज श्रीविष्णूला म्हणाला, ' हे प्रभो, मी आपला पुत्र आहें. याकरितां कृपा करून मला यज्ञांत हविर्भाग व देवमंडळींत बसण्याला जागा, हीं आपण द्यावीं. कारण आपण देवांचे मालकच आहां. " याप्रमाणें धन्वंतरीनें प्रार्थना करितांच विष्णूनें खरी स्थिति काय होती, ती मनाशीं तपासून पाहून त्याला उत्तर केलें कीं, हे पुत्रा, तूं म्हणतोस खरें, परंतु फार प्राचीन काळींच यज्ञामध्यें भाग घेण्याचा ज्यांचा हक्क पुरत होता, त्या त्या देवांनीं आपले विभाग आपआपसांत ठरवून ही गोष्ट सरवून टाकिली आहे; व त्यांच्या त्या ठरावाप्रमाणेंच मोठमोठाल्या ऋषींनींही आपआपल्या यज्ञांत देवांना हिस्सेरशीनें भाग दिले आहेत. बाबारे, तूं कालचा पोर. तूं देवांच्या पंक्तीस कसा बसणार ? तेव्हां मुख्य यज्ञीयांत तुझा प्रवेश होणें शक्यच नाहीं. बरें; बारीकसारीक होमांत तुझा भाग ठरवावा तर तुझ्या थोरवीला रुचणार नाहीं. याकरितां मी सांगतों तें ऐक. पुढल्या जन्मीं लोकांत तुझी अतिशय कीर्ति होईल; व तूं आईचे गर्भांत आहेस तोंच अणिमादि अष्टसिद्धि तुला माळ घालतील; व मग त्याच शरीरानें तुला देवत्व प्राप्त होऊन ब्राह्मणगण तुझ्या उद्देशानें चरु, मंत्र, व्रत व जाप्यही करितील. तूंही लोकहितार्थ [१]अष्टांगांनीं युक्त असा आयुर्वेद निर्माण करशील. मी जी गोष्ट तुला सांगतों ती अशी झालीच पाहिजे. कारण, ब्रह्मदेवानें ही योजना पूर्वींच करून ठेविली आहे. याकरितां जेव्हां पुढलें द्वापर युग येईल तेव्हां तूं निखालस मी सांगतों आहें त्याप्रमाणें जन्मास जाशील. याप्रमाणें धन्वंतरीला वर देऊन श्रीविष्णु तेथेंच अंतर्धान पावले.

दुसरें द्वापरयुग जेव्हां आलें त्या वेळीं काशीचा राजा सुनहोत्राचा पुत्र दीर्घतपा हा पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें तप करूं लागला. त्या तपांत त्यानें असा उद्देश ठेविला कीं, जी देवता आपल्याला पुत्र देईल तिचीच आराधना करावयाची. अशी देवता अब्ज म्हणजे धन्वंतरी आहे, असें त्याला वाटून त्यानें पुत्रप्राप्त्यर्थ त्याचीच आराधना केली. त्या वेळीं तो भगवान् अब्ज संतुष्ट होऊन त्या राजाला म्हणाला, " हे सुव्रता, तुझी इच्छा असेल तर वर माग. तो मी तुला देईन. "

राजा म्हणाला:-'हे भगवन्, आपण खरोखरच मजवर प्रसन्न असाल तर आपणच माझे कीर्तिमान् पुत्र व्हा.' राजाची ती मागणी कबूल करून धन्वंतरी तेथेंच अंतर्धान पावले; व कांहीं काळानें त्या राजाच्या घरांत देव धन्वंतरी पुत्ररूपानें उत्पन्न झाले. या जन्मीं या धन्वंतरींना काशीराजा ही पदवी होती. कोणताही रोग नाहींसा करण्याचें सामर्थ्य त्याचें अंगीं होतें. कारण, वैद्यांची विद्या म्हणजे आयुर्वेद व वैद्यक्रिया हीं त्यांनीं भरद्वाज मुनीपासून संपादिलीं होतीं. पुढें त्यांनीं या आयुर्वेदाचे आठ भाग वेगळे करून आपल्या शिष्यांना पढविले. असो; या

[१] १ कायचिकित्सा, २ बालचि०, ३ ग्रहचि०, ४ ऊर्ध्वांग चि०, ५ शल्यतंत्र, ६ विषचि०, ७ रसायन, ८ वाजीकरण. हीं आयुर्वेदाचीं आठ अंगें. वाग्भटाचे ग्रंथास, **अष्टांगहृदय** म्हणतात.

धन्वंतरीचा पुत्र केतुमान् म्हणून झाला. केतुमानाला पुढें भीमरथ नांवाचा वीर पुत्र झाला. याचा पुत्र राजा दिवोदास. हा मोठा धर्मात्मा असून वाराणशीचा मालक होता. याच्या कारकिर्दींत वाराणशी नगरी ही ओस पडली. पुढें बहुत कालानें क्षेमकनामक राक्षसानें—हा रुद्राचा सेवक होता. ती पुन्हा वसविली. ही ओस पडण्याचें कारण, रुद्रानुचर निकुंभ यानें त्या नगरीला 'तूं एक सहस्र वर्षेंपर्यंत ओस पडशील,' असा शाप दिला होता--त्याचा हा शाप दिवोदासाचे कानीं येतांच त्यानें आपल्या मूळ प्रांताच्या सीमेला लागूनच गोमती नदीचे तीरीं दुसरी नवीन एक टुमदार राजधानी वसविली. नाहींतरी वाराणशी ही मूळची दिवोदासाची नव्हती. ती भद्रश्रेण्यराजाची नगरी होती. पुढें ती भद्रश्रेण्याचे शंभर पुत्रांचे ताब्यांत गेली. ते सर्वही मोठे धनुर्धारी होते. तथापि, त्या सर्वांना मारून त्या बलाढ्य दिवोदासानें भद्रश्रेण्याची ती राजधानी आपण बळकाविली.

जनमेजय विचारितोः—हे वैशंपायना, रुद्रगण निकुंभ हा मोठा धर्मनिष्ठ होता, असें असून त्यानें वाराणशीसारख्या सिद्धक्षेत्राला शाप दिला हें काय ?

वैशंपायन सांगतातः—राजर्षि दिवोदास याचे हातीं ती वाराणशीसारखी समृद्ध नगरी लागल्यावर तो तेथें मोठ्या थाटमाटानें राहूं लागला. इकडे अशी गोष्ट झाली कीं, महेश्वर शंकर यांनीं नुकतेंच लग्न केलें होतें; व आपल्या नव्या लाडक्या बायकोची हौस पुरविण्यासाठीं ते आपल्या सासऱ्याचे जवळ रहात होते. त्या वेळीं खुद्द शंकरांच्या आज्ञेवरून व त्यांच्या पूर्वीच्या उपदेशावरून शंकरांचे तपोनिष्ठ व विशेष सुरूप जे पार्षद नामक गण ते पार्वतीची खुषामत करीत असत. त्या योगानें पार्वतीला मोठी मौज वाटे व आनंदही होई. परंतु, ( आपल्या तरण्या पोरीच्या भोंवतीं हे टोळभैरव जमून त्यांनीं तिची थट्टामस्करी करावी ) हा प्रकार तिची आई मेना हिला गोड वाटेना. ती आपल्या पोरीची व तिच्या नवऱ्याचीही वारंवार निर्भर्त्सना करूं लागली. ती म्हणाली, "इश्श; कोणगबाई तुझ्या नवऱ्याचें लक्षण हें ! तो व त्याचे पार्षदगण सगळेच मेले भ्रष्टचे. मोठा आपल्याला महेश्वर म्हणवितो; पण पहावें तों सदा अठरा विश्वे दरिद्र खिळलेलें आहे ! आणि शील तें त्याला कसें तें नाहींच." याप्रमाणें आईनें केलेली आपल्या नवऱ्याची निंदा ऐकून स्त्रीस्वभावाप्रमाणें तिला सहजच फार राग आला. पण आईपुढें तो हंशावर नेऊन ती तशीच आपल्या नवऱ्याजवळ आली. महादेव पाहातात, तों तिचा नूर अगदीं उतरून गेला आहे, तेव्हां त्यांनीं विचारिलें, 'कां ?' ती म्हणाली, 'गडे, आतां मला येथें राहावयाचें नाहीं. मला आतां आपल्या सत्तेच्या घरांत घेऊन चला.' स्त्रीचें तें वचन ऐकून आतां आवडीजोगी कोणती जागा निवडावी, या विचारांत महेश्वरानें आपल्या मनाशीं सर्व लोक न्याहाळून पाहिले. शेवटीं त्याला, हे कुरुनंदना, या भूतलावरील सिध्दिक्षेत्र जी वाराणशी ती आवडली. परंतु, त्या नगरींत दिवोदासाची वस्ती आहे, हें ध्यानीं येतांच आपल्या पाठीशीं निकुंभ नांवाचा जो गण उभा होता त्याला हांक मारून तो महातेजस्वी शंकर म्हणाला, 'हे गणश्रेष्ठा, तूं वाराणशीला जाऊन ती नगरी खालीं कर. मात्र संभाळून आणि गोडीगुलाबीच्या उपायांनीं. कारण, तो दिवोदास राजा, फारच बलाढ्य आहे. ( त्यापुढें दंडेली चालणार नाहीं. )

शिवाज्ञेप्रमाणें तो निकुंभ वाराणशीपुरीला जाऊन तेथील कंडुक नामक एका नापिकाच्या स्वप्नांत जाऊन त्याला म्हणाला कीं, भल्या

माणसा, मी तुझें कोटकल्याण करीन, पण एक कर; तूं मला येथें जागा दे. म्हणजे हुबेहुब मजसारखा एक माझा पुतळा करून या तुझ्या गांववेशीजवळ बसव." असें सांगून गेल्यावर त्या न्हाव्यानें स्वप्नांत सांगितल्याप्रमाणें त्याची मूर्ति तयार करवून व राजाची आज्ञा मिळवून ती नगरवेशीजवळ स्थापित केली. मग त्यानें गंध, धूप, माल्य, अन्न, पान व बलिप्रदान, वगैरे सर्व प्रकारें त्याची मोठ्या समारंभानें पूजा चालविली. पुढें त्या शहरांत तो एक चमत्कारच होऊन राहिला. जो तो नागरीक त्याची पूजा करूं लागला, व तो गणेश्वरही ज्याला जो इष्ट वाटेल तो वर देऊं लागला. असे वर त्यानें हजारोंना दिले. कोणाला पुत्र, तर कोणाला हिरण्य, तर कोणाला आयुष्य, याप्रमाणें त्यानें सर्व कांहीं इच्छा पुरविल्या. असें चाललें असतां दिवोदासाची पतिव्रता स्त्री राणी सुयशा ही राजाच्या आज्ञेवरूनच पुत्र मागण्यासाठीं तेथें आली. तिनें गणेश्वराची फारच उंची पूजा केली, आणि पुत्र द्यावा, अशी याचना केली. त्या पुत्रासाठीं पुन्हा पुन्हा कितीतरी वेळां येऊन तिनें पूजा केली. परंतु निकुंभ कांहीं केल्या तिला पुत्र देईना. त्याला असें करण्याचें कारणच होतें. तो म्हणाला,' राजा मजवर रागावला म्हणजे माझें काम झालें.' दीर्घकाळ लोटूनही जेव्हां निकुंभ राणीला पावेना, तेव्हां राजाला क्रोध येऊन तो म्हणाला, ' हा काय चमत्कार आहे? हा नगरवेशीजवळ बसलेला पिशाच्च माझ्या नगरजनांना मोठ्या प्रेमानें शेंकडों हजारों वर देत आहे, आणि खुद्द माझ्या नगरींत राहून, रोजच्या रोज माझ्या माणसांकडून पूजा घेऊन शिवाय पुत्रानिमित्त मी व माझ्या देवीनें वारंवार याचना केली असतांही मला पुत्र देत नाहीं किंवा एकही वर देत नाहीं, इतका हा कृतघ्न कशानें झाला? बस्स. असें आहे तर याची पूजाबीजा कांहीं उपयोगी नाहीं. निदान मजकडून तरी होणार नाहीं. मी तर या दुष्टाचें मंदिर मोडून टाकणार.' असा निश्चय करून त्या दुष्ट, पापी, दुर्बुद्धि राजानें त्या गणेश्वराचें मंदिर मोडून टाकिलें. आपलें स्थान मोडलेलें पाहून गणेश्वरानें राजाला शाप दिला कीं, ज्या अर्थीं मी तुझा कांहीं अपराध न करितां तूं माझा स्थाननाश केला आहेस, त्या अर्थीं तुझी ही नगरी अकस्मात् ओस पडेल, हें समजून ठेव.

या शापावरून ती वाराणशी पुरी ओस पडली. इकडे निकुंभ हा शाप देऊन महादेवाकडे गेला. त्याचे मागें वाराणशींतील लोक एकाएकीं दाही दिशा पळून गेले. याप्रमाणें जेव्हां ती नगरी खालीं झाली, तेव्हां महादेव शंकर यानें आपली गादी तेथें स्थापिली; व तेथें त्या दिवसापासून देव श्रीशंकर हा गिरिकन्या दुर्गा हिशीं रममाण होऊन आनंदानें राहूं लागला. परंतु, देवी दुर्गा हिला तेथें वस्ती रुचेना. तेव्हां दुर्गादेवी शंकराला म्हणाली, 'मी नाहीं या वाराणशी नगरींत राहात. तुम्हीं कोठें तरी दुसऱ्या ठिकाणीं एखाद्या घरांत चला.' यावर देवानें उत्तर केलें कीं, मी मुळीं कधींच घरांत ( शरीरांत ) राहात नाहीं. कारण; अविमुक्त ( म्हणजे जें त्रिकालींही सोडलें जात नाहीं, असें जें आत्मस्वरूप तेंच ) हेंच माझें घर आहे. म्हणून तूं म्हणतेस

[1] नीलकंठांनीं याचा हेतु मोठा गमतीचा दिला आहे. ते म्हणतात, ' शंकर हा आत्मा व गिरिजा ही माया. आत्मा हा नित्यमुक्त असल्यानें त्याला वाराणशी या मुक्तिपुरींत सहजच वास रुचला. परंतु शंकर मुक्तिपुरींत राहिले असतां त्यांचे संगतीनें अनेक संसारी जीव मुक्त होऊं लागले. तें पाहून मायेचें पोट दुखूं लागलें. कारण, तिला अशी भीति पडली कीं, या क्रमानें आपला संसार मुळींच संपुष्टांत येईल.'

तसल्या घरांत (संसारांत किंवा शरीरांत) मी येत नाहीं. तुला वाटेल तर तूं जा. याप्रमाणें त्रिपुराचा अंत करणारा (स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन शरिरांचा नाश करणारा) भगवान् त्रिनेत्र (श्रवण, मनन व निदिध्यसन हेच तीन नेत्र) हंसत हंसतच म्हणाला. याप्रमाणें देवानें या वाराणशीरूप मुक्तिक्षेत्राला अविमुक्त असें स्वतःच नांव दिलें. परंतु, लौकिकदृष्ट्या मुक्तिपुरीला अविमुक्त म्हणणें हा एकपरी तिला शाप देण्यासारखेंच झालें. असो; सर्व देवांनीं नमस्कृत असा जो धर्मात्मा महेश्वर तो देवीसह या पुरींत कृत, त्रेत व द्वापर या तीन युगांत वस्ती करून असतो. परंतु कलियुग चालू झालें म्हणजे तेथून तो गुप्त होतो, व तो गुप्त झाला म्हणजे पुनरपि मनुष्यांची वस्ती तेथें होऊं लागते. याप्रमाणें वाराणशीच्या शापाचा व पुनर्वस्तीचा हा इतिहास झाला.

भद्रश्रेण्याचा पुत्र दुर्दम नांवानें प्रसिद्ध होता. हा बाल असें समजून केवळ दयेस्तव दिवोदासानें (त्यानें बाकीचे नव्याण्णव भाऊ मारिले त्या वेळीं) वगळिला. या दुर्दमानें हैहयाचें पुत्रत्व स्वीकारिलें व शिवाय बहुत दिवस चालत आलेलें वैर मिटवावें, या हेतूनें त्या भद्रश्रेण्यपुत्र क्षत्रियश्रेष्ठ दुर्दमानें त्याच्या बापाचें जें राज्य दिवोदासानें हिसकाविलें होतें तें परत घेतलें. परंतु, दिवोदासाला वृषद्वति या स्त्रीपासून प्रतर्दन नांवाचा एक पुत्र झाला होता. त्यानें तेंच राज्य अल्प वयांतच दुर्दमाचे हातून पुन्हा बळकाविलें. या प्रतर्दनाला वत्स व भार्ग असे दोन पुत्र होते. पैकीं वत्साला पुढें अलर्क हा पुत्र झाला. अलर्काचा पुढें सन्नति. हा अलर्क राजा काशींत राज्य करीत होता, हा ब्राह्मणांचा मोठा सत्कर्ता असून अत्यंत सत्यप्रतिज्ञ होता. या अलर्क राजऋषीला पुरातन ऋषींनीं श्लोकरूपानें असा आशिर्वाद दिला कीं, "हा काशीकुलधुरीण अलर्क राजा रूप व यौवन यांहीं संपन्न राहून सासष्ट हजार वर्षेंपर्यंत नांदेल." लोपामुद्रेच्या प्रसादानें याला हें इतकें दीर्घ आयुष्य प्राप्त झालें व त्याचप्रमाणें रूप व यौवन यांसह त्यानें अति विस्तीर्ण राज्याचाही उपभोग घेतला. पूर्वीं सांगितलेल्या गणेश्वर निकुंभानें वाराणशीपुरीला दिलेला शाप संपावयाची जेव्हां वेळ आली, त्या वेळीं या अलर्कानें क्षेमक राक्षसाला मारून पुनरपि ही रम्य वाराणशीपुरी वसविली. अलर्कपुत्र जो सन्नति याला सुनीथनामक धार्मिक पुत्र होता. सुनीथाला पुढें महायशस्वी क्षेम्य झाला. क्षेम्याला केतुमान्, केतुमानाला सुकेतु, सुकेतूचा धर्मकेतु, धर्मकेतूचा दाईज महारथी सत्यकेतु. सत्यकेतूचा पुत्र राजा विभु. विभूचा आनर्त्त; आनर्त्ताचा सुकुमार. सुकुमाराचा धृष्टकेतु. हा मोठा धार्मिक होता. धृष्टकेतूचा राजा वेणुहोत्र. वेणुहोत्राचा राजा भर्ग. अलर्कपिता जो वत्स त्याला त्यापासून वत्सभूमी[1] म्हणून एक पुत्र झाला व त्याचा बंधु जो भार्ग त्याला भृगुभूमी[1] झाला.

भृगुवंशांत उत्पन्न झालेले हे गालवांगिरसाचे वंशज सांगितले. यांजपासून पुढें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिन्ही जातींची हजारों संतति झाली. हे जनमेजया, याप्रमाणें काशवंशीय राजांची हकीकत झाली. आतां नहुषाचा वंश ऐकून घे.

---

१ या शब्दांचा अर्थ मन्मथनाथ दत्तांनीं पुरुषपर न करितां स्थानपर केला आहे, परंतु नीलकंठांनीं "पुत्रांतर माहवत्सभूमिरिति" असा शेरा दिला आहे, तोच धरा.

## अध्याय तिसावा.

—:०:—

### ययातिचरित्र.

वैशंपायन सांगतात:—महातेजस्वी नहुष राजा यानें सुस्वधासंज्ञक पितरांच्या विरजा नामक कन्येचे ठिकाणीं इंद्रासारखे तेजस्वी सहा पुत्र उत्पन्न केले. त्यांचीं नांवें:—यति, ययाति, संयाति, आयाति, याति व सहावा सुयाति. यांपैकीं ययाति हा राजा झाला. खरें पाहातां ययाति हा दुसरा, आणि यति हा ज्येष्ठ; परंतु, त्याचा धर्माकडे भर फार असल्यानें तो आत्मचिंतनांतच गढून असे. त्याला गौ नांवाची कुकुत्स्थकन्या स्त्री मिळाली होती. मोक्षाची वाट धरून अखेर तो यति ब्रह्मरूपच झाला. उरले पांच. त्यांपैकीं ययातीनें सर्व पृथ्वी जिंकिली. त्याला शुक्राचार्यांची कन्या देवयानी ही भार्या मिळाली. तिजशिवाय वृषपर्वा नामक असुराची कन्या शर्मिष्ठा हीही याला भार्येचे ठिकाणींच होती. देवयानीनें यदु व तुर्वसु या दोघांस जन्म दिलें. व वृषपर्व्याची कन्या जी शर्मिष्ठा हिनें द्रुह्यु, अनु व पुरु या तिघांस जन्म दिलें. या ययातीला इंद्रानें प्रसन्न होऊन केवळ मनोजवानें धांवणारे असे एकजात शुभ्र स्वर्गीय अश्व ज्याला जोडिले आहेत, असला परम देदीप्यमान व अस्खलितगति कांचन--मय रथ दिला होता. या रथाच्या साह्यानें हा आपली युद्धाची कामगिरी करीत असे. या श्रेष्ठ रथाच्या साह्यानें त्या दुर्धर्ष वीरानें एका सहा रात्रींत सर्व भूमिजय केला. ययाति हा इंद्रासह सर्व देवांनाही अजिंक्य झाला. हा रथ पुढें बहुत कालपर्यंत पुरुकुलांतील राजांकडे होता. नंतर वसुनामक कौरवांपासून कुरुकुलाकडे गेला. अखेर बुद्धिवान् गार्ग्याच्या शापामुळें पारीक्षित राजाच्या हातून तो रथ नाहींसा झाला. त्याचा इतिहास असा:--

गार्ग्याला एक अल्पवयी पुत्र होता. तो तोंडाचा होता फटकळ. त्याला त्या पारीक्षितानें त्याच्या निष्ठुर भाषणाबद्दल ठार मारिलें. त्यापासून त्याला ब्रह्महत्या लागली. मग त्या पापाच्या योगानें त्याच्या अंगाला अतिशूद्राप्रमाणें वसवस घाण येऊं लागली. त्याचे ग्राम व पुरवासी प्रजाजनही त्याची उपेक्षा करूं लागले, त्यामुळें त्याला कोठेंही सुखास पडेना; व तो सैरावैरा इतस्ततः भटकूं लागला. शेवटीं दुःखानें होरपळून जाऊन जेव्हां कोणीकडूनही त्याला सुटकेचा मार्ग कळेना, तेव्हां तो इंद्रोत नामक शौनक कुलांतील एका ब्राह्मणाला शरण गेला. मग त्या इंद्रोतानें पापशुद्ध्यर्थ त्या जनमेजयाकडून अश्वमेध नांवाचा यज्ञ करविला. त्या यज्ञाच्या प्रभावानें त्या यज्ञांतींचें अवभृथस्नान होतांच त्याच्या आंगचा तो सर्व दुर्गंध नाहींसा झाला. परंतु, तो दिव्य रथ इंद्रानें पारीक्षितापासून काढून चेदिपति जो वसु त्याला दिला. वसूपासून बृहद्रथाला मिळाला. बृहद्रथापासून मग तो क्रमानेंच बृहद्रथाचा पुत्र जो जरासंध त्याकडे आला. पुढें भीमानें ज्या वेळीं जरासंधाला मारिलें, त्या वेळीं त्यानें तो रथ घेऊन मोठ्या प्रेमानें श्रीकृष्णाला नजर केला. असो.

ययाति राजानें ही सप्तद्वीप पृथ्वी समुद्रासह जिंकल्यावर तिचे पांच वांटे करून आपल्या पांच पुत्रांना दिले. आग्नेयीचा भाग त्यानें तुर्वसूला दिला. पश्चिमेचा द्रुह्यूला दिला.

---

१ लक्ष्मीव्यंकटेश छापखान्यांतील प्रतींत या ठिकाणीं "भार्यासुवाह" असा विलक्षण पाठ आहे. याचा अर्थ या रथांत बायकोला घालून तो फिरत असे असा होतो. हा पाठ आजकालच्या हवा खावयास जाणारांना बळकटी देणारा आहे; तथापि, तो अप्रासंगिक आहे; म्हणून आम्हीं तो सोडून लेखी पोथींतील "कार्यसमुद्वहत्" हाच पाठ धरिला आहे.

उत्तरेचा अनूला. सर्वांत ज्येष्ठ जो यदु त्याची योजना ईशान्य दिशेला केली; व पुरूला मध्यप्रांताच्या गादीवर बसविलें. ययातीनें घालून दिलेल्या मर्यादेप्रमाणें त्याचे पांचही पुत्रांचे वंशज ह्या सप्तद्वीप पृथ्वीचें तींतील नगरग्रामांसह आपआपल्या मुलखांनीं यथान्याय पालन करीत आहेत. हे राजा, आतां या पांचजणांची पुढील प्रजा मी तुला पुढें सांगेन. ( तूर्त तुला ययातीचीच एक थोडी गोष्ट सांगतों. ) ययातीनें राज्याची विभागणी करून आपले धनुर्बाणही आपल्या पराक्रमी पुत्रांच्या स्वाधीन करून आपल्या माथ्यावरील संसाराचा सर्व भार मुलांवर टाकिल्यावर त्याला जरा प्राप्त झाली. त्या अजिंक्य ययाति राजानें हातचें शस्त्र ठेविल्यावर एकवार पृथ्वीकडे अवलोकन केलें. तेव्हां त्याला अतिशय समाधान झालें. याप्रमाणें विभागणी करून राज्याची व्यवस्था लाविल्यावर एक दिवस ययाति राजा आपल्या यदु नामक पुत्राला म्हणाला, ‘हे वत्सा, कांहीं तरी युक्तीनें माझी ही जरा घेऊन आपलें तारुण्य मला दे; म्हणजे मी माझी जरा तुझे ठिकाणीं ठेवून व तुझें तारुण्य घेऊन या पृथ्वींत संचार करीन.’ यावर यदूनें उत्तर केलें, ‘मी एका ब्राह्मणाला तुला इष्ट ती भिक्षा देईन असें मोघम शब्दानें कबूल केलें. परंतु, ती भिक्षा कोणती व काय याचा अजून निर्णय ठरला नाहीं, व जरा प्राप्त झाली असतां पानभोजनाच्या कामीं मोठी खटखट पडते; याकरितां (त्या ब्राह्मणाच्या ऋणांतून मुक्त होईपर्यंत ) हे राजा, मला तुमची जरा घेण्याचें धैर्य होत नाहीं. आपणाला मजहूनही आवडते असे दुसरे बहुत पुत्र आहेत. ते आपल्या इच्छेप्रमाणें करितील. याकरितां या कामीं त्यांपैकीं कोणाची तरी निवड करावी.’ असें जेव्हां यदूनें चकचकीत उत्तर दिलें तेव्हां अतिशय क्रोध येऊन तो वाक्पटु ययाति राजा आपल्या पुत्राची निर्भर्त्सना करीत म्हणाला, ‘हे दुष्टबुद्धे, मी तुझा ज्ञानदाता गुरु, माझा अनादर करून तूं कोणाच्या आधारावर उभा राहाणार; आणि बापाचा अवमान करून अतिथीचा सत्कार केल्यास तुला धर्म कसा घडेल?’ असें म्हणून त्या रागाच्या झटक्यांतच त्यानें यदूला शाप दिला कीं, हे मूढा, तुझी प्रजा राज्यहीन होईल. नंतर त्यानें यदूप्रमाणेंच तुर्वसु, द्रुह्यु व अनु यांस आज्ञा केली; पण त्यांनींही यदूप्रमाणेंच त्याला मोडून काढिलें. मग त्या अजिंक्य ययातीनें त्या तिघांनाही शाप दिले. कसकसे ते मीं तुला आदिपर्व प्रसंगींच सांगितले आहेत. याप्रमाणें पुरूच्या वरचे चारही पुत्रांस शाप दिल्यावर राजा ययाति पुरूला म्हणाला, ‘हे पुरू, तुला जर संमत असेल तर माझी ही जरा तुझे ठिकाणीं ठेवून आणि तुझें तारुण्य घेऊन त्या रूपानें ही पृथ्वी फिरावी असा माझा हेतु आहे.’ पित्याच्या वचनाबरोबर प्रतापी पुरूनें त्याची जरा घेतली, व ययाति पुरूच्या तरण्याबांड रूपानें लोकांत वागूं लागला. कामवासनेची एकदां पक्की तृप्तीच करून टाकावी, अशी मनांत इच्छा धरून तो बलवान् ययाति चैत्ररथ नामक वनांत या जन्मीं गौ या नांवानें प्रसिद्ध असलेली जी पूर्वीची विश्वाची नामक अप्सरा तिच्याशीं रासरंग खेळत राहिला. इतकें करूनही कामभोगाची वासना पुरी होतच नाहीं असें जेव्हां त्यानें पाहिलें तेव्हां तो पुरूकडे परत आला व पुरूनें आपली जरा ययातीपासून माघारी घेतली. हे जनमेजया, ती जरा परत घेतेवेळीं त्या अनुभवी ययातीनें जे कांहीं श्लोक म्हटले त्यांचा मतलब ध्यानांत घे. कारण, तो ध्यानांत घेतल्यानें कूर्म ( कासव ) ज्याप्रमाणें

आपलीं अंगें सर्व बाजूंनीं आंवरून घेतो, त्याप्रमाणें प्रत्येक मनुष्य आपल्या कामवासना आंवरून धरील.

त्या श्लोकांचा मतलब हाः—१ काम्य वस्तूंच्या उपभोगानें हा काम कधींही शांत होत नाहीं, उलट तूप घातल्यानें जसा अग्नि अधिकच भडकतो, त्याप्रमाणें भोगानें हा अधिकच भडकतो. २ जीवांची भोगतृष्णा इतकी अफाट आहे कीं, या पृथ्वींत जेवढे म्हणून धान्य, हिरण्य, पशु व स्त्रियादि पदार्थ आहेत ते सर्व एकट्याला दिले तरी देखील त्याची तृप्ति म्हणून नाहीं. याकरितां शहाण्यानें हा प्रकार पाहून निर्मोह होण्यास शिकावें. ३ ज्या वेळेस आपल्या ठिकाणीं कोणाही प्राण्याला कर्म, मन किंवा वाणि यांपैकीं कशानेंही अपकार करण्याची बुद्धि उरत नाहीं तेव्हां ब्रह्मप्राप्ति होते. ४ ज्या वेळीं याला (जीवाला) इतर कोणापासूनही भय वाटत नाहीं, तसेंच इतर कोणालाही यापासून वाटत नाहीं, व जेव्हां हा कशाची इच्छा करीत नाहीं किंवा द्वेषही करीत नाहीं, त्यावेळीं हा ब्रह्मरूप होतो. ५ हे लोकहो, कुबुद्धीच्या लोकांना जिचा त्याग करणें अतिशय कठीण पडतें व आपण जरठ झालों तरीही जिला जरा म्हणून कशी ती येतच नाहीं, असली जी ही तृष्णा, हा एक प्राणांतिक रोगच आहे; हिला जो फांटा देईल त्यालाच सुख होईल. ६ मनुष्य जरठ झाला म्हणजे त्याचे केश जीर्ण होतात, व दंत जीर्ण होतात; पण हा जरठाहूनही जरठ झाला तरी जीविताशा व धनाशा या मात्र कधींही जीर्ण होत नाहींत. ७ या लोकांत कामसुख म्हणजे सर्व सुखांत अति मोठें असें समजतात. परलोकांत स्वर्गांतील सुख हें अति मोठें समजतात. परंतु, (मला वाटतें) तृष्णेचा क्षय झाल्यानें होणाऱ्या सुखाच्या सोळाव्या हिश्श्यानेंही कामसुखाला किंवा दिव्यसुखाला लज्जत नाहीं.

याप्रमाणें लोकांना सांगून तो राजर्षि ययाति आपले स्त्रीसह तपोवनांत गेला. तेथें त्यानें उंच पर्वताच्या कड्यावर बहुतकालपर्यंत पुष्कळसें तप केलें. तपाच्या अखेर अखेर त्यानें अन्नव्यवहार सोडिला. शेवटीं मरणोत्तर स्त्रीसह तो स्वर्गास गेला. हे राजा, या ययातीच्या वंशांत पांच मोठे राजर्षि झाले. सूर्याचे किरणांनीं जशी ही पृथ्वी व्यापली जाते त्याप्रमाणें त्यांचे प्रभावानें ही भरून गेली होती. हे राजर्षे जनमेजया, वृष्णिकुलांतील धुरीण जो परमात्मा श्रीकृष्ण तो ज्या वंशांत आला तो यदूचा राजर्षिमान्य वंश मी आतां तुला सांगतों तो ऐक. ययाति राजाचें पुण्यचरित्र श्रवण किंवा पठण करील तो धनवान्, प्रजावान्, आयुष्मान् व कीर्तिमान् होईल.

## अध्याय एकतिसावा.

—:०:—

### कुक्षेयुवंशवर्णन.

जनमेजय म्हणतोः—हे ब्रह्मन्, मला पुरुवंशाची खरी खरी हकीकत ऐकण्याची इच्छा आहे. तसेंच द्रुह्यु, अनु, यदु व तुर्वसु यांचेंही पृथक् पृथक् वंशवर्णन मला पाहिजेच आहे. तथापि, पुरुवंशाबद्दलच मीं प्रथम इच्छा दर्शविली. याला कारण, त्यांतच वृष्णिवंशाचा संबंध येत असून तो माझाही वंश आहे. तर या वंशाचें वर्णन सर्वांआधीं व सविस्तर मला सांगावें.

वैशंपायन सांगतातः—हे जनमेजया, फार चांगली गोष्ट आहे. पुरुवंश हा सर्वोत्तमच आहे, त्याचें पौरुषही अत्युत्कृष्ट आहे; व त्यांतच तुझा जन्मही आहे. याकरितां तुझ्या इच्छेप्रमाणें सर्वांआधीं व विस्तारानें तो

मी तुला सांगतों. त्याच्यामागून क्रमानें द्रुह्यु, अनु, यदु व तुर्वसु यांचेही वंश सांगेन.

हे जनमेजया, पुरूचा पुत्र हा मोठा वीर्यवान् होता. त्याला पुढें प्राचिन्वान् नामक पुत्र झाला. त्यानें पूर्व दिशा जिंकिली. प्राचिन्वानाला पुढें प्रवीर झाला. प्रवीराला मनस्यू. मनस्यूला अभयद. अभयदाचे पोटीं राजा सुधन्वा हा जन्मला. सुधन्व्याला पुढें बहुगव झाला. बहुगवाला शम्याति. शम्यातीला रहस्याति. रहस्यातीला रौद्राश्व. रौद्राश्वाला घृताची नामक रंभेपासून दहा पुत्र झाले. या दहांपैकीं ऋचेयु हा पहिला होता, पुढें कृकणेयु, कक्षेयु, स्थंडिलेयु, सन्नेतेयु, दशार्णेयु, जरेयु, स्थलेयु, धनेयु व वनेयु. याचप्रमाणें त्याला दहा मुलीही होत्या. त्यांचीं नांवें:—रुद्रा, शूद्रा, भद्रा, मलदा, मलहा, खलदा, नलदा, सुरसा, गोचपला व स्त्रीरत्नकूटा. अत्रिवंशांत[1] जन्मलेला प्रभाकर ऋषि हा या दाही बहिणींचा भर्ता होता. त्यानें पहिली जी रुद्रा, हिचे ठायीं सोम नावांचा यशस्वी पुत्र निर्माण केला. या ऋषीला प्रभाकर नांव पडण्याचें कारण, एकदां राहूच्या आघातानें सूर्य हा आकाशांतून धरणीवर पडून सर्व लोक तमोमय झाला असतां यानें प्रभा पाडली. याशिवाय सूर्य खालीं येत असतां 'स्वस्ति असो, स्वस्ति असो,' असें त्याला उद्देशून या ब्राह्मणानें म्हटल्यामुळें सूर्य पृथ्वीवर न पडतां तसाच आकाशांत थबकून राहिला. या महातपस्वी ऋषीच्या प्रभावानें अत्रिवंशाला अतिशयच महत्व आलें. तें इतकें कीं, जेवढे मिळून गोत्रप्रवर्तक झाले त्यांत अत्रीचेंच मान श्रेष्ठ आहे. यज्ञांतही आत्रेय ब्राह्मणाला स्वतंत्र दक्षणा दिली पाहिजे अशी आज्ञा आहे. हा कायदा प्रत्यक्ष देवांनींच घालून दिला आहे. असो; अशा त्या प्रख्यात प्रभाकर ऋषीनें, त्याला (रौद्राश्वानें) पुत्रिका विधीनें दिलेल्या ज्या रुद्रादि दहाजणी होत्या त्यांचे ठिकाणीं तपोनिष्ठ असे दहा पुत्र निर्माण केले. हे सर्वही मोठे वेदपारग ऋषि होऊन गोत्रकर्ते ऋषि झाले. यांना स्वस्त्यात्रेय असें नांव पडलें. मात्र बापाची मालमत्ता कांहींही यांच्या हातीं लागली नाहीं. असो; कक्षेयूला तीन महारथी पुत्र होते. त्यांचीं नांवें:—सभानर, चाक्षुष, परमंथु. या सभानराचा पुत्र कालानल नामक होता. हा मोठा विद्वान् होता. त्या कालानलाला सृंजय नांवाचा एक धर्मज्ञ पुत्र होता. सृंजयाला पुरंजय नांवाचा मोठा वीर पुत्र झाला. या पुरंजयाचे पोटीं राजा जनमेजय हा जन्मला; आणि राजर्षि जनमेजयाचा महाशाल हा पुत्र होता. हा वेदांमध्यें निपुण असून याची सर्व पृथ्वीवर मोठी कीर्ति होती. या महाशालाला महामना नांवाचा मोठा धार्मिक व वीर पुत्र झाला. यानें मोठाच लौकिक कमाविला. देवगण देखील याला मान देत. या महामनानें दोन पुत्र निर्माण केले. पहिला उशीनर, हा मोठा धर्मज्ञ होता; व दुसरा तितिक्षु, हा मोठा बलाढ्य होता. उशीनराला पांच स्त्रिया होत्या. या सर्वही राजर्षींच्या कुळांतल्या होत्या. यांचीं नांवें:—नृगा, कृमी, नवा, दर्वा व पांचवी दृषद्वती. या पांचींच्या ठिकाणीं पांच पुत्र त्या उशीनराला झाले. ते मोठ्या तपश्चर्येनें झाले व उतारवयांत झाले. तथापि, ते कुलभूषण निपजले. नृगेला नृग झाला, कृमीला कृमि झाला, नवेला नव झाला, दर्वेला सुव्रत झाला; व दृषद्वतीला राजा शिबी झाला. शिबीच्या संततीला शिबीच म्हणत. नृगाच्या संततीला योधेय म्हणत. नवाच्या राजधानीला नवराष्ट्र म्हणत; कृमीच्या राजधानीला कृमिलापुरी म्हणत, व सुव्रताच्या राजधानीला अंबष्ठा

[1] अत्रि आणि सर्वांशीं मैत्री.

असें म्हणत; आतां शिबीचे पुत्र ऐक. हे चार होते. हे मोठे त्रैलोक्यांत प्रख्यात असे वीर होते. यांचीं नांवें:—वृषदर्भ, सुवीर, भद्रक व कैकेय. यांचीं राज्यें मोठीं समृद्ध होतीं व त्यांना त्यांच्या राजकर्त्यांवरून वृषदर्भ, सुवीर, भद्रक व कैकेय अशींच नांवें पडलीं. आतां तितिक्षूची प्रजा ऐक. तितिक्षूला उषद्रथ नांवाचा मुलगा झाला. हा मोठा बलाढ्य असून यानें पूर्व दिशेला आपलें राज्य स्थापिलें. उषद्रथाला पुढें फेन नांवाचा पुत्र झाला. फेनापासून सुतप. सुतपापासून राजा बलि. हा बलिराजा पूर्वजन्मीं दानवयोनींत असून फार मोठा योगी होता. तो या जन्मीं मनुष्ययोनींत येऊन राजा झाला. याचा भाता सोन्याचा असे. या बलीनें आपला वंश चालविणारे असे पांच पुत्र इहलोकीं निर्माण केले. त्यांत अंग हा प्रथम झाला. पुढें वंग व सुम्ह हे झाले. शेवटीं पुंड्र व कलिंग झाले. एवढी प्रजा त्याला क्षत्रिय स्त्रीपासून झाली. याखेरीज ब्राह्मण जातींतही त्याचा वंश चालू झाला. हे जनमेजया, या बलीला ब्रह्मदेवानें प्रसन्न होऊन मोठमोठाले वर दिले होते, ते हे:—"तूं महायोगी होशील. तुला कल्पपर्यंत आयुष्य राहील. युद्धांत तूं अजिंक्य रहाशील. धर्मविचारांत तुझ्या मताला वरिष्ठ मान मिळेल. त्रैलोक्यांत काय काय घडत आहे, तें तुला कळत जाईल. तुझ्या अर्ध्या वचनांत लोक राहातील. शक्तींत तुझी बरोबरी कोणीच करणार नाहीं. धर्माचीं जीं अंतरंग रहस्यें त्यांचा तुला अपरोक्ष साक्षात्कार राहील. तूं या भूतलावर ब्राह्मण क्षत्रियादि चतुर्वर्णांची आपआपल्या मर्यादेनें स्थापना करशील." याप्रमाणें ब्रह्मदेवानें दिलेले वर ऐकून बलिराजा परम शांतीला प्राप्त झाला. बलि हा जात्या ऊर्ध्वरेता असल्यानें त्याची जी ही ब्राह्मणक्षत्रियादि संतति सांगितली ती त्याच्या पोटची नसून त्याचें क्षेत्र म्हणजे स्त्री जी सुदेष्णा तिचे ठायीं महातेजस्वी जो दीर्घतप नामक ऋषि त्याजपासून झालेली होती व म्हणूनच तिला क्षेत्रज म्हणत. बलीनें वर सांगितलेल्या आपल्या पांचही निष्पाप पुत्रांस राज्याभिषेक करून आपली संसारांतील कर्तबगारी संपली, असें समजून योगाचा मार्ग धरिला. तो मूळचाच समर्थ योगी होता. तो सहजच प्राणिमात्राला अजिंक्य झाला; व शेवटीं कृतकृत्य होऊन केवळ आयुष्याची नेमलेली कल्पपर्यंतची मर्यादा संपे तों वाट पाहात राहिला; व ठरल्याप्रमाणें कल्पाचा दीर्घकाल संपतांच देह ठेवून आपल्या पूर्वस्थानाला गेला. असो; बलीचे जे वर पांच पुत्र सांगितले ते राजे झाल्यावर त्यांच्या राज्यांना त्यांच्याच नांवांवरून अंगदेश, वंगदेश, सुम्हदेश, पुण्ड्रक व कलिंग अशीं नांवें पडलीं. आतां बलीपुत्र जो अंग त्याची संतति ऐक. अंगाला राजेंद्र दधिवाहन नामक मोठा प्रतापी पुत्र झाला. या दधिवाहनाचा पुत्र दिविरथ नामक झाला. हा पराक्रमानें केवळ इंद्रतुल्य होता. या दिविरथाला पुढें विद्वान् धर्मरथ हा पुत्र झाला. धर्मरथाला पुढें चित्ररथ झाला. या चित्ररथानें विष्णुपद नामक पर्वतावर यज्ञ करून त्या यज्ञांत इंद्राचे बरोबर बसून सोमपान केलें. या चित्ररथाला दशरथ[१] नामक पुत्र झाला. यालाच लोमपाद असें म्हणत असत. याला शांता नामक कन्या होती. ( ही ऋष्यशृंग नामक ऋषीला दिली होती. ) ऋष्यशृंगाच्या प्रसादानें या दशरथाला महायशस्वी चतुरंग नांवाचा पुत्र झाला. या चतुरंगाला पुढें पृथुलाक्ष नामक पुत्र झाला. या पृथुलाक्षाला चंप नामक पुत्र झाला. यानें आपल्या राजधानीस चंपा असें नांव ठेविलें. हिला पूर्वी मालिनी असें नांव होतें. पूर्णभद्र मुनीच्या प्रसादानें

१ हा दशरथ म्हणजे रामपिता नव्हे, हें उघड आहे.

याला हर्यंग नांवाचा पुत्र झाला. या हर्यंगाकरितां विभांडकपुत्र जो ऋष्यश्रृंग ऋषि यानें आपल्या मंत्रसामर्थ्यानें सागरोद्भव जो इंद्राचा ऐरावत नामक हत्ती तो स्वर्गलोकाहून खालीं आणला, व याच वाहनावर हा राजा फिरत असे. या राजाला भद्ररथ नामक पुत्र झाला. भद्ररथाला पुढें बृहत्कर्मा पुत्र झाला. त्या बृहत्कर्म्याला पुढें बृहद्दर्भ हा झाला. बृहद्दर्भाला बृहन्मन झाला. या बृहन्मनानें पुढें जयद्रथनामक पुत्र निर्माण केला. जयद्रथाला पुढें राजा दृढरथ हा झाला. दृढरथाला पुढें विश्वजित् हा झाला. विश्वजिताचा कर्ण, आणि कर्णाचा विकर्ण. विकर्णाला अंगवंशाची वृद्धि करणारे असे शंभर पुत्र झाले. मघां जो बृहद्दर्भाचा पुत्र बृहन्मन राजा सांगितला त्याला दोन स्त्रिया होत्या. एकीचें नांव यशोदेवी व दुसरीचें नांव सत्या. या दोघीही सुलक्षणी स्त्रिया चैद्याच्या मुली होत्या. या सवतींपासून या वंशाचे दोन फांटे झाले. यशोदेवीचे पोटीं वर सांगितलेला जयद्रथ आला, व सत्येच्या पोटीं विजय हा आला. हा विजय शांत्यादिक गुणांनीं कोणाही ब्राह्मणापेक्षां व शौर्यादि गुणांनीं कोणाही क्षत्रियापेक्षां श्रेष्ठ होता. या विजयाला धृतिनामक पुत्र झाला. धृतीचा पुढें धृतव्रत. धृतव्रताचा पुत्र महायशस्वी सत्यकर्मा. सत्यकर्माला अधिरथनामक सूतपुत्र[1] झाला. या अधिरथ सूतानें कुंतीपुत्र कर्ण याला आपलासें म्हटलें होतें, व त्यामुळेंच कर्णाला पुढें सूतपुत्र असें म्हणत. याप्रमाणें महाबल कर्णापर्यंत तुला वंशवर्णन सांगितलें. या कर्णाचा पुत्र वृषसेन व वृषसेनाचा पुढें वृष.

हे महाराजा, याप्रमाणें मीं तुला अंगवंशाचे सर्व राजे सांगितले. हे सर्वही मोठे सत्यनिष्ठ, महारथी, महात्मे व प्रजावान् असे होते. आतां, हे राजा, रौद्राश्वाचा पुत्र जो ऋचेयु त्याचा वंश म्हणजे ज्या वंशांत तूं स्वतः उत्पन्न झालास, तो तुला सांगतों ऐक.

# अध्याय बत्तिसावा.

—:०:—

## पुरुवंशानुकथन.

हे राजा, तुझा पूर्वज ऋचेयु याचा त्याकाळीं पराक्रमानें युद्धांत हात धरणारा कोणीही नसल्यामुळें तो एकच राजा आहे, असें म्हणत. या ऋचेयूला तक्षकाची कन्या ज्वलना ही दिली होती. या ज्वलनेचे ठिकाणीं त्यानें मतिनार नांवाचा पुत्र उत्पन्न केला. या मतिनाराला मोठे धार्मिक असे तीन पुत्र होते. त्यांतील पहिला तंसु, दुसरा प्रतिरथ व तिसरा सुबाहु. यांशिवाय मांधाता नामक प्रसिद्ध राजर्षीची माता जी गौरी ती याची कन्या होती. हे तिघेही बंधु मोठे वेदवेत्ते, ब्रह्मज्ञ, सत्यवादी, बलाढ्य, अस्त्रनिपुण व युद्धविशारद असे होते. यांपैकीं प्रतिरथाला कण्व नामक पुत्र झाला, हाच पुढें राजा झाला. कण्वाचा पुढें मेधातिथि. या मेधातिथीपासून काण्वायन नांवानें प्रसिद्ध असणारें द्विजकुल निर्माण झालें. हे राजा जनमेजया, मोठ्या ब्राह्मणांनाही भारी असा कोणी एक राजर्षि होता, त्याची ईलिनी नामक कन्या होती. तिच्याशीं तंसूनें लग्न लाविलें. त्यापासून तंसूला पुढें सुरोध नामक पुत्र झाला. हा सुरोध राजर्षि, मोठा धर्मप्रवर्तक, यशस्वी, ब्रह्मवादी व पराक्रमी होता; व उपदानवी ही त्याची भार्या होती. हिला सुरोधापासून चार पुत्र झाले. त्यांचीं नांवेः—दुष्यंत, सुष्मंत, प्रवीर व अनघ.

त्यांपैकीं दुष्यंताला भरत नांवाचा वीर्यशाली पुत्र झाला; याला अयुत हत्तींचें बळ

[1] ब्राह्मणीला क्षत्रियापासून झालेल्या संततीला सूत असें म्हणतात.

असे; व याच्या पराक्रमामुळें त्याला सर्वदमन म्हणत. हा शकुंतलेच्या पोटीं आला. हा पुढें मोठा चक्रवर्ती झाला; व हे जनमेजया, तुमच्या कुळाला जें आजकाल भारत हें नांव प्राप्त झालें आहे, तें याचे योगानेंच. याला भरत हें नांव पडण्याचें कारण असें आहे कीं, शकुंतलेनें हा तुझा म्हणून पुढें आणून ठेविलेल्या पुत्राचा दुष्यंत जेव्हां स्वीकार करीना तेव्हां आकाशवाणी झाली कीं " बाबारे, पुत्र म्हटला म्हणजे पित्याचा माल. किंबहुना पिताच तो. माता ही केवळ निमित्त आहे. ती कांहीं कालपर्यंत (गर्भावस्थेंत असतांना) पुत्र सांठविण्याची एक चर्ममय पिशवी आहे. यापलीकडे तिचा अधिकार नाहीं. सारांश, पुत्र हा बापाचा. याकरितां, हे दुष्यंता, ( साध्वी ) शकुंतलेची अशी हेटाळणी करूं नको. तिनें आणलेला हा पुत्र तुझा आहे. हा घे आणि याचें [1]भरणपोषण कर. बाबारे, स्ववीर्यापासून उत्पन्न होणारा पुत्र ही एक दुर्मिळ चीज आहे. कारण, असला पुत्र हा आपल्या बापाला यमसदनांतून बाहेर ओढून काढितो ( नरकांत पडूं देत नाहीं ). हे राजा, शकुंतला बोलली तेंच खरें आहे. हा गर्भ तूंच तिचे ठिकाणीं स्थापिलेला आहेस." हे जनमेजया, मी तुला पूर्वी आदिपर्व सांगतांना सांगितलेंच आहे कीं, मातृकोपामुळें भरतकुलाचा उच्छेद झाला होता. तेव्हां आंगिरसकुलोत्पन्न बृहस्पतीचा पुत्त जो समर्थ महामुनी भरद्वाज त्याला मरुत नामक यज्ञदेवतांनीं भरतवंशांत पुत्रत्वानें संक्रमित केलें. या कामीं मरुतांनीं बुद्धिवान् भरद्वाजाला धर्मबुद्धीनें भरतकुलांत नेऊन घातलें, आणि भरद्वाजानेंही मोठे क्रतु करून उलट मरुतांचें कल्याण केलें. ही गोष्ट लोकांच्या तोंडीं आहे. मातृशापानें भरतवंशांत पुत्रोत्पत्ति बंद पडली होती; तथापि, भरद्वाज जेव्हां त्या वंशांत आला तेव्हां ती पुन्हा चालू झाली. त्या कुळांत आल्यावर त्याला वितथ नामक पुत्र झाला. नातू दृष्टीस पडला, तेव्हां आपला खंडित वंश आतां सुरू झाला, अशी मनाला खातरी होऊन मग भरत राजा स्वर्गाला गेला. इकडे तपोनिष्ठ भरद्वाजही आपला पुत्र वितथ याला राज्यावर बसवून तपोवनांत गेला. पुढें या वितथाला पांच पुत्र झाले. त्यांचीं नांवें:— सुहोत्र, सुहोता, गय, गर्ग व महात्मा कपिल. सुहोत्राला पुढें दोन मुलगे झाले. एक महासत्ववान् काशिक, व दुसरा, राजा गृत्समति. गृत्समतीला ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिन्ही जातींत संतति झाली. काशिकाला काशेय आणि दीर्घतप हे पुत्र झाले. दीर्घतपाला धन्वंतरी नामक पुत्र झाला. धन्वंतरीचा पुत्र केतुमान्, केतुमानाचा राजा वीर भीमरथ. भीमरथाचा पुत्र राजा दिवोदास. ह्या दिवोदासानें सर्व राक्षसांचा नाश केला, अशी प्रसिद्धी आहे. दिवोदासाचे वेळींच निकुंभानें सहस्र वर्षेपर्यंत तूं ओस पडशील असा वाराणशीला शाप दिल्याप्रमाणें ती ओस पडली; व पुढें ती क्षेमकानें पूर्ववत् वसविली. वाराणशीला शाप होतांच दिवोदासानें तिच्याच सिंवेवर गोमतीचे कांठीं नवी राजधानी वसविली. ही वाराणशी नगरी पूर्वी यदुवंशांत उत्पन्न झालेला जो तपोनिष्ठ राजा भद्रश्रेण्य त्याची राजधानी होती. पुढें या भद्रश्रेण्याला मोठे शूर शंभर पुत्र झाले. परंतु यांचा निःपात करून राजा दिवोदासानें आपली वसति त्या नगरांत केली. दिवोदासाला राजा प्रतर्दन हा पुत्र झाला. प्रतर्दनाला पुढें दोन पुत्र झाले. पैकीं एकाचें नांव वत्स व दुसऱ्याचें भार्ग.

[1] " पुत्राचें भरण करीं, प्रेमें तुज लाधला, भर, तयातें।
म्हणतील आजपासुनि पूरुकुळीं सर्वही ' भरत ' यातें "॥
मोरोपंत, शाकुंतल.

या वत्साला अलर्क हा पुत्र झाला. अलर्काला पुढें सन्नतिमान् हा पुत्र झाला. भद्रश्रेण्याचा पुत्र दुर्दम याला हैहयानें दत्तक घेतलें. हा दुर्दम बाल असें समजून (त्याचे इतर बंधु मारितांना) दिवोदासानें दयेस्तव राखिला होता. परंतु, यानेंच दिवोदासानें बळकाविलेलें आपल्या वडिलांचें राज्य परत हिसकावून घेतलें. मागें जो केतुमान् राजा सांगितला त्याचा पुत्र जो भीमरथ किंवा दिवोदास याला अष्टारथ नांवाचा पुत्र झाला. याला प्रतर्दन असेंही म्हणत. यानें वैराचें बीज नाहींसें व्हावें म्हणून दुर्दमाचे पुत्र बाल आहेत असें पाहून त्यांचा चुराडा केला. काशीचा अधिपति अलर्क राजा हा मोठा ब्रह्मज्ञ व सत्यप्रतिज्ञ होता. लोपामुद्रेच्या कृपेनें हा सदैव तरुण असून याचें रूप कधींच उतरलें नाहीं. त्याचें राज्यही मोठें विशाल होतें. अशा रूपयौवनाच्या भरांत त्यानें तें राज्य साठ हजार सहाशें वर्षेंपर्यंत भोगलें. इतकें विपुल आयुष्य त्याला प्राप्त होण्याला कारण तरी लोपामुद्रेचाच प्रसाद. इतकें दीर्घकाल राज्य करून अखेर त्यानें क्षेमक नामक राक्षसाचा वध करून वाराणशी नामक जी नगरी ओस पडली होती, ती पुन्हा वसविली. या अलर्काला सुनीथ नांवाचा पुत्र होता. सुनीथाचा क्षेम्य. क्षेम्यापासून केतुमान् झाला; केतुमानापासून वर्षकेतु; वर्षकेतूचा पुढें विभु; विभूचा आनर्त; आनर्ताचा सुकुमार; सुकुमाराचा महारथी सत्यकेतु; सत्यकेतूपासून मोठा धार्मिक व तेजस्वी असा वत्स राजा झाला; वत्साच्या पुत्राला वत्सभूमी म्हणत; व भार्गवाच्या पुत्राला भार्गभूमी असें म्हणत. हे सर्वही भार्गववंशांत उत्पन्न झालेले अंगिरसाचे पुत्र होते. यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारही जाती होत्या.

वितथाचा पुत्र जो सुहोत्र त्याचा पुत्र बृहत् हा झाला. बृहताला पुढें अजमीढ, द्विमीढ व पुरुमीढ असे तीन पुत्र झाले. अजमीढाला मोठ्या यशस्विनी अशा तीन स्त्रिया होत्या. रूपलक्षणांनीं[1] या सर्वही फार उंची प्रतीच्या स्त्रिया होत्या. यांचीं नांवें:—नालिनी, केशिनी व धूमिनी. पैकीं केशिनीपासून अजमीढाला प्रतापशाली जन्हु हा पुत्र झाला. यानें सर्वमेध नांवाचा बहुत दिवस चालणारा महायज्ञ केला. त्याचे रूपाला भुलून गंगा अति नम्र होऊन एखाद्या अभिसारिकेसारखी त्याकडे आली. परंतु, तो तिचा स्वीकार करीना. तेव्हां तिनें रागावून त्याची ती सर्व यज्ञशाला जळांत बुडवून टाकिली. तें तिचें कृत्य पाहून, हे भरतश्रेष्ठा, जन्हु गंगेला म्हणाला, 'तूं फार माजली आहेस, पण तुझा नखरा मी आतांच उतरतों. तिन्ही लोकांत तुझें आहे नाहीं तें सर्व उदक आतांच पिऊन टाकितों. म्हणजे तुझ्या उर्मटपणाबद्दल तुला चांगलेंच शासन होईल.' असें म्हणून त्या राजानें गंगेचें आचमन करून टाकिलें. तें कृत्य पाहून महर्षींना मोठी फिकीर पडली, व त्यांनीं त्याची विनवणी केली, तेव्हां त्यानें ती मोकळी सोडिली. ती जन्हूच्या पोटांतून आली असें पाहून त्यांनीं तिला जान्हवी म्हणजे जन्हूची कन्या अशी संज्ञा दिली. (तिचेकडे कन्यात्व आल्यामुळें तिचें जन्हूविषयींचें विषयप्रेम अर्थातच लटकें पडलें.) मग जन्हूनें युवनाश्वाची मुलगी कावेरी हिच्याशीं लग्न लाविलें. ह्या कावेरीला गंगेचा शाप झाल्यामुळें पुढें तिचें देहार्ध नदीरूप बनलें. जन्हूला पुढें अजक नांवाचा पुत्र झाला. हा बापाचा मोठा लाडका असून मोठा प्रतापी

१ सामुद्रिक शास्त्रकारांनीं स्त्रियांचे रूपलक्षणांवरून चार वर्ग लाविले आहेत. त्यांतील सर्वोत्कृष्ट वर्गाला पद्मिनी असें म्हणतात.

होता. या अजकाला पुढें बलाकाश्व हा पुत्र झाला. याला शिकारीचा फार नाद असे. त्याचा पुत्र कुशिक, हा पल्हव नामक रानटी लोकांनीं सदा वेढलेला असे. पुढें या कुशिकानें इंद्राप्रमाणें पराक्रमी पुत्र व्हावा, म्हणून तीव्र तप आरंभिलें. तेव्हां इंद्राला धास्ती पडून तोच पुत्रत्वानें त्याचे पोटीं आला. हाच तो गाधी नांवाचा राजा झाला. अर्थात् गाधी म्हणजे खुद्द इंद्रच. या गाधीला पुढें विश्वामित्र झाला. याशिवाय विश्वरथ, विश्वकृत व विश्वजित् असे आणखी तीन पुत्र त्याला झाले, व या चौघांही भावांहून धाकटी सत्यवती नांवाची कन्या झाली. ही सत्यवती ऋचीकाची स्त्री झाली, व तिजपासून (प्रसिद्ध) जमदग्नि झाला. विश्वामित्राला त्रैलोक्यांत प्रसिद्ध असे बहुत पुत्र झाले. त्यांचीं नांवें:—देवश्रवा, कति, (याजपासूनच कात्यायन हे झाले). शालावती नामक स्त्रीपासून हिरण्याक्ष झाला. रेणूपासून रेणुमान् झाला. याशिवाय सांकृत्य, गालव व मौद्गल्य असेही पुत्र होते. या सर्व कुशिककुलोत्पन्न पुरुषांचीं गोत्रें मोठीं प्रख्यात आहेत. पणी, बभ्रु, ध्यानजप्य, देवरात, शालंकायन, सौश्रव, लोहित्य, यामदूत, कारीत, सौश्रुत व तसेच आणखी सैंधवायन हे सर्वही कुशिककुलाचेच फांटे आहेत. यांतील पुष्कळ प्रवरभेदानें आपआपसांत विवाह करूं शकतात. हे महाराजा, पुरुकुलोत्पन्न राजे, व कुशिककुलोत्पन्न ऋषि, यांचे आपसांत संबंध झाले आहेत. अर्थात् ब्राह्मण व क्षत्रिय यांची मिसळ येथें झाली आहे. विश्वामित्राच्या पुत्रांत शुनःशेफ हा वडील होता. हा मुनिश्रेष्ठ मूळचा भार्गव असून पुढें कौशिककुलास मिळाला. याशिवाय देवरात वगैरे विश्वामित्राला आणखी पुत्र होते. विश्वामित्राची दृषद्वती नामक जी एक स्त्री होती, तिजपासून झालेल्या पुत्रांचें नांव अष्टक असें होतें. या अष्टकाला पुढें लौहि हा पुत्र झाला. येथवर जन्हूचा वंश मीं सांगितला.

आतां, हे पुरुषश्रेष्ठा, अजमीढाचा वंश सांगतों, ऐक. अजमीढाला नीलिनी नामक स्त्रीपासून सुशांति नामक पुत्र झाला. सुशांतीचा पुरुजाति, पुरुजातीचा बाह्याश्व. बाह्याश्वाला देवतुल्य पांच पुत्र होते. त्यांचीं नांवें:—मुद्गल, सृंजय, बृहदिषु, पराक्रमी यवीनर व पांचवा कृमिलाश्व. या पांचांचे ताब्यांत पांच देश होते. हे सर्वही देश भरवस्तीचे असून भरभराटीचे होते. असल्या पांच देशांचें संरक्षण करण्यास हे पंच म्हणजे पांचही बंधु अलम् म्हणजे समर्थ होते, म्हणून त्यांना **पंचाल** असें नांव पडलें होतें आणि यांच्या देशालाही तेंच नांव दिलें होतें. यांपैकीं मुद्गलाचे पोटीं मोठा यशस्वी मौद्गल्यनामक पुत्र झाला. हे सर्वही मोठे थोर असून क्षत्रधर्माचा आश्रय करणारे ब्राह्मण होते. कण्व आणि मुद्गल यांनीं अंगिरस पक्षाचा आश्रय केला. या मौद्गलाचा वडील मुलगा मोठा कीर्तिमान् इंद्रसेन नांवाचा होता. त्याला पुढें बध्न्यश्व हा पुत्र झाला. यानें मेनकेचे ठिकाणीं एक मुलगा व एक मुलगी अशी एक जोडी उत्पन्न केली. मुलाचें नांव दिवोदास, व मुलीचें नांव अहल्या. ही अहल्या शरद्वत गौतमाला दिली होती. हिजपासून ऋषिश्रेष्ठ शतानंद हा झाला. शतानंदापासून मोठा कीर्तिमान् असा सत्यधृति नामक पुत्र झाला. हा धनुर्वेदांत मोठा निपुण होता. हा सत्यधृति तप करीत असतां त्याच्या तपाला विघ्न आणण्यासाठीं जालपदी नांवाची अप्सरा आली. तिला पुढें पाहून हा मोहित झाला, व तिला कवटाळून धरीत असतां ती निसटली. मग तिजमागून तसाच धांवत जात असतां त्याचें रेत शर नामक गवताच्या बेटांत गळलें.

त्या वीर्यापासून तेथेंच एक मुलगा व एक मुलगी असें जोडपें उत्पन्न झालें. शंतनु राजा मृगयेला गेला असतां त्यानें तीं अर्भकें पाहून कृपेनें त्यांचें ग्रहण करून संगोपन केलें; व याच कारणानें त्या मुलाला कृप, व मुलीला कृपी किंवा गौतमी असें म्हणत. शरद्वत नामक यांच्या पूर्वजांवरून त्यांना कोणी शारद्वत किंवा गौतम असेंही म्हणतात.

आतां दिवोदासाची संतति सांगतों. दिवोदासाला राजा मित्रयु नांवाचा पुत्र होता.त्याच्यापासूनच मैत्रायणी शाखा उत्पन्न झाली, व हिजवरूनच मैत्रेय असें नांव कित्येक कुळांना पडलें. हे सर्व भृगुकुलोत्पन्न पुरुष क्षत्रियपक्षाचा आश्रय करून होते. महात्मा सृंजयाला पंचजन नामक पुत्र होता. पंचजनाचा पुत्र सोमदत्त राजा. सोमदत्ताचा सहदेव. या यशस्वी सहदेवाचा पुत्र सोमक राजा. हा वंशक्षय झाला असतां सहदेवाचे पोटीं पुन्हा आला. या सोमकाला जंतु नामक पुत्र झाला. त्याला पुढें शंभर पुत्र होते. या सर्वांत कनिष्ठाचें नांव पृषत. हाच समर्थ पृषतराजा द्रुपदाचा बाप. द्रुपदाला पुढें धृष्टद्युम्न झाला. धृष्टद्युम्नाला धृष्टकेतु. येथवर हे अजमीढाचे प्रसिद्ध वंशज सांगितले. यांनाच सोमक असेंही म्हणत. कारण, अजमीढाचा पुत्र सोमक यावरून हें नांव पडलें. ( अजमीढाच्या नीलिनी नामक स्त्रीची संतति वर सांगितली. ) आतां अजमीढाची तिसरी स्त्री जी धूमिनी तिची संतति सांगतों. हे राजा, ही धूमिनी हीच तुझ्या पूर्वजांची माता. ही पुत्रासाठीं हपापली असल्यामुळें हिनें स्त्रीजनांला परम दुश्वर असें अयुतवर्षेंपर्यंत पुत्रप्राप्त्यर्थ म्हणून तीव्र तप केलें. ती व्रतस्थ राहून यथाविधी अग्नीला होम देत असे; व नंतर पवित्र अन्नाचें मित भोजन करी, व अग्निहोत्रार्थ आणिलेल्या कुशांचेंच आस्तरण करून त्याजवरच निजे. असें तप केल्यावर अजमीढानें धूमिनीशीं संगम केला. त्या संगमापासून दिसण्यांत सुंदर पण वर्णानें धुरकट असा ऋक्ष नांवाचा पुत्र झाला. या ऋक्षापासून संवर्ण झाला. संवर्णाला पुढें कुरु. हा कुरु म्हणजे प्रयाग सोडून पलीकडे गेलें असतां लागणारें जें प्रसिद्ध कुरुक्षेत्र तें ज्यानें निर्माण केलें तोच. हें क्षेत्र निर्माण करण्याचे कामीं त्या महाभाग कुरूला बहुत वर्षें तप करावें लागलें. तपांतीं इंद्रानें त्याला वर दिला. त्या वरापासून कुरूनें हे पवित्र लोक जेथें वसति करून राहातात, असलें पावन व रमणीय क्षेत्र निर्माण केलें. या कुरूचा पुढील वंश फारच प्रबळ झाला. हे राजा, तुम्ही जे आज कौरव म्हटले जातां ते या पुरुषामुळेंच. या करूला चार पुत्र होते. त्यांचीं नांवें—सुधन्वा, सुधनु, महाबाहु परीक्षित् व अरिकंपन असा प्रवर. यांपैकीं सुधन्व्याला सुहोत्र नामक बुद्धिमान् पुत्र झाला. ह्या सुहोत्राला धर्मार्थ-वेत्ता असा चावन हा पुत्र झाला. चावनापासून कृतयज्ञ. या धर्मज्ञ कृतयज्ञानें अनेक यज्ञ करून सर्वत्र विख्यात असा इंद्रतुल्य पुत्र निर्माण केला. या पुत्राचें नांव वसु असें होतें. हा वर अंतरिक्षांत संचार करण्याला समर्थ असल्यामुळें याला उपरिचर वसु असें म्हणत. चेदी वंशाच्या संबंधानें याला चैद्य असेंही म्हणत. या उपरिचरापासून गिरिका नामक स्त्रीला सात अपत्यें झालीं. त्यांचीं नांवें:—मगधदेशाचा प्रसिद्ध राजा महारथ किंवा ज्याची बृहद्रथ नांवानें प्रसिद्धी आहे तो. दुसरा प्रत्यग्रह, तिसरा कुश, ज्याला मणिवाहन असेंही म्हणत. यानंतर मारुत, यदु व मत्स्य हीं तीन. हे सहा पुत्र व कालीनामक एक कन्या. यांपैकीं पहिला बृहद्रथ याला कुशाग्र नामक पुत्र झाला. कुशाग्राला पुढें वीर्यशाली वृषभ. या वृषभाला पुष्पवान् नांवाचा धार्मिक

पुत्र झाला. पुष्पवानाला पराक्रमी सत्यहित हा पुत्र झाला. सत्यहिताला ऊर्ज नांवाचा धर्मात्मा पुत्र झाला. या ऊर्जाला जो बलाढ्य पुत्र झाला, तो दोन शकलांचे रूपानें जन्मास आला. हीं शकलें जरानामक एका राक्षसीनें सांधलीं व यामुळें याला पुढें जरासंध असें नांव पडलें. हा मोठाच पराक्रमी निघाला. यानें सर्व क्षत्रियमंडळ पादाक्रांत केलें. जरासंधाला सहदेव नामक पराक्रमी पुत्र झाला. सहदेवाला पुढें श्रीमंत व यशस्वी असा उदायु पुत्र झाला. उदायूनें पुढें श्रुतधर्मा नांवाचा परम धार्मिक पुत्र निर्माण केला. या श्रुतधर्म्यानेंच मगध देशांत वसति केली. कुरूचा द्वितीय पुत्र जो परीक्षिती त्याला जनमेजय पुत्र झाला. जनमेजयाला तीन पुत्र होते. हे सर्वही मोठे बलाढ्य, पराक्रमी व महारथी होते. यांचीं नांवें:--श्रुतसेन, उग्रसेन व भीमसेन. यांशिवाय मणिमती नामक स्त्रीपासून जनमेजयाला सुरथ व मतिमान् असे दोन पुत्र झाले. पैकीं सुरथाला विदूरथ नामक पराक्रमी पुत्र झाला. ऋक्ष जो प्रसिद्ध महारथी तो या विदूरथाचाच पुत्र. हे जनमेजया, कुरुपितामह जो ऋक्ष नामक तुझा पूर्वज होऊन गेला, त्याचाच नामधारी हा दुसरा ऋक्ष झाला; व हाही तसाच पराक्रमी होता. एकूण तुझ्या कुळांत दोन ऋक्ष, दोन परीक्षिति, तीन भीमसेन व दोन जनमेजय झाले. यांपैकीं दुसऱ्या ऋक्षाला भीमसेन हा पुत्र झाला. भीमसेनाला प्रतीप, व प्रतीपाला शंतनु, देवापि आणि बाल्हिक असे तीन महारथी पुत्र झाले.

हे राजा, तूं ज्या शाखेंत उत्पन्न झाला आहेस, ती ही शंतनूची शाखा. बाल्हिकाचें जें राज्य होतें, तें ज्ञान, विज्ञान, धर्म, बल, काम, उपायसंग्रह व शरीरभोग, यांत[1] कमी होतें. बाल्हिकाला सोमदत्त नांवाचा यशस्वी पुत्र झाला. सोमदत्ताला भूरि, भूरिश्रवा व शल, असे तीन पुत्र झाले. तिसरा जो देवापि हा केवळ ऋषि असून देवांचा उपाध्याय होता. हा च्यवनाचा मोठा प्रिय असून त्यानें याला आपला पुत्र म्हटलें होतें. कौरवांत धुरंधर शंतनु हा राजा झाला. हे राजा, तूं शंतनूच्याच कुळीं जन्मला आहेस; याकरितां मी शंतनूचा वंश सांगतों ऐक. समर्थ शंतनूनें गंगेचे ठिकाणीं देवव्रत नामक पुत्र उत्पन्न केला. हा भीष्म नांवानें विख्यात असलेला पांडवांचा जो आजोबा तोच. शंतनूलाच काली अथवा सत्यवति या दुसऱ्या स्त्रीपासून विचित्रवीर्य नामक पुत्र झाला. हा मोठा धार्मिक व निष्पाप असून शंतनूचा मोठा लाडका होता. कृष्णद्वैपायन व्यास यांनीं विचित्रवीर्याच्या क्षेत्रांत म्हणजे स्त्रियांचे ठिकाणीं धृतराष्ट्र, पाण्डु व विदुर, हे निर्माण केले. पुढें धृतराष्ट्रानें गांधारी स्त्रीचे ठायीं शंभर पुत्र निर्माण केले. या शंभरांपैकीं दुर्योधन वडील होता, व तोच सर्वांचा राजा झाला. पांडूला धनंजय अथवा अर्जुन हा झाला. अर्जुनाला अभिमन्यु व अभिमन्यूला परीक्षित म्हणजे हे लोकपाला तुझा पिता. ( अर्थात् पुढें तूं. ) या प्रकारें तूं ज्या पौरव वंशांत निर्माण झालास, त्या वंशाची हकीकत संपली. आतां पुरूचे बंधु तुर्वसु, द्रुह्यु, अनु व यदु, यांचे वंश सांगतों. तुर्वसूचा पुत्र वन्ही होता. वन्हीचा गोभानु, गोभानूचा अजिंक्य पुत्र

---

[1] मूळांत सप्तवाह्य व सप्तबाह्य असे दोन पाठ आहेत. पैकीं बाह्य म्हणजे शून्य असा अर्थ धरून कोणी टीकाकारानें अर्थ केला आहे. बाकी वाह्य हा पाठ धरून "या सात गोष्टींवर चालणारें" म्हणजे सात गोष्टींनीं युक्त असा अर्थ करणें बरें असें आम्हास वाटतें. बंगाली अर्थकारांनीं बाल्हीकाचीं सात राज्यें होतीं असा अर्थ केला आहे.

त्रैभानु; त्याचा पुत्र करंधम; करंधमाचा पुत्र मरुत्त. हे राजा, मी तुला याशिवाय दुसरा एक मरुत्त सांगितला आहे, पण तो अविक्षिताचा पुत्र, प्रस्तुतचा मरुत्त हा अनपत्य होता, म्हणून त्यानें विपुल दक्षणा देऊन यज्ञ केले. तेव्हां त्याला संमता नांवाची एक कन्या झाली. ती त्यानें यज्ञदक्षणा म्हणून आपला ऋत्विज संवर्त्त याला दिली; संवर्त्तानें ती दुष्यंताचा पिता जो सुत्रोर त्याला दिली; तेथें तिला दुष्यंत हा निर्मल पुत्र झाला, व तो मरुत्तानें (पुत्रिका-पुत्र म्हणून) आपला पुत्र म्हटला व या योगानें तुर्वसूचा वंश पौरवांतच सामील झाला, व असें होईल म्हणून तुर्वसु जेव्हां ययातीची जरा घेण्यास तयार होईना, त्या वेळीं ययातीनें शाप देऊन सांगितलेंच होतें, तें खरें झालें. या दुष्यंताला पुढें राजा करुत्थाम हा पुत्र झाला; करुत्थामाला पुढें आक्रीड; आक्रीडाला पुढें चार पुत्र झाले. त्यांचीं नांवें:—पांड्य, केरल, चोल व कोल. यांपैकीं पांड्य, चोल आणि केरल हे आपल्याच नांवानें प्रसिद्ध असलेल्या समृद्ध राज्यांचे मालक झाले. आतां द्रुह्यूची संतति. द्रुह्यूला दोन पुत्र. बभ्रु व सेतु. या सेतूचा पुत्र अंगार सेतु. हा मरुत्तांचा नाईक म्हटला जातो. हा मोठा बलाढ्य होता. याचें व यौवनाश्वाचें चौदा महिनेपर्यंत सारखें युद्ध झालें. अखेर यौवनाश्वानें याचा वध केला; पण तो महा मुष्किलीनें. या अंगाराचा पुत्र गांधार नामक होता, याच्याच नांवानें एका मोठ्या देशाला गांधार असें म्हणतात. या देशाचे घोडे फार नामांकित असतात. असो; अनूला धर्म हा पुत्र झाला. धर्माचा घृत झाला. घृतापासून दुदूह झाला. दुदूहाचा मुलगा प्रचेता. प्रचेताचा सुचेता. याप्रमाणें मीं अनूचा वंश सांगितला. आतां अत्यंत तेजस्वी व सर्वांत ज्येष्ठ जो यदु त्याचा वंश मी यथाक्रम सविस्तर सांगतों, तो ऐक.

## अध्याय तेहतिसावा.

—:०:—

### यदुवंश व कार्तवीर्यार्जुनोत्पत्ति.

वैशंपायन सांगतात:—या यदूला देवकुमारांसारखे असे पांच पुत्र झाले. त्यांचीं नांवें:—सहस्रद, पयोद, क्रोष्टा, नील व अंजिक. पैकीं सहस्रदाला परम धार्मिक असे तीन पुत्र झाले. त्यांचीं नांवें:—हैहय, हय व वेणुहय. पैकीं हैहयाला धर्मनेत्र हा पुत्र झाला; त्याला पुढें कार्त झाला; कार्ताला पुढें साहञ्ज पुत्र झाला. या राजानें साहञ्जनी नांवाची नगरी वसविली. या साहंज्याचा पुत्र राजा महिष्मान् यानें जी पुरी वसविली तिला माहिष्मती असें म्हणतात. या महिष्मानाला भद्रश्रेण्य नांवाचा प्रतापी पुत्र झाला, व तो वाराणशीचा राजा होता, हें पूर्वींच सांगितलें आहे. या भद्रश्रेण्याला दुर्दम नामक विख्यात पुत्र होता. दुर्दमाला पुढें मोठा वीर्यशाली व बुद्धिवान् कनक हा पुत्र झाला. या कनकाला लोकविख्यात असे चार पुत्र होते. त्यांचीं नांवें:—कृतवीर्य, कृतौजा, कृतवर्मा व कृताग्नि हा चवथा. पैकीं कृतवीर्याला अर्जुन नामक पुत्र झाला; याला सहस्र बाहू होते. त्यांच्या बळावर त्यानें एकट्यानें सूर्यतुल्य तेजस्वी अशा रथांत बसून सप्तद्वीप पृथ्वी जिंकून तिची मालकी पटकाविली. या अर्जुनानें प्रथम अत्रिपुत्र जे दत्तात्रय त्यांचे आराधनानिमित्त अयुत वर्षेपर्यंत परम दुश्चर असें तप केलें. तेव्हां दत्तांनीं प्रसन्न होऊन अत्यंत तेजस्वी असे चार वर दिले. त्यांपैकीं पहिल्या प्रथम आपणास सहस्र बाहू असावेत, हें त्यानें मागितलें. दुसऱ्या वरानें आपण अधर्माकडे वळूं लागल्यास सज्जनांनीं आपलें निवारण

करावें असें मागितलें. तिसऱ्यानें प्रथम उग्र क्षत्रिय तेजानें सर्व पृथ्वी जिंकून मग मी पालक या नात्यानें प्रजेला राजीखुषींत ठेवावें असें मागितलें, व चवथ्यानें, मीं शेंकडों लढाया कराव्या, हजारों योद्धे मारावे व अखेर लढतां लढतांच रणभूमीवर कोणातरी वरिष्ठ योद्ध्याच्या हातून मला मृत्यु यावा, असें मागून घेतलें. हे राजा, याच्या सहस्र बाहूंची गंमत अशी होती कीं, तो लढाईस उभा राहिला, म्हणजे एखाद्या निष्णात योग्याप्रमाणें नुसत्या संकल्पबलानेंच त्याला सहस्र बाहू उत्पन्न होत. यामुळें ही एवढी सप्तद्वीप पृथ्वी, परंतु, तीवरील सर्व नगरें, शहरें समुद्र यांसह ती त्यानें आपल्या उग्र तेजानें तेव्हांच जिंकिली. हे राजा, आम्हीं असें ऐकतों कीं, त्यानें सात द्वीपांत मिळून यथाविधि सातशें यज्ञ केले; व या सर्व यज्ञांमध्यें रेलचेल दक्षणा दिली. या सर्व यज्ञांत कांचनाचे यज्ञस्तंभ होते, व यज्ञवेदीही कांचनमयच होत्या. तो सोहाळा पाहाण्यासाठीं सर्व देव विमानांत बसून येत. गंधर्व आणि अप्सरा या सदासर्वदा त्या समारंभास शोभा आणीत. फार काय सांगावें, या यज्ञाचा थाट पाहून वरीदास नामक गंधर्वांचा पुत्र अगदीं चकित होऊन गेला. त्यानें व नारदऋषि यांनीं मिळून त्या यज्ञाची प्रशंसा श्लोकांनीं गाइली.

नारद म्हणालाः—कोणीही राजे झाले, तरी त्यांना यज्ञांत, दानांत, तपांत, पराक्रमांत किंवा विद्येंत, या कार्तवीर्यार्जुनाची बरोबरी येणारच नाहीं. याचें योगबल असें विलक्षण आहे कीं, हा एकाच वेळीं सातही द्वीपांत खड्ग, चर्म व धनुष्य घेऊन रथांत बसून चालला आहे, असें लोकांनीं पाहिलें आहे. शिवाय हा यथान्याय प्रजापालन करीत असतां याच्या प्रभावानें प्रजेला कधीं भूल पडली नाहीं, कधीं दुःख झालें नाहीं किंवा कधीं पैशाची तूट पडली नाहीं. पंचायशी हजार वर्षेपर्यंत हा या पृथ्वीवरील सर्व जातींच्या रत्नांचा मालक असून सम्राट् चक्रवर्ति होता. यज्ञादिकांत यजमानही तोच होता, व पृथ्वीचा पालकही तोच होता. अंगांत योगसामर्थ्य असल्यानें तो आपणच होऊन पर्जन्याच्या रूपानें वृष्टि करी. धनुष्याच्या दोरीच्या छेडण्यानें ज्यांची त्वचा कठीण झाली आहे अशा आपल्या सहस्र बाहूंच्या योगानें तो आकाशांतील शरदृतूंतील सहस्रकर सूर्यासारखा शोभत होता. त्यानें कर्कोटकनागाचे पुत्र जे सर्व नाग त्यांस जिंकून त्यांच्या माहिष्मती नामक नगरींत आपली मनुष्यांची वस्ती करविली. त्या कमलनेत्र अर्जुनानें वर्षाकाळीं समुद्रांत क्रीडा करीत असतां आपल्या सहस्र भुजांच्या योगानें समुद्राचा ओघ भेदून त्याचे एक हजार निरनिराळे ओघ केले. त्याचप्रमाणें तो नर्मदेमध्यें खेळत असतां व अवगाहन करीत असतां नर्मदा नदी एखाद्या भ्यालेल्या मनुष्याप्रमाणें हजारों तरंगांनीं (पक्षीं विचारांनीं) युक्त होत्साती त्याचा सत्कार करण्यासाठीं आपल्या फेनाची (फेसाची) शुभ्र मालिका याच्या कंठांत घालीत असे. तो समुद्रांत उतरून आपल्या हजार बाहूंनीं समुद्र ढवळूं लागला, म्हणजे पाताळांतील मोठमोठाले असुर भयानें निचेष्ट होऊन दडून राहात.ज्याप्रमाणें मंथनकालीं देव व असुर यांनीं मंदर नामक पर्वत हा मंथनदंड कल्पून समुद्रांत घातला असतां क्षीरसमुद्राची दशा झाली, त्याचप्रमाणें हा सहस्रार्जुन आपल्या हजार बाहूंच्या योगानें त्या समुद्राची दशा करून सोडी. ती अशीः—समुद्रांत उठणाऱ्या पर्वतप्राय लाटा तो आपल्या हाताच्या तडाक्यांनीं चुरडून टाकी. तिमिंगलादिक जलचरांची धांवपळ

उडवून देई, व समुद्राच्या फेसाचे पुंजके हवेंत वाऱ्याप्रमाणें फेंकून देई, आणि हजारों हजार भोंवरे उत्पन्न करून त्या समुद्राचा वेग दुःसह करून सोडी. त्या भयप्रद नृपश्रेष्ठ सहस्रबाहूला पाहून मोठमोठाले सर्प हा अमृत निर्माण करण्यासाठीं मंदराचलच समुद्राचें घुसळण करीत आहे कीं काय अशी शंका येऊन एकाएकीं पाण्यांतून चमकून उठत, व त्याजपुढें नम्र होऊन खालीं फणा टेकून निश्चल पडत; आणि सायंकालच्या वेळीं एखाद्या कदलीवनांत वायु उसळला असतां त्या वनाची जशी वाताहत होते, त्याप्रमाणें त्या सर्पांची दशा उडून जाई. लंकेचा राजा रावण याला आपल्या शक्तीबद्दल मोठाच गर्व झाला. हें ऐकून सहस्रार्जुनानें त्याला पांच बाणांनीं जिंकून व मूर्च्छागत करून आपल्या धनुष्याच्या दोऱ्यांनीं आंवळून सैन्यासह आपल्या माहिष्मती राजधानींत आणून कैदेंत ठेविलें.

आपला पुत्र रावण यास सहस्रार्जुनानें बंदींत टाकिलें ही वार्ता कानीं येतांच पुलस्त्यमुनींनीं स्वतः सहस्रार्जुनाकडे जाऊन त्याची भेट घेऊन आपल्या पुत्राबद्दल रदबदली केली; तेव्हां त्या अर्जुनानें रावणाला मोकळें सोडून दिलें. तो सहस्रार्जुन ज्या वेळीं आपल्या सहस्रही बाहूंनीं अनेक धनुष्यांच्या दोऱ्या एकाच कालीं ओढी, त्या वेळीं त्याचा होणारा टणत्कार प्रलयकाळींच्या मेघांच्या कडकडाटाचाच भास उत्पन्न करी; इतकाही पराक्रमी सहस्रार्जुन होता, पण भृगुकुलोत्पन्न परशुरामानें युद्धांत त्याचें तें सुवर्णालंकारांनीं युक्त असें सहस्र बाहूंचें वन एखाद्या तालवनाप्रमाणें खडाखड खडसून टाकिलें. तेव्हां असल्या परशुरामाचे शौर्याची सहस्रबाहूंपेक्षांही धन्य म्हटली पाहिजे.

एकाकालीं अग्नीला भूक लागल्यामुळें आपणास कांहीं पोटास द्यावें म्हणून त्यानें सहस्रार्जुनाजवळ याचना केली. त्या वेळीं त्या वीरानें अग्नीला सातही द्वीपें बक्षीस दिलीं; मग अग्नीनें वखवखून जाऊन त्या अर्जुनाच्या राज्यांतल्या चारी मुलखांतील नगरें, गांवें, खेडीं, वगैरे जाळून फस्त केलीं. शिवाय, अर्जुनासारख्याचें पाठबळ असल्यामुळें पर्वत व अरण्येंही जाळून टाकिलीं. हा जाळण्याचा तडाका चालला असतां ज्याला आपव असेंही दुसरें नांव असे, असा जो तेजस्वी व प्रख्यात वरुणपुत्र वसिष्ठ महामुनि त्याचा रमणीय आश्रम खालीं पाहून अग्नि व अर्जुन या दोघांनीं भीत भीत संगनमत करून एखाद्या वनाप्रमाणें जाळून टाकिला. तो प्रकार पाहून समर्थ वसिष्ठ मुनीनें क्रोधानें सहस्रार्जुनाला शाप दिला कीं, हे हैहया, ज्या अर्थीं तूं मजसारख्याचें तपोवनही जाळल्यावांचून ठेविलें नाहींस त्या अर्थीं तूं इतकेंही अचाट कर्म केलें आहेस तथापि दुसराच कोणी उठून या तुझ्या सर्व कृतीवर पाणी पाडील. हा दुसरा कोण म्हणशील तर भृगुकुलोत्पन्न जमदग्नीच्या पोटीं आलेला राम नांवाचा एक मोठा दीर्घबाहू, प्रतापी, तपस्वी ब्राह्मण आहे. हा वीर तुला तडाक्यास पालथा घालून तुझे हे हजारही बाहू छाटून तुला यमसदनाची वाट दाखवील.

वैशंपायन सांगतातः—हे शत्रुमर्दना, जो राजा धर्मानें प्रजापालन करीत असतां ज्याच्या पराक्रमाचा इतका दरारा होता कीं, त्याच्या प्रजाजनांपैकींही कोणाच्या सुतळीच्या तोड्याचा कोणी अपहार करूं पावत नव्हता. असल्या वीर्यशाली राजाला वसिष्ठ मुनीच्या शापसामर्थ्यानें भार्गवरामाच्या हातून मृत्यु आला. शिवाय या प्रकारचा मृत्यु यावा असा वर सहस्रार्जुनानें आपण होऊनच दत्ताजवळ मागितलाही होता, तो पुरा झाला. या सहस्रार्जुनाला शंभर पुत्र होते. पैकीं त्याच्या

पश्चात् पांचच शिल्लक राहिले. हे सर्वही अस्त्र-पटु, बलाढ्य, शूर, धर्मात्मे व यशस्वी होते. यांचीं नांवें:—शूरसेन, शूर, धृष्ट, कृष्ण आणि अवंतीचा राजा जयध्वज. हे सर्वही वीर्यशाली असून महारथीही होते. पुढें जयध्वजाला तालजंघ नांवाचा एक शक्तिमान् मुलगा झाला. याला पुढें शंभर पुत्र झाले. या सर्वांनाही तालजंघच म्हणत. हे महाराजा, एकंदरींत या हैहयांच्या वंशांत भिन्न शाखा मिळून वीतिहोत्र, सुजात, भोज, आवंत्य, तौंडिकेर, तसेंच तालजंघ व भरत इत्यादि अनेक कुळें झालीं; परंतु, त्या कुळांचा विस्तार बाहुल्यभयास्तव सांगत नाहीं.

असो, याप्रमाणें यदूचा प्रथम पुत्र सहस्रद याच्या वंशाचें वृत्त येथवर सांगितलें. आतां त्याचा दुसरा पुत्र जो पयोद त्याची संतति सांगतों. या पयोदालाच वृष म्हणत. याच्या वंशांतील जे यादव ते सर्वही मोठे पुण्यकर्मी होते. या सर्वांचा मुख्य पुरुष हा वृष. या वृषाला पुढें मधु नामक पुत्र झाला. मधूला शंभर पुत्र झाले. त्यांपैकीं वृषण नामक जो पुत्र झाला तो वंश चालविणारा निघाला. या वृषणापासून झालेल्या पुढील संततीला वृष्णि म्हणत; किंवा वृषणाच्या बापाचें नांव मधु असल्यामुळें या सर्वांना माधव असेंही म्हणत. तसेंच याचा यदु हा पूर्वज असल्यानें यादव असेंही म्हणत; याखेरीज शूर, शूरवीर आणि शूरसेन या सर्वांचाही हैहय या नांवांत सामान्यत्वानें अंतर्भाव होतो. या सहस्रार्जुनाच्या देशाला शूरसेनच म्हणत. या कार्तवीर्याचें जन्म जो नित्य कीर्तन करील त्याची घे म्हटल्या वस्तु हरवावयाचीच नाहीं व हरवलीच तर पुन्हा सांपडेल[१].

[१] या कामीं लोकांच्या तोंडीं असलेला श्लोक.
कार्तवीर्यार्जुनो नाम। राजा बाहुसहस्रवान् ॥
तस्यस्मरणमात्रेण । गतं नष्टं च लभ्यते ॥

हे राजा, याप्रमाणें यदूच्या या पांचही लोकमान्य वीरपुत्रांचे वंश तुला सांगितले. हे पांचही वंश आकाशादि पंचमहाभूतांप्रमाणें सर्व स्थावरजंगम सृष्टीचें धारण (पालन) करणारे आहेत. जो कोणी धर्मार्थवेत्ता राजा या पांचही यदुपुत्रांची उत्पत्ति व संतति यांचें श्रवण करील किंवा चित्ताचे ठायीं धारण करील त्याचीं इंद्रियें त्याच्या ताब्यांत रहातील. शिवाय इहलोकांत अत्यंत आवश्यक पण दुर्लभ अशा ज्या आयुष्य, कीर्ति, पुत्रसंतति, ऐश्वर्य व भूमि या पांचही गोष्टी त्या त्याला प्राप्त होतील.

हे राजेंद्रा, यदूचा वंश पुढें चालविणारा क्रोष्टु नामक जो पुण्यशील, यज्ञकर्ता व उत्तम वीर्यशाली पुत्र झाला, त्याचें वंशवर्णन तूं आतां ऐक. कारण, वृष्णिकुलधुरंधर जो परमात्मा श्रीविष्णु म्हणजे श्रीकृष्ण तो याच वंशांत जन्मला असल्यामुळें याच्या श्रवणानें श्रोता सर्व पापांपासून मुक्त होतो.

## अध्याय चवतिसावा.

—:०:—

### वृष्णिवंशवर्णन.

वैशंपायन सांगतात:—क्रोष्टूला दोन स्त्रिया होत्या. पैकीं पहिलीचें नांव गांधारी व दुसरीचें माद्री. यांतून गांधारीनें अनमित्र नामक महाबलाढ्य पुत्रास जन्म दिलें. माद्रीनें एक युधाजित् व दुसरा देवमीढुष अशा दोन पुत्रांस जन्म दिलें; या तिघांपासून वृष्णिकुलाची वृद्धि करणारा असा तिहेरी वंश झाला. माद्रीचा पुत्र जो युधाजित् त्याला वृष्णि व अंधक असे दोन पुत्र झाले; पैकीं वृष्णीला पुढें श्वफल्क व चित्रक हे दोन पुत्र झाले. यांतील श्वफल्क हा मोठा धर्मात्मा होता; तो ज्या ठिकाणीं असेल तेथें कधींही व्याधीचें भय नसे

किंवा अवर्षणही होत नसे. हे भरतश्रेष्ठा, एक वेळीं असें झालें कीं, काशीराजाच्या मुलखांत इंद्रानें वृष्टि केली नाहीं; त्या वेळीं त्यानें अत्यंत पूज्य अशा या श्वफल्काला नेऊन आपल्या राज्यांत बसविलें. तो येतांच इंद्रानें वृष्टि सुरू केली; मग त्या काशीराजानें (हें त्याचें कृत्य स्मरून) आपली गांदिनी नांवाची कन्या त्या श्वफल्काला भार्यार्थ दिली. या कन्येला गांदिनी हें नांव पडण्याचें कारण असें होतें कीं, ती दिनादिनाचे ठायीं म्हणजे दररोज ब्राह्मणाला गाय दान देत असे. ही पूर्वी गर्भस्थितींत आपल्या आईच्या पोटांत असतांना बहुत वर्षेपर्यंत बाहेरच येईना. तें पाहून तिचा पिता म्हणाला, 'बाळे, तूं गर्भांतच थांबून कां राहिली आहेस, बाहेर ये; देव तुझें कल्याण करील.' तें ऐकून कन्येनें गर्भांतूनच उत्तर केलें, 'मी जन्मास आल्यापासून प्रतिदिनीं मजकडून जर तुम्हीं गोदान करवाल तर मी बाहेर येईन.' त्यावर तिच्या पित्यानें "ठीक आहे, करवीन" असें आश्वासन दिलें, तेव्हां ती जन्मास आली. जन्मास आल्यावर पित्यानेंही तिची इच्छा पूर्ण केली. असो; असल्या गांदिनीला श्वफल्कापासून जो पुत्र झाला त्याचें नांव अक्रूर. हा मोठा दानशूर, यज्ञकर्ता, शहाणा, सुशिक्षित, अतिथिप्रिय व ब्राह्मणांस बहुत दक्षणा देणारा असा होता. या अक्रूराशिवाय या जोडप्याला उपासंग, मद्गु, मृदुर, अरिमेजय, अरिक्षिप, उपेक्ष, शत्रुघ्न, अरिमर्दन, धर्मधृक्, यतिधर्मा, गृध्रमोजा, अंधक, आबाहु आणि प्रतिबाहु, नांवांचे पुत्र होते; व अतिशय रूपवती सुंदरी नांवाची एक कन्या होती.

हे कुरुनंदना, या अक्रूराला उग्रसेना नामक सुंदर स्त्रीचे ठिकाणीं देवतुल्य तेजस्वी असे प्रसेन व उपदेव नामक दोन पुत्र झाले. आतां श्वफल्काचा बंधु जो चित्रक त्याची संततिः पृथु, विपृथु, अश्वग्रीव, अश्वबाहु, सुपार्श्वक, गवेषण, अरिष्टनेमी, अश्व, सुधर्मा, धर्मभृत, सुबाहु व बहुबाहु; हे पुत्र. यांशिवाय दोन कन्याही होत्या; त्यांचीं नांवें:—श्रविष्ठा, व श्रवणा. क्रोष्टूचा तिसरा पुत्र जो देवमीढुष त्यानें आपल्या अश्मकी नामक स्त्रीचे ठायीं शूर नामक पुत्र उत्पन्न केला. या शूरानें आपली पट्टराणी जी भोज्या तिचे ठायीं दहा पुत्र उत्पन्न केले. त्यांचीं नांवें:—या दहांपैकीं महाबाहु जो (कृष्णपिता) वसुदेव तो प्रथम झाला. यालाच आनक आनकदुंदुभि असेंही म्हणत. असें नांव पडण्याचें कारण, असें झालें कीं, याचा जन्म होतांच स्वर्गामध्यें आनक म्हणजे पडघम् व दुंदुभि म्हणजे नगारे यांचा अति मोठा ध्वनी माजून राहिला. याशिवाय वसुदेवपिता जो शूर त्याच्या मंदिरावर वसुदेवाच्या जन्मदिवशीं स्वर्गांतून अति मोठी पुष्पवृष्टिही झाली. हा वसुदेव सर्व पुरुषांत श्रेष्ठ होता. याच्या अंगकांतीला तर केवळ चंद्रिकेचीच उपमा; व एकंदर रूपानेंही याच्या वेळीं याच्या तोडीचा एकही पुरुष या सगळ्या भूलोकावर नव्हता. या वसुदेवामागून त्याचा बंधु देवभाग हा जन्मला. त्यानंतर पुन्हा देवश्रवा, अनाधृष्टि, कनबक, वत्सावान्, अवगृंजिम, श्याम, शमीक व गंडूष इतके जन्मले. याशिवाय त्या शूर राजाला सुंदरशा पांच कन्या झाल्या. त्यांचीं नांवें:—पृथुकीर्ति, पृथा, श्रुतदेवा, श्रुतश्रवा व पांचवी राजाधिदेवी. या पांचही जणी वीरांच्या माता झाल्या. हे कुरुनंदना, यांपैकीं पृथा नामक जी कन्या होती, तिला कुंति किंवा कुंतिभोज नामक जो राजा होता, त्यानें "ही आपली कन्या" असें म्हटल्यावरून, शूर राजानें आपल्या त्या पूज्य व वृद्ध मित्राला ती कन्या दत्तक दिली. त्या

१ कांहीं पोथ्यांत "सूर" असा पाठ आहे.

दिवसापासून पृथा ही कुंतिभोज राजाची कन्या होऊन स्वतःच कुंति या नांवानें प्रसिद्ध झाली. या पृथेची बहीण जी श्रुतदेवा तिला अंत्यं[1] नामक पुरुषापासून जगृहु नामक पुत्र झाला. तिसरी बहीण जी श्रुतश्रवा तिचे पोटीं चेदिपति जो दमघोष त्याजपासून महाबलाढ्य शिशुपाल हा जन्मास आला. हा शिशुपाल म्हणजे पूर्वीं जो हिरण्यकशिपु नामें प्रसिद्ध दैत्यराज होऊन गेला तोच. चवथी बहीण पृथुकीर्ति, तिचे ठिकाणीं वृद्धशर्म्यापासून करूष देशाचा राजा महाबलाढ्य वीर दंतवक्र (वक्रदंत) तो जन्मला. स्वतः पृथा ही कुंति भोजाची कन्या झाल्यावर पांडुराजानें तिजशीं लग्न लाविलें. हिला मोठा धर्मवेत्ता जो राजा युधिष्ठिर, तो यमधर्मापासून झाला; नंतर भीमसेन हा वायुदेवापासून झाला; व धनंजय किंवा अर्जुन जो पराक्रमानें प्रतिइंद्र असून लोकांत मोठा गाजलेला वीर होता; तो इंद्रापासून[2] झाला.

वृष्णीचा कनिष्ठ पुत्र जो अनामित्र त्यापासून शिनि हा जन्मला. शिनीपासून सत्यक. सत्यकाला पुढें युयुधान आणि सात्यकि असे दोन पुत्र झाले. पैकीं युयुधानाला असंग व असंगाला भूमि हा पुत्र झाला. या भूमीपासून युगंधर हा पुत्र झाला, आणि तेथें हा वंश खुंटला. प्रसिद्ध जो भक्त उद्धव तो वसुदेवाचा बंधु जो देवभाग त्याचे पोटीं आला. हा उद्धव सर्व पंडितांत अतिश्रेष्ठ गणला असून याची देववत् कीर्ति होती. अनाधृष्टि यानें अश्मकी नामक स्त्रीचे ठिकाणीं निवृत्तशत्रु नामक एक यशस्वी पुत्र निर्माण केला. त्याचप्रमाणें देवश्रवा यानें (स्वस्त्रीचे ठायीं) शत्रुघ्न नामक पुत्र उत्पन्न केला. या देवश्रव्यापासून पुढें एकलव्य हा झाला. हा निषादांनीं वाढविला असल्यामुळें याला नैषादि हेंच नांव वहिवाटींत पडलें. वसुदेवाचा जो वत्सावान् म्हणून भाऊ सांगितला त्याचे पोटीं पुत्रसंतति नसल्यामुळें शूरपुत्र वसुदेव यानें आपला औरस पुत्र, जो मोठा वीर्यशाली असून ज्याला कौशिक असें म्हणत, त्याचें वत्सावताच्या हातावर उदक सोडिलें (दत्तक दिला). वसुदेवाचा दुसरा भाऊ जो गंडूष यालाही पुत्रसंतान नव्हतें. त्यामुळें श्रीकृष्णानें आपल्या पुत्रांपैकीं चारुदेष्ण, सुचारु, पंचाल व कृतलक्षण हे चौघे गंडूषाला दिले. यांपैकीं चारुदेष्ण नांवाचा जो पुत्र सांगितला हा रुक्मिणीच्या पुत्रांतील धाकटा. हा मोठा शूर असून याची अशी ख्याति होती कीं, हा बाहेर पडला म्हणजे संग्राम केल्यावांचून परत यावयाचाच नाहीं; व हा आतां युद्धांत अनेक पुरुष मारून आपणास चारु म्हणजे सुंदर किंवा मिष्ट अशा मांसाची मेजवानी देईल, अशा विश्वासानें काक वगैरे हजारों पक्षी त्याचे मागें धांवत जात. यामुळें त्याला चारुदेष्णा असें नांव पडलें. कनवक नांवाचा जो आणखी एक वसुदेवाचा भाऊ होता, त्याला तंद्रिज आणि तंद्रिपाल असे दोन पुत्र झाले; व अवगृंजिमाला वीर व अश्वहनु असे दोन पुत्र झाले. हे दोघेही योद्धे होते. वसुदेवाचा भ्राता जो श्याम त्याचा जो धाकटा भाऊ शमीक त्यालाच श्यामानें आपला पुत्र[1] म्हटलें होतें. ह्या शमीकाला आपण एकच प्रांताचे राजे असणें ही गोष्ट निंद्य वाटल्यामुळें त्यानें सर्व राजे पादाक्रांत करण्याचा राजसूय नामक यज्ञ आरंभिला. या दिग्विजयांत त्यानें अजातशत्रु जो पांडव युधिष्ठिर त्याचें साह्य

१ या ठिकाणीं कुंत्य असाही पाठ सांपडतो.

२ "स्त्रीसंग करितांच तुला मृत्यु येईल" असा पांडूला शाप असल्यामुळें, त्याच्या स्त्रिया कुंति व माद्री यांना मंत्रदेवतांपासून संतति प्राप्त करून घ्यावी लागली.

१ ज्येष्ठ भ्राता हा पितातुल्य आहे हें प्रसिद्धच आहे.

संपादून सर्व शत्रूंचा नाश करून सार्वभौमत्व संपादिलें.

हे राजा, आतां मी वसुदेवाच्या शूर पुत्रांचें वर्णन करितों तें ऐक. याप्रमाणें अत्यंत तेजस्वी व अनेक शाखांनीं युक्त अशा या वृष्णीच्या विस्तीर्ण त्रिविध वंशाचें जो चित्तांत धारण करील, त्याला इहलोकीं अनर्थप्राप्ति होणार नाहीं.

## अध्याय पसतिसावा.

—:०:—

### कृष्णवंशवर्णन.

वैशंपायन सांगतातः—रूपानें एकीहून एक अधिक सरस अशा चौदा सुंदरी वसुदेवाच्या पत्न्या होत्याः त्यांचीं नांवें क्रमशः ऐक. पहिली रोहिणी, दुसरी इंदिरा; ही रोहिणीपेक्षांही रूपानें सरस होती. तिसरी वैशाखी, चौथी भद्रा, पांचवी सुनाम्नी. या पांचही पुरुकुलांतील होत्या. सहावी सहदेवा, सातवी शांतिदेवा, आठवी श्रीदेवा, नववी देवरक्षिता, दहावी वृकदेवी, अकरावी उपदेवी व (आपल्या बहिणींत सातवी वसुदेवाच्या स्त्रियांत) बारावी देवकी. या शेवटल्या साती जणी देवकाच्या कन्या होत्या. यांशिवाय सुतनु व वडवा या दोन परिचारिका, म्हणजे केवळ भोगांगना होत्या. एकूण चौदा. यांपैकीं पुरुकुलोत्पन्न जी रोहिणी ती बाल्हिकाची मुलगी होती. ही वसुदेवाची ज्येष्ठ स्त्री असून मोठी लाडकी होती; हिजपासून त्याला पहिला पुत्र झाला तो राम. त्यापुढें सारण, शठ, दुर्दम, दमन, श्वभ्र, पिंडारक व उशीनर, हे पुत्र व चित्रा नामक एक कन्या. (अशीं नऊ अपत्यें होऊन त्यांतील) चित्रा ही कन्या उपजतांच मेल्यामुळें तिची वासना राहून ती पुन्हां त्याच आईच्या पोटीं जन्मास येऊन सुभद्रा हें नांव पावली. एकूण रोहिणीचीं दहा अपत्यें झालीं. देवकी नामक जी वसुदेवाची (बारावी) स्त्री सांगितली तिचे ठिकाणीं महातपस्वी श्रीकृष्ण जन्मला. रोहिणीपुत्र जो राम (बलराम) त्याला रेवती नामक स्त्रीपासून निशठ नांवाचा मोठा लाडका पुत्र झाला. अर्जुनपासून सुभद्रेला अभिमन्यु नांवाचा रथी पुत्र झाला; व काशिराजकन्येचे ठायीं अक्रूराला सत्यकेतु हा पुत्र झाला.

आतां वसुदेवाच्या सात[1] बायकांपासून त्याला जे जे शूर पुत्र झाले, त्यांचीं नांवें मजपासून ऐक. त्याच्या शांतिदेवा नामक स्त्रीला भोज आणि विजय असे दोन पुत्र झाले. सुनामा स्त्रीला वृकदेव व गद हे पुत्र झाले. देवरक्षितेला उपासंगवर हा पुत्र झाला. त्रिगर्त राजाची कन्या वृकदेवी तिला अगावह नांवाचा महात्मा पुत्र झाला.

या वृकदेवीचा बाप जो त्रिगर्त राजा त्याचा पुरोहित शैशिरायण गार्ग्य हा पुरुष आहे कीं नपुंसक आहे, ही परीक्षा[2] करण्याकरितां (सर्व यादव मंडळीसमक्ष) यादवांचा पुरोहित जो शाल त्यानें गर्गाचें शिस्न हातांत धरून पाहिलें. परंतु, गार्ग्य हा मोठा दृढव्रती असल्यामुळें त्याचें शिस्न मुळींच उत्थान पावलें नाहीं. अर्थात्, वीर्यस्खलनही झालें नाहीं, त्यावरून हा नपुंसक आहे असें शालानें पिकविलें व सर्व यादवमंडळी खो खो हंसूं लागली (परंतु, या हंशाचा परिणाम गार्ग्यावर फार वेगळा झाला). गार्ग्याची अशी नाहक विटंबना केल्यामुळें त्याला जो संताप

---

१ त्रिगर्ताधिपति देवक याच्या सहदेवाप्रभृति ज्या सात मुली वसुदेवाला दिल्या होत्या त्या.

२ वरपक्षाकडील (यादव) लोकांनीं वधूपक्षाकडील (त्रिगर्त) मनुष्यांची अवहेलना करण्याचा पाठ पुराण कालापासूनचा दिसतो.

चढला त्या संतापानें त्याचें रक्तही लोखंडासारखें काळें झालें, व मनही पोलादासारखें घट्ट होऊन तो सतत बारा वर्षें तसाच धुश्शांतच राहिला. बारा वर्षांनंतर त्याचा कोप शांत झाला, तेव्हां ( आपलें पौरुष सिद्ध करण्याकरितां ) त्यानें एक गवळ्याची मुलगी जवळ घेऊन तिजशीं मैथुन आरंभिलें. या गोपकन्येला गोपाली असें म्हणत. खरें पाहातां ही गोपस्त्रीचा वेष घेतलेली अप्सरा होती. गार्ग्याचें वीर्य असें तसें नव्हतें; तें मोठें तीव्र व अमोघ. यामुळें त्या गोपालीला जो गर्भ राहिला तो राहिलाच. तो कांहीं ढळेना व तिला तर सोसण्यास फार जड जाऊं लागला. आतां या मनुष्यवेष धारण करणाऱ्या स्त्रीचे ठायीं गार्ग्यानें हा जो गर्भ स्थापन केला, तो शंकराच्या आज्ञेवरून केला होता. हा गर्भ जन्मास येतांच त्या कालीं कोणी एक अपुत्रिक यवन राजा होता त्याच्या अंतःपुरांतील स्त्रियांनीं त्याला वाढविलें. हा वर्णानें भुंग्यासारखा काळा असून यवनमंदिरांत वाढल्यामुळें याला कालयवन असें नांव पडलें. हा कालयवन पुढें फारच बलाढ्य निघाला. याला लढाईची मोठी खुमखुम असे. ( व ती पुरी करण्यासाठीं तो नेहमीं योद्ध्यांच्या चौकशींत असे. ) एकदां त्यानें ब्राह्मण मंडळींत योद्ध्यांची चौकशी चालविली असतां ( कळलाव्या ) नारदांनीं त्याला वृष्णि व अंधक या कुलांचीं नांवें सांगितलीं. ती वार्ता ऐकतांच कालयवन एक अक्षौहिणी सेना घेऊन मथुरेवर आला. नंतर त्यानें ( रीतीप्रमाणें युद्धाचा निरोप घेऊन ) वृष्णि व अंधक यांच्या वसतींत दूत पाठविला. ती युद्धवार्ता ऐकतांच वृष्णि व अंधक यांना त्या कालयवनाचें अतिशय भय पडून त्या समयीं त्यांनीं आपल्या पक्षांतील मोठा अक्कलवाला जो श्रीकृष्ण त्याची सल्ला घेतली. तेव्हां त्यानें ( कालयवन हा श्रीशंकराच्या कृपेचें फळ आहे हें ध्यानीं घेऊन ) शंकराचा मान राखण्यासाठीं आपण मथुरानगरी सोडून पळून जावें अशी सल्ला दिली. त्यामुळें सर्वही यादव मथुरा सोडून कुशस्थली उर्फ द्वारका या ठिकाणीं वसती करण्याच्या हेतूनें मथुरेंतून एक निश्चय करून पळाले.

या अध्यायांत सांगितलेलें हें कृष्णाचें जन्म जो ज्ञाता मनुष्य पवित्र राहून व इंद्रिय दमन करून अमावास्या व पौर्णिमा इत्यादि पर्वांचे ठिकाणीं कोणाला ऐकवील तो अनृणी व सुखी होईल.

१ हाच विषय विष्णुपुराणांत पहातां या अनपत्य यवनानें आपल्या स्वतःचे स्त्रीचे ठिकाणीं गार्ग्य मुनीकडून हा कालयवन निर्मिला असा उल्लेख आहे. या विसंगतीचें समाधान नीलकंठांनीं "कल्पभेदानें" असें केलें आहे.

२ गार्ग्याचा वर्ण कोपानें काळा झाला होता, त्याचा हा परिणाम.

३ ज्याचे शरीराचा पूर्वार्ध बैलाचे आकाराचा आहे असल्या प्रकारच्या घोड्यावर बसून तो रणांत जात असे.

## अध्याय छत्तिसावा.

—:०:—

### क्रोष्टुवंशवर्णन.

वैशंपायन सांगतातः—क्रोष्टूच्याच वंशाची आणखी एक बाजू तुला सांगतों. या क्रोष्टूलाच वृजिनीवान् नामक एक महायशस्वी पुत्र झाला. या पुत्रालाही पुढें पुत्र झाला, त्याचें नांव स्वाहि. हा स्वाहाकार करणारांत श्रेष्ठ होता. या स्वाहीला रुषद्गु नांवाचा मोठा वक्ता पुत्र झाला. आपल्याला सुतप्राप्ति व्हावी या इच्छेनें या रुषद्गूनें, ज्यांत ब्राह्मणांस विपुल दक्षणा दिली गेली असे अनेक यज्ञ केले. त्या योगानें त्याला चित्ररथ नांवाचा सर्वोत्कृष्ट पुत्र झाला. हा मोठा कर्मठ होता. याला पुढें

शशबिंदु नांवाचा मोठा वीर व विपुल दक्षिणा वांटणारा असा उदार पुत्र झाला. याचें आचरण राजकुलांत येऊन जे महात्मे ऋषिसंज्ञा पावले त्यांत अग्रगण्य होतें. या शशबिंदूला पुढें मोठा लौकिकवान् असा पृथुश्रवा नामक पुत्र झाला. पुराणज्ञ ऋषि याचेंच दुसरें नांव अंतर होतें असेंही म्हणतात. या अंतराला पुढें सुयज्ञ नामक पुत्र झाला. सुयज्ञाला पुढें उषत नामक पुत्र झाला. हा यज्ञरूपी जो स्वधर्म त्यावर प्रेम करणारांत श्रेष्ठ होता. या उषताला शिनेयु नांवाचा शत्रूंना पीडा देणारा पुत्र झाला. हे राजा, या शिनेयूला मरुत्त नांवाचा ऋषितुल्य पुत्र झाला. या मरुत्तानें (पुत्र होईना तेव्हां) रागानें, धर्माचें फल मुख्यतः मरणोत्तर मिळावयाचें असतांही त्याच्या अंशतः तरी फलप्राप्तीच्या लोभानें, रगड धर्म केला; त्यामुळें त्याला कंबलबर्हिष नांवाचा पुत्र झाला. या कंबलबर्हिषाला पुत्र व्हावा अशी इच्छा झाली असतां शतप्रसूति नांवाचा पुत्र झाला. याला पुढें रुक्मकवच. या रुक्मकवचानें कवच व धनुष्य धारण करणारे शेंकडों धनुर्धर आपल्या तीव्र बाणांनीं युद्धांत मारून अलोट संपत्ति मिळविली. या रुक्मकवचापासून परवीरांचें निर्दलन करणारा असा पराजित् नांवाचा पुत्र झाला. या पराजिताला पांच मोठे पुत्र झाले. त्यांचीं नांवें:— रुक्मेषु, पृथुरुक्म, ज्यामघ, पालित व हरि. यांपैकीं पालित व हरि हे दोघे पुत्र विदेहाधिपतीच्या साह्यार्थ पराजितानें दिले. बाकींच्यापैकीं रुक्मेषु हा राजा झाला. दुसरा जो पृथुरुक्म तो रुक्मेषूच्याच तंत्रानें असे. या दोघां भावांनीं मिळून तिसरा भाऊ जो ज्यामघ त्याला राज्यांतून हाकलून लाविलें. तेव्हां तो अरण्यांत आश्रम करून तेथें शांत चित्तानें राहिला.

परंतु, तेथें असतां वनवासी ब्राह्मणांनीं बोलून बोलून त्याची राज्यतृष्णा जागृत केली. तेव्हां त्यानें एकट्यानें रथावर ध्वजा चढवून एका दूर देशावर स्वारी करून तो जिंकिला. हा जिंकिलेला देश नर्मदेच्या तीरीं असून त्यामध्यें मृत्तिकावती नामक नगरी होती. ती काबीज केल्यावर त्यानें ऋक्षवान् नामक पर्वत आपल्या सत्तेखालीं आणून तेथें शुक्तिमती नामक एका नगरींत वसति धरिली. या ज्यामघाला शैब्या नामक स्त्री भार्या मिळाली होती. ही अत्यंत पतिनिष्ठ असून मोठी शिरजोर होती; यामुळें हिला जरी पुत्र नव्हता, तरी पुत्रार्थ दुसरी स्त्री करण्याचें धारिष्ट (तिच्या भयास्तव) राजाला होईना. अशा स्थितींत तो एका दूर प्रांतीं लढाईवर गेला. त्या लढाईंत त्याचे हातीं एक मुलगी लागली, ती घेऊन तो घरीं आला. तिला पाहातांच ही कोण, ही कोण, असें पुसपुसून शैब्येनें त्याचें डोकें उठविलें. तेव्हां (ही आपल्याला ही स्त्री जिरूं देणार नाहीं अशी भीति पडून) राजानें उत्तर केलें, "ही तुझी सून." तें ऐकून राणी म्हणाली, "नवलच. माझी सून म्हणजे कोणाच्या गळ्यांत बांधावयाची?" तो प्रश्न ऐकून राजा ज्यामघ म्हणाला, "कोणाच्या म्हणजे तुला पोर होईल त्याच्या." (हा त्यांचा संवाद झाल्यावर असा चमत्कार घडला कीं) राजानें आणलेल्या त्या उपदानवी नामक कन्येच्या उग्र तपोबलानें (तिची भावी सासू) शैब्या ही म्हातारी झाली होती तरीही तिला तितक्यापुरती ज्वानी येऊन तिला विदर्भ नांवाचा पुत्र झाला. या विदर्भानें पुढें त्याच्या बापानें सून म्हणून

१ हा लेखी पोथीचा पाठ आहे. छापील पाठ 'उत्तरम्' असा आहे.

१ कांहीं पुराणांत ही कन्या त्यानें स्वयंवरांत मिळविली असें लिहिलें आहे.

आगाऊच आणून ठेविलेली जी राजकन्या उपदानवी तिचे ठायीं मोठे विद्वान् व रणशूर असे क्रथ व कौशिक या नांवांचे दोन पुत्र उत्पन्न केले. त्यांशिवाय लोमपाद नांवाचा एक तिसराही पुत्र त्याला झाला. या लोमपादाला बभ्रु नामक पुत्र झाला. या बभ्रूचा पुत्र आहुति नामक झाला. याला मोठा विद्वान् व धार्मिक कौशिक नामक पुत्र झाला. या कौशिकाला चेदि नामक पुत्र झाला. चैद्य नांवानें जे सुप्रसिद्ध राजे झाले, त्यांना चैद्य नांव पडण्याला हा चेदीच कारण.

वर जो ज्यामघाचा पुत्र विदर्भ म्हणून सांगितला त्याला भीम नामक पुत्र झाला. भीमाला पुढें कुंति हा पुत्र झाला. कुंतीला मोठा प्रतापी व रणशूर असा धृष्ट नांवाचा पुत्र झाला. या धृष्टाला पुढें शूर व धार्मिक असे तीन पुत्र झाले. त्यांचीं नांवें:—आवंत, दशार्ह व बलाढ्य विषहर. या दशार्हाला व्योम झाला. व्योमाला जीमूत. जीमूताला बृहति. बृहतीला भीमरथ. भीमरथाचा नवरथ. नवरथाचा दशरथ. दशरथाचा शकुनि. शकुनीचा करंभ. करंभाचा देवरात. देवराताचा देवक्षत्र. देवक्षत्राच्या पोटीं मोठा यशस्वी, तेजानें देवपुत्रांसमान, पुढील मधुनामक राजांचा मूळ पुरुष, वाणीचा गोड व बापाला आनंद देणारा असा मधुनामक पुत्र झाला. या मधूला विदर्भकन्येचे ठिकाणीं मरुवसा हा पुत्र झाला. या मरुवसानें पुरुद्वान् नांवाचा पुत्र उत्पन्न केला. हा मोठा उत्तम होता. या पुरुद्वानानें आपल्या भद्रवती नामक स्त्रीचे ठायीं जो पुत्र उत्पन्न केला त्याचेंही नांव मधुच होतें. याशिवाय पुरुद्वानाला ऐक्ष्वाकी नांवाची दुसरी एक स्त्री होती, तिचे ठायीं सत्त्वान् नामक पुत्र झाला. हा सत्त्वान् सर्वगुणी असून पुढें सात्वत नांवाचे जे राजे झाले त्यांतील मुख्य होता.

येथवर सांगितलेली ही ज्यामघ राजाची संतति जो कोणी समजून घेईल, त्याला अत्यंत कीर्ति मिळून पुत्रप्राप्तिही होईल.

## अध्याय सदतिसावा.

—:०:—

### बभ्रुवंशवर्णन.

वैशंपायन सांगतातः—सत्वसंपन्न जो सत्वत त्यापासून कौशल्येनें ( सत्वताची स्त्री ) ज्या पुत्रांस जन्म दिला त्यांचीं नांवें:—भजी, भजमान्, दिव्यदेवावृध, महाबाहु अंधक व यदुकुलानंद वृष्णि. यांपैकीं चौघांचा वंश विस्तारानें सांगतों तो ऐक. भजमानाला बाह्यका व उपबाह्यका या नांवाच्या दोन स्त्रिया होत्या. या सृंजयाच्या मुली होत्या. यांपासून भजमानाला अनेक पुत्र झाले. त्यांतील जी पहिली म्हणजे बाह्यक सृंजया तिजपासून कृमि, क्रमण, धृष्ट, शूर व पुरंजय, हे झाले; व दुसरी जी उपबाह्य सृंजया तिजपासून अयुताजित्, सहस्राजित्, शताजित् व दाशक हे झाले. आतां देवावृधाचा वंशः—हा राजा मोठा यज्ञकर्ता होता. शिवाय आपणास सर्वगुणोपेत पुत्र व्हावा असा दृढ हेतु मनांत धरून यानें फारच मोठें तप केलें. त्यानें मनःसंयम करून समाधीचा अभ्यास केला. तपश्चर्येच्या कालांत तो पर्णाशा नामक नदीचें स्नान, आचमन वगैरे करीत असे. त्याच्या त्या (भक्तिपुरःसर ) सततस्पर्शानें ती नदी प्रसन्न होऊन त्याचे कल्याणाविषयीं उद्युक्त झाली; व राजाचें इष्ट कोणत्या रीतीनें सिद्ध करितां येईल याचा विचार करीत असतां राजाला ज्या प्रकारचा पुत्र पाहिजे होता त्या प्रकारचा पुत्र जिचे ठायीं उत्पन्न होऊं शकेल अशी एकही स्त्री

तिला आढळेना. त्या वेळीं तिनें निश्चय केला कीं, आतां आपणच स्त्री-रूप घेऊन याची सहचारिणी व्हावें. असा संकल्प होतांच ती अतिशय सुंदर असें रूप धारण करून कुमारी रूपानें जन्मास आली. तिनें देवावृध राजाला वरिलें व त्या राजाचेंही तिजवर मन गेलेंच होतें. लौकरच त्या उदार बुद्धीच्या राजानें तिचे ठिकाणीं तेजस्वी असा गर्भ स्थापिला. दहाव्या महिन्यांत ती सरिच्छ्रेष्ठा, बभ्रुनामक सर्वगुणसंपन्न पुत्राला जन्म देती झाली. या वंशाचें वर्णन करणारे कांहीं पुराणज्ञ महात्मे देवावृधाचे पुढीलप्रमाणें गुण वर्णन करितांना आम्हीं ऐकलें आहे. ते म्हणत, " देवावृध हा तर देवांच्या तोडीचाच आहे; व त्याचा पुत्र बभ्रु हाही सर्व मनुष्यांत श्रेष्ठ आहे. याचें योगसामर्थ्य इतकें विलक्षण आहे कीं, हा आमचे समोर आसपास किंवा दूर कोठेंही पाहावा तरी सारखाच दिसतो. या बापलेंकांनीं रणांत मारिल्यामुळें सात हजार सहासष्ट वीर मुक्तीस गेले आहेत. हा बभ्रु मोठा यज्ञकर्ता, दानशौण्ड, विद्वान्, ब्रह्मज्ञ, दृढायुध, कीर्तिमान् व महातेजस्वी असून सात्वतांच्या वंशांत महाप्रसिद्ध आहे. इत्यादि. " या बभ्रूचे विस्तीर्ण वंशांत मार्तिकावत नांवाचे सुप्रसिद्ध भोज राजे झाले.

सत्वताचा पुत्र जो अंधक त्याजपासून दृढाश्व राजाच्या मुलीला चार पुत्र झाले. त्यांचीं नांवें:—कुकुर, भजमान, शमि व कंबलबर्हिष. पैकीं कुकुराला धृष्णु हा पुत्र झाला. धृष्णूपासून कपोतरोमा. त्याला पुढें तैत्तिरि. तैत्तिरीचा पुनर्वसु. पुनवर्सूचा अभिजित्. अभिजिताला आहुक हा पुत्र व आहुकी या नांवानें प्रसिद्ध असलेली कन्या हीं झालीं. हीं नांवलौकिकवानांत मोठीं श्रेष्ठ होतीं. यांपैकीं आहुकाला उद्देशून पुराणज्ञ लोक पुढील अर्थाची गाथा गातात. " हा आहुक राजा आपले भोंवतीं श्वेतवर्णाचा किंवा शुद्ध मनाचा परिवार घेऊन व ऐशीं भाते किंवा ढाली बरोबर घेऊन देवांनीं रक्षित होत्साता एखाद्या उत्साहसंपन्न तरुण अश्वाप्रमाणें बाहेर स्वारीला निघत असतो. " या आहुकाचे भोंवतीं जी मंडळी असते तींत ज्यानें यज्ञ केला नाहीं, ज्याचें आचरण शुद्ध नाहीं, ज्याला सहस्रवर्षें आयुष्य नाहीं, ज्यानें शेंकडों मुद्रा ( नाणें ) दान केलें नाहीं, व ज्याला पुत्र नाहीं असा एकही मनुष्य नसे. आहुकाच्या आज्ञेबरोबर दहा हजार हत्ती, ज्यांना लगाम व पट्टे बांधले आहेत असे, त्याचप्रमाणें मेघांप्रमाणें घडघडणारे, आंतून सोन्यारुप्यानें मढविलेले व वर बुरखा चढवून ध्वजा उभारलेले असे दहा सहस्र रथ, पूर्व दिशेला जातात; व तितकेच हत्ती आणि रथ उत्तरेच्या दिशेला धांवतात. या प्रकारची तयारी घेऊन तो आहुक राजा आसपासच्या सर्व राजांना जिंकून आपले जे जात—बंधु भोज त्यांना घंटा बांधिलेल्या रथांत घालून मोठ्या थाटानें मार्गांतून मिरवीत जात असे. अंधकांनीं आहुकाची बहिण जी आहुकी तीं अवंति-राजाला दिली; व स्वतः आहुकानें काशीराजाची कन्या केली, तिचे ठिकाणीं त्याला दोन पुत्र झाले; त्यांचीं नांवें: देवक आणि उग्रसेन. हे दोघेही देवकुमारांसारखे तेजस्वी होते. देवकाला पुढें देवतुल्य चार पुत्र झाले. त्यांचीं नांवें:—देववान्, उपदेव, सुदेव व देवरक्षित. यांखेरीज त्याला मुली झाल्या. त्या सातीही त्यानें एकट्या वसुदेवालाच दिल्या. त्यांचीं नांवें:--देवकी, शांतिदेवा, सुदेवा, देवरक्षिता, वृकदेवी, उपदेवी व सातवी सुनाम्नी.

आतां उग्रसेनाची संततिः—उग्रसेनाला नऊ मुलगे होते. त्यांत कंस हा वडील; त्याचे

खालीं न्यग्रोध, सुनामा, कंक, राजा शङ्कु, राष्ट्रपाल, सुतनु, अनाधृष्टि व पुष्टिमान् असे आठ. या भावांना पांचजणी बहिणी होत्या. त्यांचीं नांवें:--कंसा, कंसवती, सुतनू, राष्ट्रपाली व कंका; ही फारच सुंदर होती. (हे राजा) कुकुरापासून झालेल्या उग्रसेनाच्या संततीचें वर्णन हें मीं तुला सांगितलें. हे कुकुरकुलोत्पन्न राजे अमित तेजस्वी होते, यांचें वंशवर्णन जो कोणी ऐकेल त्याला विपुल संतति होऊन त्याचा वंश ठीक चालेल.

---

## अध्याय अडतिसावा.

—:०:—

### स्यमंतकमणि.

वैशंपायन सांगतातः—भजमानाला विदूरथ नांवाचा पुत्र झाला, हा रथींमध्यें श्रेष्ठ होता. याला पुढें राजाधिदेव नांवाचा एक शूर पुत्र झाला. या राजाधिदेवाला एकाहून एक असे चढते पराक्रमी पुत्र झाले. त्यांचीं नांवें:—दत्त, अतिदत्त, शोणाश्व, श्वेतवाहन, शमी, दंडशर्मा, दंडशत्रु व शत्रुजित्. यांना श्रवणी व श्रविष्ठा अशा दोन बाहिणी होत्या. शमीला प्रतिक्षत्र नामक पुत्र झाला. प्रतिक्षत्राचा स्वयंभोज, स्वयंभोजापासून हृदीक झाला. हृदीकाचे सर्वच पुत्र मोठे पराक्रमी झाले. यांत कृतवर्मा हा वडील होता व शतधन्वा, हा मध्यम. या शतधन्व्याला देवर्षि च्यवन याच्या आशीर्वादानें चार पुत्र झाले, त्यांचीं नांवें:—भिषक्, वैतरण, सुदांत व विदांत. यांशिवाय कामदा व कामदंतिका अशा दोन कन्या झाल्या. कंबलबर्हि नामक जो मरुत्तपुत्र सांगितला त्याला देववान् नामक पुत्र झाला. देववानाला असमौजा, वीर आणि नासमौजा. यांपैकीं असमौजाला पुढें संतति न झाल्यामुळें अंधकानें आपले तीन पुत्र सुदंष्ट्र, चारुरूप व कृष्ण हे असमौजाला दिले. हे राजा, हे व यांशिवाय दुसरे अनेक अंधकवंशीय राजे मीं तुला सांगितले. या अंधकाच्या वंशाचें जो नित्य मनन करील त्याला स्वतःला विपुल वंशप्राप्ति होईल.

क्रोष्टूला गांधारी व माद्री या स्त्रिया होत्या. (हें मागें सांगितलेंच आहे.) यांतील गांधारीला महाबलाढ्य अनमित्र नांवाचा पुत्र झाला. माद्रीला युधाजित् आणि देवमीढुष. अनमित्र हा शत्रूंना जिंकणारा आणि स्वतः पराभव न पावणारा असा होता. या अनमित्राला निघ्ननामक पुत्र झाला. निघ्नाला प्रसेन व सत्राजित् असे दोन पुत्र झाले. हे दोघेही शत्रुसेनेला जिंकणारे होते. यांपैकीं प्रसेन हा द्वारावतींत रहात असतां त्याला समुद्रांतून निघालेला स्यमंतक नांवाचा दिव्य महामणी प्राप्त झाला. त्याची कथा अशीः—

या प्रसेनाचा बंधु सत्राजित् याचा आणि सूर्याचा जिवश्च कंठश्च स्नेह होता. एके वेळीं तो रथिश्रेष्ठ सत्राजित् रात्र सरून प्रातःकाल होण्याच्या समयीं स्नान व सूर्योपस्थान करण्यासाठीं रथांत बसून समुद्रतीरीं आला. तेथें सूर्योपस्थान करीत असतां भगवान् सूर्यनारायण नाक, डोळे वगैरेंचा आकार स्पष्ट न होतां केवळ तेजोमंडलरूपानें त्याचे पुढें येऊन उभा राहिला. त्याला पाहून सत्राजित् म्हणाला, "हे ज्योतिष्पते, तूं इतका मजसन्निध येऊन मला अधिक फायदा तो काय? कारण, तूं आकाशांत असतां ज्याप्रमाणें केवळ तेजोमंडलरूपानें माझ्या दृष्टीस पडतोस त्याच रूपानें जर आतांही दृष्टीस पडणार तर मग तुझी माझी एवढी दाटी पडून मला विशेष लाभ कोणता?" हे त्याचे शब्द ऐकतांच भगवान् सूर्यनारायणानें आपल्या कंठांतील स्यमंतक नांवाचें मणिरत्न सोडून एकीकडे पृथ्वीवर

ठेविलें. तो तेजस्वी मणी दूर होतांच सूर्याचे नाकडोळे सत्राजिताच्या स्पष्ट दृष्टीस पडूं लागले. तेव्हां त्याचें तें रमणीय रूप पाहून प्रसन्न होऊन राजानें त्याशीं घटकाभर इकडल्या तिकडल्या गोष्टी केल्या. मग भगवान् सूर्य जावयास निघाला. तेव्हां सत्राजित् त्याला म्हणाला, " हे भगवन्, हे प्रभो, आपण या मणिरत्नाच्या तेजानें सर्व लोकांना हा नित्य प्रकाश देत असतां ( हें मला आतां समजलें ). तर एवढें रत्न आपण मला द्यावें. कारण आपण माझे जिवश्च स्नेही म्हणवितां." हें ऐकून भास्करानें तो मणी सत्राजिताला दिला. तो गळ्यांत बांधून सत्राजित् आपल्या राज्यांत फिरूं लागला. तेव्हां प्रत्यक्ष सूर्यच धरणीवर आला असा भ्रम होऊन नगरांतले लोक त्याचे मागें धांवत सुटले. याप्रमाणें नागरिकांना थक्क करून सोडून सत्राजित् त्या मण्यासह अंतःपुरांत गेला. अखेरीस त्यानें तो मणी आपला प्रियबंधु प्रसेन याला दिला. हा मणी वृष्णि व अंधक यांच्या घरीं असतां नित्य सुवर्ण[1] वीत असे. हा मणी तेथें असतां पर्जन्य यथाकाल पडे; व रोगराईची भीति मुळींच नसे. असला हा मणी प्रसेनापासून आपणास मिळावा अशी श्रीकृष्णानें इच्छा केली. परंतु, तो त्यास प्राप्त झाला नाहीं. प्रसेनापासून तो जबरीनें हिसकावून घेण्याइतकी शक्ति कृष्णाचे अंगांत नव्हती असें नाहीं, पण त्यानें त्या उपायानें हरण केलें नाहीं.

पुढें एकदां तो प्रसेन त्या स्यमंतकमण्यानें आपलें शरीर भूषित करून मृगयेला गेला, व तेथें त्या मण्यामुळें वनचारी सिंहाचे हातून मरण पावला. पुढें तें मणिरत्न घेऊन तो सिंह पळत असतां एक बलाढ्य अस्वलांचा राजा (जांबवान्) त्यावर तुटून पडला, व त्या सिंहाला मारून व त्याचें तें मणिरत्न घेऊन आपल्या गुहेंत शिरला. (या प्रकारें प्रसेनाचा वध होऊन मणी अस्वलाच्या गुहेंत जाऊन पडला. परंतु) पूर्वीं कृष्णानें प्रसेनापासून तो मणी आपणास मिळावा अशी इच्छा केली असल्यामुळें वृष्णि व अंधक कुळांतील मंडळी या प्रसेनाला कृष्णानेंच मारिलें अशी शंका घेऊं लागले. तो आरोप जेव्हां धर्मात्मा श्रीकृष्ण याचे कानीं आला, तेव्हां त्यानें चकचकीत सांगितलें कीं, मी तर हें कर्म केलें नाहींच व शिवाय हा मणी मी असेल तेथून मिळवून आणून देतों. अशी प्रतिज्ञा करून प्रसेन ज्या अरण्यांत शिकारीला गेला होता त्या अरण्यांत बरोबर कांहीं विश्वासू नोकर घेऊन कृष्ण गेला. तेथें त्यांच्या साहाय्यानें[1] प्रसेनाच्या पावलांचा माग काढीत गिरिश्रेष्ठ ऋक्षवान् आणि विंध्य हे त्यानें पालथे घातले. अखेर तो थकून गेला. इतक्यांत प्रसेन व प्रसेनाचा घोडा हे दोघेही मरून पडलेले त्याला आढळले. परंतु, स्यमंतकमणी तेथें दृष्टीस पडेना. पुढें पाहातां पाहातां प्रसेनापासून थोड्याशाच अंतरावर अस्वलानें मारून टाकिलेला सिंहही दृष्टीस पडला. सिंहाला अस्वलानेंच मारिलें, ही गोष्ट अस्वलाचीं जीं धुळींत पदचिन्हें उमटलीं होतीं त्यावरून ध्यानांत आली. मग त्या पावलांचा माग धरीत धरीत, तो अस्वल धांवत धांवत ज्या मार्गानें गेला होता, त्या मार्गानें श्रीकृष्ण त्या अस्वलाच्या गुहेच्या तोंडाशीं पोंचला. तों त्या अस्वलाच्या त्या विशाल गुहेंतून एका तरुण स्त्रीची वाणी त्याचे कानीं पडली. हे राजा, ही स्त्री म्हणजे त्या जांबवान् अस्वलाच्या

१ चौसष्ट हजार तोळे, असें याचें मान अन्यत्र दिलें आहे ( भा० १० स्कं० अ० ५६, श्लोक ११० ).

१ मारवाड व कच्छभूजकडील वालुकाप्रदेशांत पावलांचा माग काढणारे मोठे तरवेज लोक अजूनही आहेत व त्यांस " पगी " असें म्हणतात.

मुलाला खेळविणारी दाई होय. ती दाई तो स्यमंतक मणी त्या मुलापुढें खेळण्याकरितां ठेवून त्याला म्हणाली, "बाळ, रडूं नको. हा मणी घे. हा तुझाच आहे. कारण, हा मणी ज्याजवळ होता, त्या प्रसेनाला सिंहानें मारिलें व त्या सिंहाला तुझा बाप जो जांबवान् त्यानें मारून हा जिंकून आणिला आहे. यासाठीं माझे शहाणे बाळा, तूं रडूं नको."

दाईचें हें बोलणें श्रीकृष्णाच्या कानीं अत्यंत स्पष्ट रीतीनें पडलें. (तें ऐकून आपण केलेला तर्क खरा अशी त्याची खात्री झाली.) मग बलरामासह आपल्या बरोबरच्या सर्व यादवांस गुहेच्या बाहेरच ठेवून शार्ङ्गधनुष्य धारण करणारा भगवान् कृष्ण त्या मण्याच्या उजेडानें त्या अस्वलाच्या गुहेंत शिरला; तेथें जांबवान् त्याच्या दृष्टीस पडला. मग त्या बिळांत एकवीस[1] दिवसपर्यंत वासुदेवाचें व जांबवंताचें बाहुयुद्ध झालें. श्रीकृष्ण बहुत दिवस जेव्हां बिळांतून परतेना त्या वेळीं बलराम व इतर यादव हे कृष्ण बहुधा मारला गेला असावा असा तर्क करून द्वारकेला परत आले, व तेथें कृष्ण मेला, अशी बातमी त्यांनीं दिली.

इकडे कृष्णानें त्या महाबलाढ्यही जांबवंताला जेव्हां हार खावयास लाविलें, तेव्हां त्या जांबवंतानेंच प्रसन्न होऊन आपल्या मतीनें आपली जांबवती नामक सुंदर कन्या श्रीकृष्णाला अर्पण केली; त्याशिवाय, श्रीकृष्णानें आपणावर आलेला आळ दूर होऊन आपले वर्तनाची साफी व्हावी म्हणून तो स्यमंतक मणीही त्याजपासून घेतला. मग त्या जांबवानाला चार समजुतीच्या गोष्टी सांगून व आपण केलेल्या युद्धाबद्दलचा खेद दूर करून श्रीकृष्ण त्याच्या गुहेंतून बाहेर पडला, व अत्यंत शोभेनें युक्त अशा स्थितींत द्वारकेंत शिरला. याप्रमाणें हरवलेला स्यमंतक-मणी संपादन करून व आपलें वर्तन मुळापासूनच चोख होतें अशी सर्वांची खात्री पटवून श्रीकृष्णानें सर्व सात्वत मंडळींची सभा भरवून तींत तो स्यमंतक मणी उघड रीतीनें सत्राजिताला अर्पण केला. एतावता, शत्रुमर्दक श्रीकृष्णानें आपल्यावर खोटाच आळ आला असतांही (आळ घेणारांना शिव्या देत न बसतां) स्यमंतक मणी (म्हणजे मुद्देमाल) हुडकून आणून आपले वर्तनाची सफाई केली.

सत्राजिताला दहा बायका होत्या, त्यांपासून शंभर मुलगे झाले होते. या शंभरांपैकीं तिघे फार प्रसिद्ध होते. यांतील ज्येष्ठाचें नांव भंगकार असें होतें. दुसऱ्याचें वातपति; हा वीर होता. तिसऱ्याचें नांव वियत्स्नात. या तीन पुत्रांप्रमाणेंच सत्राजिताला सर्वत्र प्रख्यात अशा तीन कन्या होत्या. त्यांचीं नांवें: सत्यभामा; ही सर्व स्त्रियांत वरिष्ठ होती. दुसरी व्रतिनी; हिचें व्रतपालन मोठें कडक असे; व तिसरी प्रस्वापिनी. यांपैकीं सत्यभामा[1] त्यानें श्रीकृष्णाला दिली. भंगकाराला दोन पुत्र होते, त्यांचीं नांवें:—समाक्ष आणि नारेय. हे दोघेही मोठे गुणी निघाले असून शिवाय सद्वर्तन व रूपसंपत्ति यांविषयीं त्यांचा लौकिक असे.

मागें क्रोष्टूची जी कनिष्ठ स्त्री माद्री म्हणून सांगितली तिचा पुत्र जो युधाजित् त्याला वृष्णि नांवाचा पुत्र होता. या वृष्णीला श्वफल्क आणि चित्रक असे दोन पुत्र होते. यांपैकीं श्वफल्काला, जिच्याबद्दल तिचा पिता प्रतिदिनीं गोदान करीत असल्यामुळें जिला गांदिनी असें नांव पडलें होतें, ती काशीराजाची कन्या भार्या

[1] कांहीं ठिकाणीं ही मुदत अठ्ठावीस दिवसांची आहे.

[1] कांहीं ठिकाणीं "भार्याःताः" असा पाठ आहे. त्याचा अर्थ त्या तिघीही बहिणी दिल्या असा होतो. तरी सत्यभामाच प्रसिद्ध आहे.

मिळाली होती. या गांदिनीचे ठिकाणीं अक्रूर हा जन्मला. हा अक्रूर मोठा बलाढ्य, भाग्यवान्, यज्ञकर्ता व विपुल दक्षणा देणारा असा होता. या अक्रूराशिवाय उपासांग, मंगु, मृदूर, अरिमेजय, गिरिक्षिप, उपेक्ष, शत्रुहा, अरिमर्दन, धर्मभृत्, यतिधर्मा, गृध्र, भोज, अंधक, सुबाहु व प्रतिबाहु हे पुत्र; व सुंदरी नांवाची रूपवती कन्या. इतकीं अपत्यें श्वफल्काला होतीं. यांतील रूपयौवनसंपन्न व प्राणिमात्राचें मनोहरण करणारी जी सुंदर कन्या सुंदरी ही विश्रुताश्वाची पट्टराणी झाली. अक्रूराला उग्रसेनी नामक स्त्रीचे ठिकाणीं सुदेव व उपदेव या नांवांचे देवतुल्य तेजस्वी दोन पुत्र झाले. श्वफल्काचा भाऊ जो चित्रक सांगितला त्याला पृथु, विपृथु, अश्वग्रीव, अश्वबाहु, सुपार्श्वक, गवेषण, अरिष्टनेमी, अश्व, सुधर्मा, धर्मभृत, सुबाहु व बहुबाहु, इतके पुत्र व श्रविष्ठा व श्रवणा या दोन मुली होत्या.

हे राजा, या अध्यायांत सांगितलेलें श्रीकृष्णावरील मिथ्या आरोपाचें वृत्त जो कोणी समजून घेईल, त्यावर खोटे आळ कधींही येणार नाहींत.

## अध्याय एकुणचाळिसावा.

—:०:—

### अक्रूरवृत्त.

वैशंपायन सांगतातः—कृष्णांनीं जो स्यमंतक मणी सत्राजिताचे स्वाधीन केला म्हणून सांगितलें तो पुनः अक्रूरानें शतधन्वा नामक यादवाचे द्वारें हस्तगत करून घेतला. याचें कारण असें कीं, अक्रूरानें सुंदर सत्यभामा आपणास मिळावी म्हणून सत्राजिताजवळ मागणी घातली होती व त्या वेळेपासूनच सत्यभामेबरोबरच स्वर्णादिक विणारा तो स्यमंतक मणी आपणास मिळावा असा त्याचा हेतु होता. ( परंतु सत्यभामा जेव्हां श्रीकृष्णाला मिळाली तेव्हां तो तिजबद्दल निराश झाला. तथापि, स्यमंतक मिळविण्याची मात्र त्यानें शतधन्वा नामक एका यादवाचे द्वारें खटपट चालविली. ) त्यामुळें शतधन्वानामक बलाढ्य यादवानें रात्रीं सत्राजितावर छापा घालून त्याला ठार मारून तो मणि हिरावून आणिला आणि अक्रूराला दिला. त्या वेळीं, हे राजा, अक्रूरानें शतधन्व्यापासून तें रत्न घेऊन करार केला कीं, हें रत्न माझे ( अक्रूराचे ) हातीं लागलें आहे असें तूं कोणास सांगूं नको. कृष्ण कदाचित् तुझा पाठलाग करूं लागलाच तर आम्ही सर्व यादव तुझ्या पाठोपाठ उभे आहों, असें समज. कारण, आजकाल उभी द्वारका नगरी माझ्या अध्यावचनांत आहे, ही गोष्ट निखालस आहे. आपला बाप सत्राजित् मारिलेला पाहून यशस्विनी सत्यभामा अत्यंत दुःखी झाली, व त्या दुःखावेगानें रथांत बसून हस्तिपुराला गेली. तेथें तिनें तें भोज[1]कुलोत्पन्न शतधन्व्याचें दुष्कर्म आपला पति श्रीकृष्ण याचे कानीं घातलें; आपण दुःखानें विव्हल होत्साती अश्रु ढाळीत पतीच्या पार्श्वभागीं उभी राहिली. त्या वेळीं दुर्योधनानें कपटानें लाक्षागृहांत जाळलेल्या पांडव-बंधूंना स्वतः निवापांजली देऊन व त्यांची बाकीची और्ध्वदेहिक क्रिया करण्याकडे सात्यकीची योजना करून श्रीकृष्ण लगबगीनें द्वारकेस गेला.

द्वारकेंत येतांच मधुदैत्याला मारणारा श्रीकृष्ण आपला वडील बंधु जो हलधर बलराम त्याला म्हणाला, "प्रसेनाला सिंहानें मारिलें व सत्राजिताला शतधन्व्यानें मारिलें. अशा स्थितींत स्यमंतक मी सत्राजिताला दिला

---

१ हा युधाजिताचा वंश याच ग्रंथांत पूर्वीं सर्व दिला असून पुन्हा विस्तारानें पुनरुक्ति करण्याचें प्रयोजन ग्रंथकारास ठाऊक.

[1] भोजकुल हें यादव कुलांतील एक पोटकुल होय.

असल्यामुळें त्यावर माझी मालकी उघडच आहे. याकरितां हे महाबाहो, आपण सत्वर रथांत बसून व त्या बलाढ्य भोजाला ठार करून मणी आपलासा केला पाहिजे." (असें बोलून कृष्ण व बलराम यांनीं शतधन्व्याला गांठलें.) नंतर हृदीकाचा पुत्र तो शतधन्वा भोज याचें व श्रीकृष्णाचें तुंबळ युद्ध जुंपलें. त्या वेळीं आपणास संकेताप्रमाणें अक्रूर साह्यार्थ येईल या आशेनें शतधन्वा चोहोंकडे अक्रूराला पाहूं लागला. परंतु, अक्रूरानें जेव्हां पाहिलें कीं, शतधन्व्याची आणि कृष्णाची झोंबी केवळ निकराची चालली आहे, तेव्हां अक्रूराचे अंगांत साह्याचें सामर्थ्य असतांही त्यानें कपट केलें, व त्याला साहाय्य दिलें नाहीं. आपणास कोणी साहाय्यकर्ता नाहीं असें शतधन्व्याला आढळतांच भयानें गांगरून जाऊन त्यानें पळून जाण्याचा निश्चय केला. त्या वेळीं त्या शतधन्व्याजवळ विज्ञातहृदया नांवाची एक अति चलाख घोडी होती. ही रोज शंभर योजनें चालत असे; व हिच्या साह्यानेंच शतधन्वा श्रीकृष्णाशीं लढत होता. तिजवर बसून त्यानें पळ काढिला तो एका दमांत शंभर योजनें रस्ता टाकून गेला. इतकी मजल मारिल्यावर ती घोडी अतिवेगामुळें फारच थकून गेली. शिवाय रामकृष्णांचा रथ पाठोपाठ चढ करून येत आहे असें शतधन्व्याला दिसलें, तेव्हां त्यानें ती घोडी तेथेंच सोडली. थोडक्यांतच अतिश्रमानें व दुःखानें त्या घोडीचे प्राण स्वर्गस्थ झाले. ती गोष्ट पाहून कृष्ण बलरामाला म्हणाला कीं, हे महाबाहो, आतां आपला रथ येथेंच थांबवा. कारण, शतधन्व्याच्या घोडीचे बहुतेक बारा वाजले असें माझ्या लक्षांत येत आहे, याकरितां आतां रथाचें कांहीं कारण नाहीं. मी आतां पायींपायींच चालत जाऊन तो स्यमंतक मणी हिसकावून आणितों. असें म्हणून श्रीकृष्ण पायींच शतधन्व्याचा पाठलाग करूं लागला; व जातां जातां अखेर मिथिला नगरीच्या समीपभागीं त्या अस्त्रनिपुण कृष्णानें शतधन्व्याला गांठून ठार केलें. परंतु, त्या महाबल भोजाला मारून फायदा कांहींच झाला नाहीं. कारण, मणी त्याजपाशीं आढळला नाहीं. तेथून कृष्ण परत येतांच बलरामानें 'मणी कोठें आहे तो दे' म्हणून म्हटलें. त्यावर कृष्णानें उत्तर केलें कीं, मणी नाहीं. तें ऐकतांच दादांचें माथें फिरलें. व 'धिःकार असो, धिःकार असो!' असें वारंवार म्हणूं लागले. शेवटीं ते म्हणाले, 'तूं भाऊ आहेस. एवढ्याच खातर गय केली आहे. असो; देव तुझें कल्याण करो. मी आतां चाललों. मला त्या द्वारकेचें कारण नाहीं, तुझेंही नाहीं आणि यादवांचेंही नाहीं.' असें सांगून बलराम निघाला तो मिथिला नगरीस गेला. तेथें मिथिलेश्वरानें त्या शत्रुमर्दन रामाची अनेक इष्ट उपहार देऊन पूजा केली.

या सुमारासच बुद्धिमंतांत श्रेष्ठ जो अक्रूर यानें नानातऱ्हेचे सर्व कांहीं मनसोक्त क्रतु केले; आणि साठ वर्षेंपर्यंत त्यानें हें यज्ञसत्र चालू ठेवून त्यांत शेलकीं शेलकीं रत्नें, नानातऱ्हेचीं द्रव्यें, विपुल अन्नशांति, प्रचुर दक्षणा व सर्व तऱ्हेचीं इच्छित दानें चालू ठेविलीं होतीं. हे यज्ञ इतके प्रसिद्ध झाले कीं, त्यांचें अक्रूरयज्ञ असें स्वतंत्र नांवच पडलें. हे यज्ञ करण्यांत अक्रूराची मोठी चतुराई होती. कारण, त्याजपाशीं स्यमंतक मणी होता, तो हिरावून घेण्यासाठीं कोणी परचक्र येईल, या भयास्तव त्यानें हें यज्ञदीक्षा[1]रूपी कवच धारण केलें; व या योगानें त्यानें स्वतःचा बचाव केला; व स्यमंतक मण्यापासून आयतीच प्राप्त होणारी विपुल संपत्ति यज्ञ-

[1] यज्ञदीक्षा घेतल्यावर वे म्हटल्या कोणी युद्धार्थ आव्हान करीत नाहीं, असा राजधर्म आहे.

निमित्तानें लोकांस वांटून स्वतःचें कल्याण व लोकांचेंही आराधन केलें.

असो; बलराम दादा रुसून मिथिलेला गेले हें सांगितलेंच आहे. ते तेथें असतां राजा दुर्योधन त्यांजकडे गेला, व त्यांजपासून त्यानें गदायुद्धाचें अलौकिक कौशल्य संपादिलें. ( ही बातमी द्वारकेंत येतांच ) वृष्णि व अंधक कुलांतील महारथी व स्वतः महात्मा कृष्ण यांनीं दादांची समजूत घालून त्यांस द्वारकेंत परत आणिलें; तेव्हांच अंधक मंडळीबरोबर अक्रूर द्वारकेंतून निघून गेला. वास्तविक पाहातां युद्धांत महापराक्रमी अशा सत्राजिताला म्हणजे कृष्णाच्या प्रत्यक्ष सासऱ्याला ( स्यमंतक मण्यासाठीं ) अक्रूरानें मारिलें होतें ( त्या अर्थीं कृष्णानें त्याचें पारिपत्य करणें न्याय्य होतें ). परंतु, आपले स्वजातींत दुफळी उत्पन्न न व्हावी म्हणून त्यानें त्याची उपेक्षा केली. अक्रूर द्वारकेंतून गेल्यावर असा चमत्कार झाला कीं, इंद्र तेथें पर्जन्य पाडीना व त्यामुळें अनावृष्टि होऊन अन्नावांचून सर्व राज्य रोडलें. तें पाहून कुकुर आणि अंधक या मंडळींनीं जाऊन अक्रूराची समजूत घालून त्याला पुन्हा द्वारकेस आणिलें. तो दानशूर अक्रूर द्वारकेंत येतांच त्या समुद्रतीरच्या प्रांतांत इंद्रानें पर्जन्याची रेलचेल करून सोडिली. अक्रूर हा मोठा बुद्धिमान् होता, हें मागें सांगितलेंच आहे. त्यानें द्वारकेंत आल्यावर कृष्णाचा रोष घालविण्यासाठीं अशी खुबी केली कीं, आपली सुशील बहिणच कृष्णाला देऊन टाकिली. कृष्णही कांहीं कमी बुद्धिमान् नव्हता; त्यानें अक्रूराच्या दानधर्मावरून व इतर थाटावरून अक्रूराजवळच स्यमंतक असला पाहिजे असें ताडिलें; आणि अक्रूर एकदां सभेंत आहे असें पाहून त्याला म्हटलें, "महाराज, तें स्यमंतक मणिरत्न निःसंशय आपले हातीं लागलें आहे; तरी तें माझें मला परत करा. आपण संभावित आहां, याकरितां मजपाशीं हलकटपणा करूं नका. या रत्नाप्रीत्यर्थ आपल्यावर माझा रोष होऊन आज साठ वर्षें लोटलीं; व इतक्या दीर्घकालांत तो अनेक वेळां धुमधुमसून अतिशय वाढला आहे. करितां हें ध्यानांत धरून काय करणें तें करा." कृष्णाचें तें नरमगरम वचन ऐकून त्या शहाण्या अक्रूरानें आपणास तो मणी परत करण्यांत कोणताही क्लेश वाटत नाहीं, असें दाखवून सर्व सात्वतांच्या सभेंत तो स्यमंतक कृष्णाच्या हवालीं केला. शत्रूला नरम आणणाऱ्या कृष्णानें अक्रूरानें आढेवेढे न घेतां आपला मणी परत केला, हें पाहून आपली प्रसन्नता दाखवून तो मणी पुनरपि आपण होऊनच अक्रूराला दिला. कृष्णाच्या हातून आपणास तें मणिरत्न राजरोस मिळालें असें पाहातांच त्या गांदिनीच्या पुत्रानें म्हणजे अक्रूरानें उघडपणें तें आपल्या गळ्यांत लटकाविलें. तेव्हां त्या मण्याच्या तेजानें तो सूर्यासारखा शोभूं लागला.

जो कोणी शुचिर्भूत होऊन एकाग्र चित्तानें हें स्यमंतकोपाख्यान नित्य श्रवण करील तो सर्व प्रकारच्या सुखांचा फलभोक्ता होईल. शिवाय, हे राजा, अशा मनुष्याची कीर्ति निःसंशय ब्रह्मलोकापर्यंत जाईल. हें मी तुला कांहीं तरी सांगत नाहीं.

## अध्याय चाळिसावा.

—:०:—

### वराहोत्पत्तिवर्णन.

[ स्यमंतक मण्याचें आख्यान ऐकत असतां अक्रूरानें वास्तविक अक्षम्य अपराध केला असून व श्रीकृष्ण परमात्मा त्याचें पारिपत्य करण्यास समर्थ असूनही लोकांस त्रास न

व्हावा, ज्ञातींत विरोध न वाढावा, इत्यादि उंची गोष्टी मनांत आणून परमात्म्यानें त्याला क्षमा केली. इतकेंच नाहीं, तर तो अमूल्य मणी पुन्हा अक्रूराला स्वहस्तें अर्पण केला. इत्यादि गोष्टी ऐकून जनमेजयाला परमात्म्याच्या क्षमा, औदार्य वगैरे अनेक गुणांबद्दल प्रबल भक्ति उत्पन्न होऊन अशा परमात्म्याचें चरित्र अधिकच ऐकावें अशी बुद्धि होऊन त्यानें वैशंपायनास प्रश्न केला. ]

जनमेजय विचारितोः—हे वैशंपायना, अमित तेजस्वी जो परमात्मा विष्णु याचे पुराण अवतारांच्या कथा थोर थोर ज्ञात्यांच्या तोंडून ऐकत असतां त्या अवतारांत वाराह म्हणून एक अवतार होता एवढें आम्हीं ऐकिलें. परंतु, या यज्ञवराहाचें चरित्र, त्याचा विधि, त्याचा विस्तर, त्याचें कर्म, त्याचे गुण, त्याचा देशकाल, त्याचा अधिकार व त्याचें मनीषित हीं मला कांहीं समजत नाहींत. त्या वराहाचें अंतःस्वरूप काय, बाह्याकार कसा, त्याची देवता कोणती, त्याची इतिकर्तव्यता काय, त्याचें सामर्थ्य कोणतें व त्यानें पूर्वी काय काय केलें, तें मला माहीत नाहीं. पूर्वी कृष्णद्वैपायनानें यज्ञासाठीं मोठमोठे ब्राह्मण जमले असतां त्यांच्या समक्ष या महावराहाचें चरित्र सांगितलें होतें. तर, हे वैशंपायना, भगवान् नारायणानें हें वराहरूप कोणत्या कारणानें घेतलें? व ही भूमी समुद्रांत निमग्न झाली असतां आपल्या दाढेनें वर कशी काढिली, इत्यादि त्या बुद्धिवान् व अरिमर्दन श्रीकृष्णाचीं अशेष कर्में यथाक्रम सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे. त्याचप्रमाणें त्याचीं इतर अवतारांतील चरित्रें व त्याची मूल प्रकृति यांचेंही वर्णन आपण सांगावें. तो देवशत्रूंचा घात करणारा बुद्धिमान् भगवान् विष्णु देवगणांनीं व्याप्त व पुण्यवान् लोकांनीं सेवित असा पवित्र स्वर्गलोक सोडून या मृत्यु-लोकीं येऊन वसुदेवाच्या कुलांत जन्म घेऊन वासुदेव संज्ञा पावला, हें सर्व कां? त्याच-प्रमाणें या सर्व सृष्टीचा उगम, देव व मनुष्य यांचा नायक आणि सर्वव्यापी असा परमात्मा आपल्या दिव्य आत्म्याला मनुष्यदेहाशीं कां संयुक्त करिता झाला? जो श्रेष्ठ चक्रधर हें मनुष्यांचें संसारचक्र निर्दोषपणें स्वतः चाल-वितो त्याला त्याच चक्रांत येऊन पडण्याची बुद्धि कशी झाली? जो देव विष्णु स्वर्गांत राहून जगतांतील सर्व लोकांचें गोपन म्हणजे रक्षण करितो तो या भूलोकीं येऊन स्वतःच गोपत्व धरिता कां झाला? जो भूतात्मा या पंचमहाभूतांचा कर्ता व धारणकर्ता असून ज्याचे उदरांत श्री नांदते असा तो या भूमी-वर फिरणाऱ्या यःकश्चित् स्त्रीच्या गर्भांत कसा मावला? ज्यानें देवमंडळीच्या इच्छे-वरून ( वामनावतारीं ) तीन पावलांनीं तिन्ही लोक जिंकून क्रमानें स्वर्ग, मृत्यु व अधोलोक यांची प्राप्ति करून देणारे जे धर्म, अर्थ व कामरूपी तीन पुरुषार्थ त्यांचे मार्ग कायम केले; जो प्रलयकालीं स्वतः जलरूप धारण करून आणि हें सर्व पंचभूतात्मक जगत् सकारण गट्ट करून या सर्व लोकांना त्यांतील जडचेतन अंशासह एकचएक जलनिधीचें रूप देऊन टाकितो; जो स्वतः फार जुनाट असून ज्यानें पुरातन कालीं वराहरूप धरून आपल्या दंताग्रानें या वसुधेला समुद्रांतून वर काढिलें; ज्या अविनाशी सुरश्रेष्ठानें पूर्वी इंद्राखातर सर्व असुरांना जिंकून हें त्रैलोक्य देवांना अर्पण केलें; ज्यानें पूर्वी सिंहाचें रूप घेऊन व पुन्हा त्यांत नर व सिंह अशी द्विधा करून नरसिंह-रूपानें हिरण्यकशिपु नांवाचा महाबलाढ्य दैत्य मारिला; जो सर्व शक्तिमान् परमात्मा पूर्वी प्रलयकालीं संवर्तक नांवाचें वडवाग्नीचें

रूप घेऊन पाताल-समुद्रांतील सर्व जल हवि म्हणून पान करिता झाला; हे ब्रह्मन्, ज्याला युगायुगाचे ठायीं अनंत मस्तकांचा, अनंत नेत्रांचा व अनेक चरणांचा देव असें म्हणत आले; सर्व स्थावरजंगम सृष्टि नष्ट होऊन व तिचे ठिकाणीं एकच एक जलसमुद्र होऊन राहिला असतां जो त्यांत शयन करितो व अशा वेळीं ज्याच्या मंथनदंडतुल्य नाभिनालांतून ब्रह्मदेवाचें वसतिस्थान जें कमल तें निर्माण झालें; ज्यानें तारकासुराशीं युद्ध करीत असतां सर्व-देवमय व सर्वशस्त्रमय असें आपलें शरीर करून सर्व दैत्य मारिले; ज्यानें गरुडावर बसून मस्तींत आलेला कालनेमी दैत्य लोळविला; मय नामक दैत्य जिंकिला; व तारक नामक महासुर मारिला; ज्यापासून अमृत उत्पन्न झालें, असल्या क्षीरसमुद्राच्या उत्तर तीरासमीप जो योगमायेचा आश्रय करून शाश्वत योगाभ्यासांत पडून राहिला आहे; ज्या दिव्य पुराण पुरुषाला अत्यंत तपःसंचयाच्या प्रभावानें देवमाता आदिति ही वामनरूपानें गर्भांत धारिती झाली व गर्भांतून बाहेर पडतांच ज्यानें दैत्य मंडळीनें कोंडून टाकिलेल्या इंद्राचे मनोरथ पूर्ण करून त्याचा संतोष केला; तसेंच ज्यानें तीन लोकांत तीन पाउलें देऊन सर्व दैत्यांना जळांत लपून बसावयास लाविलें, व स्वर्गांतील देवांस पुन्हा निर्भयपणें क्रीडादिक करण्यास लाविलें; आणि इंद्राला देवांच्या राज्यावर बसविलें, ज्यानें यज्ञासंबंधीं पात्रें, दक्षणा, दीक्षा, चमस, उलूखल, वेदी, कुश, स्रुव, प्रोक्षणी, ध्रुवा, अवभृथाचें साहित्य, तसेंच आहवनीय अग्नि, गार्हपत्याग्नि तत्संबंधीं विधि व अन्वाहार्य[1] कर्में, त्याचप्रमाणें तीन तऱ्हेच्या सुधा केल्या; ज्यानें हव्यकव्य करणारे द्विज निर्माण केले, व यज्ञसमयीं मंत्रविधिपूर्वक देवांना हव्य भाग घेण्याचा अधिकार दिला; व पितरांना कव्याचे भागीदार केलें; त्याचप्रमाणें ज्यानें यूप, समिधा, स्रुच, सोम, पवित्र असे परिधी, इत्यादि यज्ञीय द्रव्यें निर्माण केलीं. त्याचप्रमाणें अग्नि व तत्स्थापनार्थ भिन्न स्थानें निर्माण करून सदस्य, यजमान, मेध्यप्रभृति उत्तम उत्तम ऋतु निर्माण केले; ज्यानें ब्रह्मदेवानें घातलेल्या प्रवृत्तीप्रमाणें यज्ञाचे निरनिराळे विभाग लोकांमध्यें चालू करून आपलें सामर्थ्य प्रकट केलें; ज्यानें क्षण, लव, काष्ठा, कला, प्रातः, मध्याह्न व सायं हे तीन काल, व मुहूर्त, तिथी, मास, पक्ष, संवत्सर, ऋतु याप्रमाणें कालभाग निर्माण करून, नित्य, नैमित्तिक व काम्य या त्रिविध कर्मीकडे या कालविभागाचा उपयोग कसकसा करावयाचा याबद्दल श्रुति, स्मृति व शिष्टाचार या प्रकारचीं तीन प्रमाणें ठरवून दिलीं, त्याचप्रमाणें ज्यानें स्थावरजंगमात्मक क्षेत्रें[1] म्हणजे शरीरें निर्माण करून त्यांचे ठिकाणीं आयुष्य म्हणजे कालमर्यादा, वृद्धि ( म्हणजे लहानाचें मोठें होणें किंवा एकाचें अनेक होणें ), द्विपाद, चतुष्पाद इत्यादि लक्षणभेद व सौंदर्यादि धर्म निर्माण केले; त्याचप्रमाणें ज्यानें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य असे यज्ञोपयोगी तीन वर्ण; स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे तीन लोक; ऋक्, यजुः, साम हे तीन वेद; दक्षिण, आहवनीय, गार्हपत्य हे तीन अग्नि; भूत, भविष्य व वर्तमान हे तीन काल; सात्विक, राजस, तामस हीं तीन कर्में; पुत्रैषणा, वित्तैषणा व लोकैषणा या प्रकारचीं तीन व्यसनें; सत्व, रज व तम हे तीन गुण व भूः, भुवर् व स्वर् हे तीन लोक;

१ दाक्षिणाग्नीवर ब्रह्मयानें शिजविलेला चरु. हा ऋत्विजाला दक्षिणेऐवजीं द्यावयाचा असतो.

१ इदं शरीरं कौंतेय । क्षेत्रमित्यभिधीयते ॥ भ० गी० अ० १३, श्लो० १.

इत्यादि अनेक गोष्टी ज्यानें आपल्या अपार सामर्थ्यानें सृष्टीच्या आरंभीं निर्माण केल्या; जो सर्व भूतांचा व गुणांचा स्रष्टा असून स्वतःही जो भूतात्मक व गुणात्मक आहे; जो जीवांना जन्ममृत्यूच्या रूपानें ब्रह्मांडांत सर्वत्र फिरवितो, व जो जीवरूप असतां इंद्रियें व विषय यांच्या संयोगानें प्राप्त होणाऱ्या सुखांत रमतो; जो सर्वनियामक आहे, ज्याचे पदाचा मार्ग धर्मिष्ठांना सदा खुला आहे, परंतु, पाप्यांना मात्र जेथें रीघ नाहीं; ब्राह्मणादि चतुर्वर्ण ज्यापासून झाले; होता, उद्गाता इत्यादि चतुर्विध ऋत्विजांचा जो रक्षणकर्ता; जो चतुर्विध विद्येचा ( आन्वीक्षिकी इ० ) ज्ञाता, व ब्रह्मचर्यादि चार आश्रमांचा आधार; दशदिशा ज्याच्या उदरांत राहातात, असा जो आकाशरूप; त्याचप्रमाणें जो वायुरूप, जलरूप, व अग्नि, चंद्र व सूर्य इत्यादि ज्योतिरूप; जो निर्विकल्प, जो चक्षुःस्वरूप, जो रात्रिरूप अंधकाराचा नाशकर्ता, जो सर्व ज्योतींतील श्रेष्ठ ज्योति व सर्व तपांतील श्रेष्ठ तप असें श्रुतींत म्हटलें आहे; सूत्रात्मरूपानें ज्याला पर म्हणतात; विराट्रूपानें ज्याला अपर म्हणतात, व ज्याला आत्मरूपानें परात्परही म्हणतात; ज्याच्या नारायण स्वरूपांत सर्व वेद, सर्व क्रिया व सर्व धर्म हे राहातात; सत्य, तप व गति आणि मोक्ष हीं सर्व ज्याच्या नारायणरूपाच्या आश्रयानें राहातात; जो सर्वांचें परमोच्च आश्रयस्थान आहे; जो आदित्याचाही आदि आहे; जो स्वतः दिव्य, सर्वव्यापी व दैत्यांतक आहे; युगांतकालीं जो अंतकाची कामगिरी बजावीत असून जो यमाचाही अंतक आहे; मन्वादिक जे लोकाचार-नियंते त्यांचाही जो नियंता; जो सर्व पवित्रांत पवित्र, जो वेदवेत्त्यांनाही परमवेद्य, जो मरीच्यादिकांचा प्रभु, जो सर्व सुंदर वस्तूंत सुंदर व तेजस्वींत तेजस्वी; जो मनुष्यांचें मन, तपस्व्यांचें तप, नयशीलांचा विनय, तेजस्व्यांचें तेज, सर्व सृष्ट पदार्थांचा स्रष्टा व सर्व लोकांचा आदिकारण; जो देहधारकांचा देह, गतिमंतांची गति, जो आकाशांत निर्माण झालेला वायु, व वायूनें चेतन होणारा हुताशन; अग्नि हा देवांचा प्राण, व मधुसूदन नारायण त्या अग्नीचाही प्राण; जठराग्नीच्या सामर्थ्यानें अन्नाचा परिपाक होऊन अन्नरस उत्पन्न होतो, मग त्या अन्नरसापासून रक्त बनतें; रक्तापासून मांस, मांसापासून मेद, मेदापासून अस्थि, अस्थीपासून मज्जा, मज्जेपासून शुक्र, व शुक्रापासून गर्भसंभव ही सर्व परंपरा एका रसव्यापारापासून निर्माण होते. आतां हा जो गर्भरूप पिण्ड याला हेतुभूत जें रेत तो उदकाचा भाग आहे; व हा शुभ्रवर्ण असल्यामुळें सोमरूप आहे. पुढें जठराग्नीच्या योगानें उत्पन्न होणारा जो ऊष्मा हा अग्निस्वरूप होय. त्याचप्रमाणें पुरुषाचें शुक्र हें सोमरूप आहे, व स्त्रीचें आर्तव हें अग्निरूप आहे. एतावता शुक्र व आर्तव हे दोन्हीही भाग रसरूप असून चंद्र व अग्नि हे त्यांचे पोषक आहेत. कफापासून शुक्र होतें, पित्तापासून शोणित होतें, हृदयांत कफ असतो व नाभीचे ठिकाणीं पित्त असतें; देहामध्यें हृदय राहातें, तेंच मनाचेंही स्थान होय. मन हाच प्रजापति होय; आणि कफ हा सोम समजला जातो; व पित्त हा अग्नि असून तो जठराग्निसंज्ञेनें नाभी व कोष्ठ यांमधील प्रदेशांत राहातो; एतावता हें सर्व जगत् ( पिण्ड ) अग्नीषोमात्मक आहे. याप्रमाणें शुक्रशोणितसंयोगानें गर्भ स्थापित होऊन तो मेघाप्रमाणें वाढीस लागला असतां त्यांत जीव हा परमेश्वरासहित प्रवेश करितो; प्रवेशानंतर तो शिरःप्रभृति अवयव निर्माण करून त्याचें पोषण करितो. तो शरीरस्थ प्राणरूप होऊन प्राण, अपान, समान,

उदान व व्यान असे आपले पांच भाग करितो; यांपैकीं प्राण हा हृदयाचे ठिकाणीं राहून त्या भागास वाढवितो; अपान हा देहाचें पश्चिमार्ध म्हणजे जघनापासून चरणापर्यंतचा भाग यास वाढवितो; उदान वायु हा शरीराचा छातीपासून वरचा भाग वाढवितो; व्यान हा सर्व शरीरसंधींचे ठिकाणीं राहून शरीराला बळकटी आणितो व म्हणूनच याला व्यान असें म्हणतात; आणि समान हा नाभीदेशीं राहून अन्नपानादिक यथास्थान पोंचवितो; या प्रकारें पंचप्राणांची वांटणी झाल्यावर त्या जीवाला इंद्रियद्वारा विषयरूपानें पृथ्वी, आप, तेज इत्यादि पंचमहाभूतांचा साक्षात्कार होऊं लागतो. याचें कारण, त्याचीं जीं इंद्रियें तीं पृथिव्यादि पंचमहाभूतांचींच विशिष्ट रूपें असल्यामुळें तीं स्वभावतःच आपआपल्या विषयांशीं संगत होऊं लागतात. या शरीरापैकीं देह हा पृथ्वीचा भाग, प्राण हा वायूचा, कर्णादिकांचीं रंध्रें हा आकाशाचा, लालामूत्रादि स्राव हा जलाचा; व नेत्रांतील ज्योति हा भाग तेजाचा; व या सर्वांचा नियामक, तें मन; व या मनाच्याच सामर्थ्यानें ग्रामनगरादि प्रदेश हे निर्माण झाले.

याप्रमाणें ही अनादिसिद्ध सृष्टि त्या परमात्म्यानेंच निर्माण केली असतां तीमधील या मर्त्य लोकांत तोच परमात्मा मनुष्यरूप धारण करून येण्यास कसा राजी झाला? याबद्दल मला मोठें आश्चर्य वाटतें व संशयही येतो. मनुष्ययोनींतील जीव अखेर ज्याकडे जावें म्हणून धांव घेतात, तोच उलट मनुष्यांत येऊन मिसळतो याला काय ह्मणावें? हे वैशंपायना, मी माझे एकंदर पूर्वज व त्यांतून विशेषतः माझी शाखा याबद्दलचा इतिहास तुमचे मुखांतून ऐकला. आतां श्रीविष्णु व एकंदर वृष्णिकुल, यांचा वृत्तांत क्रमशः ऐकण्याची इच्छा आहे. देव तसेच दैत्यही विष्णु हा अतिशय आश्चर्यकारक आहे असें म्हणतात. याकरितां असल्या त्या विष्णूची उत्पत्ति व त्याचें तें आश्चर्यकारक चरित्र मला सांगा. बलवीर्यानें प्रख्यात व तेजानें अपरिमित व स्वकर्मानें जीवमात्राला चकित करून सोडणारा अशा त्या विष्णूचें चमत्कारपूर्ण चरित्र मला खचितच सुखावह होईल, याकरितां तुम्ही तें मला सांगा.

## अध्याय एकेचाळिसावा.

—:o:—

### श्रीविष्णूचें अवतारवर्णन.

वैशंपायन सांगतातः—हे जनमेजया, शार्ङ्ग धनुष्य धारण करणारा जो भगवान् श्रीविष्णु त्याच्या संबंधानें तूं एक गाडाभर प्रश्न मला केलेस, त्यांतून मला झेपतील तितक्यांचीं उत्तरें मी तुला सांगतों. तर आतां श्रीविष्णूचें यश ऐकच. हे राजा, तूं तरी मोठा भाग्यवानच आणि म्हणूनच श्रीविष्णूचें यश ऐकण्याची तुला बुद्धि स्फुरली. ठीक आहे; आनंद आहे; तर आतां माझे मुखांतून श्रीविष्णूची दिव्य उत्पत्ति ऐक.

या श्रीविष्णूला वेदवेत्ते-ब्राह्मण, सहस्र-नेत्र, सहस्र-मुख, सहस्र-बाहु, सहस्र-मूर्धा, सहस्र-कर, सहस्र-जिव्ह, सहस्र-मुकुट, सहस्र-हस्त, व सहस्रादि आणि सहस्रद, अव्यय प्रभुदेव इत्यादि विशेषणांनीं वर्णितात. ते ब्राह्मण तो सर्वव्यापी परमात्मा सर्वदा यज्ञस्वरूप असून यज्ञांतील हवन, हव्य, होता, पवित्र पात्रें, वेदि, दीक्षा, चरुस्थली, स्रुवा[1], स्रुक्[2], सोम, शूर्प, मुसल,

---

१ 'स्रुवा' ही एक ढबूपैशाइतकी पुढें उखळी असलेली पळी असते. यानें वृताची आहुती देतात.

२ 'स्रुक्' ही अजमासें सुव्याच्या बारापट तूप राहील अशी हंसाचे मुखाचे आकृतीची एक पळी असते.

प्रोक्षणीपात्र, अन्वाहार्यादि हविर्भाग, अध्वर्यु, सामगायक ब्राह्मण, सदस्य, सदन (पत्निशाला), सद (ऋत्विक्शाला,) समिधा, दर्भ, दर्वी, चमस, उलूखल, प्राग्वंश, यज्ञभूमी, ऋत्विज, स्थंडिल, चर व स्थिर असे ऱ्हस्व व दीर्घ प्रमाणांचे शकट, प्रायश्चित्तें, स्वर्गादि फलें, यज्ञवेदी, कुश, मंत्र, हव्यवाहक अग्नि, वह्निभाग, गायत्रीछंद; अग्रेभुज, सोमभुज, घृतार्चि व उदयनीय इत्यादि संज्ञक अग्निही सर्व तोच आहे, असें म्हणतात. हे वैशंपायना, तो श्रीवत्सानें लांछित असणारा देवदेवेश श्रीविष्णु याचे हजारों हजार अवतार पूर्वी होऊन गेले व पुढेंही निःसंशय असेच होतील, असें सर्व वेददर्शी जो ब्रह्मा तो म्हणतो. हे महाराजा, तूं मला सुरश्रेष्ठ व अरिमर्दन असा भगवान् विष्णु देवलोक सोडून वसुदेवाच्या कुळांत कां आला, म्हणून विचारिलेंस त्यापक्षीं ती पवित्र, दिव्य व कल्याणकारक कथा मी तुला पूर्णपणें सांगतों, ती ऐक. त्याप्रमाणेंच त्या महातेजस्वी श्रीविष्णूचें महत्व व चरित्र मी तुला सांगतों. श्रीविष्णूचा अवतार उगाच होत नसतो, तो कांहीं विशिष्ट कार्यास्तव होत असतो. बहुधा हें कार्य म्हणजे देव व मनुष्य यांचें कल्याण करणें, व एकंदर लोकांचें तेज वाढविणें, हाच त्याचा उद्देश असतो व याच्या सिद्धयर्थ तो सर्व भूतांचा अंतरात्मा अवतार धारण करीत असतो. अशा त्या परमात्म्याचे पवित्र, दिव्यगुणांनीं युक्त, आणि श्रुतिमंत्रांनीं वर्णन केलेले जे अनेक अवतार, हे जनमेजया, मी सांगतों ते तूं पवित्रपणें मुकाट्यानें ऐक. मी जें तुला हें वृत्त सांगणार तें फार पुरातन, फार पावन व श्रुतीला मान्य असें आहे. याकरितां विष्णूची दिव्य कथा मी तुला सांगतों आणि तूं ऐक.

हे जनमेजया, जेव्हां जेव्हां म्हणून लोकांत धर्माची ग्लानि होते तेव्हां तेव्हां पुन्हां धर्माची संस्थापना करण्यासाठीं हा सर्वशक्ति परमात्मा अवतार धरितो. हे राजा, या परमात्म्याची एक सत्वगुणविशिष्ट श्रेष्ठमूर्ति कायमची स्वर्गांत असते व ही सर्वदा दुष्कर असें तपःश्चरण करीत असते. याची दुसरी, तमःप्रधान मूर्ति ही प्रजेचा संहार करण्याकरितां योगनिद्रेचा आश्रय करून निद्रिस्त शयनावर असते. या मूर्तीचे अनुकरणानें लोकांत कुत्सित असे अध्यात्म-चिंतक निर्माण होतात. हा देवाधिदेव जगत्पति योगनिद्रेंत सहस्त्र युगें घालवून त्या कालाचे अंतीं लोककार्यार्थ प्रकट होतो. तसेच पितामह ब्रह्मदेव, सर्व लोकपाल, चंद्र, सूर्य, अग्नि, कपिलमुनि, परमेष्ठी, सर्व देव, सप्तही ऋषि, महायशस्वी त्रिलोचन शिव, वायु, समुद्र, पर्वत, महानुभाव सनत्कुमार, लोकनियंता महात्मा मनु, हे सर्वही या परमात्म्याच्या देहाचा आश्रय करून असतात. प्रदीप्त अग्नीप्रमाणें ज्याचें तेज आहे अशा या जुनाट देवानें ब्रह्मदेवापासून तों तृणापर्यंत अनंत शरीरें निर्माण केलीं आहेत. त्यानें सर्व स्थावरजंगम, सर्व देवदैत्य, सर्व उरग, राक्षस नष्ट झाल्यावर समुद्रांत राहाणारे, व युद्धाविषयीं उत्सुक असे मधुकैटभ नांवाचे दोन दुर्धर्ष राक्षस मारून त्यांना अमित वरही दिले. हा कमलनाभ परमात्मा पूर्वी समुद्रोदकांत निजला असतां त्याच्या नाभिकमलापासून ऋषींसहित देव निर्माण झाले. हा परमात्म्याचा पुष्करनामक अवतार

१ हा अग्नीवरच भात शिजवून तोच ब्राह्मणांना दक्षिणा म्हणून द्यावयाचा असतो.

२ 'चमस' हें एक चौकोनी पात्रें असून यानें सोमाची आहुती देतात.

३ हें यज्ञाच्या उपकरणशालेसमोरच बांधिलेलें एक गृह असतें. हें पूर्वदिशेला असून त्यांत यज्ञकर्में करणारे ऋत्विज व यज्ञकर्त्यांचे कुटुंबांतील मंडळीला राहाण्यास जागा असते.

समजावा. ज्यांत प्रत्यक्ष वेदच एकरूप करून ओतला आहे, असल्या पुराणांत या परमात्म्याचा श्रुतिमुख असा आदिवराह अवतार झाला, म्हणून वर्णिलें आहे. या अवताराचे समयीं परमात्म्या देवश्रेष्ठ विष्णूनें वराहाचें रूप घेऊन पर्वतारण्यासहित समुद्रापर्यंत ही सर्व पृथ्वी आपल्या दाढेवर उचलली. यासच यज्ञवराह अशी संज्ञा आहे. या यज्ञवराह रूपाचे चार वेद हेच चार पाय, यज्ञीय यूप याच चार दंष्ट्रा, क्रतु हेच दांत, चिती[1] हेंच मुख, अग्नि हीच जिव्हा, दर्भ हे रोम, ब्रह्म हेंच मस्तक, दिवस आणि रात्र हे डोळे, वेदभाग हींच कर्णभूषणें, आज्य हीच नासिका, स्रुवा हें तोंड, सामघोष हाच महान् शब्द, प्रायश्चित्तें हेच नखर, पशु हेच गुडघे, उद्गाता हेच अंत्र, फलें हेच वृषण, व बीजयुक्त महौषधी हेंच वीर्य, वायु हाच अंतरात्मा, मंत्र हेच कुले, पिळलेला सोमरस हेंच रक्त, वेदी हा स्कंध, हवी हाच गंध, हव्यकव्य हेंच गतिचापल्य, प्राग्वंश हेंच शरीर, दक्षिणा हेंच हृदय, उपाकर्म हाच अधरभाग, प्रवर्ग्याचीं आवर्तनें हींच भूषणें, नानाछंद हेच गतिमार्ग, गूढ उपनिषदें हेंच आसन, छाया हीच पत्नी; अशा प्रकारचा हा महातपस्वी दिव्यरूपी, धर्ममय, सत्यमूर्ति, श्रीमान्, व जो क्रमविक्रम[2] सत्कृत ( म्हणजे ज्यानें तीन पावलांनीं त्रिभुवन व्यापण्याचा अद्भुत पराक्रम केल्यामुळें ज्याचा सर्वत्र गौरव केला जातो असा ), धीर, महाबाहु, द्युतिमान्, अनेक दीक्षांनीं पवित्र झालेला, योगी, व केवळ महायज्ञस्वरूप असा हा वराह मेरुपर्वताच्या शिखराप्रमाणें उच्च होता. यानें सर्वत्र जलमय झाल्यानें एकच एक दिसणाऱ्या समुद्रांत बुडालेली ही सागरांत पृथ्वी तीवरील पर्वत व अरण्यें यांसह लोकांच्या कल्याणासाठीं आपल्या दाढेनें वर काढिली. याप्रमाणें, भूतमात्रांचें हित पाहाणाऱ्या या सहस्रशीर्ष आदिदेवानें यज्ञवराहाचें रूप घेऊन समुद्रजलाचें स्वपृष्ठावर धारण करणारी ही पृथ्वी समुद्रांतून वर काढून पुनरपि पूर्वरूपानें स्थापित केली.

या प्रकारें मीं तुला वराह अवतार सांगितला. आतां नरसिंह अवतार ऐक. हे राजा, या नरसिंह अवताराचा प्रसंग असा आहे कीं, पूर्वीं कृतयुगामध्यें दैत्यांचा आदिपुरुष जो हिरण्यकशिपु नांवाचा दैत्य याला स्वतःच्या बलाचा गर्व होऊन तो देवांना पाण्यांत पाहूं लागला, त्या वेळीं परमात्म्यानें सिंहाचें रूप घेऊन त्याला मारिलें. या हिरण्यकशिपूला इतकें बल प्राप्त होण्यास कारण, त्यानें अकरा हजार पांचशें वर्षेंपर्यंत अतिशय तीव्र तपाचरण केलें. ह्या कालांत तो इंद्रियसंयमन करून, मौन धारण करून व केवळ जलावर निर्वाह करून दृढासनावर बसलेला असे. त्याचें तें तीव्र तप, नियमशीलत्व, ब्रह्मचर्य, तसेंच शम व दम, या सर्वांच्या योगानें हे पवित्रा जनमेजया, पितामह ब्रह्मदेव प्रसन्न झाला. हे भूपाला, प्रसन्न होतांच तो भगवान् स्वयंभु, ज्याला हंसपक्षि हे वाहक आहेत, व ज्याचा वर्ण सूर्यासारखा आहे, अशा उज्ज्वल विमानांत स्वतः बसून व बरोबर बारा आदित्य, अष्टवसु, साध्य, मरुत नामक देव, विश्वेदेव, रुद्रगण, यक्ष, राक्षस, किन्नर, दिशा, उपदिशा, नद्या, सागर, नक्षत्रें, मुहूर्त, आकाशस्थ महाग्रह, तपोवृद्ध असे सिद्ध व देवर्षि, प्रसिद्ध सप्तर्षि, तसेच पुण्यवान् राजर्षि व गंधर्व आणि अप्सरागण हे बरोबर घेऊन हिरण्यकशिपूजवळ आला, आणि वर सांगितल्याप्रमाणें सर्व देवादि मंडळी सभोंवतीं असतां,

१ कूर्म, श्येन इत्यादि अनेक आकारांचीं अग्निस्थापनेचीं स्थंडिलें.

२ यज्ञांतीं यजमानाला कांहीं मंत्र म्हणून पाउलें टाकावीं लागतात, त्याला उद्देशून हें पद आहे.

तो ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ व चराचरांचा गुरु श्रीमान् ब्रह्मदेव त्या दैत्याला बोलला, "हे सुव्रता, तूं माझा खरा भक्त आहेस. तुझ्या या तपानें मी प्रसन्न झालों आहें. तुझें कल्याण असो; आतां मजपासून वाटेल तो वर मागून घेऊन आपली इच्छा तृप्त करून घे."

हिरण्यकशिपु म्हणाला, "देव, असुर, गंधर्व, यक्ष, उरग, राक्षस, मनुष्य किंवा पिशाच्च, यांपैकीं कोणाचेही हातून कोणत्याही उपायांनीं मला मृत्यु न यावा; त्याचप्रमाणें हे लोकपितामहा, तपानें युक्त असे जे ऋषि ते क्रुद्ध झाले असतांही त्यांचा शाप मला बाधूं नये, हा वर मी निवडतों. तसेंच, शस्त्र, किंवा अस्त्र किंवा पर्वत किंवा वृक्ष किंवा कोणतीही ओली किंवा शुष्क वस्तु यांपासून किंवा इतर कोणत्याही वस्तूचे साहाय्यानें माझा वध होऊं नये. जो कोणी माझे सेवक, माझें सैन्य व माझें वाहन या सर्वांसह मला केवळ आपल्या पंजाच्या तडाक्यानेंच नाहींसा करूं शकेल त्याचे हातून माझा मृत्यु व्हावा; (मला वाटेल त्याचें रूप व अधिकार घेतां यावे) मीच सूर्य व्हावें; मीच सोम, मीच वायु, मीच अग्नि, मीच जल, मीच अंतरिक्ष, मीच नक्षत्रें, मीच दाही दिशा, मीच अहंकार, मीच क्रोध, मीच काम, मीच वरुण, मीच इंद्र, मीच यम, मीच धनपति कुबेर, मीच यक्ष व मीच किन्नराधिप असावें."

याप्रमाणें त्या दैत्यानें भाषण केलें असतां भगवान् ब्रह्मदेव हंसतच त्या दैत्यपतीला म्हणाले, "बाबारे, तूं हे जे वर मागितलेस ते सर्वही मोठे दिव्य व अद्भुत आहेत. तथापि, मीं ते तुला दिले आहेत; आणि तूं मजपुढें ज्या ज्या इच्छा प्रदर्शित केल्या आहेस, त्या सर्वही पूर्ण होतील. यांत संशय बाळगूं नको." याप्रमाणें सांगून भगवान् ब्रह्मदेव थेट आकाशांतच आपलें ब्रह्मर्षिगणांनीं युक्त असें जें दिव्य ब्रह्मभवन तेथें गेले. त्या वेळीं देव त्यांस म्हणूं लागले, "हे भगवन्, या असुराला आपण असले असले वर दिले खरे; परंतु, यांच्या योगानें तो आम्हांला बाधा देईल; याकरितां, हे ब्रह्मन्, कृपा करून याच्या वधाचाही उपाय योजून ठेवा."

देवांचें हें सर्वलोककल्याणहेतुक वाक्य ऐकून सर्व भूतांचा आदिकर्ता, सर्वशक्तिमान्, हव्यकव्यांचा निर्माता, स्वयंभु, सृष्टिकर्ता, मूलप्रकृतिरूप व अविनाशी असा देव प्रजापति त्या देवगणांना म्हणाला, "हे देवगणहो, (मी त्याला विलक्षण वर दिले खरे, परंतु, काय करूं?) त्यानें तीव्र तप केलें त्या अर्थी त्याचें फळ त्याला मिळालेंच पाहिजे होतें. तथापि, हें फल भोगून या तपाचा क्षय होईल त्या वेळीं भगवान् श्रीविष्णूच त्याचा वध करितील." या प्रकारचें हें वाक्य या कमलोद्भवाच्या मुखांतून ऐकतांच सर्वही देवगण आनंदित होऊन आपआपल्या दिव्य स्थानीं परत गेले. इकडे वर पदरांत पडतांच त्या वराच्या मस्तीनें चढून जाऊन तो हिरण्यकशिपु दैत्य सर्व लोकांना पिसाळवूं लागला. आश्रमांत जाऊन तेथील सत्यनिष्ठ, दान्त व नियमानें व्रताचरण करणारे मुनींवर बळजबरी करूं लागला. त्रैलोक्यांतील देवांना जिंकून व सर्व त्रैलोक्य आपल्या मुठींत आणून आपण स्वर्गांत वास करूं लागला; व याप्रमाणें वरसामर्थ्यानें उन्मत्त होऊन त्या बड्या दैत्यानें जेव्हां स्वर्गांत ठाणें दिलें, तेव्हां त्यानें यज्ञांत देवांना मिळणारे हविर्भाग बंद पाडून त्या ठिकाणीं आपले जातभाई जे दानव त्यांना हविर्भाग मिळण्याचा हक्क दांडगाईनें सुरू केला. त्यावेळीं आदित्य, रुद्र, विश्वेदेव व मरुद्गण हे सर्वही शरणागतांचें रक्षण करणारा व

महाबलाढ्य असा जो भगवान् विष्णु त्याजकडे आश्रयार्थ गेले. हा भगवान् विष्णु म्हणजे ब्राह्मणांचें दैवत, वेद व यज्ञ यांचें मूर्तस्वरूप, अतीत, अनागत व वर्तमान या तिन्ही कालांला व्यापून असणारा; सनातन, सर्व लोकांस वंद्य, सर्वव्यापी, सर्वशक्तिमान् व शरणागतांविषयीं दयाळु असा पाहून देव त्याला शरण गेले.

देव म्हणाले, "हे देवेशा, आम्हांला हिरण्यकशिपूच्या भयापासून तूं आतां संभाळ. हे सुरश्रेष्ठा, ब्रह्मदेवप्रभृति जे आम्ही देवगण या सर्वांचाही तूंच निर्माणकर्ता आहेस; तूंच आमचा परमदेव व परमगुरु आहेस; हे उत्फुल्ल कमलनेत्रा, हे शत्रुपक्षभयंकरा, दितीच्या संततीचा नाश करण्याचे ठायीं तूं आमचा आश्रय हो."

श्रीविष्णु म्हणाले, "हे अमरहो, तुम्ही सर्व भय सोडा; कारण मी तुम्हांला अभय देतों आणि असें सांगतों कीं, अल्पकालांतच तुम्हांला पूर्ववत् स्वर्गाची मालकी मिळेल. मी जाणतों आहें कीं, तो दैत्य वरदानानें चढून जाऊन तुम्हांपैकीं मुख्य मुख्यांनाही मोजीनासा झाला आहे. परंतु, हें समजा कीं, त्याचा त्याच्या अनुयायांसह मी नायनाट करून टाकितों."

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें त्या देवगणांना वाटेस लावून श्रीविष्णु हिरण्यकशिपूचे सभास्थानीं आले. त्या वेळीं त्यांनीं अर्धें शरीर मनुष्याचें व अर्धें शरीर सिंहाचें असें धारण केलें होतें; व त्या वेळीं त्यांच्या देहाची कांति, त्यांचा शब्द, त्याचें उद्दीप्त तेज व त्यांचा वेग हीं सजल मेघांप्रमाणें होतीं. तो हिरण्यकशिपुही सामान्य नव्हता. तो अतिशय बलाढ्य, अतिशय जाज्वल्य व गुर्मींत आलेल्या वाघाप्रमाणें पराक्रमी, असा असून हजारों मदोन्मत्त दैत्य त्याच्या रक्षणार्थ उभे होते. पण अशाही स्थितींत त्या नृसिंहरूप धारण करणाऱ्या परमात्म्यानें केवळ त्याच्या हस्ततलाला आपला हस्ततल लावून तेवढ्यानेंच त्या दैत्याला मृत्युसदन दाखविलें.

याप्रमाणें नरसिंहावताराचें हें वर्णन झालें. आतां यापुढें येणारा वामन. या अवतारांत दैत्यविध्वंसकर्त्या परमेश्वरानें वामनाचें ( बटूचें ) रूप धारण केलें; आणि बलीनामक जो बलवान् दैत्य होता, त्याचे घरीं यज्ञ चालू असतां जाऊन आपण ब्राह्मण म्हणून तीन पाउलें भूमि दान मागून घेतली; व तीं तीन पाउलें भरून घेण्यांतच त्या बलीचे अंगभूत असलेले एकाहून एक अक्षोभ्य असे जे राक्षस होते, त्यांच्यांत मोठी खळबळ उडवून दिली. त्या दैत्यांचीं नांवें: विप्रचित्ति, शिबि, शंकुरय, शंकु, अयःशिरा, शंकुशिरा, वीर्यवान् हयग्रीव, वेगवान् केतुमान्, उग्र, सोग्र, व्यग्र, महासुर, पुष्कर, पुष्कल, वेपन, बृहत्कीर्ति, महाजिव्ह, साश्व, अश्वपति, प्रल्हाद, अश्वशिरा, कुंभ, संऱ्हाद, गगनप्रिय, अनुऱ्हाद, हरि, हर, वराह, शंकर, रुज, शरभ, शलभ, कुपन, कोपनक्रथ, शंकुकर्ण, महास्वन्, दीर्घजिव्ह, अर्क, नयन, मृदुचाप, मृदुप्रिय, वायु, गविष्ठ[१], नमुचि, शंबर, विज्वर, महान्, चंद्रहंता, क्रोधहंता, क्रोधवर्धन, कालक, कालय, वृक, क्रोध, विरोचन, गरिष्ठ, वरिष्ठ, प्रलंब, नरक, इंद्रतापन, वातापि, बलदर्पित, केतुमान्, असिलोमा, पुलोमा, वाक्कल, प्रमद, मद, खसृम, कालवदन, कराल, कैशिक, शर, एकाक्ष, चंद्रहा, राहु, संऱ्हाद, सृमर, वखन यांपैकीं कोणाचे हातांत शतघ्नि, कोणाचे चक्र, कोणाचे परिघ, कोणाचे शूल, कोणाचे महाशिला, कोणाचे अश्मयंत्र, कोणाचे भिंदीपाल, कोणाचे शूल, कोणाचे उलूखल, कोणाचे परश्वध, कोणाचे पाश,

१ या ठिकाणीं गविष्ठ व ग्रविष्ठ असेही पाठ सांपडतात.

कोणाचे मुद्गर व कोणाचे मुशल, याप्रमाणें अनेकांचे हातीं अनेक आयुधें होतीं. ते दैत्य दिसण्यांत मोठे भयंकर व अति चपल असून त्यांचे आकारही नानाप्रकारचे होते. कोणी कूर्ममुखी, कोणी कुक्कुटमुखी, कोणी शशमुखी, कोणी घुबडतोंडे, कोणी गाढवतोंडे, कोणी उंटतोंडे, कोणी डुकरतोंडे, कोणी मोठे भयासुर सुसरतोंडे, कोणी जंबूकमुखी, कोणी उंदीरतोंडे, कोणी बेडूकतोंडे, कोणी घोर वृकमुखी, कोणी मांजरतोंडे, कोणी गजवक्त्र, कोणी महावक्त्र, कोणी मगरतोंडे, कोणी मेंढतोंडे, कोणी गोमुख, कोणी अजामुख, कोणी अवि[1]मुख, कोणी महिषमुख, कोणी गोधा[2]-मुख, कोणी शल्य[3]मुख, कोणी क्रौंचमुख, कोणी गरुडतोंडे, कोणी गेंडयाच्या तोंडाचे व कोणी मयूरवदन होते. कोणी मोठ्या हत्तींचें कातडें पांघरलें होतें, कोणी मृगचर्म, कोणी चिंध्या व कोणी वल्कलें. कोणी डोक्यावर मुंडासे घातलें होतें, कोणी मुकुट, कोणी किरिट व कोणी कानांत कुंडलें घातलीं होतीं. कोणाच्या शेंडया फारच लांब होत्या, कोणाचे कंठ शंखाप्रमाणें सुरेख होते, व कांहींची कान्तिही फार उज्ज्वल होती. या प्रकारें त्या दैत्यांनीं नानाप्रकारचे वेष घेतले होते. त्यांनीं नानातऱ्हेचीं पुष्पें व उटया लाविल्या होत्या. या प्रकारें सज्ज होऊन व आपआपलीं झळझळीत अस्त्रें हातीं घेऊन ते अनंत राक्षस, आपल्या अलौकिक तेजानें सर्वांस दिपवून टाकून तीन पाउलें घेणाऱ्या, त्या हृषीकेश वामनाच्या भोंवतीं गराडा देऊन उभे राहिले. त्या वेळीं त्या प्रभूनें एकाएकीं विक्राल रूप धारण करून आपल्या पायाच्या लाथा व हाताच्या चडकणा यांनीं ते असंख्यही दैत्य ठार करून तत्काल ही सर्व पृथ्वी आपले ताब्यांत घेतली. तें विक्राल रूप धारण करून परमात्मा पाऊल टाकीत असतां आकाशांतील चंद्र व सूर्य हे त्याच्या स्तनांमधील जागेंत आले; व त्याहूनही अधिक विशाळ रूप करून तो जेव्हां आकाश आक्रमूं लागला, त्या वेळीं तेच चंद्रसूर्य त्याच्या नाभीशीं आले. त्यानंतर त्या अतुलवीर्यशाली विष्णूनें त्याहीपेक्षां अधिक विशाल रूप घेतलें. त्या वेळीं तर हे चंद्रसूर्य त्याच्या गुडघ्यांशींच लागले, असें ब्राह्मणलोक बोलतात. याप्रमाणें सर्व असुरश्रेष्ठांना जिंकून आणि अखिल पृथ्वी आपलीशी करून त्या बलिश्रेष्ठ विष्णूनें स्वर्गाचें राज्य पुनरपि इंद्राचे स्वाधीन केलें. याप्रमाणें तुला परमात्म्याचा वामनरूप अवतार सांगितला. जे मोठमोठे वेदवेत्ते ऋषि आहेत ते त्या श्रीविष्णूचें यश याप्रमाणें गात असतात.

यापुढें भूतात्मा जो श्रीविष्णु याचा दत्तात्रेयसंज्ञक अवतार झाला. या अवतारांत मुख्य गुण क्षमा हा होता. या अवताराचे पूर्वीं वेद लुप्तप्राय झाले होते. वेदक्रिया व यज्ञादिक नष्ट झाले. ब्राह्मणादि चतुर्वर्णांची भेसळ झाली. एकंदरींत सत्यधर्म शिथिल पडून अधर्म वाढूं लागला; सत्य नाहींसें होऊन असत्य जोरावलें; धर्माचा सर्व घोंटाळा उडाला व त्यामुळें प्रजाजन निकृष्ट दशेला येत चालले. असा प्रकार पाहून परमात्म्यानें हा दत्तावतार घेऊन यज्ञक्रियांसहित पुनरपि वेद स्थापन केले. भेसळलेले ब्राह्मणादि चतुर्वर्ण निवडून वेगळे वेगळे केले. याच धीमान् व वरदात्या दत्तात्रेयानें आपला भक्त जो हैहयकुलोत्पन्न राजा कार्तवीर्य त्याला वर दिला कीं, हे निष्पापा, तुला हे दोनच बाहु आहेत परंतु, माझे कृपेनें युद्धसमयीं तुला यांचे बदली एक सहस्र बाहु

---

१ अवि म्ह० मेंढी.

२ हें पाण-घोरपडीला नांव आहे.

३ शल्य म्ह० शाळू नांवाचें एक जनावर.

उत्पन्न होतील. शिवाय, हे राजा कार्तवीर्या, तूं या अखिल वसुंधरेचें पालन करशील—शत्रुगण तुजकडे वर मान करून पाहूं शकणार नाहींत व तूं मोठा धर्मज्ञ होशील. हे जनमेजया, याप्रमाणें हा अद्भुत व सर्वथा शुभलक्षण असा श्रीविष्णूचा दत्तात्रेयसंज्ञक अवतार कथन केला. ( हा अवतार केवळ ज्ञानमार्गस्थापनार्थ होता. ) हें सर्व अवतारवृत्त मीं जसें ऐकलें होतें, तसें मीं तुला सांगितलें.

आतां पुढें भगवंताचा जामदग्न्यसंज्ञक अवतार झाला. या अवतारांत जामदग्न्य रामप्रभूनें सहस्र बाहूंच्या योगानें गर्विष्ठ झालेला व रणांत केवळ अजिंक्य राहिलेला जो राजा सहस्रार्जुन त्याला तो रणभूमीवर आपल्या सैन्याचे मध्यभागीं रथांत उभा असतां खालीं घेऊन धरणीवर पाडून यथास्थित मनास वाटेल तसें बुकलिलें. त्या वेळीं तो सहस्रार्जुन मेघांप्रमाणें महाशब्दानें आक्रोश करूं लागला. तेव्हां परशुरामानें आपल्या हातांतल्या पाजळलेल्या परशूनें त्याचे ते सर्व सहस्रही बाहु व त्याचे साथी सर्व असुर जातभाई यांस तोडून काढून अर्जुनाला ठार मारिलें. मेरु व मंदर या पर्वतांनीं जिला शोभा आली आहे, अशा या पृथ्वीवर कोटों क्षत्रिय पसरले होते. परंतु, या परशुरामानें पुनःपुनः असे एकवीस वेळां पृथ्वीवरील हे सर्वही क्षत्रिय मारून टाकिले. याप्रमाणें ही पृथ्वी निःक्षत्रिय केल्यावर त्या महातपस्वी भार्गवरामानें घडलेल्या हत्येच्या पापशमनार्थ अश्वमेध यज्ञ केला; व त्या यज्ञांत प्रसन्न होऊन परशुरामानें ही सर्वही वसुंधरा दक्षिणेदाखल मरीचिपुत्र जो कश्यप याला दिली. या अश्वमेधांत त्या रथिश्रेष्ठ, यशस्वी व उदार अशा परशुरामानें मोठे चलाख असे समुद्रकांठचे घोडे, रथ, अलोट सुवर्ण, धेनु व उंची उंची हत्ती हेही दान केले. अजूनही[1] तो बुद्धिमान् भृगुपुत्र जामदग्न्य लोकहितार्थ श्रेष्ठ असा जो महेंद्रपर्वत त्यावर एखाद्या देवाप्रमाणें वारंवार उज्ज्वल तप करीत असतो. याप्रमाणें हा सनातन व अविनाशी जो परमात्मा देवेश महाविष्णु त्याचा जामदग्न्यसंज्ञक अवतार तुला सांगितला.

चालू मन्वंतरांतील चोविसाव्या चौकडींतील त्रेतायुगांत कमलविशालनेत्र परमात्मा प्रथम विश्वामित्राला पुढें पाठवून मागोमाग आपलीं चार प्रकारचीं रूपें करून दशरथाचे पोटीं आला. तेथें त्याला लोकांत राम ही संज्ञा प्राप्त झाली. त्याच्या तेजाला केवळ सूर्याचीच उपमा. राक्षसांना मारणें, लोकांचा संतोष करणें, व धर्माची विशेष वाढ करणें, या हेतूनें महायशस्वी परमात्म्यानें हा अवतार घेतला. या नरेंद्र राघवाला ‘ सर्व भूपतींचेंही शरीर ’ असें ज्ञाते म्हणतात. याच रामाला देवशत्रूंचा वध करण्यासाठीं बुद्धिमान् विश्वामित्रानें देवांनाही जीं हातांत धरवत नाहींत असलीं दुर्धर अस्त्रें दिलीं; व ज्या रामानें त्या अस्त्रांच्या साह्यानें नियमशील मुनींच्या यज्ञाला विघ्न आणणारे जे बलाढ्य राक्षस मारीच आणि सुबाहु यांना मारिलें व त्यांचा हेतु विफल केला, त्या रामानें जनकराजाकडे यज्ञ चालला असतां तेथें जाऊन सहज खेळतां खेळतां शिवधनुष्य भंगून टाकिलें. तो अशेष धर्म जाणता व सर्व भूतांचा हितकर्ता प्रभु रामचंद्र लक्ष्मणास बरोबर घेऊन चौदा वर्षेंपर्यंत वनांत राहिला. त्यावेळीं जिला जगांत सीता असें प्रख्यात नांव होतें व जी त्या रामचंद्राची पूर्वींची लक्ष्मी अशी त्याची ती रूपवती स्त्री त्याचे पाठोपाठ चालली. रामानें चौदा वर्षें रानांत राहून घोर तप करून जनस्थाननामक क्षेत्रीं राहात असतां देवांची कामगिरी

[1] ‘ परशुराम ’ हा चिरंजीव आहे.

करून दिली. पाठीशीं लक्ष्मण घेऊन परमात्मा राम सीतेच्या पावलांच्या खुणा शोधीत चालला असतां, मोठे भयंकर पराक्रमी, पुरुषांतील केवळ व्याघ्र, असे जे विराध आणि कबंध नांवांचे राक्षस, जे पूर्वीचे गंधर्व असून शापानें या योनींत आले होते, त्यांना आपल्या इंद्र-वज्राप्रमाणें दृढ, अग्नि, सूर्य किंवा विद्युल्लता यांप्रमाणें ज्यांची चमक असून ज्यांचे पिसारे अग्नीसारख्या लाल, सोन्याच्या वर्खांनीं चित्र-विचित्र केले होते, असल्या बाणांनीं त्यांच्या शरीरापासून वेगळे केले. त्यानें आपल्या सुग्रीव नामक मित्रासाठीं त्याचा वडील भाऊ जो बलाढ्य वानरराजा वाली त्याचा वध केला, आणि सुग्रीवाला राज्याभिषेक केला. पुढें, देव, असुर, यक्ष, गंधर्व, उरग, इत्यादिकांच्या समूहांनाही अवध्य, युद्धांत केवळ अजिंक्य, कोट्यावधी राक्षसांनीं युक्त असलेला, शरीरानें केवळ काजळाचा पर्वतच, व पराक्रमानें व्याघ्रासारखा, त्रैलोक्याला रडवून सोडणारा, वरदानानें चढल्यामुळें देवगणांनाही दुर्निरीक्ष, मोठा घोर, दुर्जय, दुर्धर, गर्वानें फुगलेला, धिप्पाड शरीराचा, एखाद्या ढगाराप्रमाणें शोभणारा, महाबलाढ्य, सर्व राक्षसांचा स्वामी, मोठा गुन्हेगार, कच्च्या निश्चयाचा व युद्धांत दुर्जय, असा जो पुलस्तिपुत्र रावण त्याला या भूतपती रामचंद्रानें हां हां म्हणतां त्याचें सैन्य, बंधु, पुत्र व सचीव यांसह ठार मारिलें, त्याचप्रमाणें मधुनामक राक्षसाचा लवणासुर नामक मोठा उन्मत्त योद्धा पुत्र होता. तो वरदानानें माजलासें पाहून त्या युद्धपटु रामानें त्याला मधुवनांतच पार केलें. याप्रमाणेंच त्यानें दुसरेही अनेक राक्षस मारिले. याप्रमाणें क्षत्रियोचित शौर्याचीं कर्मे करून त्या धर्मिष्ठ रामचंद्रानें अप्रतिबंध असे दहा अश्वमेध विपुल दक्षणा देऊन केले. रामाचें राज्य चालू असतां कोणतीही दुर्वार्ता कानीं आली नाहीं, वारें कधीं प्रतिकूल वाहिलें नाहीं, किंवा कोणाचें द्रव्य चोरीला गेलें नाहीं, कोणाही स्त्रीला वैधव्य प्राप्त होऊन विलाप करण्याची वेळ आली नाहीं, कसलींही अरिष्टें आलीं नाहींत व राज्यांतील सर्व लोक शिस्तीनें वागत असत. कोणाही प्राण्याला जल किंवा वायु यांपासून अपघात झाला नाहीं, किंवा वृद्धांना तरुणांचें प्रेतकार्य करण्याची पाळी आली नाहीं. क्षत्रिय लोक ब्राह्मणांची सेवा करीत, वैश्यलोक क्षत्रियांच्या छंदानें वागत, व शूद्र हे अहंकार सोडून तीनही वर्णांची शुश्रूषा करीत. स्त्रिया कधींही भर्त्यांची अमर्यादा करीत नसत; व पतीही स्त्रियांची पायमल्ली करीत नसत. सर्व जगच दाबांत असल्यानें सर्व पृथ्वींत चोरच उरला नाहीं. रामच सर्वांचें भरण करणारा, रामच सर्वांचा पालनकर्ता, त्याचे राज्यांत लोकांचें आयुष्यमान सहस्र वर्षें, व पुत्रसंततीचें मानही सहस्रसंख्याच. प्राणिमात्राला रोग कसा तो माहीत नव्हता. देव, ऋषि व पितर या सर्वांचा परस्पर एकोपा होता. ज्यांना या पुराण्या गोष्टी पूर्ण माहीत आहेत असले विद्वान् लोक या रामराज्यासंबंधीं अनेक गाणीं गातात. त्या सर्व गाण्यांचें सार रामाचें माहात्म्य वर्णन करण्याकडेच आहे.

राम हा वर्णानें श्याम, वयानें तरुण, नेत्रांत आरक्त, मुखानें देदीप्यमान, मितभाषणी, आजानुबाहु, देखणा, सिंहस्कंध व महाभुज, अशा लक्षणांनीं युक्त असून त्यानें अकरा हजार वर्षेंपर्यंत अयोध्येचा राजा होऊन राज्य केलें. त्या महात्म्याच्या राज्यांत ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांचा घोष, त्याचप्रमाणें धनुष्यांचा ज्याघोष, त्याचप्रमाणें "द्याद्या आणि ध्या खा" हे शब्द कधींच बंद पडले नाहींत. दशरथपुत्र राम हा सत्व-

शील, गुणी, स्वतेजानें चमकणारा किंबहुना चंद्रसूर्याहूनही अधिक तेजस्वी झाला. त्यानें पुण्यप्रद असे शंभर यज्ञ करून त्यांच्या पूर्त्यर्थ विपुल दक्षणा दिल्या. इतकें करून तो रघुकुलोद्भव समर्थ रामचंद्र अयोध्या सोडून स्वर्गास गेला. याप्रमाणें हा इक्ष्वाकुकुलाला आनंद देणारा महाबाहु रामचंद्र रावणाला त्याच्या गणांसह मारून स्वतः स्वर्गास चढला.

वैशंपायन सांगतातः—आतां परमात्म्याचा केशव किंवा कृष्णसंज्ञक अवतार मी सांगतों. हा सर्व लोकांच्या कल्याणाकरितां माथुरनामक कल्पांत झाला. या अवतारांत त्या वीर्यशाली केशवानें शाल्व, मैंद, द्विविद, कंस, अरिष्ट, ऋषभ, केशी, चाणूर, मुष्टिक, इत्यादि राक्षस, कुवलयापीड नांवाचा हत्ती व पूतना नांवाची दैत्यकन्या, आणि याशिवाय मनुष्याचें सोंग घेतलेले अनेक राक्षस मारिले. अद्भुतकर्म करणारा जो बाणासुर त्याचे सहस्रबाहु छेदून टाकिले. युद्धांत नरकासुर व महाबलाढ्य कालयवन[1] यांस चीत केलें. स्वतेजानें राजे लोकांचे संग्रहीं ज्या ज्या उत्तम वस्तु होत्या त्या हिरावून आणिल्या; व जेवढे म्हणून भूतलावर दुराचरणी राजे होते तेवढ्यांचा निःपात केला. अठ्ठाविसाव्या पर्यायांतील द्वापरयुगांत नव्या ( कृष्ण ) अवताराचे वेळीं जातूकर्ण्याला पुढें पाठवून भगवान् विष्णूच व्यासरूपानें अवतीर्ण झाले. या वेळीं त्या महात्म्यानें सत्यवतीचे पोटीं जन्म घेऊन (खुंटलेला) भारतवंश वाढीस लाविला; आणि मूळ एक वेद होता त्याचे चार भाग केले.

हे राजा, याप्रमाणें आतांपर्यंत लोककल्याणार्थ परमात्म्यानें धरलेले मागील सर्व अवतार तुला सांगितले. आतां यापुढें होणारेही तुला सांगतों. प्रभु विष्णु लोककल्याणासाठीं पुनरपि शंभल नामक ग्रामीं विष्णुयशानामक ब्राह्मणाचे पोटीं कलंकी नांवानें दहावा अवतार घेईल. हा अवतार दहाव्या म्हणजे बौद्ध अवताराच्या अखेरीस होऊन यांत याज्ञवल्क्यमुनि हे प्रथम आविर्भूत होतील, आणि नंतर भगवान् बुद्धानें कलियुगांत दांभिक यज्ञप्रवृत्ति होऊन लोकांचा नाश न व्हावा म्हणून केलेली निंदा खरी समजून स्वतः यज्ञांची निंदा करणारे व जगत् हें क्षणोक्षणीं उत्पत्ति व नाश पावणारें आहे असें मत धारण केल्यानें ज्यांना क्षणिकवादी असें नांव पडलें आहे, अशा सर्व बौद्धांशीं वाद करून व त्यांचा वादांत फडशा पाडून स्वतः आपल्या अनुयायांसह गंगायमुनांच्या संगमासन्निध जाऊन तेथें देह ठेवतील. नंतर कलियुगाचा संधिकाल लागेल. या कालांत वाटेल त्यानें वाटेल त्याची स्त्री बळकवावी, असा भ्रष्टाकार झाल्यामुळें शुद्ध कुळी सर्वथा बुडून जाईल. राजे आपआपलें सैन्य व सचिव यांसह नाश पावतील. प्रजांना नियंता नसल्यामुळें प्रजाजन एकमेकांवर उठून एकमेकांचा प्राणघात करितील, व परस्परांचा द्रव्यापहार करून परस्पर अत्यंत दुःखशोकाला कारण होतील. असा प्रकार येऊन ठेपला म्हणजे सर्व प्रजा दुःखमय होऊन कलियुगासहवर्तमान नाश पावेल.

या प्रकारें कलियुग नष्ट झालें कीं, आपोआप हिशोबानेंच कृतयुगाचा उदय होईल. त्याला निराळा प्रयत्न नको. असो; या प्रकारें हे व असलेच दैवी अंशानें युक्त असे परमात्म्याचे अनेक अवतार ज्ञात्यांनीं पुराणांतून वर्णिले आहेत. बाकी हें अवतारकथन इतकें अवघड आहे कीं, मोठमोठे देव देखील मूढ होऊन जातात; व या अवतारांचें वर्णन व्हावें म्हणूनच वेदापासून पुराणापर्यंत हे अनेक ग्रंथ

---

१ यास कृष्णानें स्वतः न मारितां मुचकुंदाकडून युक्तीनें मारविलें.

प्रवृत्त झाले आहेत. परमात्मा सर्वलोकगुरु याचें यश प्राणिमात्रानें कथन करावें असेंच मोहक असल्यामुळें मीं तें यथाशक्ति केवळ संक्षेप रूपानें तुला सांगितलें आहे. जो कोणी या अतुल वीर्यशाली परमात्म्याचें हें अवतार-कथन बद्धांजली होऊन प्रेमपुरःसर ऐकेल त्याचे पितर तृप्त होतील. हे अवतार ह्मणजे योगेश्वर जो भगवान् यानें योगमायेचा आश्रय करून दाखविलेल्या लीला होत. ( वस्तुतः त्याला यांचा लेप नाहीं. ) या लीलांच्या श्रवणानें मनुष्यावर भगवंताचा प्रसाद होऊन त्याला धार्मिक व लौकिक समृद्धि व नाना-प्रकारचे विपुल भोग प्राप्त होतील.

## अध्याय बेचाळिसावा.

—:०:—

### विष्णूचें ईश्वरत्वकथन.

वैशंपायन सांगतातः—हे जनमेजया, भगवान् विष्णु याला त्याच्या अभयदातृत्वामुळें विश्व[1] अशी संज्ञा आहे; तो जनांचें दुरितदुःख हरण करितो ह्मणून त्याला कृतयुगांत हरि असें ह्मटलें आहे. त्याच्या अकुंठित सामर्थ्या-वरून देवमंडळींत त्याला वैकुंठ असें नांव आहे. मनुष्यांत त्याला कृष्ण असें ह्मणतात; व त्याच्या निग्रहानुग्रहसामर्थ्यावरून त्याला ईश्वर असेंही ह्मणतात. या प्रकारें भगवंताच्या नानारूपी कर्मांवरून त्याला भिन्न भिन्न नांवें पडलीं आहेत. अशा त्या बहुरूपी परमेश्व-राच्या गहन लीलांची भूत व भविष्यकालाची गति मी जशीच्या तशीच तुला सांगतों, ती श्रवण कर. या लीला ऐकतांना तुझे असें ध्यानांत येईल कीं, हा अनंतात्मा नारायण प्रभु जरी वास्तविक अव्यक्त आहे तरीही या लीलांसाठीं त्यानें मत्स्यादि व्यक्त शरीरांचा आश्रय केला. हा नारायण सर्व सृष्टीचा उगम असून स्वतः अविनाशी आहे. कृतयुगांत हाच जगत्स्रष्टा नारायण हरिसंज्ञेनें प्रख्यात झाला. हाच ब्रह्मा, शक्र, सोम, धर्म, शुक्र व बृहस्पतिही झाला. हाच यदुकुलानंद पर-मात्मा अदितीचें पुत्रत्व स्वीकारून इंद्राचा धाकटा बंधु किंवा उपेन्द्र झाला. हा सर्व-शक्तिमान् परमात्मा विष्णु अदितीचे पोटीं पुत्ररूपानें आला. हा केवळ त्याचा प्रसादच म्हणावयाचा. कारण, हा जन्म घेण्यांत त्याचा हेतु देवांचे वैरी जे दैत्य[1] तसेच दानवें आणि राक्षस त्यांचा वध करून देवांस सुखी करणें हाच होता. ह्याच मायावी परमात्म्यानें त्रिगुणात्मक मायेचा आश्रय करून पुरातन-कालीं ब्रह्मदेव निर्माण केला. याच आदि-पुरुषानें प्रथम कल्पांत मरीच्यादि प्रजापति निर्माण केले. मग या मरीचिकश्यपादि प्रजापतींनीं आपली संतति वाढवून उत्तम उत्तम अशीं अनेक ब्राह्मणांचीं गोत्रें निर्माण केलीं. या गोत्रांत निर्माण झालेले जे महात्मे ऋषि त्यांचे योगानें मूळ एकरूप असलेल्या वेदाचे अनेक शाखाभेद केले. बाबारे, या विष्णूची लीला केवळ अद्भुतरूप असून याचें यश सर्वथा गाण्यासारखेंच आहे; व ज्याला साधेल त्यानें हें यश लोकांस सांगतच रहावें असें आहे. याकरितां मी तें कथन करितों तें ऐक.

हे बाबारे, वृत्रासुराचा वध होऊन कृतयुग[2] चालू असतां त्रैलोक्यविख्यात असें तारका-

[1] विशेषेणश्वसिति ( अभयं प्राप्य ) जनो यस्मात्.

[1] दितीचे पुत्र ते दैत्य व 'दनू' पासून झाले ते दानव.

[2] वृत्रासुरयुद्ध त्रेतायुगांत झालें. ( भा०, स्कं० ६, अ० १०।१६ ) असें असतां येथें कृतयुग चालू असल्याचें कसें लिहिलें आहे कळत नाहीं. कदाचित् प्रत्येक महा-युगाचे पोटांत कृतादि चतुर् युगें असतात, ही कल्पना धरिल्यास संगति लागते.

सुराशीं युद्ध झालें. या तारकयुद्धांत युद्धाविषयीं गर्व वाहाणारे असे मोठमोठे भयंकर दैत्य यांनीं यक्ष, उरग, राक्षस, यांसह देवमंडळीची मोठी कत्तल मांडिली. त्यावेळीं त्यांची युद्धसामग्री बहुतेक संपत येऊन ते युद्धाविषयीं पराङ्मुख होऊन आपला वाली जो परमात्मा हरि नारायण त्याला मनोभावानें शरण गेले. याच समयीं असा चमत्कार झाला कीं, मेघ हे सूर्य, चंद्र व इतर ग्रह यांसह आकाश आच्छादून टाकून निखाऱ्यांचा पाऊस पाडूं लागले; व चमचमणाऱ्या विजांनीं व्यापलेले आणि भयंकर कडकडाट करणारे असले ते मेघ एकमेकांवर आदळूं लागले. तशांत मेघमंडळीची खळबळ उडवून देणारे प्रवाहादि सप्तवायु वाहूं लागले. वज्राच्या वेगामुळें उठलेले जे वायु त्यांच्या तडाक्यानें व्याकुल होऊन व विद्युत्पातामुळें तापून गेलेल्या पाण्याच्या योगानें आणि भयंकर उल्कापातांनीं पेटून गेलेलें आकाश जणूं घाबरून ओरडूं लागलें. हजारों उल्कापात होऊं लागले. व वारंवार आकाशांतून चालणारीं विमानेंही उलथीं पालथीं होऊं लागलीं; व कधीं खालीं पडूं लागलीं; आणि कधीं अधिकच वर उसळूं लागलीं. चार युगांच्या अखेरीस प्रलयकाल सुरू झाला असतां ज्या प्रकारचीं लोकांना भय देणारीं चिन्हें उत्पन्न होतात, त्याच प्रकारचीं या उत्पातसमयीं सर्व चिन्हें दिसूं लागलीं. सर्वत्र अंधारमय होऊन कशाची प्रभा मिळून दिसेना व कोणतीही वस्तु न्याहाळेना; व दाही दिशा अंधकाराच्या पुंजानें व्यापून गेल्यामुळें त्यांचा प्रकाश उमटेना. फार काय सांगावें, अत्यंत घोर अशा अंधकारापुढें सूर्याचें देखील तेज पडेना व त्यामुळें अर्थातच द्यौ ( आकाश ) ही काळमेघाचें पांघरूण घेऊन अमावास्येची प्रत्यक्ष मूर्तिमंत रात्रच कीं काय अशी भासत होती. अशा त्या अंधकारानें व्याप्त झालेल्या मेघपुंजांना आपल्या उभय हातांनीं दूर सारून भगवान् हरि परमात्मा यानें आपली श्यामसुंदर दिव्य मूर्ति प्रकट केली. त्या मूर्तीचा वर्ण सजल मेघासारखा नील व तीवरील केशही नीलवर्ण. याप्रमाणें एकंदर शरीर व त्यावरील कान्ति हीं उभय कृष्णवर्ण असल्यामुळें कृष्ण परमात्म्याला पाहून नीलपर्वताचा भास होत असे. कटीभोंवतीं झळाळीत पीतवर्णी पीतांबर[1] होता. आगीसारख्या लाल सोन्याचे दागिने अंगावर होते; व शरीराचा मूलवर्ण धूसर असल्यामुळें धूम्रानें व्याप्त असा प्रलयाग्नीच उठला आहे काय असें भासे. त्याला पुष्ट असे आठ खांदे होते. त्याचे मस्तकावरील केश किरीटाखालीं झांकले होते. सोन्याच्या ज्यांना मुठी आहेत अशीं आयुधें हातांत धरिल्यानें त्याला अधिक शोभा आली होती, व चंद्रसूर्यांच्या किरणानें चमकणाऱ्या गिरिशिखराप्रमाणें अचल असें नंदक नांवाचें खड्ग हातीं घेतल्यानें त्याला आनंद होत असे व तें खड्ग मनःशिला नामक धातूच्या वर्णाच्या कमरपट्ट्यांत अडकविलेलें असे. त्याच्या भात्यांत बाणरूपी सर्प भरून राहिले होते, व त्यानें हातांत शक्ति, वज्र, हल, शंख, चक्र व गदा, हीं आयुधें धारण केलीं होतीं. त्या विष्णुरूप पर्वताचें क्षमा म्हणजे पृथ्वी हें मूळ असून त्यावर श्री म्हणजे लक्ष्मीरूपी वृक्ष होता, किंवा जो साक्षात् लक्ष्मीचा म्हणजे शोभेचा वृक्षच होता. अशा त्या परमेश्वराच्या हातांत शार्ङ्ग धनुष्य असून हरिद्वर्णाचे अश्व ज्याला जोडिले आहेत, ज्याच्यावर गरुडाच्या आकृतीचा ध्वज फडकतो आहे, चंद्र व सूर्य हीं ज्याचीं शोभिवंत चाकें आहेत, मंदर पर्वत

१ पीतांबर याचा मुख्यार्थ पिंवळें वस्त्र असा आहे, तथापि, रूढीमध्यें तो बदलून तिळाचें तेल या न्यायानें पिंवळा पितांबर असा प्रयोग सह्य झाला आहे.

हा ज्याच्या दोन चाकांमधील आंस आहे, अनंत नामक सर्प हाच ज्याच्या रथाच्या दोऱ्या आहेत, मेरु पर्वत हा ज्याचा तुंबा आहे, आकाशांतील तारागण हेच ज्याच्या रथाच्या टपावर जडविलेलीं चित्रविचित्र नक्षीचीं फुलें; व ग्रहनक्षत्रें हेच ज्याला ठिकठिकाणीं घातलेले टांके आहेत, अशा त्या विश्वमय रथांत बसलेली परमात्म्याची भीताला अभय देणारी मूर्ति त्या दैत्यांपासून पराजय पावलेल्या देवगणांनीं पाहिली. तेव्हां ते सर्व देव इंद्राला पुढें करून हात जोडून व जयजय शब्द उच्चारून त्या शरणागताला अभय देणाऱ्या देवास शरण गेले. मग त्यांची ती दीनवाणी विनवणी ऐकून परमात्म्या विष्णूला दया आली; आणि घोर संग्राम करून देवमंडळीला त्रास देणाऱ्या दानवांचा निःपात करण्याचा निश्चय त्यानें केला. त्या पुरुषोत्तम विष्णूनें अत्युच्च अशा आकाशांतूनच त्या सर्वही देवांना प्रतिज्ञापूर्वक असें सांगितलें कीं, हे मरुद्गणहो, देव तुमचें कल्याण करो. तुम्ही भिऊं नका, स्वस्थ व्हा. मी सर्व दानव मारिलेच समजा; आणि तुम्ही हें त्रैलोक्याचें राज्य आपलें परत घ्या. याप्रमाणें त्या कधींही अनृत न बोलणाऱ्या श्रीविष्णूच्या मुखांतून त्यांना जेव्हां आश्वासन मिळालें तेव्हां ते सर्वही संतुष्ट होऊन त्या सर्वांच्या मनाला असला पराकाष्ठेचा आनंद झाला कीं, तसला आनंद पूर्वीं समुद्रांतून त्यांना ज्या वेळीं अमृत प्राप्त झालें होतें त्या वेळीं मात्र झाला होता.

भगवंतांनीं असें आश्वासन देतांच सर्वभर माजून राहिलेला काळोख संपुष्टांत आला. ढग कोठच्या कोठें नाहींसे झाले; मंगल असे वारे सुटले, दाही दिशा प्रसन्न दिसूं लागल्या, सर्व नक्षत्रें तेजास चढून चंद्राभोंवतीं प्रदक्षिणा घालूं लागलीं, त्याचप्रमाणें शनिशुक्रादि सर्व ग्रहगण दीप्तिमान् होऊन सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा घालूं लागले. ग्रहाग्रहांचा विरोध बंद पडला. नद्यांचीं उदकें स्वच्छ दिसूं लागलीं, देवयान पितृयान व मोक्षयान हे तीनही मार्ग रजोरहित होऊन स्वच्छ दिसूं लागले, नद्यांचे ओघ सरळपणें वाहूं लागले, क्षुब्ध झालेले समुद्र पूर्ववत् झाले, मनुष्यांचीं आंतरिंद्रियें शुभेच्छेनें प्रेरित झालीं. मोठमोठ्या ऋषींची चिंता दूर झाल्यानें ते उच्च सवनावर वेद म्हणूं लागले. यज्ञयाग सुरू होऊन त्यांत अग्नीला मिष्ट व पवित्र असा हविर्भाग मिळूं लागला. सारांश, हे राजा, देवाधिदेव जो सत्यप्रतिज्ञ विष्णु त्याची शत्रुवधाविषयींची निश्चित वाणी कानीं पडतांच सर्व लोकांना फार प्रेम वाटून चित्तांत अत्यानंद झाला, व सहजच सर्व लोक सुरळीतपणें आपआपल्या धर्माचें सेवन करूं लागले.

## अध्याय त्रेचाळिसावा.

—:०:—

### दैत्यसेनावर्णन.

वैशंपायन सांगतातः—प्रत्यक्ष श्रीविष्णु आपला वध करणार ही भयंकर बातमी ज्या वेळीं दैत्यदानवांच्या कानीं गेली त्या वेळीं त्यांनीं युद्धाविषयींची जंगी तयारी चालविली. कारण, युद्धांत पराजय व्हावा हें त्यांना आवडत नव्हतें. मयनामक असुर एका कांचनमय रथावर चढला. हा रथ कधींही न मोडेल इतका भक्कम होता. याच्या गर्भातील क्षेत्र चारशें हात होतें, याला चार चाकें होतीं. पाण्यांतून, आगींतून, समविषम भूभागांतूनही हा न अडखळतां धांवत जात असे. यावर मोठमोठालीं निवडक आयुधें सुव्यवस्थित भरून ठेविलीं होतीं. क्षुद्र घंटांच्या जाळ्या सभोंवार लावल्या असल्यामुळें तो रथ चालूं लागला

असतां त्यांचा मोठा घणघणाट उठे. तो व्याघ्र-चर्मानें सुशोभित केला असून रत्नांच्या व सुवर्णाच्या जाळांनीं खचला असल्यामुळें फारच सुशोभित दिसे. त्याचा आंसही फार खबरदार होता. त्या काळचे जे नामांकित रथ होते त्यांत हा श्रेष्ठ होता. हा केवळ पर्वतप्राय दिसत असे. यांत मुख्य रथिखेरीज-करून इतर लोक बसण्यासाठीं केलेल्या जागा ( ज्यांस संस्कृत भाषेंत उपस्थान असें म्हणतात ) त्याही फार सोईच्या बनविल्या होत्या. त्या रथावर हरीण, लांडगे, वगैरे पशु व अनेक तऱ्हेचे पक्षी यांचीं चित्रें बसविलीं होतीं. दिव्यास्त्रांनीं भरलेले असे भाते त्यांत ठेविलेले होते. त्याचा गडगडाट केवळ मेघांच्या गडगडाटाप्रमाणें असे. त्यांत गदा आणि परिघ हीं आयुधें भरपूर ठेविलीं होतीं. त्याचा अफाटपणा पाहून मूर्तिमंत समुद्राचा भास होत असे. त्याचे सांधे सोनेरी कड्यांनीं आंवळले होते. त्याच्या चाकांचे तुंबेही सोनेरीच होते. त्याजवर उंच उंच ध्वज व पताका फडकत असल्यामुळें शिरोभागीं सूर्यमंडल धारण करणाऱ्या मंदराचलाचा भास होत असे. धिप्पाड हत्ती किंवा नीलमेघ याप्रमाणें तो भव्य दिसे. त्याच्या अति चपल वेगामुळें सिंहाचें साम्य दिसे. त्यावर अनेक अस्वल ठेविले होते. हजारों मेघांच्या गर्जनेप्रमाणें त्याचा घडघडाट असे. तो केवळ आगीच्या लोळाप्रमाणें दिसे. त्या दिव्य रथाची गति आकाशांतही असून शत्रूच्या रथाचा तो चुराडा करून टाकणारा होता. असो; अशा त्या रथावर अंशुमाली सूर्य जसा मेरुपर्वतावर चढतो त्याप्रमाणें तो रणोत्सुक मयासुर चढला.

तारकासुरानेंही तसलाच जंगी रथ आणिला होता. तो सर्वच लोखंडाचा होता. त्याचा विस्तार कोसभर होता. त्याच्या ध्वजावर कावळे बसविले होते. त्याला ठिकठिकाणीं लहान लहान मेघडंबऱ्या उचलून दिल्या असल्यामुळें लहान टेंकड्यांनीं भरून गेलेल्या पर्वताप्रमाणें तो दिसे. तो लोहमय असल्यानें त्याच्या कृष्णवर्णावरून काजळाच्या ढिगाप्रमाणें दिसे. त्याला पोलादाचीं केलेलीं आठ चाकें होतीं. त्याचे दांडे व तुंबेही लोखंडाचे होते. पेटलेल्या कोळशाप्रमाणें त्याचें तेज होतें. गर्जणाऱ्या मेघाप्रमाणें त्याचा आवाज होता. त्याला लोखंडी जाळ्यांचे झरोके चौफेर बसविले होते. त्यांत लोखंडी परिघ, फेंकण्याचीं अश्मयंत्रें, प्रास, तोमर, मुद्गर, शत्रूला भीति देणारे परशु व एकमेक गुंफलेले असे विस्तीर्ण पाश, इत्यादि सामुग्री भरपूर ठेविली होती. शत्रूंवर चाल करून जाण्यासाठीं दुसरा मंदर पर्वतच उठला आहे कीं काय असा ज्याला पाहून भास होत होता, व ज्याला हजार गाढव जोडिले होते अशा उत्कृष्ट रथावर तो तारकासुर बसला. तिसरा विरोचन हा रागानें खवळून जाऊन व हातीं गदा घेऊन, चमकणाऱ्या शिखराप्रमाणें त्या तारकसैन्याच्या अग्रभागीं उभा राहिला. चौथा हयग्रीव दानव यानें आपला रथ हजार घोड्यांनीं चालविला होता. हा हयग्रीव शत्रूंचीं सैन्येंचीं सैन्यें उध्वस्त करण्याइतका पराक्रमी होता. पांचवा वराह दानव. हा अनेक सहस्र दोऱ्या लाविलेलें व अत्यंत दीर्घ असें धनुष्य ओढीत एखाद्या पारंब्या सुटलेल्या वटवृक्षाप्रमाणें सैन्याच्या तोंडावर उभा राहिला. सहावा खर नामक दानव हा तर युद्धाविषयीं इतका हुटहुटून गेला होता कीं, त्याच्या देहांत तो तेख मावेनासा होऊन त्याचे दांतओंठ फुरफुरूं लागले, व संतापानें त्याची मस्ती अश्रूंच्या रूपानें डोळ्यांतून घळघळ वाहूं लागली. सातवा दानव त्वष्टा. हा अठरा घोडे जोडलेल्या रथांत बसून मोठ्या नेटानें दानवांच्या

गराडयांतून सैन्याच्या रचलेल्या व्यूहांतून फिरत होता. आठवा विप्रचित्ति दानवाचा पुत्र श्वेत हा श्वेतकुंडलें अंगावर घालून एखाद्या श्वेतपर्वताप्रमाणें शोभायमान् दिसणारा युद्धासाठीं सामोरा उभा राहिला. बलीचा पुत्र अरिष्ट हा मेहनत केलेला श्रेष्ठ वीर हातांत पर्वतावरील पाषाणांचीं आयुधें घेऊन युद्धार्थ उभा राहिला. त्या वेळीं तोही पर्वतासारखा दिसत होता. दहावा किशोर दानव. हा तर युद्धासाठीं इतका खुलखुलला होता कीं, तो एखाद्या शिंगराप्रमाणें थयथय नाचूं लागला, आणि दैत्यसैन्याच्या मध्यभागीं जाऊन उभा राहिला. त्या वेळीं उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें तो शोभूं लागला. अकरावा लंब. ह्याची कांति पाण्यानें ओथंबलेल्या मेघाप्रमाणें असून याच्या अंगावरील वस्त्रें व भूषणें हीं लांबचलांब शोभत होतीं. असा हा लंब दैत्यांच्या सैन्य-व्यूहांत जाऊन उभा राहिला असतां कंकणग्रहणसमयीं राहूच्या जाबडयांत सांपडलेल्या सूर्याप्रमाणें दिसूं लागला. महाग्रह जो स्वर्भानु म्हणजे राहु हा हंसतच दैत्यसैन्याच्या अघाडीस उभा राहिला. दांत, ओंठ, नेत्र व मुख हींच याचीं युद्धांतील आयुधें होतीं. असला हा विलक्षण होता.

या वर सांगितलेल्या ठळक ठळक दानवांशिवाय दुसरे असंख्य दानव होते. त्यांतील कित्येक घोड्यांवर बसले होते. कित्येक हत्तींच्या खांद्यावर, कित्येक सिंहांवर, कित्येक व्याघ्रांवर, कोणी डुकरांवर तर कोणी अस्वलांवर, कोणी गाढवांवर तर कोणी उंटांवर व कोणी तर मेघांवर स्वार होऊन चालले होते. कांहींनीं मोठमोठ्या पक्ष्यांच्या[1] पाठीवर स्वाऱ्या ठेविल्या होत्या; व कांहींनीं तर वायूचेंच वाहन केलें होतें, हा रिसाला झाला. याशिवाय पायदळ तर वेगळेंच होतें. त्या पायदळांत कसले कसले भ्यासूर व वेडेवांकड्या तोंडांचे दैत्य होते. कोणाला एकच पाय होता तर कोणाला दोन्हीही होते; व युद्धाविषयीं उत्सुक होऊन ते नंदिबैलाप्रमाणें डरकाळ्या फोडीत होते. मस्तींत आलेल्या व्याघ्राप्रमाणें गर्जना करणाऱ्या त्या दानवश्रेष्ठांनीं सारखा कोलाहल माजविला होता; व त्यांतील कित्येक जण खणाखण दंड ठोकीत होते. अडसरासारखे लांबच लांब ज्यांचे बाहू आहेत असले ते दैत्य गदा, परिघ वगैरे उग्रायुधें हातांत घेऊन, आणि धनुष्याला ताण देदेऊन आपल्या प्रतिपक्ष्यांकडील देवतांना भय देऊं लागले. याशिवाय कित्येकांनीं आपले हातांत प्रास, कोणी पाश, कोणी खड्ग, कोणी तोमर, कोणी अंकुश, कोणी पट्टिश, कोणी शतघ्नी, कोणी शतधारांचे मुद्गर, कोणी गंडशैल, कोणी शैल, कोणी परिघ, कोणी चक्रें, इत्यादि अनेक प्रकारचीं आयुधें हातीं घेऊन व त्यांशीं सहज मजेनें खेळून सर्व दानवसैन्यांत आनंदी आनंद करून सोडला.

याप्रमाणें हें दानवांचें सर्वही सैन्य युद्धाविषयीं बळकट उत्कंठित होऊन सूर्यापुढें चालत जाणाऱ्या मेघमंडलाप्रमाणें देवसमूहासमोर तोंड देऊन उभें राहिलें. हजारों हजार दैत्यांनीं खचलेलें व वायु, अग्नि, जल, मेघ आणि पर्वत यांप्रमाणें भासणारें तें अद्भुत सैन्य सर्वांच्याही अंगांत त्या रणप्रवाहांत घुसण्याचा आवेश संचारल्यामुळें युद्धलालसेनें केवळ वेडें होऊन गेलेलें दिसत होतें.

---

१ ही गोष्ट असंभाव्य नव्हे. आजकालही शहामृग व त्याच्या वर्गातील कित्येक पक्षी हे मनुष्याला पाठीवर सहज वाहूं शकतात.

# अध्याय चवेचाळिसावा.

—:०:—

## देवसेनावर्णन.

वैशंपायन सांगतातः—बा जनमेजया, तूं या संग्रामांत दैत्यांच्या बाजूला सैन्याचा विस्तार कसा होता तें ऐकलेंस. आतां विष्णु-पक्षाच्या म्हणजे देवांच्या एकंदर सैन्याचा विस्तार कसा होता तो ऐक. आदित्य, वसु, रुद्र, तसेंच महाबलाढ्य अश्विनीकुमार हे सर्वही आपआपले हाताखालचीं सैन्यें व आपले अनुयायी यांसह बंदोबस्तानें सज्ज होऊन राहिले. लोकपाल व सर्व देवांचा अग्रणी जो सहस्रनेत्र इंद्र तो ऐरावतावर बसून सर्व सैन्याच्या अघाडीस उभा राहिला. त्याचे डावे बाजूस गरुडाप्रमाणें वेगवान्, सुंदर चक्रांनीं युक्त, सुवर्ण आणि हिरे यांनीं शोभिवंत केलेला असा रथ तयार ठेविला होता. त्या देवेंद्रामागून देव, गंधर्व, यक्ष यांचे थवेच्या थवे चालले होते, व तेजस्वी सदस्य आणि ब्रह्मर्षि त्याची स्तुति गात होते. वज्राचे आघातानें उदय पावलेल्या विद्युल्लतारूप आयुधानें युक्त अशा स्वैर-संचारी पर्वताप्रमाणें दिसणाऱ्या मेघांनीं भोंवतालीं कोट करून त्या इंद्राचें रक्षण केलें होतें. अशा बंदोबस्तांत भगवान् इंद्र, ज्याची स्तुति सोमयज्ञकालीं ब्राह्मणलोक यज्ञमंडपांत गातात, असा तो ऐरावतावर बसून चालला. याप्रमाणें तुताऱ्या वगैरे रणवाद्यांच्या घोषांत ज्या वेळीं इंद्राची स्वारी स्वर्गांतून चालली त्यावेळीं शेंकडों अप्सरांचे ताफे स्वारीपुढें नाचूं लागले. त्या इंद्राच्या रथावर ज्याला दांड्याला वेळूची काठी आहे असा ध्वज लाविला असून, त्याला वायुवेगानें किंवा मनोवेगानें पळणारे घोडे जोडिले होते व मातली त्यावर सारथी बसला होता. त्या वेळीं तो रथ पाहून सहस्रकिरण रवीची किंवा रविकिरणांनीं सर्वथा व्याप्त झालेल्या मेरु पर्वताची आठवण होते असे. यम हा आपला दंड आणि कालस्वरूपी मुद्गर उगारून आपल्या हबकणीनें दैत्यगणांस दरडवीत देवसैन्यांत उभा राहिला. त्यापुढें देवसैन्याच्या मध्यभागींच पाशधारी वरुण उभा होता, त्याचे रक्षणार्थ त्याचे भोंवतीं चार समुद्र व वारंवार जिभल्या चाटणारे मोठमोठे सर्प होते. त्याचें शरीर जलमय असून त्याचे हातांत शंख व मुक्तामय बाहुभूषणें होतीं. तो हातामध्यें कालपाश घेऊन चंद्रकिरणाप्रमाणें धवल अशा अश्वांशीं व वायूनें उसळविलेल्या जलतरंगांशीं नानाप्रकारचे खेळ खेळत होता. त्याच्या अंगावर पांढरें घवघवीत आणि मलमलीहूनही पातळ असें वस्त्र होतें. पोंवळ्यांच्या वेलींचीं रमणीय अशीं कडीं त्याच्या हातांत होतीं व पाचूप्रमाणें त्याची शरीरकान्ति असून त्याच्या उदरावर हारांचें ओझेंच लोंबत होतें. अशा रीतीनें तो वरुण मर्यादेबाहेर वाढलेल्या समुद्राप्रमाणें युद्धोत्कंठेनें उचंबळून चालला होता. कुबेरही त्या युद्धांत हजर होता. त्याजबरोबर यक्षराक्षसांचीं सैन्यें व गुह्यकांचे गण होते. त्याचें शरीर अतिशय सुंदर असून त्यावर पाचूचें तेज होतें. त्याचें विमान मनुष्यें ओढीत होतीं. तो देवांचा खजिनदार असल्यामुळें शंख व पद्म या नांवांचे दोन निधी मूर्तिमंत त्याजबरोबर होते. त्याला राजराजेश्वर अशी संज्ञा होती. अर्थातच त्याचेजवळ अलोट संपत्ति होती, व तो सर्वांना द्रव्य पुरविणारा असल्यामुळें त्याला धनद असें म्हणत. त्याला विमानांतून युद्ध करण्याची हौस होती. यामुळें तो पुष्पक नामक विमानांत बसून तें मनुष्यांच्या खांद्यांवर देऊन त्या युद्धभूमीवर उभा होता. तो शंकराचा प्रिय मित्र असून स्वतःही शंकराप्रमाणेंच शोभिवंत असल्यामुळें त्या राजराजाकडे सर्वांचेही डोळे वेधून राहिले होते.

याप्रमाणें देवसैन्याच्या चार बाजूंना बलाढ्य असे हे चौघे लोकपाल आपआपली नेमलेली दिशा धरून रक्षणार्थ उभे होते. म्हणजे पूर्वेकडील बाजू इंद्रानें संभाळिली होती, दक्षिणेकडील यमानें, वरुणानें पश्चिमेकडील व उत्तरेकडील कुबेरानें. त्याशिवाय दिनराज सूर्य हा मेरु पर्वताच्या भोंवतीं फिरणाऱ्या आपल्या सात घोडे जोडलेल्या व तेजानें जळतोच कीं काय अशा उज्ज्वल किरणमय आकाशस्थ रथांत बसून आलातचक्राप्रमाणें स्वर्गप्रदेशांत गिरक्या घेत व सर्व लोकांना सतत प्रकाशमान् करीत आपल्या सहस्रकिरणमय तेजांनीं चमकत चमकत द्वादश स्वरूपांनीं देवमंडळींतून फिरत होता. शुभ्र अश्व जोडलेल्या रथांत बसून आपल्या शीतल व जलमय किरणांनीं जगताला आनंदवीत भगवान् शीतरश्मी म्हणजे चंद्रही तेथें आला होता. याचे भोंवतीं नक्षत्रांचा परिवार होता. हा शीतकिरण चंद्र म्हणजे ब्राह्मणांचें मुख्य दैवत; ग्रहणसमयीं पृथ्वीची छाया स्वदेहावर धारण करणारा, रात्रीसंबंधीं अंधःकाराचा क्षय करणारा, आकाशस्थ ज्योतींमध्यें प्रधान, सर्व रसांना प्राणभूत, सर्व औषधींचा मालक आणि रक्षणकर्ता, अमृताचें निधान, या अग्निसोमात्मक जगतांतील प्रथम म्हणजे अन्नात्मक अंश, अर्थातच रसमय, व हिमरूपी शस्त्र धारण करणारा (थंडीनें मारणारा), अशा त्या शीतमय चंद्राकडे दानव मंडळी विशेष रोखून पाहात होती.[१] जो सर्व भूतांचा प्राण, जो मनुष्यदेहामध्यें प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान या पांच रूपांनीं विभक्त आहे; जो सप्तरूपभेदानें या त्रैलोक्यांतील चराचराचें पालन करितो, ज्याला अग्नीचा सारथी असें म्हणतात, जो सर्वांचा उद्भव व ईश्वर आहे, सप्तस्वरात्मक जें गायन तें ज्याचें उत्पत्तिस्थान म्हटलें आहे, ज्याला महाभूतांतील उत्तम भूत असें म्हणतात, ज्याला अमूर्त असेंही म्हणतात, ज्याची गति फार शीघ्र असून ज्याची उत्पत्ति आकाशापासून असून ज्याला मातरिश्वा म्हणजे आपल्या उत्पत्तिस्थानाचे (आकाशाचे) ठिकाणींच चलन पावणारा असें म्हणतात, असा तो सर्व भूतांचा प्राणभूत वायु पर्जन्याला साथ घेऊन आपल्या अंगांतील सर्व बल प्रकट करून मोठ्या सोसाट्यानें दैत्यमंडळीला प्रतिकूल दिशेनें वाहून बेजार करूं लागला. याशिवाय विद्याधरांना बरोबर घेऊन देव, गंधर्व व मरुद्गण हे कांत टाकलेल्या सर्पाप्रमाणें जाज्वल्य अशा तरवारींच्या फेंका करीत होते, व मोठमोठाले सर्प देवमंडळीच्या हातीं बाणरूप होऊन आपलीं तोंडें पसरून रागानें तीव्र विष ओकीत ओकीत आकाशांतून इतस्ततः संचरत होते. पर्वतही आपलीं शिलामय शिखरें व आपल्या अंगावरील सहस्रावधि शाखांनीं विस्तारिलेले वृक्ष यांस बरोबर घेऊन दानवसैन्यावर हल्ला करण्यासाठीं देवपुढ्याला येऊन मिळाले. आकाशांत संचार करणाऱ्या पक्षिगणांत श्रेष्ठ असा जो अरुणाचा धाकटा भाऊ गरुड त्यावर स्वयंप्रकाश असा लक्ष्मीपति श्रीहरि बसून त्या समरांगणांत स्वतः उभा होता. हे जनमेजया, या श्रीहरीचें वर्णन तुला किती म्हणून सांगूं? याला हृषीकेश असें म्हणतात; कारण तो इंद्रियांचा स्वामी आहे. त्याला पद्मनाभ असें म्हणतात; कारण याच्या नाभीच्या ठिकाणीं कमल आहे. याला त्रिविक्रम म्हणतात; कारण यानें तीन पावलांत वामनावतारीं त्रिभुवन व्यापलें. याला

१ याचें कारण चंद्र हाही एके दृष्टीनें दानवांत धरिला आहे. ज्योतिषांतही क्षीण चंद्र पापग्रह व पूर्णचंद्र पुण्यग्रह, असा उभयात्मक मानिला आहे. तेव्हां चंद्र हा दानव अर्थात् आपले जातीचा असून देवांत मिसळला म्हणून दानवांचा त्याजवर रोष.

प्रलयकालचा अग्नीही म्हणतात; निखिल विश्वाचा प्रभूही म्हणतात; जो मधुसूदनरूपानें समुद्रांतून आल्यानें ज्याला समुद्रयोनि असें म्हणतात. त्यानें मधु नामक दैत्याला मारिलें म्हणून मधुरिपु म्हणतात. यज्ञांतील हविर्भागाचा तो भोक्ता असल्यामुळें त्याला हविर्भुक् असें म्हणतात. यज्ञांत याचा सन्मान होत असल्यामुळें त्याला क्रतुसत्कृत असें म्हणतात. जो पृथ्वी, आप व आकाश या सर्वही भूतांशीं एकरूप असल्यानें ज्याला सम असें म्हणतात. जो दुष्टांना निर्दलून जगताला स्वास्थ्य देतो, यास्तव ज्याला अरिहा आणि शांतिकर असें म्हणतात. सर्व जगत् याजपासून उत्पन्न झाल्यामुळें याला जगद्योनि किंवा जगद्बीज असेंही म्हणतात. शिवाय जगताला सदुपदेश करणारा हा असल्यामुळें या उदारबुद्धि परमात्म्याला जगद्गुरु असें म्हणतात. ज्याच्या हातांमध्यें सदैव चक्र आणि गदा असतात त्यानें शत्रूचा घात करणारें अत्युत्तम तेजस्वी केवळ सूर्यासहित असणाऱ्या अग्नीप्रमाणें जाज्वल्य असें आपलें सुदर्शन चक्र उगारून देवसैन्यांत ठाणें धरिलें होतें. त्या वेळीं डाव्या हातानें सर्व असुरांचा नाश करणारी व वर्णानें काळी असून शत्रूलाही कालाचा मार्ग दाखविणारी जंगी गदा तो गरगरवीत होता, व त्यामुळें त्या गदेला तेजोमंडलासह उदय पावणाऱ्या सवित्रबिंबाची शोभा आली होती. उरलेल्या हातांत त्या गरुडध्वज महायशस्वी प्रभूनें शार्ङ्गधनुष्य इत्यादि अनेक उज्ज्वल आयुधें धरिलीं होतीं.

अशा लक्षणांनीं युक्त होऊन तो परमात्मा कश्यपपुत्र व सर्पाशन असा पक्षिश्रेष्ठ जो गरुड त्यावर बसला होता म्हणून सांगितलेंच आहे. हे राजा, तो गरुड कसा होता म्हणशील तर तो वायूपेक्षांही अधिक वेगानें गमन करीत असून आपल्या पक्षांच्या फटकाऱ्यानें आकाश हालवून सोडी. त्याच्या चोंचींत मोठा सर्प धरिला असल्यामुळें तो मोठा शोभिवंत दिसत होता व त्याच्या त्या विशाळ देहामुळें समुद्रांतून अमृतप्राप्ति झाल्यावर घुसळण्यांतून मोकळा होऊन वर आलेला हा मंदराचलच कीं काय असा भास होई. त्या गरुडाचा पराक्रम असामान्य होता. त्यानें देवासुरांच्या लढालढींत हजारों वेळ आपला तडाका दाखविला होता व अमृतासाठीं चाललेल्या भांडणांत इंद्राच्या वज्रानें त्याला वण पडला होता. त्याला मोठी शोभिवंत शिखा व झुलपें होतीं. शिवाय कानांत आगीसारख्या लाल सोन्याचीं सुंदर कुंडलें होतीं. चित्रविचित्र पिसांचें त्याच्या अंगावर पांघरूण होतें, त्यामुळें व आपल्या धिप्पाडपणामुळें अंगावरून गैरिकादि धातूंचे पट्टे असणाऱ्या पर्वताप्रमाणें तो दिसत असे व त्यानें तोंडात धरलेल्या व अर्धवट गिळलेल्या सर्पाच्या मस्तकांत असलेल्या चंद्रतुल्य तेजस्वी मण्याच्या प्रभेनें त्याचें विशाल उराड फारच शोभत होतें. सुंदर सुंदर रंगीबेरंगी पिसें ज्यांत भरलीं आहेत असे आपले विस्तीर्ण उभे पंख पसरून तो आकाशांतून मौजेनें चालला असतां सर्व आकाश भरून टाकी, त्या वेळीं दोहीं बाजूंना इंद्रधनुष्यांच्या कमानी उभारून आकाशभर फिरणाऱ्या प्रलयकालच्या मेघांचाच भास होत असे. अथवा दैत्यांच्या शत्रुरूपानें प्रकट झालेलें तें नील, लोहित व पीत वर्णांच्या पताकांचें अवरोपणस्थानच कीं काय असें वाटे. अशा त्या गरुडावर बसलेल्या श्रीविष्णूच्या मागोमाग देवगण, व तपोधन मुनि चालत

१ लेलिह्यसे ग्रसमानः समंतात् । लोकान् समग्रान् वदनैर्ज्वलद्भिः ॥ भ० गी० अ० ११, श्लो० ३०.

२ वास्तविक या उपमेचा संबंध मागील श्लोकांतील चक्राशीं लावणें जास्ती समीचीन आहे; परंतु, चतुर्धरानें तो गदेकडे लाविला आहे.

असून आपल्या मंत्रमय वाणीनें त्या गदाधराचें स्तोत्र करून त्याला संतोषवीत होते.

या प्रकारें कुबेरानें अंगीकारिलेलें, यमानें पुढाकार घेतलेलें, वरुणानें वेढिलेलें, इंद्रानें शोभायमान् केलेलें, चंद्रप्रभेनें धवलित झालेलें, वायुवेगानें दणाणून राहिलेलें, अग्नितेजानें झगमगणारें व विष्णु, जिष्णु, सहिष्णु व भ्राजिष्णु यांच्या तेजानें भरलेलें असें तें अद्भुत शक्तियुक्त व देवसैन्य सज्य होऊन युद्धार्थ उभें राहिलें. याप्रमाणें उभय सैन्यें उभीं राहिलीं असतां अंगिरसकुलोत्पन्न देवगुरु बृहस्पति "तुमचें कल्याण असो, तुमचा जयजयकार होवो." याप्रमाणें देवमंडळीस आशीर्वाद देत होते. तिकडे दैत्यगुरु शुक्राचार्य हेही दैत्यमंडळीला याचप्रमाणें आशीर्वाद देऊन राहिले होते.

## अध्याय पंचेचाळिसावा.

—:o:—

### देवासुरसंग्रामवर्णन.

वैशंपायन सांगतातः—मग त्या एकमेकांवर चढ करून जय मिळवूं इच्छिणाऱ्या देव व असुर या उभयतांच्या सैन्यांची मोठी तुंबळ लढाई झाली. अनेक प्रकारचीं शस्त्रास्त्रें घेऊन ते दानव त्वेषानें देवांवर जेव्हां चाल करूं लागले, त्या वेळीं पर्वत पर्वतांशीं भांडतात कीं काय असें भासूं लागलें. देव व असुर यांमधील युद्ध एक प्रकारें अद्भुतच होतें. कारण, त्यांत एका बाजूला धर्म व विनय, आणि असुरांच्या बाजूला अधर्म व दर्प, असा विपरीत प्रकार होता. तें देवदानवांचें युद्ध फारच गर्दीचें व अतिशय घोर असें झालें. त्यामुळें सर्व जगताला त्राही त्राही होऊन जाऊन युगांतींचा प्रलयाग्नि पेटला कीं काय असा भास होऊं लागला. कारण त्या वेळीं ते दानव अत्यंत वेगवान् व केवळ आकाशांत उडी घेणारे असे आपल्या चपळ रथांचे घोडे चेंपून हातांत नंग्या तरवारी घेऊन कोणी मुसळें फेकीत, कोणी बाण सोडीत, कोणी धनुष्यें ताणीत, कोणी मोगऱ्यांचा वर्षाव करीत, कोणी आपल्या हातांतील परिघ भिरकावीत, तर कोणी पर्वतच फेंकीत,—अशा प्रकारें इंद्रप्रभृति देवगणांवर तुटून पडले. याप्रमाणें त्या महाबलाढ्य आणि विजयशाली दानवांनीं भडाभड देवांना घायाळ करण्याचा यत्न सुरू केला, त्या वेळीं ते देवगण त्या रणभूमीवर हिरमुष्टी होऊन अत्यंत खेद करूं लागले. त्या दितीच्या पुत्रांनीं त्या देवांचीं आपल्या परिघानें मुंडकीं उडविलीं. आपल्या अस्त्रजालांनीं त्यांची कणीक मऊ केली, व त्यांना प्रथम पाशांत गुरफटवून निश्चेष्ट करून नंतर बाणांच्या योगानें छाताडें फोडून त्यांना रक्ताच्या गुळण्या ओकावयास लाविलें. या प्रकारें त्या दानवी मायेच्या तडाक्यांत सांपडून त्या देवांची कांहींएक गडबड चालेनाशी झाली. त्या असुरांचें सामर्थ्य किती म्हणून सांगावें? त्यांच्या शक्तीपुढें तें देवांचें सैन्य निरस्त्र व विप्रयत्न होऊन मेल्याप्रमाणें निश्चेष्ट दिसूं लागलें. असा प्रकार पाहून देवश्रेष्ठ जो सहस्रनेत्र इंद्र तो आपल्या शक्तीनें ते दैत्यांचे मायावी पाश दूर करीत आणि आपल्या वज्रानें दैत्यांच्या बाणांचे तुकडे करीत त्या घोर दैत्यसैन्यांत शिरून त्यांतील प्रमुख दैत्यांना प्रथम ठार करून उरलेल्या त्या अफाट दैत्यसैन्याला आपल्या तामसी मायेच्या योगानें तमोमय करून सोडता झाला. इंद्राच्या सामर्थ्यामुळें याप्रकारें अत्यंत घोर अशा तमानें व्याप्त होतांच त्या दानवांना देव कोणता व असुर कोणता, हें ओळखेना. अशा समयीं दैत्यांच्या मायावी पाशांतून सुटलेले देवगण यत्न करून अंधकारानें गोंधळून

गेलेल्या त्या दैत्यांचीं शरीरें तडातड धरणीवर पाडूं लागले. याप्रमाणें त्या तमाच्या प्रभावानें नीलवर्ण व बेशुद्ध होऊन जाऊन देवांच्या हातून ते धिप्पाड दानवगण पंख तुटलेल्या पर्वतांप्रमाणें धडाधड कोसळूं लागले. इंद्राच्या त्या तामसी मायेचा परिणाम केवळ दैत्य-सैन्यावरच न होतां त्या दैत्यांच्या राजभवना-वरही झाला. कारण, तो सर्व राजवाडा त्या-मधील मेघांप्रमाणें धिप्पाड असे रक्षक राक्ष-सांसह काळोखांत दडून जाऊन अंधकाराच्या समुद्राप्रमाणें भासूं लागला.

दैत्यसैन्याची ही अवस्था पाहून मय नामक असुरानें कल्पांतकालीन वडवाग्नीपासून बनविलेली अशी अत्युग्र महामाया सोडून तिच्या योगानें इंद्राच्या तामसी मायेला जाळून काढिलें. मयासुराच्या त्या मायेनें त्या इंद्रमायेनें निर्माण केलेलें तें सर्व तम नष्ट करितांच असुर मंडळीला पुन्हा तजेला चढून ती तत्काल युद्धार्थ उभी राहिली. इकडे मयासुरानें सोडलेल्या त्या और्वी मायेच्या योगानें देवमंडळीच्या अंगाचा जेव्हां भडका होऊं लागला तेव्हां ते थंडगार अशा पाण्यांत निजावयास सांपडावें म्हणून शीतकिरण जो जलात्मा चंद्र त्याच्या आश्रयास धांवले. या-प्रमाणें त्या और्वी मायेच्या तेजानें जळून जाऊन भ्रष्टतेज झाले असतां त्या देवांनीं दैत्यांना शरण जाण्याची आपली इच्छा आपला अधिपति जो इंद्र त्याला कळविली. याप्रमाणें त्या दैत्यमायेच्या सामर्थ्यानें देवसैन्य कावून जाऊन इंद्राकडे आलें असतां इंद्रानें वरुणाला आज्ञा केली. त्या वेळीं वरुण म्हणाला कीं, हे इंद्रा, पूर्वकालीं गुणांनीं केवळ ब्रह्मदेवाप्रमाणें असा भृगुमहर्षींचा पुत्र जो तेजस्वी और्वमुनि त्यानें अति दारुण असें तप केलें. मग तो आपल्या तपस्तेजानें सनातन सूर्याप्रमाणें जेव्हां सर्व जगत् तापवूं लागला तेव्हां सर्वही मुनिगण व ब्रह्मर्षींसह देवगण त्याजकडे आले. त्याचप्रमाणें दानवपति हिर-ण्यकशिपु दानवही त्या परम तेजस्वी ऊर्व-ऋषीची विनवणी करूं लागला. ब्रह्मर्षि त्या ब्रह्मतुल्य ऋषीला म्हणाले, " हे मुने, आपण ऋषिवंशात जन्मलेले असून ब्रह्मचर्य अवलंबिलें आहे, व त्यामुळें आपलें हें ऋषिकुल खुंटलेंसें-च झालें. कारण आपण आपल्या पित्याच्या पोटीं एकटेच उत्पन्न झालां असून आपण उर्ध्वरेत्याचें व्रत पतकरून तपाचे कष्ट सोशीत बसलां आहां आणि पुत्रपौत्रादि संतानवृद्धि करण्याचा क्रम सोडून दिला आहे. आपल्याचप्रमाणें ब्राह्मण-जातींत अनेक जितेंद्रिय मुनींचीं कुलें त्यांत एकच एक पुरुष उरून छिन्नमूल होत चाललीं आहेत. तथापि, त्या सामान्य कुळांची आम्ही फिकीर करीत नाहीं. परंतु आपण तपानें अत्यंत श्रेष्ठ असून आपलें तेज केवळ ब्रह्मदेवाच्या तोडीचें आहे; याकरितां ( आपल्यासारख्याचें पुत्ररूप प्रतिबिंब मागें रहावें असें आह्मांस फार वाटतें म्हणून ) आम्ही विनंती करितों कीं, आपण वंशवृद्धि करण्याकडे लक्ष द्या, आणि आपण आपणास ( पुत्ररूपानें ) द्विगुणित करा. आपण तपाच्या योगानें आपलें तेज फारच उत्कर्षास आणलें आहे. तर असलें हें ओजवलेलें उत्कृष्ट तेज केवळ आपल्याच ठिकाणीं राखून न ठेवितां तें स्त्रीचे गर्भांत घालून पुत्ररूपानें आपले मूर्तीची दुसरी प्रत निर्माण करा."

याप्रमाणें त्या ऋषींनीं विषयाची गोष्ट काढितांच त्या ब्रह्मचारी मुनीच्या मनाला फार मोठा धक्का बसला; आणि त्या ऋषींची निर्भर्त्सना करून तो म्हणाला, "बाबांनो ब्रह्म-योनींत उत्पन्न होऊन ब्राह्मण्याचें आचरण

१ पूर्वकालीं पर्वतांस पंख होते, परंतु इंद्रानें पुढें ते तोडून टाकिले.

करणारे आणि वन्यमूलफलांवर निर्वाह करून सर्वदा आर्ष म्हणजे ऋषियोग्य कर्म करणारे जे कोणी आहेत त्यांचा पुरातन कालापासून 'ब्रह्मचर्य' हा शास्त्रानें शाश्वतधर्म सांगितला आहे. या ब्रह्मचर्याचें सामर्थ्य सामान्य नव्हे. ब्रह्मचर्याचें योग्य रीतीनें पालन केल्यास तें ब्रह्माला देखील हालवून सोडील. जे कोणी ब्राह्मण गृहस्थाश्रम धरून असतील त्यांना याजन, अध्यापन व प्रतिग्रह या निर्वाहार्थ तीन वृत्ति सांगितल्या आहेत. परंतु आमच्यासारखे जे वनवासी मुनि आहेत त्यांना वन हेंच निर्वाहाचें साधन. (आमच्यासारख्यांना वानप्रस्थ विवाहावांचूनच करितां येतो.) आजपर्यंत जे कोणी अंबुभक्ष म्हणजे जलपान करून रहाणारे, वायुभक्ष म्हणजे केवळ वायु भक्षण करून रहाणारे, व दांत असतां दंतोलूखलिक म्हणजे दांतांतोंडाचा खलबत्ता करून तुसासकटच नीवारादि कच्चें धान्य खाणारे, अथवा अश्मकुट्ट म्हणजे दंतांचें साधन नसल्यानें दगडानें कुटून हिरवें धान्य खाणारे आणि पंचाग्निसाधन[1] करणारे—असले असले अत्यंत दुष्कर व्रतें करून तपश्चर्या करणारे जरी झाले तरी मुख्यतः या ब्रह्मचर्यव्रताचाच अवलंब करून त्याच्या बळावरच मोक्षप्राप्ति करून घेण्याची त्यांनीं उमेद बांधली. बाबांनो, ब्राह्मणाला जें ब्राह्मणत्व येत असतें तें या ब्रह्मचर्यामुळेंच, असें सत्यलोकांत रहाणारे जे ब्रह्मवेत्ते (अर्थात् स्वानुभवी) जन ते म्हणतात. ब्रह्मचर्य हा धैर्याचा पाया आहे, तपाची इमारतही ब्रह्मचर्याशिवाय उभी रहात नाहीं. ज्यांनीं मिळून इहलोकीं असतांना नैष्ठिक ब्रह्मचर्य करारानें तडीस नेलें तेच आजकाल स्वर्गांत जाऊन नांदत आहेत. योगावांचून सिद्धि नाहीं; सिद्धीवांचून यश नाहीं. परंतु, असल्या या यशाला मूलभूत जें तप तें ब्रह्मचर्याहून अधिक दुसरें नाहीं. याकरितां पांचही इंद्रियें व तद्वारा (इंद्रियविषयरूपी) पंचही भूतें यांचें नियमन करून पुरुषानें ब्रह्मचर्यानें रहावें. कारण यापलीकडे दुसरें श्रेष्ठ तप कोणतेंही नाहीं. योगदार्ढ्यावांचून केवळ भगवीं पांघरून डोई मुंडणें, दृढनिश्चयावांचून व्रताचरण करणें आणि ब्रह्मचर्यावांचून तपाचरण करणें, या तीन कृतींना दंभ म्हणजे ढोंग अशी संज्ञा आहे. हे ऋषीहो, पूर्वीं ब्रह्मदेवानें जेव्हां केवळ मनोबलानें सनत्कुमारादिक मानसप्रजा उत्पन्न केली त्या वेळीं तुमच्या या स्त्रिया कोठें होत्या, त्यांशीं पुरुषाचा संयोग कोठेंसा होता आणि चित्ताला उलथून पाडणारा कामातुरपणा तरी कोठें होता? तुम्ही आपणास महात्मे म्हणवितां त्या अर्थीं तुमचे ठिकाणीं तपाचा खराच जोर असेल तर ब्रह्मदेवाच्या पद्धतीप्रमाणेंच तुम्हीही मानस प्रजा निर्माण करा. तपस्वी म्हणविणाऱ्यांनीं आपले मनानेंच योनी निर्माण करून तिचेच ठिकाणीं गर्भाचें आधान करून मानस प्रजा निर्माण करावी. इतरांप्रमाणें हाडामांसाची स्त्री घेऊन तिच्याशीं संयोग करून तिचे ठिकाणीं बीजाधान करणें हें व्रत तपस्व्यांना सांगितलें नाहीं. याकरितां तुम्हीं आपणास भले म्हणवीत असतां मजपुढें बेधडक (मीं लग्न करावें म्हणून) जें धर्मार्थाला सोडून भाषण केलेंत त्यावरून तुम्हीं भले मनुष्य नाहीं असें मला वाटतें. (माझी संतति असावी असा ज्या अर्थीं तुमचा आग्रह त्या अर्थीं) मी आतांच स्वसंकल्पानें माझे ठिकाणींच मनोमय योनी निर्माण करून स्त्रीसंयोगावांचून जाज्वल्य वृत्तीचा असा एक औरसपुत्र निर्माण करितों.

[1] चार बाजूंना चार धुन्या पेटवून मस्तकावर सूर्याचा प्रखर ताप घेणें याला पंचाग्निसाधन असें म्हणतात.

याप्रमाणें वनवासी जनांना योग्य अशा विधीनें माझाच आत्मा माझे ठिकाणी पुत्ररूपानें द्वितीय आत्मा निर्माण करील. मात्र तो पुत्र इतका तेजस्वी होईल कीं, प्रजेला जाळून टाकितो असें वाटेल." याप्रमाणें बोलून त्या तपोनिष्ठ ऊर्वमुनीनें आपली मांडी अग्नींत घालून तीच पुत्रोत्पत्तीचें स्थान समजून अरणीप्रमाणें ती एका दर्भानें मंथूं लागला. तेव्हां एकाएकीं त्याची मांडी फोडून इंधनावांचूनच ज्वाला धारण करणारा व सर्व जगताचा ग्रास करूं इच्छिणारा पुत्ररूप अग्नि त्यांतून निघाला. ऊर्वाची मांडी फोडून तिन्ही लोकांना जाळूं पहाणारा असा परम कोपिष्ठ जो पुत्ररूपी अंतकर्ता अग्नि उत्पन्न झाला त्याला और्व असें म्हणतात. तो उत्पन्न होतांच त्वेषयुक्त वाणीनेंच आपल्या पित्याला म्हणाला, "मला सोडा, मला जाऊं द्या. भुकेनें माझे प्राण चालले. मी आतां जाऊन सर्व जग भक्षण करितों." असें म्हणून तो अंतक अग्नि आकाशाला पोंचतील अशा ज्वाळा बाहेर टाकीत आ पसरून प्राणिमात्राला अग्निसात् करीतच दाही दिशा वाढूं लागला.

या समयास सर्व लोकपति प्रभु ब्रह्मदेव ऊर्वमुनीनें असला लोकोत्तर पुत्र ज्या स्थळीं निर्माण केला त्या स्थळीं प्राप्त झाला. तेथें पाहातो तों ऊर्व ऋषीची मांडी सूतरूप अग्नीनें पेटली असून पुत्राच्या कोपाग्नीमुळें ऋषीगणांसह सर्व लोकही पेटून राहिले आहेत असें दिसलें. त्या वेळीं ब्रह्मदेव ऊर्व मुनीचा प्रथम सत्कार करून म्हणाला, "लोकांच्या कल्याणासाठीं हें पुत्ररूप तेज ( बाहेर वाढूं न देतां ) आपलेच ठिकाणीं संभाळून ठेवा. ( असें आपण केल्यास ) हे विप्रर्षे, मी आपल्या या पुत्राचें उत्तम साहाय्य करीन, मी यास रहावयास उत्तम स्थळ देईन व अमृततुल्य मधुर असें भक्ष्यही देईन. हे वाक्पते, मी हें कांहीं तरी सांगत नाहीं." त्यावर ऊर्वानें उत्तर केलें, "हे भगवन्, आपल्या सारख्यांनीं माझ्या पुत्राकडे इतपत लक्ष पोंचविलें हा मजवर मोठा अनुग्रह आहे. यामुळें मी आपल्याला मोठा धन्य समजतों. आपण म्हणतां याप्रमाणें माझे पुत्राची सोय लाविल्यास सर्वांवरच मोठा अनुग्रह होणार आहे. आतां मी इतकेंच विचारून घेतों कीं, माझा हा पुत्र इष्ट अशा तारुण्यांत आला, आणि अन्नाविषयीं विशेष लालसा करूं लागला म्हणजे अशाचें समाधान होण्यास आपण त्याला कसल्या प्रकारचीं हव्यें देणार आहां ? शिवाय ह्या महातेजस्वी पुत्राला योग्य असें वसतिस्थान व त्याच्या दांडग्या शक्तीला पुरें पडेल असलें कोणतें अन्न आपण देणार आहां ? "

ब्रह्मदेव ह्मणाला, "हे विप्रर्षे, आपण जाणतांच कीं खुद्द माझें उत्पत्तिस्थान उदक हें आहे. याकरितां वडवा म्हणजे घोडीच्या आकाराचें ज्याचें मुख आहे असा जो उदकपति समुद्र तेथेंच आपल्या पुत्राला मीं वसती देणार आहें. कारण, समुद्राचें मुखही जलमयच आहे. ( मुखाशीं भूमीवरील नद्यांचें मधुर उदक मिळतें. ) याकरितां हेंच स्थळ तुझ्या पुत्राला मी वसतीकरितां देणार व तेथील मधुर उदक हेंच तुझ्या पुत्राचें भक्ष्य होईल. कारण मी स्वतःही हेंच हविभक्षण करीत त्याच ठिकाणीं सर्वदा वसती करीत असतों. हे सुव्रता, जेव्हां युगांताचा काल येईल तेव्हां हा तुझा पुत्र आणि मी लोकांचा क्षय करण्याकरितां वारंवार सर्वत्र संचार करूं. हा जल भक्षण करणारा तुझा पुत्ररूपी अग्नि मी जो अशा रीतीनें राखून ठेवितों त्याचा हेतु असा आहे कीं, जेव्हां प्रलयकाल येईल त्या वेळीं

हाच अग्नि देव, असुर, राक्षस यांसह सर्व भूतांचा दाहकर्ता होईल."

ब्रह्मदेवांनीं ऊर्व मुनीला सांगितलेली गोष्ट और्वालाही पटली, व त्या वेळीं त्यानें ब्रह्मदेवाला "बरें आहे" असें उत्तर करून आपल्या ज्वाला झांकून घेतल्या व आपलें सर्व दाहक तेज बापाचे ठिकाणीं ठेवून आपण समुद्रमुखांत शिरला.

असें होतांच ब्रह्मदेव व सर्व महर्षी और्व अग्नीचा प्रताप पूर्णपणें ओळखून ( त्यामुळें चित्तास समाधान पावून ) आपआपल्या मार्गास लागले. ऊर्वमुनीच्या तपापासून होणारा हा सर्व अद्भुत प्रकार पाहून हिरण्यकशिपु हा ऊर्वाला साष्टांग दंडवत घालून म्हणाला, "हे भगवन्, आतां येथें सर्व लोकांसमक्ष जो प्रकार घडला, तो खरोखरच अद्भुत होय. हे मुनिश्रेष्ठा, प्रत्यक्ष पितामह देखील आपल्या तपानें इतका संतुष्ट झाला आहे तर आपला प्रभाव काय सांगावा? असो; मीं जर सदाचरणी असेन तर, हे महाव्रता, मी तुझा आणि तुझ्या पुत्राचा एक नम्र सेवक आहें असें लेखावें. याकरितां मी आपणास शरण आलों असून मी सर्वदा आपल्याच आराधनांत तत्पर रहाणार आहें. मात्र याउपर जर मला कोठें ( युद्धांत ) खालीं बसण्याची पाळी आली, तर तो आपला पराजय, माझा नव्हे; असें मी समजेन."

ऊर्वमुनि उत्तर करितात, "हे हिरण्यकशिपो, तूं ज्या अर्थी मला गुरु म्हणून मानितोस त्या अर्थी मी स्वतःला मोठा धन्य व अनुगृहीत म्हणून समजतों. हे सुव्रता, तूं कांहीं काळजी करूं नको. माझे या तपःप्रभावानें तुला आतां भय म्हणून कसलें नाहीं असें समज. याशिवाय तुझ्या संरक्षणार्थ मी तुला माझ्या पुत्रानें निर्माण केलेली ही अग्निमय माया देतों, हिची मौज अशी आहे कीं, ही तरती ठेवण्याला कांहीं इंधन वगैरे लागत नसूनही इतकी जलाल असते कीं, प्रत्यक्ष अग्निही तिला स्पर्श करीत नाहीं. ही माया, तूं आणि तुझे वंशज यांच्या शत्रूंचा निग्रह करण्याचे कामीं तुझे हुकमांत राहील; आणि आपल्या ( तुझ्या ) पक्षाचा बचाव करून प्रतिपक्षाचा मात्र फडशा करील."

और्व मुनीचे हे शब्द ऐकून तो दानवेश्वर हिरण्यकशिपु "ठीक आहे" असें म्हणून त्या मायेचा स्वीकार करून आणि मुनिश्रेष्ठाला प्रणाम करून आपण कृतार्थ झालों असें मनांत समजून मोठ्या आनंदानें स्वर्गास परत गेला.

वरुण म्हणाला, "हे देवहो, ही देवांनाही दुःसह झालेली जी मयासुरानें सोडलेली माया तिचा हा जो इतिहास मीं सांगितला त्यावरून तुमचे ध्यानांत आलेंच असेल कीं, ही माया ऊर्व मुनीचा पुत्र जो और्वाग्नि त्यानें स्वतः निर्माण केली. आतां ज्यानें पूर्वी ही स्वतेजानें निर्माण केली त्यानेंच हिला त्याच वेळीं असा शाप देऊन ठेविला आहे कीं, हिरण्यकशिपु मरतांच ही निस्तेज होईल. यास्तव, माझें असें म्हणणें कीं, जर ही माया हाणून पाडून हे देवेंद्रा, आपणास सुखी करावें हें आपणास संमत असेल, तर आपण जलयोनी जो भगवान् निशाकर म्हणजे चंद्र तो माझे साह्यार्थ द्यावा. म्हणजे मी त्याला बरोबर घेऊन व त्याजमधील याद म्हणजे जलजंतु यांचेंही साहाय्य घेऊन या मायेला निश्चित हाणून पाडीन."

---

## अध्याय ७ेचाळिसावा.

### देवांची सरशी.

वैशंपायन सांगतातः—वरुणाची ही शिफारस ऐकून देवांचा उत्कर्ष चिंतणाऱ्या इंद्राला फार आनंद झाला; आणि "ठीक आहे"

असें वरुणाला आश्वासन देऊन अगोदर हिमायुध जो सोम त्याला युद्धास जाण्याविषयीं त्यानें आज्ञा केली. इंद्र म्हणाला, " हे सोमा, तूं जा; आणि दैत्यांचा विनाश करून देवांचा विजय करण्याचे कामीं या पाशधर वरुणाला साहाय्य कर. तुझें सामर्थ्य बिनतोड आहे, तूं आकाशस्थ ज्योतींत श्रेष्ठांत श्रेष्ठ आहेस. जे कोणी रसवेत्ते आहेत ते लोकांतील सर्व रस त्वद्रूपच आहेत असें जाणतात. तुझ्या मंडलांत ज्याप्रमाणें क्षयवृद्धि दिसून येईल त्याच धोरणानें सागरांत पाण्याची भरतीओहोटी चालते ( इतका तुझा जलावर अंमल आहे ). जगताला कालाची सोय लावून देऊन तूं त्यांतील अहोरात्राचें चक्र फिरवितोस. हे सोमा, तुझ्या अंगावर जें हें शशसंज्ञक चिन्ह तूं धारण करितोस तें चिन्ह म्हणजे पृथ्वीची अंतराळीं तुजवर पडलेली छायाच होय. परंतु ही गोष्ट नक्षत्रांचें ज्यांस ज्ञान आहे असे देवही जाणत नाहींत. तूं सूर्यमार्गाच्या वर असून इतर सर्व ज्योतींच्याही शिरोभागीं आहेस. तूं आपल्या तेजानें तम दूर घालवून सर्व जगताला प्रकाशित करितोस. तुझे किरण शुभ्र असून तुझें शरीर हिममय आहे. तूं ज्योतींचा पालक असून तुला शीशि अशी संज्ञा आहे. तूंच मेघांचा कर्ता असून कालाचा प्राणही तूंच आहेस. तूं यज्ञांत पूज्य असून यज्ञांत लागणारा सोमरसही प्रवाहरूपानें तूंच आहेस. तूं औषधींचा स्वामी असून क्रियांचें उत्पत्तिस्थान तूंच आहेस. तुझी ऊत्पत्ति जलापासून असून तुझ्या ठिकाणीं ऊष्णता कशी ती नसल्यामुळें तुला शीतांशु असें म्हणतात. तूं अमृताचा आधार आहेस. तूं मोठा चंचल असून तुझें वाहन शुभ्र आहे. लोकांत जे कोणी दिसण्यांत कांतिमान् किंवा सुंदर आहेत त्या सर्वांची कान्ति तूंच आहेस; व सोमरसावर निर्वाह करणाऱ्या सोमदेवांचा सोम तूंच आहेस. सर्व भूतमात्रांत तुझ्या इतकें शांत तेज कोणाचेंच नाहीं. तूं नक्षत्रांचा अधिपति असून अंधकाराचा शत्रु तूंच आहेस. याकरितां हा वरुण सैन्यासह जात आहे त्याबरोबर तूं युद्धास जा; आणि ज्या आसुरी मायेच्या योगानें आपण युद्धांत भाजून निघतों आहों ती माया थंड करून टाक."

सोम म्हणाला, " हे जगत्पते, हे देवेंद्रा, ज्या अर्थीं मला आपण युद्धार्थ आज्ञा करितां त्या अर्थीं मी असा कांहीं थंडीचा तडाका पाडितों कीं, त्या योगानें त्या दैत्यांची अग्निमय माया नाहींशीच होईल. तुम्ही आतां गंमतच पहा कीं, युद्धभूमीवर हे सर्वही दानव बर्फांत गुरफटले जाऊन माझ्या अतिशय शीतलत्वानें पोळून निघतील व असें झालें म्हणजे त्याची मायाही लटकी पडेल व धुंदीही उतरेल. "

वैशंपायन सांगतात:—सोमाचें असें बोलणें होतांच त्याच्या प्रेरणेनें दैत्यांच्या भोंवतीं बाष्पासह हिमाची वृष्टि इतकी दाट झाली कीं, तिनें ते दैत्य मेघगणांत सांपडल्याप्रमाणें गुरफटून गेले. मग त्या महारणांत तो पाशधर वरुण व शुभ्रांशुधर चंद्र हे अनुक्रमें पाशघात व हिमपात यांच्या योगानें दानवांचा संहार करीत चालले. पाशधर वरुण व जलधर चंद्र हे दोघेही जलाधिपच. हे खवळ-

१ सर्व आकाशस्थ ज्योती यांचें जल हें पोषक आहे, व जलाचा उगम चंद्र हा आहे. या दृष्टीनें चंद्र हा सूर्यापेक्षांही श्रेष्ठ आहे. हल्लींची नेब्यूलर हैपॉथेसिसही ज्योती बाष्पमय असेंच सांगते.

२ छायाहि भूमेःशशिनो मलत्वे नारोपिता शुद्धिमतः प्रजाभिः ( रघुवंश—कालिदास ).

३ शश म्हणजे ससा त्याच्या आकाराचें छायारूप चिन्ह ज्याच्या अंगावर आहे तो.

१ बर्फाचे आति गारठ्यानेंही हातास चटकाच बसतो.

लेल्या महासागराप्रमाणें जलवर्षाव करीत युद्धभूमीवर संचार करूं लागले. त्या दोघांनीं तें दैत्यसैन्य पाण्याच्या पुरांत बुडविलें असतां तें युगांतींच्या मेघांनीं केलेल्या जलप्रलयांत सांपडलें कीं काय असें दिसत होतें. ते दोघे देव म्हणजे चंद्र व वरुण हे अनुक्रमें आपले पाश व किरण यांच्या योगानें दैत्यांनीं निर्माण केलेल्या मायेचा पाडाव करिते झाले. चंद्राच्या शीतजलानें पोळल्यामुळें ( गारठून गेल्यामुळें ) व वरुणाच्या पाशानें जखडल्यामुळें ते दैत्य शिखर उडलेल्या पर्वताप्रमाणें त्या रणांत अचळ बसले. शीत किरणांच्या तडाक्यामुळें थंडीनें मेहरून जाऊन आणि सर्वांग हिमानें व्याप्त होऊन ते विझलेल्या निखाऱ्यांप्रमाणें निरुपयोगी पडून राहिले. त्या वेळीं दैत्यांचीं निस्तेज झालेलीं विचित्र विमानें आकाशांत खालींवर खालींवर करूं लागलीं. इतक्यांत मायावी दानव जो मयासुर त्यानें आपली दैत्यमंडळी पाशधरानें जखडली असून चंद्रानें हिमांत बुडवून टाकिली आहे असें पाहिलें; आणि त्या दानवश्रेष्ठ मयानें आपला पुत्र जो क्रौंच त्यानें निर्माण केलेली जी अति विस्तृत पर्वतरूपिणी माया ती देवमंडळीवर सोडिली. ही माया पर्वतमय असल्यामुळें तिचे ठिकाणीं सर्वत्र शिलासमूह असून गंड शीलांचे योगानें ती हंसतेच आहे कीं काय असें भासत होतें. तिचीं शिखरें वृक्षांनीं भरून गेलीं होतीं आणि तिजवरील गुहांत झाडी वाढली होती. त्याचप्रमाणें तींत सिंह, व्याघ्र व हत्ती यांची गर्दी होऊन राहिली होती; व सिंहव्याघ्रगजादिकांच्या कळपांचे नायकांमुळें ती मोठी प्रसन्न दिसत होती. शिकारीचे हरण तींत विपुल असून तिजवरील वृक्ष वायूनें गदगद हालत होते. अशा त्या पर्वतरूपी मायेचा प्रयोग करितांच तिजमधून शिलांचा वर्षाव होऊन त्यापासून बारीकबारीक धोंडे देवमंडळीच्या अंगांवर तडातड बसूं लागले. तसे मोठमोठे वृक्ष तुटून अंगावर कोसळूं लागले. या प्रकारें त्या मयानें त्या देवमंडळीला सडकून काढून आपली दानवमंडळी सजीव केली. त्या वेळीं या पार्वतीमायेपुढें पूर्वीं चंद्र व वरुण यांनीं निर्माण केलेल्या दोन्हीही माया लोप पावल्या. लोखंडासारख्या कठीण अशा दगडींचा त्या रणांत देवमंडळीवर वर्षाव सुरू राहिल्यानें पृथ्वी तिजवर सर्वभर पर्वत उभे राहिल्याप्रमाणें दगडांच्या राशींनीं जाण्यायेण्यास बिकट व वृक्ष आणि पर्वत यांनीं भरून गेलेली अशी दिसूं लागली. मग त्या देवमंडळींत ज्याला दगडाचे तडाके बसले नाहींत किंवा ज्याच्या अंगावर एखादी शिळा कोसळली नाहीं, किंवा वृक्ष आडवा आल्यानें जो अडला नाहीं, असा एकही देव शिलक राहिला नाहीं. अखेर एकगदा धारणकर्ता विष्णूखेरीज बाकीचें सर्वही देवसैन्य धनुष्यें तुटून जाऊन व आयुधें मोडून पडून सर्वथा निष्प्रयत्न होऊन बसलें. मात्र तो समर्थ श्रीपति गदाधारी श्रीविष्णु युद्धाच्या रगाड्यांत असतांही लवमात्र भय पावला नाहीं; व त्या जगत्स्वामीची सहनशक्ति अलौकिक असल्यामुळें ( तो दैत्यांचे चेष्टेनें ) रागावलाही नाहीं. तो मेघश्याम—कान्ति जनार्दन याला प्रत्येक गोष्टीचें कालज्ञान असल्यामुळें, व देव व असुर यांची कुस्ती कशी काय होते हें पाहावयाचा हेतु असल्यामुळें तो आपल्या कर्तबगारीची योग्य वेळ येई तोंपर्यंत थांबला होता.

आतां वेळ येतांच ती मयासुरानें सोडिलेली अतिदीर्घ पार्वती माया दूर करण्यासाठीं त्या भगवंतानें अग्नि व वायु यांस आज्ञा केली. भगवंताच्या शब्दानें प्रेरणा होतांच ते अग्नि व वायु परस्परसाहाय्यानें अतिशय वाढून त्या

पार्वती मायेला दूर सारते झाले. कारण, ते उभयही त्या रणामध्यें अतिशय वाढून शत्रूंना ज्या वेळीं भोंवऱ्यांत घालूं लागले त्या वेळीं त्या पार्वती मायेची जळून राख झाली; आणि अशा रीतीनें ती माया नाश पावली. कुठें वायूचे साहाय्याला अग्नि आणि कुठें अग्नीच्या साहाय्याला वायु, याप्रमाणें प्रकार होऊन त्यांनीं प्रळयकालीं कोपलेल्या अग्नि-वायू-प्रमाणें ती दैत्यसेना केव्हांच माजून टाकिली. त्या दानवसैन्यांत त्या अनलअनिलांच्या (अग्निवायूंच्या) जोडीनें मोठी मौज मांडिली. कोठेंही वायु गेला कीं, त्याच्या पाठोपाठ अग्नि धांवत जाई. कांहीं दानव होरपळून खालीं पडूं लागले, कांहीं वर उसळूं लागले, व अखेरीस भस्म होऊन सर्व नाहींसे झाले; आणि याप्रमाणें अग्नीनें आपली कामगिरी बजावली. त्याचप्रमाणें वायूनें सर्वभर वावटळ उठवून दैत्यांचीं विमानें उलथीं पालथीं करून टाकिलीं, व या प्रकारें त्या दानवी मायेचा अंमल सर्वथा दूर केला. त्या वेळीं गदाधर श्रीविष्णूची स्तुती होऊं लागली. जिकडून तिकडून "शाबास शाबास! दैत्यांना लटकें पाडून, त्रैलोक्याला बंधांतून सोडून आपण आनंद दिलात त्या अर्थीं, हे विष्णो, आपली शाबास आहे, शाबास आहे," असा ध्वनी कानीं येऊं लागला.

याप्रमाणें सहस्राक्ष इंद्राचा जय व मयासुराचा पराजय होतांच सर्व दिशा प्रसन्न झाल्या, धर्मकार्यें प्रसार पावूं लागलीं, चंद्राचा मार्ग खुला झाला, सूर्यही क्रान्तिवृत्तावर आला, प्रजाजन आपआपल्या पूर्वस्थितीवर आले, व लोक सुरळीतपणें सदाचारानें वागूं लागले, मृत्यु आपली मर्यादा उल्लंघीनासा झाला ( अकालमृत्यु दूर गेला ), अग्नीला आहुती मिळूं लागली, देवांना यज्ञांत हविर्भाग मिळूं लागून ते यजमानांना स्वर्गप्राप्तीची खूण दाखवूं लागले; सर्वही दिक्पाल आपआपल्या दिशांचे ठिकाणीं राहून निर्भयपणें लोकांचें पालन करूं लागले; तपोनिष्ठ शुद्धवृत्तीचे जे लोक होते त्यांचा उत्कर्ष होऊन दुष्टकर्मी लोकांचा नायनाट झाला. देवपक्ष आनंदीत होऊन दैत्यपक्ष खेद करीत खालीं बसला, धर्माला जोर येऊन तो तीन पायांवर चालूं लागला व अधर्म लुला पडून एकच पायावर खरडत बसला, मोक्षाचें महाद्वार खुलें झालें, व नीतीचे मार्ग स्थापित होऊन जगांतील लोक आपआपले धर्माप्रमाणें वर्णाश्रमाचें पालन करूं लागले, राजेलोक मोठे तेजस्वी होऊन प्रजेचें यथान्याय रक्षण करूं लागले, देवादिकांचीं लोक स्तोत्रें गाऊं लागले, लोकांतील पापप्रवृत्ति कमी होऊन दारुण अज्ञानरूपी अंधकार नष्ट झाला. याप्रमाणें त्या अग्नि आणि वायूच्या युद्धाचा परिणाम लोकांना सुखकर झाला, त्यांच्या जयाच्या योगानें लोकांवरचीं संकटें दूर झालीं, व लोकही प्रेमानें त्या उभयतांचा जयजयकार वर्णूं लागले.

इकडे दैत्यांना अग्निवायूंपासून मोठें अरिष्ट प्राप्त झालेलें ऐकून त्यांच्या रक्षणार्थ सुप्रसिद्ध कालनेमी नांवाचा दानव रणभूमीवर प्रकट झाला. त्याच्या मस्तकावरील मुकुट सूर्याप्रमाणें देदीप्यमान होता, त्याच्या अंगावरील अलंकार व बाहुभूषणें शब्द करीत होतीं. तो मंदराचलाप्रमाणें धिप्पाड असून रुप्यानें खचला होता. त्याला शंभर मस्तकें, शंभर तोंडें व शंभर बाहु असून शंभरही हातांत घेतलेलीं आयुधें घेऊन तो उभा राहिला होता. त्या वेळीं तो एखाद्या शंभर शिखरांच्या पर्वताप्रमाणें शोभत होता. तो ऊष्णकालीं वनांत भडकत चाललेल्या अग्नीप्रमाणें जाज्वल्य दिसत होता; त्याचे डोईचे केश धुरकट रंगाचे असून त्याची दाढी हिरवट

होती; व त्याच्या तोंडांतील खालचा जबडा लांब लांब दांताडांनीं खचून गेला होता. त्याचें शरीर अति विशाळ असून त्रैलोक्यामधील अंतर भरून काढण्याइतकें वाढण्याजोगें होतें. तो आकाशाची मंडपी हातावर सहज तोलून धरण्याइतका समर्थ होता; व मोठमोठाले पर्वत लाथेनें उडवून देण्याइतकी त्याची अचाट शक्ति होती. पर्जन्यासकट मोठमोठाले मेघ तो सहज फुंकरानें उडवून देत असे; त्याचे डोळे अतिदीर्घ, तिरळे आणि लालगुंज असे असत. त्याचें तेज केवळ इंद्राप्रमाणें होतें; तो रणभूमीवर आला तो देवांना धमकावीत आणि जाळूं पाहातच आला. त्यानें दाही दिशा झांकून टाकिल्या. प्रलयकालीं खाण्यासाठीं हापापलेल्या गुर्मीदार मृत्यूप्रमाणें तो भयंकर दिसत होता; त्या धिप्पाड राक्षसानें आपला पुष्पालंकार घातलेला व लांब सडक बोटांचा व ज्यांतील हातमोजा किंचित् उचलला गेला आहे व ज्याचा तल अतिसुंदर आहे असा उजवा हात उगारून देवांनीं मारून टाकिलेल्या दानवांना " उठा, उठा " म्हणून इषारा दिला. शत्रूंना केवळ काळासारखा अशा त्या कालनेमीला रणभूमीवर पाहातांच देवांची भयानें गाळणच उडाली. तो कालनेमी जेव्हां त्या समरांत लांबलांब ढेंगा टाकूं लागला तेव्हां वामनावतारीं तीन पावलांत भूमी आटणारा हा परमात्मा त्रिविक्रमच चालला आहे कीं काय असें वाटून लोक त्याच्याकडे साश्चर्य पाहूं लागले. त्यानें आपलें पहिलें पाऊल उचलितांच उसळणाऱ्या वाऱ्यानें आकाश भरून गेलें, आणि सर्व देवतांना भयभीत करीत तो युद्धभूमीवर फिरूं लागला. मयासुराला बरोबर घेऊन तो कालनेमी रणांत फिरत असतां विष्णुसहित चालणाऱ्या इंद्राचा भास झाला, व काळाप्रमाणें भयंकर तो कालनेमी आपणावर चाल करून येतोसें पाहून इंद्रप्रभृति सर्वही देवगण भयानें विव्हल झाले.

## अध्याय सत्तेचाळिसावा.

—:०:—

### कालनेमीचा पराक्रम.

वैशंपायन सांगतातः—आपले ज्ञातिबंधु जे दानव त्यांना आनंदित करण्याकरितां महातेजस्वी जो कालनेमी असुर तो ग्रीष्म ऋतूच्या अंतीं ज्याप्रमाणें मेघसमूह वाढत जातो त्याप्रमाणें त्रैलोक्यभर वाढूं लागला. याप्रमाणें कालनेमी हा जेव्हां सर्वत्र त्रैलोक्यभर पसरला असें आढळून आलें, तेव्हां त्या दानवमंडळींतील जे मुख्य मुख्य होते ते अत्युत्तम अमृत तोंडीं लागलें असतां जसे ( मेलेले मनुष्यही ) उठून उभे राहातात, त्याप्रमाणें यापूर्वीं जरी थकूनभागून व निराश होऊन मटकन् खालीं बसलेले होते, तरी आतां, ते सर्व श्रम विसरून हुषारीनें टप्दिशीं उठून युद्धार्थ उभे राहिले; आणि या तारकामय संग्रामांत आपलाच जय व्हावा अशी सतत ज्यांची इच्छा होती ते मयासुर आणि तारासुरप्रभृति दानव जे हा वेळपर्यंत भेदरून जाऊन मट्ट बसले होते ते निर्धास्तपणें युद्धभूमीवर उभे राहून युद्धोत्कंठेनें चमकूं लागले; व कालनेमीला पाहून त्यांना अंतर्यामीं इतकें प्रेम वाटलें कीं, त्या प्रेमभरांत ते निःशंकपणें वारंवार अस्त्रें सोडीत व व्यूहांतून इकडे तिकडे धांवत. त्याचप्रमाणें मयासुराचे हाताखालीं जे कोणी म्होरके वीर होते तेही सर्व शंका सोडून युद्धार्थ उभे राहिले. याप्रमाणें मय, तार, वराह, शूर हयग्रीव, विप्रचित्तीचा पुत्र श्वेत, खर व लंब हे दोघे, बलीचा पुत्र अरिष्ट, तसेंच किशोर व उष्ट्र हे दोघे, देवतुल्य स्वर्भानु व वक्त्रयोधि नांवाचा महासुर; हे सर्वही मोठे अस्त्रवेत्ते, तपोनिष्ठ व कार्य-

कुशल असे असुर जमून सर्वश्रेष्ठ जो कालनेमी त्याला साथ करण्यास गेले. त्याच्या साह्यार्थ ते हातीं जंगी जंगी गदा, चक्रें, फरश, पर्वतप्राय शिळा, पर्वताचे तुटके कडे, पट्टे, गोफणी, भाले, तोफा, सोटे, बड्या बड्या तोफा, कालदंडासारखीं मुसळें, फेंकण्याजोगे मोगरे, युगें, यंत्रें, मोकळ्या व तोंडें शेवटलेल्या अर्गळा, पाश, प्राश, जिभळ्या चाटणारे साप, धांवणारे बाण, वज्रें, पहारा, झगझगीत तोमर, नंग्या तरवारी, पाजळून झक्क केलेले तीव्र शूल, इत्यादि आयुधें घेऊन मोठ्या हुरूपानें आपल्या लंब, विस्तीर्ण व पुष्ट अशा बाहूंच्या बलासह सज्ज झाले. याप्रमाणें झगझगीत अस्त्ररूपी विजा जींत चमकून राहिल्या आहेत अशी ती दैत्यचमु वर्षाकालीं नक्षत्र लुप्त झालेल्या आणि मेघांनीं आच्छादिलेल्या द्यौ-( आकाशा ) प्रमाणें शोभूं लागली.

इकडे इंद्राच्या हाताखालची देवांची सेनाही चंद्र आणि सूर्य यांच्या शीतोष्ण तेजांनीं शोभत होती. प्रत्यक्ष वायूच तिच्या वेगस्थानीं होता. सोमामुळें ती सौम्य होतीच. तारागणांच्या पताका फडकत होत्या; मेघरूपी वस्त्र तिला गुरफटलें होतें; ग्रह व नक्षत्ररूपानें ती हास्य करीत होती; यम, इंद्र, कुबेर आणि बुद्धिमान् वरुण हे तिचे रखवालदार होते, व यक्षगंधर्व हेही तींत पुष्कळ होते. तिच्यांत अग्नि आणि वायु हे चेतून राहिले होते. परमात्मा नारायण तिचा सर्वस्वी आधार होता. शिवाय तिच्यांत अस्त्रांचीही रेलचेल होती. यामुळें व तिच्या अफाटपणामुळें ती दिव्य देवसेना समुद्राप्रमाणें भयंकर दिसत होती. अशा या दोन अवाढव्य सेनांचा जेव्हां युद्धार्थ संयोग झाला, तेव्हां युगांतीं होणाऱ्या द्यावापृथ्वीच्या संयोगाचा भास होऊं लागला. देव व दानव यांची ज्यांत एकच गर्दी उसळून गेली आहे, असें तें युद्ध फारच घनघोर झालें. एका पक्षाला विनय आणि क्षमा, आणि दुसऱ्या पक्षाला पराक्रम व दर्प हीं दिसून येत होतीं. तीं जंगी सैन्यें घेऊन जेव्हां ते भयंकर देव व दैत्य एकमेकांवर चढ करून जावयास निघाले, त्या वेळीं पूर्व-पश्चिम समुद्रांच्या योगानें खवळलेल्या मेघांप्रमाणें ते दिसूं लागले. पर्वतावरील वनांत फुलें फुललीं असतां हत्ती जसे त्या वनांतून मौजेनें हिंडत असतात, त्याप्रमाणें त्या चित्रविचित्र सैन्यांतून ते देव व दानव मोठ्या आनंदानें फिरत होते. मग उभयतांनीं नगारे बडविले व अनेक शंख फुंकले. त्यांचा शब्द एवढा तुमुल झाला कीं, त्यामुळें आकाश, पृथ्वी व दशदिशाही भरून गेल्या. धनुष्यांच्या दोऱ्यांचे हातावर होणारे फट्फट् आवाज, शिवाय धनुष्यांच्या कांबिटांचे लवतांना होणारे कुंय्कुंय् आवाज आणि दुंदुभींचे स्वर यांच्या कल्होळांत दैत्यांच्या आरोळ्या लपून गेल्या. मग उभयपक्षांकडील वीर युद्धोत्कण्ठेनें उतावीळ होऊन एकमेकांवर तुटून पडले; व द्वंद्वयुद्धांत शिरून कोणीं कोणाला खालीं पाडिलें, कोणीं कोणाचे हात मोडले. देवांनीं त्या वेळीं भयंकर वज्रें व उत्तम पोलादी परीघ व तीस तीस अंगुळें लांबीच्या तरवारी शत्रूवर फेंकिल्या; दानवांनीं भल्या भल्या गदा फेंकिल्या, गदेच्या आघातानें अंगें चुरडून व बाणांनीं छिन्नभिन्न होऊन कोणी सर्वभर उलथेपालथे पडले, व कोणी तशांतच अस्त्रप्रयोग करीत होते. नंतर ते दोघेही रागाच्या आवेशांत आपलीं शीघ्रगामी विमानें यांसह एकमेकांशीं भिडले. कोणी समोरासमोर तोंड देऊं लागले, कोणी तोंड फिरवून माघार घेऊं लागले, रथी रथ्यांना अडवूं लागले, व पायदळ लोक पायदळाला अडवूं लागले. त्या रद्दयांत रथांचा जो घडघड शब्द

उठला, तो आकाशांत परस्परांवर आदळणाऱ्या मेघांच्या शब्दाप्रमाणें भासला. कोणी रथांचा चुराडा केला, कोणी रथाखालीं चुरडून गेले, कांहींचे रथ अशा चेंचाटींत सांपडले कीं, त्यांना फिरावयास वाव मिळेना. ते मस्तींत आलेले उभयपक्षीय वीर उंच उंच हात उडवून ढालतरवारींनीं एकमेकांशीं भिडूं लागले. त्या वेळीं त्यांच्या अंगदादि भूषणांचे खडाखड आवाज होऊं लागले. कांहींजण अस्त्रांनीं छिन्नभिन्न होऊन वर्षाकालीं जल स्रवणाऱ्या मेघाप्रमाणें रुधिर स्रवूं लागले. ती देवदानवांची मारामारी फारच घनघोर झाली. खालींवर फेंकलेल्या गदांनीं व एकमेकांवर आदळणाऱ्या शस्त्रांनीं तें अगदीं रणमैदान भरून गेलें होतें. तें युद्ध म्हणजे एक तऱ्हेचें दुर्दिनच[1] होय. कारण त्यांत ते धिप्पाड दैत्य हेच मोठमोठाले ढग उसळले होते; देवांचीं तेजस्वी आयुधें याच विजा लवून राहिल्या होत्या; व उभयसैन्यांची बाणवृष्टी हाच पर्जन्य पडत होता.

अशांत महादानव जो कालनेमी तो रागावून एकाएकीं समुद्राच्या ओघामुळें पुष्ट झालेल्या मेघाप्रमाणें वाढला. तो इतका कीं, विद्युद्रूपी ज्यांच्या गळ्यांत पुष्पमाळा हालत आहेत व प्रदीप्त अशा अशनींचा ज्यांचेपासून वर्षाव होत आहे, व जे पर्वतशृंगांप्रमाणें धिप्पाड आहेत, अशा मेघांचा त्याच्या शरीरस्पर्शानें चुराडा झाला. तो कालनेमी ज्या वेळीं क्रोधानें फूं फूं करूं लागला त्या वेळीं रागानें मोडलेल्या त्याच्या भृकुटींतून घर्माच्या धारा लागून मुखांतून निश्वासरूपानें अग्नीच्या ठिणग्या घेऊन निघणाऱ्या ज्वाळा बाहेर पडूं लागल्या. अशांत त्याचे ते असंख्य बाहु अंतरिक्षांत उभे, आडवे, तिरपे असे सर्वभर पसरले. तें पाहून आ पसरून जिभाळ्या चाटणारे हे काळेकुळकुळीत सापच फिरतात कीं काय असें वाटलें. त्यानें आपल्या अनेक हातांत धनुष्यें, गदा व अनेक दिव्य अस्त्रें घेऊन आकाश भरून टाकिलें असतां, तें पर्वतांच्या तुंग शिखरांनीं व्याप्त झालें कीं काय असें दिसूं लागलें. अंगावरील वस्त्र वायु फडकवीत आहे, अशा स्थितींत तो रणभूमीवर उभा असतां सायंकाळच्या सूर्यप्रकाशानें ज्याचें शिखर व्याप्त झालें आहे अशा दिव्य मेरुपर्वताप्रमाणें दिसूं लागला. इंद्र ज्याप्रमाणें आपल्या वज्रानें महान् पर्वत छेदून खालीं पाडतो, त्याप्रमाणें त्या कालनेमीनें आपल्या मांड्यांच्या धसक्यानें पर्वतांचीं शृंगें व मोठमोठाले वृक्ष उपटून घेऊन त्याच्या साहाय्यानें देव मंडळी हाणून पाडिली. आयुधाची गोष्ट वेगळीच, पण त्या असुरानें शस्त्रांप्रमाणें कर्कश अशा आपल्या केवळ बाहूंनीं देवमंडळीचीं मस्तकें व वक्षस्थळें इतकीं छिन्नभिन्न केलीं कीं, देवांना जागचें हालवेना. याशिवाय यक्ष, गंधर्व व उरग यांतील मुख्यांना त्यानें नुसत्या बुक्क्यांनीं बुकलून व्याकूळ केलें, व त्यांची फळी फोडून टाकिली. देव कांहीं कमी खटपटी नव्हते; तथापि, त्या कालनेमीची दहशत त्यांच्या मनांत इतकी बसली कीं, तेथें त्यांना काय करावें तें सुचेनासें झालें. ऐरावतावर बसलेला एवढा सहस्रनेत्र इंद्र पण तोही कालनेमीनें आपल्या शरजालांनीं असा जखडून टाकिला कीं त्याचें पाऊल पुढें पडेना. मोठा पाशधारी वरुण, पण त्याचेही त्यानें पाश हिसकावून घेऊन त्याला निर्जल समुद्राप्रमाणें कोरडा पाडून किंवा निर्जल मेघाप्रमाणें फिका पाडून रणांत मट्ट बसविलें. देवांचा खजिनदार जो लोकपाल कुबेर त्याला त्या असुरानें कालस्वरूपी बडग्यांच्या मारानें द्रव्य वांटण्याचें थांबविलें, व त्यामुळें तो कुबेर रडूं लागला.

[1] पावसाळ्यांत ज्या दिवशीं सूर्यदर्शन होत नाहीं त्या दिवसाला दुर्दिन म्हणतात.

यम म्हणजे सर्वांचे प्राण हरण करणारा व दंडानें ज्याला त्याला मारणारा पण अशालाही त्या कालनेमीनें मृतप्राय करून सोडून दक्षिण दिशेला पळवून लाविलें. याप्रमाणें या चारही दिशांच्या इंद्रप्रभृति पालकांना उखडून लावून त्यानें त्या चौघांची कामगिरी आपलेकडे घेतली व आपल्या एका देहाचे चार देह करून ते चतुर्दिशेला स्थापित केले. नंतर स्वर्भानूनें दाखविलेल्या मार्गानें नक्षत्रमार्गांत जाऊन त्यानें चंद्राचें तेज व त्याचा प्रांतही हरण केला. (तो एवढेंच करून राहिला नाहीं, त्यानें खुद्द चंद्रालाही स्वर्गद्वारांतून हाकून लाविलें व सूर्यालाही त्याचा अयनमार्ग, त्याचा एकूण प्रांत व त्याचें दिनकर्तृत्व हिरावून घेऊन स्वर्गांतून काढून दिलें. अग्नि हा देवांच्या मुखीं आहे असें दृष्टीस पडतांच तो त्यानें आपल्या मुखांत आणून ठेविला. वायूला तर त्यानें तडाक्यासरसा जिंकून आपला ताबेदार करून सोडिलें. नद्यांवर त्यानें अशी कांहीं जबरदस्ती केली कीं, त्यांना समुद्राच्या मुखापासून ओढून आणून दांडगाईनें देहधारी करवून आपल्या आज्ञेंत ठेविलें. याचप्रमाणें आकाशांतील व भूमीवरील सर्व जल आपल्या बसांत आणून त्यानें पर्वतांचे सर्वत्र पहारे ठेवून पृथ्वीचें पालन चालविलें. एवंच, तो दैत्य सर्व लोकांना व्यापून टाकून व सर्व लोकांना भयावह होऊन प्रत्यक्ष ब्रह्मदेवाप्रमाणें स्वतःच सर्व—भूतपति होऊन बसला. सर्व लोकपाल व चंद्र, सूर्य, ग्रह, त्याप्रमाणेंच अग्नि व वायु या सर्वांच्या जागीं आपण एकटाच होऊन त्या युद्धभूमीवर शोभूं लागला. याप्रमाणें लोकांचे उद्भव व लय जेथें होतात अशा परमेष्ठीच्या ( ब्रह्मदेवाच्या ) जागीं जाऊन जेव्हां हा कालनेमी बसला, तेव्हां देव ज्याप्रमाणें ब्रह्मदेवाची स्तुति करितात, त्याचप्रमाणानें दैत्य मंडळीनें त्याची स्तुति आरंभिली.

## अध्याय अठ्ठेचाळिसावा.

—:०:—

### कालनेमी व विष्णु यांचें युद्ध.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें कालनेमीनें सर्व त्रैलोक्य आपलेंसें केलें तथापि त्या दानवाच्या विपरीत आचरणामुळें वेद, धर्म, क्षमा, सत्य व नारायणाचा आश्रय धरून रहाणारी देवी—लक्ष्मी—या पांच गोष्टी मात्र त्याला अनुकूल होतना. त्या जेव्हां हातीं येतना तेव्हां तो दैत्येंद्र रागास चढून विष्णूचेंच स्थान हिरावून घेण्याच्या हेतूनें थेट नारायणाजवळ येऊन ठेपला. तो हातीं शंख, चक्र, गदा घेऊन सुवर्णपंखांनीं युक्त व मस्तकावर तुरा धारण करणाऱ्या कश्यपपुत्र गरुडावर सुखांत बसलेला सजल मेघाप्रमाणें नील कान्तीचा व विद्युल्लतेप्रमाणें तेजस्वी पीतवस्त्र नेसलेला भगवान् नारायण दानवाच्या नाशाकरितां हातांत गरगर गदा फिरवीत असतां त्याचे दृष्टीस पडला. तो कधींही क्षुब्ध न होणारा विष्णु धिमेपणें दैत्यनाशार्थ रणांत उभा राहिलेला पाहून कालनेमी अतिक्षुब्ध होऊन म्हणाला, “ अरे, हाच आमचा पूर्वींच्या मोठमोठ्या दानवांचा व विशेषतः समुद्रवासी मधु व कैटभ यांचा शत्रु. यानेंच युद्धांत जुने जुने बहुत दानव मारिले असून हा युद्धांत पडला असतां आम्हां दैत्य मंडळीकडून याची कंडू कधींही जिरत नाहीं, असा लौकिक आहे. हा अस्त्र घेऊन युद्धांत शिरला म्हणजे फारच निर्दयपणानें वागतो व हा निर्लज्ज तर इतका आहे कीं, त्याला लहान पोराचीच उपमा.

१ येथें “ महत् ” असें एक नपुंसकीं पद सर्व पोथ्यांत आहे त्याचा निर्वाह आम्हास कळत नाहीं.

२ अग्निमुखावै देवाः ( श्रुति ).

या निर्दयानें आम्हां दानवांच्या स्त्रियांचे केश कींहो उतरिले! अदितीच्या पुत्रांत याला विष्णु अशी संज्ञा आहे. एकंदर देवमंडळींत याला वैकुंठ असें ह्मणतात. नागांमध्यें शेषही हाच आहे. ब्रह्मदेवाला स्वयंभु म्हणतात, पण त्याच्याही पूर्वींचा स्वयंभु हाच आहे. हा एकंदर देवांचा पालक असून आमच्या वाइटावर सदा उठलेला आहे. याच्या रागाच्या तडाक्यांत यानेंच हिरण्यकशिपु मारला. याच्या आश्रयाच्या जोरावरच देवमंडळीला यज्ञांत अग्रस्थान मिळालें असून मोठमोठाल्या ऋषींनीं अंग, प्रधान व प्रायश्चित्त अशा तिन्ही होमांत दिलेलें तूप देवांना खावयास सांपडतें. देवांचे जेवढे म्हणून द्वेष्टे आहेत तेवढ्यांच्या मरणाला कारण हाच. युद्धामध्यें आम्हां दानवांचीं कुळेंच्या कुळें धारातीर्थीं पडून याच्याच विराट तेजांत लीन झालीं. देवांकरितां लढाईची वेळ आली म्हणजे हा आपल्या जिवाकडेही पाहात नाहीं; आणि तेजानें केवळ सूर्याप्रमाणें असें आपलें सुदर्शन चक्र सोडितो. आजपर्यंत हा दैत्यांचा म्हणजे काळच ठरून गेला होता. परंतु, त्या दुष्टबुद्धीला म्हणावें कीं, आज मी तुझा काळाचाही काळ उभा राहिलों आहें. आतां तुझ्या मागील एकूण अपराधांचें उट्टें काढितों. योग फार चांगला आला कीं, असल्या या विष्णूची आज माझी प्रत्यक्षच गांठ पडली. आज म्हणावें, माझ्या बाणांच्या तडाक्यानें मऊ होऊन माझ्याच पायां पडशील. हा नारायण दानवांना एक मोठा बागुलबोवाच होऊन बसला आहे. अशाला आज मीं युद्धांत संपविला म्हणजे माझी पूर्वजमंडळी खरोखरच माझ्यावर फुलें टाकितील. हें धेंड एकदां खालीं आणिलें म्हणजे याच्या आश्रितांना तर मीं हां हां म्हणतां नाहींसे करीन. हा विष्णु मोठा लोंचट आहे. हा जन्मोजन्मीं राक्षसांना युद्धांत त्रास देतो. वास्तविक हा मूर्तिरहित. तथापि, पूर्वीं जेव्हां एकार्णवमय सृष्टि झाली त्या वेळीं यानें पद्मनाभरूप घेऊन त्या घोर समुद्रांत ते मधु व कैटभ नांवांचे प्रचंड दानव आपल्या मांडीवर उचलून ठार केले. पुढें अर्धसिंह व अर्धनर असें द्वित्तरूप घेऊन या एकट्यानेंच माझा बाप हिरण्यकशिपु मारिला. देवतांची माता म्हणून गाजलेली जी अदिति तिच्या पोटीं हा शुभलक्षणी बाब्या जन्मास आला. बलीच्या यज्ञांत या बेट्यानें खुजा पोराचें रूप घेऊन तीन पावलें टाकून त्रिभुवन आटलें. इतकें करूनही याचें संपलें नाहीं. आज हा तारकसंग्राम निघतांच हा पुन्हा पुढें आलाच; पण येथें आतां माझ्याशीं गांठ आहे, तेव्हां याच्या देवमंडळीसह याची मी चटणी उडवितों.

याप्रमाणें तोंडास येईल तसें अगडतगड व बेताल बोलून नारायणाची निर्भर्त्सना करून त्यानें आपल्याशीं युद्धाला उठावें अशी तो इच्छा करूं लागला. तो श्रेष्ठ असुर इतकें टाकून बोलला तरी गदाधर कसा तो रागावला नाहीं. कारण, त्याचे अंगांत क्षमेचें अलौकिक बल होतें. तो केवळ हंसून म्हणाला, "हे दैत्या, अरे तुझी शक्ति किती आणि तुझा दर्प किती, हें न पाहातां उगाच रागास चढून तूं जर मर्यादा सोडून भलतेंच अयोग्य बोलतोस तर तूं आपल्याच दोषांनीं मेला आहेस; तुला निराळें मारायचें तें काय? अरे, मी तुला तुच्छ समजतों. तूं मोठा शिरा ताणून बोललास म्हणून कोण डरतो? रांडा थोड्या का गरजतात? त्यांतलाच तूं. अरे, अशा ठिकाणीं मजसारखे पुरुष उभेही राहात नाहींत. हे दैत्या, थांब, तूं काळजी करूं नको. तुला येथें मजसमक्षच तुझ्या पूर्वींच्या वाडवडिलांच्या वांट्याला पाठवितों. अरे, मूळ सृष्टिकर्त्यानें जी

धर्ममर्यादा घालून दिली आहे, ती उल्लंघिल्यावर कुशल कोण राहील? तूं आपली मर्यादा विसरून देवांचे अधिकार चालवूं लागलास, त्या अर्थीं आज तुला नाहींसा करून देवता पूर्वींप्रमाणें मी आपआपल्या स्थानावर स्थापीत करीन.”

वैशंपायन सांगतातः—श्रीवत्सलांच्छन धारण करणारा परमात्मा रणभूमीवर अशीं वाक्यें बोलला असतां त्या दानवानें त्याची थट्टा करून क्रोधानें आपले सास्त्र शतबाहु त्यावर उगारिले. हातीं नानाप्रकारचीं आयुधें घेऊन व क्रोधानें डोळे पहिल्यापेक्षां दुप्पट लाल करून त्यानें श्रीविष्णूच्या छातीवर ताडन केलें. त्याचा घाव पडतांच मय, तारप्रभृति जे इतर दानव होते तेही पट्टे, तरवारी, वगैरे हत्यारें उचलून विष्णूवरच धांवून पडले. याप्रमाणें मोठमोठे बलाढ्य दैत्य सर्व प्रकारच्या आयुधांनीं श्रीविष्णूला ताडन करीत असतांही तो रणांत तिळभर न चळतां एखाद्या पर्वताप्रमाणें अकंप राहिला. मग त्या महासुर कालनेमीनें गरुडाशीं गांठ घातली. त्यानें जीवाचें त्राण करून आपल्या सर्व बाहूंनीं एक भली थोरली भयंकर जळती गदा उचलून गरुडाच्या कपाळावर घातली. दैत्याच्या या कृतीचें विष्णूला फारच नवल वाटलें. डोक्यांत गदा बसतांच तो पक्षी घायाळ होऊन मट्टदिशीं पायांवर भूतळीं पडला. त्या वेळीं श्रीगोपालविष्णूला त्या घोर रणांत त्या दैत्यगणांनीं मातीचीं ढेकळें, शिळा, भाले, वज्रें, इत्यादि आयुधांनीं मारण्याचा सपाटा चालविला. त्या वेळीं श्रीविष्णूचें माथें फिरून त्याचे डोळ्यांपुढें अंधेरी आली. तेव्हां देवांनीं त्याची स्तुति आरंभिली. ती अशीः—“हे महाबाहो, हे मधुकैटभनाशना, आपण आपल्या फाळासारख्या नखांनीं हिरण्यकशिपूची छाती फोडिली, याचें स्मरण ठेवा आणि उठा. आपला जयजयकार असो.” इत्यादि प्रकारें देवांनीं स्तुति केल्यावर रणांत श्रीविष्णु उठून उभा राहिला. इकडे तो पूर्वी मूर्च्छित झाला होता त्याच वेळीं तो संपला असें मानून त्या दानवानें आपला शंख फुंकला, व त्यामागून इतर असुरही लहान मोठे तीन प्रकारचे मृदंग वाजवून त्या तालावर नाचूं लागले. एकंदरींत त्यानें तेथें एक मोठा उत्सवच मांडिला.

विष्णु शुद्धीवर येतांच आपला गरुड घायाळ झाला व आपलें स्वतःचेंही शरीर खराब झालें असें त्याचे दृष्टीस पडलें. त्याबरोबर क्रोधानें डोळे लाल करून त्यानें आपलें सुदर्शन चक्र सरसाविलें. मग त्याचा वाहक गरुड व स्वतः तो या दोघांसही फार चेव चढला, व श्रीविष्णूचे बाहु इतके वाढले कीं, त्यांच्या योगानें दाही दिशा व्यापून गेल्या; आणि केवळ आपल्या तेजानें चतुर्दश लोकांना आक्रांत करण्याचा हेतु मनांत धरून तो परमात्मा असा बेसुमार वाढला कीं, त्यानें धरणी आकाश व दशदिशाही भरून टाकिल्या. याप्रमाणें देवांना जय मिळवून देण्याच्या हेतूनें परमात्मा असा वाढलेला पाहून आकाशांत ऋषिगणांनीं गंधर्वांसह त्या मधुसूदनाचें स्तोत्र गाइलें. परमात्म्याचें तें विराट स्वरूप इतकें विशाळ होतें कीं, त्याच्या किरीटानें आकाश खरडलें जात होतें. त्याचें वस्त्र मेघमंडळाला घांसत होतें. त्याच्या बाहूंनीं दशदिशा खवळल्या होत्या व पावलांनीं धरणी आच्छादिली होती. असलें जगड्वाळ रूप घेऊन त्यानें आपल्या हातीं जें सुदर्शन चक्र घेतलें त्याला सहस्र अऱ्या असून त्याचें तेज सहस्रकिरण सूर्याप्रमाणें फांकलें होतें. तें चक्र म्हणजे शत्रूंचा प्रत्यक्ष काळच होतें; व तें असें भयप्रद असूनही आकारांत इतकें सुबक होतें कीं, त्याला सुदर्शन ( दिसण्यांत सुंदर ) असें तर

नांवच पडलें होतें. त्या चक्राला सोन्याची धांव बसविली असून त्याचा तुंबा हिऱ्याचा होता. आजपर्यंत मारिलेल्या असंख्य दैत्यांच्या मेद, मज्जा, अस्थि व रक्त यांनीं लडबडून गेल्यामुळें तें भ्यासूर दिसत होतें. त्याच्या धांवेला सभोंवार तीक्ष्ण सुऱ्या बसविल्या असल्यामुळें त्याचा तडाका बिनतोड बसे. सुऱ्या असून त्यावर फुलांच्या माळाही गुंफल्या होत्या; व तें एकवार हातून सोडिलें म्हणजे सोडणाऱ्याच्या मनांत असेल तेथें तेथें त्याच्या इच्छेप्रमाणें रूपें घेऊन जात असे. असलें तें अद्भुत चक्र स्वतः स्वयंभूनें अंगींच घडविलें होतें. त्याजकडे दृष्टि जातांच दुष्टांचा सहजच थरार होई. तशांत मोठमोठ्या ऋषींनीं आपल्या सर्व क्रोधाची त्यावर भारणी टाकिली होती. त्यामुळें त्याला नेहमीं युद्ध करण्याविषयीं उसळी आलेली असे. तें फेंकतांच स्थावरजंगम जीवांना मूर्च्छा येत असे. युद्धकालीं त्याच्या कृपेनें मांस खाणारे पशुपक्षी फार संतुष्ट होत. असलें तें सूर्यसम तेजस्वी व अप्रतिम कर्म करणारें चक्र उगारून क्रोधानें लाल झालेला तो लक्ष्मीपति गदाधर आपल्या तेजानें दानवांचें सर्व तेज नाहींसें करून त्या चक्रानें त्या कालनेमीचे सर्व बाहु तोडिता झाला. तेव्हां त्या राक्षसाचीं तीं विक्राळवाणी शंभर तोंडें तोफेप्रमाणें गर्जून हंसूं लागलीं. तेव्हां हरीनें आपल्या सामर्थ्यानें व सुदर्शनाचे साह्यानें तीं तोंडेंही कापून काढिलीं. याप्रमाणें, बाहु व मस्तकेंही तुटून पडलीं. तथापि, तो दानव डगला नाहीं. फांद्यापल्लव कापून जाऊन एखादा थोटा वृक्ष ज्याप्रमाणें उभा असतो, त्याप्रमाणें तो मुंडकीं तुटून उरलेल्या धडानेंच युद्धभूमीवर ठाम उभा होता. तेव्हां गरुडानें आपले मोठाले पंख पसरून व वायूप्रमाणें भरारी घेऊन आपल्या छातीच्या धडाक्यानें त्या कालनेमीला आकाशांतून खालीं पाडिलें. बाहु व मुख छाटिलेला त्याचा तो देह जेव्हां आकाशांतून धरणीवर पडला, त्या वेळीं धरणीतलालाही एक प्रकारची शोभा आली.

या प्रकारें हें दैत्याचें धेंड जेव्हां धरणीवर आदळलें तेव्हां ऋषिमंडळीसहित सर्व देव “ फार नामी, फार नामी ” असें म्हणत विष्णूपाशीं जमून त्याची पूजा करूं लागले. कालनेमीची ही अवस्था झाल्यावर ज्यांचा मिळून त्या युद्धांत कांहीं पराक्रम दृष्टीस पडला होता त्यांची अवस्था अशी झाली कीं, ते परमात्म्याचे सर्वव्यापी बाहूंचे कचाट्यांत सांपडून त्यांची हालचालच बंद झाली. परमात्म्यानें त्यांपैकीं कित्येकांच्या शेंड्या आंवळिल्या; कित्येकांच्या नरड्या दाबिल्या; कित्येकांचीं मुस्कटें फोडिलीं; व कांहींना कमरेंत गच्च आंवळलें. शिवाय परमात्म्याच्या गदाचक्रांच्या तेजानें भाजून गेल्यानें कित्येक निःसत्त्व व निष्प्राण होऊन सर्वही अंगें लुलीं पडून गगनांतून धरणीतलावर कोसळले. याप्रमाणें सर्वही दैत्य मारिले गेले तेव्हां इंद्राला इष्ट ती गोष्ट आपल्या हातून पूर्ण झाली, हें पाहून तो गदाधर आपण कृतकार्य झालों. असें जाणून स्वस्थ बसला. इतक्यांत तो तारकानिमित्त आरंभिलेला घनघोर संग्राम उरकला असें पाहून गंधर्व, अप्सरा व ब्रह्मर्षि यांसह पितामह ब्रह्मदेव त्या स्थळीं येऊन त्या श्रीहरीची पूजा करून म्हणाला, “ हे देवा, आपण आज या दैत्यांना मारून एक फारच मोठी कामगिरी उरकली. देवांना आतां कांटा म्हणून कसा तो ठेविला नाहीं. आपल्या या कृतीनें खरेंच आम्हां सर्वांचा फार फार संतोष झाला आहे. हे विष्णो, तूं जो हा प्रचंड कालनेमी असुर मारिलास

हें कर्म तूंच एकटा करूं जाणस. तुजवांचून याला रणांत पालथा घालणारा दुसरा कोणीच नाहीं. हा किती माजला होता म्हणून सांगूं? यानें सचराचर लोक व सर्व देवगण हे पादाक्रांत करून बिचाऱ्या ऋषींचेंही कांडात काढिलें. इतकेंच नव्हे, तर मलाही गुरकावण्या दाखवूं लागला, म्हणून मी म्हणतों कीं, तूं हा कालतुल्य कालनेमी पाडण्याचें जें अत्युग्र कर्म केलेंस त्यानें मी फार संतुष्ट झालों. तुझें बरें असो. आपण आतां चला स्वर्गास जाऊं. तेथें सर्व ब्रह्मर्षि सभा भरून तुझी वाट पाहात आहेत. हे वाचस्पते, तेथें मी व महर्षि मिळून तुझें यथाविधि पूजन करून दिव्य वाणीनें तुझें स्तोत्र गाणार आहों. मी जर खरें पुसशील तर तुजवर इतका खूष झालों आहे कीं, तुला एखादा वर द्यावा असें माझे मनांत येतें; परंतु, यावद्दैत्यांना, त्याचप्रमाणें देवांनाही तूंच वर देणारा तेव्हां अशा वरदश्रेष्ठाला मीं काय वर द्यावा? आतां मी इतकेंच सुचवितों कीं, आपण त्रैलोक्यांतील सर्व कांटे काढून टाकिले आहेत, तेव्हां आतां हें त्रैलोक्याचें समृद्ध राज्य पुनरपि स्वहस्तें इंद्राच्या पदरांत घालावें."

या प्रकारें ब्रह्मदेवानें सुचवितांच सनातन परमात्मा इंद्रप्रभृति देवांस मंगल वाणीनें म्हणाला, "हे देवहो, तुम्ही जितके कोणी आज येथें जमलां असाल ते सर्व पुरंदराला पुढें करून आपलीं सर्वेंद्रियें माझें वाक्य ऐकण्याविषयीं सादर करून मी काय म्हणतों तें ध्यानांत घ्या. आपण जो हा नुकताच संग्राम संपविला त्यांत इंद्रालाही भारी असे कालनेमिप्रमुख सर्वही असुर नाहींसे केले. मात्र या रट्ट्यांतून दोघेच काय ते निसटले. एक दैत्यश्रेष्ठ वैरोचन (बलि) व दुसरा महाग्रह स्वर्भानु. (तथापि, त्यांची विशेष भीति नको). आतां तुम्हीं पूर्ववत् आपआपल्या दिशांच्या ठिकाणीं अधिकारावर जावें. म्हणजे इंद्रानें पूर्वेस, वरुणानें पश्चिमेस, यमानें दक्षिणेस व कुबेरानें उत्तरेस. चंद्रमानें आपलीं सर्व नक्षत्रें घेऊन यथाकाल, यथायोग त्यांच्यांत संचार करावा. सूर्यानें दक्षिणोत्तर अयनें, संवत्सर व ऋतु यांची मालकी आपणाकडे घ्यावी. यज्ञांत सदस्यांनीं पूजन वगैरे करून आज्यभाग सुरू करावेत. विप्रांनीं वेदांत सांगितलेल्या रीतीनें अग्नींना आह्वान करावें. लोकांनीं पूर्ववत् बलिहोम देऊन देवांचें, वेदाध्ययन करून महर्षींचें व श्राद्ध करून पितरांचें तर्पण करावें. वायूनें आपल्या मार्गानें वहावें, व गार्हपत्य, आहवनीय व दक्षिण या तिन्हीं रूपांनीं अग्नीनें प्रदीप्त व्हावें. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनीं आपआपल्या अंगच्या विशिष्ट गुणांनीं त्रैलोक्याची समृद्धि करावी. दीक्षा देण्यास योग्य असे जे ब्राह्मण असतील त्यांजकडून क्रतु आरंभवावे; व सत्रांत जे कोणी गुंतले असतील त्यांस त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें दक्षणा द्याव्या. सूर्यानें जनदृष्टीला आनंदवावें, सोमानें ओषधींच्या ठिकाणीं रसपरिपोष करावा व वायूनें प्राण्यांचे ठिकाणीं प्राणप्रवृत्ति करावी. एकंदर सर्वांनीं सौम्य व कल्याणकारक असें आचरण करून लोकांचा संतोष करावा. पर्जन्याच्या जलापासून उत्पन्न होणाऱ्या त्रैलोक्याच्या अन्नदात्या ज्या लहानमोठ्या नद्या त्यांनीं पूर्वीप्रमाणेंच आपआपल्या मानाप्रमाणेंच क्रमानें सागराकडे जावें. सर्व देवांनीं आतां दैत्यांपासून कशी ती भीति उरली नाहीं असें समजून स्वस्थपणें असावें. असो; तुम्हां सर्वांचें कल्याण होवो; मी आतां माझ्या सनातन ब्रह्मलोकालाच जातों. जातां जातां एवढें सुचवून ठेवितों कीं, दानव किती झाले तरी मोठे हल-

कट व कपटी आहेत; तेव्हां एकांतांत, लोकांतांत आणि संग्रामांत तर विशेषतःच त्यांचा विश्वास म्हणून कसा तो मानूंच नये. तुम्ही देवमंडळी पडलां सरळ व सौम्य मनाचे. तुम्हांला सदा उजू तो रस्ता दिसत असतो. पण, या दैत्यांचा निश्चय म्हणून कांहीं नाहीं. ते सदा छिद्र शोधीत असतात आणि सांपडतांच टोला हाणतात. याकरितां सदा सावध असा. मीही आपल्याकडून तुमचे-विषयीं जे सदा वैरबुद्धि बाळगितात असे जे दुष्ट दुराचारी असुर त्यांच्या बुद्धीला, हे देवहो, भूल घालून अधर्म हाच धर्म असें भासवीन. ( अर्थात् या योगानें ते बहुधा सहजच नाश पावतील. ) इतक्यांतूनही तुम्हांला अनावर असेंच भय दानवांपासून जर कधीं उत्पन्न झालें तर मी स्वतः अंगीं येऊन तुम्हांला त्यांपासून निर्भय करीन. ( काळजी करूं नका. )"

वैशंपायन सांगतातः—यांप्रमाणें देवमंडळीला सांगून सत्यपराक्रमी व महायशस्वी विष्णु ब्रह्मदेवासह ब्रह्मलोकास गेले. हे जनमेजया, तूं मला तारकासुराच्या युद्धांत दानव व विष्णु यांमध्यें काय काय मौजा झाल्या म्हणून विचारिलें होतेंस त्याचा हा वृत्तांत मीं तुला सांगितला.

## अध्याय एकुणपन्नासावा.

—:o:—

### विष्णूसंबंधीं जनमेजयाचे प्रश्न.

जनमेजय विचारतोः—गताध्यायीं देवदेव जो कमलोद्भव ब्रह्मा त्यासह श्रीविष्णु ब्रह्मलोकास गेले ह्मणून आपण सांगितलें; तर तेथें जाऊन श्रीविष्णूनें काय केलें, व आदिदेव जो कमलयोनी ब्रह्मा त्यानें सर्व देवांनीं व विष्णूंनीं केलेल्या दैत्यवधाबद्दल त्यांचा योग्य सत्कार केला असतांही पुनरपि त्यास ब्रह्मलोकीं नेलें याचा हेतु काय? ब्रह्मलोकांत श्रीविष्णु कोणत्या स्थानीं रहातात, तेथें कोणता योग धारण करून व कोणत्या नियमाचें पालन करीत ते भूतपति तेथें असतात? ते ब्रह्मलोकांत असतांना या सर्व विशाल जगतांत देव, असुर व मनुष्य यांना पूज्य अशी विपुल लक्ष्मी कोठून प्राप्त झाली? श्रीविष्णु ऊष्णकालाचे अखेरीस निजतात व वर्षाकालाच्या अखेरीस जागे होतात[1] हें कसें? व ब्रह्मलोकीं राहून सर्व लोकांचा ते कार्यभार कसा वाहातात? हे विप्रेंद्रा, त्या भगवंताचें तें दिव्य चरित यथातत्व सविस्तर तुझे मुखानें ऐकण्याची इच्छा आहे.

वैशंपायन सांगतातः—हे राजा, परमात्मा नारायण ब्रह्मलोकीं ब्रह्मदेवासह राहून कसा आनंदांत असतो, हें ऐकण्याचे पूर्वी त्या भगवंताची प्रवृत्ति कशी आहे, हें सविस्तर ऐक. बाकी मी तरी त्याची प्रवृत्ति सांगण्यास समर्थ थोडाच आहें, कारण, ती इतकी सूक्ष्म आहे कीं, देवांनाही तिचा थांग लागत नाहीं; तथापि माझे ज्ञानाप्रमाणें मी तुला सांगतों, तें ऐक. हा भगवान् पटांत ज्याप्रमाणें तंतु त्याप्रमाणें पृथिव्यादि सर्व लोकांत आपणच आहे, व तंतूंत ज्याप्रमाणें पट त्याप्रमाणें त्रैलोक्यही याच्यांतच आहे. स्वर्गांतही हा देवरूप आहे आणि देवही याचे स्वरूपांत आहेत. पुष्कळ लोक याच्या अंताचा शोध लावण्याच्या खटपटींत आहेत. तथापि, त्याचा अंतपार त्यांस लागत नाहीं. या माधवाला मात्र सर्व लोकांचा पार माहीत आहे. असा हा देवांनाही अगम्य व मनुष्यांच्या इंद्रियांना तर केवळ

[1] ज्येष्ठ शु० एकादशीचें नांव "योगिनी" आषाढ शु० एकादशीचें नांव "शयनी" व कार्तिक शु० एकादशीचें नांव 'प्रबोधिनी' हीं कशीं सार्थ आहेत तें येथें कळतें.

अंधकाररच ( अज्ञातच ) असा हा परमात्मा ब्रह्मलोकांत असतांना पूर्वी काय घडलें तें ऐक.

मागें सांगितल्याप्रमाणें ब्रह्मदेवाबरोबर ब्रह्मलोकीं गेल्यावर श्रीविष्णूनें प्रथम तें ब्रह्मदेवाचें स्थान मनःपूर्वक अवलोकन केलें. नंतर तेथें असणाऱ्या सर्व ऋषींना मंत्रपूर्वक अभिवादन केलें. तदुत्तर तेथें प्रातःकालीं महर्षि अग्नीचें हवन करीत होते असें पाहून त्या महातेजस्वी विष्णूनें आपलें स्नानसंध्यादि प्रातःकालचें कर्म उरकून अग्नीला वंदन केलें. त्या यज्ञमंडपांत महर्षि अग्नीला घृताहुतींनीं पूजित होते व अग्नि तो यज्ञाहुति प्राशन करीत होता. असें पाहून अग्निरूपानें आपणच हें प्राशन करीत आहों असें त्यानें पाहिलें. नंतर त्या अचिंत्यस्वरूप परमात्म्यानें वंद्य असे जे ब्रह्मवर्चस्वी ऋषि त्यांना वंदन करून त्या सनातन ब्रह्मलोकाला एक फेरी घातली. तों त्याला ब्रह्मर्षींनीं ज्यांच्या मस्तकावर "चषाल[1]" वगैरे चिन्हें बसविलीं आहेत असे शतशः यज्ञीय यूप त्याला आढळले. मग यज्ञभूमींतून फिरत अग्नींत घातलेल्या घृताचा वास घेत घेत व ब्राह्मणांच्या मुखांतून आलेले वेद श्रवण करीत करीत आणि यज्ञाच्या रूपानें सर्वजण आपलेंच आराधन करीत आहेत असें पाहात पाहात तो चालला. वाटेनें त्या यज्ञशालांतील देव, ऋषि व सदस्य हे बोटांत पवित्रकें घालून आणि हातांत अर्घ्यपाद्यादि पूजासामुग्री घेऊन उभे होते. हे राजा, देवांचें जें कांहीं वैभव आहे तें सर्व या जनार्दनापासूनच व देवांपासूनच जें कांहीं कोणाला मिळतेंसें दिसतें तेंही सर्व या जनार्दनापासूनच. ज्ञाते लोक, ही सृष्टि अग्नीषोममय आहे असेंच समजतात. पण ही सृष्टि व तिला व्यापणारे अग्नि आणि सोम हे तरी हा सनातन विष्णुच होय. ज्याप्रमाणें दुधांतून दहीं होतें, आणि दह्यापासून तूप निघतें, त्याचप्रमाणें ध्यानबलानें देहेंद्रियें लीन झालीं असतां अंतरदृष्टीला हा सर्व चराचर लोक जनार्दनापासून निघाला आहे, असें व्यक्त दिसतें. या भूलोकामध्यें ज्याप्रमाणें चेतनव्याप्त जीं इंद्रियें[1] व भूतें त्यांवरून परमात्म्याचें अस्तित्वाचें अनुमान होतें. त्याप्रमाणें देव, वेद व लोक यांपासून श्रीविष्णूचें ज्ञान होतें. ज्याप्रमाणें या पृथ्वीवर देहधारी जीवांच्या इंद्रियांचा सर्वथा पंचमहाभूतांवर अवलंब दिसून येतो त्याप्रमाणेंच स्वर्गामध्यें देवांचें बल व ऐश्वर्य हीं श्रीविष्णूवर अवलंबून आहेत, असें समजतें. असा तो श्रीविष्णु यज्ञकर्त्यांना यज्ञाचें फल देणारा, सर्व पवित्रांचा पवित्र, सर्वतंत्र-स्वतंत्र, लोकांना वागविणारा व ज्या मंत्रस्वरूपाची योग्य स्तुति त्याच्याच मंत्रांशिवाय होणें शक्य नाहीं, अशा त्या परमात्म्याला पाहून ऋषिगण स्वागत करून म्हणाले, "हे सुरश्रेष्ठा, हे पद्मनाभा, हे महाद्युते, हें आह्मीं तुझें यज्ञीय आतिथ्य करीत आहोंत; अर्थात्, याचा आपण मंत्ररूपानें स्वीकार करावा. आम्ही जें हें यज्ञानें पवित्र झालेलें पाद्य आणिलें आहे, असल्या पाद्याचें ग्रहण करण्याला तुजसारखाच पवित्र पुरुष योग्य होय. आम्हीं मंत्रद्वारा ज्याला अतिथी समजून यज्ञाचे ठिकाणीं नित्य आलास हें मानीत होतों, तो तूं आज खराखुराच आमचे दृष्टीस पडलास. हे विष्णो, तूं येथून युद्धाला निघून जातांच आमच्या यज्ञक्रिया बंद पडल्या.

१ ही एक मुसळाच्या वश्वीसारखी लांकडी बांगडी करून यज्ञस्तंभाचे तोंडीं बसविलेली असते.

१ या देहाला जिवंतपणीं पंचमहाभूतांचा बहुधा नित्य संबंध राखावा लागतो; बाहेरचा वायु आंतल्याशीं संबद्ध होण्याचें क्षणभर बंद झाल्यास प्राण व्याकूळ होऊं लागतात. याचप्रमाणें इतर इंद्रियांचें.

कारण, विष्णूचे अविद्यमानीं कोणतीही यज्ञीय क्रिया करण्याविषयीं शास्त्राची आज्ञा नाहीं. यज्ञांतही दक्षिणा वगैरे देऊन तो सांग केला असतांही त्याचें फळ तूं देशील तेंच प्राप्त होतें. आज तूं समक्षच पाहातो आहेस कीं, आह्मी तुझीच यज्ञरूपानें आराधना करीत आहों.

## अध्याय पन्नासावा.

—:०:—

### नारायणाश्रमवर्णन.

वैशंपायन सांगतातः—या प्रकारें त्या ऋषींनीं पूजा केल्यावर तो ईश्वर श्रीहरी आपल्या ब्रह्मलोकान्तर्गत महापुरातन अशा दिव्य नारायणाश्रमांत शिरला. मग स्वतःच्याच नांवानें प्रख्यात असलेल्या त्या आश्रमांत शिरतांच भगवान् नारायणानें युद्धार्थ इतका वेळ हातीं घेतलेलीं सर्व आयुधें एकीकडे ठेवून दिलीं. आणि नंतर सभासदांना व आदिदेव जो ब्रह्मदेव त्यालाही तेथें बोलाविलें. आणि त्याला वंदन करून नंतर आपल्या त्या समुद्रतुल्य आलयाकडे दृष्टि फेंकिली. तें देवगणांनीं व सनातन महर्षींनीं अधिष्ठित असून प्रलयकालीन मेघाच्या अभिमानिनी देवताही तेथें होत्या. शिवाय तेथें नक्षत्रचक्र असून गडद अंधारही होता. व त्या आलयावर देव किंवा असुर यांपैकीं कोणाचाही पराक्रम चालत नव्हता; इतकेंच नव्हे, तर तेथें वायूचा रिघाव नव्हता; तसाच चंद्राचा न सूर्याचा. तो सर्व देश पद्मनाभाच्या केवळ अंगकान्तीनेंच लखलखत होता. असो; अशा त्या आलयांत शिरतांच परमात्मा सहस्र मस्तकें व त्या सर्वांवर जटाभार ( लोककर्मवासनाजालरूपी ) धारण करून शयनावर पडला. पडतांच जिला लोकांच्या अंतसमयाचें पूर्ण ज्ञान असून जी नयनप्रदेशीं फार खुलते अशी कालरूपिणी निद्रा त्या परमात्म्याजवळ तत्काल आली. तेव्हां निर्विकल्प समाधीची तयारी करून तो नियमशील श्रीहरी निस्ताप अशा दिव्य शयनावर निद्रा करिता झाला. तो निद्रिस्त होतांच ऋषिगणांसह देव जगाची पुनरुत्पत्ति व्हावी, हा हेतु मनांत धरून त्या महात्म्या प्रभूची उपासना करूं लागले. तो भगवान् निजला असतां सूर्याप्रमाणें तेजस्वी व ब्रह्मदेवाचें आद्यवसतीस्थान असें एक सुंदर कमल त्याच्या नाभीमध्यांतून उठून आलें. या कमलाला सहस्र पाकळ्या असून त्याचा वर्ण फारच उंची होता. शिवाय, तें सुकुमार असून फारच शोभिवंत दिसत होतें. तो महामुनि परमात्मा निजल्या निजल्याच अखिल लोकांचें युगादि कालचक्र फिरवीत असतो. तें असें कीं, त्या त्या कल्पांतील जो ब्रह्मदेव असेल त्याचे स्वाधीन जिवांचे वासनामय तंतु करून त्याला कामांत साह्य करितो. तो निद्रिस्त असतां त्याच्या उघड्या मुखांतून चालणाऱ्या निःश्वासाबरोबर वाऱ्यानें प्रजांच्या मालिकाच्या मालिका बाहेर येऊन खालींवर पडतात. मग ह्या रीतीनें निर्माण झालेल्या प्राण्यांची ब्रह्मदेव स्वतः वेदांत घालून दिलेल्या रीतीप्रमाणें ब्राह्मणक्षत्रियादि चार वर्णरूपानें व्यवस्था लावितो. नंतर ते प्राणी आपआपल्या मार्गास लागतात. असा हा अविद्याशबलित जो श्रीविष्णूचा निद्रामय योग आहे, याच्या देखील सत्यस्वरूपाची कल्पना प्रत्यक्ष ब्रह्मदेवाला किंवा सनातन ब्रह्मऋषींनाही येत नाहीं. हे पितामहपुरःसर जे ब्रह्मर्षि यांना खरें बोलूं जातां हा परमात्मा कोणत्या स्थलीं किंवा कोणत्या कालीं निजतो किंवा न निजतां मध्येंच उठून आसनावर बसून व्यवहार करितो, याचा कांहींच पत्ता लागत नाहीं. त्याचप्रमाणें या देहांत तरी जागतो कोण, निजतो कोण? अंगीं शक्ति

[1] अज्ञानावरणमय.

असूनही कधीं कधीं अक्रिय असा राहतो कोण, हे भोग भोगतो कोण, देहाचे ठिकाणीं जें तेज खेळतें तें कोणाचें व अणोरणीयान इत्यादि वाक्यांनीं सूक्ष्माहून सूक्ष्मतरत्व जें वर्णन केलें आहे तें कोणाचें, हें तरी कोणाला कळतें आहे ?

देवमंडळी श्रुतिसंमत युक्तींनीं त्याचा पत्ता लावण्याविषयीं रात्रंदिवस खल करीत असतात; तथापि, त्याच्या जन्माचा किंवा कर्माचाही थांग लागत नाहीं. अशा स्थितींत त्या परमात्म्यानें आपण होऊनच आपल्या निःश्वसितरूपानें समजविलेल्या वेदाचा आधार घेऊन मोठमोठाल्या पुराण ऋषींनीं पुराण ग्रंथांत त्याचें चरित गाइलें आहे. देवमंडळी मानवी सृष्टीपेक्षां फार फार जुनी; पण त्या मंडळीच्या कानींही या परमात्म्याचें जें चरित्र म्हणून आहे, तें किती किती तरी जुनें म्हणूनच आहे. हे जनमेजया, या परमात्म्याच्या स्वतःसामर्थ्याचा जो इतिहास आहे, त्या इतिहासानेंच वैदिक व लौकिक गाथा भरलेल्या आहेत. हा लोकनिर्माणकर्ता सृष्टीच्या निर्माणकालीं प्रकट होतो व हा मधुसूदन दानवांना मारण्यासाठीं टपत बसतो, आणि प्रलयकालीं पुन्हा निद्रित होतो. या सुप्तस्थितींत प्रत्यक्ष देवांनाही त्याचेकडे पाहावत नाहीं. ह्या जागृती—सुषुप्तीचा सांवत्सरिक पर्याय म्हणजे दरवर्षी उष्णकाल संपून आषाढी एकादशी आली म्हणजे निजणें व वर्षाकाल संपून कार्तिकी एकादशी येतांच उठणें, असा आहे. वेद, यज्ञ, यज्ञाचीं सर्वांगें आणि यज्ञापासून प्राप्त होणारी गति हीं सर्वही परमात्मरूपच आहेत असें म्हणतात. आषाढामध्यें तो निजला म्हणजे मंत्रानें होणाऱ्या यज्ञक्रिया बंद पडतात, त्या तो पुनः शरदृतूंत कार्तिकांत जागृत झाला म्हणजे सुरू होतात. श्रीविष्णु वर्षाकालांत चतुर्मास जेव्हां निद्रिस्त असतो तेव्हां त्याच्या गैरहजेरींत मेघाधिपति जो पुरंदर इंद्र तो हें वर्षाचक्र चालवितो. हा जो विष्णूचा योगमायाबलानें अकस्मात् प्राप्त होणारा तमोमय निद्रेचा काल तो राजेलोकांना फारच घातक आहे; या कालांत ते परस्पर युद्धादि करून नाश पावतात. ही जी परमात्म्याची योगनिद्रा हिचीच छोटीशी प्रत म्हणजे ह्या पृथ्वीवरील प्राणिमात्राला प्राप्त होणारी व आपल्या बरोबर प्राण्यांच्या आयुष्याचें अर्धे[1] चोरून नेणारी व दिवसाचा नाश करणारी अशी निशा ही होय. या निशेचेंच विशिष्ट स्वरूप निद्रा हें होय. या निद्रेचें सामर्थ्य असें विलक्षण आहे कीं, तिनें एकदां ज्याचे देहांत प्रवेश केला तो किती जरी सशक्त असला तरी त्याला वारंवार जांभया येऊं लागतात, व तिचा वेग अनावर होऊन त्याला एखाद्या महासमुद्रांत बुडल्यासारखें होतें. या भूतलावर लोकांना जी निद्रा येते तिला हेतु दोन. एक तर ती अन्नाच्या कैफानें येते किंवा श्रमामुळें येते. बहुधा पृथ्वीवरील प्राण्यांना उठतां उठतां स्वप्नें पडून या निद्रेचा अंत होतो. व प्राणिमात्राच्या मृत्युसमयीं ही निद्रा हजर राहून त्यांचे प्राण हरण करिते. या बयाचा तडाका इतका विलक्षण आहे कीं, देवमंडळींत देखील एका नारायणाशिवाय इतर कोणालाही तो सहन होत नाहीं. आतां नारायणाला तरी तो सहन होतो याचें कारण असें आहे कीं, सर्वांतक जो हा परमात्मा जनार्दन त्याची ही पक्की मैत्रीणच; कारण, ही त्याच्याच शरीरापासून उत्पन्न झालेली आहे. ही दिसण्यांत मोठी मनोहर आहे, हिचे नेत्र कमलासारखे आहेत आणि ही सर्व लोकांना मोहिनी घालणारी आहे. ही प्रथम नारायणाचे मुद्रेवर दृष्टीस येते आणि नंतर थोड्याच कालांत सर्व जग-

१ आयुर्वर्षशतं नृणां परिमितं रात्रौ तदर्धं गतं ।
—भर्तृहरी.

ताला व्यापून टाकिते. परमात्म्यानें तरी लोकहितार्थच स्वतः हिचें सेवन केलें आहे. हिचें सेवन करण्यांत परमात्म्याला कांहीं कमीपणा नाहीं. कारण, खऱ्या साध्वी स्त्रीची सुखार्थी पतीनें देखील सेवा करणें योग्यच आहे. असो; अशा या निद्रेचें स्वतः पांघरूण घेऊन व निखिल सृष्टीला मोह घालून परमात्मा श्रीविष्णु शयन करितात. या निद्रेमध्यें त्या महात्म्याचीं सहस्त्रावधि वर्षें जातात. या चालू पर्यायांतीलही भगवंताच्या निद्रास्थितींतच सर्व कृतयुग लोटलें, त्रेतायुगही लोटलें आणि द्वापराचीही बहुतेक अखेर आली. परंतु, इतक्यांत प्रजेला बहुत दुःख झालें आहे असें ध्यानीं आणून ऋषिमंडळींनीं स्तुति आरंभिल्यामुळें तो महातेजस्वी परमात्मा जागा झाला.

ऋषि म्हणाले:—हे भगवन्, ब्रह्मदेवासहित सर्व देव आपले दर्शनाची इच्छा करीत आहेत; तर वास घेऊन उपभोगिलेल्या पुष्पमालेप्रमाणें या आपल्या सहज निद्रेचा त्याग करावा. हे हृषीकेशा, हे सर्वही वेदपरायण आणि तपोनिष्ठ ब्रह्मवेत्ते ऋषि तुझी स्तुति करून तुझें स्वागत करीत आहेत. हे स्वयंभो, हे भूतमया विष्णो, या पृथिव्यादि सर्व भूतांच्या अधिदेवता तुजपुढें आल्या आहेत, यांची मंगलवाणी ऐकून घे. हे देवा, हे सप्तर्षि इतर मंडळी बरोबर घेऊन दिव्य आणि योग्य शब्दांनीं तुझी स्तुति गात आहेत. हे कमलाक्षा, हे पद्मनाभा, हे महादेवा, देवांना तसेंच कांहीं महत्वाचें कार्य असल्यामुळें तुझी जरूरी लागली आहे, तर ऊठ.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें स्तुति कानीं येतांच त्या हृषीकेशानें भोंवतीं पसरलेलें सर्व जल आवरून घेऊन व आपल्या भोंवतींचें तमाचें दाट आवरण फोडून तो मोठ्या तेजांत उठून बसला. पहातो तों पितामहासह सर्व देवमंडळी क्षुब्ध होऊन जगत्कल्याणाकरितां आपणास कांहीं विनंति करावी म्हणून आलेली दृष्टीस पडली. त्यांना पाहून तो श्रीहरि डोळ्यांवरून निद्रा साफ गेल्यावर धर्मयुक्त व सहेतुक अशा तात्विक भाषेनें म्हणाला कीं, हे देवहो, तुमची कलागत कोठें उपजली आहे, तुम्हांला कोणाचें भय वाटतें, तुम्हांला कोणाचे साह्याची व कोणाकरितां जरूरी आहे. बरें, या प्रसंगीं माझे हातून होण्याजोगें काय आहे? दानवांकडून तर लोकांना त्रास पोंचत नाहींना? तसें असेल तर मला झटपट सांगा. मी माझी असली गोड झोंप व शय्या सोडून तुमच्या कल्याणासाठीं उठून या ब्रह्मवेत्त्या मंडळींत बसलों आहें, तरी मी तुमच्याकरितां कोणती कामगिरी करूं तें सांगा.

## अध्याय एकावन्नावा.

—:०:—

### श्रीविष्णु व देवमंडळी यांचा संवाद.

वैशंपायन सांगतातः—गताध्यायीं सांगितलेलें श्रीविष्णूचें भाषण ऐकून सर्व लोकांचा पितामह ब्रह्मदेव निखिल स्वर्गवासी लोकांना परम हितावह वाक्य बोलला कीं, हे असुरांतका विष्णो, ज्या अर्थीं कोणतेंही युद्ध उपस्थित झालें असतां तुजसारखा नावाडी रणरूप नदींतून देवांना निर्धोकपणें पार पाडण्यास सदा उभा आहे त्या अर्थीं देवमंडळीला कशाचें भय असणार? याप्रमाणें शत्रूचा निःपात करण्याला तुजसारखा समर्थ सिद्ध असतां व देवांचें आधिपत्य इंद्राकडे असतां धर्मानें चालणाऱ्या मनुष्यांना तरी भयाची कोठेंही जागा नाहीं. यामुळें सर्व मनुष्यें निर्भयपणें धर्मानें व सत्यानें वागूं लागल्यामुळें असल्या धार्मिक प्रजेकडे अकाल मृत्यु नुसती दृष्टि टाकण्याला देखील समर्थ नाहीं.

ही प्रजाजनांची स्थिति झाली. आतां राजांची. राजे लोकही प्रजेपासून धर्मशास्त्रानें सांगितल्याप्रमाणें उत्पन्नाचा सहावाच भाग घेत असल्यामुळें सर्वत्र संतोष राहून राजांस परस्परांपासूनही भय वाटत नाहीं. याप्रमाणें कर देणारे लोकांचे शिव्याशाप न घेतां राजेलोक योग्य करांनीं आपले कोश भरीत असून प्रजेच्या हितासाठीं सतत झटत असल्यामुळें त्यांच्या सत्तेखालील सर्वही वसतीचा प्रांत भरभराटींत आहे. प्रजांना अपराधाबद्दल दंड करणें तोही फार कडक न करितां त्यांवर क्षमा-दृष्टि ठेवून ब्राह्मणादि चतुर्वर्णांचें राजेलोक यथान्याय पालन करीत आहेत. एवंच, राजांपासून कोणाही प्राण्यांना त्रास होत नसून त्यांचे सचिवही त्यांना योग्य मान देत असून चतुरंग[1] सैन्याची आपणापाशीं योग्य बळकटी ठेवून संधिविग्रह इत्यादि जे सहा प्रकारचे राजनीतीचे उपाय सांगितले आहेत, त्या उपायांना धरून राजेलोक चालले आहेत. सर्वही धनुर्वेदांत निष्णात असून वैदिक धर्माचे अभिमानी आहेत. यज्ञाला योग्य काल येतांच यज्ञ करून ते विपुल दक्षिणा वांटतात. स्वतः वेदाध्ययन करून महर्षींचा संतोष करितात. त्याचप्रमाणें यज्ञदीक्षा व नियमादि ग्रहण करून सर्व देवतामय जें परब्रह्म त्याचें तर्पण करितात, व पवित्र अशा अनेक श्राद्ध-क्रियांनीं पितरांचेंही संतर्पण करितात. हे राजेलोक इतके चतुर आहेत कीं, त्यांना विदित नाहीं अशी वेदांत, लौकिकांत किंवा धर्मशास्त्रांत कोणतीही गोष्ट नाहीं. इतकेंच नव्हे, तर हे राजे ब्रह्मर्षींप्रमाणें तेजस्वी असून त्यांना परब्रह्माचा साक्षात्कार झाला आहे व यामुळें पुनः कृतयुगाचा प्रचार करण्याच्या ते उमेदींत आहेत. या राजांच्याच पुण्यबलानें इंद्र सुखावह अशी पर्जन्यवृष्टि करीत असतो. सर्व दिशांनीं धूलिरहित यथाकाल अनुकूल वायु वहात असतात. पृथ्वीवर कोणत्याही तऱ्हेचे उत्पात ( धरणीकंपादि ) होत नाहींत. आकाशांत सर्व ग्रह आपआपल्या मार्गानें सुरळीत चालतात. चंद्रमाही आपल्या सत्तावीस नक्षत्रांशीं यथाकाल संगत होऊन शांतपणें फिरत असतो. सूर्य हा दक्षिण व उत्तर हीं दोन अयनें क्रमून यथाक्रम वसंतादि ऋतु वर्तवीत असतो. हुताशन अग्नि हा नानाप्रकारच्या हवनीय द्रव्यांनीं संतुष्ट होऊन सुगंधोद्गार टाकीत असतो. याप्रमाणें सर्व राजेलोक नीतीनें चालत असून व यज्ञयागादि वाढत्या प्रमाणावर राहून सर्व पृथ्वी संतुष्ट स्थितींत असतांना मनुष्यांना यमाची भीति कशाला पडेल ? ( येथपर्यंत सर्व ठीक आहे; परंतु, या शांततेच्या व भरभराटीच्या स्थितीचा एक प्रतिकूल परिणाम असा झाला आहे कीं,) हे उज्ज्वल कीर्तीचे व एकमेकांच्या सलोख्यानें चालणारे राजेलोक आपल्या पदरीं फार मोठीं सैन्यें बाळगून आहेत; आणि या सैन्यांच्या योगानें वसुधेला पीडा होत आहे. ती इतकी कीं, ही बिचारी पृथ्वी राजांच्या या सैन्यांच्या भारानें अगदीं टेंकीस येऊन बुडूं पाहाणाऱ्या नावेप्रमाणें डबघईस आली आहे. हे कल्पांत अग्नीप्रमाणें जाज्वल्य राजे तिला इतकी पीडा देत आहेत कीं, तिला समुद्रांत स्थिर ठेविणारें जें तिजवरील पर्वतांचें दडपण हें दूर होऊन तिच्यांतून सर्वत्र पाण्याचे फवारे उडूं लागले आहेत आणि त्या योगानें बापडी क्षणोक्षणीं घामाघूम होत आहे. एतावता, या क्षत्रियमंडळीच्या शरीरांनीं, तेजानें, बलानें व मनुष्यांच्या अवाढव्य वस्तीनें ही वसुंधरा अगदीं थकून गेली

[1] हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ हीं सेनेचीं चार अंगें.

आहे. प्रत्येक राजधानींत, प्रत्येक राजा कोटि कोटि सेना बाळगून आहे. प्रत्येकाच्या राज्यांत हजारों लाखों वसतीचे गांव आहेत. राजेही हजारों आहेत. असल्या या असंख्य बलाढ्य राजांनीं, त्यांच्या कोटीसंख्य सैन्यांनीं व ज्यांत लाखों गांव आहेत अशा अनेक राष्ट्रांनीं ही भूमी इतकी व्यापून गेली आहे कीं, तिच्यावर रिकामी जागाच नाहीं. बरें, या संख्येंतून कोणी कमी होतील तर कोठेंही रोगराई नाहीं. अर्थात् काळाला उपास पडत आहेत व धरित्रीची पाठ मोडावयास झाली आहे. ती इतकी कीं, ती बहुतेक निश्चेष्ट होण्याच्या बेतांत आहे. हे विष्णो, याप्रमाणें हिची संकटमय स्थिति झाल्यानें ही उपाशीं मरणाऱ्या काळाला आपल्या बरोबर घेऊन बिचारी माझ्या घरीं आली. पण माझ्यानें तिचें संकट निवारण होईना म्हणून मी तिला आपल्याकडे घेऊन आलों. आतां आपण हिचा पल्ला पोंचवून द्या. ही भूमी म्हणजे मनुष्यांच्या व्यवहाराचा सर्वस्वी आधार आणि अशीला ही दशा प्राप्त व्हावी हें बरें नव्हे. यासाठीं जिकडून ही चिरडली न जातां शाश्वत आधारभूत राहील अशी कांहीं युक्ति करावी. हे मधुसूदना, या धरणीमातेला पीडा होऊं देणें हें मोठेंच दोषावह आहे. तसें झाल्यानें एकतर लोकांचा क्रियालोप होतो व हिलाही पीडा होते. आणि आजकाल मी म्हणतों त्याप्रमाणें या राजांच्या गर्दीमुळें हिला अत्यंत पीडा होत आहे. ही गोष्ट ही अचला म्हणजे चलन न पावणारी व क्षमा म्हणजे सहन-समर्थ अशीं नांवें यथार्थ धारण करणारी असतां आज आपलें स्थान सोडून ( चलन पावून ) व तिचे अंगची ती उपजत क्षमा गमवून व्याकूळ स्थितींत येथें आली, यावरूनच स्पष्ट होत आहे. हिची दुःखाची कहाणी मीं स्वतःही ऐकून घेतलीच आहे व आपल्याही कानीं घातली आहे. तिच्या सांगण्याचा सारांश इतकाच कीं, तिजवरील हा भार कमी झाला पाहिजे. तर तो कोणते रीतीनें करावयाचा त्याची, हे विष्णो, आपण सर्वजण मिळून वाटाघाट करूं.

हें काम मोठेंच विचाराचें येऊन पडलें आहे. कारण, सर्वही राजे सन्मार्गानें चालत असून आपआपल्या राज्याची भरभराट करीत आहेत. प्रजाजनांत इतर तिन्ही वर्ण ब्राह्मणांच्या धोरणांनीं चालत आहेत. खोटा शब्द म्हणून कोठें ऐकूं येत नाहीं. सर्वही वर्ण आपआपल्या धर्मानें चालत आहेत. सर्व ब्राह्मण वेदरत आहेत, व इतर सारे अशा ब्राह्मणांच्या कच्छपीं आहेत. एवंच, भूतलावर सर्वही मनुष्यें आपआपल्या परी धर्माला धरून चाललीं आहेत. तेव्हां अशांची धर्महानी होतां कामा नये आणि आपलें इष्टकार्य तर साधेल अशी तोड काढिली पाहिजे. कारण, ही धरणी हा सज्जनांचा आधार आहे. अतएव, हिला संकटांत ठेवून उपयोग नाहीं, आणि हिला सुखी करणें याला धर्मरक्षणासारखा दुसरा मार्ग नाहीं, ( अर्थात् धर्महानी होतां कामा नये. ) असा सर्वपरी पेंच आहे. त्यास आमच्या मतें या धरणीचा भार दूर करण्याकरितां राजांचा वध करावा असें आहे. यासाठीं, हे महाभागा, आपण या वसुंधरेला पुढें घेऊन या कामीं पक्कें खलबत करण्यासाठीं चला मेरूच्या शिखरावर जाऊं.

हे जनमेजया, याप्रमाणें बोलून विश्वात्मा ब्रह्मदेव धरणीसह ( उत्तराची वाट पाहात ) स्वस्थ बसला.

१ भूर्भूमिरचलानंता रसा विश्वंभरा स्थिरा ।
विपुला गव्हरी धात्री गौरिला कुंभिनी क्षमा ।
— अमरकोश.

## अध्याय बावन्नावा.

—:०:—

### पृथ्वीची विनंति.

वैशंपायन सांगतात:—ब्रह्मदेवानें याप्रमाणें विनंति करितांच तो साभ्र पर्वताप्रमाणें विशाल देहाचा, मेघाप्रमाणें श्याम कान्तीचा आणि मेघाप्रमाणेंच दणदणीत ज्याचा स्वर आहे असा परमात्मा श्रीहरि " बरें आहे चला " असें म्हणून उठला. हे राजा, त्या भगवंतानें मुक्तामणींच्या प्रभेनें उद्दीप्त झाल्यामुळें ज्याला चंद्रयुक्त मेघमंडळाची शोभा आली होती, असें अखंड जटामंडळ मस्तकीं धारण केलें होतें. त्या लक्ष्मीपतीच्या विशाल वक्ष:स्थलावर रोमांच उभे असून आपल्या कान्तीनें उभयस्तनांचीं अग्रें व्यापून टाकणारें असें श्रीवत्सचिन्ह शोभत होतें. नेसू व अंगावर पीत वस्त्रें असल्यानें तो सर्व लोकांचा शाश्वत गुरु संध्याकालचें सतेज मेघपटल अंगावर धारण करणाऱ्या पर्वताप्रमाणें मनोवेधक दिसत होता. असा तो श्यामसुंदर गरुडावर बसून ब्रह्मदेवासह चालला असतां त्याचे रूपाकडे डोळे गुंतून सर्व देवमंडळी मागोमाग चालूं लागली; व अल्पकालांतच ते सर्वही मेरुपर्वतावर जाऊन पोंचले. तेथें सोन्याचे खांब व हिऱ्यांचीं बहिर्द्वारें जिला आहेत अशी सूर्याप्रमाणें चमकणारी व वाटेल तो आकार धारण करणारी दिव्य सभा त्याचे दृष्टीस पडली. या सभेंत सेंकडों विमानें ठेविलीं असून तिच्या भिंतींवरून मनास वाटेल तशीं सुंदर सुंदर चित्रें काढिलीं होतीं. मध्यें मध्यें रत्नांचे पडदे सोडिले असून ठिकठिकाणीं मोठ्या युक्तीनें रत्नें बसवून नक्षीकाम केलें होतें. तेथें सर्व ऋतूंत उत्पन्न होणाऱ्या फुलांची केवळ लूट होती. तिला रत्नांच्या जाळ्या बसविल्या होत्या. असली ही दैवीमाया-रूपी सभा विश्वकर्म्यानें निर्माण केली असून वाटेल त्या स्थळीं संचार करूं शकत होती. अशी ती सभा पाहून सर्वही देवांना फार आनंद झाला आणि ते सर्वजण रीतीप्रमाणें आपआपल्या मर्यादेनें त्या सुंदर सभास्थानीं आपआपल्या जागीं जाऊन बसले. त्यांना बसण्यासाठीं तेथील व्यवस्थापकानें ज्या बैठका दाखविल्या त्यांत कांहीं विमानें, कांहीं आसनें, कांहीं भद्रासनें, कांहीं पीठें, कांहीं चटया व कांहीं गालिचे अशा अनेक जाती होत्या. नंतर ब्रह्मदेवानें प्रभंजन नामक वायूला खडी आज्ञा केल्यामुळें त्यानें सर्व सभासदांना " बोलूं नका " अशी सक्त ताकीद देतांच सर्व सभा नि:शब्द झाली. मग त्या शांत देवसभेपुढें दु:खानें केविलवाणा स्वर काढून धरणी बोलूं लागली.

धरणी म्हणाली:—"हे देवाधिदेवा श्रीविष्णो, ज्या अर्थीं तूंच हें निखिल जगत्, हीं सर्व भूतें व सर्वही भुवनें धारण करितोस, त्या अर्थीं, माझेंही तूंच धारण केलें पाहिजे, हा न्याय आहे. आतां मला लोकांत धरणी म्हणजे धारण करणारी असें म्हणतात; तथापि, त्यांतील खरा प्रकार असा आहे कीं, ज्या कांहीं वस्तु तूं आपल्या तेजानें व बलानें धारण करितोस अशाच वस्तु मग तुझ्या प्रसादानें मी मोठ्या यत्नानें ( बाह्यदृष्टीला ) धारण करितें. हे विष्णो, तुझा ज्याला आधार आहे त्याचेंच धारण मी करितें. इतरांचें करीत नाहीं. बाकी तुझा ज्याला आधार नाहीं अशी सृष्ट वस्तुच नाहीं. हे नारायणा, हे देवा, युगायुगाचे ठायीं लोककल्याणाच्या हेतूनें तूंच माझें भारहरण करीत असतोस. बरें, प्रस्तुत मी भाराखालीं चिरडली जाऊन अगदीं सप्तपाताळ खचत चाललें आहे; याला तरी कारण तुझेंच तेज आहे; आणि या संकटांत आश्रयार्थ मी तुज-

१ पृथ्विक्त्वया धृतालेका देवित्वं विष्णुनाधृता (संध्या).

कडेच आलें आहें. याकरितां हे सुरश्रेष्ठा, माझें रक्षण तूंच कर. बाबारे, जेव्हां जेव्हां मला दानव किंवा दुष्टात्मे राक्षस गांजितात त्या वेळीं सनातनरूप जो तूं त्या तुजकडेसच मी आश्रयार्थ येत असतें, असा माझा नेहमींचा परिपाठ आहे. शेंकडों वेळचा माझा असा अनुभव आहे कीं, सर्व बलिष्ठांत शिरोभूत असा जो तूं त्याला जोंपर्यंत मी मनानें शरण आलें नाहीं तोंपर्यंतच मला भयाची बाधा होत असते. मजवरील कृषि, वाणिज्य व्यवहार, इत्यादि सुरू होण्याचे पूर्वी कमलयोनी ब्रह्मदेवानें मला बांधून टाकून माझा विस्तार कांहींसा कमी करून त्यापासून मातीचे दोन मोठे असुर बनविले. पुढें महात्मा श्रीविष्णु क्षीरसमुद्रांत निद्रिस्त असतां त्याच्या कर्णमलांतून हेच दोघे राक्षस बाहेर आले. आणि काष्ठाच्या भिंतीसारखे निश्चेष्ट उभे राहिले. इतक्यांत ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून प्राणवायु त्यांच्यांत शिरला. तेव्हां ते महा असुर इतके वाढले कीं, त्यांनीं आकाश आच्छादून टाकिलें. ज्यांना प्राणवायु प्राप्त झाला आहे अशा त्या असुरांच्या जवळ जाऊन ब्रह्मदेवानें त्यांना आपल्या हातानें हळूच चेपून पाहिलें. तेव्हां त्यांपैकीं एकजण त्याला मृदु लागला व दुसरा कठीण लागला. मग त्या जलजोद्भवानें त्या दोघांना नांवें दिलीं. तीं अशीं कीं, जो मृदु होता त्याला त्यानें मधु असें नांव दिलें; आणि जो कठीण होता त्याला कैटभ असें नांव दिलें. याप्रमाणें ब्रह्मदेवानें नांवें ठेविल्यावर ते उभय-दैत्य फारच बलगर्वित होऊन व आपणास अजिंक्य समजून त्या सर्वत्र एकच जलमय झालेल्या प्रदेशांत सांपडेल त्याशीं युद्ध करावें या इच्छेनें इतस्ततः भटकूं लागले. भटकतां भटकतां ते ब्रह्मदेवाकडे वळले. त्यांना येतांना पाहून लोकपितामह ब्रह्मदेवानें त्या जलांतच बुडी दिली; आणि पद्मनाभ जो श्रीविष्णु त्याचे नाभीमधून उत्पन्न झालेल्या कमलामध्यें आपण आतां सुरक्षितपणें वसती करावी असें वाटून तो चतुर्मुख तेथें लपून बसला. मग श्रीविष्णु व ब्रह्मा हे दोघेही पाण्याच्या पोटांत अनेक वर्षेपर्यंत निर्भयपणें पडून होते. इकडे हे मधु व कैटभ जलांत भ्रमत होतेच. ते भ्रमतां भ्रमतां कितीतरी वर्षांनीं ब्रह्मदेव जेथें सुरक्षितपणें दडून बसला होता त्या ठिकाणीं प्राप्त झाले. ब्रह्मदेवानें ते प्रचंड व अजिंक्य असे घोर असुर पुढें आलेले पाहून हळूच कमळाचे देंठानें फटकारून विष्णूला जागें केलें. फटकाऱ्यासरशीं तो महातेजस्वी पद्मनाभ तट्कन् उठून शय्येवर बसला. त्या वेळीं सर्व त्रैलोक्य जलमय होऊन सर्वभर एकच समुद्र वाढला होता, अशा स्थळीं श्रीविष्णूचें त्या उभय असुरांशीं घनघोर युद्ध झालें; व तुंबल युद्ध सहस्रावधि वर्षें चालत राहिलें. तरीही ते दोघे असुर युद्धांत थकतना, व त्यांची मस्ती विष्णूच्यानेंही जिरेना. त्यामुळें तें युद्ध आणखीही तसेंच चालू राहिलें. मग एकंदरींत फारच फार काळ लोटला, तेव्हां ते असुर आपण होऊनच प्रसन्न मनानें देव नारायणाला म्हणाले कीं, हे हरे, शाबास. तुझ्या युद्धकौशल्यानें मी फारच खुष झालों आहें आणि म्हणूनच तुझ्या हातून आम्हांला मृत्यु येणें फार श्लाघ्य वाटतें. याकरितां तूं आम्हांला मार. मात्र जेथें धरणी पाण्यांत बुडाली नाहीं अशा स्थळीं आमचा वध झाला पाहिजे. हे देवश्रेष्ठा, आम्हांला तूं मारिलेंस म्हणजे आम्हीं पुढला जन्म तुझेच पोटीं घेणार आहों. कारण, आमच्यासारख्यांना जो युद्धामध्यें हार आणणारा अशाचे ( आज्ञाधारक ) पुत्र व्हावें हें सर्वथा उचित आहे. विष्णूनें त्यांचें म्हणणें स्वीकारून त्या उभय

दैत्यांना जलापासून अधांतरीं वरचेवर आपल्या हातांत उचलून घेऊन तेथेंच चुरडून टाकिलें आणि पाण्यांत फेंकून दिलें. मरून पाण्यांत पडतांच त्या मधुकैटभांचे दोन पृथक् देह होते ते एकरूप झाले; आणि अशा स्थितींत जेव्हां समुद्राच्या लाटांच्या थडका त्यांचे अंगांवर बसूं लागल्या तेव्हां त्यांचे अंगचा सर्व मेद झडून सर्व समुद्रभर झाला. तेव्हां ते दैत्य तेथेंच गडप झाले. मग त्या निष्पाप भगवान् नारायणानें पुनः सृष्टि उत्पन्न केली. त्या दैत्यांच्या मेदानें समुद्रतळीं ही पृथ्वी आच्छादली गेल्यामुळें हिला ( मला ) मेदिनी असें नांव त्या दिवसापासून प्राप्त झालें. सारांश, या पद्मनाभाच्याच प्रभावानें त्या समयीं या जगतीला ( मला ) चिरस्थायित्व आलें. याप्रमाणें पुनः मी जलांत बुडलें असतां, हे भगवंता, आपण वराहरूप धारण करून मार्कंडेय ऋषींच्या देखत मला आपल्या दाढेवर घेऊन वर काढिलें. हे देवहो, यानंतर पुनरपीही बलिदैत्याचे वेळीं याच समर्थ श्रीविष्णूनें तीन पाउलें टाकण्याच्या मिषानें तुम्हां सर्वांसमक्षच मला बलीच्या जाचांतून सोडविलें.

असा हा आजपर्यंतचा इतिहास आहे, व यामुळेंच मी माझ्या सांप्रतच्या कष्टमय स्थितींत अनाथ झाल्यानें या जगताच्या नाथाला, अशरण झाल्यानें या शरणागताचें पालनकर्त्याला, शरण आलें आहें. अग्नि हा सुवर्णाचा हितकर्ता, सूर्य हा गोधनांचा, सोम हा नक्षत्रांचा आणि त्याचप्रमाणें हा नारायण माझा हितकर्ता आहे. मी या स्थावरजंगम विश्वाला धारण करितें; परंतु, ( त्यांतील रहस्य असें आहे कीं, ) मी जेवढें कांहीं धारण करितें तेवढ्या सर्वाला आंतून या नारायणाचा टेंका आहे. (वामनावतारानंतर पुनः ) परशुरामाचे कालींही मी क्षत्रियांचे भारानें गांजून गेलें होतें, तेव्हां जामदग्न्य रामानें माझा भार हलका करण्याच्या हेतूनें रोषाच्या तडाक्यांत एकवीस वेळां मजवरील क्षत्रिय दूर केले, आणि त्या परशुरामानें आपल्या पित्याच्या श्राद्धसमयीं माझे पृष्ठावर रणस्तंभ उभारून तेथें क्षत्रिय राजांच्या रक्तानें माझें संतर्पण केलें आणि नंतर मला कश्यपाच्या हवालीं केलें. मी ज्या वेळीं कश्यपापाशीं गेलें त्या वेळीं नुकतीच क्षत्रियांच्या मांस, मेद, अस्थि व रक्त यांनीं मी भरून गेली असल्यामुळें एखाद्या रजस्वला स्त्रीप्रमाणें माझे देहाला दुर्गंध येत होता. अशा स्थितींत मी अर्थातच लज्जेनें खालीं मान घालून कश्यपासन्निध उभी राहिलें. तेव्हां त्या महर्षीनें मला विचारिलें कीं, "हे पृथ्वि, तूं अशी खालीं तोंड करून उभी कां? व रणांत जिचा भर्ता नुकताच मारला गेला आहे अशा एखाद्या वीरपत्नीप्रमाणें खिन्न कां दिसतेस?" यावर मी लोककल्याणकर्त्या कश्यपांस विनंति केली कीं, हे ब्रह्मन्, महात्म्या परशुरामानें माझे सर्वही पति मारिले व यामुळें शस्त्रांवर जीविका करणारे सर्वही पराक्रमी क्षत्रिय मजवरून नाहींसे झाल्यानें मी केवळ विधवा झालें आहें, व मजवरील नगरें ओस पडलीं आहेत. अशा स्थितींत मला जगावेंसें वाटत नाहीं. याकरितां, हे भगवंता, आपणासारखा कोणी समर्थ राजा मला पति करून द्या म्हणजे सागरानें वेढिलेली जी मी त्या माझें मजवरील ग्रामनगरांसह तो रक्षण करील. अशी माझी विनंति ऐकतांच "फार बरें आहे" असें म्हणून त्या भगवान्

१ मुळांत "अग्निः सुवर्णस्य गुरुः गवां सूर्यो गुरुःस्मृतः। नक्षत्राणां गुरुः सोमो मम नारायणो गुरुः॥" असा श्लोक आहे; व यांत गुरु शब्दाचा अर्थ "कारण" आणि "गवां" शब्दाचा अर्थ "किरणांचें" असा नीलकंठांनीं दिला आहे व तो ठीकच आहे.

कश्यपानें मला मानवेंद्र जो मनु त्याचे स्वाधीन केलें. नंतर त्या मनूपासून देवतुल्य असा इक्ष्वाकूचा वंश माझा पालनकर्ता झाला; व तेव्हांपासून बहुत कालपर्यंत एका पृथ्वीपतीपासून दुसऱ्याकडे अशी मी जात आलें. सारांश, मी त्या बुद्धिमान् मनूच्या अर्पण झाल्यापासून महर्षितुल्य कुलांत अशा सहस्रावधि राजांनीं मला भोगिली. किती तरी शूर क्षत्रिय मला आपलीशी करून शेवटीं स्वर्गास गेले. कित्येक कालाच्या तडाक्यांत सांपडून माझेच ठिकाणीं नष्ट झाले. युद्धांत कधींही माघार न खाणाऱ्या क्षत्रियांचे मत्प्राप्त्यर्थ आजपर्यंत कितीदां तरी झगडे झाले आणि अजूनही चालू आहेतच. हे भगवंता, या सर्व घडामोडी आपण घालून दिलेल्या दैवरूपी नियमाचाच परिपाक आहेत; व राजांनीं युद्ध करून त्यांत वध पावावें ही योजना तरी जगद्धितार्थ आपणच केलेली आहे. असो; मी भारावून गेलें आहें. यासाठीं माझा भार हलका करावा अशी जर मजविषयीं आपणास दया येत असेल तर, हे श्रीमंता, हे चक्रधरा, आपणच मला अभय दिलें पाहिजे. ( कारण, या कामीं अन्य कोणीही समर्थ नाहीं.) हे देवहो, मी भारानें गांजलें असतां आश्रयार्थ ज्या विष्णूकडे आलें, त्याचे मनांत जर माझा भार दूर करण्याचें असेल तर त्यानेंच रोखठोक मला काय तें सांगावें."

## अध्याय त्रेपन्नावा.

—:०:—

### देवतांचे अंशावतार.

वैशंपायन सांगतातः—ती सर्वही देवमंडळी धरणीचें तें वाक्य ऐकून तिचा इष्ट हेतु सिद्धीस जाण्याकरितां काय केलें पाहिजे हें ठरविण्यासाठीं पितामहाला बोलले:—हे भगवन्, तुम्हीच सर्व लोकांना शरीर देणारे व तुम्हीच सर्व लोकांचे स्वामी आहां. याकरितां या धरणीला झालेला अतिशय भार तुम्हींच दूर करावा हें न्याय्य आहे. तर ही गोष्ट म्हणजे पृथ्वीचें कल्याण करण्याकरितां राजे लोकांत झगडा सुरू करणें हें जर आपल्याला आम्हांप्रमाणेंच संमत असेल तर त्या कार्याचे सिद्ध्यर्थ आम्हांपैकीं कोणी कोणत्या रूपानें आपल्या तेजाचें अंशावतरण पृथ्वीवर करावें तें आपणच आम्हां सर्वांना सांगावें. आमचेपैकीं महेंद्रानें काय करावें, त्याचप्रमाणें यमानें, वरुणानें, कुबेरानें, स्वतः नारायणानें, चंद्रानें, सूर्यानें, बारा आदित्यांनीं, आठ वसूंनीं, एकादश रुद्रांनीं, देववैद्य अश्विनीकुमारांनीं, स्वर्गस्थ साध्यांनीं, बृहस्पतीनें, शुक्रानें, कालानें, कलीनें, महेश्वरानें, कार्तिकस्वामीनें, यक्षांनीं, राक्षसांनीं, गंधर्वांनीं, चारणांनीं, महा उरगांनीं, पक्ष्यांनीं, पर्वतांनीं, तरंगयुक्त सागरांनीं किंवा गंगाप्रभृति दिव्य नद्यांनीं, कोणत्या रीतीनें आपले तेजाचा अंश धरणीवर पाठवून कोणती कामगिरी करावी हें आपणच त्वरित सांगा. आमचें मत विचाराल तर असें आहे कीं, जे कोणी अंतरिक्षांत किंवा पृथ्वीवर राजे आहेत आणि त्याचप्रमाणें सदस्य ब्राह्मण आणि इतर उंची कुळें आहेत अशांत योनिसंबंधावांचून आम्ही आपले देह प्रकट करून पृथ्वीवर संचार करूं.

याप्रमाणें सर्व देवमंडळीचा एकोप्यानें झालेला निश्चय श्रवण करून देवमंडळांत बसलेला ब्रह्मदेव म्हणाला कीं, हे देवश्रेष्ठहो, फार नामी. तुमचाच निश्चय मला संमत आहे. तुम्ही आपल्या तेजाचा अंश पृथ्वीवर पाठवून तेथें हुबेहूब येथल्याप्रमाणें शरीरें उभीं करा; आणि सर्व त्रैलोक्यांतील सौभाग्य गोळा करून

आणून या धरणी देवीला शोभिवंत करा. आतां या बाबतींत मीं काय केलें आहे तें, ऐका.

पृथ्वीला आजचें हें संकट प्राप्त होणार हें मला पूर्वींच कळून चुकलें होतें. यामुळें पृथ्वीवरील भारतवंशांत मीं पुढील उद्दिष्ट कार्यसाधनांचा बीजारोप करून ठेविला आहे. कसा तो ऐका. पूर्वी मी पूर्वसमुद्राच्या पश्चिमतीरावर माझा पुत्र महात्मा कश्यप याजबरोबर जुन्यापान्या कथा व लोकांत आणि वेदांत घडलेले इतिहास व पुराणांतून सांगितलेल्या चांगल्या चांगल्या गोष्टी बोलत बसलों होतों, अशा वेळीं मेघकारक वायूला बरोबर घेऊन गंगेसह मूर्तिमान् समुद्र मजपाशीं आला. त्या वेळीं त्या समुद्राची गति जोरानें उसळणाऱ्या लाटांनीं विषम झाली होती. जलजंतूंच्या योगानें चित्रविचित्र झालेलें असें जलरूपी वस्त्रानें त्याचें शरीर झांकलें असून त्याच्या त्या निर्मल शरीरावर शंख, मौक्तिकें आणि प्रवालवल्ली यांचीं भूषणें होतीं. बरोबर पूर्णचंद्र होता. अशा थाटांत सजलमेघाप्रमाणें गर्जना करीत आपल्या ठरीव मर्यादेला ओलांडून व आपल्या खारट आणि चंचल अशा जलौघानें मला भिजवून अर्थात्, माझी एकप्रकारें अमर्यादा करून मी बसलों होतों, त्या स्थलाला बुडवून टाकण्याच्या इच्छेनें तो तेथें आला. त्या वेळीं त्याला जरा झटक्यानेंच दटावून म्हटलें कीं, ' शांत हो. ' देव हो, काय सांगावें माझे ' शांत हो ' हे शब्द कानीं पडतांच तो वाढलेला समुद्र झटदिशीं संकोच पावला, आणि आपले वाढलेले ओघ व तरंग एकत्र आंवरून राजतेजानें चमकतच माझे पुढें उभा राहिला. त्या वेळीं, हे देव हो, तुमचें हित मनांत आणून मतलबी दृष्टीनें मी त्या समुद्राला गंगेसह शाप देऊन म्हटलें कीं, हे समुद्रा, ज्या अर्थीं तूं राजकीय थाटानें येऊन मजपुढें उभा राहिला आहेस त्या अर्थीं ( तुला राजत्व आवडतेंसें दिसतें; तर ) तूं भारतांच्या कुळामध्यें जा म्हणजे तेथें तुझ्या स्वतेजानें व सहजलीलेनें तूं लोकांचा पोषणकर्ता आणि भरतकुलांत अग्रयायी असा राजा होशील. ज्या अर्थीं मी तुला शांत हो असें म्हणतांच तूं तनुत्वाला ( संकोचाला ) प्राप्त झालास, त्या अर्थीं तूं भारत कुलांत शंतनु या नांवानें प्रसिद्ध होशिल; आणि तुजबरोबर असलेली ही सर्वांगसुंदरी व दीर्घापांगी सरिच्छ्रेष्ठा रूपवती गंगा तुझे सोबतीस येईल.

याप्रमाणें, माझी शापवाणी ऐकून समुद्र क्षुब्ध होऊन मला म्हणाला, ' हे देवाधिदेवा प्रभो, मला आपण कां बरें शाप द्यावा ? मी तर आपला आज्ञावर्ती, आपलाच किंकर, आपणच निर्माण केलेला व आपणालाच अत्यंत मानणारा, असें असतां आपल्या पुत्राला—मला अयोग्य वाक्यांनीं आपण शाप दिला यांत हेतु काय ? आपण म्हणाल, 'मी उसळून आपल्या आंगावर आलों.' तर पर्वकालीं माझा वेग वाढून मी चलन पावावें ही आपलीच कृपा आहे. तेव्हां माझा वेग वाढत असतां वाऱ्याच्या थपडींनीं माझें पाणी उसळून पर्वकालीं आपणास स्पर्श झाला. यांत आपण मला शाप द्यावा इतका अपराध कोणता ? मी काय करूं ? एकतर चोहोंकडून फार मोठें वारें उसळलें, मेघांनींही गर्दी केली आणि तशांत पौर्णिमेच्या पूर्णचंद्राचें मजवर आकर्षण पोंचलें, अशा या तीन कारणांनीं मीं उसळलों. यांत जरी मजकडून तुझा अपराध झाला असला तरीही तो तूं निर्माण केलेल्या कारणांनींच झाला हें ध्यानीं घेऊन, ब्रह्मन्, मला क्षमा करून आपला शाप परत घ्यावा. मला तर आपणावांचून आधार नाहीं; आणि शिवाय मी आपल्या शापामुळें अगदींच लटका पडून गेलों आहें. याकरितां,

हे देवेशा, आपण न्यायमर्यादा पाळीत असाल तर मजवर करुणा करा. विशेषतः या देवगंगेला तरी आपल्या आज्ञेनुसार धरणीवर जाणें माझ्या दोषांनीं संपृक्त झाल्यामुळेंच येणार आहे. तर हिजवर तरी आपण कृपादृष्टि करावी.' याप्रमाणें शापाग्नीनें त्रासून गेलेल्या त्या महार्णवाची विनंति ऐकून मी फार कोमल वाणीनें त्याला बोललों कीं, हे महोदधे, मी तुजवर प्रसन्न आहें, भिऊं नको, शांत हो. तुला हें माहीत नाहीं. परंतु, हे सरित्पते, तुला मीं जो शाप दिला यांत माझा देवांची कांहीं पुढील कामगिरी साधण्याचा हेतु आहे. तर तूं आतां हें आपलें समुद्ररूप सोडून भारतवंशांत जा आणि तेथें आपल्या तेजानें आपल्याला मनुष्यदेह निर्माण कर. म्हणजे, हे जलपते, तूं त्या भारतवंशांतील राजा होऊन राजकीय वैभवानें युक्त होत्साता चारी वर्णांचें यथान्याय पालन करीत मोठ्या सुखानें राहाशील. तुजबरोबरच ही सर्वांगसुंदरी सरिद्वरा गंगा उत्कृष्ट रूप घेऊन तुझ्या सेवेंत तत्पर राहील; आणि हे सागरा, माझे आज्ञेवरून याप्रमाणें राजकुळांत या सुंदरी जान्हवीसह दंग झालास म्हणजे मी तुला शाप दिल्याबद्दल आज जें वाईट वाटत आहे तें सर्व तूं विसरून जाशील. याकरितां, हे सरित्पते, आतां तूं माझे आज्ञेप्रमाणें वागण्यास विलंब लावूं नको, त्वरा कर; आणि भारतवंशीं प्रकट होऊन या गंगेबरोबर शास्त्रोक्त प्राजापत्य विधीनें लग्न कर. स्वर्गांतून तुमच्या पूर्वींच आठही वसू भूतलीं जाऊन बसले आहेत. त्यांस मनुष्ययोनींत येणें अवश्य आहे. त्यांची सोय लागावी म्हणूनच मी तुला या विवाहाची आज्ञा केली आहे. हे सर्वही वसू देवांचे मोठे आवडते आणि अग्नितुल्य तेजस्वी आहेत. करितां या आठहीजणांना या तुझ्या स्त्रीनें म्हणजे गंगेनें आपले उदरीं अपत्यरूपानें जन्म द्यावा. एवढी कामगिरी तुम्हीं दंपत्यांनीं झटपट करून कुरुकुलाची वृद्धि केली म्हणजे तत्काळ तो मानवदेह सोडून, हे सागरा, तूं आपल्या पूर्वरूपास प्राप्त होशील.

हे देवश्रेष्ठहो, या पृथ्वीला राजमंडळाचा भार होऊन संकट प्राप्त होणार हें भविष्य मला अगोदरच कळलें असल्यामुळें मीं आतां सांगितल्याप्रमाणें समुद्राला आज्ञा देऊन तुमच्या हितार्थाची अशी आगाऊ योजना करून ठेविली होती; व या योजनेप्रमाणें आजकाल पृथ्वीवर जो शंतनूचा म्हणून वंश चालू आहे त्याची स्त्री मीं रुजत घातली. या गंगेचे पोटीं जे देव व अष्टवसु जन्मले त्यांतील सात हे पूर्ववत् देवरूप होऊन आपणांत मिसळले. तथापि, यांपैकीं आठवा ज्याला गांगेय किंवा भीष्म म्हणतात तो अजून धरणीवर मागें थांबला आहे. शंतनूनें या गंगेशिवाय सत्यवती नांवाची दुसरी एक स्त्री केली होती. तिचे ठिकाणीं त्यानें आपलेंच प्रतिशरीर असा विचित्रवीर्य नांवाचा मोठा तेजस्वी पुत्र उत्पन्न केला. हा मोठा प्रतापशाली राजाही झाला. या विचित्रवीर्याचे दोनच पुत्र सांप्रत धरणीवर विद्यमान् आहेत. या विख्यात पुरुषश्रेष्ठांचीं नांवें:—धृतराष्ट्र आणि पाण्डु. यांपैकीं पाण्डूला सौभाग्यसंपन्न अशा सुलक्षणी दोनच स्त्रिया असून एकीचें नांव कुन्ती व दुसरीचें नांव माद्री. या दोघीही देवांगनेतुल्य रमणीय आहेत. धृतराष्ट्र राजाला गांधारी नांवानें प्रसिद्ध अशी एकच स्त्री आहे. ही मोठी पतिव्रता असून सर्वदा आपल्या पतीच्या इच्छेप्रमाणें तंतोतंत वागत असते. हे जे पाण्डु आणि धृतराष्ट्र म्हणून दोघे राजे सांगितले, यांच्या पुत्रांचा मोठा भयंकर संग्राम होणार आहे व त्या संग्रामार्थ उभयतांत पक्ष विपक्ष अशा फळ्या पडणार आहेत आणि मग या उभय भाऊबंधांत

वडिलार्जित राज्याच्या विभागासंबंधें झगडा सुरू झाला म्हणजे त्या झगड्यांत बहुतेक सर्व राजांचा संहार होणार आहे. हा प्रकार सुरू होईल त्या वेळीं प्रत्यक्ष कल्पान्तसमय येऊन ठेपल्याप्रमाणें सर्व प्रजेला मोठेंच भय उद्भवेल. एकापेक्षां एक बलाढ्य राजे आपआपल्या सैन्यासह परस्परांची मस्ती जिरविण्याच्या भरीं भरले म्हणजे त्या नादांत या पृथ्वीवरील आजकाल मनुष्यसंख्येनें गजबजून गेलेलीं पुरेंच्या पुरें आणि राष्ट्रेंच्या राष्ट्रें रितीं पडून या धरित्रीला सांप्रत झालेला भार हलका पडेल. मीं केव्हांच पाहून ठेविलें आहे कीं, द्वापरयुगाचे अंतीं शस्त्रघातानें राजेलोक आपल्या प्रजेसह नाश पावतील. रणांगणीं शस्त्राचे घायांतून थोडे बहुत जे कोणी उरतील, त्यांस ते रात्रीं शिबिरांत गाफिल होऊन निद्रिस्त पडले असतां शस्त्रतेजोरूपी अग्नीनें, शंकराचा अंशावतार जो अश्वत्थामा तो जाळील. याप्रमाणें केवळ यमालाच शोभणारें असलें हें मनुष्यवधाचें क्रूर कृत्य पुरतें झालें म्हणजे मी तिसरें म्हणजे द्वापरयुग समाप्त झालें असें म्हणेन. शंकराचा अंशावतार जो अश्वत्थामा तो युद्धांतून एका बाजूला सरला म्हणजे मग शंकराचे युगाला म्हणजे शेवटल्या कलियुगाला प्रारंभ होईल. हें युग फारच दारुण होणार आहे. कारण, या युगांत मनुष्यमात्राची प्रवृत्ति अधर्माकडे विशेष व सद्धर्माकडे फार अल्प राहील. सत्याची ओळख बहुतेक बुजाल्यासारखी होऊन असत्याचा सांठा मात्र फार वाढेल. बहुतेक सर्व लोक शंकर किंवा कार्तिकस्वामी या दोन देवांचे उपासक होतील, व कोणालाही म्हातारे लोक फार आढळणार नाहींत. असा प्रकार होणार आहे.

हे देवहो, एतावता माझ्या समजुतीनें आपण आतां ज्या उपायाविषयीं बोललों हाच उपाय पृथ्वीवरील राजांचा क्षय करण्यास फार उत्तम आहे, व म्हणून हा सिद्धीस जाण्याकरितां त्वरा करून तुम्हीं आपआपल्या तेजाच्या अंशानें अवतीर्ण व्हा. त्यांतले त्यांत योजना अशी कीं, धर्माचा जो अंश आहे तो कुंती आणि माद्री यांचे ठिकाणीं योजावा; आणि भावी संग्रामाला हेतुभूत होणारा असा जो कलीचा अंश तो गांधारीचे ठिकाणीं योजावा. असें केलें असतां एकीकडे धर्म आणि एकीकडे कलि असे दोन जंगी पक्ष होऊन कालप्रेरणेमुळें सर्वही राजांना पृथ्वीबद्दल लोभ उत्पन्न होऊन युद्ध करण्याविषयीं मोठी उत्कंठा होईल. एकंदरींत या सर्व राजांचे बळी पडण्याचा हा सुप्रसिद्ध उपाय योजिला आहे. तर आतां या लोक-धारिणी पृथ्वीनें निश्चितपणें आपल्या पूर्वस्थानीं जावें. ब्रह्मदेवाचें हें वाक्य ऐकतांच पृथ्वी ज्याप्रमाणें कालाला पुढें करून ब्रह्मदेवाकडे आली होती त्याचप्रमाणें ती राजांच्या संहारार्थ त्याच कालाला पुढें करून आपल्या पूर्वस्थलीं गेली.

इकडे ब्रह्मदेवानें देवद्वेष्ट्यांचा निग्रह करण्याविषयीं देवमंडळीला आज्ञा केली, आणि त्याचप्रमाणें पुराणऋषि जो नर, तसाच धरणीधर्ता--शेष, सनत्कुमार, साध्य, अग्निप्रभृति देव, वरुण, यम, सूर्य, चंद्रमा, गंधर्व, अप्सरा, रुद्र, आदित्य व अश्विनौ देव या सर्वांसही आज्ञा केली. त्या आज्ञेप्रमाणें सर्वही देवांनीं आपले अंश धरणीवर पाठविले. मीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें देवांनीं पृथ्वीतलावर कांहीं योनिसंभव व कांहीं अयोनिसंभव अशीं रूपें घेऊन दैत्यदानवांचे निःपातकर्ते पुरुष निर्माण केले. या पुरुषांत कांहीं राजणीच्या वृक्षाप्रमाणें विस्तीर्ण शरीराचे होते. कांहींचीं शरीरें वज्रासारखीं घट्ट होतीं. कांहींना दहा सहस्र हत्तींचें बळ असून कांहींच्या अंगांत एखाद्या प्रवाहा-

प्रमाणें रग होती. कांहींकांचे भुज परिघाप्रमाणें दीर्घ व मांसल असून मोठमोठाल्या गदा, परीघ व शक्ति आपल्या हातांनीं सहज फिरवूं शकत. गदेचा खेळ तर सर्वांनाच साधला होता, आणि त्यामुळें ते मोठाल्या पर्वतशिखरांचा तेव्हांच चुराडा करून टाकीत. या प्रकारचे शेंकडों हजारों पुरुष वृष्णिवंशांत उत्पन्न झाले. त्याच मासल्याचे कुरु व पंचाल राजवंशांत झाले. कांहीं देव समृद्ध आणि यज्ञकर्त्या अशा ब्राह्मणांच्या कुळांत निपजले. ब्राह्मण-कुळांत येऊनही ते मोठे धनुर्धर व शस्त्रास्त्रांचे पूर्ण माहितगार होते. शिवाय ब्राह्मण या नात्यानें वेदाचें पारायण करणें, यज्ञयागादि पुण्यकर्में करणें, हेंही त्यांच्या अंगीं असून त्यांस सर्व प्रकारची अनुकूलता होती. त्यांचें सामर्थ्य इतकें होतें कीं, ते रागावले असतां पर्वतांना हालवून सोडितील, धरणी फाडून टाकितील; आकाशांत उड्डाण करितील किंवा महासमुद्राला हालवितील.

याप्रमाणें त्या देवमंडळीच्या अवतार-स्वरूपांचें वर्णन करून व त्याप्रमाणें देवांस आज्ञा देऊन तो भूतभविष्यवर्तमानाचा स्वामी ब्रह्मदेव सर्व लोकांची व्यवस्था भगवान् नारायणाचे स्वाधीन करून आपण शान्तीचा आश्रय करिता झाला.

हे जनमेजया, यापुढें प्राणिमात्रांचा हित-कर्ता प्रभु नारायण प्रजेच्या कल्याणासाठीं भूतलीं ययातिवंशांतील वसुदेवाच्या पूज्य कुलांत निर्माण होऊन कसकसें यश संपादन करता झाला, तें सांगतों ऐक.

## अध्याय चौपन्नावा.

—:०:—

### नारदवाक्यवर्णन.

वैशंपायन सांगतातः—पुढें कोणती कामगिरी करावयाची याबद्दलचीं वाटघाट पुरी होऊन तो काळ जातांच सर्व देवांनीं आपआपल्या अधिकारा-नुरूप भारतकुलामध्यें अंशावतरण करून (पाण्डव-रूपानें) धर्म, इंद्र, वायु, दोघे देववैद्य अश्विनौदेव व सूर्य हे प्रकट झाले. देवांचा पुरोहित बृहस्पति द्रोणाचार्यांच्या रूपानें पाण्डवांपूर्वींच प्रकट झाला. तसाच अष्टवसूंतील आठवा हा भीष्मरूपानें अगोदरच धरणीतलावर अवतीर्ण झाला होता. त्याचप्रमाणें विदुररूपानें मृत्यूचा अंश, दुर्योधन-रूपानें कलीचा अंश, भूरिश्रव्याच्या रूपानें शुक्रा-चा, अभिमन्यूच्या रूपानें सोमाचा, श्रुतायुधाचे रूपानें वरुणाचा, अश्वत्थामाचे रूपानें शंकराचा, कणिकाच्या रूपानें मित्राचा, धृतराष्ट्राच्या रूपानें कुबेराचा व देवक, उग्रसेन, दुःशासन, इत्यादि-कांच्या रूपांनीं गंधर्व, उरग, यक्ष यांचे अंश गगनांतून खालीं येऊन धरणीतलावर प्रकट झाले असतां नारायण परमात्म्याच्या अंशरूपानें सदैव असणारा नारदमुनि देवसभेंत प्राप्त झाला. या नारदमुनीची अंगकान्ति जळत्या अग्नीप्रमाणें जाज्वल्य असून त्याची दृष्टि बाल-सूर्याप्रमाणें तेजस्वी होती. मस्तकीं डाव्या बाजूनें फिरविलेलें असें विपुल जटांचें मंडळ होतें. अंगावर चंद्रकिरणाप्रमाणें शुभ्र वस्त्रें असून सुवर्णाचीं भूषणें होतीं. एखाद्या प्रिय-सखीसारखी बगलेला चिकटून वीणा घेतली होती. उत्तरीयाला जोडून एक कृष्णाजिन होतें व एक सुवर्णाचें यज्ञोपवीत होतें. हातीं दंडकमंडलु असून अधिकारानें तो केवळ इंद्रा-प्रमाणें दिसत होता. कोणाची कोठेंही आणि कितीही गुप्त गोष्ट असो, ती फोडण्यांत स्वारीचा हातखंडा असे; व ज्याप्रमाणें आका-शांत धूमकेतु दिसला म्हणजे कांहींतरी अनर्थ होणार असें अनुमान काढितात त्याचप्रमाणें या मुनींची मूर्ति कोठेंही गेली कीं, तेथें लवकरच कांहीं कलागत होणार असें समजलें

जात असे. तो चारही वेदांचा पाठ करीत असून आद्य ऋत्विजांपैकीं उद्गाता होता. त्याची महर्षींत गणना असून तो मोठा ज्ञाता व गायनकलेंत निपुण होता. त्या ब्राह्मणाला भांडणाची फार आवड; पक्का कण्या टाकून कोंबडीं झुजविणारा. कोणाही दोन पक्षांत वैमनस्य येऊन झोंबी सुरू झाली कीं, या बहाद्दराला मौज वाटावयाची. किंबहुना हा ब्रह्मदेवाचा पुत्र दुसरा मूर्तिमान् कलीच होता. देव आणि गंधर्व मंडळींतील हाच महामुनी आदिवक्ता. असा हा ब्रह्मर्षि नारद अक्षय ब्रह्मलोकांत फिरत असतां या वेळीं देवसभेंत येऊन व्याकुलतेनें विष्णूस म्हणाला, ' हे विष्णो, पृथ्वीवरील राजांचा संहार करण्याच्या उद्देशानें देवांनीं आपआपलें अंशावतरण भूलोकीं केलें आहे; परंतु, माझ्या समजुतीनें तें सर्व व्यर्थ आहे. कारण, मला असें वाटतें कीं, पृथ्वीवरील हें सर्व क्षत्रियमंडळ तुझ्या आधारावर उभें आहे; आणि याकरितां याचा संहार करणें ही कामगिरी तुम्हां नरनारायणांनाच योग्य असें मला दिसतें. हे देवाधिदेवा, तुला प्रत्येक गोष्टींतलें खरें तत्त्व कोणतें हें बरोबर दिसत असतें. हें जर खरें आहे तर, हे देवा, तुझ्यासारख्या जाणत्यानें बिचाऱ्या पृथ्वीची असली महत्वाची कामगिरी इतरेजनांवर परस्पर टोलवून द्यावी हें योग्य नाहीं. कारण, हे देवा, सर्व डोळसांचा डोळा तूं. समर्थांचें श्लाघ्य सामर्थ्य तूं. योगयुक्तांत श्रेष्ठयोगी तूं व गतिमंतांची गति तूं. अरे, तूं मोठा समर्थ व सर्वांचा आधार, असें असतां इतर देवमंडळींनीं पृथ्वीकरितां आपआपले अंश खालीं पाठविलेले तूं पाहात असतांही तिचे साह्यार्थ तूं आपला अंश पाठवीत नाहींस हें कसें? अरे, तुझें पाठबळ असेल तर त्या देवांशांना जोर येईल. कारण, त्या देवांशांचें सर्वस्व काय तें तूंच आहेस. तूं प्रेरक पाठीशीं असलास म्हणजे हे देवांश धरणीतलावर एक कामगिरी संपवून दुसरी, दुसरी संपवून तिसरी, अशा रीतीनें तूं म्हणशील तितकी कामगिरी करितील, ( परंतु पाठीशीं तूं पाहिजेस ) व ही गोष्ट ध्यानीं आणूनच, हे विष्णो, तुझी उठावणी करण्याकरितां मी इतक्या लगबगीनें देवसभेंत आलों आहें. शिवाय माझ्या येण्यांत दुसरा एक मुद्दा आहे. तूं मागें तारकायुद्धांत जे जे दैत्य मारिलेस त्यांपैकीं जे कोणी पुनः पृथ्वीवर गेले त्यांची हकीकत काय झाली ती तुला सांगतों, ऐक.

पृथ्वीवर यमुनानदीचे तीरीं वसलेली मोठी संपन्न व दाट वसतीची अशी मथुरा नांवानें प्रसिद्ध आनंददायक नगरी आहे. ( ही मधुवनांत असून शत्रुघ्नानें वसविली आहे. ) या नगरीचे ठिकाणीं पूर्वी मधुवन नांवाचें घोर अरण्य होतें. या अरण्यांत मोठमोठाल्या जुनाट वृक्षांची अतिशय गर्दी असून तेथें मधु नांवाचा एक मोठा दुर्जिंक्य दानव रहात असे. हा मोठा बलाढ्य असून प्राणिमात्राला त्रास देणारा होता. या मधूला लवण नांवाचा पुत्र होता. हाही सर्वपरी बापाचीच प्रतिमा होता. हा दानव त्या मधुवनांत अनेक वर्षें खेळ खेळत होता. त्यानें आपल्या अंगमस्तीनें कित्येक दैवतांना आणि लोकांना उठवून लाविलें. या दानवाच्या वेळीं अजिंक्य अशा अयोध्या नगरींत राक्षसांना कंप देणारा असा दशरथपुत्र धर्मज्ञ रामराजा राज्य करीत होता. लवणाला आपल्या बलाची फारच घमेंड चढली होती. तेव्हां त्यानें आपल्या वसतीच्या त्या घोर मधुवनांतून रामाकडे चरचरीत निरोप सांगणारा असा एक दूत पाठविला, व त्या दूताबरोबर असा निरोप दिला कीं, हे रामा, मी तुझा वैरी असून

तुझ्या प्रांताला अगदीं लागून आहे. खरे राजे आहेत ते आपल्या आसपास असला मजसारखा शक्तीची घमेंड करणारा शत्रु टिकूं देत नाहींत. तूं आपणास राजा म्हणवीत असून राज्य करण्याचें कंकण बांधिलें आहेस. तर प्रजेचें हित होऊन आपणास समृद्ध असें राज्य असावें अशी तुला ज्या अर्थी इच्छा आहे त्या अर्थी तूं प्रथम मजसारखे रिपु जिंकून टाकावेस. प्रजेकडून अभिषेक करवून घेऊन राजा म्हणवून घेण्याची हौस वाटते, तर अशानें परत प्रजेलाही खूष ठेविलें पाहिजे, आणि असें करणें तर आपले अभिषेकाचे केंस पुरे वाळले नाहीं तोंच आपलीं इंद्रियें ताब्यांत घेण्याचा अभ्यास केला पाहिजे. कारण, आधीं इंद्रियजय करावा तेव्हां मग खात्रीनें शत्रूवर जय मिळतो. ज्या कोणाला लोकांत आपण नीट वर्तावं करावा असें वाटत असेल अशा प्रत्येकानें, आणि त्यांतूनही विशेषतः राजानें कर्तव्य कोणतें, अकर्तव्य कोणतें हें पुस्तकांतून शिकत बसण्यापेक्षां दुनियेंतच ठेंचा खाऊन शहाणें व्हावें. कारण, असल्या गोष्टी पक्क्या शिकविण्याला जनतेसारखा दुसरा उंची गुरु नाहीं. ज्या राजाची सैन्यासंबंधीं बळकटी पहिल्या प्रतीची असून त्याचे खालोखाल धर्माची बळकटी आहे, व द्यूतादि व्यसना-विषयीं ज्याला सर्वांत कमी आदर वाटतो, अशा बुद्धिमान् राजाला आसपासच्या शत्रूंपासून भय बाळगण्याचें कारण नाहीं. ज्या राजाचे ठिकाणीं आपलें मन ताब्यांत ठेव-ण्याचें धारिष्ट नाहीं अशा प्रत्येक राजाला ( बाह्य शत्रूंपेक्षां ) जन्मतः प्रत्येकाच्या बरोबर जन्मलेले, जे मनाला मोह घालणारे आणि अभ्यासानें फाजील लाडावलेले इंद्रियरूप शत्रु हेच खरे घातक असतात. हे त्याचें अहित करून त्याच्या शत्रूंचें कल्याण करीत असतात. हे रामा, तूं व्रतस्थ असूनही तुझी बायको रावणानें नेतांच तुला भूल पडून तूं आपलें व्रत विसरून यःकश्चित् स्त्रीसाठीं सपरि-वार रावणाचा वध केलास. हें तुझें करणें माझे मतें राजनीतीला धरून नव्हे. छे, हें कितीही मोठ्या शौर्याचें असलें तरी केवळ निंद्यच हें. तूं वनवासांत असून व्रतस्थ अस-तांही राक्षससैन्यावर हत्यार धरिलेंस खरें; पण जे खरे सज्जन आहेत ते असें आचरण करितांना आढळत नाहींत. खऱ्या सज्जनांचा धर्म म्हणजे क्रोधराहित्य किंवा शान्ति हाच होय, व यानेंच ते सद्गतीला जातात. परंतु, तूं स्त्रीमोहास्तव खरा धर्म विसरून हत्त्या केलीस आणि आपल्या उदाहरणानें त्या बिचाऱ्या आश्रमवासी तपस्व्यांनाही कलंक लाविलास. खरोखरच एखाद्या प्राकृताप्रमाणें विषयलंपट होऊन, केवळ स्त्रीसाठीं तिला हरण करून नेणाऱ्या रावणाला, तूं व्रतस्थ असतां त्या कालांत मारिलेंस ( यानें तुझा कमीपणा झाला ); परंतु, रावण धन्य झाला असें मी समजतों. बाकी तूं युद्धांत रावणाला मारिलेंस म्हणून तुला शूरत्वाची घमेंड नको; कारण, रावण हा दुष्टबुद्धि व अजितेंद्रिय असल्यामुळें वस्तुतः तो आपल्या मरणानेंच मेला. तुझे अंगीं खरेंच सामर्थ्य असेल तर आज माझ्याशीं रणांत गांठ घाल म्हणजे पाहूं."

याप्रमाणें त्या दूताच्या मुखांतून तें कठोर पांडित्य ऐकूनही रामाचें मन सहज धैर्यामुळें न गडबडतां त्यानें हंसतच उत्तर केलें कीं, "हे दूता, तूं आपण निर्भय आहों असें सम-जून आपल्या धन्याची थोरवी गाण्याकरितां मला दोष देण्यास कबूल झालास हें मात्र तूं खोटें काम केलेंस. क्षनें माझी बायको उपटली व ( तूं म्हणतोस त्याप्रमाणें ) तिच्या मोहानें मी भल्यांचा मार्ग सोडून रावणाला ठार केलें,

हें जरी खरें असलें तरी त्याबद्दल तुला येवढी ऊर बडवून घेण्याची पाळीं कां आली? जे खरे खरे सदाचणी आहेत असले सज्जन वृथा वाणीनें देखील दुसऱ्याला दुखवीत नाहींत. कारण, ते असें समजतात कीं, देव जो आहे तो सज्जनांच्या प्रमाणेंच इतरांच्याही हृदयांत आहे. असो, हे दूता, तुझी कामगिरी तूं केलीस. आतां तूं परत जा. विलंब लावूं नको. ( तुझा धनी मला युद्धार्थ बोलावितो खरा परंतु, ) तुझ्या धन्यासारखे आपली आपणच स्तुति करणारे जे आहेत अशांवर मजसारखे शस्त्र धरीत नसतात. हा माझा धाकटा भाऊ शत्रुघ्न आहे. हाही शत्रूला त्राहि त्राहि करून सोडणाराच आहे. हा तुझ्या त्या दुष्टबुद्धि दैत्याचें संग्रामांत गांठून उट्टें काढील. याला घेऊन जा."

याप्रमाणें महात्म्या रामराजानें निरोप देतांच शत्रुघ्नाला बरोबर घेऊन तो दूत परतला. बरोबरील वाहन चपल असल्यामुळें तो अल्पकालांतच त्या दानवाच्या विस्तीर्ण मधुवनांत जाऊन पोहोंचला. तेथें जातांच युद्धेच्छेनें शत्रुघ्नानें त्या वनाच्या सरहद्दीवरच तळ दिला. इतक्यांत त्या दूतानें वार्ता कळवितांच तो दैत्य अंगांत क्रोध मावेनासा होऊन युद्धार्थ चालून आला, आणि सर्व वन पाठीशीं घालून त्या स्थळीं युद्धाला उभा राहिला. मग शत्रुघ्न आणि तो लवण या उभयतां शूर आणि बलाढ्य वीरांचें त्या रणभूमीवर मोठेंच युद्ध झालें. ते उभयतांही एकमेकांना अति तीक्ष्ण अशा बाणांनीं सारखे प्रहार करीत होते. परंतु, त्यांतून एकही युद्धांतून तोंड फिरवीना किंवा दमेना. शेवटीं शत्रुघ्नाच्या बाणांपुढें जर्जर होऊन तो दानव त्या वेळीं त्याचा आवडता शूल हातीं नसल्यामुळें हरण्याच्या बेतांत आला. पण इतक्यांत त्यानें त्याला देवांनीं वरदानपूर्वक दिलेला सर्व प्राण्यांचें आकर्षण करणारा असा आपला अंकुश हातीं घेऊन प्रचंड आरोळी ठोकिली. आणि त्या अंकुशाचा आंकडा शत्रुघ्नाच्या मानेला घालून त्याला ओढूं लागला व तो अंकुश शत्रुघ्नाच्या मानेंत घुसवून त्याला तो खालीं पाडणार इतक्यांत शत्रुघ्नानें सोन्याची मूठ बसविलेला असा एक उत्तम खड्ग घेऊन त्यानें लवणाची मान उडविली. नंतर त्या मित्रवत्सल शत्रुघ्नानें आपल्या अस्त्रानें त्या दैत्याचे वसतीचें तें सर्व वन तोडून टाकून तेथें वसाहत करण्याचें मनांत आणिलें आणि त्या देशाचा उदय होण्यासाठीं त्या धर्मवेत्त्या सुमित्रापुत्रानें त्या मधुवनांत मथुरा नांवाची एक राजधानी निर्माण केली.

याप्रमाणें शत्रुघ्नानें लवण दानवाला मारून निर्माण केलेली ही मथुरा नगरी फारच शोभिवंत होती. तिला सभोंवार उंच तटबंदी असून मोठमोठ्या नगरवेशी होत्या. तिच्या पोटांत लहान लहान अनेक खेडीं असून ती एकंदरींत मोठी विस्तीर्ण व बल आणि वाहनें यांनीं संपन्न होती. त्या नगरीची मांडणी फार रेखलेली असून तिच्या चतुःसीमाही स्पष्ट आंखलेल्या होत्या. वनोपवनांनीं ती संपन्न असून तिजभोंवतील तटबंदी हेंच कोणी वस्त्र तिनें वेढिलें होतें, व त्या तटबंदीभोंवतालची जी परिखा ( खंदक ) तोच त्या वस्त्रावरून कमरपट्ट्याचा वेढा होता. विटेबंदी, उंच उंच माड्या, हींच तिचीं बाहु-भूषणें व राजमंदिरें हींच तिचीं कुंडलें. तिच्या गांववेशी मोठ्या बंदोबस्ताच्या असून तिजमधील ठिकठिकाणचे रस्त्यांतील चौक इतके प्रशस्त होते कीं, त्यांचे रूपानें ती हंसतेच कीं काय असें वाटे. युद्धोपयोगी हत्ती, घोडे, रथ यांची तिच्यांत गर्दी असून तीमधील शिपायांना दुखणें कधीं

माहीत नसे. ती यमुनेचे कांठीं अर्धचंद्राकार वसली असून यमुनेचे सान्निध्यानें तिला फारच शोभा आली होती. शत्रूचा तिच्यांत रिघाव होत नसे. असा तेथील बंदोबस्त कडेकोट असल्यामुळें तिच्यांत व्यापारउदीमही फार जोरानें चालत असून तेथील सराफ्यांत व लोकांजवळ रत्नें तर इतकीं असत कीं, त्यांबद्दल त्यांना गर्वच वाटे. अशी संपत्ति असून तिच्या परिघांत पुण्यस्थानेंही बरींच होतीं. पर्जन्यही वेळचे वेळीं पडत असल्यानें तीमधील नरनारी सर्वदा आनंदांत असून ती नगरी जशी चमकून राहिली होती.

अशा या शत्रुघ्नानें स्थापिलेल्या मथुरा नगरींत एके कालीं उग्रसेन नांवाचा एक भोजवंशीय राजा राज्य करीत होता. हा मोठा वीर्यवान् असून पराक्रमानें कार्तिकेयाप्रमाणें होता; आणि त्याची सेनाही मोठी शूर होती. हे विष्णो, तूं पूर्वीं तारकायुद्धांत कालनेमी नांवाचा महादैत्य मारिलास तोच सांप्रत भोजवंशाची वृद्धि करण्याकरितां या उग्रसेनाचे पोटीं येऊन कंस या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. याचे नेत्र विशाल असून याचा पराक्रम सिंहाप्रमाणें प्रसिद्ध आहे. राजांना हा मोठा भयंकर वाटत असून ते त्याला सर्वदा चपापून असतात. तो एकंदरींत सर्व प्राण्यांनाच भय देणारा असून बऱ्या मार्गापासून फारच दूर झुकला आहे. त्याचा निश्चय मोठा कडक असून तो मनाचा फार निर्दय आहे, व या आपल्या गुणांबद्दल त्याला मोठा गर्व वाटत असतो. त्याला पाहून त्याच्या प्रजेच्या अंगावर तर थरारून कांटा उभा रहातो. राजधर्म तो कधींच पाळीत नाहीं व स्वतः त्याच्या राजधानींत त्याच्या पक्षाच्या लोकांना देखील त्यापासून सुख होत नाहीं. तो सदान्कदा कोपास चढला असून तंटे उकरून काढीत असतो. असा हा तूं पूर्वीं कालनेमि-रूपानें पराजित केलेला व मांसभक्षक राक्षस कंसरूपानें प्रकट झाला असून आपल्या राक्षसी वृत्तीनें लोकांना पीडा देत आहे. त्याचप्रमाणें पूर्वजन्मीं अश्वाप्रमाणें बळकट जो हयग्रीव नांवाचा दैत्य होता तो याच कंसाचा केशि नामक धाकटा भाऊ झाला आहे. हा दुष्ट केशी अश्वाचें रूप घेऊन वृंदावनांत वसती धरून आहे. त्याची आयाळ मोठी भरदार असून तो अक्षयीं खिंकाळत असतो व त्याला कोणी नियंता नसल्यानें तो येत्याजात्या माणसांच्या मांसाचे लचके तोडीत असतो. तिसरा, बलीचा पुत्र अरिष्ट. हा महासुर वाटेल तें रूप घेऊं शकतो. सांप्रत यानें मोठ्या सांडाचें रूप घेतलें असून त्याचें वशिंड फारच मोठें आहे व हा इतका मस्त आहे कीं, हा गाईंना एक काळच होऊन राहिला आहे. दानवांत श्रेष्ठ असा जो दितीचा रिष्ट नांवाचा पुत्र त्यानें हत्तीचें रूप घेतलें असून तो हल्लीं कंसाच्या स्वारीला असतो. पूर्वजन्मींचा मोठा गुर्मीदार जो लंब नामक दैत्य तो या जन्मीं प्रलंब नांवानें प्रसिद्ध होऊन भांडीर नामक वटाखालीं असतो. पूर्वींचा जो खर तो या जन्मीं धेनुकासुर झाला असून मोठ्या तालवनांत असतो व प्रजेला फार उत्साह देतो. पूर्वींचे वाराह व किशोरनामक जे महाबलाढ्य दानव ते चाणुर व मुष्टिक नांवांचे मल्ल झाले असून सदा आखाड्यांत पडून असतात. याशिवाय, हे दानवांतका, मय व तार नांवांचे दोघे दानव ते सांप्रत भूमिपुत्र जो नरकासुर त्याच्या प्राग्ज्योतिष नामक पुरांत दडून असतात.

हे विष्णो, तूं पूर्वीं एकदां मारून नाहींसे केलेले हे सर्व दैत्य सांप्रत मनुष्यरूप घेऊन या प्रकारें भूमीवर मनुष्यांना त्रास देत आहेत. सर्वांनाही तुझ्या नांवाची मोठी चीड

असून कोणीही तुझे भक्त आढळले कीं, अशा मनुष्यांना ते ठार मारितात. तेव्हां अशा या दानवांचा क्षय पुनः तरी तुझ्याच हातून झाला पाहिजे. कारण, स्वर्गांत, धरणीवर किंवा समुद्रांत—कोठें झालें तरी ते तुला तेवढे भितात; इतर कोणालाही भीक घालीत नाहींत. हे श्रीधरा, कोणीही जीव कितीही दुर्वृत्त असो, त्याला जर एकवार तूं स्वहस्तें मारून स्वर्गांतून धरणीवर लाविलें आहेस, तर त्याची पुनरपीही व्यवस्था लावणें ती तुजवांचून या धरणीवर अन्य कोणी लावूं शकत नाहीं. कारण, हे केशवा, तूं प्रत्येक गोष्ट दक्षतेनें पाहात असल्यामुळें तुझे हातून जो कोणी प्राणी एकवार वध पावून या भूलोकीं मनुष्य-शरीर घेऊन उठला, त्याला तुजवांचून पुनरपि स्वर्गास जातां येणार नाहीं. याकरितां हे विष्णो, चल. आपण भूतलीं जाऊं, आणि दानवांचा संहार करण्याकरितां तूं आपणाला निर्माण कर. शिवाय, देवांनाही कांहीं दृश्य व कांहीं अदृश्य अशीं तुझीं रूपें आहेत. अशा तुझ्या रूपांत तूंच या देवांचा प्रवेश करून दिलास म्हणजे त्या त्या रूपानें ते प्रकट होतील. एवंच, हे विष्णो, तूं अवतीर्ण झालास म्हणजे कंसाचा नाश होईल आणि जो हेतु मनांत धरून पृथ्वी तुजकडे आली होती तोही सिद्धीस जाईल. या भारतवर्षांत असली कोणतीही अवचट कामगिरी करणें झालें म्हणजे ती करणारा तूंच एक आहेस. तूंच सर्वांचा डोळा असून सर्वांचा आश्रयही तूंच आहेस. याकरितां, हे हृषीकेशा, मजबरोबर धरणीवर चल व दानवांचा संहार कर."

# अध्याय पंचावन्नावा.

—:०:—

## ब्रह्मवाक्यवर्णन.

वैशंपायन सांगतातः—नारदाची ही वकिली ऐकून मधुसूदनाला हंसूं आलें. मग संसारी व मुमुक्षु या उभयांसही सारखाच प्रिय वाटणारा तो समर्थ परमेश्वर नारदाला शुभ वाणीनें म्हणाला, "हे नारदा, तूं त्रैलोक्याच्या हितासाठीं म्हणून जी मला विनंती केलीस ती फार समर्पक आहे. आतां तिचें उत्तर काय तें ऐक. मला ही गोष्ट माहीतच आहे कीं, मी पूर्वी मारिलेले दानव सांप्रत भूलोकीं देहधारी झाले आहेत. त्याचप्रमाणें कोण दैत्य कोणतें रूप घेऊन वैर माजवीत आहे तेंही मी जाणून आहें. कंस हा भूलोकीं उग्रसेनाचा पुत्र झाला आहे, हें मी जाणतों. तसेंच केशी दैत्यानें घोड्याचें रूप घेतलें आहे हेंही मी समजतों. हल्लींचा कुवलयापीड हत्ती हा कोण, तसेच चाणुर—मुष्टिक जेठी कोण, हेंही मला अवगत आहे. अरिष्टानें वृषभाचें रूप घेतलें आहे ही मला खबर आहे. त्याचप्रमाणें खर व प्रलंब महासुर यांनाही मी ओळखितों आहें आणि, हे ब्राह्मणा, ही जी पूतना ही बलीची कन्या आहे, याचीही मला याद आहे. याच प्रकारें गरुडाच्या भयानें यमुनेच्या डोहांत लपून असलेला जो कालिय सर्प त्यालाही मी विसरलों नाहीं. राजांचा शिरोवर्ति राजा जरासंध व प्राग्ज्योतिषपुरांत रहाणारा नरकासुर यांवरही माझी पक्की नजर आहे. कार्तिकस्वामितुल्य जो बाण तो सांप्रत मनुष्यलोकीं मनुष्यरूप घेऊन शोणितपुरांत रहात असतो व त्याला आपल्या सहस्र बाहूंचा मोठा गर्व वाटत असून तो देवांनाही भारी आहे. याचा मला पत्ता आहे,

याखेरीज, हे नारदा, या भरतभूमीच्या भाराचें जूं माझ्याच मानेवर ठेविलें आहे, याचीही मला शुद्ध आहे. याचप्रमाणें आजकाल पृथ्वीवर वाढलेले राजे भूलोकीं क्षय पावून शक्र-लोकीं आदरास कसे पात्र होतील तेंही मला पुरें ठाऊक आहे, व सांप्रत मनुष्यरूप घेऊन जे हे असुर भूलोकीं संचरले आहेत, यांचे प्राण पुनः या लोकीं न येतील असें करण्यासाठीं मी स्वतः योगाचा आश्रय करून व इतर देवां-कडून करवून या मनुष्यलोकांत स्वतः भौतिक देह घेऊन या कंसादिक महासुरांपैकीं ज्याला ज्या युक्तीनें शाश्वत शान्ति प्राप्त होईल त्या युक्तीनें त्याचा वध करीन. कारण, या देवेंद्राचे जे कोणी असे शत्रु आहेत त्यांना माझ्या योगबलानें अंतर्धानादि अनेक युक्त्या योजून मला मारिलेंच पाहिजे. हे नारदा, देव, देवर्षि, गंधर्व, इत्यादि स्वर्गवासी जनांनीं हा जो आपला अंशावतार धरणीवर केला आहे तो माझ्याच संमतीनें केला असल्यामुळें आपण स्वतः जाऊन त्यांच्या कृतीचें साफल्य करावें, असा निश्चय तूं मला जागें करण्यापूर्वींच मीं आपल्या मनाशीं करून ठेविला आहे. हे ब्रह्मर्षे, आतां पितामहानें मजसाठीं भूलोकीं एक वसतिस्थान निर्माण करावें, आणि कोणत्या देशांत, कोणत्या वेषानें, कसें राहिलें असतां या सर्व असुरांना मला युद्धांत सोईनें मारितां येईल हें मला पितामहानेंच सांगावें."

तें ऐकून ब्रह्मदेव म्हणाला, "हे नारायणा, हे विभो, कोणत्या उपायानें आपला हेतु सिद्धीस जाईल ? हे महाबाहो, भूलोकीं आपलीं आईबापें कोण होतील व कोणत्या वंशांत उत्पन्न झाल्यानें आपण कुलवृद्धि करून यावत् यादववंशाचें धारण कराल आणि त्या सर्व असुरांचें उन्मूलन करून व आपल्या वंशास महतीस चढवून प्रजाजनांना वर्तनाची मर्यादा घालून द्याल, त्या सर्व गोष्टी मी आपणास सांगतों, त्या मजकडून ऐकाव्या.

पूर्वकालीं, हे विष्णो, कश्यपानें महात्म्या वरुणाच्या फार दूध देणाऱ्या अशा यज्ञीय धेनु, त्याचा यज्ञ चालू असतां आणिल्या. घरीं आणिल्यावर कश्यपाच्या अदिति आणि सुरभी अशा ज्या दोन स्त्रिया होत्या त्या पुनः त्या गाई वरुणास देऊं देतना. त्या वेळीं वरुण मजकडे येऊन शिरःप्रणामपूर्वक म्हणाला कीं, हे भगवन्, गुरु कश्यपानें माझ्या गाई नेल्या. आतां त्याचा कार्यभाग उरकला असतांही तो आपल्या अदिति व सुरभी या दोघी स्त्रियांच्या नादीं भरून माझ्या गाई मला परत आणूं देत नाहीं. हे प्रभो, माझ्या या गाई सर्वकाल आप-णास वाटेल तितकें दूध देणाऱ्या असून सर्व सागरभर फिरतात; तथापि, त्यांना कोणी गुराखी लागत नाहीं. कारण, त्या स्वतेजानेंच आपलें रक्षण करितात; अशा त्या दिव्य आहेत. त्यांचें दूध फारच अव्वल प्रतीचें, केवळ देवांच्या अमृताच्या तोडीचें असून, पुनः, त्याला कधींही खंड नाहीं. असल्या या माझ्या दिव्य गाई दाबून ठेविण्याचें सामर्थ्य कश्यपा-वांचून इतर कोणालाही नाहीं. हे भगवन्, प्रभु असो, गुरु असो किंवा इतर कोणी असो, तो जर आपली मर्यादा सोडून वागेल तर त्याला तूंच अटकाव केला पाहिजेस. कारण, आमचें अखेर दाद लाविण्याचें ठिकाण

तूंच आहेस. हे लोकगुरो, आपली मर्यादा न ओळखून लोकांत वागणारे जे कोणी दांडगे लोक आहेत अशांना जर दंड न होईल तर सर्वत्र बेबंदी माजेल. बाकी तें कसेंही असो, आपण सर्व कांहीं करण्यास समर्थ आहां. करितां माझ्या गाई मला देववाव्या म्हणजे मी समुद्रांत जातों. या गाई म्हणजे माझ्या देवताच आहेत; या माझे अविनाशी सत्त्वच आहेत. हे विभो, तूं निर्माण केलेल्या लोकांचे गाई आणि ब्राह्मण हे प्राण आहेत. यांपैकीं गाईंचें रक्षण प्रथम करावें म्हणजे त्या ब्राह्मणांचें रक्षण करितात, आणि याप्रमाणें गाई व ब्राह्मण या उभतांचें रक्षण झालें म्हणजे त्याचे पोटीं सर्व जगताचें रक्षण होतें.

हे विष्णो, याप्रमाणें जलाधिपति वरुणानें मजकडे फिर्याद दिल्यावर गाईंच्या बाबतींत कश्यपाच्या हातून काय कारण घडलें होतें तें ध्यानांत आणून मीं त्याला शाप दिला. तो असाः—कश्यप महर्षींच्या ज्या अंशानें वरुणाच्या गायी नेल्या त्या अंशानें तो भूतलीं नंदनामक गौळी होईल. बाकीच्या अंशानें यदुकुलांत वसुदेव रूपानें जन्मेल, आणि कश्यपाच्या ज्या सुरभी आणि देवमाता अदिति अशा दोन भार्या आहेत, त्यांपैकीं अदिति ही दोन अंशांनीं यशोदा व देवकी अशीं दोन रूपें घेऊन आणि सुरभी रोहिणीचें रूप घेऊन, नंदरूपाची यशोदा व वसुदेवरूपाची देवकी व रोहिणी अशा स्त्रिया होऊन, कश्यप त्यांशीं रममाण होईल. यांपैकीं कश्यपाचा जो वसुदेवनामक अंश सांगितला, तो तेजानें प्रति कश्यप होऊन मथुरेच्या जवळच जो गोवर्धन नामक पर्वत आहे तेथें कंसाचा मांडलीक होऊन गाईगोधनांतच राहील. अशा या वसुदेवाच्या घरांत, हे महाबाहो, तूं प्रथम शिशुरूपानें जन्मून आणि गोपाळाचा वेष घेऊन रहा. हे मधुसूदना, तूं लोककल्याणार्थ आपल्या योगमायेनें आपलें खरें स्वरूप गुप्त राखून यदुकुलांत याप्रमाणें प्रथम प्रकट हो, आणि मग वामनावताराप्रमाणें वाढ. शिवाय, स्वर्गवासी जन तुझा उत्कर्ष होण्यासाठीं तुला जयवाद आणि आशिर्वाद देतीलच. याकरितां तूं भूतलीं आपला आपणच अवतार करून देवकी आणि रोहिणी या दोघींनाही त्यांचे गर्भांत[१] राहून संतुष्ट कर, आणि तेथें गवळयांच्या हजारों पोरी निर्माण होतील त्यांशीं मौजा मारीत भूलोकीं रहा. हे विष्णो, तूं गोपवेषानें वनांमध्यें गाई राखीत इकडून तिकडे फिरत असतां ज्या गाई तुझें वनमालांनीं व्यापलेलें शरीर अवलोकन करितील, त्या खरोखरच धन्य होत. हे कमलदलाक्षा विष्णो, तूं बाल होऊन गोपालांच्या वसतींत गेला असतां तेथील सर्वच लोक तुझ्या नादानें बाल होतील, आणि, हे पुंडरीकाक्षा, तुझ्याच तंत्रानें चालणारे जे तुझे भक्त आहेत ते गोपाळ होऊन गाई राखण्याचे कामीं तुला सदा साह्य करितील. तुझें रानांत गाई चारणें, गाईमागून गोठ्यांतून इकडे तिकडे धांवणें, आणि यमुनाडोहांत बुड्या मारणें, या चेष्टांनीं तुजवर त्यांचें फारच प्रेम जडेल. वसुदेवाला तूं “ बाबा ” म्हणून हांका मारिशील आणि तो तुला “ बाळ ” म्हणून हांक मारील आणि असा दिवस आला म्हणजे त्या

१ श्रीकृष्ण प्रथम देवकीच्या गर्भांत येऊन कंसाला फसविण्याकरितां नंतर रोहिणीच्या गर्भांत गेला.

वसुदेवाचें जीवित खरोखरच धन्य होईल. बाकी कश्यपा ( वसुदेवा ) वांचून इतर कोणाचें पुत्रत्व तुझ्यासारख्यानें स्वीकारावें? आणि हे विष्णो, कश्यपस्त्री अदिति तिजवांचून दुसरी कोणती स्त्री तुझें गर्भांत धारण करूं शकेल ? ( तेव्हां तूं वसुदेवदेवकीच्या [ अदिती ] पोटीं येणें हेंच न्याय्य आहे. ) याकरितां तूं आपल्या स्वयंभु योगबलानें विजय मिळविण्यासाठीं भूलोकीं जा, आणि, हे मधुसूदना, आम्हीही आपआपल्या घरीं जातों."

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें ब्रह्मदेवाची विनंती कानीं येतांच देवमंडळीला तेथून जाण्याची अनुज्ञा देऊन श्रीविष्णु क्षीरसमुद्राच्या उत्तर प्रांताला जें स्वतःचें वसतिस्थान होतें तेथें गेले. तेथें मेरूचे पोटांत पार्वती नांवाची एक अत्यंत दुर्गम अशी गुहा आहे. या गुहेंत श्रीविष्णूचीं तीन पाउलें उमटलेलीं असून त्याकरितां संक्रान्तीचे दिवशीं लोक तिची नेहमीं पूजा करितात. असल्या या पवित्र गुहेंत आपलें जुनें शरीर ठेवून तो उदारधी परमात्मा हरि स्वतःला वसुदेवाच्या घरीं जन्मास घालण्याचे खटपटीस लागला.





# विष्णुपर्व.

## अध्याय पहिला.

## नारदाचें आगमन.

### मंगलाचरण.



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

वैशंपायन सांगतातः—भगवान् विष्णु व इतर देवांचे अंश हे अवतार धरून मृत्युलोकीं गेले. हें समजतांच कंसाला त्याचे भावी मृत्यूविषयीं बातमी देण्याच्या हेतूनें नारदमुनि स्वर्गांतून मथुरानगरीच्या बाहेरील बागांत उतरले; व तेथून त्यांनीं उग्रसेनाचा पुत्र कंस याजकडे दूत पाठविला. त्यानें नारदमुनि उपवनांत उतरले आहेत म्हणून कंसाला सांगितलें. नारदागमनाची वार्ता ऐकतांच तो विशाल नेत्रांचा असुर कंस जलद पावलानें आपल्या नगरींतून बाहेर पडला. उपवनांत येतांच, स्वरूपानें अग्नीप्रमाणें, कांतीनें सूर्य, असे निष्कलंक व सर्वांस श्लाघ्य, ते देवर्षि नारद त्याचे दृष्टीस पडले. त्यांस पाहातांच वंदन व यथाविधी पूजन करून त्यांस बसण्याकरितां अग्नितुल्य उज्ज्वल असें आसन त्यानें दिलें. नंतर इंद्रमित्र नारद त्या आसनावर बसले व उग्रसेनाच्या त्या परमकोपिष्ट पुत्रास म्हणाले, "हे वीरा, माझें यथाविधी पूजन करून तूं मला संतुष्ट केलें आहेस, त्या अर्थीं तुझे हिताची गोष्ट मला सांगणें आलें. करितां ती गोष्ट ऐकून तूं मनांत बाळग."

"या वेळीं मी ब्रह्मलोक व प्रमुख स्वर्गांतील बहुतेक सर्व लोक फिरत फिरत इंद्राचें नंदनवन तसेंच कुबेराचें चित्ररथवन पाहात सूर्याचा प्रिय-

मित्र जो विशाल मेरुपर्वत त्याप्रत प्राप्त झालों. वाटेंत ज्या ज्या नद्या व तीर्थें लागलीं त्यांत इतर देवतांसह मीं स्नानें केलीं. वाटेंत, स्मरणानेंच सर्व पातकांचा उच्छेद करणारी व तीन धारांनीं वाहणारी पवित्र गंगानदी मला लागली; तिचें व अन्य तीर्थांचेंही क्रमाक्रमानें उपस्पर्शन करीत करीत मी ब्रह्मलोकीं आलों. तेथें ब्रह्मर्षींचे थवेचे थवे असून गंधर्वांचीं सुस्वर गायनें, व अप्सरांचीं नर्तनें सर्वत्र चालू होतीं. मेरुपर्वतावर असतांना मी एक दिवस माझी वीणा नीट सुरावर लावून देवांचा समाज जमला होता तेथें गेलों. तेथें दिव्यासनावर बसलेले, नानारत्नांनीं भूषित व पांढरीं शुभ्र पागोटीं घातलेले असे देवगण ब्रह्मदेवासह जमलेले दृष्टीस पडले. हळूच ऐकतों तों त्यांचीं खलबतें चाललीं होतीं, व त्यांचा मतलब तुझ्या अनुचरांसह तुझा वध मोठ्या जहाल उपायांनीं करावयाचा असा होता. त्यांतला मुख्य भाग म्हटला म्हणजे तुझी देवकी जी धाकटी बहीण मथुरेंत आहे तिचे पोटीं जो आठवा गर्भ निपजेल तो तुझा काळ होणार. कारण, हा आठवा गर्भ म्हणजे सामान्य नव्हे. तो सर्व देवांचें मुख्य निधान, स्वर्गाचा आधार, सर्व वेदांचें गुह्य, देवांस स्वर्ग किंवा मोक्ष वाटेल तें देणारा, व केवळ आपले आपणच उत्पन्न होणारा, असा आहे. असो, आतां मी तुला एक महत्वाची गोष्ट सांगतों. ती अशी कीं, असल्या पुरुषाचे हातून तूं मरणें ही गोष्ट एका अर्थीं तुला भूषणावहच आहे. हेंही ठरून चुकलें आहे. तथापि, 'श्वास तों आस' म्हणून म्हण आहे. त्याप्रमाणें स्वरक्षणाचा प्रयत्न केलाच पाहिजे. तर माझे मतें तूं देवकीचे गर्भ छाटण्याचा यत्न सुरू ठेव. म्हणजे कदाचित् अरिष्ट टळेलही. मी इतके दूर तंगड्यातोड करीत आलों याला केवळ कारण म्हणजे तुजवरील माझें प्रेमच होय. करितां सावध रहा, आणि आनंदानें यथेच्छ सुखविलास भोग. असो; तुझें कल्याण असो; आतां मी जातों."

याप्रमाणें सांगून नारदमुनि गेल्यावर त्यांचे शब्दांचा विचार करीत असतांना तो कंसासुर दांताड्या बाहेर काढून कोण वेळचा मोठमोठ्यानें हंसतच सुटला. नंतर आपल्या नोकरांच्या पुढें उभा राहून व किंचित् स्मित करून म्हणाला, "अरे, हा नारद म्हणजे कांहीं अट्टलांतला नव्हे. सर्व देवांचें खेळणें आहे; ते मौजेखातर त्याला कांहीं तरी थाप देतात, आणि हें वेडें ती खरी समजून घाबरून जातें. त्याला बापड्याला काय ठाऊक कीं, हा कंस आपल्या या दोन विशाल बाहूंचे बलानें ही सर्व पृथ्वी हालवून सोडील; व निजला असो, बसला असो, शुद्धीवर असो किंवा गाफिल असो, कोणत्याही स्थितींत इंद्रासह सर्व देव येऊन पडले तरी डरणार नाहीं. या मृत्युलोकांत तर माझे वाटेस जाण्याची कोणाची छाती नाहींच. शिवाय म्हणावें आजपासून आतां हीच प्रतिज्ञा कीं, देव, तसेंच त्यांचे अनुयायी, मग ते मनुष्य, पशु, पक्षी, कोणीही असोत, सर्वांचें काण्डात काढितों. बरें आहे. दूतहो, आपले केशी, प्रलंब, धेनुक, अरिष्ट, वृषभ, पूतना, कालियप्रभृति मंडळीला माझी आज्ञा सांगा कीं, वाटेल तशीं रूपें घेऊन तुम्हीं सर्व पृथ्वीभर यथेच्छ भ्रमण करा; व आमचे जे म्हणून प्रतिपक्षी आढळतील त्यांस हाणून पाडा. शिवाय नारदानें गर्भापासून मला भय सांगितलें असल्यानें स्त्रियांचे गर्भांचीही तपासणी ठेवीत चला. मी तुमचा मालक असल्यावर देवांचें देखील तुम्हांला भय नाहीं. करितां तुम्हीं निश्चिंत चैन उडवा, व वाटेल तशी दंगल चालू द्या. मला त्या नारदाचें कांहीं खरें वाटत नाहीं. तो बेटा नसेल तेथें खाजवून खरूज काढील; त्याला चैनच पडत नाहीं.

कोणी किती दाट गट्टीचे मित्र असतना, या बेत्याला चहाड्या करून त्यांच्यांत वैर पाडल्याशिवाय जेवणच गोड लागत नाहीं, असला हा कलहप्रिय ब्राह्मण आहे. मोठा हूड, बारा मुलूख पालथे घालून राजे लोकांत नसती कळ लावून तंटे उभे करील. हा स्वभावच याचा. तेव्हां त्याचें बोलणें विशेष जमा धरण्यासारखें कोणीं समजूं नये; व निर्भय असावें."

याप्रमाणें अंतर्यामीं संतापानें लाल होऊन जाऊन व बाह्यतः वरीलप्रमाणें तोंडाची वटवट करीत करीत तो कंस आपले मंदिरांत गेला.

## अध्याय दुसरा.

—:०:—

### कंसाचा संकेत व आर्येला वरदान.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें त्या कंसानें खवळून जाऊन आपले मर्जींतले जे सचिव होते त्यांस आज्ञा केली कीं, देवकीचे गर्भ छेदून टाकण्याचे कामीं कंबर बांधून तयार असा. तिचे सातही गर्भ उदरांत संभूत होतांच ठार करा. कारण, माझा समज असा आहे कीं, आठव्या गर्भापर्यंत न थांबतां या अनर्थाचें मूळ पहिल्या गर्भापासूनच छाटून राहिलें पाहिजे. यासाठीं आजपासून देवकीच्या घरांत चोरगस्तीनें आटोकाट पहारा ठेवा. मात्र तो अशा खुबीनें कीं, तिला तर संशय येऊं नये. तिनें निर्भय स्वानंदांत हिंडावें फिरावें; मात्र तिचे गर्भारपणीं तिला इकडे तिकडे हालूं देऊं नका. आतां गर्भारपणा ध्यानांत येण्यासाठीं असें करावें कीं, मजकडून ज्या स्त्रिया हेर असतील त्यांनीं तिची विटाळशीची पाळी चुकली कीं दिवसगणनेस आरंभ करावा. पुढें त्या हिशोबानें दहावा महिना उजाडला कीं, काय करणें तें आपण करूं. तसेंच माझें हित इच्छिणाऱ्या ज्या स्त्रिया व जे वर्षवर (नपुंसक) असतील त्यांनीं रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून जेथें मिळून स्त्रियांचा संचार आहे, अशा स्थलीं वसुदेवाचा रिघाव न होईल अशी खबरदारी ठेवावी; ( कारण तो प्रसूतिकालीं गर्भ अन्यत्र नेईल. ) मात्र त्याला कारण काय तें सांगूं नये. येथपर्यंतच्या ह्या गोष्टी मानवी यत्नाच्या आहेत, करितां त्या साधण्यासाठीं मनुष्यांनींच तत्परता ठेवावी. आतां दैवाधीन जो भाग असेल त्याची वाट काय म्हणून कोणी शंका घेईल, तर त्याचाही उलगडा सांगतों. ऐका. दैव म्हणजे बहुधा मनुष्याचे आटोक्याबाहेरचें असा सामान्यांचा समज आहे. परंतु, अस्मादिकांच्याजवळ दैव हाणून पाडण्याच्याही सबळ युक्त्या आहेत. सुविहित अशा मंत्रसमुच्चयानें, तसेंच निवडक औषधींनीं व इतर परिस्थित्यनुकूल यत्नांनीं दैव देखील वळवितां येतें.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें नारदापासून भावी उपायाची गोष्ट ऐकल्यामुळें मनांत भिऊन जाऊन तो दीर्घप्रयत्नी कंस देवकीचे गर्भ छाटून काढण्याचे कामीं खलबतें करूं लागला.

इकडे अखिल शक्तिमान् परमात्मा विष्णु हे ध्यानस्थ असतां कंस हा देवकीचे गर्भछेद करण्याचे कामीं असे घोर उपाय योजून राहिला आहे असें त्यांचे ध्यानीं येतांच, त्यांनीं आपल्याशीं विचार केला कीं, 'ठीक आहे, हा भोजवंशोत्पन्न कंस देवकीचे पहिले सात गर्भ ठार करणार; ते झाले म्हणजे आठव्या वेळीं मात्र आपण स्वतः देवकीचे गर्भांत जाऊन राहावयाचें.' या प्रकारचे विचारांत असतां असतांच परमात्म्याचें मन पाताळलोकाकडे गेलें. तेथें हंस, सुविक्रम, क्रोध, दमन, रिपुमर्दन व क्रोधहंता या नांवांनीं प्रख्यात असे षड्गर्भसंज्ञक सहा बंधु पाण्यांत दडून राहिलेले

होते. हे बंधु कालनेमीचे पुत्र असून मोठे धिप्पाड, तेजस्वी, देवतुल्य व युद्धांत तर प्रतिदेवच असे होते. यांनीं पूर्वीं आपला आजा हिरण्यकशिपु याला न मानितां सर्व लोकांचा पितामह जो ब्रह्मदेव याची उपासना केली. डोईवर जटांचीं वेटोळीं पेंडून त्यांनीं खडतर तपस्या केली; त्या योगानें ब्रह्मदेव प्रसन्न होऊन त्या षड्गर्भांना वर देण्यास सिद्ध झाला.

ब्रह्मदेव त्यांना म्हणाला:–हे दानवश्रेष्ठहो, तुमचे तपस्येनें मी फार संतुष्ट झालों आहें. आतां तुमच्या कोणाच्या ज्या इच्छा असतील त्या मला सांगा, आणि मी त्या पूर्ण करीन. त्या साहीजणांची इच्छा एकच असल्यानें ते सर्वच ब्रह्मदेवास म्हणाले कीं, ' हे भगवन्, आपण जर खरोखर प्रसन्न आहां तर आम्हां सर्वांना एकच पण तो मात्र शेलका वर पाहिजे आहे, तेवढा द्यावा. इतकाच कीं, आपण ज्यापक्षीं आम्हांस वर देत आहां, त्या अर्थीं देव, उरग, यक्ष, गंधर्वपति, सिद्ध, चारण किंवा मनुष्य यांपैकीं कोणाचे हातून आमचा वध होऊं नये. त्याचप्रमाणें मोठमोठे तपोधनऋषि हे जरी हात उचलून मारणारे नाहींत तरी त्यांचे शाप हे अस्त्राहून घातक असतात, व ते त्यांचाच वर्षाव चालवितात. तर अशांच्या शापापासूनही आम्हांस बाधा होऊं नये. ऐवढें द्या.

हें ऐकून ब्रह्मदेव प्रसन्न अंतःकरणानें त्यांस म्हणाले कीं, तुम्ही आतां जें जें कांहीं मागितलें तें तें सर्व तुमचे मनाप्रमाणें होईल, याप्रमाणें त्या षड्गर्भ बंधूंना वर देऊन ब्रह्मदेव स्वर्गीं गेले.

इकडे वरील प्रकार ऐकून हिरण्यकशिपु क्रुद्ध होऊन षड्गर्भांस म्हणाला कीं, मला अवगणून ज्या अर्थीं ब्रह्मदेवापासून वर मिळविला त्या अर्थीं तुम्हीं माझे आतां शत्रूच झालां व म्हणून तुमच्यावरील माझें सर्व प्रेम उडालें आहे, व मी तुम्हांला आजपासून टाकिले आहेत, असें समजा. शिवाय ज्या तुमचे पित्यानें तुम्हांला षड्गर्भा म्हणून मोठें प्रतिष्ठित नांव दिलें व तुमचें देव्हारें केलें तोच आतां तुम्हीं गर्भस्थ असतांना तुम्हां सर्वांचा वध करील. गर्भांचा संभव कोठून म्हणाल तर ऐका. देवकीचे पोटीं ओळीनें सहा गर्भ राहावे असा देवसंकेत आहे व तुम्हीही दैत्य सहाच आहां, म्हणून तुम्हींच देवकीच्या गर्भांत जाल व तेथें असतां कंस तुम्हां सर्वांना ठार करील.

वैशंपायन म्हणतातः—हिरण्यकशिपूनें असा शाप दिल्यावर ते सहाही बंधु पाताळांत जाऊन पाण्याचे पोटीं लपून बसले होते. त्याच स्थळीं श्रीविष्णु गेले. पाहातात तों ते साहीजण पाण्यांत दडून असून, काळझोंपेनें विवश होऊन घोरत पडले आहेत. तेव्हां त्या सत्यपराक्रमी विष्णूंनीं स्वप्नरूपानें त्यांचे देहांत शिरून त्यांचे जीवात्मे काढून घेतले, व ते आपल्या योगमायेचे हवालीं करून तिला सांगितलें कीं, हे षड्गर्भ नामक जे दानवश्रेष्ठ त्यांचे जीवात्मे आहेत. ते घेऊन तूं माझ्या आज्ञेस्तव देवकीचे गृहीं जा, आणि क्रमाक्रमानें या साहीजणांस देवकीच्या गर्भांत स्थापन कर. हे उपजलेरे उपजले कीं, कंस यांना यमाचें दार दाखविल (कारण, यांना शापच तसा आहे). बरें, या योगानें देवकीचेंही वांझपण फिटेल व कंसाचेही श्रम फुकट जातील. ( कारण, यांना मृत्युलोकीं मारणें म्हणजे मेले त्यांनाच मारणें आहे. ) असो; येथवर गोष्टी साधल्या म्हणजे मी माझ्या सामर्थ्याला शोभेल अशा प्रकारचा तुझ्यावर मृत्युलोकीं प्रसाद करीन व तेणेंकरून, हे महामाये, तूं सर्व मृत्युलोकाची देवीच होऊन राहाशील. नंतर देवकीच्या सातव्या गर्भांत माझेंच

तेजाचा सौम्यांश राहील, व हा पुढें माझा वडील बंधु म्हणविला जाईल. यासंबंधीं तुला अशी कामगिरी आहे कीं, तो गर्भावस्थेंत असतांच सातवे महिन्यांत देवकीचे गर्भांतून काढून रोहिणीचे गर्भांत नेऊन स्थापन करावा. तूं देवकीचे गर्भांतून त्याचें संकर्षण ( ओढून किंवा काढून अन्यत्र येणें ) केल्यामुळें याचें जन्मानंतर संकर्षण हेंच नांव लोकांत पडून हा माझा वडील बंधु म्हटला जाईल, व याची मुद्राही चंद्राप्रमाणें शीतळ व मोहक होईल. या रीतीनें देवकीचे गर्भांत सातव्या महिन्यांत म्हणजे योग्यकालापूर्वीच गर्भ नाहींसा झाला असतांना तो राहिणीचे उदरांत नेऊन ठेविला आहे, हें कंसाला न कळल्यामुळें देवकीचा हा सातवा गर्भ आपले भयानेंच पतन पावला असें वाटून आठव्या वेळीं म्हणजे मीं देवकीच्या गर्भांत जाऊन राहिलों असतां माझा नाश करण्याविषयीं अधिकच तयारीनें तो झटेल. ( त्याला फसविण्याकरितां ) कंसाचा नंद नामक जो खिल्लारी त्याची यशोदा नांवाची सर्व गौळणींत मुखरण व सर्व लोकप्रसिद्ध स्त्री आहे, तिच्या पोटीं तूं आमच्याच कुळांतील (भावंडांतील) नववा गर्भ म्हणून जन्म घे. देव तुझें कल्याण करो. तेथें तुझा जन्म श्रावण वद्यांतच नवमीला[1] होईल व मीं अष्टमीच्या रात्रीला ऐनमध्याह्नीस, म्हणजे अभिजित्[2] नामक रात्रीच्या आठव्या मुहूर्तावर, सुखानें गर्भाबाहेर येईन.

याप्रमाणें आपण दोघेही गर्भाचे आठवे महिन्यांत एकेच वेळीं जन्मास येऊन कंसाचें शासन करणें जरूर असल्यामुळें आपण आपल्या गर्भांची अदलाबदल करून मी यशोदेच्या गर्भांत जाईन व तूं देवकीच्या गर्भांत जा. आणि आपली ही जी गर्भांची उलटापालट होईल तिजसंबंधीं कंसाला भूल पाडणें हें, हे निद्रेदेवी, तुझें काम. याप्रमाणें अदलाबदल करून तूं देवकीच्या गर्भांतून बाहेर येतांच कंस तुला तंगडी धरून ताडकन् शिळेवर आपटील; त्याबरोबर तूं आकाशांत जाऊन आपल्या शाश्वत पदास पोंचशील. स्वर्गांत जातांना तुझ्या अंगाची कान्ति मजसारखीच श्यामल असेल, आणि तुझा चेहेरा बलरामासारखा असेल. तुझे हात माझे हातांसारखेच लांब व मोठे असतील. तुझ्या हातांत एक तीन धारांचा त्रिशूल; एक सोन्याच्या मुठीचें खड्ग, एक मद्यानें भरलेलें पात्र आणि एक अत्यंत शुभ्र असें कमळ असेल. तुझ्या नेसूं निळी रेशमी साडी असून तुझे अंगावर पिंवळें पांघरूण राहील, व वक्षस्थलीं चंद्रकिरणांप्रमाणें ज्यापासून प्रकाश फांकतो आहे असला हार असून तुझ्या कानांत दिव्य कुंडलें असतील. तुझें मुख तर चंद्राचें प्रतिस्पर्धि असेल व केशपाश मनोहर असून त्यास विचित्र रत्नांचा मुकुट शोभिवंत करील. तुझे बाहु मोठ्या सर्पाप्रमाणें मृदु, मांसल व भयंकर असून दाही दिशा त्यांचें तेज फांकेल. शोभायमान् मयूरपिच्छांचा तुजवर ध्वज उभारिला जाऊन मयूरपिच्छांचींच तुझीं तेजस्वी बाहुभूषणें असतील, आणि तुजभोंवतीं घोर अशा भूतगणांचा वेढा असून माझे आज्ञेप्रमाणें कौमार व्रत पालन करून तूं स्वर्गास जाशील. तेथें गेल्यावर सहस्रनेत्र इंद्र मीं सांगितलेल्या पद्धतीनें तुला दिव्याभिषेक करून तुझे ठिकाणीं देवत्व उत्पन्न करील; आणि तो इंद्र तेव्हांपासून तुला आपली बहीण समजून चालेल; व

१ अष्टमी मध्यरात्रीस अष्टमी सरून नवमी लागली होती.

२ रात्रिदिवसाचे साठ घटिकांपैकीं दोन दोन घटकांचा एक असे जे भाग मानिले आहेत त्या प्रत्येकाला ' मुहूर्त ' अशी सामान्य संज्ञा आहे, व या मुहूर्तांपैकीं रात्रीच्या आठव्यास " अभिजित् " म्हणतात.

होते. हे बंधु कालनेमीचे पुत्र असून मोठे धिप्पाड, तेजस्वी, देवतुल्य व युद्धांत तर प्रतिदेवच असे होते. यांनीं पूर्वीं आपला आजा हिरण्यकशिपु याला न मानितां सर्व लोकांचा पितामह जो ब्रह्मदेव याची उपासना केली. डोईवर जटांचीं वेटोळीं पेंडून त्यांनीं खडतर तपस्या केली; त्या योगानें ब्रह्मदेव प्रसन्न होऊन त्या षड्गर्भांना वर देण्यास सिद्ध झाला.

ब्रह्मदेव त्यांना म्हणालाः–हे दानवश्रेष्ठहो, तुमचे तपस्येनें मी फार संतुष्ट झालों आहें. आतां तुमच्या कोणाच्या ज्या इच्छा असतील त्या मला सांगा, आणि मी त्या पूर्ण करीन. त्या साहीजणांची इच्छा एकच असल्यानें ते सर्वच ब्रह्मदेवास म्हणाले कीं, ‘ हे भगवन्, आपण जर खरोखर प्रसन्न आहां तर आम्हां सर्वांना एकच पण तो मात्र मोलका वर पाहिजे आहे, तेवढा द्यावा. इतकाच कीं, आपण ज्यापक्षीं आम्हांस वर देत आहां, त्या अर्थीं देव, उरग, यक्ष, गंधर्वपति, सिद्ध, चारण किंवा मनुष्य यांपैकीं कोणाचे हातून आमचा वध होऊं नये. त्याचप्रमाणें मोठमोठे तपोधनऋषि हे जरी हात उचलून मारणारे नाहींत तरी त्यांचे शाप हे अस्त्राहून घातक असतात, व ते त्यांचाच वर्षाव चालवितात. तर अशांच्या शापापासूनही आम्हांस बाधा होऊं नये. ऐवढें द्या.

हें ऐकून ब्रह्मदेव प्रसन्न अंतःकरणानें त्यांस म्हणाले कीं, तुम्ही आतां जें जें कांहीं मागितलें तें तें सर्व तुमचे मनाप्रमाणें होईल, याप्रमाणें त्या षड्गर्भ बंधूंना वर देऊन ब्रह्मदेव स्वर्गी गेले.

इकडे वरील प्रकार ऐकून हिरण्यकशिपु क्रुद्ध होऊन षड्गर्भांस म्हणाला कीं, मला अवगणून ज्या अर्थीं ब्रह्मदेवापासून वर मिळविला त्या अर्थीं तुम्हीं माझे आतां शत्रूच झालां व म्हणून तुमच्यावरील माझें सर्व प्रेम उडालें आहे, व मी तुम्हांला आजपासून टाकिले आहेत, असें समजा. शिवाय ज्या तुमचे पित्यानें तुम्हांला षड्गर्भा म्हणून मोठें प्रतिष्ठित नांव दिलें व तुमचें देव्हारें केलें तोच आतां तुम्हीं गर्भस्थ असतांना तुम्हां सर्वांचा वध करील. गर्भाचा संभव कोठून म्हणाल तर ऐका. देवकीचे पोटीं ओळीनें सहा गर्भ राहावे असा देवसंकेत आहे व तुम्हीही दैत्य सहाच आहां, म्हणून तुम्हींच देवकीच्या गर्भात जाल व तेथें असतां कंस तुम्हां सर्वांना ठार करील.

वैशंपायन म्हणतातः—हिरण्यकशिपूनें असा शाप दिल्यावर ते सहाही बंधु पाताळांत जाऊन पाण्याचे पोटीं लपून बसले होते. त्याच स्थळीं श्रीविष्णु गेले. पाहातात तों ते साहीजण पाण्यांत दडून असून, काळझोंपेनें विवश होऊन घोरत पडले आहेत. तेव्हां त्या सत्यपराक्रमी विष्णूंनीं स्वप्नरूपानें त्यांचे देहांत शिरून त्यांचे जीवात्मे काढून घेतले, व ते आपल्या योगमायेचे हवालीं करून तिला सांगितलें कीं, हे षड्गर्भ नामक जे दानवश्रेष्ठ त्यांचे जीवात्मे आहेत. ते घेऊन तूं माझ्या आज्ञेस्तव देवकीचे गृहीं जा, आणि क्रमाक्रमानें या साहीजणांस देवकीच्या गर्भात स्थापन कर. हे उपजलेरे उपजले कीं, कंस यांना यमाचें दार दाखविल (कारण, यांना शापच तसा आहे). बरें, या योगानें देवकीचेंही वांझपण फिटेल व कंसाचेही श्रम फुकट जातील. ( कारण, यांना मृत्युलोकीं मारणें म्हणजे मेले त्यांनाच मारणें आहे. ) असो; येथवर गोष्टी साधल्या म्हणजे मी माझ्या सामर्थ्याला शोभेल अशा प्रकारचा तुझ्यावर मृत्युलोकीं प्रसाद करीन व तेणेंकरून, हे महामाये, तूं सर्व मृत्युलोकाची देवीच होऊन राहाशील. नंतर देवकीच्या सातव्या गर्भात माझेच

तेजाचा सौम्यांश राहील, व हा पुढें माझा वडील बंधु म्हणविला जाईल. यासंबंधीं तुला अशी कामगिरी आहे कीं, तो गर्भावस्थेंत असतांच सातवे महिन्यांत देवकीचे गर्भांतून काढून रोहिणीचे गर्भांत नेऊन स्थापन करावा. तूं देवकीचे गर्भांतून त्यांचें संकर्षण ( ओढून किंवा काढून अन्यत्र येणें ) केल्यामुळें याचें जन्मानंतर संकर्षण हेंच नांव लोकांत पडून हा माझा वडील बंधु म्हटला जाईल, व याची मुद्राही चंद्राप्रमाणें शीतळ व मोहक होईल. या रीतीनें देवकीचे गर्भांत सातव्या महिन्यांत म्हणजे योग्यकालापूर्वींच गर्भ नाहींसा झाला असतांना तो रोहिणीचे उदरांत नेऊन ठेविला आहे, हें कंसाला न कळल्यामुळें देवकीचा हा सातवा गर्भ आपले भयानेंच पतन पावला असें वाटून आठव्या वेळीं म्हणजे मीं देवकीच्या गर्भांत जाऊन राहिलों असतां माझा नाश करण्याविषयीं अधिकच तयारीनें तो झटेल. ( त्याला फसविण्याकरितां ) कंसाचा नंद नामक जो खिल्लारी त्याची यशोदा नांवाची सर्व गौळणींत मुखरण व सर्व लोकप्रसिद्ध स्त्री आहे, तिच्या पोटीं तूं आमच्याच कुळांतील ( भावंडांतील ) नववा गर्भ म्हणून जन्म घे. देव तुझें कल्याण करो. तेथें तुझा जन्म श्रावण वद्यांतच[1] नवमीला होईल व मीं अष्टमीच्या रात्रीला ऐनमध्यान्हीस, म्हणजे अभिजित्[2] नामक रात्रीच्या आठव्या मुहूर्तावर, सुखानें गर्भाबाहेर येईन.

याप्रमाणें आपण दोघेही गर्भाचे आठवे महिन्यांत एकेच वेळीं जन्मास येऊन कंसाचें शासन करणें जरूर असल्यामुळें आपण आपल्या गर्भांची अदलाबदल करून मी यशोदेच्या गर्भांत जाईन व तूं देवकीच्या गर्भांत जा. आणि आपली ही जी गर्भांची उलटापालट होईल तिजसंबंधीं कंसाला भूल पाडणें हें, हे निद्रेदेवी, तुझें काम. याप्रमाणें अदलाबदल करून तूं देवकीच्या गर्भांतून बाहेर येतांच कंस तुला तंगडी धरून ताडकन् शिळेवर आपटील; त्याबरोबर तूं आकाशांत जाऊन आपल्या शाश्वत पदास पोंचशील. स्वर्गांत जातांना तुझ्या अंगाची कान्ति मजसारखीच श्यामल असेल, आणि तुझा चेहेरा बलरामासारखा असेल. तुझे हात माझे हातांसारखेच लांब व मोठे असतील. तुझ्या हातांत एक तीन धारांचा त्रिशूल, एक सोन्याच्या मुठीचें खड्ग, एक मद्यानें भरलेलें पात्र आणि एक अत्यंत शुभ्र असें कमळ असेल. तुझ्या नेसूं निळी रेशमी साडी असून तुझे अंगावर पिंवळें पांघरूण राहील, व वक्षस्थलीं चंद्रकिरणांप्रमाणें ज्यापासून प्रकाश फांकतो आहे असला हार असून तुझ्या कानांत दिव्य कुंडलें असतील. तुझें मुख तर चंद्राचें प्रतिस्पर्धि असेल व केशपाश मनोहर असून त्यास विचित्र रत्नांचा मुकुट शोभिवंत करील. तुझे बाहु मोठ्या सर्पाप्रमाणें मृदु, मांसल व भयंकर असून दाही दिशा त्यांचें तेज फांकेल. शोभायमान् मयूरपिच्छांचा तुजवर ध्वज उभारिला जाऊन मयूरपिच्छांचींच तुझीं तेजस्वी बाहुभूषणें असतील, आणि तुजभोंवतीं घोर अशा भूतगणांचा वेढा असून माझे आज्ञेप्रमाणें कौमार व्रत पालन करून तूं स्वर्गास जाशील. तेथें गेल्यावर सहस्त्रनेत्र इंद्र मीं सांगितलेल्या पद्धतीनें तुला दिव्याभिषेक करून तुझे ठिकाणीं देवत्व उत्पन्न करील; आणि तो इंद्र तेव्हांपासून तुला आपली बहीण समजून चालेल; व

---

[1] अष्टमी मध्यरात्रीस अष्टमी सरून नवमी लागली होती.

[2] रात्रिदिवसाचे साठ घटिकांपैकीं दोन दोन घटकांचा एक असे जे भाग मानिले आहेत त्या प्रत्येकाला ' मुहूर्त ' अशी सामान्य संज्ञा आहे, व या मुहूर्तांपैकीं रात्रीच्या आठव्यास " अभिजित् " म्हणतात.

तूं कुशिकाचें गोत्र घेऊन कौशिकी होशील; आणि नंतर तुला तो इंद्र गिरिश्रेष्ठ जो विंध्याचल त्यावर कायमचें मुख्य स्थान देईल. मग तेथून हजारों अन्यस्थानीं तुझ्या प्रतिमा होऊन सर्व पृथ्वीला तूं शोभिवंत करिशील. हे महाभागे, तूं मन मानेल तें रूप घेऊन आणि लोकांना वरदात्री होऊन त्रैलोक्यांत संचार करिशील; आणि तुजपाशीं कोणीं कोणतीही इच्छा मनांत धरून याचना केली असतां ती अवश्य सफल होईल. त्या विंध्याचलावर फिरणारे शुंभ आणि निशुंभ असे दोन दानव आहेत. त्यांना तूं माझें मनांत ध्यान केलें असतां त्यांच्या अनुयायांसह ठार मारिशील. श्रावण वद्य नवमीचे दिवशीं लोक तुझी जत्रा भरवून तुला दारूमांसाचे बळी देतील, व पशुहत्येसह तुझी पूजा करितील. जे कोणी माझें सामर्थ्य ध्यानीं आणून तुला वंदन करितील त्या मनुष्यांना धनाचे किंवा पुत्राचे बाजूनें कांहीं कमी पडणार नाहीं. कोणी रानावनांत फसले, किंवा समुद्रांत बुडूं लागले, अथवा चोरांनीं वाटेंत अडविले तर अशा मानवांचें तूंच रक्षण करिशील. आणि, हे कल्याणि, पुढें सांगितलेलें तुझें स्तोत्र म्हणून जे कोणी भक्तिपूर्वक स्तवन करितील अशा भक्तांना मी कधीं नाहींसा व्हावयाचा नाहीं व तेही मला नाहींसे होणार नाहींत.

## अध्याय तिसरा.

—:०:—

### आर्यास्तव.

**वैशंपायन उवाच:—**

आर्यास्तवं प्रवक्ष्यामि यथोक्तमृषिभि:पुरा ।
नारायणीं नमस्यामि देवीं त्रिभुवनेश्वरीम् ॥ १॥
त्वं हि सिद्धिर्धृतिः कीर्तिः श्रीर्विद्यासन्नतिर्मति ।
संध्यारात्रिः प्रभा निद्रा कालरात्रीस्तथैव च ॥ २॥
आर्या कात्यायनी देवी कौशिकी ब्रह्मचारिणी॥
जननी सिद्धसेनस्य उग्रचारी महाबला॥ ३॥
जया च विजया चैव पुष्टिस्तुष्टिः क्षमा दया ॥
ज्येष्ठा यमस्य भगिनी नीलकौशेयवासिनी ॥ ४॥
बहुरूपा विरूपा च अनेकविधिचारिणी ॥
विरूपाक्षी विशालाक्षी भक्तानां परिरक्षिणी ॥ ५॥
पर्वताग्रेषु घोरेषु नदीषु च गुहासु च ॥
वासस्तव महादेवि वनेषूपवनेषु च ॥ ६ ॥
शबरैर्बर्बरैश्चैव पुलिन्दैश्च सुपूजिता ॥
मयूरपिच्छध्वजिनी लोकान् क्रमसि सर्वशः ॥७॥
कुक्कुटैश्छागलैर्मेषैस्सिंहैर्व्याघ्रैस्समाकुला ॥
घण्टानिनादबहुला विन्ध्यवासिन्यभिश्रुता ॥८॥
त्रिशूला पट्टिशधरा सूर्यचन्द्रपताकिनी ॥
नवमी कृष्णपक्षस्य शुक्लस्यैकादशी तथा॥ ९॥
भगिनी बलदेवस्य रजनी कलहप्रिया ॥
आवासः सर्वभूतानां निष्ठा च परमागतिः ॥ १०॥
नन्दगोपसुता चैव देवानां विजयावहा ॥
चीरवासास्सुवासाश्च रौद्री संध्याचरी निशा ॥ ११
प्रकीर्णकेशी मृत्युश्च सुरामांसबलिप्रिया ॥
लक्ष्मीरलक्ष्मीरूपेण दानवानां वधाय च ॥ १२॥
सावित्री चापि देवानां माता मन्त्रगणस्य च ॥
कन्यानां ब्रह्मचर्यत्वं सौभाग्यं प्रमदासु च ॥ १३॥
अन्तर्वेदी च यज्ञानामृत्विजां चैव दक्षिणा ॥
कर्षुकाणां च सीतेति भूतानां धरणीति च ॥ १४॥
सिद्धिः सांयात्रिकाणां तु वेला त्वं सागरस्य च ॥
यक्षाणां प्रथमा यक्षी नागानां सुरसेति च ॥ १५॥
ब्रह्मवादिन्यथो दीक्षा शोभा च परमा तथा ॥
ज्योतिषां त्वं प्रभा देवि नक्षत्राणां च रोहिणी॥ १६
राजद्वारेषु तीर्थेषु नदीनां सङ्गमेषु च ॥
पूर्णा च पूर्णिमा चंद्रे कृत्तिवासा इति स्मृता॥ १७
सरस्वती च वाल्मीके स्मृतिर्द्वैपायने तथा ॥
ऋषीणां धर्मबुद्धिस्तु देवानां मानसी तथा ॥
सुरा देवी तु भूतेषु स्तूयसे त्वं स्वकर्मभिः ॥ १८॥
इन्द्रस्य चारुदृष्टिस्त्वं सहस्रनयनेति च ॥
तापसानां च देवी त्वमरणी चाग्निहोत्रिणां ॥ १९॥

क्षुधा च सर्वभूतानां तृप्तिस्त्वं देवतेषु च ॥
स्वाहा तृप्तिर्धृतिर्मेधा वसूनां त्वं वसूमती ॥ २० ॥
आशा त्वं मानुषाणां च पुष्टिश्च कृतकर्मणाम् ॥
दिशश्च विदिशश्चैव तथा ह्यग्निशिखा प्रभा ॥ २१ ॥
शकुनी पूतना त्वं च रेवती च सुदारुणा ॥
निद्रापि सर्वभूतानां मोहिनी क्षत्रिया तथा ॥ २२ ॥
विद्यानां ब्रह्मविद्या त्वमोङ्कारोथ वषट् तथा ॥
नारीणां पार्वतीं च त्वां पौराणीमृषयो विदुः ॥ २३ ॥
अरुन्धती च साध्वीनां प्रजापतिवचो यथा ॥
यथार्थनामभिर्दिव्यैरिन्द्राणी चेति विश्रुता ॥ २४ ॥
त्वया व्याप्तमिदं सर्वं जगत्स्थावरजङ्गमम् ॥
संग्रामेषु च सर्वेषु अग्निप्रज्वलितेषु च ॥
नदीतीरेषु चौरेषु कान्तारेषु भयेषुच ॥ २५ ॥
प्रवासे राजबन्धे च शत्रूणां च प्रमर्दने ॥
प्राणात्ययेषु सर्वेषु त्वं हि रक्षा न संशयः ॥ २६ ॥
त्वयि मे हृदयं देवि त्वयि चित्तं मनस्त्वयि ॥
रक्ष मां सर्वपापेभ्यः प्रसादं कर्तुमर्हसि ॥ २७ ॥
इमं यस्सुस्तवं दिव्यमिति व्यासप्रकल्पितम् ॥
यः पठेत्प्रातरुत्थाय शुचिः प्रयतमानसः ॥ २८ ॥
त्रिभिर्मासैः काङ्क्षितं च फलं वै संप्रयच्छसि ॥
षड्भिर्मासैर्वरिष्ठं तु वरमेकं प्रयच्छसि ॥ २९ ॥
अर्चिता तु त्रिभिर्मासैर्दिव्यं चक्षुः प्रयच्छसि ॥
संवत्सरेण सिद्धिं तु यथाकामं प्रयच्छसि ॥ ३० ॥
सत्यं ब्रह्म च दिव्यं च द्वैपायनवचो यथा ॥
नृणां बन्धं वधं घोरं पुत्रनाशं धनक्षयम् ॥ ३१ ॥
व्याधिमृत्युभयं चैव पूजिता शमयिष्यसि ॥
भविष्यसि महाभागे वरदा कामरूपिणी ॥
मोहयित्वा च तं कंसमेका त्वं मोक्ष्यसे जगत् ॥ ३२
अहमप्यात्मनो वृत्तिं विधास्ये गोषु गोपवत् ॥
स्ववृद्ध्यर्थमहं चैव करिष्ये कंसगोपताम् ॥ ३३ ॥
एवं तां स समादिश्य गतोन्तर्द्धानमीश्वरः ॥
सा चापि तं नमस्कृत्य तथास्त्विति च निश्चिता ३४
यश्चैतत्पठते स्तोत्रं शृणुयाद्वाप्यभीक्ष्णशः ॥
सर्वार्थसिद्धिं लभते नरो नास्त्यत्र संशयः ॥

इति श्रीखिलेषु हरिवंशे विष्णुपर्वणि स्वप्नगर्भविधाने आर्यास्तुतिर्नाम तृतीयोध्यायः ॥

**अर्थ.**

१ वैशंपायन सांगतातः—हे राजा, त्रिभुवनाची स्वामिनी जी देवी नारायणी तिला नमस्कार करून मी पूर्वकालीं ऋषींनीं तिचा जसा स्तव केला आहे तसाच तुला बोलून दाखवितों.

२ ( ऋषि म्हणतात. ) हे देवि, तूंच आमची सिद्धि, जीवन, कीर्ति, संपत्ति, विद्या, नम्रता, मति असून तूंच सन्ध्या, रात्रि, प्रभा, निद्रा व कालरात्रीहि आहेत. ३ तूंच आर्या, तूंच कात्यायनी, तूंच कौशिकी, तूंच ब्रह्मचर्यपालनकर्ती, तूंच कार्तिकस्वामीची माता, तूंच उग्र कर्म करणारी असून महाबलाढ्य आहेस. ४ तूंच जया, विजया, पुष्टि, तुष्टि, क्षमा, दया, नील वस्त्र धारण करणारी यमाची वडील बहीणही तूंच. ५ बहुरूपा, विरूपा, विरूपाक्षी, विशालाक्षी व नानाप्रकारचे विधी आचरून भक्तांचें परिरक्षण करणारी तूंच. ६ हे महादेवि, घोर पर्वतशिखरें, नद्या, गुहा, वनें व उपवनें यांत तुझी वस्ती असते. ७ शबर, बर्बर व पुलिंद हे लोक तुझी पूजा करितात आणि मयूरपिच्छांचा ध्वज लाविलेल्या रथांत बसून तूं सर्वत्र फिरतेस. ८ तूं विन्ध्य पर्वतावर रहात असून तेथें तुजभोवतीं कोंबडे, बकरे, मेंढे, सिंह, व्याघ्र इत्यादिकांची गर्दी असून अक्षयीं अनेक घंटांचा नाद चालू असतो अशी तुजबद्दल ख्याति आहे. ९ तुझे हातीं त्रिशूल व पट्टिश असून सूर्य आणि चन्द्र हे तुझे पताकेवर आहेत; तूं कृष्णपक्षांतील नवमी व शुक्लपक्षांतील एकादशीहि होस. १० तूं बलरामाची बहीण असून जनाचें रंजन करणारी आहेस; तूं कलहप्रिय असून सर्वभूतांना मरण व मुक्ति देणारी आहेस. ११ नंद गव-

ळ्याची मुलगी असून देवांना विजय देणारी आहेस; तूं सुंदर वस्त्र नेसणारी, रूपानें मोठी भयंकर, सन्ध्याकाळीं संचार करणारी व रात्रीरूपिणी आहेस. १२ तुझे केश पिंजारलेले असून मद्यमांसाच्या बलीची तुला फार आवड आहे; तूं एरवीं रूपानें अति मोहक असतां असुरांच्या वधार्थ मोठें विक्राल रूप धारण करितेस, आणि त्यांस प्रत्यक्ष मृत्युरूपिणी होतेस. १३ तूं देवांची गायत्री, मन्त्रगणांची आई, कुमारी जनांचें ब्रह्मचर्य व तरुणींचें सौभाग्यहि तूंच आहेस. १४ यज्ञांतील वेदि, ऋत्विजांची दक्षिणा, कृषिजनांची सीता (नांगराचा फाळ) व भूतमात्रांची धारण करणारी तूंच आहेस. १५ गलबतांतून व्यापार करणाऱ्यांना यशदात्री तूंच असून समुद्राची तीरमर्यादाहि तूंच आहेस; यक्षांमधील कुबेराची आई तूंच व नागांमधील नागमाता जी सुरसा ती तूंच. १६ ब्रह्मवादिनी तूंच; यज्ञ—दीक्षा तूंच; व उत्तम शोभा तूंच; हे देवि, ज्योतींचें तेज तूंच; नक्षत्रांमधील रोहिणी तूंच. १७ राजद्वारांस, तीर्थांस व नद्यांच्या संगमांस पूर्ण शोभा आणणारी तूंच; चन्द्राचे ठिकाणची पूर्णिमा तूंच व तुलाच कृत्तिवासा ह्मणजे गजचर्म पांघरणारी असें ह्मटलें आहे. १८ वाल्मीकमुनीची काव्यवाणी तूंच; व्यासमुनीची स्मरणशक्ति[1] तूंच; ऋषींची धर्मबुद्धि तूंच; देवांची सत्यसंकल्पात्मक मानसिक शक्तिहि तूंच; व आपल्या कृतीनें स्तुतीस पात्र होणारी अशी प्राणिमात्रांना सुराहि तूंच. १९ इन्द्राची सहस्रनयनयुक्त मोहक दृष्टि तूंच; तपस्व्यांचें आराध्य दैवत आणि अग्निहोत्र्यांची अरणीहि तूंच; २० सर्वभूतांची क्षुधा व सर्व दैवतांची स्वाहा, तृप्ति, धृति व मेधाहि तूंच व अष्टवसूंची वसुमतीहि तूंच. २१ उद्योगी जनांची आशा तूंच व कृतोद्योगांची पुष्टिहि तूंच; दिशा, विदिशा, अग्निशिखा व प्रभाही तूंच. २२ शकुनि, पूतना व दारुण अशी रेवती[1] तूंच आहेस. सर्व भूतांना झांपड घालणारी अशी शूर निद्राहि तूंच. २३ विद्यांमधील जी ब्रह्मविद्या ती तूंच. ओंकार तूंच; वषट् तूंच; स्त्रियांपैकीं फार पुरातन अशी जी पार्वती ती तूंच असें ऋषि समजतात. २४ प्रजापतीचे ह्मणण्याप्रमाणें साध्वींमधील अरुंधती तूंच. अनेक इतर दिव्य नामांनीं विश्रुत असणारी इन्द्राणीही तूंच. २५–२६ यावत् स्थावरजंगमात्मक जगत्‌ही तूंच; सर्व युद्धांत, सर्व अग्निप्रळयांत, नदीकांठीं, चोरांशीं गांठ पडली असतां, अरण्यांत, कोणत्याही भयप्रसंगीं, प्रवासांत, राजबंधांत, शत्रुमर्दनप्रसंगीं, व कोणत्याही प्राणसंकटीं तूंच आमची रक्षणकर्ती यांत शंका नाहीं. २७ हे देवि, माझें हृदय सर्वथा तुझे ठिकाणीं आहे. तसेंच माझें मन व चित्तही[2] तुझेच ठिकाणीं. याकरितां मजवर कृपा करून सर्व पापांपासून माझें रक्षण कर.

२८–२९ हा श्रीविष्णूंनीं स्वमुखानें केलेला व व्यासमुनींनीं पद्यरूपानें लिहिलेला दिव्यस्तव जो कोणी नित्य प्रातःकालीं उठून शुचिर्भूत होऊन निर्मल अंतःकरणानें पठण करील त्याला हे देवि, तीन महिन्यांत तूं इच्छित फल देतेस व सहा महिन्यांनीं तर फारच उंची असा वर देतेस. ३० शिवाय तीन महिनेपर्यंत जर कोणी तुझें अर्चन करील तर तूं त्याला दिव्य चक्षु देशील आणि संवत्सर-

१ अठरा पुराणें व उपपुराणें असले विशाल ग्रंथ लिहिणाराची स्मरणशक्ति खरोखरच अमानुष किंवा दैवीच असली पाहिजे.

१ या बालकांना पीडा देणाऱ्या कोणी देवता आहेत.

२ संकल्प व विकल्प करणें हा मनाचा धर्म व कोणत्याही वस्तूचें सतत चिंतन किंवा ध्यास करणें हा चित्ताचा धर्म.

पर्यंत अर्चन करणाराची तर कोणतीहि मनकामना तूं पुरवितेस. ३१–३२ कृष्णद्वैपायनांचे म्हणण्याप्रमाणें तूंच ब्रह्म किंवा दिव्य असें सत्य आहेस. आणि पूजन केलें असतां मनुष्यांना बंधन, वध, घोर पुत्रनाश, धनक्षय, व्याधिभय, व मृत्युभय हीं बाधूं देत नाहींस. हे कामरूपिणि, हे महाभागे, तूं जगताला वरदात्री होशील. आणि त्या कंसाला भूल पाडून तूं एकटीच सर्व जगताचा उपभोग घेशील. ३३ ( विष्णु म्हणतात, ) मीही गायींत राहून गवळ्यांची वृत्ति धरीन इतकेंच नव्हे तर माझें कल्याण व्हावें म्हणून मी कंसाचाच गुराखी होईन.

३४ याप्रमाणें त्या आर्येला सांगून तो परमात्मा अंतर्धान पावला व तीही त्याला नमस्कार करून "बरें, आपण म्हणतां तसेंच असो" असें त्याला निश्चयानें बोलली. ३५ जो कोणी हें स्तोत्र पठण करील किंवा वारंवार श्रवण करील त्या पुरुषाला निखालस सर्वार्थसिद्धि प्राप्त होईल.

## अध्याय चवथा.

—:०:—

### श्रीकृष्णजन्मवर्णन.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें योगनिद्रा आणि परमात्मा श्रीविष्णु यांनीं देवकीचे ठिकाणीं गर्भयोजना कसकशी करणें याबद्दल संकेत केल्यावर लौकरच देवतेतुल्य सुन्दर जी देवकी ती त्या संकेतानुरूप एकामागून एक असे सात गर्भ धारण करिती झाली. त्यांपैकीं पहिले सहा गर्भ तिचे उदरांतून बाहेर येतांच कंसानें शिलातलावर आपटले. पुढें तिला सातवा गर्भ राहिला त्या वेळीं त्या योगमायेनें तो गर्भ देवकीचे उदरांतून काढून रोहिणीचे उदरांत नेला. इकडे रोहिणीला त्या वेळीं एकाएकीं गाढ निद्रा येऊन ती धरणीवर पडली असतां तिला असें स्वप्न पडलें कीं, आपणास विटाळ[1] आला असून आपल्या पोटांतून गर्भ धरणीवर पडला, व त्याचे ठिकाणीं आपले गर्भाशयांत दुसरा गर्भ स्थापित झाला. जागी झाल्यावर पूर्वीं स्वप्नांत तिनें आपले उदरांतून जो गर्भ खालीं पडला म्हणून पाहिलें होतें तो गर्भ जागृतींत तिला धरणीवर कोठें दिसेना व यामुळें ती कांहीं वेळ फार खिन्न झाली. त्या वेळीं तिला खिन्न पाहून त्या रात्रीच्या काळोखांतच योगनिद्रा तिला म्हणाली कीं, हे रोहिणि, तूं खिन्न होऊं नको, तूं या बुद्धिमान् वसुदेवाची रोहिणी म्हणजे वंशवृद्धिकर्त्री असून चन्द्राची ज्याप्रमाणें रोहिणी ( तारा ) त्याप्रमाणें आवडती आहेस. आणि तूं जो गर्भपाताचा प्रकार पाहिलास त्याचें खरें स्वरूप उलट आहे. तें असें कीं, हा गर्भ मी देवकीचे उदरांतून आकर्षण करून तुझे उदरांत आणून स्थापिला. याकरितां आतां तुला लौकरच पुत्ररत्न होईल. व अन्य गर्भांतून कर्षण करून हा तुझे ठिकाणीं शिरल्यामुळें याला संकर्षण असें नांव पडेल. आपणास पुत्रगर्भाचा संभव झाला हें ध्यानीं येतांच रोहिणीला पोटांत फार आनंद झाला व लज्जेनें किंचित् खालीं मान घालून ती आनंदानें रोहिणीचे तारकेसारखी चमकत आपल्या मन्दिरांत शिरली.

इकडे देवकीचें पोट जिरलें कीं गर्भपात झाला इत्यादि चौकशी कंसाचे लोक करीत असतां ज्याच्या कारणानें कंसानें देवकीचे सात गर्भ आपटून टाकिले तो ( आठवा ) गर्भ देवकीचे उदरांत पुनरपि संभूत झाला, आणि या वेळीं तर कंसाचे मसलतगार त्या गर्भाच्या

[1] बहुधा गर्भपात होण्याचे पूर्वीं स्त्रियांना अकालीं विटाळ वाहूं लागतो.

अतिशयच जपणीस लागले; आणि परमात्मा हरिहि या गर्भांत आपखुषीनें येऊन राहिला होता. ज्या दिवशीं देवकीला हा आठवा गर्भ राहिला त्याच दिवशीं तिकडे नन्दपत्नी जी यशोदा तिलाही गर्भ राहिला; मात्र हा गर्भ विष्णूच्या शरीरापासून उत्पन्न झालेली व त्याचे आज्ञेबरोबर चालणारी अशी जी योगनिद्रा तिचा होता. देवकी व यशोदा याप्रमाणें गर्भवती होऊन त्यां गर्भांच्या पूर्णतेचा काल म्हणजे नऊ महिने होण्याचे अगोदरच, आठवे महिन्यांत सारख्याच प्रसूत झाल्या. वृष्णिकुलधुरंधर श्रीकृष्ण ज्या रात्रीं जन्मला त्याच रात्रीं यशोदेनेंही आपल्या कन्यागर्भास जन्म दिला. यशोदा आणि देवकी ज्या सारख्याच वेळ गर्भारपणांत होत्या त्यांपैकीं पहिली नन्दगोपाची भार्या व दुसरी वसुदेवाची. यांपैकीं देवकी बरोबर मध्यरात्रीं (अष्टमीच्या) अभिजित् मुहूर्तावर (कृष्णरूपानें) विष्णूस प्रसवती झाली आणि यशोदा त्या कृष्णाला वसुदेवाचे घरून काढून नन्दाचे घरीं आणून पोंचवितां क्षणींच म्हणजे पहांटेची अर्धप्रहर रात्र शिल्लक आहे तोंच वर सांगितलेल्या कन्येला प्रसवती झाली.

कृष्णजन्म होतांच समुद्र हेलकावूं लागले, शेषादि धरणीधर मान डोलवूं लागले, थंड पडलेले अग्नि धडकले, मंगल वारे वाहूं लागले, धूळ शांत झाली, आकाशांतील ज्योती फारच चमकूं लागल्या. या प्रमाणें तो अव्यक्त,शाश्वत, सूक्ष्म, व जगाचें दुःख हरणकर्ता प्रभुनारायण जन्मास येतांच स्वर्गांत देवांच्या दुंदुभी न वाजवितांच शब्द करूं लागल्या. इन्द्र आकाशांतून पुष्पवृष्टि करूं लागला. महर्षि हे गंधर्व अप्सरांसह मंगलवाणीनें त्या मधुसूदनाचें स्तोत्र गात राहिले. सारांश, तो हृषीकेश जन्मास येतांच निखिल जगताला आनंद झाला. व त्यानें उपजतांच जगताकडे दृष्टि फेंकिली, तिजबरोबर सर्व जगताला मोह पडला. असा तो प्रभु ज्या नक्षत्रावर जन्मला त्या नक्षत्राचें नांव अभिजित्, त्या रात्रीचें नांव जयंती, व त्या मुहूर्ताचें नांव विजय. (याप्रमाणें सर्वच विजयकारक होतें.) जन्मतांच देवगणासह इंद्रही त्याची स्तुति करूं लागला. इकडे वसुदेव त्या रात्रीं आपले पोटीं श्रीवत्सादि दिव्य लक्षणांनीं युक्त असा भगवान् अधोक्षज आलेला पाहून म्हणाला, "हे प्रभो, आपलें दिव्यरूप आंवरून घ्या. मी असें सांगतों याचा हेतु, हे देवा, या कंसाचें मला भय वाटतें. कारण, हे कमलाक्षा, या कंसानें माझे (सात) पुत्र म्हणजे तुझेच सर्व वडील भाऊ मारिले आहेत.

वैशंपायन सांगतातः—वसुदेवाचें तें वचन ऐकून अच्युतानें तें आपलें चतुर्भुजात्मक रूप लपविलें व पिता या नात्यानें वसुदेवाला विनंती केली कीं, "मला आपण (आतांचे आतां गुप्तपणें) नन्दनामक गवळ्याचे घरीं नेऊन पोंचवा." ते त्याचे शब्द ऐकतांच तो पोरवेडा वसुदेव त्या मुलाला बंदोबस्तानें गुरफाटून घेऊन क्षणाचा विलंब न करितां रातोरात यशोदेच्या घरीं घेऊन गेला. व यशोदेला नकळत त्या मुलाला तेथें ठेवून तिची नुकतीच झालेली पोरगी बरोबर घेऊन परतला आणि तिला देवकीच्या बिछान्यावर ठेवून देता झाला. याप्रमाणें त्या गर्भांची आदलाबदल केल्यावर एका अर्थीं आपण कृतार्थ झालों असें वाटून तो त्या सूतिकागृहांतून बाहेर आला. आणि नंतर मनांत भयविव्हल होऊन त्यानें उग्रसेनपुत्र जो कंस त्याला सांगितलें कीं, आपणांस (वसुदेवास) अति सुंदर कन्या झाली. ती वार्ता कानीं येतांच कंसाला धीर निघेना. तत्काल बरोबर चलाख रक्षक घेऊन तो बलाढ्य कंस वसुदेवाचे दाराशीं येऊन ठेपला. आणि दारीं येतांच "काय



तो पोरवेडा वसुदेव त्या मुलाला बंदोबस्तानें गुरफाटून घेऊन रातोरात यशोदेच्या घरीं घेऊन गेला. (विष्णुपर्व अ० ४ पृष्ठ १८८.)

झालें? काय झालें? तें बरे बोलानें आतांचे आतां मजपाशीं घेऊन या" असें म्हणून धमकी देतांच बोलूं लागला. ते शब्द कानीं येतांच देवकीच्या गृहांतील सर्व स्त्रिया हाहाःकार करूं लागल्या, व स्वतः देवकी दीन होऊन बाष्पगद्गदवाणीनें कंसाला विनवून म्हणूं लागली "बाबारे ही घे, या खेपेला पोरगीच झाली. तूं शक्तिमान् पडलास तेव्हां मला एकासारखे एक सुंदर सात पुत्र झाले होते, ते सर्वेही तूं मारिलेस. या वेळीं मला मुळींच पोरगी झाली व तीही मेल्यासारखीच आहे. तथापि, तुला वाटत असेल तर ही आपली पाहून घे." याप्रमाणें देवकी बोलतांच त्या मूर्ख कंसाला तसली पोरगी पाहूनही आनंद झाला. आणि मग गर्भाशयांत क्लेश पावल्यानें निश्चेष्ट होऊन केवळ पृथ्वीप्रमाणें जड झालेली व गर्भोदकानें जिचे केश ओले झाले आहेत अशी ती कन्या देवकीनें त्याचे पुढें भुईवर ठेविली असतां तिला घेऊन गर्गर फिरवून व तिचे हालहाल करून त्यानें अखेरीस शिळेवर ताडकन् आपटून फेंकून दिली. याप्रमाणें अवहेलना करून त्यानें आपलेकडून जरी तिला दगडावर आपटून दिली तरी तिचा चुराडा न होतां ती तशीच आकाशांत उडून गेली. जातांना तिनें गर्भांतून बाहेर आलेलें मर्त्य शरीर येथेंच टाकून दिलें. आणि दुसरें दिव्य स्वरूप घेतलें. या रूपांत तिनें डोकीवर केश मोकळे सोडिले होते, दिव्य पुष्पांच्या माळा घातल्या होत्या व उट्या लाविल्या होत्या, कंठस्थित रत्नहारांनीं तिचे सर्व अंगाला शोभा आली होती, मस्तकीं मुकुट झळकत होता, तिच्या नेसूं नीलवस्त्र व अंगावर पीतवस्त्र होतें, तिचे स्तन गजगंडाप्रमाणें पीनोन्नत असून तिचे नितंब रथचक्राप्रमाणें विस्तीर्ण होते. तिचें मुख केवळ चंद्राप्रमाणें आल्हादक असून तिला चार भुजा होत्या. तिचा वर्ण विद्युल्लतेप्रमाणें झळाळत असून तिचे नेत्र बालसूर्याप्रमाणें तेजस्वी होते. तिचा स्वर मेघाप्रमाणें गंभीर व मांसल असून ती मेघयुक्त संध्येप्रमाणें शोभत होती. ती सदा कन्याच म्हणजे ब्रह्मचारिणी असून देवही तिची स्तुति करीत असत. त्या अंधारे रात्रीं तिचे भोंवतीं पिशाच्चगण जमून त्यांबरोबर ती नाचत हंसत होती व सभोंवर मधून मधून घेरे घेत असल्यानें फारच खुलत होती. अशा थाटांत ती भयंकर कन्या आकाशांत जाऊन व तेथें अति उंची मद्य पिऊन खदखदां मोठ्यानें हंसूं लागली. आणि रागानें लाल होऊन कंसाला दडपून बोलूं लागली कीं, "हे कंसा, तूं एकाएकीं मला तंगडी धरून भिरकावून शिळेवर आपटून (आपलेकडून) मला ठार केलीस परंतु, ही करणी तूं केवळ आत्मघाताची केलीस. (कारण, माझी तर कांहीं हानी झाली नाही पण) आतां ज्या वेळीं शत्रु तुला फरफर ओढून रणांगणीं ठार करण्याच्या बेतांत येईल त्या वेळीं मी तुझा देह हातांनीं (नखांनीं) विदारून त्यांतील ऊन्ह ऊन्ह रक्त पिईन."

याप्रमाणें भयंकर शब्द बोलून ती देवी आपल्या भूतगणांसह त्या देवभुवनांत म्हणजे आकाशांत यथेच्छ मार्गानें संचारूं लागली. वृष्णिकुलानें पूज्य अशी ती कन्या स्वर्गांतच वाढत चालली. देवाचे आज्ञेवरून तिचें देवलोकीं पुत्रवत् पालन चालू होतें. ही देवी प्रजापतीचे अंशापासून पूर्वीं योगबलानें निर्माण झाली असून ती केशवाच्या रक्षणार्थ पुनरपि भूलोकीं अवतीर्ण झाली होती; व पुनः स्वर्गांत जाऊन देवांप्रमाणें दिव्य शरीर धारण करून ती कृष्णाचें संरक्षण करीत होती व यामुळें यादवरूपानें अवतीर्ण झालेले सर्व देव तिची पूजा करीत असत.

ती स्वर्गांत उठून जातांच कंसाला वाटलें कीं, आतां आपला मृत्यु खास आला ( आणि आपण केलेले सर्व यत्न विफल झाले. ) असें पाहून आणि लाजून एकांतांत तो देवकीला बोलला. हे भगिनि, मी तुझे गर्भ मारून आपल्याकडून स्वतःचा मृत्यु दूर व्हावा म्हणून यत्न केले. परंतु, माझे सगळे यत्न विफळ होऊन मला भलतेचकडून मृत्यु उपस्थित झाला. मी आपल्याच आत्मसंबंध्यांचा घात केला. ( ही गोष्ट मी खास वाईट केली खरी ) पण मी हें निराशेच्या भरांत केलें; पण ( खेदाची गोष्ट ही कीं ) मीं आपलेकडून इतका भगीरथ प्रयत्न केला तरी माझ्या कर्तब-गारीची कमान दैवावर चढली नाहीं ( दैवानें करायचें तें केलेंच ). असो; हे भगिनि, आतां तूं गर्भांबद्दल चिंता आणि पुत्रहानीबद्दल होणारा मनस्ताप सोडून दे. ( व मजवरही रागावूं नको. कारण ) खरें पाहातां काल उफराटा आला आहे व ही सर्व वस्तुतः कालाची करणी असून मी तेथें निमित्तमात्र झालों आहें. वास्तविकपणें काल हाच मनुष्यांचा शत्रु आहे. तोच त्यांचा परिणाम करितो; व वस्तुमात्राला कालच नाहींसा करितो; आणि अशा कामांत माझ्यासारखा एखादा गोमाजी अपयशापुरता नामधारी मात्र असतो. हे देवि, मनुष्याच्या कर्मानुसार त्याला दुःखें हीं अवश्य येतातच. खेदाची गोष्ट ही कीं, मनुष्य त्यांशीं आपला कारणसंबंध लावितो. याकरितां तूं आतां पुत्रांची चिंता सोड व त्यांसंबंधीं दुःख करून विलाप करण्याचें सोडून दे. बहुधा मनुष्यांचा जन्म हा असाच; आणि कालाला स्थैर्य हें माहीतच नाहीं. हे देवकि, हा मी पुत्राप्रमाणें तुझे चरणांवर मस्तक ठेवितों. मी जाणतों आहें कीं, मी तुझा अपकार केला आहे, तथापि, ( मी शरण आहें हें पाहून ) मज-वरील रोष सोड.

याप्रमाणें कंस बोलला असतां देवकी डोळ्यांत अश्रु आणून दीनमुद्रेनें वसुदेवाकडे पहातच " वत्सा ऊठ ऊठ " असें माते-प्रमाणें कंसाला म्हणत, बोलली, "हे कंसा, तूं कांहीं विशिष्ट इच्छेनें माझे समक्ष माझे गर्भ मारिलेस. पण हे वत्सा, या कृतीचें खरें कारण तूं नसून कृतांतच आहे. शिवाय, ज्या-अर्थीं तूं आपल्या अपकृत्याबद्दल आपली स्वतःची इतकी निर्भर्त्सना करून माझे पायावर माथेंही ठेवितो आहेस, त्या अर्थीं माझा झालेला गर्भनाश मला शांतपणें सहन केला पाहिजे. तूं म्हणतोस तेंही केवळ खोटें नव्हे. जीव गर्भांत प्रविष्ट झाला कीं, मृत्यु त्याजपाशीं खेटून उभा असतोच. तो त्याची बाल्यांतही कींव करीत नाहीं, तारुण्याकडेही पहात नाहीं, आणि वार्धक्यांत तर त्याचा जसा काय हक्कच. एतावता कोणत्याही अवस्थेंत मृत्यु येणें हें केवल कालाचेंच चेष्टित आहे. त्यांत तुझे-सारखा एखादा निमित्ताला मात्र सांपडतो. जो गर्भ जन्मासच आला नाहीं, तो वायू-सारखा अदृश्यच असतो. ( म्हणून आपलें चित्त तेथें गुंतत नाहीं. ) बरें, जन्मास आलेला गर्भही ( विधीचे मनांत आल्यास ) जन्मून न जन्मल्यासारखा होतो ( मरतो ) आणि विधि नेईल तिकडे जातो. असा खरा प्रकार आहे. याकरितां हे वत्सा, तूं स्वस्थ परत जा; व माझे पुत्रांचे नाशाबद्दल मला होणाऱ्या खेदाचा विटाळ तुला होऊं देऊं नको. मृत्यु प्रथम अकस्मात प्राण्याला घेऊन जातो आणि मग मनुष्यें त्याच्या मरणाला कोणी तरी हेतु मागून शोधून काढीत असतात. खरें पहातां मातेच्या गर्भकालीं होणारे शास्त्रविधि, पूर्व-जन्मींचें कर्म, कालधर्म, स्तेयादि लौकिकी

अपकृत्यें, आईबापांचे अनाचार, व जातीदोष, इत्यादि अनेक कारणसंघातानें प्राण्याचा मृत्यु होत असतो.

याप्रमाणें तें देवकीचें वाक्य ऐकून कंस अंतर्यामीं एकाअर्थीं क्रुद्ध होऊन जळूं लागला. तथापि, दुसऱ्या बाजूनें, आपण केलेला सर्व यत्न विफल गेला हें पाहून तो उदास व दीन होऊन आपल्या सदनास गेला.

## अध्याय पांचवा.

— :०:—

### नंदाचें व्रजनगरीप्रत गमन.

वैशंपायन सांगतातः—गोकुलामध्यें पाठविलेल्या रोहिणीचे पोटीं चंद्रापेक्षां अधिक रमणीय तोंडवळ्याचा पुत्र जन्मास आल्याचें वर्तमान देवकी प्रसूत होण्यापूर्वींच वसुदेवाला समजलें होतें. म्हणून करदानार्थ मथुरेस आलेल्या नंदाला विलंब न करतां गांठून वसुदेव मधुर वाणीनें म्हणाला; ' बा नंदा या यशोदेसहवर्तमान तूं गोकुळांतच जा; व तेथें गेल्यानंतर, दोघांहि पुत्रांचे जातकर्मादिक संस्कार करून, त्यांचें मोठ्या काळजीनें संगोपन कर. गोकुळामध्यें रोहिणीच्या पोटीं आलेल्या माझ्या लाडक्या बालकाचें लालनपोषण कर. (खरोखर) पितृपक्षाकडील पुत्रवान् लोकांच्या मी निंदेला पात्र होणार. कारण, दोहोंतून एकाही तान्ह्या मुलाचें मुख अवलोकन करण्याचें ( सुख ) माझ्या नशीबीं नाहीं. मी अक्कलवंत असूनही, माझी अक्कल ( दुर्दैवाच्या ) जोरानें नसल्यासारखी होते. ( ती अशी ) माझ्या बालकाचा हा निर्दय कंस वध करील कीं काय अशी मला भीति वाटते. म्हणून, बाबा नंदगोपा, माझ्या रौहिणेय पुत्राला, मारण्याकरितां टपलेल्या कंसादिकांचें खरें स्वरूप ओळखून वाग व त्याचें संरक्षण कर. शिवाय लहानपणीं मुलांना पुष्कळ प्रकारच्या विघ्नांपासून त्रास होतो असा या संसारांतील नित्याचा अनुभव आहे. माझा पुत्र वडील आहे व तुझा हा कनिष्ठ आहे. पण, दोघांच्या नांवांतील यौगिक अर्थ एकच आहे. तो ओळखून, विषम भाव मनांत न आणतां, उभयतांचें संगोपन कर. समवयस्क अशीं हीं बालकें क्रमानें मोठीं होत जाऊन, गोकुलाला शोभा आणतील अशा रीतीनें, हे नंदा, त्यांस पाळ. बाल्यावस्थेंत प्रत्येक मनुष्य नाना प्रकारच्या मोहांना बळी पडून, स्वेच्छाचारी व रागीट बनण्याचा संभव असतो. म्हणून आतांच तुला फार जपलें पाहिजे. वृंदावनामध्यें तूं कधींही गुरांचा वाडा बांधूं नकोस. कारण, तेथें वास्तव्य करून राहिलेल्या पापदृष्टि केशी दैत्याचें त्या ठिकाणीं फार भय आहे. सरपटणारे प्राणी, कीड, मुंग्या, पक्षी, गोठ्यांतील गाई व वासरें इत्यादिकांपासून या उभयतां बालकांचें संरक्षण कर. बा नंदा, रात्र बहुतेक संपत आली आहे. करितां एकाद्या जलद चालणाऱ्या वाहनांत बसून तूं आतां येथून जा. हे पहा तुझ्या उजवीकडचे व डावीकडचे पक्षी किलबिल करून तुला जणूं काय हांका मारीत आहेत.

याप्रमाणें, महात्म्या वसुदेवानें गुप्तपणानें नंदाला जाण्याची आज्ञा दिल्यावर, तो हर्षभरित होऊन यशोदेसहवर्तमान वाहनारूढ झाला. स्कंधावर (भोयांनीं) वाहून न्यावयाच्या शिबिकेंतील मृदु शय्येवर त्या सुबुद्ध नंदानें कुमार श्रीकृष्णाला निजविलें, आणि तो यमुना नदीच्या तीरातीरानें जाणाऱ्या मार्गानें उद्दिष्ट स्थळाकडे जावयास निघाला. तो मार्ग निर्जन व जलमय असून, त्यावरून थंडगार वारा वहात होता.

१ संकर्षण व कृष्ण हे दोन्ही शब्द " कृष " आकर्षण करणें, ओढणें याच धातूपासून झाले असल्यानें 'चित्ताकर्षक' हा अर्थ उभयांसहि सारखाच लागू पडतो.

जातां जातां गोवर्धन पर्वताच्या संनिध रम्य जागीं यमुनेच्या कांठीं वसलेलें असें गोकुल त्याच्या दृष्टीस पडलें. तेथें शीतल वायूचा यथेच्छ संचार चालू होता; विविध प्रकारचे शब्द करणाऱ्या श्वापदांनीं त्या व्रजास शोभा आलेली होती. तसेंच नाना तऱ्हेच्या लता, वेली व मोठमोठे वृक्ष त्या ठिकाणीं दृग्गोचर होत होते. ठिकठिकाणीं तृणाच्या आश्रयानें बसलेल्या दुभत्या गाईंच्या कळपांमुळें तें स्थान रमणीय दिसत होतें. तेथील, गाईंचे जाण्याचे व जलाशयांत उतरण्याचे मार्गांत खांचखळगे वगैरे कांहीं एक नव्हते. बैलांच्या खांद्याच्या व शिंगांच्या तडाक्यांनीं तेथील वृक्षांच्या साली निघाल्या होत्या. गृध्रादि मांसभक्षक प्राणी आणि त्यांच्या मागें लागलेले ससाणे, वन-मार्जारादिक हिंस्र पशु, त्याप्रमाणेंच वसा व मेद इत्यादिक भक्षण करून राहणारे कोल्हे, वाघ आणि सिंह यांचेंही तेथें वैपुल्य होतें; व्याघ्रादिकांच्या गर्जनेचे ध्वनि त्या ठिकाणीं कानीं पडत होते. नाना प्रकारचे पक्षी तेथें वास्तव्य करून राहिले होते. तेथील वृक्षांना मधुर फळें आलेलीं होतीं त्यामुळें तें अधिकच खुलत होतें. तृण व वेली या तेथें विपुल होत्या. त्या रमणीय व्रजांत गाईंचें हंबरणें ऐकूं येत होतें. जिकडे तिकडे गवळीणी दृष्टीस पडत होत्या, व वासरांच्या हंबरण्याचे ध्वनि चोहों-कडे ऐकूं येत होते. तेथें गाडे पुष्कळ असून, रस्त्यांवर कांटेरी वया घातल्या होत्या; गांवाच्या शींवेवर मोठमोठे वन्य वृक्ष तुटून पडलेले दिसत होते. वासरांसाठीं भूमींत रोंव-लेले खुंट व गुरांचीं दावीं यांचे योगानें तें गोकुळ फार शोभिवंत दिसत होतें. तेथें जमिनी-वर जिकडे तिकडे वाळलेल्या गोमयाचा चूर पडलेला होता. प्रत्येक झोंपडींत व मठींत चटया हांतरलेल्या दिसत होत्या. सुलक्षण गोपवीरांच्या उद्योगीपणामुळें तें भरभराटींत होतें. त्यांतील रहिवाशी सुखी व सदृढ होते. गुरांच्या दावणीच्या रज्जूंनीं तें लांबच लांब दिसत होतें. ताक घुसळीत असतांना डेऱ्यांतून उठणारे ध्वनींनीं गजबजून गेलें होतें. ताकाचे थेंब भूमीवर सांडल्यामुळें ठिकठिकाणची जागा मलिन झालेली होती. दह्यावरील निवळ फेंक-लेल्या ठिकाणची मृत्तिका आर्द्र झालेली होती. ताक करण्याचे माथे व गोपींच्या हातांतील बांगड्या वाजत त्यांच्या नादानें सर्व गांव दुमदुमून गेलें होतें. झुलुपें धारण करणाऱ्या लहान बालकांच्या गोपालक्रीडा चोहोंकडे चालू होत्या. तेथील गोठ्यांना अडसराचीं दारें होतीं; गुरांनीं भरलेल्या गोठ्यांनीं तें सर्व नगर व्यापून राहिलें होतें. जागजागीं तूप कढत होतें, त्या योगानें तेथील वायूला सुगंध प्राप्त झाला होता; नील व पीत वर्णाचीं वस्त्रें परिधान केलेल्या तरुणींच्या संचारानें त्या गोकुलाला अपूर्व शोभा आलेली होती. गोपकन्यांनीं वन्य पुष्पांचे तुरे कानांत खोंवले होते; आंवळ कांचोळ्या घालून व मस्तकावर घडे ठेवून यमुना नदीच्या तीरातीरानें गवळीणींचे थवे पाणी आणण्याकरितां निघालेले दृष्टीस पडत होते, त्या योगानें तें व्रजनगर फार मनोहर दिसत होतें.

अशा त्या गोपांनीं गजबजलेल्या गोव्रज नगरामध्यें प्रवेश करतांना नंदाला अत्यानंद झाला. वृद्ध वृद्ध गोप व गोपस्त्रिया त्याला सामोऱ्या आल्या होत्या. त्या सुखदायक स्थलीं रहाणें नंदास मनापासून फार आवडलें. ज्या ठिकाणीं वसुदेवाला सुखविणारी रोहिणी राहिलेली होती तेथेंच नंदानें बालसूर्याप्रमाणें चमकणाऱ्या श्रीकृष्णास गुप्तपणें ठेऊन दिलें.

## अध्याय सहावा.

—:०:—

### श्रीकृष्णाची बाललीला व पूतनेचा वध.

वैशंपायन सांगतातः——याप्रमाणें त्या व्रजनगरीमध्यें गुप्तपणें गवळ्याचा धंदा करून नंद राहिला असतां बराच काळ लोटला. तेथें त्याचे घरांत नामकरण विधी होऊन तीं उभयतां बालकें सुखानें नांदत होतीं. ज्येष्ठ पुत्राचें नांव संकर्षण असें ठेविलें होतें. आणि धाकट्याला श्रीकृष्ण असें ह्मणत. श्रीविष्णूनेंच मेघासारखा श्यामवर्ण धारण करून कृष्णरूपानें हा दुसरा अवतार घेतला होता. सागराच्या जलानें जसा मेघ वृद्धिंगत होतो, त्याप्रमाणें गोरस भक्षण करून गोकुलामध्यें कृष्णपरमात्मा वाढत होता.

एके दिवशीं कृष्ण शकटाखालीं निजला असतां त्याला तसाच टाकून प्रातःस्नानासाठीं उत्कंठित झालेली यशोदा यमुना नदीवर गेली. इकडे बाललीला करण्याच्या मिषानें हातपाय आपटून कृष्णानें मधुर स्वरानें रडण्यास आरंभ केला. पुढें पाय वर करून एका पायानें त्यानें तो शकट उलटविला. नंतर स्तनपानासाठीं टाहो फोडून तो तेथेंच पालथा पडून रडूं लागला. इतक्यांत स्नान आटोपून यशोदा परत आली. तिला पुत्राचें आरडणें ऐकून फार भय वाटलें. एखाद्या पान्हवलेल्या व दुभत्या गाईचें वासरूं आटोपून बांधलें असतां तिची जशी स्थिति होते त्याप्रमाणें यशोदेचें सर्व अंग दुग्धाच्या धारांनीं माखून गेलें. सोसाट्याचा वारा सुटला नसतांना शकट उलथून पडला आहे हें अवलोकन करतांच मोठा हाहाःकार करून तिनें आधीं लगबगीनें पुत्राला उचलून घेतलें. गाडा उलटण्याचें खरें कारण तिच्या लक्षांत आलें नाहीं. तथापि, आपल्या लाडक्याला त्यापासून कांहीं इजा झाली नाहीं हें पाहून तिला फार आनंद झाला, व लागलीच भीतिही वाटली. तेव्हां पुत्राला संबोधून यशोदा म्हणाली, "बाळा तान्हुल्या, तूं गाड्याखालीं निजला असतांना अकस्मात् तो गाडा उलटला ही वार्ता कानीं पडतांच तुझा अति रागीट पिता मला काय बरें म्हणेल? नदीवर जाऊन आतांच स्नान करायचें माझें काय अडलें होतें! या स्नानाला जाण्यापायीं हा गाडा उलटून, हे वत्सा, त्याच्या खालीं संकटावह स्थितींत तुला उपडा पडलेला पाहण्याचें माझ्या नशिबीं आलें त्या अर्थीं खरोखर हें माझें स्नान अपशकुनी होय." (यशोदा याप्रमाणें बोलत आहे) तोंच काषायवस्त्रें[1] परिधान केलेला नंद गाईसहवर्तमान रानांतून घरीं परत आला. तेव्हां गाड्याचा आंस, जूं, मोडून त्यांतील भांडीं, गाडगीं, लोटकीं फुटून गेलीं असून, तो उलटल्यामुळें त्याचीं चाकें वर झालीं आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. हा प्रकार पाहण्याबरोबर तो एकदम भयभीत झाला व त्याचे नेत्र पाण्यानें भरून आले. आणि त्वरेनें यशोदेसन्निध येऊन, "कां गे, माझ्या बच्चाला कांहीं इजा झाली नाहींना?" हा प्रश्न तो तिला पुनः पुनः विचारूं लागला. इतक्यांत आपला पुत्र स्तनपान करीत आहे इकडे त्याचें लक्ष गेलें व तो स्वस्थचित्त झाला. मग त्यानें पुनः विचारलें कीं, "बैलांची झोंबी वगैरे कांहीं एक कारण घडलें नसतां हा माझा गाडा कोणीं उलटला?" नंदाचा प्रश्न ऐकून भयभीत झालेल्या यशोदेनें सद्गदित होऊन अडखळत

१ या स्थळीं 'पुत्रगृद्धिनी' हा पाठ सोडून 'कर्मगृद्धिनी' असा पाठ आढळला तो मुद्दाम घेतला आहे.

१ ही काषायवस्त्रें कांहीं संन्यासाची खूण अर्थात् नव्हत. आपले कडील नाकाडोळ्याचे वैदू देखील अशींच वस्त्रें वापरतात.

उत्तर दिलें. "गाडा कोणीं उलटला हें मला माहीत नाहीं. महाराज, वस्त्रें धुण्याच्या हेतूनें मी नदीवर गेलें होतें, आणि परत येऊन पहातें तों हा गाडा जमिनीवर उलटलेला माझ्या नजरेस पडला."

याप्रमाणें त्या दोघांचीं परस्पर प्रश्नोत्तरें चाललीं आहेत इतक्यांत तेथें उभीं असलेलीं बालकें म्हणूं लागलीं कीं, आम्ही सगळे जमून इकडे येत होतों, तों या तुमच्या मुलानें पायाचा धक्का देऊन हा गाडा उलटल्याचें सहज आमच्या दृष्टीस पडलें. बालकांचें भाषण ऐकून नंदाला अत्यंत आश्चर्य वाटलें व आनंदही झाला. त्याबरोबरच हा काय चमत्कार असावा म्हणून तो मनाशीं विचार करीत असतां त्याला थोडें भयही वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

परंतु वरील गोष्टीवर, इतर गोपांचा विश्वास बसेना. त्यांच्या बुद्धीची धाव मानवी बुद्धीच्या विवक्षित मर्यादेपलीकडे जाणें शक्य नव्हतें. तथापि हा आश्चर्यकारक प्रकार पाहून त्यांचे नेत्र विस्मयानें विस्तृत झाले. त्या सर्वांनीं मिळून गाडा पुनः होता तसाच केल्यावर त्याचीं चाकें बांधून काढलीं.

वैशंपायन सांगतातः—या गोष्टीलाही आणखी कांहीं काल लोटल्यावर, भोज कंसाची धात्री म्हणून लोकांना माहीत असलेली पूतना नांवाची घोर व दुसऱ्यांचे प्राण हरण करणारी राक्षसी, पक्षिणीचें रूप धारण करून मध्यरात्रीचे सुमारास रागानें आपले पंख फडफडवीत गोकुलामध्यें प्राप्त झाली. तेव्हां व्याघ्राप्रमाणें वारंवार गंभीर गर्जना करीत असतांना तेवढ्या रात्रीं लोकांनीं तिला पाहिली. तिच्या स्तनांतून दुग्धस्राव होत होता व त्यामुळें तिला फार वेदना होत होती. अशा स्थितींत उपरोक्त शकटाच्या कण्यावर ती पडून राहिली आणि लोकांची निजानीज झाल्यावर तिनें आपला स्तन कृष्णाचे मुखांत दिला. श्रीकृष्णानें मोठी गर्जना करून, तिचे स्तन व त्याबरोबर प्राणही शोषून घेतले. तात्काळ त्या पक्षिणीचे स्तन तुटून पडले व ती धाडकन् जमिनीवर आदळली. तेव्हां मोठा आवाज झाला. तेणेंकरून भयभीत होऊन सर्व लोक जागृत झाले. तों गतप्राण होऊन भूमीवर पडलेली स्तनरहित पूतना, नंदादिक गोप व विशेषेंकरून व्याकुल झालेली यशोदा या सर्वांच्या दृष्टीस पडली. वज्रासारख्या शस्त्राच्या आघातानें पूतनेची अशी स्थिति झाली असावी असें त्यांना वाटलें. हा विचित्र प्रकार अवलोकनांत आल्यामुळें सर्व लोक गोंधळून गेले. आणि हें कोणाचें कृत्य असावें बरें असा विचार करीत, नंदाला पुढें करून त्याचे पाठीमागें व पूतनेच्या सभोंवतीं ते सर्व गोप उभे राहिले. वरील प्रकाराचें सत्य स्वरूप व त्यांतील हेतु कोणाच्याच लक्षांत येईना. तेव्हां "हें मोठें आश्चर्य आहे बोवा," असें म्हणत ते घरोघर निघून गेले. आश्चर्यभरित झालेले गोप आपआपल्या घरीं गेल्यानंतर, नंद किंचित् भयरहित होऊन यशोदेस म्हणाला, "हा काय प्रकार असावा याची मला कल्पनाही होत नाहीं. मी अगदीं आश्चर्यमूढ झालों आहें. माझ्या पुत्रावर हें मोठें अरिष्ट कोसळलें आहे असें मला वाटतें." भयभीत झालेल्या यशोदेनें उत्तर केलें, "महाराज मलाही पण यांतील कांहीं ठाऊक नाहीं. मी पुत्राला सन्निध घेऊन निजलें होतें आणि आवाज ऐकतांच दचकून उठलें एवढें मला माहीत आहे."

यशोदेलाही कांहीं ठाऊक नाहीं असें पाहून विस्मित झालेले नंद व त्याचे बांधव हे हें कंसाचें घोर कर्म असावें असा तर्क करून त्याला थरक भिऊं लागले.

## अध्याय सातवा.

—:०:—

### यमलार्जुनभंग.

वैशंपायन सांगतातः—दिवसेंदिवस संकर्षण व कृष्ण हीं नांवें धारण करणारे ते दोघेही सुंदर पुत्र मोठे होत चालले व रांगूं लागले. ते परस्परांचे अंश होते यामुळें बालपणापासूनच ते एकमेक मिळून वागूं लागले. वस्तुतः ते एक मूर्तीचे भिन्न अंश होते. त्यांची कांति बालचंद्र व सूर्य यांच्याप्रमाणें तेजःपुंज होती. ते अभिन्न असून जन्मातीत होते. त्यांची निद्रा, बसणेंउठणें व भोजनविधि हीं एकत्र व एकच प्रकारचीं होतीं. ते सारखाच पोषाख घालीत व एकच स्वरूपाचें व्रताचरण पाळीत. एकच कार्य घडवून आणण्यासाठीं त्यांचा अवतार होता. एकाच देहाचे ते दोन भाग होते. त्यांची वागणूक एकसारखी असून ते फार पराक्रमी होते. त्यांनीं एकाच मातापितरांच्या पोटीं जन्म घेतला होता. त्यांचे अवयवांतील प्रमाण देखील सारखें होतें. पापी लोकांचें निर्दलन करून यज्ञयागादिकांचा अबाधित प्रचार करणें हा जो देवांचा सिद्धांत तो पुरा करण्यासाठीं ते मनुष्यरूपानें या जगांत अवतीर्ण होऊन आले होते. अखिल जगताचे हे गोप (पालक) गोपकुलांमध्यें जन्मास आले होते. उभयतांच्या क्रीडा देखील एकमेकांत मिळूनमिसळून असल्यामुळें ते फार शोभिवंत दिसत.

आकाशामध्यें पौर्णिमेच्या दिवशीं सूर्य व चंद्र यांचे अस्तोदय एकमेकांत[1] मिसळून घडतात. त्याप्रमाणें ते एकमेकांच्या तेजांत गुरफाटले असत. त्यांच्या भुजा सर्पांच्या देहाप्रमाणें (लांब) होत्या. त्यांचीं शरीरें जेव्हां धुळीनें मलिन होत त्या वेळीं मत्त झालेल्या हत्तीच्या छाव्यांप्रमाणें ते शोभायमान दिसत. त्यांच्या देहावर कधीं भस्माचे पट्टे असत, तर कधीं गोमयानें त्यांचीं शरीरें माखून जात. गोकुलामध्यें ते जेव्हां संचार करतांना दृष्टीस पडत तेव्हां अग्नीचे पुत्र कार्तिकस्वामी यांची आठवण झाल्यावांचून रहात नसे. केव्हां केव्हां ते गुडघ्यांवर सरपटत त्या वेळीं मोठी मौज दिसे. वासरें बांधावयाच्या गोठ्यांत त्यांची क्रीडा सुरू झाली ह्मणजे तेथील शेण अंगावर उडून त्यांचे मस्तकावरील केंसही माखून जात. तेव्हां ते सौंदर्यलक्ष्मीनें युक्त असल्याकारणानें फार मनोहर[1] दिसत. त्यांच्या लीला पाहून पित्याला फार आनंद होई. नवनीत वगैरे पदार्थांची चोरी करून ते लोकांना त्रास देत. केव्हां त्यांचे चेहेऱ्यावर मधुर हास्याची, तर कधीं जिज्ञासेची छटा दृग्गोचर होई. त्यांचे मस्तकावरील केंस डोळ्यांवर आले ह्मणजे ते अत्यंत घाबरून[2] जात. त्यांचीं वदनें चंद्रासारखीं मनोहर असल्यामुळें, ते सुकुमार पुत्र अत्यंत रमणीय दिसत. खोडकरपणा करण्याची त्यांना फार हौस होती. सर्व गोकुळभर त्यांचा धिंगाणा चालत असे. नंदाला त्यांना आवर घालतां आला नाहीं. किंबहुना खोडकरपणापासून त्यांचें निवारण करणें अशक्यच होतें.

---

१पौर्णिमेचे रात्रीला पूर्व चतुर्दशीचे सूर्याचा अस्त होऊन त्याचे किरण जों सायंसंध्येंत आहेत अशांत चंद्राचा उदय होऊन त्याचे किरण त्यांत मिश्र होतात; व निशावसानीं पुनः त्या पौर्णिमा—चंद्राचे अस्तगामी किरण पूर्वेकडे गोंधळत आहेत तोंच प्रतिपदेच्या उदयोन्मुख सूर्याचे किरण त्यांत मिसळतात. एतावता त्या दिवशीं चंद्रसूर्याचे किरण एकमेकांत गुरफाटतात. हा भाव. व्यासांचें हें सृष्ट्यवलोकन व उपमाचातुर्य कौतुक करण्याजोगें आहे.

१ ‘जातीच्या सुंदरांना कांहींही शोभतें,’ च खरें.

२ डोळ्यांवर झिप्या लोंबल्या ह्मणजे पोरें रडूं लागतात.

एकदां असें झालें कीं, यांच्या खोडकरपणामुळें यशोदेला फार राग आला. तेव्हां तिनें कमललोचन श्रीकृष्णाला शकडीपाशीं[1] खेंचून आणून वारंवार त्याची निर्भर्त्सना केली, व पोटाला दावें लावून त्याला उखळीशीं बांधून टाकलें. मग ती त्याला म्हणाली, "तुझी शक्ति असली तर येथून निसटून जा पाहूं."

इतकें बोलून ती आपल्या कामाला लागली. यशोदा आपल्या गृहकृत्यांत चूर झाली आहे असें पाहून कृष्ण अंगणांतून( उखळी सकट )निघाला. त्याची लीला चालूच होती. हा प्रकार पाहून व्रजवासी जनांना फार विस्मय वाटला. कृष्ण जो उखळी ओढीत अंगणांतून निघाला तो थेट वनांत गेला. तेथें यमलार्जुन नांवांचे दोन जुनाट वृक्ष होते. त्यांच्या मधून तो उखळी ओढीत निघून जाऊं लागला. असें करतांना त्याला बांधलेली उखळी त्या जुळे वृक्षांत अडकली. तेव्हां उखळीबरोबर तो ते दोन्ही वृक्ष मुळासकट ओढूं लागला. त्या बालकानें मोठ्या जोरानें उखळी ओढतांक्षणीं ते अर्जुन वृक्ष मुळासकट तुटून पडले. इतकें झालें तरी हा आपला त्या दोन वृक्षांचे दरम्यान हंसतोच आहे.

आपले अंगची दिव्य शक्ति गोपांचे निदर्शनास आणून देण्याकरितां, श्रीकृष्ण वरील अद्भुत कर्म करून तेथेंच राहिला. त्याच्याच प्रभावामुळें त्याला बांधलेलें दावें मात्र भक्कम झालें. यमुनाकांठच्या रस्त्यानें कांहीं गोपस्त्रिया चालल्या होत्या, त्यांनीं जेव्हां ही (कृष्णाची) स्थिति पाहिली तेव्हां त्या आश्चर्यचकित होत्सात्या आरडत यशोदेपाशीं आल्या. त्या अगदीं गोंधळून गेल्या होत्या. त्या यशोदेला म्हणूं लागल्या. "यशोदे, अग लवकर चल, पाऊल उचल. ऊठ. गोंधळल्यासारखें करून वेळ काय लावतेस ? अग ते कल्पतरु अर्जुनवृक्ष आहेतना ते दोन्ही तुझ्या मुलाचे अंगावर पडले आहेत आणि वांसराप्रमाणें तूं दाव्यानें उखळीला बांधलेला तुझा मुलगा त्या दोन्ही वृक्षांच्या मध्यें हंसत बसला आहे. अग वेडे, ऊठ, खुळे तुला आपल्या शहाणपणाची मोठी घमेंड आहे नाहीं का, चल आणि काळाच्या जाबडच्यांतून सुटून जिवंत राहिलेल्या आपल्या मुलाला घेऊन ये कशी." गोपींचें हें भाषण ऐकून भयभीत झालेली यशोदा, लगबगीनें उठली व हाहाकार करून ओरडत ज्या ठिकाणीं ते प्रचंड वृक्ष मोडून पडले होते तेथें येऊन पहाते तों, आपला दाव्यानें उखळीला बांधलेला पुत्र उपरोक्त अर्जुनवृक्षांच्या मध्यें उखळीला ओढीत आहे असें तिच्या दृष्टीस पडलें. ( इतक्यांत ती बातमी गांवभर पसरून ) सर्व गोपस्त्रिया, व लहानथोर पुरुष तो आश्चर्यकारक प्रकार पहावयासाठीं त्या जागीं गोळा झाले. नेहमीं रानावनांत भटकणारे गोप आपआपसांत वरील प्रकाराबद्दल वाटतील ते तर्कवितर्क करूं लागले. "सर्व गौळवाड्याला देवासारखे पूज्य असलेले हे वृक्ष कोणी बरें मोडले ? वादळ झालें नाहीं, पाऊस पडला नाहीं, वीज कडाडली नाहीं किंवा हत्ती माजलेला नाहीं. मग हे वृक्ष मोडले कसे ? खरोखर हे मुळावेगळे झालेले वृक्ष विशोभित दिसतात. जमीनदोस्त झालेले हे द्रुम जलरहित मेघांप्रमाणें निस्तेज झाले आहेत. आपल्या गौळवाड्यांतच हे वृक्ष वाढलेले असून यांचेपासून आपल्या गांवाचे नेहमीं कल्याण झालें आहे. हे नंदा, जरी या वृक्षांची अशी वाताहत झाली आहे, तरी यांची तुझ्यावर कृपा असल्याचें दिसत आहे. कारण, ते प्रचंड वृक्ष जमीनीवर मोडून पडले आहेत

[1] लहान गाडीस छकडा, छकडी, शकडी ( शकटी ) असें ह्मणतात.

तरी त्यांनीं तुझ्या बालकाला कांहीं एक इजा केलेली नाहीं. या आपल्या गांवीं हा तिसरा उत्पात आहे. गाडा उलटणें, पूतनेचा मृत्यु हे दोन व या प्रचंड वृक्षांचा नाश, हा तिसरा. आतां आपला गौळवाडा ह्या ठिकाणीं ठेवणें योग्य नाहीं. कारण, अशुभसूचक उत्पात येथें घडत आहेत. "

गोकुलवासी लोकांचीं याप्रमाणें भाषणें चाललीं असतां नंदानें कृष्णाची उखळीपासून सुटका करून पुनर्जन्म झालेल्या आपल्या पुत्राला पुष्कळ वेळ मांडीवर घेतलें. कमलनयन श्रीकृष्णाच्या मुखाकडे तो एकसारखा पहात होता, तरी त्याची तृप्ति झाली नाहीं. त्यानें यशोदेला पुष्कळ दोष दिला. नंतर सर्व गोप व नंद आपआपल्या घरीं गेले. गोठ्यामध्यें कृष्णाला दाव्यानें बांधून ठेवलें होतें या गोष्टीवरून दामोदर या नांवानें गोपी त्याला संबोधूं लागल्या. हे भरतश्रेष्ठा, गोकुलांत असतांना कृष्णानें लहानपणीं आश्चर्यकारक लीला करून दाखविली.

## अध्याय आठवा.

—:०:—

### वृकदर्शन.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें उभयतां कृष्णसंकर्षणांची बाल्यदशा परिपूर्ण होऊन गोकुळांतच ते सात वर्षांचे झाले. ते अनुक्रमें पीत व नील वस्त्रें परिधान करीत; आणि पीत व श्वेत वर्णाच्या उट्या लावीत. त्या उभयतांना झुलपें ठेवलेलीं होतीं. ते वासरें राखावयास रानांत जाऊं लागले. त्यांचे तोंडवळे अत्यंत सुंदर होते. वनामध्यें जाऊन कानाला फार मधुर लागणारी वेणू ते वाजवूं लागले म्हणजे तीन फण्यांच्या नागासारखे ते अति मनोहर दिसत. केव्हां केव्हां ते मोराचीं पिसें कानावर धारण करीत, पल्लवांचा गुच्छ मस्तकावर ठेवीत व वनमालांनीं आपलें वक्षःस्थल अलंकृत करीत तेव्हां ते नूतनोत्पन्न बालवृक्षाप्रमाणें दिसत. कधीं कधीं ते कमलें मस्तकावर धारण करून, रज्जूचीं यज्ञोपवीतें घालीत आणि कमंडलूसारखे शिंक्यासकट तुंबे हातांत घेत व वेणूवादन करीत. क्वचित् ते परस्परांशीं खेळून आपल्याशींच हंसत. कधीं पर्णशय्येवर पडून निद्रासुखाचा अनुभव घेत. या प्रकारें गुराख्याचें काम करून ते त्या महावनाला शोभा देत. खरोखर पहातां चंचल शिंगराप्रमाणें सगळ्या रानभर हुतुतू घालून ते आपली क्रीडा करीत. (असें होतां होतां) एके दिवशीं सौंदर्यलक्ष्मीनें युक्त असलेल्या दामोदरानें संकर्षणाला उद्देशून भाषण केलें, " दादा, आतां यापुढें या वनांत गोपालांसह क्रीडा करणें शक्य नाहीं; इतके दिवस आपण येथें क्रीडा केल्यामुळें या अरण्याची शोभा आतां नाहींशी झाली आहे. गोपांनीं या वनांतील सर्व वृक्ष तोडून नेल्यामुळें एकही लांकूड अथवा गवताची काडी या ठिकाणीं राहिलेली नाहीं. जें रान (थोडे दिवसांपूर्वीं) अत्यंत गर्द दिसत असे तें आतां अगदीं उजाड झालें असून या टोंकापासून त्या टोंकापर्यंत आकाशासारखें शून्याकार झालें आहे. गोठ्यामध्यें जे वृक्ष होते त्यांना सभोंवार भिंतींचें व अडसरांच्या दरवाजांचें कुंपण होतें, परंतु अक्षय टिकण्यासारखे तेही वृक्ष गोठ्यांत आग लागून नष्ट झाले आहेत. पूर्वीं येथें लांकूडफांटें व गवतकाडी अगदीं सन्निध मिळत असे, पण सांप्रत दूरवर जाऊन शोधून आणण्याचा प्रसंग आला. या वनांत हल्लीं पाणी फार थोडें आहे, गवत देखील तोट्याचें झालें आहे; कोठेंही आश्रय राहिलेला नाहीं; एखादें विश्रांतिस्थान पाहिजे असल्यास महत्प्रयासानें

तें शोधावें लागतें. या रानांत वृक्ष आतां तुरळक राहिले असल्यामुळें तें फार भयंकर दिसतें. यांतील वृक्ष द्विजकर्में करण्याचे सोईचे राहिले नाहींत या कारणानें ब्राह्मणांनीं हें स्थान सोडून दिलें आहे. या मोठ्या गांवचे सर्व वृक्ष, लोकांनीं तोडून नाहींसे केले आहेत. या ठिकाणीं कसल्याही प्रकारचा आनंद उरलेला नाहीं. येथील सगळी मौज नाहींशी झाली आहे. येथील वायूपासून पूर्वींप्रमाणें आल्हाद वाटत नाहीं. पक्ष्यांनीं देखील ही जागा टाकून दिली आहे. तोंडीं लावण्यावांचून अन्न जसें बेचव लागतें, त्याप्रमाणें पक्ष्यांवांचून हें रान ओस झालें आहे. रानांत उत्पन्न होणारे भाजीपाले व लांकडें यांचा लोक आतां विक्रय करूं लागले आहेत; तसेंच ते गवताचा देखील संचय करतात, त्यामुळें या गौळवाड्याला नगराची स्थिति प्राप्त झाली आहे. गौळवाडे हे पर्वताचीं भूषणें होत. प्रत्येक गौळवाड्याला लागून वन असणें त्या वाड्याला शोभादायक आहे. बरें, गाई असतील तर त्या वनाला तरी शोभा आणि गाई म्हणजे आपलीं श्रेष्ठ दैवतें होत.

वरील कारणांकरितां ज्या रानांत नवें गवत व जळण सांपडेल अशा रानांत आपण आपलें वसतिस्थान नेलें पाहिजे. पूर्वीं ज्या गवताला दुसऱ्या कोणाचें तोंड लागलें नाहीं असें गवत खाण्याची आपल्या गाई इच्छा करीत आहेत. त्यासाठीं धनिक गोपाळांनीं आतां हें स्थान सोडून जेथें चांगलें व विपुल गवत मिळेल अशा एखाद्या नव्या ठिकाणची वाट धरावी. ज्यांना घरादाराची व शेताभाताची आडकाठी असेल म्हणजे जे लोक घरेंदारें व शेतवाडी करून स्थायिक झाले असतील त्यांनीं मात्र स्थानत्याग करूं नये. हंसादि पक्ष्यांप्रमाणें ज्यांचें बिऱ्हाडबाजलें पाठीवर असेल, त्या गवळ्यांनींच हा अन्य स्थानीं जाण्याचा पक्ष स्वीकारावा. गवतावर गोमय किंवा गोमूत्र पडलें म्हणजे त्यावर एक प्रकारचा अपकारी क्षार उत्पन्न होतो. तशा प्रकारचें गवत गाई भक्षण करीत नाहींत व तें दुधालाही चांगलें नाहीं. मैदानासारख्या सपाट अशा वनामध्यें आपण आपल्या गाईंसहवर्तमान संचार करूं. हा सगळा गौळवाडा येथून लवकर तिकडेच घेऊन चला. वृंदावन नांवाचें फारच रम्य वन आहे असें माझ्या ऐकण्यांत आहे. तेथें विपुल गवत असून मधुर वृक्षफलें व उदक यांची समृद्धि आहे. त्यांत जीवजंतु किंवा कांटेकुटे कांहींएक नाहींत. उत्तम वनाला अवश्य असणारे सर्व गुण त्या वनाचे ठिकाणीं आहेत. त्यामध्यें बहुतेक कदंबाचींच झाडें असून तें यमुनेच्या कांठींच वसलेलें आहे. तें वन अत्यंत मनोवेधक असून तेथें शीतल वायु सुटलेला असतो. तें सर्व ऋतूंचें मंगलकारक माहेरघरच आहे. गोपींना वास्तव्य करण्याला तें अत्यंत सोईचें आहे, किंबहुना तें दुसरें चित्रवनच आहे असें म्हटलें तरी चालेल. त्या वनापासून जवळच गोवर्धन नामक मोठा पर्वत आहे. त्याचीं शिखरें उंच असून नंदनवनांतील मंदर पर्वताप्रमाणें त्यानें वृंदावनाला शोभा आणली आहे. त्या पर्वताच्या मध्यभागीं भांडीर नामक वटवृक्ष आहे, तो आकाशांतील नील मेघासारखा तेथें अत्यंत रमणीय दिसत आहे. न्यग्रोध[1] वृक्षाच्या फांद्या मोठ्या असून तो एकंदर एक योजन उंच आहे. नंदनवनांतून ज्याप्रमाणें नलिनी नदी गेलेली आहे, त्याप्रमाणें वृंदावनामधून मधोमध कालिंदी नदीचा प्रवाह चाललेला आहे. त्यामुळें, ती नदी वृंदावनाला स्त्रीचे मस्तकावरील भांगा-

१ वटवृक्षाला न्यग्रोध ( न्यक्+रोध ) म्हणण्याचें कारण त्याची पारंब्याच्या रूपानें खालीं वाढ असते.

प्रमाणें शोभा देत आहे कीं काय, असा भास होतो. त्या वनामध्यें आपण आनंदानें राहूं लागलों म्हणजे गोवर्धन पर्वत, भांडीर वृक्ष व रमणीय कालिंदी नदी या तिहींचें (पुण्य-कारक) दर्शन आपल्याला नेहमीं घडेल, म्हणून हा वाडा तेथें नेला पाहिजे व ह्या गुणहीन वनाचा त्याग केला पाहिजे. तुझें कल्याण असो. आतां कांहीं तरी निमित्त उत्पन्न करून लोकांना आपण त्रासवून सोडूं."

याप्रमाणें त्रिकालज्ञ वासुदेव संकर्षणाला म्हणतो आहे तोंच त्या (जगताची) चिंता वाहणाऱ्या श्रीकृष्णाचे शरीराच्या केसांतून रक्त, मांस व वसा भक्षण करणारे भयंकर आणि घोर असे शेंकडों लांडगे चोहोंबाजूंनीं बाहेर पडले, व व्रजाचा विध्वंस करण्या-करितां ते सैरावैरा धांवूं लागले. गाई, वासरें, गोप व गोपी या सर्वांचे अंगावर जेव्हां निः-शंकपणें लांडगे धांवून येतांना दृष्टीस पडूं लागले, तेव्हां गोकुलामध्यें मोठा हाहाकार उडाला. श्रीवत्सलक्षणानें युक्त असलेले ते लांडगे श्रीकृष्णाच्या अवयवांपासून, पांच पांच, दहा दहा, वीस वीस, तीस तीस, किंबहुना शंभर शंभर असे एकदम एकसंख्येनें प्रकट होऊं लागले. कृष्णाच्या शरीरापासून उत्पन्न झालेले ते लांडगे काळ्या तोंडाचे होते; त्यांच्या-पासून गोपालांना फार भय प्राप्त झालें. ते वासरें खाऊन टाकूं लागले, गोठ्यांना उपद्रव देऊं लागले आणि रात्रीं लहान मुलें देखील ओढून नेऊं लागले; त्यामुळें गोकुळ—नगर अगदीं जेरीस आलें. कोणाला रानांत जाण्याची, गाई राखण्याची, रानांतून कांहीं आणण्याची किंवा नदींतून पोहून जाण्याची कशाचीही सोय राहिली नाहीं. गोकुलवासी लोक फार त्रासून गेले; त्यांचीं मनें अत्यंत उद्विग्न झालीं; कोणाला शरण जावें हें त्यांस कळेना, तथापि अशा स्थितींतही ते तेथेंच राहिले होते, कारण दुसरी कांहीं तोड नव्हती. याप्रमाणें वाघासारख्या त्या पराक्रमी लांडग्यांच्या त्रासानें सर्व व्रजां-तील व्यापार बंद पडून जो तो आपआपलें ठिकाण धरून राहिला.

## अध्याय नववा.

—:०:—

### वृंदावन—प्रवेश.

वैशंपायन सांगतातः—त्या अनिवार (झालेल्या) वृकांची संख्या वाढतच आहे असें पाहून गोकुलांतील सर्व स्त्रीपुरुषांनीं एके-ठिकाणीं जमून त्या संकटनाशनाचा विचार सुरू केला. ते म्हणाले, "आपणांस या ठिकाणींच राहिलें पाहिजे असें नाहीं. करितां आपण दुसऱ्या एकाद्या मोठ्या वनामध्यें रहा-वयास जाऊं. आपल्याला व गाईंना रहाण्यास अत्यंत सुखावह व कल्याणकारक असें स्थान आतां पाहिलें पाहिजे. मग या गोष्टीला उशीर तरी कशाला? आपल्या सर्व गांवाचा लांड-ग्यांनीं फडशा उडवला नाहीं तों आजच आपलीं गोधनें घेऊन आपण मार्गाला लागूं कसे. या विक्राळ दाढांच्या व धूम्र आणि अरुण वर्णांच्या नखयुक्त काळतोंड्या लांड-ग्यांची रात्रीं हुल्लड सुरू झाली म्हणजे आम्हांला फार भीति वाटते. कोणी म्हणतो माझा पुत्र लांडग्यांनीं मारला तर कोणी म्हणतो माझ्या भावाची तीच गति झाली. कोणी म्हणतो माझें वासरूं लांडग्यांनीं नेलें तर कोणी म्हणतो माझी गाय वृकांनीं भक्षण केली. याप्रमाणें घरोघर कांहींना कांहीं हाहाःकार चाललेला आपण ऐकत आहोंत. लोकांची रडारड चालली आहे व गाई हंबारत आहेत या गोष्टी लक्षांत घेऊन, एकत्र जमलेल्या वृद्ध गृहस्थांनीं स्थानत्याग करण्याचा उपाय सुचविला. व्रजवासी लोकांचें

प्राणरक्षण व्हावें व गाई वांचाव्यात म्हणून वृंदावनांत रहाण्याकरितां जावयाचें असें त्यांचें मत असून त्यांनीं त्याप्रमाणें वृंदावनीं जाण्याचा ठाम निश्चय केला आहे असें पाहून नंदानें बृहस्पतीप्रमाणें गंभीर भाषण केलें. "जर आपण आजच जावयाचा निश्चय केला असेल तर उशीर न करतां निघण्याची तयारी करून सज्ज होण्याबद्दल त्वरित सर्व लोकांना आज्ञा द्या." हें ऐकून लोकांनीं, "ताबडतोब गाई व वांसरें जुळवा, गाड्या जोडा व हांडीभांडीं त्यांत घालून, हे जनहो, येथून वृंदावनांत राहण्यास जाण्यासाठीं निघण्याची तयारी करा" अशी दवंडी पिटली.

नंदाचें वरील हितकर भाषण ऐकतांच, सर्व व्रजवासी लोक गमनोत्सुक होऊन तांतडीनें उठले. त्याबरोबरच तेथें "चला उठा, जाऊं या, निजतां काय? गाड्या जुंपा, आटपा, इत्यादि शब्दांचा एकच कल्होळ उठला. गाडे वगैरे घेऊन तो सर्व गौळवाडा जेव्हां व्रज सोडून निघाला त्या वेळीं अवर्णनीय शोभा दिसत होती. वाघाच्या व सागराच्या गर्जनेप्रमाणें मोठा कल्होळ त्या ठिकाणीं उत्पन्न झाला होता. आकाशांतून तारका उदयास येतांना जशी शोभा दिसते त्याप्रमाणें, डोकीवर रव्या व ताकाचीं मडकीं घेउन गोपी जेव्हां गोकुलांतून बाहेर पडल्या तेव्हां मोठी मौज दिसली. स्तनाग्रांवर उचलून दिसणारीं नील पीत आणि रक्त वर्णाचीं वस्त्रें परिधान केलेल्या गोपींची रांग रस्त्यानें चालली होती तेव्हां इंद्रधनुष्याची शोभा दृष्टीस पडत होती. दावणी व दावीं यांचे भार मस्तकावर धारण करून गोप निघाले तेव्हां हे मोठे जटाधारी वृक्ष चालले आहेत कीं काय असा भास होत होता. समुद्रामध्यें वायूच्या जोरानें नौका चालत असतात तेव्हां जसा देखावा दृष्टीस पडतो, त्याप्रमाणें गोकुलांतील चमकदार गाडे वृंदावनाच्या दिशेनें निघाले तेव्हां मौजेचा देखावा दृग्गोचर होत होता. याप्रमाणें एका क्षणांत तें व्रजनगर उध्वस्त अरण्यासारखें दिसूं लागलें. द्रव्याचा अल्पांश देखील तेथें राहिला नाहीं. त्या नगरांत वायस मात्र शिल्लक राहिले.

जातां जातां ते व्रजवासी जन वृंदावनीं येऊन पोंचले. मनुष्यांना तशीच गाईंना रहाण्यासाठीं त्यांनीं विपुल जागा पाहून सर्व सोयी केल्या. त्यांच्या वसतिस्थानाभोंवतीं अर्धचंद्राकार शकट त्यांनीं उभे केले. त्याचा परिघ दोन योजनें असून, व्यास एक योजन होता. जुनाट बाभळी व इतर कांटेरी झाडें आणि भूमींत खोलवर गेलेलीं पाळेंमुळें व उंच वाढलेलीं फांदाडें यांचें जाळें सभोंवर पसरलें असल्यामुळें त्या नूतन घोषाचें आयतेंच उत्तम रितीनें संरक्षण झालें होतें. कोणी ताक करण्यासाठीं खांब रोवूं लागले. कोणी माथ्यांना दोऱ्या लावून ते फिरवून पाहूं लागले. कोणी आपल्या माथण्या पाण्यानें धुवून काढूं लागले. कित्येक गुरांना बांधण्यासाठीं मेखा पुरूं लागले. कित्येक त्या मेखांना दावणीनें घट्ट बांधूं लागले. कोणी खांब धरून उभे राहिले. कित्येकजण गाड्यांच्या व्यवस्थेला लागले. कोणी ताक करण्यासाठीं पुरलेल्या खांबांनां दोऱ्या लावूं लागले. डेरे ठेवण्यासाठीं व झांकण्यासाठीं केलेलीं गवताचीं निवणीं व झांकणें जिकडे तिकडे पसरलेलीं दिसत होतीं. कोणी झाडांवर पक्ष्यांसाठीं घरटीं तयार करण्यास सुरवात केली. कित्येक गाईंना बांधण्यासाठीं सोईस्कर जागा शोधण्याच्या मार्गाला लागले. कित्येकांनीं उखळें पुरण्याचा उद्योग आरंभिला. कोणी पूर्वाभिमुख होऊन सडासारवण घालूं लागले. कोणी विस्तव पेटविण्याच्या उद्योगाला लागले. कोणी वस्त्रें व चर्में पर्यंकावर घालण्याचें

काम हातीं घेतलें. गोपींपैकीं कांहींजणी पाणी ओढावयास लागल्या. कांहीं वनशोभा अवलोकीत बसल्या. कांहींजणी झाडांच्या फांद्या ओढूं ( मोडूं ) लागल्या. लहानथोर सर्व गोपाळ कोणत्यानाकोणत्या तरी कामांत अत्यंत चूर झालेले होते. कोणी कुऱ्हाडीनीं झाडें व लांकडें तोडीत होते. त्या नूतन घोषासभोंवतीं अरण्याचें वेष्टण असल्याकारणानें तो गौळवाडा फारच शोभिवंत दिसत होता. वृंदावनामध्यें वस्तीसाठीं त्यांनीं पसंत केलेलें हें स्थान रमणीय असून त्यांत मधुर फलें, कंदमूलें व उदक यांची समृद्धि होती. त्यांच्या गाई कामधेनूसारख्या होत्या. सर्व तऱ्हेच्या पक्षांच्या किलबिलाटानें तें वन नादित झालें होतें. फार काय सांगावें, या गोपनिवासानें त्या वृंदावनाला नंदनवनाची शोभा प्राप्त झाली. वनामध्यें हिंडत असतां श्रीकृष्णानें पूर्वींच गोधनांच्या कल्याणासाठीं वरील स्थल आपल्या मंगलकारक अंतर्दृष्टीनें पाहून ठेवलें होतें.

पुढें रूक्ष परंतु आरोग्यकारक ग्रीष्म ऋतूच्या शेवटच्या महिन्यांत देवानें तेथें अमृतासारखा पाऊस पाडला. त्यामुळें तेथें तृणादिकांना अंकुर फुटून तीं विशेषेंकरून वाढूं लागलीं. गाई, वासरें किंवा मनुष्यें यांपैकीं कोणालाही तेथें त्रास झाला नाहीं. कारण, त्या ठिकाणीं जगताच्या कल्याणासाठीं प्रत्यक्ष मधुसूदन राहिलेला होता. गाई, सर्व गोपाळ व गोपी आणि तरुण संकर्षण हे त्या श्रीकृष्णानें योजलेल्या स्थळीं कोणत्याही प्रकारचा त्रास न होतां सुखानें कालक्रमणा करूं लागले.

## अध्याय दहावा.

—:०:—

### प्रावृड्वर्णन.

वैशंपायन सांगतात:—वृंदावनांत रहावयास आल्यावर, ते दोघे वसुदेवाचे सुस्वरूप पुत्र वनामध्यें वासरांचे कळप चरावयास घेऊन जात असत. वनांत जाऊन गोपालांसह ते यमुनानदीमध्यें स्नानादिक क्रीडा करीत. याप्रकारें सुखानें त्यांचा ग्रीष्मकाळ त्या ठिकाणीं लोटला. नंतर लोकांच्या मनकामना उल्हसित करणारा पर्जन्यकाळ प्राप्त झाला, तेव्हां ज्यांवर इंद्रधनुष्य पडलें आहे असे मोठे मेघ अतिशय वृष्टि करूं लागले. सूर्याचें दर्शन होईनासें झालें. तृणांकुर उगवल्यामुळें भूमिहि आच्छादित झाली. नूतन उदकाचा वर्षाव करणाऱ्या मेघवायूनें भूमितलाचें संमार्जन केल्या कारणानें पृथ्वी युवतीप्रमाणें तजेलदार दिसूं लागली. मेघांनीं ऊष्मा पार नाहींसा केला. जलवृष्टीनें वसुंधरा संतुष्ट झाली. इंद्रगोपनामक किड्यांचे थवे नूतन पर्जन्यानें भिजून गेले. वनांतील वणव्याचा धूर नष्ट होऊन तीं फार शोभायमान दिसूं लागलीं. पिसाऱ्यानें युक्त असलेल्या मोरांचा हाच नृत्यकाल असल्यामुळें, मदानें शोभणाऱ्या व कर्णमधुर अशा केका जिकडे तिकडे ऐकूं येऊं लागल्या. पावसाळ्याला नुकताच आरंभ झाला असल्याकारणानें; भ्रमरांना खाद्य पुरविणारे सुंदर व तरुण कदंब वृक्ष, नूतन मेघपटलांमध्यें अत्यंत मनोहर दिसत होते. कुटज वृक्षांना फुलांचा बहर आला होता त्यामुळें तें वन हंसत आहे कीं काय असा भास होई.[1] जिकडे तिकडे कदंब वृक्षांच्या पुष्पांचा परिमळ सुटला होता, त्यायोगें तें वन सुगंधित झालें होतें. सूर्याच्या प्रखर किरणांनीं व वणव्यांनीं तापून गेलेल्या पर्वतांवर जेव्हां मेघवृष्टि झाली तेव्हां ते जणूं काय ( आनंदानें ) बाष्प[2]

१ हास्याचा वर्ण श्वेत आहे अशी कवी नेहमीं कल्पना करीत असतात. कुटजपुष्पें देखील पांढरींच असतात.

२ पाऊस पडतांच पर्वतांतून वाफा बाहेर पडतात त्यास अनुलक्षून वरील वर्णन आहे.

बाहेर टाकीत आहेत असें वाटलें. पावसाळचे झंझावात पताकांप्रमाणें फडकत होते; आणि मोठाले मेघ हे प्रासादांसारखे शोभत होते; त्यामुळें आकाश एखाद्या राजाच्या नगराप्रमाणें दिसत होतें. कोठें कोठें कदंबपुष्पें विकसित झालेलीं दृग्गोचर होत होतीं. क्वचित् स्थळीं छत्र्यांनीं तें वन अलंकृत झालें होतें. चोंहोकडे नीप वृक्ष फुलल्यामुळें अग्निच प्रदीप्त झाला आहे असा भास होई. इंद्राच्या जलवृष्टीनें आर्द्र झालेल्या व वायूनें दाही दिशा पसरलेल्या मातीच्या वासामुळें लोकांच्या मनांत कामवासना उत्पन्न झाली. मत्त भ्रमरांच्या गुणगुणण्यानें, बेडकांच्या डरांव डरांवानें आणि मोरांच्या नूतन टाहोनें पृथ्वी दुमदुमून गेली. पावसामुळें नद्यांमध्यें मोठाले भोंवरे उत्पन्न झाले. त्यांचा वेगही मोठा झाला. नद्यांचीं पात्रें विस्तृत होऊन, तीरावरील वृक्ष देखील त्या आपल्या प्रवाहाबरोबर घेऊन चालल्या. पावसाच्या संतत धारेमुळें पक्ष्यांचे पंख जड होऊन त्यांचा अगदीं निरुपाय झाला. पक्षी वृक्षाग्रांवर बसून राहिले होते ते एखाद्या दमलेल्या प्राण्याप्रमाणें आपलीं स्थानें सोडीनात.

वर्षाव करणाऱ्या, व गडगडणाऱ्या वारिपूर्ण नूतन मेघांच्या पोटांत सूर्यानें जणुं काय बुडी मारली आहे असें वाटलें. वृक्ष उन्मळून पडल्यामुळें व पृथ्वीवर जिकडे तिकडे पूर आल्यामुळें, मार्ग शोधून काढणें जरूर झालें. जिकडे तिकडे हिरवें गार गवत उगवल्यामुळें पृथ्वीला फार अवर्णनीय शोभा प्राप्त झाली होती. वृक्षांनीं युक्त असलेल्या पर्वतांचीं शिखरें पूरामुळें वज्रानें तोडल्याप्रमाणें खालीं पडूं लागलीं. उताराचे धोरणानें वाहत जाणाऱ्या पडत्या पावसाच्या पाण्यानें व डबकीं भरून उरलेल्या पाण्यानें वनांतील भूमि भरून गेली. वन्य हस्तींनीं सोंडेसह आपलीं तोंडें वर केलीं होतीं. अतिवृष्टिमुळें गोंधळून जाऊन, ढगांच्या गडगडाटाच्या अनुरोधानें ते पळूं लागले तेव्हां पृथ्वीवर हे मेघच संचार करीत आहेत कीं काय असा भास झाला.

पावसाळ्याची ही शोभा पाहून, जलपूर्ण मेघांकडे दृष्टि फेंकीत, रोहिणीपुत्र बलराम श्रीकृष्णाला एकीकडे म्हणाला, "कृष्णा, ते पहा, आकाशांतील काळेकुट्ट मेघ. बगळ्यांच्या योगानें ते शोभिवंत दिसत आहेत; जणूं काय तुझ्या शरीराचा वर्ण चोरून ते आकाशांत जाऊन बसले आहेत, असें मला वाटतें. हा तुझा निद्रा घेण्याचा काल आहे. आकाश तुझ्या शरीरासारखें दिसत आहे. तूं ज्याप्रमाणें प्रतिवर्षीं या वेळीं अज्ञातवासांत राहतोस,[1] त्याप्रमाणें चंद्रानें सांप्रतकाळीं अज्ञातवास स्वीकारला आहे असें वाटतें. पावसाळ्यामुळें आकाश मेघाच्छादित झाल्याकारणानें नीलमेघाप्रमाणें तें काळें दिसत आहे. त्याची प्रभा नील कमलाच्या पाकळीसारखी झाली आहे. हे कृष्णा, शिखरावरील जलपूर्ण असलेल्या या कृष्णवर्ण मेघांनीं गोधनांची वृद्धि करणारा हा गोवर्धन पर्वत किती रमणीय दिसत आहे पहा. सभोंवार पाऊस पडल्यामुळें, मदयुक्त व आनंदित झालेले कृष्णसारंग (काळवीट) वनामध्यें फार रमणीय दिसत आहेत. हे कमलनेत्रा, पावसानें उगवलेल्या या हरित व मृदु तृणानें पृथ्वी झांकून टाकिली आहे. पावसामुळें पर्वत व वनें यांतून जलस्राव होत आहे. नांगरून टाकलेल्या भूमींतून धान्यांकुर वर आलें आहेत. या तिहींची शोभा उणी-अधिक दिसत नाहीं. सोसाट्याच्या वाऱ्यांनीं मेघ हे इकडून

१ पावसाळ्यांतील आषाढशुद्ध एकादशी, जिला पंचांगांत 'शयनी' असें ह्मटलें असतें तेथपासून तों कार्तिक शुद्ध ११ जिला 'बोधिनी' असें ह्मणतात तेथपर्यंत 'देव' निजले असतात अशी आर्यधर्मीयांची समजूत आहे. हाच अज्ञातवास.

तिकडे जातात. मेघ आकाशांत दिसूं लागतांच प्रवासी जनांना घरीं परत जाण्याची उत्कंठा होते. तुझ्यासारखे गंभीर ध्वनि करणारे हे ढग हलके हलके प्रगल्भ होतील. हे हरे, हे त्रिविक्रमा, बाण व ज्या यांनीं रहित असलेल्या तीन रंगांच्या इंद्रधनुष्यानें तुझें हें मध्यमपद[1] ( अंतरिक्ष ) अलंकृत झालें आहे. हा नभस्[2] मास असून यांतच नभश्चक्षु (सूर्य) नभस्तलीं जणुं प्रकाशतच नाहीं! मेघांमुळें चंद्रकिरणांना निस्तेजपणा आल्याकारणानें चंद्राचे किरण असून नसल्यासारखे वाटतात. समुद्राच्या ओघासारख्या व दूरवर पसरलेल्या मेघांतून एकसारखी वृष्टि होत असल्याच्या योगानें, पृथ्वी व आकाश यांचा नित्यसंबंध या मेघांनीं घडवून आणला आहे. फार पाऊस पडल्याकारणानें नीप, कदंब, व अर्जुनवृक्षांच्या फुलांच्या परिमळानें सुगंधित झाल्यानें कामोद्दीपनकारक वायु पृथ्वीवर जोरानें वहात आहेत. आकाशामध्यें मोठा पर्जन्याचा वर्षाव सुरू असून तें सर्व विस्तीर्ण मेघांनीं व्याप्त झालें आहे; या योगानें असें वाटतें कीं, आकाशांत एक समुद्रच उत्पन्न झालेला आहे. तसेंच आकाशानें विद्युद्युक्त मेघांचें कवच धारण करून इंद्रधनुष्यांतून पर्जन्यधारारूपी निर्मल बाणांचा वर्षाव सुरू केला आहे त्या अर्थीं हें युद्धाकरितां सज्ज उभें राहिलें आहे अशी कल्पना मनांत येते. हे सुंदरमुखा, पर्वत, वन व वृक्ष यांचीं शिखरें दाट मेघांनीं आच्छादून टाकल्यासारखीं दिसतात. गजसमूहाप्रमाणें जलाचा वर्षाव करणाऱ्या या मेघांनीं युक्त असलेल्या गगनाला सागराचें स्वरूप प्राप्त झालें आहे. समुद्रांतून उत्पन्न झालेले तृणाला हालवून सोडणारे, चंचल, शीतल, आर्द्र, तुषारयुक्त, दांडगे व कठोर असे वायु वहात आहेत. सूर्यास्त झालेला असल्याकारणानें, रात्रीं यथेच्छ मेघवर्षाव सुरू झाला म्हणजे चंद्र नष्टप्राय होऊन, दाही दिशा ओळखूं येत नाहींत. वायुपूर्ण मेघांनीं व्याप्त झालेलें आकाश सचेतन आहे असा भास होतो. इतकें आहे तरी लोकांना रात्र झाली कीं दिवस आहे हें कळत नाहीं असें मात्र नाहीं. हे कृष्णा, ग्रीष्मऋतूचे अपकारापासून सुटून आतां पर्जन्यानें शोभणारें हें वृंदावन चित्ररथ गंधर्वाच्या वनाप्रमाणें दिसत आहे, तें अवलोकन कर."

याप्रकारें वर्षाकाळाचे गुण श्रीकृष्णाला सांगत सांगत, ज्येष्ठ भ्राता बलवान् संकर्षण व्रजामध्यें परत गेला. या प्रकारें असें एकमेकांचें मनोरंजन करीत कृष्ण व संकर्षण हे उभयतां आपल्या ज्ञाति-बांधवांसह त्या महावनामध्यें काल क्रमीत असत.

## अध्याय अकरावा.

—:०:—

### यमुनावर्णन.

वैशंपायन सांगतात:—एके समयीं, रमणीय वदनाचा, कामरूपी श्रीकृष्ण, संकर्षणाला बरोबर घेतल्यावांचून, एकटाच, त्या मनोहर वनामध्यें हिंडत होता. तो श्यामवर्ण कृष्ण काकपक्षांचे योगानें फार रमणीय दिसत होता. त्याचे नेत्र कमलाच्या पाकळ्यांप्रमाणें होते. चंद्राला जसें शशलांछन शोभा देतें तद्वत् श्रीवत्सचिन्ह त्याचे वक्षःस्थलाला शोभवीत होतें. त्याच्या अग्रहस्तामध्यें बाहुभूषणें असून त्याची कांती फुललेल्या कमळासारखी होती. त्याचे तुरतुर चालणारे पाय सुकुमार असून ताम्रवर्ण होते. त्यानें पद्मकेसरासारखी तेजस्वी

---

१ वामन अवतारांतील तीन पावलांपैकीं मधल्या पावलानें अंतरिक्ष व्यापून टाकलें होतें त्यास अनुसरून वरील वर्णन आहे.

२ नभस् [ श्रावण ] महिन्यांतच नभश्चक्षु लुप्तप्राय व्हावा हे आश्चर्य होय, अशीं व्यासांची कोटि आहे.

पीतवर्णाचीं व लोकांच्या मनास आल्हाद देणारीं दोन सूक्ष्म वस्त्रें परिधान केलीं असल्या-कारणानें, तो संध्याकाळच्या मेघाप्रमाणें शोभत होता. वांसरांची व्यवस्था करण्यांत गुंतलेल्या आपल्या हातांमध्यें त्यानें दंड व रज्जू घेतले होते, त्याच्या भुजा सरळ असून, देवादिक त्याच्या भुजांचें पूजन करीत. त्याचे ओंठ अति मनोहर होते, त्याचें तें बालपणचें मुख पुंडरीक कमलाप्रमाणें सुगंधित असन अत्यंत शोभत होतें. भ्रमरांनीं युक्त पद्ममंडल ज्याप्रमाणें दिसावें त्याप्रमाणें त्याचें मुखकमल, मोकळे सुटून तोंडावर आलेल्या केंसांमुळें विराजमान दिसत होतें. आकाशांतील नक्षत्रां-च्या पंक्तीप्रमाणें त्याचे मस्तकावर, अर्जुन, कदंब, नीप इत्यादि वृक्षांच्या पुष्पांची व पल्ल-वांची माला अत्यंत रमणीय दिसत होती. कंठांतील त्या माळेच्या योगानें तो वीर मेघ-राजीनें युक्त असलेल्या मूर्तिमंत श्यामवर्ण भाद्रपद मासासारखा दिसत होता. त्याच्या कंठसूत्रांत बांधलेलें एकच निर्मल मोराच्या पिसाऱ्यांतील पान जेव्हां मंद वायूनें हाले तेव्हां ती शोभा मोठी रमणीय दिसे. वनांत गेला असतां कांहीं वेळ तो गायन करी; नंतर धांवे. केव्हां केव्हां तो नानाप्रकारचे खेळ करी. लहर लागली तर कर्णमधुर पर्णवाद्य (पिपाणी) वाजवीत बसे. अथवा गाईंना उल्हास वाटावा म्हणून वनांत गेल्यावर तो बालक अत्यंत गोड लागणारी गोपवेणु[१] ( पांवा) वाजवूं लागे. गोकु-लांत संचार करणारा, देदीप्यमान व घननीळ प्रभु गोपाल कृष्ण, त्या रम्य व चित्रित अस-लेल्या वनराजीमध्यें रममाण होऊन जाई. त्या कामवासना उद्दीपित करणाऱ्या वनामध्यें मोर टाहो फोडीत होते. मेघगर्जनांच्या प्रति-ध्वनीनें तें दुमदुमून गेलें होतें. त्यांतील मार्ग तृणांकुरांनीं आच्छादित झाले होते. भ्रमर हे त्या वनराजींना अलंकाराप्रमाणें शोभवीत होते. त्यांतील पालवी व पानें स्वच्छ दिसत होतीं. त्यांतून नव्या पाण्याचे प्रवाह चालले होते. जिकडे तिकडे परागांचा सुवास सुटलेला होता. केस-रांच्या परिमळाला मदनाच्या श्वासांची उपमा देत असतात; म्हणून प्रियविरहामुळें एकसार-ख्या निःश्वास सोडणाऱ्या कामिनी स्त्रियां-प्रमाणें त्या वनराजी दिसत होत्या. गर्द वृक्षां-वरून येणाऱ्या नव्या वायूच्या झुळुकी जेव्हां श्रीकृष्णाच्या शरीराला लागल्या तेव्हां वरील गुणांनीं युक्त असलेल्या त्या वनराजींमध्यें त्याला अत्यानंदाचा लाभ झाला.

कोणे एके वेळीं गाईंसहवर्तमान त्या वना-मध्यें हिंडत असतां सर्व झाडांमध्यें श्रेष्ठ अस-लेल्या एका वटवृक्षाकडे श्रीकृष्णाची दृष्टि गेली. त्याचा विस्तार फार मोठा होता. त्या-वरील पानें अति दाट असल्याकारणानें, तो वृक्ष म्हणजे आकाशांतील एखादा मेघ पृथ्वी-वर आला आहे असें वाटे. त्याचा विस्तार पर्वताप्रमाणें प्रचंड असून, तो अर्ध्या गगनां-पर्यंत जाऊन भिडला होता. नीलादि बहुविध वर्णांचे अनेक पक्षी त्या वृक्षावर बसले होते. त्यावर पुष्कळ फळें व दाट पालवी असल्या-कारणानें तो इंद्रधनुष्ययुक्त मेघासारखा दिसत होता.त्याच्या फांद्या भल्या मोठ्या घरासारख्या होत्या. फुलें व वेली यांचे योगानें तो शोभिवंत झालेला होता. वायु व मेघ यांना त्यानें आधार दिलेला होता. त्या प्रदेशांतील सर्व वृक्षांचा तो राजा होता. तो पुण्यवान् वृक्ष पाऊस व ऊन यांपासून लोकांचें रक्षण करी. तो पर्वता-च्या शिखराप्रमाणें दिसत होता. त्याचीं मुळें खोल गेलीं असून भारानें तो फार वांकला होता. त्या वृक्षाचें नांव भांडीर असें होतें.

---

१ आजकाल देखील गुराखी पोरें रानांत गुरांमागें पांवे वाजवितात.

त्या वृक्षाचें स्वरूप अवलोकन करून प्रभूनें तेथें वास करण्याचा निश्चय केला. हे अनघा, त्या वृक्षाच्या समीप, आपल्या बरोबरीच्या गोपाळांसह एक दिवसभर, श्रीकृष्णानें तेथें क्रीडा केली. पूर्वी स्वर्गलोकीं असतांना त्यानें अशीच क्रीडा केली होती. त्याच्या सोबत्यांनीं नाना प्रकारचे वनांत खेळावयाचे खेळ काढून, भाण्डीर वृक्षावर वास करून क्रीडा करणाऱ्या श्रीकृष्णाचें मनोरंजन केलें. कांहीं गुराख्यांच्या मुलांनीं मुदित अंतःकरणानें गाणीं म्हणण्यास प्रारंभ केला. कित्येक खेळाडू मुलें कृष्णाचींच गाणीं गाऊं लागले. त्यांचें गायन चालू असतां पराक्रमी श्रीकृष्ण पर्णवाद्यांतच वेणु व तुंबीवीणा वाजवूं लागला.

एके वेळीं तो वृषभनेत्र कृष्ण गाई चारतां चारतां, यमुनेच्या कांठीं येऊन पोंचला. त्या ठिकाणचे वृक्षांना वेलींनीं अलंकृत केलें होतें. तेथून पद्म नामक कमलांनीं युक्त असलेली यमुना नदी त्याचे दृष्टीस पडली. तरंगरूपी कटाक्षांनीं ती वांकडी झालेली होती. तिच्या प्रवाहावरून वहाणारा वायु जलस्पर्शानें युक्त झालेला असल्यामुळें त्यापासून अत्यंत आल्हाद होत होता. त्या नदीला उत्तम घाट बांधला असून तिचें उदक फार मधुर होतें. तिजमध्यें बरेच डोह असून ती जोरानें वहात होती. जलबिंदूंनीं आर्द्र झालेल्या वायूच्या जोरानें जवळपासचे वृक्ष वांकून गेले होते. यमुनातीरावर हंस, कारंड व सारस हे पक्षी आपले स्वर काढीत होते. नेहमीं जोडप्यानें असणारे चक्रवाकादि पक्षी तिच्या तीराचा आश्रय करून राहिलेले दृष्टीस पडत होते. जलामध्यें वास करणाऱ्या मत्स्यादि प्राण्यांनीं ती युक्त होती. जलामध्यें दृष्टीस पडणाऱ्या शीतलत्वादि गुणांनीं यमुनेला भूषविलें होतें. पाण्यामध्यें उत्पन्न होणारीं पुष्पें यमुनेंतही असल्यामुळें ती चित्रित झाली होती. शेवाळ आल्याकारणानें तिचें उदक क्वचित् हिरवें दिसत होतें.

यमुना नदी ही सर्व अवयवांनीं युक्त असलेली समुद्राची जणुं राज्ञीच होती. कारण, प्रसृत झालेले प्रवाह हे तिचे चरणांचे ठिकाणीं होते. पुलिनरूपी श्रोणिमंडळानें ती युक्त होती. आवर्तरूपी गंभीर नाभी, पद्मरूपी रोम, तटच्छेदरूपी उदर व तरंगरूपी त्रिवली, इत्यादि आरोपित मानवी चिन्हांनीं ती अलंकृत झालेली असून फार सुंदर दिसत होती. फेंस हेच त्या प्रसन्न यमुनेचे हंसतमुखाचे ठिकाणी होते. हंसरूपी हास्य, रक्तकमलरूपी ओष्ठ, कमलरूपी, वांकलेल्या भुवयांनीं युक्त असलेले नेत्र, डोहरूप विशाल ललाट, शैवलरूपी केश, चक्रवाकरूपी स्तन, तीराचा पार्श्वभाग हेंच मुख, दीर्घ जलौघरूपी लांब लांब भुजा, तीराच्या पाळी हेच कर्ण, कारंडवरूपी कुंडलें, सुंदर कमलें हेच लोचन, तीरावर उगवलेले वृक्षादिक हीं आभरणें, मीनरूपी निर्मल मेखला, कमलिनीच्या पांकळ्या हीं रेशमी वस्त्रें, सुस्वर काढणारे सारसपक्षी हेच नूपुर, काशपुष्परूपी वस्त्र, कूर्म व हंस हींच लक्षणें, आणि मनुष्यरूपी पुष्ट स्तन इत्यादि आरोपित मानवी अवयवांनीं व गुणधर्मांनीं ती सुंदर यमुनानदी युक्त होती. तिच्यामध्यें भयंकर नक्र रहात असून, पाणी पिण्याचे ठिकाणीं येणाऱ्या श्वापदांनीं तिला फार शोभा आलेली होती; पशूंनीं तिचें उदक उष्टविलें होतें; तिच्या तीरावर अनेक आश्रम बांधलेले होते.

त्या समुद्रपत्नी यमुनानदीकडे चोहोंबाजूंनीं नेत्रकटाक्ष फेंकीत, श्रीकृष्ण तिच्या तीरातीरानें हिंडूं लागला; त्याच्या संचारानें त्या मनोहर नदीला अधिकच शोभा आली. त्या श्रेष्ठ

नदीच्या बाजूनें हिंडतां हिंडतां एक उत्तम डोह त्याच्या नजरेस पडला.

तो डोह एक योजन लांब असून, देवांनाही दुर्लंघ्य होता. तो फार खोल होता; त्याचें पाणी केव्हांही क्षुब्ध होत नसे; तो समुद्राप्रमाणें संथ होता. जलचर पशुपक्षी यांची त्या डोहांत मुळींच वसति नव्हती; मेघांनीं भरून टाकलेल्या आकाशाप्रमाणें तो डोह पाण्यानें तुडुंब भरला होता. त्या जलाचा थांग लागणें शक्य नव्हतें; त्याच्या तीरावर सर्पांचीं मोठमोठीं बिळें होतीं, त्यामुळें तेथें फिरकणेंही मुष्किलीचें होतें. सर्पांच्या फूत्कारापासून उत्पन्न झालेल्या अग्नीच्या धुराचें त्या डोहाभोंवतीं वेष्टण पडलेलें होतें. त्यांतील जलाचा पशु किंवा इतर तान्हेलेले प्राणी यांना कांहींएक उपयोग नव्हता. त्रिकाल स्नान करण्याची इच्छा करणाऱ्या देवांनींही तो डोह वर्ज्य केला होता. आकाशमार्गानें संचार करणाऱ्या पक्ष्यांना देखील त्या डोहावरून उंच फिरकण्याची सोय नव्हती. तृण जरी त्या डोहाच्या पाण्यांत पडलें तरी त्याच्या भयंकर आगीनें तें त्वरित जळून खाक होई. तो डोह औरसचौरस एक योजन असून देवांनाही दुर्गम होता; त्यांतील भयंकर विषरूपी अग्नीनें तेथील वृक्ष जळत होते.

व्रजाच्या उत्तरेस एका कोसावरच तो डोह होता; तो लांबरुंद, अगाध व झगझगीत डोह पाहून कृष्णाच्या मनांत असा विचार आला. "हा कोणाचा बरें डोह असावा? यांतच महाभयंकर व अंजनराशीसारखा काळाकुट्ट कालीय नामक सर्पराज राहतो, असें मला वाटतें. सर्पांचा नाश करणाऱ्या पक्षिराज गरुडाच्या भयानें समुद्र सोडून तो येथें येऊन राहिल्याचें मला ठाऊक आहे. त्यानेंच या सागराला मिळणाऱ्या यमुना नदीचें पाणी दूषित करून टाकलें आहे. या सर्पश्रेष्ठाच्या भीतीनें येथील प्रदेशांत कोणी फिरकत नाहीं. त्यामुळें हें अरण्य जास्तच भयंकर दिसत असून यांत जिकडे तिकडे गवत वाढलें आहे. वटादि नाना प्रकारच्या वृक्षवेलींनीं हें घोर वन भरलेलें असून या कालियाचे हितकारी साचिव त्या वनाचें रक्षण करतात. हें अरण्य निर्जन असून, विषान्नाप्रमाणें अस्पृश्य आहे, व कालियाचे संबंधी नित्य त्याचें रक्षण करीत आहेत. या डोहाचे उभय तट, शेवाल, कमलें, झाडेंझुडुपें व वेली यांनीं युक्त असल्यामुळें, त्यांतून जाण्यासाठीं मार्ग अजून करावयाचे आहेत असें वाटतें. या सर्पराजाची मस्ती जिरवून या नदीचें पाणी कल्याणदायक होईल असें मला करणें आहे. कालियाचा निग्रह केल्यावर हा डोह या व्रजाला उपयोगी होऊन, निष्कंटक रीतीनें सर्वांना येथें संचार करण्यास हरकत पडणार नाहीं. या डोहाचे घाटांवर वाटेल त्याला बिनदिक्कत जातां येईल. कालियासारख्या कुमार्गगामी दुरात्म्यांचें निर्दलन करण्याकरितां मी गोपकुलांत अवतार घेतला असून या ठिकाणीं वास्तव्य करीत आहें. तर आतां या कदंब वृक्षावर चढून, बाललीलेनें या भयंकर डोहांत मी उडी मारतों आणि कालियाचें दमन करितों. असें केलें म्हणजे माझा पराक्रम जगतांत प्रसिद्ध होईल.

## अध्याय बारावा.

—:०:—

### कालियामर्दन.

वैशंपायन सांगतातः—असें म्हणून तो चपल कृष्ण नदीच्या कांठाजवळ गेला व घट्ट कंबर बांधून त्यानें मोठ्या आनंदानें त्या कदंब वृक्षाच्या शेंड्यावर आरोहण केलें. नंतर तो

मेघश्याम कृष्ण त्या कळंबाच्या फांदीला धरून लोंबकळत राहिला. आणि तशा स्थितींत त्या कमलनेत्रानें मोठी आरोळी देऊन डोहामध्यें उडी मारली. कृष्णानें आंत उडी मारतांक्षणीं तो यमुना नदीचा डोह खळबळून गेला आणि एखादा ढग दुभंग होऊन त्यांतील उदक ज्याप्रमाणें जोरानें चोंहीकडे उसळतें, त्याप्रमाणें त्या डोहांतील पाणी मोठ्या जोरानें जिकडे तिकडे उसळून गेलें. तसेंच कृष्णाच्या आरोळीनें त्या डोहांतील सर्पाचें तें भव्य वसतिस्थान खवळून जाऊन तो सर्प जलांतून एकदम वर आला. त्याचे नेत्र रागानें लाल झाले होते. त्या क्रुद्ध झालेल्या सर्पराजाची प्रभा मेघराशीसारखी काळीभोर दिसत होती. त्याचे डोळे अत्यंत लाल दिसत होते. त्याला पांच मुखें असून त्याच्या उच्छ्वासांतून अग्नि (अग्नीसारखा ऊष्ण वायु) निघत होता. त्याच्या जिव्हा सारख्या हालत होत्या; त्याचीं मुखें अग्नीप्रमाणें असून, पांच प्रशस्त व भयंकर फणांनीं तो युक्त होता. त्या अग्नीप्रमाणें प्रखर तेजाच्या सर्पानें तो सर्व डोह व्यापून टाकला होता. तो रागानें फुरफुरत होता. त्याचें तेज जळजळीत होतें. क्रोधानें त्याची आग होत होती. त्यामुळें डोहाचें पाणी देखील आधण आल्याप्रमाणें सळसळूं लागलें. यमुना नदीनें सुद्धां भीतीनें आपला प्रवाह बदलला. ( उलट दिशेनें वाहूं लागली. ) क्रोधाग्नीनें जळत असलेल्या त्याच्या मुखांतून एकसारखा वायु बाहेर चाललेला होता. डोहामध्यें येऊन कृष्ण लीलेनें बालक्रीडा करीत आहे असें पाहण्याबरोबर त्या सर्पराजाच्या तोंडांतून धूर व ज्वाळा निघूं लागल्या. त्याच्यापासून उत्पन्न झालेल्या क्रोधाग्नीनें तीरावरील वृक्षांची एका क्षणांत राखरांगोळी झाली तेव्हां तो प्रलयकालचा कृतांतच आहे कीं काय असें वाटलें. त्याचीं बायकामुलें, चाकर इत्यादिक इतर मोठमोठे सर्पही आपल्या तोंडांतून विषापासून उत्पन्न झालेला भयंकर अग्नि व धूर (बाहेर) टाकूं लागले. त्या नवीन उत्पन्न झालेल्या सर्पराजांचें तेज देखील अत्यंत प्रखर होतें. त्या सर्व सर्पांनीं श्रीकृष्णाला आपल्या फणांच्या वेंगेमध्यें आंवळून टाकलें. त्यामुळें त्याला हातपाय हालवतां येईनासे होऊन तो पर्वताप्रमाणें जागचेजागीं उभा राहिला. ज्यांतील विष बाहेर पडल्याकारणानें नदीचें पाणी बिघडलें होतें तसल्या तीक्ष्ण दंतांनीं त्या सर्पेंद्रांनीं कृष्णाला दंश केले. परंतु त्या योगानें तो महावीर्यशाली कृष्ण कालवश झाला नाहीं. इतकें होत आहे तों त्याच्या बरोबरचे सर्व गोप अत्यंत भयभीत होऊन सद्गदित शब्दांनीं ओरडत व्रजामध्यें जाऊन पोंचले.

तेथें जातांच गोप सांगूं लागलेः—"लोकहो, कृष्णाला भूल पडून त्यानें कालीय सर्प रहातो त्या डोहामध्यें बुडी घेतली आहे व त्या ठिकाणीं सर्पराज कालीय त्याला खाऊन टाकीत आहे; म्हणून विलंब न लावतां तिकडे चला. सर्पराजानें तुझ्या कृष्णाला डोहामध्यें ओढून नेलें आहे हें वर्तमान लवकर नंदरानाला कळवा." तें वज्राघातासारखें भाषण कानीं पडतांच नंद अत्यंत व्याकुल झाला. त्याचीं पावलें त्या भयंकर डोहाकडे वळलीं. तो चालतांना अडखळूं लागला. आबालवृद्ध स्त्रीपुरुष त्याचे पाठीमागून तिकडेच धांवूं लागले. तरुण बलराम देखील त्या पन्नगराजाच्या डोहांतील विहारस्थानासमीप प्राप्त झाला. नंदप्रभृति सर्व गोपांचे डोळे पाण्यानें भरून गेले होते. व डोहाच्या कांठावर उभे राहून त्यांनीं सारखा हाहाःकार चालविला. लज्जा, विस्मय व शोक या भिन्न भिन्न विकारांची छाया आळीपाळीनें त्यांचे चेहेऱ्यांवर दृग्गोचर होत होती. "हायरे

पुत्रा" असें कित्येकजण ओरडूं लागले. "हायरे, धिःक्कार असो आम्हांला" असे उद्गार कित्येकांच्या मुखावाटे बाहेर पडूं लागले. कोणी म्हणूं लागले, " हायरे दुर्दैवा, आम्ही मेल्याहून मेले झालों आहों." याप्रमाणें सर्वांना अत्यंत दुःख होऊन ते रडूं लागले. तेथें जमलेल्या स्त्रिया देखील मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागल्या. त्या यशोदेला उद्देशून म्हणाल्या " ज्या अर्थी आपल्या पोटचा गोळा सर्पराजाच्या तावडींत सांपडलेला पाहण्याचें तुझ्या नशिबीं आलें आहे, त्या अर्थी तूं खरोखर अत्यंत दुर्दैवी आहेस असें दिसतें. अमृतेच्छु सुरासुरांनीं सर्पाची दोरी करून समुद्रमंथन केलें, त्या समयीं जसें अमृत हिसळलें गेलें त्याप्रमाणें हा सर्प स्वशरीरानें या कृष्णास घुसळीत आहे. त्यानें त्याचें धैर्य कांहींसें हललें (ढळलें)सें दिसत आहे. खरोखर तुझें हृदय पाषाणाचें केलें आहे असें वाटतें. यशोदे, पुत्राची ही कष्टमय स्थिति अवलोकन करून तुझ्या अंतःकरणाचे अद्यापि तुकडे तुकडे कसे झाले नाहींत? अरेरे, दुःखित झालेल्या नंदानें,डोहाजवळ उभें राहून, पुत्राच्या तोंडाकडे दृष्टि लाविली आहे. एखाद्या अचेतन वस्तूप्रमाणें तो त्या ठिकाणीं दिसत आहे. आणि हा असा प्रकार पाहण्याचें आमच्या नशिबीं आलें आहे! यशोदेच्या मागोमाग आम्ही पण या कालियाच्या डोहामध्यें उडी घालणार. दामोदराला घेतल्याशिवाय व्रजामध्यें परत जाऊन आम्हांला हीं काळीं तोंडें दाखवावयाचीं नाहींत. सूर्यावांचून दिवसाची, चंद्रावांचून रात्रीची व वृषभाशिवाय गाईची काय बरें शोभा आहे? कृष्णावांचून सर्व गोकुळ आम्हांला शून्याकार आहे; म्हणून वत्सरहित धेनूंप्रमाणें आम्ही कृष्णाला टाकून गोकुळांत परत जाणार नाहीं."

याप्रकारें त्या व्रजवासी स्त्रीपुरुषांचे आणि विशेषतः नंद व यशोदा यांचे विलाप ऐकून बलराम, जो मनानें, शरीरानें व बुद्धीनें कृष्णाशीं एकच होता, व बाह्यतः तरी एकच देह दोन ठिकाणीं केल्यासारखा दिसत होता, तो क्रुद्ध होऊन अव्यय श्रीकृष्णाला म्हणाला, " हे महाबाहो कृष्णा, तूंच गोपांचा आनंद वृद्धिंगत करणारा आहेस. तर लवकर या विषपूर्ण सर्पराजाचें दमन कर. हे विभो, हे आपले मानुषबुद्धि गोपबांधव, तूं इतरांसारखा मनुष्य आहेस या समजुतीनें, अत्यंत शोक करीत आहेत."

बलरामाचे हे खुणेचे शब्द कानीं पडतांच, मोठा पराक्रम करण्याची इच्छा होऊन कृष्णानें दंड थोपटले. नंतर तें सर्पाचें वेष्टण ताडकन् तोडून, पाण्याच्या वर असलेल्या त्या सर्पराजाच्या शरीराच्या भागावर कृष्णानें आपले दोन्ही पाय ठेवले आणि आपल्या हातामध्यें त्याचें मस्तक धरून तें खालीं वांकविलें. मग एकदम त्याच्या मधल्या मोठ्या मस्तकावर श्रीकृष्णानें आरोहण केलें. सुंदर बाहुभूषणांनीं युक्त असलेला कृष्ण त्याच्या मस्तकावर उभा राहून नाचूं लागला. कृष्णाच्या मर्दनानें त्या भुजंगमाचें मस्तक चळवळेनासें झालें व त्याच्या तोंडांतून रक्त बाहेर पडूं लागलें. नंतर अत्यंत भयभीत होत्साता तो कालिय पुढीलप्रमाणें बोलता झाला. " हे कृष्णा, तुझें सत्य स्वरूप न ओळखल्यामुळें मीं आपल्या रागाचें आविष्करण केलें. हे वरानना, माझें आतां पूर्ण दमन झालें असून, मी निर्विष बनलों आहें. मी आतां तुला शरण आलों आहें. माझीं मुलें व नातलग यांसह मी काय करावें त्याबद्दल मला आज्ञा कर. त्याप्रमाणेंच मी कोणाच्या ताब्यांत राहूं तें सांग. हे देवा, मला जीवदान दे."

सर्पराजाचीं पांचीं मस्तकें लीन झालीं आहेत असें पाहून, गरुडवाहन भगवान् न

रागावतां, त्या उरगेश्वराला उद्देशून बोलला, "हे सर्पराजा, तुला मी या यमुना नदीमध्यें वास्तव्य करूं देणार नाहीं. भार्या व बंधु यांसह तूं सागराच्या जलामध्यें राहण्यास जा. जर कोणी तुझा पुत्र अथवा भृत्य या डोहामध्यें माझ्या दृष्टीस पडला तर मी तत्काल त्याचा वध करीन. या यमुना नदीचें पाणी आतां निर्दोष व सुपेय होवो. तूं महासागरामध्यें जाऊन तेथें वास्तव्य कर. यापुढें जर तूं येथेंच राहिलास तर तुजवर मोठें अरिष्ट येऊन त्यांत तुझा अंत होईल. हे सर्पराजा, सागरामध्यें तुझ्या मस्तकांवर माझीं पावलें उमटलेलीं पाहून, पन्नगांचा शत्रु गरूड तुला प्रहार करणार नाहीं."

हें ऐकतांच, श्रीकृष्णाच्या चरणांवर मस्तक ठेवून, तो सर्पश्रेष्ठ कालिय सर्व गोपांच्या देखत, डोहांतून निघून गेला; व सर्पराज पराभूत होऊन तेथून निघून गेल्यावर, कृष्ण तीरावर येऊन उभा राहिला. या कृत्यानें विस्मित झालेल्या गोपांनीं प्रदक्षिणापूर्वक श्रीकृष्णाची स्तुति केली. नंतर संतुष्ट होऊन त्या वनवासी गोपाळांनीं नंदाला उद्देशून भाषण केलें. "हे अनघा, अशा प्रकारचा अवतारी पुत्र तुला लाभला असल्याकारणानें खरोखर तुजवर परमेश्वराचा मोठा अनुग्रह झाला आहे, असें आम्हांला वाटतें. तूं धन्य आहेस. आजपासून आपल्यावर, आपल्या गाईंवर किंवा व्रजावर कोणतीही आपत्ति ओढवली तर आपण या विशाललोचन प्रभु कृष्णाला शरण जाऊं. या मुनिसेवित यमुना नदीचें जल आतां पूर्णपणें स्वच्छ व मंगलकारक झालें असून, इच्या कांठीं आपल्या गाईंना निर्वेधपणें नेहमीं संचार करण्यास हरकत राहिलेली नाहीं. आम्हां वनवासी गोपांना हा कृष्ण ह्मणजे व्रजामध्यें प्रकट झालेला परमेश्वर ( महद्भूत[1] ) आहे, हें झांकलेल्या अग्नीप्रमाणें कळलें नाहीं."

याप्रमाणें आश्चर्यभरित झालेले गोप अव्यय कृष्णाचें स्तोत्र गायन करीत, देव जसे चित्ररथ गंधर्वाच्या उपवनाप्रत जावे तसे आपल्या घोषाचे ठिकाणीं परत गेले.

# अध्याय तेरावा.

—:०:—

## धेनुकवध.

वैशंपायन सांगतातः—कृष्णानें यमुनाडोहांत कालियाचें दमन केल्यानंतर, बलराम व तो असे उभयतां जोडीनें त्याच प्रदेशांत संचार करीत असत. कोणे एके समयीं ते दोघे वसुदेवाचे पुत्र गोधनें चारीत चालले असतां, रमणीय अशा गोवर्धन पर्वतासमीप प्राप्त झाले. तेव्हां गोवर्धन पर्वताच्या उत्तरेस व यमुनेच्या कांठीं एक भलें मोठें शोभिवंत तालवन त्या उभयतां वीरांच्या दृष्टीस पडलें. त्या वनांत जिकडे तिकडे तालवृक्षांचीं पानें पडलेलीं होतीं. तेथें नानाप्रकारचे खेळ खेळून, उच्छृंखल गोऱ्ह्यांप्रमाणें मुदितांतःकरणानें ते वावरूं लागले. तो प्रदेश थंड विस्तीर्ण व सपाट असून त्या ठिकाणीं मातीचीं ढेंकळें किंवा दगड वगैरे कांहीं एक नव्हतें. तेथील भूमि बहुतेक दर्भांनीं व्यापलेली असून, त्यांतील माती काळीभोर होती. त्या ठिकाणचे तालवृक्ष उंच असून त्यांना पुष्कळच फांद्या होत्या. त्यांचीं पेरें काळीं असून त्यांच्या फांद्यांच्या टोंकाला फलांचा बहर आलेला होता. त्यामुळें त्या तालवनामध्यें हत्तींनीं आपल्या सोंडाच उंच केल्या आहेत कीं काय असा भास होई. त्या प्रदेशांत वक्त्यांतील अग्रणी दामोदर आनंदानें म्हणाला, " अहाहा, पिकलेल्या तालफलांच्या

१ " एको विष्णुर्महद्भूतम्."

घमघमाटानें हा प्रदेश कितीतरी सुवासित झाला आहे! दादा, आपण हीं गोड, सुवासिक, काळीं, रसाळ व पक्क झालेलीं फळें पाडूं या! मनांत विचार येतांच त्याप्रमाणें कृति करण्यास, आपल्याला मुळींच वेळ लागत नाहीं. यांच्या नुसत्या वासानें आपल्या घ्राणेंद्रियाची तृप्ति होत आहे. त्यापक्षीं यांतील रस अमृतासारखा असला पाहिजे असें मला वाटतें.''

श्रीकृष्णाचें भाषण संपतें न संपतें तोंच बलराम हंसत हंसत तीं झाडें हलवून फळें पाडूं लागला. तें तालवन दुर्लंघनीय असून माणसांची तेथें जाण्याची सोय नव्हती, वास्तविक तें अस्सल असूनहि प्रस्तुत एखाद्या मनुष्यभक्षकाच्या भवनासारखें शून्यवत् दिसत होतें.

धेनुक नामक भयंकर दैत्य गर्दभाचें रूप धारण करून त्या वनामध्यें रहात होता. त्याचे बराबर एक भला मोठा गर्दभांचा कळप होता. तो दुष्टबुद्धि गर्दभरूपी दैत्य त्या तालवनाचें रक्षण करून मनुष्य, पक्षी व श्वापदें यांच्या समूहांना त्रास देई. फळें पाडतांना उत्पन्न झालेला तो तालशब्द कानीं पडतांच त्याला फार क्रोध आला व हत्तीला जसा तालशब्द सहन होत नसतो तसाच त्यालाही सहन झाला नाहीं. तेव्हां अत्यंत क्रोधायमान झालेला तो राक्षस त्या शब्दाच्या अनुरोधानें धांवून गेला; तों तेथें रोहिणीचा तनय त्याच्या दृष्टीस पडला. मदामुळें त्या गर्दभाचे केंस विखरून त्याच्या तोंडावर आले होते. त्याचे नेत्र स्तब्ध झाले होते. मोठ्यानें आरोळी देत व खुरांनीं पृथ्वी विदारीत चालला असतां, तो आ पसरलेल्या कृतांताप्रमाणें दिसत होता. त्यानें आपलें पुच्छ वर केलें असून भक्ष्य सांपडणार या आशेनें त्याला मोठा आनंद झाला होता. दंत हेंच त्याचें आयुध होतें. तालवृक्षांच्या खालीं त्या ध्वजाकार व अव्यय बलरामाला पाहून त्या दुष्ट खरानें त्याला दंश केला. नंतर उलट वळून त्या दैत्येंद्रानें आपल्या पाठीमागच्या तंगड्यांच्या दुगाण्या शस्त्ररहित असलेल्या बलरामाचे उरावर झाडल्या. परंतु बलरामानें त्याच तंगड्या धरून, त्याचें मुख व स्कंध फिरविले आणि त्या गर्दभरूपी दैत्याला, तालवृक्षाच्या अग्रावर झुगारून दिलें. त्यामुळें, त्याची पाठ, मांड्या, कंबर व मान हीं सर्व मोडून जाऊन, तो दुरात्मा तालफलांसहवर्तमान भूतलावर धाडदिशीं आपटला. तो गर्दभ वैभवहीन होऊन, मरून पडला आहे असें पहातांच बलरामानें त्याच्या इतर अनुचरांनाही फेंकून देण्याची सुरुवात केली. गर्दभांचीं शरीरें व तालफलें यांनीं भरून गेलेली तेथील जागा, शरदृतूंतील मेघाच्छादित आकाशाप्रमाणें दिसत होती. त्या गर्दभरूपी दैत्याचा सपरिवार नाश झाल्यामुळें, आधींच रम्य असलेल्या त्या तालवनाची शोभा द्विगुणित झाली. आतां त्या तकतकीत व उत्तम तालवनांतील भीति नाहींशी झाल्याकारणानें गाई तेथें सुखानें नांदूं लागल्या व तें विशिष्ट आकाराचें वन फार शोभिवंत दिसूं लागलें. नंतर वनचर गोपाल त्या वनांत निःशंकपणें शिरून, दुःख व त्रासरहित होत्साते तेथें यथेच्छ विहार करूं लागले. मग गाई निर्वेधपणें चरूं लागल्या असें पाहून, त्या हत्तीप्रमाणें पराक्रमी बालकांनीं, झाडांच्या पानांचें आसन तयार केलें व त्यावर ते सुखानें विश्रांति घेत बसले.

## अध्याय चौदावा.

—:०:—

### प्रलंब-वध.

वैशंपायन सांगतातः—नंतर कांहीं वेळानें त्या आनंदित झालेल्या वसुदेवपुत्रांनीं तें तालवन सोडून दिलें व पुनः ते भाण्डीर वृक्षापाशीं

आले. वाटेनें ते बहुगुणित झालेलीं शुभ गोधनें चारीत होते व जिकडे तिकडे विपुल तृणांकुर उगवलेल्या वनाची शोभा अवलोकन करीत होते. तसेंच, वाटेनें जातां जातां, ते दंड थोपटीत होते; गाणीं म्हणत होते; मधून मधून झाडांच्या मागें लपत होते; केव्हां केव्हां ते शत्रूला जेर करणारे वीर गाईंचीं व वांसरांचीं नांवें घेऊन आरोळ्या देत होते. शुभ चिन्हांनीं युक्त असलेल्या त्या बालकांच्या खांद्यांवर अन्नाचीं शिंकीं होतीं. त्यांच्या वक्षःस्थळावर वनमाला विराजत होत्या; ते लहान लहान शिंगें आलेल्या खोंडांसारखे दिसत होते. सुवर्ण व अंजन यांच्यासारखी त्यांची कांति असून त्यांनीं एकासारखीं एक अशीं वस्त्रें परिधान केलीं होतीं. त्या कारणानें इंद्रधनुष्यांनीं युक्त असलेल्या शुक्ल व कृष्ण वर्णांच्या मेघांप्रमाणें ते शोभिवंत दिसत होते. ते उभयतां वनांतून चालले असतां वन्यवेष धारण करीत. त्याप्रमाणें त्यांनीं कुशाग्रें व पुष्पें हींच मनोहर कर्णभूषणें कानांत धारण केलीं होतीं. कधींही पराभूत न होणारी ती जोडी आपल्या अनुचरांसह गोवर्धन पर्वताच्या आसपास लौकिक खेळ खेळत असे. देव देखील त्यांची पूजा करीत; तथापि त्यांनीं मनुष्यरूप धारण केलें असल्यामुळें, आपल्या मनुष्यत्वाला साजतील अशा गोपक्रीडा करीत ते तेथील वनांत हिंडत असत.

प्रसंगवशात् भाण्डीरवृक्षासमीप बाललीला करीत करीत ते वृक्षश्रेष्ठ न्यग्रोधापाशीं येऊन पोंचले. त्या वृक्षाला विपुल शाखा होत्या. तेथेंच युद्धकृत्यांमध्यें निपुण असलेल्या त्या दोघांनीं गोपाळांसहवर्तमान झाडांच्या फांद्या धरून झोंके घेण्याचे, दगड फेंकण्याचे, इत्यादिक विविध खेळ खेळून व्यायाम करण्यास आरंभ केला. याप्रमाणें सिंहासारख्या त्या पराक्रमी बालकांनीं आनंदानें तेथें हुतुतू घातला असतांना, त्यांना हस्तगत करून घेण्यासाठीं योग्य संधीची वाट पहात बसलेला असुरश्रेष्ठ प्रलंब त्या ठिकाणीं प्राप्त झाला. वन्यपुष्पांनीं आपलें शरीर अलंकृत करून त्यानें गोपवेष धारण केला होता. हास्यादिक क्रीडा करून त्यानें रामकृष्णांना भूल पाडण्याचा यत्न चालविला. तो दानवश्रेष्ठ प्रलंब राक्षस मनुष्यरूप घेऊन निःशंकपणें त्यांच्यांत जाऊन मिसळला. तो देवशत्रु गोपवेषानें दिसल्यामुळें हा आपल्या जातींपैकींच एक गोप आहे असें त्यांना वाटून ते गोपाल त्याबरोबर खेळूं लागले. परंतु वस्तुतः प्रलंबानें आपणास कांहीं फट मिळावी म्हणून तो गोपवेष घेतलेला होता. खेळतां खेळतां त्यानें आपली भयंकर दृष्टि रामकृष्णांकडे लावली. अद्भुत कृत्यें करणारा कृष्ण कांहीं आपल्याला आटोपावयाचा नाहीं, असें पाहून त्या दैत्यश्रेष्ठानें बलरामाला ठार करण्याचा यत्न सुरू केला. 'हरिणाक्रीडन' नामक एक मुलांचा खेळ ते सर्वजण खेळूं लागले. त्यांत दोघांदोघांनीं हरिणासारखी एकदम उडी मारावयाची असते. कृष्णानें श्रीदाम नांवाचा एक गोपकुमार आपल्या जोडीला घेतला, व हे अनघा, बलरामानें प्रलंब हा गडी घेतला. बाकीच्या गोपालांनीं असाच एक एक गडी निवडून ते सर्व चपल गोपाल एकमेकांच्या वरून उड्या मारूं लागले. कृष्णानें श्रीदामाला जिंकलें, बलरामानें प्रलंबावर वरचढ केली. कृष्णाच्या बाजूच्या सर्व गड्यांनीं विरुद्धपक्षाचा पराजय केला. ते परस्परांना आनंदानें पाठीवरून भाण्डीर वृक्षाच्या खोडापर्यंत, पळत पळत वाहून नेत व पुनः तेथून निघाल्या ठिकाणीं परत येत. याप्रमाणें चाललें असतां, प्रलंबानें एकाएकीं बलरामाला उचलून खांद्यावर घेतलें आणि मेघ जसा चंद्राला घेऊन जातो त्याप्रमाणें त्याला

घेऊन उलट दिशेनें तो राक्षस झपाट्यानें निघून जाऊं लागला. परंतु सुबुद्ध रामाचा भार त्याला सहन न झाल्याकारणानें, त्या अक्राळविक्राळ राक्षसानें इंद्राचें अधिष्ठान असलेल्या मेघाप्रमाणें आपलें शरीर फुगवण्यास सुरवात केली. तेव्हां त्या दानवोत्तम प्रलंबाचें खरें स्वरूप प्रगट झालें. त्याचें शरीर भाण्डीर वृक्षाएवढें मोठें असून, त्याचा वर्ण दग्ध झालेल्या अंजनाच्या पर्वताप्रमाणें (काळाकुट्ट) होता. सूर्याप्रमाणें चमकणारा व पांच स्तबकांनीं युक्त असलेला असा मुकुट त्यानें धारण केला असल्यामुळें त्या दैत्याचें मुख देदीप्यमान् दिसत होतें व सूर्ययुक्त मेघासारखा तो शोभत होता. त्या भयंकर राक्षसाचें तोंड व मान हीं फार मोठीं असून, त्याचे नेत्र गाड्याच्या चाकासारखे होते. त्याच्या पायाच्या भारानें पृथ्वी देखील वांकत होती. त्या शूर प्रलंबानें गळ्यामध्यें पुष्पांच्या लांब लांब माळा व इतर तसलींच आभरणें धारण केलीं होतीं. त्याप्रमाणेंच त्यानें एक लांबच लांब वस्त्र परिधान केलें होतें. अशा रीतीनें तो चालला असतांना ओथंबलेल्या मेघासारखा शोभत होता. प्रलयकाल ज्याप्रमाणें जलप्रलयांत सांपडलेल्या सर्व लोकांचे प्राण हरण करून नेतो, त्याप्रमाणें तो भयंकर राक्षस बलरामाला झपाट्यानें घेऊन चालला होता. आकाशामध्यें प्रलयकाळचा मेघ जसा चंद्राला घेऊन जातो, तद्वत्च प्रलंब संकर्षणाला घेऊन चालला आहे असा भास झाला. त्या दैत्याच्या खांद्यावर बसलेल्या श्रीमान् संकर्षणाला असें वाटून चुकलें कीं, आतां आपली धडगत नाहीं. तेव्हां कृष्णाला उद्देशून तो म्हणाला. "कृष्णा, ह्या पर्वतप्राय शरीराच्या दैत्यानें, मोठ्या मायावीपणानें मनुष्यरूप दाखवून, मला हरण करून चालविलें आहे. या दुष्टबुद्धि व फुगलेल्या प्रलंबाची शक्ति गर्वानें द्विगुणित झालेली आहे, तर मी याचें शासन कसें करूं तें मला सांग.'

रौहिणेयाचें पूर्ववृत्त व खरें बल कृष्णाला माहीत असल्यामुळें, त्यानें किंचित् स्मित करून शांतपणानें व कांहींसें आनंदानें उत्तर केलें "बा रामा, मानवी रूपाची बतावणी चांगली चालवली आहेस ! ( कारण ) तूं गुह्याहून गुह्य जो जगद्व्यापी परमेश्वर त्याचे पदाप्रत पोंचला आहेस. विश्वप्रलयाच्या वेळीं तूं नारायणरूप घेतोस तें लक्षांत आण. समुद्राशीं तादात्म्य पावून सृष्टीचा तूं संहार करतोस, तो तुझा प्रभाव ध्यानांत घे. आपल्यापासून उत्पन्न होऊन पराक्रम करणाऱ्या पुरातन देवांची, ब्रह्मदेवाची व जलाची आद्यसृष्टि कशी झाली त्याची आठवण कर. आकाश हें तुझें मस्तक आहे. जल हीच तुझी मूर्ति आहे. पृथ्वी ही तुझ्या क्षमेच्या ठिकाणीं आहे. अग्नि हा तुझ्या मुखाच्या स्थानीं व लोकांचा आयुर्दायरूपी वायु हा उच्छ्वासाचे ठिकाणीं आहे. तुझ्या मनानें ही सृष्टी उत्पन्न केली आहे. तुला सहस्र मुखें, सहस्र अंगें, सहस्र नेत्र, सहस्र चरण, सहस्र नाभीकमलें व सहस्र किरण आहेत. तूं सर्व शत्रूंचा नाश करण्यास समर्थ आहेस. तूं जेवढें जगतामध्यें उत्पन्न करून ठेवलें आहेस, तेवढेंच देवांना दिसतें. तूं जें अद्याप सांगितलेलें नाहींस त्याचा शोध लावण्यास कोण समर्थ आहे ? या जगांत जेवढें कांहीं ज्ञात होण्यासारखें आहे तें सर्व तूं प्रतिपादन करून ठेवलें आहेस. परंतु, तुला एकट्यालाच जें ठाऊक आहे तें मात्र देवांना देखील विदित नाहीं. आकाशांत आत्म्यापासून निर्माण झालेली तुझी काया त्यांना अगोचर आहे. तुझ्या कृत्रिमरूपाची देव पूजा करितात. देवांना देखील तुझा अंत लागत नाहीं, म्हणून तुला अनंत असें म्हणतात. तूं महान्

आहेस, तसाच सूक्ष्मही आहेस. सूक्ष्म वस्तूस देखील कळावयासारखा नाहींस. (शेषरूपानें) तुझा आधार आहे म्हणूनच हें शाश्वत जगत् चाललें आहे; व सर्व प्राण्यांचे उत्पत्तिस्थान अशी ही अचल पृथ्वी या अखिल विश्वाला संभाळून धरीत आहे. तूं (स्वशरीरानें) चारी समुद्र व्यापून टाकले आहेस. चातुर्वर्ण्याचा जनक तूंच आहेस. चारी युगें तूंच निर्मिलीं असून चारी प्रकारच्या यज्ञांतील हविर्भाग तूंच ग्रहण करतोस. मी या अखिल जगताला ज्या ठिकाणीं आहें त्याच ठिकाणीं तूंही आहेस असें मी समजतों (तुझ्यामाझ्यांत कांहीं भेद नाहीं). वस्तुतः आपला देह देखील एकच आहे; पण जगताच्या कल्याणाकरितां आपण दोन भिन्न रूपें घेतलीं आहेत. मी शाश्वत कृष्ण आहें, तर तूं पुरातन शेष आहेस. अखिल विश्वांचा नित्य देव तूंच सनातन शेष आहेस. आपल्या या दोन भिन्न रूपांनीं हें विश्व चाललें आहे. मीं ह्मणजे तूंच व तूं ह्मणजे सनातन असलेला मीच. तुझ्यामाझ्यांत कांहींही भेदभाव नाहीं. आपण उभयतां एकशरीरी व महापराक्रमी आहों. तर मग मोह पावलेल्या मनुष्याप्रमाणें स्वस्थ काय बसला आहेस? हे देवा, वज्रासारख्या तुझ्या मुष्टीचा त्या दानवाचे मस्तकावर प्रहार करून त्याचा प्राण घे."

वैशंपायन सांगतातः—कृष्णानें याप्रमाणें बलरामाला पूर्ववृत्ताची व आपल्या अवतारकार्याची आठवण देतांक्षणींच, त्रैलोक्याचें सर्व बल त्याच्या ठिकाणीं एकवटलें, आणि लागलीच त्या महाभुजानें, त्या दुष्ट प्रलंबाच्या मस्तकावर, आपल्या मिटलेल्या वज्रप्राय मुष्टीचा प्रहार केला. त्याबरोबर त्याचा कपाळमोक्ष होऊन त्याचें मस्तक त्याच्या शरीरांत शिरलें. बलरामानें पुनः त्याला गुडघ्याची ठोकर मारतांच तो दैत्यश्रेष्ठ गतप्राण होऊन भूमीवर पडला. आकाशांतील विदीर्ण झालेल्या मेघाप्रमाणें त्या पृथ्वीवर पडलेल्या प्रलंबाचा देह दिसूं लागला. त्याच्या मस्तकाच्या ठिकऱ्या उडून सर्व शरीरांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या; तेव्हां पर्वताच्या शिखरावरून गेरूनें युक्त असलेल्या उदकाचा प्रवाह चालला आहे असें वाटलें. प्रलंबाला ठार मारल्यावर, आपले सामर्थ्याचा प्रतापशाली बलरामानें संकोच केला आणि कृष्णाला कडकडून आलिंगन दिलें. त्या घोर दैत्याचा निःपात झालेला अवलोकन करून, स्वर्गस्थ देव, गोप व श्रीकृष्ण या सर्वांनीं त्या महापराक्रमी बलरामाचा आशीर्वचनपूर्वक जयजयकार केला. "सरळवृत्तीच्या सुकुमार बलरामानें प्रलंबाचा वध केला" अशा प्रकारच्या आकाशवाणी सर्व देवांच्या तोंडून निघूं लागल्या. आकाशस्थ देवांनीं त्याला 'बलदेव' हें नामाभिधान दिलें. देवांना देखील अनावर झालेल्या प्रलंबाचा नाश जेव्हां बलरामानें केला, तेव्हां त्याचें सामर्थ्य लोकांना कळून आलें.

## अध्याय पंधरावा.

—:०:—

### शक्रोत्सव.

वैशंपायन सांगतातः—याप्रकारें वनांत संचार करून, कृष्ण व राम यांचा दिनक्रम चाललेला असतां, वर्षाऋतूचे दोन महिने निघून गेले. नंतर ते उभयतां व्रजामध्यें परत आले. तेव्हां, इंद्रोत्सव जवळ आलेला असून, त्याकरितां, उत्सवप्रिय गोपाल उत्सुक झाले आहेत, असें त्यांना समजलें. मग मोठी जिज्ञासा दाखवून कृष्णानें त्यांना प्रश्न केला. "ज्यामुळें तुम्हांला इतका हर्ष झालेला आहे, त्या इंद्राच्या महोत्सवाची कथा काय आहे ती मला

सांगा." त्यावर एका अतिवृद्ध गोपानें उत्तर केलें. 'बाबारे, इंद्राच्या ध्वजाची आम्ही कां पूजा करितो, त्याचें कारण (मी) सांगतों, तें ऐक. हे अरिसूदना, इंद्र हा सर्व देवांचा व मेघांचा स्वामी आहे. हे कृष्णा, त्या जगदीशाच्या प्रीत्यर्थ हा यज्ञ आम्ही कुलाचाराप्रमाणें करीत असतों. तोच मेघांना प्रेरणा देतो. त्याच्या आयुधानें मेघ अलंकृत झालेले आपण पहातों. त्याच इंद्राच्या आज्ञेनें, मेघ हे नूतन जलाची वृष्टि करून तृण-धान्यादिक वाढवितात. पुरुहूत पुरंदर जो इंद्र तोच मेघांचे ठिकाणीं जलाची उत्पत्ति करतो. स्वतः (यज्ञयागादिकांनीं) संतुष्ट झाला, म्हणजे सर्व जगाला, तो भगवान् संतोष देतो. त्यानें उत्पन्न केलेल्या तृण-धान्यावर आम्ही—किंबहुना सर्व मानव—आपला निर्वाह करित. व म्हणूनच आम्ही असले उत्सव करून देवतांना संतुष्ट करतों. इंद्रानें पृथ्वीवर पाऊस पाडला तरच धान्याला अंकुर येतात; जलानें भिजलेली पृथ्वी अमृतानें युक्त झाल्यासारखी दिसते; व या गाई विऊन पुष्कळ दूध देऊं लागतात. त्यांना सुख लागतें. पावसाळ्यांत वाढलेलें हिरवें गवत खाऊन, गाई—बैल पुष्ट होतात. ज्या ठिकाणीं वृष्टि करणारे मेघ आपल्या दृष्टीस पडतात, तेथील भूमि तृणधान्याशिवाय आढळून यावयाची नाहीं. त्या जागच्या लोकांना दुष्काळाची भीति नसते. (तेथें क्षुधेनें व्याकुळ झालेले लोक आढळून यावयाचे नाहींत.) इंद्र हा सूर्याच्या किरणरूपी दिव्य व दुभत्या गाईंचें दोहन करतो व त्या ढगांमध्यें सांठवलेलें पवित्र व नूतन (जलरूपी) क्षीर[1] देतात. वायूच्या प्रेरणेनें मेघ एकमेकांवर आदळून, मोठ्या जोरानें फिरावयास लागून, प्रचंड ध्वनि होतो, त्याला मेघगर्जना असें लोक म्हणत असतात. इंद्राच्या मेघराशी वायूच्या सपाट्यांत सांपडल्या, म्हणजे, पर्वतांना भेदून टाकणारे व वज्राघातासारखे आवाज होत असतात. एखादा धनी ज्याप्रमाणें आपल्या सेवकांकडून पाहिजे तीं कामें करून घेतो, त्याप्रमाणें इंद्र हा आकाशस्थ मेघांना इच्छेप्रमाणें नाचवून त्यांजकडून पाऊस पाडवितो. त्या वेळीं केव्हां केव्हां विजा चमकून मोठा गडगडाट होतो. कांहीं मेघ दुर्दिनसूचक असतात; कांहीं विदीर्ण झालेल्या अभ्रपटलासारखे असतात; कांहीं अंजनासारखे असतात; व कांहींतून जलबिंदूंचा वर्षाव होत असतो. आकाशांतील अशा प्रकारच्या भिन्नस्वरूप मेघांच्या योगानें, देवेंद्र वर्षाकालामध्यें या विश्वाला जणूं काय अलंकृतच करतो आहे असा भास होतो. केव्हां केव्हां आकाशभर मेघांतील जलबिंदु पसरलेले असतात, त्या समयीं आकाशाला मोत्यें लटकलीं आहेत असें वाटतें. सूर्याच्या किरणांचे द्वारानें शोषून घेतलेलें उदक, जलदाता पर्जन्य, जगताच्या कल्याणाकरितां पुनः पृथ्वीवर पावसाचे रूपानें परत करितो. बा कृष्णा, बीजापासून धान्यादिकांची उत्पत्ति करणारा पाऊस हा इंद्राच्या कृपेनें पृथ्वीवर पडतो, या कारणाकरितां राजेलोक, आम्ही गोप, किंबहुना सर्व मनुष्यप्राणी, पावसाळ्यामध्यें मोठ्या आनंदानें एकत्र जमून उत्सवादिकांनीं देवेंद्राची आराधना करीत असतों.

[1] सूर्य पृथ्वीवरील जल आपल्या किरणांच्या उष्णतेनें शोषून घेतो व तें मेघांमध्यें सांठवतो. मेघांपासून यथाकालीं आपल्याला तें वृष्टिरूपानें प्राप्त होतें.

## अध्याय सोळावा.

—:०:—

वैशंपायन सांगतातः—श्रीकृष्णाला इंद्राचें सामर्थ्य पूर्णपणें माहीत होतें. तरी वृद्ध गोपानें इंद्राच्या प्रीत्यर्थ उत्सव करण्याचें कारण सांगि-

तलेलें ऐकून घेतल्यावर, त्यानें समजून उमजून पुढीलप्रमाणें उत्तरपक्ष केला. " आपण अरण्यांत वास्तव्य करणारे गोपाल आहोंत, गाईंच्या जीवावर नेहमीं आपण आपला निर्वाह करतों. त्यापक्षीं पर्वत, वनें व गाई हींच आपलीं दैवतें होत, असें आपण समजलें पाहिजे. कृषिकर्म हें शेतकऱ्यांच्या निर्वाहाचें साधन होय. वैश्यवृत्तीच्या लोकांचें व्यापार हें पोट होय. आणि आपल्या उपजीविकेचें परम निधान म्हणजे या गाई होत. वर्णधर्म असाच असून तो याप्रमाणें तीन प्रकारचा आहे. पूर्वकर्मानुसार ज्याला जो वर्ण प्राप्त झाला असेल, तोच त्यानें आपला मूल्यवान् ठेवा असें मानलें पाहिजे. ज्याचा त्याचा स्वधर्म ( वर्णधर्म ) हाच ज्याला त्याला पूज्य, अर्चनीय व उपकारी असला पाहिजे. जो स्वधर्म सोडून,अन्य वर्णाला नियुक्त केलेलीं कर्में आचरण करतो व तज्जन्य फलाचा उपभोग घेतो, त्या मनुष्याला इहपरलोकीं दोन अनर्थ भोगावे लागतात. शेतें असतील तेथपर्यंत गांवाची सीमा असते. गांवाची मर्यादा संपली कीं, वनाला सुरवात होते. पर्वत लागले म्हणजे अरण्याची गति खुंटते. म्हणून पर्वतांना आपण श्रेष्ठ दैवत समजलें पाहिजे, असें माझें म्हणणें आहे. या अरण्यांतील पर्वत वाटेल तीं रूपें धारण करून, भिन्न भिन्न रूपांच्या द्वारानें, आपआपल्या शिखरांवर क्रीडा करतात, असेंही आपल्या ऐकण्यांत आहे. नखें हींच ज्यांचीं आयुधें आहेत, अशा व्याघ्रसिंहादिक पशूंचीं रूपें घेऊन, पर्वत हे आपल्या वनांचा उच्छेद करणाऱ्या लोकांस त्रास देतात, आणि त्या योगानें वनांचें सहज रक्षण होतें. या उपर जेव्हां वनांत वास्तव्य करणारे किंवा अरण्यांतील कंदमूलादिकांवर निर्वाह करणारे लोक तेथें नासधूस करितात, तेव्हां हिंस्र कर्में करून अशा दुर्जनांचा ते चांगला फडशा उडवतात. ब्राह्मण मंत्रयज्ञ करतात; कृषीवल हे सीतयज्ञ करतात; व आपण गोपाल गिरियज्ञ[1] करतों. तात्पर्य, वनांतील पर्वतांचेंच आपण पूजन केलें पाहिजे. गोपहो, आपण पर्वताप्रीत्यर्थ उत्सव करण्यास सुरवात केली पाहिजे असें मला वाटतें. झाडांखालीं अथवा पर्वतावर छानदार ठिकाण पाहून तेथें स्वस्तिवाचनादिक क्रिया करण्यास आरंभ करा. तसेंच यज्ञीय पशूंचा त्या जागेवर बळी देऊन कुंडमंडपादिकांची तेथें स्थापना करा. इतकें झाल्यावर, घोषांतील सर्व लोक मिळून उत्सव करण्यास लागा. विचार कसला करतां ? शरदृतूंत फुलणाऱ्या पुष्पांच्या माला घालून, सर्व गाईंकडून या पर्वतश्रेष्ठाभोंवतीं प्रदक्षिणा करवून पुनः त्यांस व्रजामध्यें परत आणा. गाईंना मधुर तृण व जल देणारा रमणीय व प्रमुदित शरत्काल सांप्रत प्राप्त झाला आहे. हा ऋतु लागला म्हणजे मेघ कमी होत जाऊन जलाशयांतील पाणी आटूं लागतें. प्रस्तुत हें अरण्य प्रियक वृक्षांच्या पुष्पांनीं गौरवर्ण दिसत आहे. परंतु त्यांत कोठें कोठें बाणासनाच्या पुष्पांमुळें कृष्ण वर्णाची छटा दिसत आहे. आतां या वनांतील गवत जून झालें असून, मोरांचा शब्द देखील कोठें ऐकूं येत नाहीं. तरी याची शोभा कांहीं विशेषच दिसत आहे. भग्नदंत कुंजरांप्रमाणें, आकाशांतील जलधर, विद्युद्रहित व जलशून्य झाल्यानें स्वच्छ दिसत आहेत; व नवीन उदक आकर्षण करून घेणारे मेघ गडगडत आहेत. सर्व वृक्षांना नवी व घनदाट पालवी आलेली असल्यामुळें ते प्रसन्न दिसत आहेत. शुभ्रवर्ण मेघरूपी उष्णीष, हंसरूपी चामरें व पूर्णचंद्ररूपी निर्मळ छत्र, यांनीं हें अंबर सुशोभित

१ स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः। गीता.

[1] नांगराची पूजा.

झालेलें असल्याकारणानें, तें नूतन अभिषिक्त राजाप्रमाणें शोभत आहे. पाऊसकाळ संपत आला असल्यामुळें, त्याबरोबर तळीं वगैरे जलाशय देखील रोडावत चालले आहेत असें वाटतें. हे कृश होत चाललेले जलाशय पाहून हंस व सारस हे देखील नाकें मुरडीत आहेत. चक्रवाकरूपी स्तन, पुलिनरूपी श्रोणिमंडल व हंसरूपी हास्य यांनीं युक्त असलेल्या नद्या आपल्या समुद्ररूपी पतीच्या भेटीस चालल्या आहेत असा भास होत आहे. सांप्रत जलाशयांमध्यें कुमुदपुष्पें[1] फुललीं आहेत. आणि आकाश हें नक्षत्रांमुळें मनोहर दिसत आहे. त्यामुळें रात्रींच्या वेळीं जलाशय व आकाश या उभयतांची चढाओढ लागून राहिली आहे कीं काय, असा भास होतो. या वनामध्यें, मत्त झालेले क्रौंचपक्षी गात आहेत व धान्याचीं कणसें पिकावयाला आलीं आहेत. त्या कारणानें हें वन नुकताच विवाह झालेल्या दंपत्याप्रमाणें शोभत असून त्याचे ठिकाणीं मन अत्यंत रममाण झाल्यावांचून रहात नाहीं. तडागांमध्यें पुष्कर कमलें फुललीं आहेत. विहिरींमध्यें उत्पलें विकासित होत आहेत. उदकपूर्ण क्षेत्रें, नद्या व सरोवरें हीं अत्यंत सुंदर दिसत आहेत. तांबड्या, निळ्या, पांढऱ्या वगैरे रंगांच्या कमलांना पर्जन्याचे जलापासून एक प्रकारे विशिष्ट टवटवी आली आहे. मयूरांचा मद उतरलेला आहे. वायूंचा जोर कमी होऊन ते मंदमंद वाहूं लागले आहेत. आकाशांत अभ्रें येईनाशीं झालीं आहेत. आणि समुद्र मात्र तुडुंब भरलेले दिसत आहेत. ऋतु बदलल्यामुळें साहजिक मोरांचा उत्साह शिथिल पडून त्यांनीं नर्तन करण्याचें सोडून दिलें आहे व त्यांचे पिसाऱ्यांतील डोळे पृथ्वीवर जिकडे तिकडे गळून पडले असल्याकारणानें भूमि ही असंख्य नेत्रांनीं युक्त झाल्यासारखी भासत आहे. यमुना नदीच्या चिखलांनीं भरलेल्या तीरांवर काशादिक फुलें व वेली ही रगडून पडलीं असून तेथें हंस व सारस पक्षी बसले आहेत, त्यामुळें आधींच रम्य असलेल्या यमुनेला विशेष शोभा आलेली आहे. धान्यें पिकावयाच्या सुमारास आलीं असल्याकारणानें शेतें व वनें हीं फार रमणीय दिसत आहेत. धान्यें खाणारे व जलांत उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांना गट्ट करणारे पक्षी मत्त होऊन गुंजारव करीत आहेत. पावसाळ्याच्या आरंभीं ज्यांना मेघांनीं पाणी घातलें, तीं धान्यें आतां मोठीं होऊन जून झालीं आहेत. मेघांचें आवरण टाकून देऊन, शरदृतूच्या प्रभावानें चमकणारा चंद्र निरभ्र आकाशामध्यें आनंदित होऊन राहिला आहे. गाई द्विगुणित दुग्ध देऊं लागल्या आहेत. वृषांचें बळ दुप्पट वाढून ते मस्त झाले आहेत. वनशोभा देखील द्विगुणित झाली असून, पृथ्वी धान्यादिकांनीं सुंदर ( गुणवती ) दिसत आहे. नक्षत्रें मेघांच्या कचाट्यांतून सुटलीं आहेत. जलाशयांमध्यें कमलें उगवलेलीं आहेत. आणि ही शोभा अवलोकन करून मनुष्यांचीं अंतःकरणें सुप्रसन्न दिसत आहेत. फारा दिवसांनीं मेघांच्या तडाक्यांतून सुटलेला सूर्य शरदृतूच्या आगमनानें प्रज्वलित झालेलें आपलें तेज आकाशामध्यें प्रकट करून, प्रखर किरणांनीं सर्व रसात्मक सृष्टि आपल्या ठिकाणीं शोषून घेत आहे. दिग्विजय करण्यासाठीं हापापलेले पृथ्वीपति राजे आपआपल्या सैन्यांचा नीराजन–विधि[1] करून, परस्परांच्या राष्ट्रांच्या दिशेनें निघाले आहेत. या चित्रविचित्र वनराजींमध्यें सर्वत्र चिखल पडला असून त्या लालभडक पुष्पांमुळें फार सुंदर

१ प्राकृतांत यास 'कमोदपुष्पें.' ह्मणतात. हीं लहान असून पडवळीचे फुलांसारखी यास झालर असते.

१ ओंवाळणी.

दिसत आहेत. त्यांचेकडे लक्ष गेलें असतां मन त्यांचे ठिकाणीं मोहून जातें. वनाला शोभा देणारे, असन, सप्तपर्ण, कोविदार, बाणासन, निकुंभ, प्रियक व स्वर्णक इत्यादि वृक्षांना फुलांचा बहर आलेला असून त्यामुळें या वनाला अत्यंत शोभा आली आहे. त्याचप्रमाणें, या अरण्याचे सभोंवतीं, सृमर जातीचे हरिण व घुबड यांची गडबड दृष्टीस पडत आहे. व जिकडे तिकडे केतकीचीं बनें लागून गेलीं आहेत. घरोघर डेऱ्यांतून उत्पन्न होणाऱ्या नादाच्या मिषानें मूर्तिमंत शारदी शोभा हास्य करीत गौळवाड्यांतून वावरत आहे कीं काय असें वाटतें. खरोखर, देवाधिदेव गरुडध्वज विष्णूनें मेघकालामध्यें सुखानें शयन केलें आहे, त्याला देव हे जागृत करूं पहात आहेत. पावसाळा संपून शरत्काल प्राप्त झाला आहे. जिकडे तिकडे उत्तम प्रकारचीं धान्यें उगवलीं आहेत. या समोरील गोवर्धन पर्वतावर, नील-वर्णाचे व चंद्रसूर्यांच्या रंगाचे नानाविध पक्षी विहार करीत बसले असल्याकारणानें त्याला मनोहर वैचित्र्य प्राप्त झालें आहे. विविध प्रकारचीं फलें व पल्लव यांनीं हा पर्वत फुलून गेला असून इंद्रधनुष्यानें युक्त असलेल्या मेघाप्रमाणें हा शोभत आहे. घराएवढे वृक्ष व मोठमोठ्या लता यांनीं हा गोवर्धन अत्यंत रमणीय दिसत आहे. विशाल मूलांच्या योगानें हा वांकलेला असून वायूच्या तांडवानें याला फारच रमणीयता आलेली आहे. अशा या गोवर्धन पर्वताचें व विशेषेंकरून गाईंचें आपण पूजन करूं. शिंगांवर तुरे व मोराचीं पिसें अडकवून गळ्यांत लोंबत्या घंटा बांधून सर्वांच्या कल्याणाकरितां शरदृतूंत फुलणाऱ्या पुष्पांच्या योगानें गाईंचें पूजन करा व गिरि-यज्ञ सुरू करा. देव पाहिजे तर इंद्रयज्ञ कर-तील. आपण गिरियज्ञच करूं. बऱ्याबोलानें तुम्हीं असें न केल्यास बलात्कारानें मीं हें तुम-च्याकडून निःसंशय करवीन. जर तुमचें मज-वर प्रेम असेल व परस्परांमध्यें मित्रभाव असेल तर शंका न आणतां आपण गाईंचेंच पूजन केलें पाहिजे. आपल्या हिताकरितां, बऱ्या बोलानें, मीं सांगतों याप्रमाणें, आणखी कांहींएक विचार न करतां, करा. मी सांगत आहें तें सत्य आहे.

## अध्याय सतरावा.

—:०:—

### गिरियज्ञप्रवर्तन.

वैशंपायन सांगतातः—दामोदराचें वरील भाषण श्रवण करून गाईंवर उपजीविका कर-णाऱ्या गोपांना फार आनंद झाला. श्रीकृष्णाचे वचनामृताचा लाभ घेतल्यानंतर त्यांनीं निःशंकपणें पुढीलप्रमाणें प्रत्युत्तर केलें. "बाळा, ही तुझी सर्व गोपांच्या हिताची बुद्धि ऐकून आम्हांला अत्यंत संतोष होत आहे. या तुझ्या मोठ्या युक्तीनें आपल्या गोधनांची चांगली वाढ होईल. आमची गति व प्रीतिस्थान तूंच आहेस. तुला सर्व कांहीं कळत आहे. तूंच सर्वांचें श्रेष्ठ शरणस्थान आहेस. तूंच आमचा सुहृच्छ्रेष्ठ असून संकटसमयीं आम्हांला अभय देतोस. हे कृष्णा, तुझ्यामुळें हा घोष सुरक्षित असून तुझ्या दर्शनानें गाईंना देखील आनंद होतो. येथील लोकांना कसलेंही भय उरलेलें नाहीं. आपण जणूं स्वर्गांत जाऊन राहिलों आहों असें त्यांना वाटतें. देवांना देखील कठीण अशीं कृत्यें तूं जन्मापासून करीत आला आहेस. "मी तुम्हांकडून बलानें गोयज्ञ व गिरियज्ञ करवीन" इत्यादि तुझी प्रशंसनीय गर्वोक्ति ऐकून आमचीं मनें आश्चर्यानें फारच गुंग झालीं आहेत. श्रेष्ठ प्रकारचें सामर्थ्य, यश व पराक्रम इत्यादि गुणांच्या योगानें तूं

देवांत जसा पुरंदर तसा आम्हां मानवांत सर्वश्रेष्ठ आहेस असें आम्हांस वाटतें. तेजोगोलांमध्यें जसा दिवाकर तसा सर्व मर्त्य मनुष्यांमध्यें तूं आपल्या प्रखर प्रतापानें, तेजानें व सर्वांगपरिपूर्णतेनें वरिष्ठ आहेस. उपग्रहांत ज्याप्रमाणें चंद्र, त्याप्रमाणें तूं कांति, शोभा, प्रसन्नता व स्मितवदनत्व इत्यादि गुणांनीं सर्व लोकांत वैशिष्ट्यानें चमकत आहेस. बळ, शरीर व अद्भुत बाललीला या बाबतींत, एक कार्तिकस्वामीशींच तुझी तुलना करितां येईल. कोणत्याही मनुष्याच्यानें तुझी बरोबरी करवणार नाहीं. हे प्रभो, महासागराच्यानें ज्याप्रमाणें आपल्या तीराचें उल्लंघन होणें नाहीं त्याप्रमाणें गिरियज्ञाविषयीं तूं जी आज्ञा आम्हाला केली आहेस, तिचें उल्लंघन करण्याची कोणाची छाती आहे? बाबारे, शक्रोत्सव तहकूब करून आतां त्या ऐवजीं तुझ्या आज्ञेप्रमाणें, गाई व गोप यांच्या कल्याणाकरितां, श्रीमान् गिरिमह आम्ही चालू करतों. लोकहो, आपण भोजनाकरितां सुंदर सुंदर दुधाचीं पक्वान्नें तयार करूं या. जलप्राशन करण्याच्या ठिकाणीं मंगलकारक कुंभ नेऊन (भरून) ठेवूं. मोठमोठ्या टांक्या व कांहीं लांबरुंद डोण्या ( दगडच्या ) दुधानें भरून भक्ष्य, भोज्य व पेय पदार्थांचा चांगला सांठा करूं. मांसाचीं व भाताचीं तपेलीं बरोबर घेऊन सर्व घोषांतील तीन दिवसांचें दहीं-दूध जमा करूं. टोणगे वगैरे ज्या पशूंचें मांस आपण खातों, तसले पशू मारून सर्वजण मिळून गिरियज्ञ करण्याच्या तयारीला लागूं.

तदनंतर गोधनें संतुष्ट होऊन त्या घोषांत सर्वत्र आनंदी आनंद झाला. तूर्य, प्रणाद इत्यादि मंगलवाद्यांच्या घोषानें व गाई, बैल आणि वांसरें यांच्या हंबरण्यानें सर्व गोपाळांना अत्यंत हर्ष वाटला. त्या घोषांत लौकरच जिकडे तिकडे दह्याचे डोह, त्यांत तुपाचे भोंवरे, व भोंवतीं दुधाचे कालवे, मसालेदार मांसाच्या मोठाल्या राशी आणि भाताचे पर्वतप्राय ढीग नजरेस पडूं लागले. सारांश, गाईसहवर्तमान, सर्व गवळ्यांचा गिरियज्ञ सुरू झाला. त्या यज्ञाचे ठिकाणीं संतुष्ट चित्त अशा गोपाळांची गर्दी झाली असून गौळणींच्या सान्निध्यानें त्या यज्ञाला फारच शोभा आलेली होती. तेथें भक्ष्य पदार्थांच्या राशीच्या राशी पडल्या असून शिवाय नानाप्रकारचे धूप व गंधमाल्यादि पूजासामुग्री यांचीही रेलचेल होती. भाताचीं भांडीं चुलीवर ठेवण्यापर्यंत गिरियज्ञाची सर्व तयारी होतांच, सुमुहूर्त पाहून गौळ्यांनीं ब्राह्मणांसह उद्दिष्ट यज्ञ करण्यास आरंभ केला.

यज्ञ समाप्त झाल्यावर कृष्णानें आपल्या मायेनें पर्वताचें रूप घेऊन यज्ञामध्यें अर्पण केलेलें सर्वोत्कृष्ट अन्न, दूध, दहीं व मांस भक्षण करण्यास सुरुवात केली. यज्ञाकरितां आलेले ब्राह्मणश्रेष्ठहि जेऊन अत्यंत तृप्त झाले. त्यांच्या मनकामना पूर्ण होऊन त्यांच्या अंतःकरणाला परम संतोष झाला व स्वस्तिवाचन करून ते मोठ्या समाधानानें पानावरून उठले. अवभृथस्नान करण्याच्या वेळीं, मी इष्ट अन्न भक्षण करून व आतृप्तिपर्यंत दुग्ध प्राशन करून "अत्यंत तृप्त झालों आहें" असें दिव्यरूपानें कृष्णानें म्हटलें व तत्सूचक मधुर हास्य केलें. नंतर पर्वताएवढें विशाल रूप धारण करून, कृष्ण पर्वताच्या शिखरावर बसलेला गोपांच्या दृष्टीस पडला. त्याच्या गळ्यांत दिव्य पुष्पमाळा असून त्याच्या अंगाला उटी लावलेली होती. पर्वताला वंदन करण्याकरितां निघालेले गोपाळ विशेषेंकरून पर्वताशिखरावर दिसत असलेल्या कृष्णाकडे जाऊं लागले; तेव्हां समर्थ भगवान्

कृष्णानें गोपरूपांत आपलें खरें स्वरूप लीन करून सर्व गोपाळांच्या बरोबर स्वतःसच (पर्वतरूपी) प्रणामपूर्वक वंदन केलें. श्रीकृष्ण गिरिशिखरावर बसला आहे हें अवलोकन करून गोपाळांना अत्यंत आश्चर्य वाटलें व ते पर्वतारूढ भगवंताला उद्देशून म्हणाले, "देवा, आम्ही तुझे दास असून, सर्वस्वीं तुझ्या अधीन आहों. आम्ही पामरांनीं काय करावें तें सांग."

यावर भगवंतानें पर्वताकडून शब्द काढवून गोपांना प्रत्युत्तर दिलें. "गोपहो, गाईंवर जर खरोखर तुमची ममता असेल तर आजपासून तुम्ही नेहमीं माझाच यज्ञ करा. मींच तुमचा मुख्य देव असून तुमच्या मनकामना पूर्ण करतों. तुमचें कल्याण करणाराही मींच. माझ्याच प्रभावानें तुम्हीं सहस्रावधि गाईंचा उपभोग घ्याल. तुम्ही माझे भक्त असल्या-कारणानें मी वनांमध्यें तुमचें कल्याण करीन व स्वर्गांत ज्याप्रमाणें मी रहातों, त्याप्रमाणें येथें तुमच्याबरोबर रममाण होईन. नंदादिक प्रसिद्ध गोपांवर संतुष्ट होऊन मी त्यांना विपुल धन प्राप्त करून देईन. आतां एकदां वांसरांसह सर्व गाईंकडून मला प्रदक्षिणा करवा म्हणजे मला अत्यंत संतोष होईल, यांत संशय नाहीं."

तदनंतर, त्या पर्वताची अर्चा करण्या-करितां सर्व गाई व बैल मिळून कळपा-कळपांनीं त्या गिरिश्रेष्ठाभोंवतीं झपाट्यानें प्रदक्षिणा करूं लागलीं. त्यांच्या शिंगांवर माळा व तुरे लावले होते. मस्तकांवर व पुढच्या पायांवर अशींच उचित भूषणें घालून सर्व गाईबैलांना सजविलेलें होतें. याप्रमाणें आनंदानें, शेंकडों हजारों गाई पर्वताभोंवतीं चालल्या होत्या; त्यांचे मागून, त्यांना हांकीत गुराखी चालले होते; त्यांनीं आपल्या विविध अवयवांना वेगवेगळे रंग लावले होते. तांबडीं, पांढरीं व पिंवळीं अशीं वस्त्रें त्यांनीं परिधान केलीं होतीं. मोराच्या पिसाऱ्याचीं बाहुभूषणें घालून त्यांनीं हातांत (गाईस वळण्याकरितां) काठ्या घेतल्या होत्या; तसेंच आपल्या केंसां-मध्यें त्यांनीं मोराच्या पिसाऱ्यांतील काड्या मोठ्या युक्तीनें खोंवल्या होत्या. अशा प्रकारें ते गोपाल फारच शोभिवंत दिसत होते. त्यांतही कित्येकजण बैलांवर बसले होते; कित्येक नाचत होते; कांहीं अतिशय पळत असलेल्या गाईस आवरीत होते.

याप्रमाणें, तो प्रदक्षिणाविधि पूर्ण झाल्या-वर त्या पर्वताचें कृष्णस्वरूप अंतर्धान पावलें. इकडे कृष्णही सर्व गोपांसहवर्तमान व्रजामध्यें परत आला. गिरियज्ञाचे वेळीं घडलेल्या प्रकारामुळें सर्व आबालवृद्ध गोप फार आश्चर्य-भरित झाले व जो तो मधुसूदनाची स्तुति करूं लागला.

## अध्याय अठरावा.

--:०:--

### गोवर्धनोद्धरण.

वैशंपायन सांगतातः—आपल्या प्रीत्यर्थ होणाऱ्या उत्सवामध्यें विघ्न आलें असें पहा-तांच सुरेश्वर इंद्राला अत्यंत क्रोध आला व त्यानें सांवर्त्तक नांवाच्या मेघसमूहांस आज्ञा केली, कीं "हे मेघश्रेष्ठ हो, माझे मनांत असलेली गोष्ट, राजनिष्ठेच्या भावनेनें, करण्याची तुमची इच्छा असेल, तर मी सांगतों तें ऐका. श्रीकृ-ष्णाची भक्ति करणारे वृंदावनांतील नंदादिक गोप माझ्या उत्सवाच्या विरुद्ध झाले आहेत. यांचा गाईंवरच मुख्यत्वेंकरून निर्वाह चालतो; ह्मणून तुम्ही सात अहोरात्रपर्यंत एकसारखा पाऊस पाडून व सोसाट्याचा वायु उत्पन्न करून यांच्या गाईंना पीडा करा व मी स्वतःही

ऐरावतावर आरूढ होऊन वज्राघातासारखी धो धो वृष्टि करतों आणि प्रलयकालाप्रमाणें सोसाट्याचा वारा निर्माण करून पावसाचा भयंकर वर्षाव करतों. ह्मणजे तुमच्या प्रखर वृष्टीमुळें व वाऱ्याच्या सोसाट्यानें, दे माय धरणी ठाय असें होऊन, सर्व व्रजवासी लोक व गाई पटापट प्राण सोडतील. ”

श्रीकृष्णानें आपली व्यवस्था मोडून टाकली असें पहातांच क्रोधवश झालेल्या देवेंद्रानें सर्व मेघांना वरीलप्रमाणें आज्ञा केली. त्याबरोबर, काळेकुट्ट, भयंकर व पर्वतप्राय मेघ, चोहोंबाजूंनीं आकाशांत जमून मोठमोठ्यानें गडगडूं लागले. क्षणार्धांत त्यांनीं सर्व नभोमंडल व्यापून टाकलें. विजा चमकूं लागल्या. (आकाशांत) इंद्रधनुष्यें दिसूं लागलीं आणि आकाश अंधकारानें गुडुप झालें. कित्येक ढग दुसऱ्यांवर तुटून पडण्यास उद्युक्त झालेल्या हत्तींप्रमाणें नभोमंडळांत चमकत होते, तर कित्येकांची आकृति मकरासारखी होती. कांहीं नागांच्या आकाराचे दिसत होते. याप्रकारचे जलधर वीर आकाशामध्यें ( इंद्राची आज्ञा होतांक्षणींच ) इकडून तिकडे संचार करूं लागले. सर्व ढग एकमेकांशीं संलग्न झाल्यामुळें हत्तींच्या दाट समुदायाप्रमाणें दिसत होते. सर्व नभोमंडल मेघांच्या योगानें व्यापून गेल्यामुळें काळोख पडून अकालीं दुर्दिनाची अवस्था प्राप्त झाली. लौकरच माणसाच्या हाताप्रमाणें, हत्तीच्या सोंडेप्रमाणें व बांबूच्या दांड्याप्रमाणें, पावसाची मोठी मुसळधार कोसळूं लागली. काळेंभोर झालेलें आकाश अगाध, अनंत व दुस्तर दिसत असल्यामुळें, समुद्रानें[1] गगनांत उडी मारली आहे कीं काय असा त्या वेळीं लोकांच्या दृष्टीला क्षणभर भास झाला.

पर्वतासारखे मोठाले मेघ गडगडाट करून आकाशांत थैमान करूं लागल्याकारणानें पक्षी उडेनासे झाले. हरिणांचे पाय चालेनात. प्रलयकालीन मेघांप्रमाणें भयंकर मेघांची प्रचंड वृष्टि झाल्यामुळें लोकांचीं शरीरें विद्रूप झालीं. पावसाच्या धुमश्चक्रीमुळें आकाश अत्यंत निस्तेज झालें. ग्रह व नक्षत्रें हीं अदृश्य झालीं. चंद्रसूर्यांचे किरण आहेत कीं नाहींत याचा संशय पडूं लागला. सारांश, आकाशाची प्रभा पूर्णपणें लोपून गेली. मेघांतून एकसारखी उदकाची वृष्टि चालू झाल्यामुळें पृथ्वी जिकडे तिकडे जलमय दिसूं लागली. मोर मोठमोठ्यानें टाहो फोडूं लागले व पक्षी केविलवाणीने आरडूं लागले. उलटपक्षीं नद्यांना पूर येऊन त्यांच्या तीरावरील वृक्ष उन्मळून पाण्याच्या ओघाबरोबर वाहूं लागले. ढगांच्या गडगडाटानें व पावसाच्या धोधाट्यानें तृणें व झाडें कांपावयास लागलीं. सर्व पृथ्वी एकच जळमय झाल्याचें स्पष्ट दिसत असून “ जगताचा प्रलयकाल समीप आला आहे ” असें भीतीनें गांगरून जाऊन, व्रजवासी लोक आपआपसांत बोलूं लागले. त्या उत्पातसूचक जलवृष्टीमुळें, गाई अत्यंत व्याकुल होऊन दीनवाणीनें हंबरूं लागल्या व जखडून बांधल्याप्रमाणें त्यांच्यानें एक पाऊलही पुढें मागें टाकवेना. त्यांचे पाय व मांड्या हीं ताठून गेलीं. खुरांनीं व तोंडांनीं त्यांना कांहीं करवेना. त्यांच्या अंगावर कांटा उभा राहिला. त्यांचीं शरीरें नखशिखांत भिजून गेलीं आणि त्यांच्या ओटा व आंचळ हीं आंवळून गेलीं. कित्येक गाईनीं दमून जाऊन प्राण सोडले, कित्येक मृतप्राय निचेत पडल्या, कांहीं जलबिंदूंच्या तडाक्यानें व्याकुल होऊन वत्सांसह खालीं बसल्या. कित्येकींनीं आपलीं वांसरें पोटाखालीं घेतलीं. कांहींनीं तोंडें फिरविलीं. त्यांच्या मांड्यांमध्यें जोम राहिला नाहीं व पोटांत कांहीं नसल्यामुळें पोटें खपाटीला गेलीं.

१ ही उत्प्रेक्षा किति बहारीची आहे.

पावसाच्या वर्षावानें त्रस्त होऊन कित्येक गाई अत्यंत विव्हल झाल्या. त्यांचीं शरीरें थरथर कांपूं लागलीं. गाईचीं लहान लहान वासरें वर मान करून कृष्णाकडे पहात होतीं. जणूं काय, त्रस्त झालेल्या आमचें तूं रक्षण कर असें आपल्या दीनवदनांनीं तीं कृष्णाला सांगत होतीं. अकालपर्जन्यामुळें गाईंची दाणादाण झालेली पाहून व सर्व गोपाल देखील मरणोन्मुख पडलेले अवलोकन करून, शेवटीं कृष्णाला अत्यंत कोप आला व प्रक्षुब्ध स्थितींतच विचार केल्यानंतर पुढीलप्रमाणें तो प्रियभाषी कृष्ण आपल्याशींच बोलला:—

" मला या आपत्तीचा नाश करण्याचा उपाय तर सुचला. आतां या दुर्धर पर्वताला त्याच्यावरील रानांवनांसह उपटून त्याच्याखालीं पर्जन्याचा त्रास चुकविण्यासाठीं गाईंना रहातां येईल असें स्थान मी तयार करतों. मीं हा पर्वत वर उचलून धरला म्हणजे पृथ्वीवरील एखाद्या घराप्रमाणें हा व्रजवासी गाईंचें व गोपांचें रक्षण करील आणि पूर्णपणें माझ्या ताब्यांत राहील. "

याप्रमाणें स्वगत विचार करून आपलें बाहुबल दाखविण्याकरितां सत्यपराक्रमी कृष्ण त्या पर्वताजवळ गेला. आणि पर्वताएवढें रूप धारण करून त्यानें आपल्या हातांनीं तो पर्वत उपटला व लटकलेल्या ढगांसह उजव्या हातांत घेऊन वर उचलला. त्याबरोबर तो घराच्या छपराप्रमाणें शोभूं लागला. शिखरांसह त्या पर्वताला कृष्णानें भूमींतून जेव्हां उपटून काढलें तेव्हां त्यावरील शिला शिथिल होऊन हालूं लागल्या व वृक्ष उन्मळून पडले. जेव्हां त्या पर्वताचीं शिखरें गरगर फिरूं लागलीं, वृक्ष कोसळूं लागले व सुळके हलूं लागले, त्या वेळीं तो मूळचा अचल पर्वत एखाद्या पक्ष्याप्रमाणें आकाशांत संचार करतो आहे असा भास होत होता. त्या पर्वताच्या दोन्ही अंगांनीं पाण्याचे प्रवाह चालले होते, त्यांतच एकत्र झालेल्या मेघांतून पडणारें पाणी मिळून गेलें होतें. या पाण्याच्या मारानें, पर्वतावरील दगडांचा चुरा होत होता व पर्वतही एकसारखा डळमळत होता. पर्वतासारख्या अवाढव्य छपराखालीं आश्रय मिळाला असल्यामुळें वर चाललेली मेघांची वृष्टि, वायूचा सोसाटा व पर्वतावरून दगडांचा होत असलेला वर्षाव यांपैकीं कोणतीही गोष्ट व्रजवासी लोकांचे समजण्यांत येत नव्हती. निळे मेघ पर्वतावरील पाणलोटापर्यंत येऊन थडकल्यामुळें तो उन्मत्त मयूरांनीं युक्त पर्वत मेघांत मिसळूनच गेलासा दिसत होता. तेव्हां " अहो! या पर्वताला मेघरूपी पंख फुटून तो आकाशांत पक्ष्याप्रमाणें संचार करीत आहे." अशीं वाक्यें विद्याधर, उरग, गंधर्व व अप्सरा यांच्या मुखावाटे चोंहोंकडून निघूं लागलीं. जमिनीवरून उपटून कृष्णानें तळहातावर घेतलेल्या त्या पर्वतापासून पिंवळ्या, काळ्या, पांढऱ्या धातूंचा वर्षाव होऊं लागला. पावसाची मुसळधार लागल्यामुळें त्या पर्वताचीं कित्येक शिखरें खिळखिळीं झालीं व कांहींचे दोन तुकडे झाले. इंद्रानें क्रोधामुळें सुरू केलेल्या पर्जन्यवृष्टीच्या तडाक्यानें पर्वत गदगदां हालूं लागला, त्याबरोबर त्यावरील वृक्ष देखील डळमळून नानाप्रकारचीं उच्चनीच पुष्पें भूमीवर गळून पडलीं व जिकडे तिकडे फुलेंच फुलें झालीं. मोठमोठ्या फणांचे व मस्तकावर स्वस्तिकचिह्न धारण करणारे नाग खवळून जाऊन आपआपल्या विवरांतून बाहेर पडले व आकाशांत इतस्ततः फिरूं लागले. भयंकर वृष्टीमुळें भिऊन जाऊन पक्ष्यांची तर अत्यंत दीनवाणी स्थिति झाली. ते पुनः पुनः आकाशांत उडी मारीत; परंतु उपाय न चालून धाड-

दिशीं कांहीं वेळानें खालीं पडत. चिडून गेलेले सिंह पाण्यानें ओथंबलेल्या मेघांप्रमाणें मोठमोठ्यानें गर्जना करूं लागले. ताक करीत असतांना डेऱ्यांतून जसा नाद होतो त्याप्रमाणें वाघ ओरडूं लागले. त्या पर्वतावर वृष्टीपूर्वीं जे विषम भाग होते ते पाऊस पडल्यानंतर सम झाले; व आधीं सम होते त्यांवरून जाण्याची आतां सोय उरली नाहीं.

अशा रीतीनें त्या पर्वताचा मूळचा आकार पार बदलून गेल्यामुळें, हा ओळखेनासा होऊन दुसराच एखादा पर्वत असावा अशी शंका येऊं लागली. फार पाऊस पडल्यामुळें त्या पर्वताचें रूप आकाशांत रुद्रानें जखडून ठेवलेल्या त्रिपुरासारखें दिसूं लागलें. कृष्णानें आपल्या हातानें त्या पर्वताला झेलून धरलें असल्यामुळें निळ्या ढगांनीं व्यापलेल्या छत्रीप्रमाणें तो गोवर्धन शोभिवंत दिसत होता. गोवर्धन पर्वताची ही स्थिति पाहून तो पर्वत विवररूपी आपलें विशाल वदन मिटून कृष्णाच्या बाहुरूपी उशीवर निजला आहे व त्यांत त्याला मेघरूपी स्वप्नें पडत आहेत असा भास होत होता. अत्यंत पाऊस पडल्यामुळें त्या पर्वतावरच्या वृक्षांवर पक्ष्यांचा किलबिलाट ऐकूं येईनासा झाला. तसेंच, तेथील वनांत मोरांचा टाहो बंद पडला. त्या कारणानें शिखरांसकट त्या पर्वतावर कोणतेही प्राणी वास्तव्य करीत नाहींत अशी शंका येई. त्याचीं शिखरें अस्ताव्यस्त होऊन गरगर घुमत होतीं, त्यामुळें गोवर्धनाला व त्यावरील अरण्यांना ज्वरच आला आहे असें वाटलें. वाऱ्याच्या सपाट्यानें मेघ त्या पर्वताच्या माथ्यावर आले व महेंद्रानें निकडीची आज्ञा केल्यावरून त्यांनीं त्या पर्वतावर पावसाचा न खळणारा एकसारखा झोत सुरू केला. राजानें पीडा दिल्यामुळें जेथील प्रजाजन विपत्तीच्या भोंवऱ्यांत सांपडला आहे तो जसा दिसतो, त्याप्रमाणें कृष्णाच्या हातावर लोंबकळणारा तो अरण्ययुक्त पर्वत गिरक्या घेतांना दिसत होता. एखाद्या मोठ्या नगराच्या आश्रयानें सभोंवर जशीं लहान लहान गांवें वसतात, त्याप्रमाणें त्या गोवर्धनपर्वताभोंवतीं मेघ लटकून बसले होते.

याप्रमाणें एका हातावर पर्वत तोलून धरून प्रजापतीप्रमाणें गोपाळांचें रक्षण करणारा प्रभु कृष्ण स्मित करून गोपाळांस ह्मणाला "गोपहो, देवांना देखील करतां येणार नाहीं असें हें पर्वताचें घर मीं आपल्या अलौकिक प्रभावानें निर्माण केलें आहे. या ठिकाणीं थंडीवाऱ्याचा उपद्रव न होतां गाईंना सुखानें रहातां येईल. पर्जन्याचा त्रास चुकविण्याकरितां सर्व गाईंचे कळप या गृहांत त्वरित घेऊन चला. ह्मणजे वायूपासून पीडा न होतां या ठिकाणीं त्यांना सुखानें वास करतां येईल. गोधनांची संख्या व सामर्थ्य यांचे मानानें येथें जागेची वांटणी करून घ्या ह्मणजे पावसापासून तुमचें रक्षण झालेंच. गोवर्धन पर्वत उपटून काढून मी येथें पांच कोस लांब व एक कोस रुंद इतकी मोठीथोरली जागा निर्माण केली आहे. येथें तीन्ही लोकांचा देखील समावेश होईल. मग आपल्या व्रजाची कथा काय ?"

कृष्णानें भाषण करतांच, गाई मोठ्यानें हंबरल्या व गोपाळांनींही मोठी आरोळी दिली. इकडे बाहेर मेघगर्जना चालूच होती.

तदनंतर गोपाळांनीं गाईंचे कळप करून एकामागून एक सर्व गाई त्या पर्वताच्या विशाल गुहेमध्यें नेऊन घातल्या. कृष्ण मात्र पर्वताच्या मुळाशींच उभा होता व त्यानें आपला एक हात प्रिय असलेल्या अतिथीसारख्या त्या पर्वताला दिला होता. [ (ह्मणजे) एका हातानें पर्वत उचलून धरला होता. ] पावसाला भ्यालेल्या गोपांनीं जलदीजलदीनें त्या पर्वताच्या छपरा-

खालीं निर्मिलेल्या घरांत, आपलीं गाड्या, भांडीकुडीं, वगैरे चटसारें वाहून नेलें.

तदनंतर, देवांनाही अशक्य अशी कृष्णाची ही कृति अवलोकन करून, आपली प्रतिज्ञा विफल झाली व याच्यापुढें आपलें कांहीं चालावयाचें नाहीं अशी वज्रायुध इंद्राची खात्री झाली आणि त्यानें लागलीच वृष्टि बंद करण्याविषयीं मेघांना आज्ञा दिली. सात अहोरात्रपर्यंत पृथ्वीवर भयंकर वृष्टि करूनही आपलें कांहीं चालत नाहीं असें पाहून ज्याचा उत्सव बंद झाला आहे अशा वृत्रारि इंद्रानें मेघांसह स्वर्गलोकीं गमन केलें.

याप्रमाणें सात दिवस झाल्यानंतर इंद्राचा निरुपाय झाला; आभाळ नाहींसें होऊन आकाश स्वच्छ झालें आणि भगवान् सूर्य आपल्या प्रखर तेजानें नभोमंडळांत चमकूं लागला. तेव्हां पुनः आल्या मार्गानें गाई व गोप हीं आपल्या नेहमींच्या राहण्याच्या ठिकाणीं परत गेलीं व वरदात्या प्रभु गोपालकृष्णानेंही संतुष्ट होऊन त्या अचल पर्वताची पुनः जागच्याजागीं लोकांच्या कल्याणासाठीं स्थापना केली.

## अध्याय एकोणिसावा.

—:०:—

### गोविंदाभिषेक.

वैशंपायन सांगतातः—गोवर्धन पर्वत उचलून धरून कृष्णानें गोकुळाचें संरक्षण केलें असें पाहून इंद्राला फार विस्मय वाटला व श्रीकृष्णाचें दर्शन घेण्याची त्याला फार इच्छा उत्पन्न झाली. लागलीच ऐरावतावर आरोहण करून तो भूलोकीं आला. त्या ऐरावताचा आकार जलशून्य मेघासारखा असून मदाच्या स्रावानें त्याचें सर्व शरीर भिजून गेलें होतें. पृथ्वीवर उतरतांच, अलौकिक कृत्यें करणारा कृष्ण गोवर्धन पर्वतावरील एका शिळेवर बसलेला आहे असें पुरुहूत पुरंदर जो इंद्र त्याच्या दृष्टीस पडलें. ते समयीं तो बालक अत्यंत तेजःपुंज दिसत होता. अव्यय विष्णूनें घेतलेलें तें गोपाळाचें रूप पाहून इंद्राला फार संतोष वाटला. श्रीवत्स लक्षणानें युक्त असलेल्या कृष्णाचें दर्शन झाल्याकारणानें इंद्राच्या नेत्रांचें साफल्य झालें. कमलाच्या पाकळीसारख्या श्यामसुंदर कृष्णाकडे त्यानें आपल्या सहस्र नेत्रांनीं सारखी टक लावली. कृष्णाचें रूप अत्यंत सुंदर असून भूलोकावर हा कोणी देवच आला आहे असें वाटे. अशा प्रकारच्या कृष्णाला सुंदर शिलातलावर बसलेला पाहून इंद्र अत्यंत लज्जित झाला. पक्षिराज सर्पारि गरुडानें प्रकट न होतां आपल्या पंखांनीं त्या शिलातलावर बसलेल्या कृष्णाच्या मुखावर सावली धरली होती. अशा वेळीं, इंद्र ऐरावतावरून खालीं उतरून वनामध्यें एकांतीं बसलेल्या आणि लौकिक व्यवहार करण्यांत दक्ष असलेल्या कृष्णाजवळ आला. सुरपति इंद्रानें अंगाला गंध चर्चिलें असून गळ्यांत दिव्य माळा धारण केल्या होत्या व हातांत वज्र घेतलें होतें. इंद्र प्रभु कृष्णाजवळ जाऊन उभा राहिला त्या वेळीं तर तो फारच शोभिवंत दिसूं लागला. मस्तकावरील सूर्यासारखा तेजस्वी व विजेप्रमाणें लकाकणारा किरीट आणि कानांतील दिव्य कुंडलें यांचे योगानें त्याच्या मुखाला अत्यंत रमणीयता आली होती. पाचगुच्छांच्या हारानें त्याचें वक्षःस्थळ सुशोभित झालें होतें; तसेंच, त्याला सहस्रपत्र कमलाप्रमाणें सुंदर व देहाला भूषविणारे असे इच्छित आकार घेणारे हजार डोळे होते. ज्या मेघगर्जनेप्रमाणें मधुर वाणीनें तो देवेंद्र देवांना आज्ञा करी, त्याच दिव्य स्वरानें त्यानें कृष्णाला उद्देशून म्हटलें, "कृष्णा, बा महाबाहो कृष्णा, गाईवरील ममतेमुळें व ज्ञाति-

बांधवांना सुखविण्याच्या इच्छेनें तूं अलौकिक कृत्य केलेंस, यांत शंका नाहीं. प्रलयकाळच्या सारखा मुसळधार पाऊस मीं सुरू केला असतांना तूं गाईंचें रक्षण केलेंस यामुळें मी अत्यंत संतुष्ट झालों आहें. आपल्या अंगच्या प्रभावानें तूं हा गोवर्धन पर्वत अंतरिक्षांत घराच्या छपराप्रमाणें उचलून धरलास, हें पाहून कोणाला बरें विस्मय वाटणार नाहीं? माझ्या प्रीत्यर्थ होणारा उत्सव तूं बंद पाडल्यामुळें रागावून जाऊन मीं सात दिवसपर्यंत, हे कृष्णा, भयंकर वृष्टि केली. परंतु माझ्यादेखत माझ्या अनिवार्य पर्जन्यवृष्टीचें तूं उलट निवारण केलेंस. खरोखर मी केलेल्या वृष्टीचें निवारण करण्याची देवदैत्यांचीही छाती नव्हती. खरोखर कृष्णा, तूं मानुष देहानें अवतार घेतला आहेस, हें मला फार आवडलें. व्रजासाठीं तुला राग आला असतांही तूं आपली सर्व शक्ति प्रकट केली नाहींस ही गोष्ट तुझा मोठेपणा व्यक्त करीत आहे. ज्या अर्थीं तूं आपलें सामर्थ्य बरोबर घेऊन मनुष्यरूप स्वीकारलें आहेस, त्या अर्थीं तुला देवांचें कांहीं तरी कायमचें कार्य साधावयाचें आहे असें मला वाटतें. तूं देवांचा नेता व सर्व कामांतील अग्रणी आहेस. तुझ्या कार्यांत तुला पूर्ण यश येईल. कांहींएक न्यून पडणार नाहीं. त्रैलोक्याची चिंता वाहणारा तूंच एक सनानत आहेस. तुझ्याशिवाय त्यांचा पुढाकार घेईल असा मला तर कोणी दिसत नाहीं. हे गरुडवाहना, ज्याप्रमाणें, धष्टपुष्ट बैल सर्वांत पुढच्या गाड्याला जोडीत असतात, त्याप्रमाणें संकटांत बुडालेल्या देवांचें रक्षण करण्यासाठीं तुलाच सर्व लोक पुढें करतात. बा कृष्णा, अन्य धातूंपासून जशी सोन्याची उत्पत्ति आहे, तद्वत् तुझ्या शरीरापासून सर्व जगत् निर्माण झालें आहे असें जें ब्रह्मदेवाचें म्हणणें आहे तें खरें आहे. ज्याप्रमाणें पंगु मनुष्याच्यानें जलद पळणाऱ्या माणसाची पाठ झिपटावयची नाहीं त्याप्रमाणें स्वतःब्रह्मदेवाला देखील बुद्धीनें किंवा वयानें तुझी बरोबरी करितां यावयाची नाहीं. जसा स्थावरामध्यें-पर्वतांमध्यें हिमालय श्रेष्ठ आहे, किंवा जलाशयांत सागर श्रेष्ठ आहे अथवा गरुड सर्व पक्ष्यांत वरिष्ठ आहे, तसा तूं सर्व देवांमध्यें अत्यंत थोर आहेस. जलाच्या खालीं पाताल लोक आहे. त्यावर पर्वत आहेत. पर्वतांवर पृथ्वी असून तिच्यावर माणसें रहातात. त्यांच्याही पुढें अंतरिक्षांत पक्ष्यांची गति चालते. त्यांच्याही टप्याच्या पलीकडे सूर्य असून त्यालाच स्वर्गद्वार म्हणतात. सूर्यलोकापलीकडे देवलोक असून तेथें फक्त विमानांत बसून जातां येतें. त्याच देवलोकांत, हे कृष्णा, इंद्रपदावर माझी योजना झालेली आहे. माझ्या स्वर्गलोकाच्या पुढें ब्रह्मलोक असून तेथें ब्रह्मर्षींचा समुदाय रहातो. त्या प्रदेशांत, चंद्र व तारका यांचा प्रवेश होतो. त्यानंतर गोलोकाची शींव लागते. साध्य त्या ठिकाणाचें संरक्षण करतात. तो लोक महाकाशांत पसरलेला आहे. बा कृष्णा, या सर्व लोकांच्या पलीकडे दूरवर, तुझ्या तपोमय सामर्थ्याचा अंमल चालतो. परंतु त्या विषयीं आम्हांला मात्र मुळींच माहिती नाहीं. ब्रह्मदेवाला याविषयीं आम्हीं विचारलें त्यावरून त्याला देखील कांहीं ठाऊक असेल असें दिसत नाहीं.

सर्वांच्या खालीं भयंकर नागलोक असून, अत्यंत पापी लोकांना तेथें जावें लागतें. कर्मशील मनुष्यांची वसती पृथ्वीवर असते व म्हणूनच तिला कर्मभूमि अशी संज्ञा आहे. वायूप्रमाणें चंचल वृत्तीचे लोकांना आकाशांत संचार करावा लागतो आणि शमदमादि गुणांनीं युक्त असलेल्या सज्जन माणसांना स्वर्ग

प्राप्त होतो. तपाचरण करणारांना ब्रह्मलोक मिळतो आणि गाईच्या भक्तांना गोलोकामध्यें ठाव लाभतो. गोलोक दुसऱ्या कोणालाहि मिळत नाहीं.

हे पराक्रमी कृष्णा, तोच गोलोक सांप्रत तूं पृथ्वीवर आणलेला असून गाईंना अतिवृष्टीचा मजकडून उपद्रव झाला असतां, त्यापासून तूं त्यांचें रक्षण केलेंस. महाभागा, ब्रह्मदेव व गाई यांच्या आज्ञेनें व तुझ्याविषयींच्या आदरानें प्रेरित होऊन मी येथें आलों आहें.

कृष्णा, मी सर्व भूतांचा व देवांचा स्वामी इंद्र आहें. अदितीच्या पोटीं प्रथम मी जन्मास आलों. प्रभो, पर्जन्यवृष्टि करून मीं आपलें सामर्थ्य तुझ्या समोर दाखविलें त्याबद्दल मला कृपेनें क्षमा कर. माझें तेज मला तुजपासूनच मिळालेलें आहे. शांतस्वरूप धारण करून मन स्थिर कर, आणि हे गजविक्रमा, ब्रह्मदेव व गाई यांचा निरोप मी तुला सांगतों, तो ऐक. भगवान् ब्रह्मदेव व आकाशसंचारी गाई यांनीं तुला उद्देशून मला असें सांगितलें आहे कीं, "देवा, अलौकिक रीतीनें तूं आमचें रक्षण केलेंस यामुळें आम्ही अत्यंत संतुष्ट झालों आहों. गाई व हा अखिल गोलोक यांचें तूं संरक्षण केलेंस, त्यामुळें वत्सांची वृद्धि होऊन वृषभांसहवर्तमान आम्ही आतां सुखानें नांदत आहों. आम्हांला वाटेल तिकडे संचार करतां येतो. वृषभांच्या योगानें आम्ही शेतकऱ्यांची मनकामना तृप्त करूं. यज्ञामध्यें अर्पण होणाऱ्या पवित्र हवीच्या द्वारा देवांना संतुष्ट करूं आणि गोमयानें लक्ष्मीदेवीला आनंदवूं. तूं आपल्या अतुल सामर्थ्यानें आमचे प्राण वांचविले आहेस. यास्तव तूंच आमचा गुरु आहेस. हे प्रभो, आजपासून तूं आमचा राजा व इंद्र हो. हे सुवर्णकलश मीं आपल्या हातानें मंदाकिनीच्या दिव्य जलानें भरून आणले आहेत; त्यांचे योगानें तूं आपल्याला अभिषेक करून घे. मी देवांचा इंद्र आहें व तुला गोलोकाच्या इंद्रपदाची प्राप्ति झाली आहे, यापुढें, भूलोकीं लोक तुझी 'गोविंद' या नांवानें नेहमीं स्तुति करतील. तसेंच ज्यापेक्षां गाईनीं तुला मजहून श्रेष्ठ अशा इंद्रपदावर नियुक्त केलें आहे, त्यापेक्षां स्वर्गीय देवता तुझें उपेंद्र या अभिधानानें गायन करितील. एकंदर पावसाळ्याचे असे माझे चार महिने आहेत, त्यांतील शेवटचे शरदृतूचे दोन महिने मी तुला अर्पण करतों. इतउत्तर वर्षाकालाचे पहिले दोनच महिने माझे असें लोक मानूं लागतील. अर्धा पावसाळा झाल्यानंतर माझी कालमर्यादा व पूजा समाप्त करून तुझी पूजा लोक करूं लागतील. त्या वेळीं माझ्या भागांतील पावसामुळें उत्पन्न झालेला मोरांचा मद नाहींसा होईल. माझ्या दुमाही कारकीर्दींत संचार करणारे व पावसाळा सुरू होतांच शब्द करूं लागणारे जे कोणी इतर प्राणी असतील, त्यांचीही वाचा बंद पडून त्यांचा मदोन्मत्तपणा कमी होईल व ते शांतिसुखाचा अनुभव घेतील. [ त्रिशंकु व अगस्त्य हे तारे उगवतात त्या दिशेनें ( दक्षिण ) ] भगवान् सहस्ररश्मि सूर्य आपल्या तेजानें चमकूं लागेल. शरदृतु लागण्याचा काल प्राप्त झाला म्हणजे मोर मदरहित होऊन मौन स्वीकारतील व पक्षिगण हे उदकाची मार्गप्रतीक्षा करूं लागतील. नद्यांचे पूर ओसरल्यामुळें नावांची गरज उरणार नाहीं; नद्यांच्या पुलिनांवर हंस व सारस इत्यादि पक्ष्यांची गर्दी दिसूं लागेल; मत्त क्रौंचपक्ष्यांचा प्रणाद सुरू होईल; वृषभांना मस्ती येईल; गाईचीं मनें उल्हसित होऊन त्या पुष्कळ दूध देऊं लागतील; जगतांतील शोषून घेतलेलें जल पुनरपि जगताला पावसाच्या रूपानें परत दिल्यानंतर मेघ नाहींसे होतील;

आकाश शस्त्रधारेसारखें निर्मल होऊन त्यांत हंसांचा संचार सुरू होईल; सरोवरें, विहिरी इत्यादि जलाशयांमध्यें कमलेंच कमलें फुललेलीं दृष्टीस पडतील; तडागांना विशेष शोभा प्राप्त होईल; जल निर्मल दिसूं लागेल; कृष्णवर्ण शेतांमध्यें धान्यें पिकून कणसांमुळें खालीं वांकलेलीं दृष्टीस पडतील; पावसाचा जोर कमी झाल्यामुळें नद्या आपल्या मर्यादेनें मधोमध वाहतांना दिसूं लागतील; जिकडे तिकडे सुंदर सुंदर धान्येंच धान्यें लागून गेल्यामुळें ऋषींना देखील संतोष वाटेल. याप्रमाणें वर्षाकाल संपण्याचे वेळीं पृथ्वीवरील सर्व विस्तीर्ण राष्ट्रांना मोठी रमणीयता प्राप्त होऊन, रस्त्यानें जातांना अत्यंत मनोहर शोभा जाणारांचे नेत्रांना सुख देईल; तृणांना फळें येण्याचा बहर प्राप्त होऊन, जिकडेतिकडे ऊंसच ऊंस दिसूं लागतील; तसेंच, लोक यज्ञ करण्यास प्रवृत्त होऊन तुझी शयनोत्तर जागृत होण्याची वेळ झाली म्हणजे पुण्यकारक शरत्काल सुरू होईल.

हे कृष्णा, ध्वजाकार यष्टी उभ्या करून स्वर्गलोकींप्रमाणें या भूलोकांतही अखिल लोक तुझें व माझें महेंद्र व उपेंद्र या नांवांनीं पूजन करतील. जे जन आपल्या उभयतांच्या शाश्वत कृतीला मान देऊन आपलें महेंद्र व उपेंद्र या नांवानें स्तवन करतील, त्यांना कोणतेंही संकट प्राप्त होणार नाहीं.

इतकें ह्मणून, इंद्रानें दिव्य उदकानें भरलेले घट योगवेत्त्या श्रीकृष्णाचे शरीरावर ओतून त्याला अभिषेक केला. इंद्रानें गोविंदाला अभिषेक घातलेला पाहून स्वर्गांतील गाईंनीं देखील आपल्या गोपालांसहवर्तमान आचळांतून गळणाऱ्या दुग्धानें अव्यय कृष्णाला स्नान घातलें. लागलींच आकाशांतील मेघांनींही त्या अव्यय परमात्म्याला आपल्या अमृतयुक्त पावसाच्या वृष्टीनें अभिषेक करून सर्व पृथ्वी भिजवून टाकली. तत्क्षणीं सर्व प्रकारच्या वनस्पतींपासून चंद्राप्रमाणें अमृत जलाचा स्राव होऊं लागला. देव पुष्पवृष्टि करूं लागले. नभोमंडळांत तूर्यादिक वाद्यें वाजूं लागलीं. मंत्रपरायण मुनि आपल्या पवित्र वाणीनें त्याचें स्तोत्र गाऊं लागले. फार काय सांगावें, पृथ्वीला क्षीरसागराचें रूप प्राप्त झालें. सागर प्रसन्न होऊन जगताला संतोष देणारे वायू वाहूं लागले; नित्याप्रमाणेंच मार्गक्रमण करीत असलेला सूर्य या वेळीं विशेष शोभूं लागला. चंद्रहि आपल्या नक्षत्रांसह विशेष चमकूं लागला. अतिवृष्टि इत्यादिक उत्पात बंद पडून राजे लोकांना कोणाचीही भीति राहिली नाहीं. ते निष्कंटकपणानें राज्य करूं लागले. वृक्षांना पालवी फुटून फुलांचा बहर येण्याची सुरवात झाली. हत्तींच्या गंडस्थळांतून मद गळूं लागला. वनामध्यें हरिण अत्यंत संतुष्ट झाले. पर्वतांचे पृष्ठभाग वृक्षदिकांनीं अलंकृत होऊन शिवाय धातू चमकूं लागल्यामुळें त्यांना अवर्णनीय शोभा आली. सारांश, जिकडे तिकडे अमृतरसाची वृष्टीच वृष्टि झाल्यामुळें,या लोकाला देवलोकाची रमणीयता प्राप्त झाली. स्वर्गांतून अमृताचा वर्षाव होऊन, याप्रमाणें कृष्णाचा अभिषेकसमारंभ संपूर्ण झाला.

गाईंचा अभिषेक पुरा झाल्यावर दिव्यमाल्यांबरधारी अव्यय देवाधिदेवाला उद्देशून इंद्रानें पुढीलप्रमाणें भाषण केलें. " बा कृष्णा, तुला सांगण्याकरितां गाईंनीं जो निरोप मला सांगितला होता, तो मीं तुला सांगितला. आतां माझ्या आगमनाचा दुसरा हेतु तुला सांगतों, ऐक. कंस, तुरगाधम केशी व मदोन्मत्त झालेला अरिष्ट या त्रिवर्ग राक्षसांचें तूं त्वरित निर्दळण कर; नंतर राज्यसुखाचा अनुभव घे. तुझ्या आतेच्या पोटीं मी अवतार घेतला आहे. त्या माझ्या अंशाचें रक्षण करणें तुज-

कडेसच आहे. त्याचा सन्मान करून तूं त्याच्यावर मित्रासारखा लोभ ठेव. तुझा त्याजवर अनुग्रह झाला म्हणजे तुझ्या सांगण्याप्रमाणें वागून तो तुझ्या आज्ञेंत राहील. मग मोठाले पराक्रम करून तुझ्या कृपेनें त्याची दिगंत कीर्ति होईल. सगळ्या भरतवंशांत तो अत्यंत श्रेष्ठ असा धनुर्धर होईल. तुला साजेल असेंच त्याचें वर्तन राहील. तुजवांचून मात्र त्याला करमणार नाहीं. भारतीय युद्ध तुम्हां दोघां पुरुषश्रेष्ठांवर अवलंबून असल्याकारणानें, तुम्हां दोघांचा संगम होतांच सर्व राजे मरण पावतील. हे कृष्णा, ऋषि व देव यांचे समोर मीं अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, कुंतीचे पोटीं माझ्यापासून अर्जुन नामक जो पुत्र जन्मास आला आहे तो मोठा कुलदीपक होईल. अस्त्रविद्येमध्यें व धनुर्विद्येमध्यें मोठें नैपुण्य संपादन करून, सर्व शस्त्रधर राजांना तो मागें सारील. रणामध्यें संग्रामशील शूर राजांच्या अक्षौहिणींच्या अक्षौहिणी, तो एकटा यमसदनास पाठवील. हे प्रभो, तुजवांचून त्याच्या अस्त्रचातुर्याचें व धनुर्विद्येचें अनुकरण करील असा कोणीही राजा मला या पृथ्वीतलावर दिसत नाहीं. रणांगणामध्यें तो तुझें बंधुत्व व सहायत्व करील. हे गोविंदा, माझ्यासाठीं तूं त्याला अध्यात्मविद्येचें[1] ज्ञान करून दे. सर्व विश्वाला व अर्जुनाला तूं यथार्थत्वानें ओळखीत आहेस. जसा तूं मला मानतोस, तसाच अर्जुनालाही मान. नेहमीं मोठमोठ्या लढायांमध्यें तूं त्याचें संरक्षण कर. तुझें संरक्षणछत्र त्याच्यावर असलें म्हणजे मृत्यूचें त्याच्यावर कांहीं चालावयाचें नाहीं. बा कृष्णा, अर्जुन म्हणजे मींच आहें असें समज. मी म्हणजे अर्थात् तुझ्याहून अन्य कोणी नाहीं याची तुला ओळख आहेच. मी ज्याप्रमाणें तुझ्या आत्म्याचेच ठिकाणीं आहें, त्याप्रमाणेंच अर्जुनही आहे. पूर्वीं वामनरूपानें त्रिपाद् भूमि मागून व नंतर तीन पावलांनीं सर्व विश्व आक्रमून या सर्व लोकांना तूं बळीच्या कचाट्यांतून सोडविलेंस, त्याच वेळीं ज्येष्ठ बंधू म्हणून तूं माझी देवांचे राज्यपदावर स्थापना केली आहेस. तूं सत्यमय आहेस. सत्य हेंच तुला इष्ट असून सत्य हाच तुझा पराक्रम होय. सत्यानेंच तुला प्रसन्न करून घेऊन देव हे तुजकडून शत्रूंचा नाश करवितात. अर्जुन नामक माझा पुत्र म्हणजे तुझ्या पित्याच्या भगिनीचा पुत्र होय. पूर्वीं तो तुझा सखा होतांच[1], तसाच या अवतारामध्यें त्याला तुझ्या सख्याची प्राप्ति होवो असें मी इच्छितों. हे कृष्णा, जसा वृषभ गाड्याच्या धुरेचा भार वहातो, तसा तूं रणांगणामध्यें, घरीं, दारीं, सर्व ठिकाणीं त्याची नेहमीं काळजी वहा. प्रभो, तुला सर्व भविष्य कळतच आहे. कंसाला तूं मारल्यानंतर राजेलोकांमध्यें मोठें भारतीय युद्ध होईल. अलौकिक सामर्थ्याच्या नरवीरांच्या या युद्धांत अर्जुनाला विजयश्री माळ घालील आणि तुझी अजरामर कीर्ति होईल. हे अच्युता, मी, देव व सत्य इत्यादिकांचा जर तूं खरा वाली असशील तर मीं सांगितल्याप्रमाणें सर्व तुला केलें पाहिजे."

'गोविंद' पदाची प्राप्ति झालेल्या कृष्णाला इंद्राचें भाषण श्रवण करून मोठा संतोष झाला व त्यानें प्रत्युत्तर केलें. "शचीपते, तुझ्या दर्शनानें मी संतुष्ट झालों आहें. तूं एवढा वेळपर्यंत जें जें सांगितलेंस त्यांत किमपिही न्यून पडणार नाहीं. तुझा आशय माझे ध्यानांत आला आहे; तूं अर्जुनरूपानें अवतार घेत-

---

१ अर्जुनाला गीता सांगण्याविषयीं इंद्राचीच विनंति होती असें दिसतें. प्रक्षिप्तवादी यांनीं या गोष्टीचा विचार करावा.

१ नरनारायण रूपानें.

त्याचें मला समजलें आहे; महात्म्या पंडूला दिलेली, माझ्या पित्याची भगिनी मला ठाऊक आहे; तसेंच यमधर्मापासून उत्पन्न झालेल्या कुमार धर्मराजाला पण मीं जाणतों; वायूचा पुत्र भीमसेन मला ठाऊक आहे. अश्विनीकुमारांपासून माद्रीच्या पोटीं जन्मास आलेल्या नकुलसहदेवांनाही मीं चांगलें ओळखतों. एवढेंच नव्हे, तर सूर्यापासून कौमार्यावस्थेंत कुंतीला झालेल्या कर्णाची देखील मला माहिती असून तो सांप्रत सूताच्या घरीं वाढत आहे, हें पण मला समजलें आहे. युद्धासाठीं हपापलेल्या सगळ्या धृतराष्ट्रपुत्रांना मीं ओळखतों. शापरूपी अशनिपातामुळें पंडूला कसें मरण आलें हाही वृत्तांत मला विदित आहे. हे इंद्रा, देवांच्या कल्याणाकरितां तूं सुखानें स्वर्गलोकीं परत जा; मी असतांना अर्जुनाला हात लावण्याची कोणत्याही शत्रूची प्राज्ञा नाहीं. भारतीय युद्ध संपूर्ण झाल्यावर अर्जुनाकरितां सर्व पांडव मी कुंतीच्या स्वाधीन करीन. युद्धामध्यें त्यांच्या केंसालाही धक्का लागूं देणार नाहीं. हे शक्रा, तुझा पुत्र अर्जुन जें जें मला सांगेल तें तें सर्व तुझ्याविषयींच्या प्रेमानें बद्ध झाल्यामुळें चाकराप्रमाणें मी ऐकेन". सत्यभाषी साक्षात् श्रीकृष्णाचें संतोषवृत्तीचें हें मधुर भाषण श्रवण केल्यानंतर, अमरनाथ स्वर्ग लोकीं निघून गेला.

## अध्याय विसावा.

—:०:—

### रासक्रीडा.

वैशंपायन सांगतातः—इंद्र स्वस्थानीं गेल्यानंतर व्रजवासी लोकांना पूज्य झालेला गोवर्धनोद्धारक सुंदर कृष्ण व्रजामध्यें परत आला. तेव्हां व्रजांत राहणारे त्याच्या जातीचे लोक व विशेषतः वृद्ध लोक अभिनंदनपूर्वक त्याला म्हणूं लागले, "देवा, धन्य आहों आम्हीं कीं, ज्या आम्हांला तुझ्यासारख्या जगद्गुरूच्या शिकवणीचा ( बोधामृताचा ) व अद्भुत करणीचा लाभ झाला आहे. केवळ तुझ्या कृपाप्रसादानें[1] पावसाच्या अरिष्टापासून गाईंचें व आमचें रक्षण झालें. खरोखर, देवासारखा तूं पराक्रमी आहेस. गोपते, तुझीं एक एक अद्भुत कृत्यें आम्हीं प्रत्यक्ष पाहिलीं आहेत. हा गोवर्धन पर्वत तूं उचलून धरलास तेव्हांपासून तर आम्ही तुला प्रत्यक्ष देवच समजतों आहों. हे महासमर्थ देवा, तूं रुद्र, मरुद्गण किंवा वसू यांच्यापैकीं कोणी आहेस काय? वसुदेवाच्या पोटीं तूं कां जन्म घेतला आहेस? जरी तुझें जन्म आम्हां पामर लोकांत झालें आहे, तरी तुझी बाळलीला, तुझें सामर्थ्य व तुझी अलौकिक कृति पाहून आमच्या अंतःकरणाला शंका उत्पन्न होत आहे. गुराख्याच्या वेषानें तूं आमच्या बरोबर गौणप्रकारचे खेळ खेळतोस याचा अर्थ काय? तुझा पराक्रम लोकपालासारखा असतांना येथें गाई राखीत बसण्यांत तुझा काय हेतु आहे? तूं देव, दानव, यक्ष किंवा गंधर्व यांच्यापैकीं कोण आहेस? तूं कोणीही अस; परंतु ज्याअर्थी तूं आमचा बांधव झाला आहेस, त्यापक्षीं तुला आमचा नमस्कार असो. कोणत्याही विशिष्ट कार्याकरितां तूं येथें यदृच्छेनें रहात असलास तरी आम्ही तुझे अनुयायी तुला शरण आहों."

वैशंपायन पुढें सांगतातः—कमललोचन कृष्णानें गोपाळांचें वरील भाषण ऐकून घेतल्यानंतर किंचित् स्मित करून, भोंवतीं गोळा झालेल्या आपल्या ज्ञातिबंधूंना उद्देशून पुढीलप्रमाणें प्रत्युत्तर केलें. "गोपहो, तुम्ही मला

[1] येथें 'नगेनच' ह्मणजे 'गोवर्धनानें' असाहि एक पाठ आहे.



तरुण गोपकन्या जमवून तो समयज्ञ कृष्ण त्यांचे बरोबर आनंदानें खेळूं लागला.
( विष्णुपर्व अ० २० पृष्ठ २२९. )

मोठा पराक्रमी समजत आहां, परंतु तशी तुमची कल्पना होऊं देऊं नका. मी आपला तुमच्या जातीचा एक साधा मनुष्य आहें. जर तुम्हांला मी कोण, काय, वगैरे समजून घ्यावयाचेंच असेल तर कांहीं वेळ धीर धरा, म्हणजे तुम्हांला खरें स्वरूप कळून येईल. किंबहुना माझें स्वरूप तुमचे दृष्टीस देखील पडेल. मी तुम्हांला देवासारखा पराक्रमी व स्तुत्य वाटतों आहें यापेक्षां अधिक कळून तुम्हांला काय करावयाचें आहे? जर मजवर तुमचा लोभ असेल तर आणखी मजविषयीं चौकशी करूं नका."

वसुदेवाच्या मुलाचें भाषण कानीं पडतांच, तोंडें झांकून सर्व व्रजवासी लोक मुकाट्यानें आपआपल्या वाटेनें निघून गेले.

शरदृतूंतील एका सुंदरशा चांदण्या रात्रीं सृष्टीची मनोहर शोभा अवलोकन करून कृष्णाचे मनांत खेळण्याची इच्छा उत्पन्न झाली. तेव्हां त्या पराक्रमी बालकानें वाळलेलें गवत व शेण यांनीं भरून गेलेल्या व्रजांतील रस्त्यांमध्यें बलाच्या गर्वानें चढून गेलेल्या वृषभांच्या झुंजा लावल्या. तसेंच सुदृढ गोपाळांकडून कुस्त्या करविल्या. त्या अरण्यांत कृष्णवीर गाई व बैल यांना एखाद्या सुसरीप्रमाणें बळकट पकडी. उपनयनापूर्वीं वाटेल तसें वागलें तरी शास्त्राची परवानगी आहे, म्हणून तरुण गोपकन्या जमवून तो समयज्ञ कृष्ण त्यांचे बरोबर आनंदानें खेळूं लागला. रात्रींच्या प्रहरीं कृष्णाचें मनोहर मुख पाहून हा चंद्रच पृथ्वीवर आला आहे असें त्यांना वाटेल; व त्याच्या वदनचंद्राकडे आपले नेत्रकटाक्ष एकसारखे फेंकून आकाशस्थ चंद्रासारखें तें त्याचें सौंदर्य नेत्रांनीं पीत. ओल्या हरताळीप्रमाणें पिवळें व सुंदर रेशमी वस्त्र त्यानें परिधान केलें असल्यामुळें त्याचें सौंदर्य अधिकच खुलत होतें. त्यानें हातांत बाहुभूषणें घातलीं असून गळ्यांत रंगी-बेरंगी वनपुष्पांची माळ घातली होती, त्यामुळें व्रजाला भूषणीभूत झालेला तो कृष्ण गोपकन्यांसह क्रीडत असतां मोठी मौज दिसत होती. घोषांतील त्या तेजस्वी कृष्णाची अद्भुत लीला पाहून गोपकन्यांनीं त्याला दामोदर असें नांव ठेविलें होतें. त्याच नांवानें त्या त्याला हांका मारूं लागल्या. त्या सुंदर स्त्रिया आपल्या चंचल नेत्रयुक्त वदनांनीं त्याच्याकडे पहात पहात त्याला आपल्या उत्तुंग वक्षःस्थलाशीं धरून दृढ आलिंगन देऊं लागल्या. त्या गोपस्त्रियांचे पति, बंधू व माता हीं त्यांना प्रतिबंध करीत, तरी त्या कृष्णाशीं रममाण होण्यास उत्सुक झालेल्या असल्यामुळें रात्रीं कृष्णाला शोधून काढीत व त्याचे भोंवतीं जोडीजोडीनें कधीं मंडलाकार आणि कधीं सरळ उभें राहून, त्याच्या मनोरम चरित्राचीं गाणीं म्हणत व आपली करमणूक करून घेत. कृष्णावर अचल दृष्टि ठेवून कृष्ण ज्या लीला करी, त्या त्या लीला, त्या तरुण गोपस्त्रियाही करीत. तो जसें पाऊन टाकील तसें त्या टाकीत. दुसऱ्या कांहीं गोपपत्न्या हातांनीं ताल धरून कृष्णाचें चरित्र स्वतः करून दाखवीत होत्या. तसेंच, कृष्णाचें नृत्य, गीत, विलास, स्मित व वीक्षित इत्यादिकांचें अनुकरण करीत त्या व्रजयोषिता यथेच्छ क्रीडा करीत होत्या. कृष्णावरील प्रेमातिशय प्रकट करणारीं मधुर गाणीं म्हणून दामोदरपरायण झालेल्या गोपी व्रजामध्यें कृष्णाबरोबर सुखानें रममाण होत. धुळीनें भरलेल्या हत्तीणी एखाद्या मत्त हत्तीला वेढून त्याचेसह जशा रममाण होतात, त्याप्रमाणें गोमयाच्या कणांनीं युक्त असलेल्या शरीराच्या गोपललना कृष्णाला मध्यें घेऊन त्याचे बरोबर क्रीडा करीत. कित्येक हरिणाक्षी, गोपांगनांनीं स्मितहास्य करून प्रेमसूचक प्रफुल्ल नेत्रांनीं

कृष्णाकडे सारखी टक लाविली होती.तरी त्यांचे नेत्रांची तृप्ति ह्मणून होईना. कृष्णाच्या कमल-मुखाचें दर्शन घेण्यास आतुर झालेल्या गोपांगना रात्रींच्या प्रहरीं आपली हौस मनमुराद पुरवून घेत. दामोदराच्या तोंडावाटे निघालेले हांकांचे शब्द श्रवण करून गोपींना अत्यंत आनंद होई. भांग काढून नीट घातलेल्या व्रजांगनांच्या वेणींचे केंस खेळतांना विखरून त्यांच्या स्तनयुग्मांवर येत.परंतु तशा स्थितींतही त्या फार सुंदर दिसत.

याप्रकारेंकरून गोपी मंडळांनीं परिवेष्टिलेल्या कृष्णानें शरदृतूंतील चांदण्या रात्रीं मोठ्या सुखानें व आनंदानें त्यांचे बरोबर खेळ खेळून आपलें मनोरंज केलें.

## अध्याय एकविसावा.

—:o:—

### वृषभासुराचा वध.

वैशंपायन सांगतातः—वरील प्रकारें क्रीडेमध्यें कृष्णाची कालक्रमणा चालली असतां एके दिवशीं अवशीचे सुमारास एकाएकीं अरिष्ट नामक मदोन्मत्त राक्षस व्रजामध्यें येऊन धडकला. तेव्हां सर्व लोकांना अत्यंत भीति वाटली. त्यानें वृषभाचें रूप धारण केलें होतें. त्याचा वर्ण मेघाप्रमाणें व विझविलेल्या निखाऱ्याप्रमाणें असून त्याचीं शिंगें तीक्ष्ण होतीं. डोळे सूर्यासारखे तेजस्वी होते. त्याचे पुढच्या पायांचे खूर तरवारीच्या धारेसारखे होते. तो अत्यंत काळा होता. त्याच्या एकंदर आविर्भावावरून तो दुसरा कृतांत काळच आहे असें वाटलें. तो जिव्हेनें आपले ओंठ वारंवार जोरानें चाटीत होता. आणि शेंपूट ऐटीनें खालीं वर हालवीत होता. त्याचें वशिंड अतिशय कठीण असून त्याच्या तडाक्यानें तो प्रासादादि वस्तू जमीनदोस्त करून टाकीत होता. त्याचें शरीर साधारण मानापेक्षां बरेंच भरभक्कम असल्यामुळें त्याला अडवण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. त्याचें अंग शेणामुतानें भरलेलें होतें. त्याला पाहून गाईंची फारच त्रेधा उडाली. त्याची कंबर मोठी असून मुख विशाल होतें. तसेंच गुडघे जोमदार असून पोटही भलें मोठें होतें. त्याचे गळ्याखालीं लोंबणाऱ्या भक्कम पोळीचे झोंकानें त्याचीं शिंगें कांहींशीं हालत किंवा पुढें झुकत होतीं. गाईवर चढाव करण्यांत तो अत्यंत चपळ होता. त्याचे तोंडावर वृक्षादिकांच्या फांद्या लागून ओरखाडे निघाले होते. त्यानें झुंझ खेळण्यासाठीं तयारीनें आपलीं शिंगें टवकारलीं होतीं. त्याच्याशीं कोणताहि बैल झोंबी घेता तरी त्याला मारून टाकण्यास तो समर्थ होता.

अशा प्रकारचें वृषभाचें रूप घेऊन अरिष्ट नामक महा भयंकर दैत्य गाईंच्या गोठ्यांतून, इकडे तिकडे यथेच्छ वावरूं लागलें; तेव्हां गाईवर मोठें थोरलें अरिष्टच कोसळलें. त्याच्या भीतीनें कित्येक गाईंचे गाभ गळून पडले. तो अत्यंत मत्त झालेला असल्यामुळें ऋतुकालावांचूनच ( कालवडींशीं ) गमन करूं लागला. मोठ्यानें जांभया देत देत त्यानें नुकत्याच व्यालेल्या गाईशीं संभोग करण्यास सोडलें नाहीं. त्या भयंकर व दुर्मद वृषभानें आपल्या शिंगांचे तडाखे गोठ्यांतील गाईवर एकसारखे लगावण्यास सुरवात केली. त्याला तेथें मस्ती केल्याशिवाय गोडच वाटेना. याप्रमाणें कांहीं वेळपर्यंत मदोन्मत्त बैलाचा धुमाकूळ झाल्यानंतर त्याचीं शंभर वर्षें पुरीं भरलीं असल्यामुळें धांवतां धांवतां तो कृष्णाच्या पुढें येऊन उभा राहिला. त्याला अत्यंत मस्ती आलेली असल्यामुळें मोठ्या जोराजोरानें तो गाईस अत्यंत पीडा देत होता. थोड्या वेळांत

गोठ्यांतील सर्व गुरें त्यानें पार नाहींशीं केलीं. एक वासरूं देखील शिल्लक ठेविलें नाहीं. असें करतां करतां, मृत्यु समीप आल्याकारणानें कृष्णाच्या जवळ असलेल्या गाईंना त्रास देण्याची त्या दुरात्म्यास दुर्बुद्धि झाली. आणि इंद्राच्या वज्रानें युक्त असलेल्या मेघाप्रमाणें तो महादैत्य मोठ्यानें गर्जना करूं लागला. तेव्हां कृष्णानें टाळी बाजवून सिंहनाद केला व त्या योगानें अरिष्टासुराला भुरळ पाडली. व त्या बैलाच्या पाठीमागें तो गोविंद धांवत सुटला. वृषभालाही कृष्ण दृष्टीस पडतांच मोठा हर्ष होऊन त्यानें आपले नेत्र व पुच्छ हीं फुरफुरवलीं. कृष्णाच्या टाळीच्या शब्दानें त्याला फार राग येऊन त्याच्याशीं झुंज करण्याची त्याला अनिवार इच्छा झाल्यामुळें त्यानें मोठ्यानें आरोळी दिली. वृषभाचें रूप घेतलेला तो दुर्वृत्त राक्षस आपल्या अंगावर धांवून येत आहे असें पाहून कृष्ण कांहीं आपल्या जागेवरून हालला नाहीं. तो जागच्या जागीं अचल पर्वतासारखा स्थिर उभा होता. वृषभानें मान वर करून कृष्णाच्या कांखांवर दृष्टि लावली व त्याचा प्राण घेण्याच्या बुद्धीनें प्रेरित होऊन त्यानें कृष्णाचे अंगावर धाडकन् उडी घातली. कृष्णांजनासारख्या काळ्या व वृषभाप्रमाणें पराक्रमी कृष्णानें तो दुर्धर दैत्य आपल्याकडे चाल करून येत आहे असें पाहून त्याची मान धरली आणि त्याच्याशीं झुंज केली. तेव्हां त्या बैलाच्या मुखावाटें फेंस व फांफूं असा आवाज निघूं लागला. झोंबी खेळतांना कृष्ण व वृषभासुर यांचीं शरीरें एकमेकांच्या शरीरांवर आदळत होतीं; त्या कारणानें, पावसाळ्यांत एकमेकांवर आदळणाऱ्या मेघांसारखे ते दिसत होते.

लढतां लढतां कृष्णानें त्याच्या दोन शिंगांमध्यें पाय देऊन त्याचा गर्व व सामर्थ्य हीं पार जिरवून टाकलीं आणि आर्द्र वस्त्राप्रमाणें त्याचा कंठ ( पोळी ) दाबून पिळून काढला. नंतर यमदंडासारखें असलेलें त्या बैलाचें उजवें शिंग उपटून काढून त्याचाच एक तडाखा कृष्णानें त्या वृषभासुराच्या तोंडावर लगावला. तो जोराचा तडाखा बसतांच अरिष्टासुर मरण पावला. आणि तोंड, वशिंड व शिंग हीं सर्व छिन्नविच्छिन्न होऊन तो दानव जलस्रावी मेघाप्रमाणें रक्त ओकत जमिनीवर पडला. मत्त झालेल्या बैलाचा गोविंदानें विध्वंस केला असें पहातांच, "शाबास, शाबास" असे शब्द भूतमात्रांच्या तोंडून बाहेर पडले व प्रत्येकानें या अद्भुत करणीबद्दल कृष्णाची स्तुति आरंभिली.

याप्रमाणें वृषभाची वाट लावल्यानंतर पुनरपि कमललोचन कृष्णानें रमणीय चांदण्यातील पूर्वरात्रीं आपले खेळ खेळावयास सुरवात केली. सर्व गोपाळांनाही भयनाशामुळें आनंद झाला आणि देव जशी इंद्राची सेवा करितात, त्याप्रमाणें ते कमलेक्षण कृष्णाची उपासना करूं लागले.

## अध्याय बाविसावा.

—:०:—

### अक्रूरप्रस्थान.

वैशंपायन सांगतातः— कृष्णापासून आपल्याला भीति आहे हें ठाऊक असल्यामुळें कृष्ण गोकुळांत जाऊन अग्निप्रमाणें वृद्धिंगत होत आहे, हें वर्तमान कंसाच्या कानीं जातांच त्याला अत्यंत उद्वेग उत्पन्न झाला. कृष्णानें पूतनेचा वध केला, कालियाचें दमन केलें, धेनुकाला ठार मारलें, प्रलंबाला लोळविलें, गोवर्धन पर्वत उचलून धरून इंद्राची आज्ञा विफल केली आणि अलौकिक करणी करून गाईंचें रक्षण केलें. तसेंच वृषभरूपी अरिष्टा-

सुराची वाट लावून गोपांची भीति घालवली, इत्यादि अद्भुत गोष्टी ऐकून आपला विनाशकाल समीप आला असें कंसाला स्पष्ट दिसूं लागलें. त्याचप्रमाणें आपला शत्रु प्रचंड अर्जुनवृक्ष उन्मळून पाडून भला मोठा गाडा उलटवण्यासारखीं अचाट कृत्यें करून दिवसेंदिवस गोकुळांत वाढत आहे, ही कल्पना मनांत येऊन आपल्यावर खास अरिष्ट कोसळलें आहे अशी त्या मथुराधिपाची खात्री झाली. त्यामुळें त्याचीं सर्व इंद्रियें व मन यांचें भान नाहींसें झालें आणि त्याच्यावर प्रेतकळा दिसूं लागली.

त्यानंतर एके दिवशीं रात्रीं सर्व लोक निद्रावश झाल्यामुळें मथुरा नगरींत जिकडे तिकडे सामसूम असतांना, जुलमी कंसराजानें आपल्या ज्ञातीच्या लोकांस व पित्यास बोलावून आणलें. त्यांतच देवासारखा निर्दोष वसुदेव, यादवश्रेष्ठ कंक, सत्यक, दारुक, कंकानुज, भोज, वैतरण, महाबल विकद्रु, धर्मज्ञ भयशंख श्रीमंत विपृथु, दानाध्यक्ष बभ्रु (: हाच अक्रूर होय ), कृतवर्मा आणि अतितेजस्वी व कधींही क्षुब्ध न होणारा भूरिश्रवा इतक्या लोकांस त्यानें विशेषेंकरून पाचारण केलें होतें. सर्व यादवमंडळी जमल्यानंतर, उग्रसेनाचा पुत्र व मथुरेचा राजा कंस त्यांना उद्देशून म्हणाला.

“ मीं बोलतों इकडे कृपेनें अवधान असूं द्या. आपली वेदांवर अत्यंत श्रद्धा असून कोणते समयीं कसें वागावें हें आपणांला चांगलें समजतें. तसेंच न्याय-नीति इत्यादिकांचे आचार आपल्याला पूर्णपणें अवगत असून धर्म-अर्थ-काम या तीन पुरुषार्थांचे आपण प्रवर्तक आहां. आपआपलीं कर्तव्यें करण्याचे कामीं आपण निरंतर अत्यंत दक्ष असल्यामुळें देवांचीच उपमा आपणांस योग्य आहे. महत्वाचें कार्य करावयाचें असलें तरी न डगमगतां आपण पर्वतासारखे अचल रहातां. दंभ कसा तो आपणांस मुळींच माहीत नाहीं. आपण सर्वांनीं शास्त्राज्ञेप्रमाणें गुरुगृहीं वास करून सर्व विद्यांचें ज्ञान संपादन केलें आहे. धनुर्विद्येंत कोणालाही तुमचा हात धरतां येणार नाहीं. राजाला योग्य सल्लामसलत देण्याचे कामांत तुम्हीं फार चतुर आहां. अखिल सृष्टीमध्यें तुमचा यशोदीप चमकत असून वेदांचें खरें रहस्य तुम्हांला कळलेलें आहे. वर्णाश्रमधर्मांचें साद्यंत ज्ञान तुम्हीं मिळविलेलें आहे. सदाचाराचे नियम तुम्हींच घालून दिले असून स्मृतिकारांमध्यें देखील तुम्ही अग्रगण्य आहां. परराष्ट्रें जिंकून घेणें म्हणजे तुम्हांला कःपदार्थ आहे. तथापि, शरणागताचें रक्षण करण्यास तुम्ही चुकत नाहीं. याप्रकारें तुमचें शील अत्यंत निर्दोष असून वाद किंवा संभाषण करण्याचे कामीं तुमची बरोबरी कोणाच्यानेंही व्हावयाची नाहीं. तुमच्या वैभवाची कीर्ति दूरवर पसरलेली आहे. तुमच्यासारख्या थोर पुरुषांच्या वास्तव्यानें स्वर्गलोकची देखील थोरवी वाढेल, मग या पृथ्वीची कथा काय ? आपलें आचरण ऋषींप्रमाणें आहे. मरुद्गणासारखे तुम्ही पराक्रमी आहां. रुद्राप्रमाणें तुमचा राग असून तेज अग्नीसारखें आहे. आपली कीर्ति सर्वत्र विश्रुत आहे. ज्याप्रमाणें पृथ्वीला पर्वतांचा आधार आहे, त्याप्रमाणें अवनतीस चाललेल्या या थोर यदुकुलाला तुम्हांसारख्या विभूतींनीं सांप्रतकाळीं सांवरून धरलें आहे. असें असून, माझ्या मनाप्रमाणें वागून माझें रक्षण करण्याकरितां तुम्ही नित्य तत्पर असतांनाही माझा शत्रु दिवसेंदिवस बळावत चालला आहे या गोष्टीची तुम्ही उपेक्षा करितां याचा अर्थ काय ? गोकुळामध्यें कृष्ण नांवाचा नंदाचा पुत्र आहे. तो दिवसेंदिवस सागराप्रमाणें वाढत असून त्यानें आमच्या मुळावर घाव घालण्याची वेळ आणली आहे.

माझें हृदय ठिकाणावर नाहीं. मला कर्तृत्ववान् सचिव नाहींत व मी गुप्त हेर ठेवले नसल्याकारणानें अंधळ्यासारखा झालों आहें. यामुळेंच नंदाचा पुत्र अद्याप आपल्या घरीं सुखानें नांदत आहे. उपेक्षा केलेल्या व्याधीप्रमाणें, अंवसेपौर्णिमेच्या समुद्राच्या उधानाप्रमाणें, किंवा उन्हाळ्याच्या शेवटीं शेवटीं गडगडणाऱ्या मेघाप्रमाणें, तो दुरात्मा कृष्ण माझा शत्रु रोजच्या रोज अधिकच बळावत चालला आहे. नंदाच्या घरीं जन्मास आलेल्या व एकापेक्षां एक अलौकिक कृत्यें करणाऱ्या माझ्या शत्रूचें निर्दळण करण्याचा मार्ग मला सुचत नाहीं. किंबहुना त्याचें खरें स्वरूप व त्याचा पराक्रम यांचाच मला ठाव लागत नाहीं. मी अगदीं मूढ बनलों आहें. तो नंदपुत्र म्हणजे पंचमहाभूतांपैकीं एखाद्या महाभूताचा अवतार आहे कीं काय कोण जाणे! एकदां असें वाटतें कीं, तो देवाचा पुत्र असावा; परंतु, नक्की कांहींच कळत नाहीं. त्याच्या अलौकिक व दैवी कृत्यांवरून तो कोण असावा याचें अनुमान करावयाचें आहे. अगदीं तान्हा असतांना त्या दुर्जय मुलानें उताणें निजून पूतना नामक पक्षिणीचें स्तनपान करण्यास आरंभ केला व क्षणार्धांत स्तनमार्गानें तिचे प्राण शोषून घेतले. पुढें त्यानें यमुना नदीच्या डोहामध्यें वास्तव्य करणाऱ्या कालिया सर्पाचें दमन करून, अल्पावकाशांत तो डोह सोडून पातालांत रहावयास जाण्याचें त्याला भाग पाडलें आणि नागपाशबंध तोडून पुनः पूर्ववत् वर आला; तसेंच त्यानें तालवृक्षाच्या शेंड्यावरून धेनुक नामक राक्षसास खालीं लोटून देऊन गतप्राण केलें. प्रलंब राक्षस म्हणजे युद्धांत देवांना देखील अजिंक्य; परंतु या प्रतापी बालकानें एकाच मुष्टिप्रहारानें सामान्य माणसाप्रमाणें त्याला यमलोकची वाट दाखविली. नंतर, त्यानें इंद्राचा उत्सव बंद केला, यामुळें चिडून जाऊन इंद्रानें मुसळधार वृष्टि सुरू केली. परंतु, गाईचें वृष्टीपासून रक्षण करण्याकरितां त्यानें गोवर्धन पर्वत छत्रीसारखा वर उचलून धरला व इंद्राचें पारिपत्य केलें. अगदीं अलीकडे, बलवान् अरिष्ट नामक राक्षस बैलाच्या रूपानें व्रजामध्यें गेला असतांना, त्याचीं शिंगें उपटून कृष्णानें त्याला ठार मारलें. मला वाटतें कीं, तो दिसतो तसा लहान मुलगा नाहीं; तो कोणी तरी महासमर्थ वीर बालकाचें रूप घेऊन आपली बाललीलेची हौस पुरवीत असला पाहिजे. गोकुळामध्यें राहून तो कृष्ण अशा प्रकारचे अद्भुत चमत्कार करीत आहे, त्यावरून माझें व केशी दैत्याचें मरण निःसंशय समीप आलें असें मला वाटतें. मागल्या जन्मीं मला याचेपासूनच मृत्यु आला; किंबहुना, प्रत्येक जन्मांत यानेंच मला मारलें आणि आतां तोच मजशीं युद्ध करून मला ठार करण्यासाठीं माझ्या डोळ्यांसमोर गोकुळांत नांदत आहे. वरवर पाहिलें तर अमंगल गोपकुलामध्यें मरणशील अशा माणसाचें रूप यानें घेतलें आहे असें दिसून येतें; परंतु याची करणी पहावी तर ती मात्र एखाद्या दैवी अवताराप्रमाणें अद्भुत व अलौकिक दिसते. यावरून मला तर असें वाटतें कीं, हा कोणीं तरी देव बाह्यतः गोपासारख्या क्षुल्लक वेषानें आपलें खरें स्वरूप गुप्त ठेवून स्मशानांतील अग्नीप्रमाणें भलत्याच ठिकाणीं नांदत आहे.

मीं म्हणतों या गोष्टीला पुराणांतरीं देखील पुष्कळ दाखले असल्याचें आपल्या ऐकिवांत आहे. प्राचीन काळीं विष्णूनें देवांचें कांहीं एक संकट निवारण्याकरितां, वामनरूप धारण करून बळीपासून पृथ्वीची मुक्तता केली. त्याहीपूर्वीं पृथ्वीवर दैत्यांचा सुळसुळाट झाला

असतां, सर्वशक्तिमान् विष्णूनें सिंहाचें रूप घेऊन दानवांचा मूळपुरुष जो हिरण्यकशिपु राक्षस त्याचा वध केला. तसेंच श्वेतपर्वताच्या शिखरावर त्रिपुरासुर शंकरानें कल्पनातीत रूप धारण करून दैत्यांचा विध्वंस केला. आंगिरस बृहस्पतीचा पुत्र जो कच त्याला(बेडकाप्रमाणें) प्राणत्याग करावयास लावून व पुनःपुनः जिवंत करून ( म्हणजे दार्दुरी मायेचा आश्रय करावयास लावून ) त्याचेकडून त्याच विष्णूनें शुक्राच्या संजीविनी मंत्राचें सामर्थ्य नाहींसें केलें व कचाच्या हत्येच्या पापाकरितां दैत्य-वस्तीमध्यें दुष्काळ पाडला. पुराणांतरीं आपण आणखी असेंही ऐकलें आहे कीं, त्या सहस्र मुखी, अव्यय, अनंत व सनातन प्रभूनें वराहरूपानें सागरांत बुडून गेलेली पृथ्वी वर काढली व मोहिनीरूप घेऊन अमृताकरितां देवदैत्यांचें भयंकर युद्ध माजविलें. अमृत घुसळून काढण्याकरितां, देव व दैत्य यांनीं मिळून जेव्हां मंदरपर्वतानें समुद्रमंथन करण्यास आरंभ केला तेव्हां कूर्मरूपानें श्रीविष्णूनेंच मंदरपर्वताला आधार दिला होता, अशी श्रुति आहे. एकदा सुंदर वामनरूप घेऊन त्यानेंच आपल्या तीन पावलांनीं तिन्ही लोक व्यापून टाकले व त्रैलोक्याची बळीचे त्रासांतून सुटका केली. आपल्या तेजाचे चार भाग करून दशरथाच्या घरीं चार देहांनीं अवतार घेतला आणि त्यापैकीं रामनामक ( विष्णूच्या ) अंशानें रावणाचा नाश केला.

यांप्रमाणें आपल्या मायेनें निमित्तपरत्वें नाना प्रकारचीं रूपें घेऊन श्रीविष्णु आपलें व देवांचें कार्य साधीत असतो. सांप्रत मला मारण्याच्या उद्देशानें विष्णु, इंद्र किंवा मरुत्पति यांपैकीं कोणीतरी गोकुळामध्यें नंदाच्या घरीं कृष्णरूप घेतलें असावें असें मला तर खास वाटतें. नारदानें देखील मला असेंच सांगितलें होतें.

या कामीं मला वसुदेवाबद्दल मोठी शंका येत आहे. याच्याच कारवाईमुळें आपल्याला भय उत्पन्न झालें आहे यांत मला तरी संदेह वाटत नाहीं. खट्वांगवनामध्यें पुनः एकदां नारद ऋषी मला भेटले होते. त्या प्रसंगीं फिरून त्यांनीं मला बजावलें कीं “ कंसा, ( अष्टम ) गर्भाबद्दल जो तूं मोठा अट्टाहास केलास तो एका रात्रींत वसुदेवानें फुकट घालवला. देवकी प्रसूत झाली त्या रात्रीं मुलगी ह्मणून जिला तूं शिलेवर आपटून मारलीस ती यशोदेची मुलगी होती व तिचा ह्मणून गोकुळांत नांदत असलेला कृष्ण हा वसुदेवाचा आठवा पुत्र आहे. हें पुनः एकवार सांगतों ध्यानांत ठेव. तुझा वध करण्याकरितां तुझ्या हितशत्रूनें (वसुदेवानें) तुझ्याशीं कपट करून त्याच रात्रीं गर्भाची अदलाबदल करून तुझ्या शत्रूला ( कृष्णाला ) जिवंत राखिलें आहे. तूं आपटलेली यशोदेची मुलगी विंध्यनामक पर्वतश्रेष्ठावर संचार करणाऱ्या शुंभनिशुंभ नामक दोघां राक्षसांस मारून सुखरूप राहिली आहे. त्या वरदात्या देवीला अभिषेक होऊन तिची सर्व भूतसंघ सेवा करीत असतात. मोठमोठे धान्याचे व पशूंचे बळी तिला फार आवडतात व भयंकर दरवडेखोर तिचें पूजन करतात. सुरा व मांस यांनीं भरलेले दोन घट तिच्या समीप ठेवलेले असल्याकारणानें ती फार सुंदर दिसते. मोरांच्या चित्रविचित्र पिसाऱ्यांचीं भूषणें तिनें अंगावर धारण केलेलीं आहेत. कावळे व आनंदित झालेले कोंबडे यांच्या ओरडण्यानें, ती देवी जेथें वास करिते तें वन गजबजून गेलें आहे. त्याचप्रमाणें त्या अरण्यांत मृगांचे कळप व परस्परांशीं गुण्यागोविंदानें राहणारे पक्षी सर्वत्र संचार करतांना दृष्टीस पडतात. सिंह, वाघ व डुक्कर यांनीं तेथें आरोळी ठोकली कीं लागलीच मोठा

प्रतिध्वनी उमटतो. जिकडे तिकडे प्रचंड वृक्षांची गर्दी झाली असून सभोंवार रानें माजून राहिलीं आहेत. दिव्य सुवर्णपात्रें, चंवऱ्या व आरसे यांनीं त्या देवीचें देऊळ भरून गेलें आहे. देवांच्या वाद्यांच्या गजराच्या नादाचा नेहमीं त्या ठिकाणीं दुमदुमाट चाललेला असतो. तिनें आपल्या स्वतःच्या सामर्थ्यानें विंध्याचलावर वसतिस्थान निर्माण केलें असून त्या मनोरम जागीं शत्रूंना त्रासवून सोडणारी व देवांना वंद्य असणारी ती देवी मोठ्या संतोषानें वास्तव्य करीत आहे आणि हा जो नंद गवळ्याचा कृष्ण नामक पुत्र आहे तो वसुदेवाचा दुसरा मुलगा असून त्याचींच हीं पूतनावधादिक अद्भुत कृत्यें आहेत व तोच तुझा बांधव तुला मारील असें नारदानें मला सांगितलें आहे."

"वसुदेवाचा महासमर्थ पुत्र वासुदेव हा धर्मशास्त्राप्रमाणें माझा नातेवाईक (बांधव) खरा, परंतु त्याचेच हातून माझा नाश व्हावयाचा आहे. कावळा ज्याच्या मस्तकावर पाय ठेवून बसतो त्याच्याच डोळ्यामध्यें मांस खाण्याच्या लालसेनें आपली चोंच खुपसतो; तद्वत्च हा वसुदेव आपल्या पुत्रादिक बांधवांसहवर्तमान माझेपाशीं अन्न खाऊन माझ्याच प्राणांवर उठलेला आहे. भ्रूणहत्या, गोवध व स्त्रीवध इत्यादि पापांना प्रायश्चित्तानें शुद्धि आहे परंतु कृतघ्न मनुष्याला—विशेषेंकरून आपल्या नातलगांशीं कृतघ्नपणा करणाराला—कधींच स्वर्गप्राप्ति होत नाहीं. जो कृतघ्न मनुष्य कपटानें स्वार्थ साधण्याकरितां, वरून स्नेह दाखवून आंतून गळा कापतो त्याला लौकरच पतित ज्या मार्गानें जातात, त्या मार्गानें जावें लागतें (म्हणजे त्याचा निःपात होऊन त्याला नरकवास भोगावा लागतो). जो पापी अंतःकरणाचा पुरुष निष्पाप मनाच्या मनुष्याशीं कपट करतो त्याला भयंकर नरकवासाचीच वाट धरली पाहिजे. वसुदेवा, तूं मोठा सदाचरणी असून माझ्याशीं आजपर्यंत मित्रत्वानें वागत आलास व तूं माझेंच अन्न खात आहेस असें असतां सदाचाराच्या नियमांस अनुसरून तुला मी तुझा स्वजन-प्रिय वाटावा कीं तुझा मुलगा तुला अधिक व्हावा, सांग पाहूं? रानामध्यें हत्तींची झुंज सुरू झाली म्हणजे लतावेलींचा चुराडा होतो, परंतु भांडण मिटतांच सर्व हत्ती मिळूनच त्या लतावेलींचा फडशा उडवतात. त्याचप्रमाणें बांधवांच्या अंतःकलहाला आरंभ झाला म्हणजे कपटानें वागणाऱ्या माणसांचा नाश होतो, हें मात्र लक्षांत ठेव. मग तो मनुष्य स्वपक्षाचा असो कीं परपक्षाचा असो. अरेरे! वसुदेवा, ज्या अर्थीं तूं माझ्या कुळाचा घात करावयास उद्युक्त झाला आहेस त्या अर्थीं मला वाटतें तुला पोसून नकळत माझ्या नाशासाठीं मी आपल्या मृत्यूलाच कींरे वाढवलें. तूं असहिष्णु व पापबुद्धीचा असून अत्यंत शठ आहेस. अरे मूर्खा, माझ्याशीं वैर करून तूं आज यदुकुलाला मोठ्या फिकिरींत पाडलें आहेस. तूं केलेंस हें तुझ्या शीलाला योग्यच आहे. वसुदेवा, मी तुझा परामर्ष घेऊन तुला वाढवला तें सर्व निष्फळ झालें. शहाणपण वयावर किंवा पांढऱ्या केंसांवर अवलंबून नसतें. ज्याची बुद्धि परिपक्व तोच खरा शहाणा; केंस पिकले म्हणजे शहाणपण आलें असें नाहीं. तूं कलहप्रिय आहेस पण तुझें ज्ञान फार नाहीं. तूं वयानें मोठा आहेस परंतु शरदृतूंतील मेघांप्रमाणें तुझ्यांत कांहीं जीव नाहीं. अरे मूर्खा वसुदेवा, तुला वाटत आहे कीं कंसाचा नाश झाला म्हणजे माझा पुत्र मथुरेचा राजा होईल. परंतु तुझें हें वाटणें अगदीं चुकीचें आहे. तूं थेरडा झाल्याकारणानें तुझी तर

आतां कांहींएक आशा राहिलेली नाहीं. तुझ्या सर्व आकांक्षा निष्फळ झालेल्या आहेत. उगीच एरंडासारखा मोठा झाला आहेस एवढेंच. अरे, जिवंत रहाण्याची आशा ठेवून माझ्यापुढें उभें रहाण्याची कोणाची तरी प्राज्ञा आहे काय? अरे मी तुजवर विश्वासून असतां दुष्ट बुद्धीनें माझे एक घाव दोन तुकडे करण्यासाठीं तूं टपून बसलेला आहेस. परंतु तुझ्या डोळ्यांदेखत तुझ्या उभयतां पुत्रांची मी उलट वाट लावून टाकतों पहा. मीं आजपावेतों कोणाही वृद्ध मनुष्याचा, ब्राह्मणाचा किंवा स्त्रीचा वध केलेला नाहीं व पुढें करणार नाहीं. त्यांतलेत्यांत विशेषेंकरून मी आपल्या नातलगाची हत्या तर नाहींच करणार. आमच्या येथें तुझा जन्म झाला असून आम्हींच तुला वाढविलें आहे. माझ्या पित्यानें तुला लहानाचा मोठा केला. तूं माझ्या पितृभगिनीचा पति असून यादवांचा मूळपुरुष आहेस. चक्रवर्ति[1] राजांच्या महाविख्यात कुलामध्यें तुझी मोठी कीर्ति होती. धर्मबुद्धीचे महात्मे व सज्जन तुला गुरूचे ठिकाणीं मानीत. परंतु यादवकुलाच्या आधारस्तंभाची असली नीच कृति पाहून सर्व भले लोकांमध्यें आमची छी थू चालली आहे. आम्हांला वर मान करण्याची सोय राहिली नाहीं. अरे, मला मृत्यु आला काय किंवा माझा जय झाला काय, दोन्ही गोष्टींची मला मोठी किंमत नाहीं. परंतु वसुदेवाच्या अनीतीमुळें यदुकुलांतील पुरुषांना भल्यांच्या समाजामध्यें तोंडाला पदर लावून तोंडें खालीं करण्याचा प्रसंग आल्याकारणानें मला अत्यंत वाईट वाटत आहे. युद्धामध्यें माझा नाश कसा होईल याविषयीं उपाय-चिंतन करून, तूं माझा विश्वासघात केला आहेस आणि सर्व यादवांच्या तोंडाला काळें फासलें आहेस. मी व कृष्ण यांच्यामध्यें कधींही विझणार नाहीं असा वैराग्नि आतां चेतला असून आमच्यापैकीं एकाची प्राणाहुति पडल्याशिवाय, यादवकुलाला शांति मिळावयाची नाहीं. ”

“ हे दानपते अक्रूरा मी तुला आज्ञा देतों कीं, उभयतां वसुदेवपुत्रांना व मला कर देणाऱ्या नंदादिक गोपांना व्रजांतून इकडे आणण्यासाठीं विलंब न करितां गोकुळामध्यें जा आणि नंदाला सांग कीं सर्व गोपांसहवर्तमान वार्षिक कराची रक्कम घेऊन त्वरित मथुरेला ये. त्याला असेंही सांग कीं वसुदेवाच्या मुलांना——रामकृष्णांना——पहाण्याची कंसाला फार इच्छा झाली आहे. मथुराधिपाचे सेवक व पुरोहित हे देखील त्यांचें दर्शन घेण्यासाठीं उत्कंठित झाले आहेत. राम व कृष्ण हे दोघे सुदृढ, सुंदर, प्रसंगावधानी, कल्पक व सावध असून आखाड्यांत कुस्ती करण्याचे कामीं मोठे कुशल आहेत असें ऐकतों. आमच्यापाशीं देखील चाणूर व मुष्टिक हे दोन चांगले मल्ल असून कुस्ती करण्यासाठीं त्यांचे बाहू फुरफुरत आहेत. युद्धकलेमध्यें निपुण असलेल्या या रामकृष्णांचा त्यांच्याशीं सामना लावून देऊं. म्हणजे त्या देवावतारी बालकांचें सामर्थ्य माझे दृष्टीस पडेल. नाहीं तरी मला माझ्या आतेभावांना भेटावयाचें होतेंच. बिचारे भिकारड्या गोकुळांत रहात असून अरण्यामध्यें गुरें राखीत फिरत

[1] चक्रवर्ति राजाचें आमचे शास्त्रांत लक्षण दिलें आहे तें:—

“यस्य मूर्द्धनि दृश्येत विनाछत्रेण भूपतेः ।
पद्मानुकारिणी छाया तमाहुश्चक्रवर्तिनम् ।”

अर्थः—बाहेरील छत्रावांचूनच ज्या भूपतीचे मस्तकाभोंवती अंगचेंच पद्माकार तेजोमण्डल दिसतें, तो चक्रवर्ति समजावा.

असतात. त्यांचा मला शोधसमाचार घेणें अवश्य आहेच.

त्या गोकुल-वासी जनांना तूं आणखी असें सांग कीं, राज्यसुखें उपभोगीत असलेला राजा कंस धनुर्मख नांवाचा यज्ञ करविणार आहे. आणि यज्ञासाठीं बोलाविलेल्या लोकांची उत्तम व बिनचूक व्यवस्था रहावी एतदर्थ या मथुरे-जवळ असलेल्या वनामध्येंच त्यांना रहावयाला सांग. त्यांच्या सर्व सोई आपण लावून देऊं. गवळीवाडा संनिध असला ह्मणजे ताकपाणी, दहीं, दूध व तूप इत्यादिकांची वाण न पडतां आपल्याला ते ते पदार्थ नानाप्रकारच्या भोज्य वस्तू तयार करण्याकरितां, वाटेल तेव्हां व वाटेल तितके, अनायासानें घेतां येतील. ह्मणून अक्रूरा, तूं ताबडतोब जा व माझ्या आज्ञेवरून त्या दोघां रामकृष्णांना घेऊन ये. त्यांना केव्हां पाहीन असें मला झालें आहे. ते येथें आले ह्मणजे मला मोठा संतोष होईल. त्या महापराक्रमी वीरांना डोळे भरून पाहि-ल्यावर, मला जें हिताचें दिसेल तें करण्यास ठीक पडेल. माझी आज्ञा व निरोप ऐकून ते जर बऱ्या बोलानें इकडे आले नाहींत, तर मीं त्यांस शासन करीन. बालकांशीं वागावयाचें तें सौम्यपणानें वागलें पाहिजे असा नीतीचा पहिला नियम—सिद्धांत—आहे. ह्मणून होतां होईल तों गोड बोलून त्या जडबुद्धींना तूं सत्वर माझ्या समोर घेऊन ये. हे सुशील अक्रूरा, वसुदेवानें जर तुला आपल्या पक्षाला ओढून घेतलें नसेल, तर तूं माझें एवढें काम कर. ह्मणजे मी तुझ्यावर अत्यंत लोभ ठेवीन. सारांश, बाबारे, ते वसुदेवाचे पुत्र मथुरेला येतील असें कर. ”

याप्रकारें कंसानें सारखी निर्भर्त्सना चालवि-लेली असतां देखील, वसूसारख्या स्थिरबुद्धीच्या वसुदेवानें आपलें स्वास्थ्य ढळूं दिलें नाहीं. सागराप्रमाणें तो निष्कंप बसला होता. अदूर-दर्शी कंस वरीलप्रमाणें वसुदेवावर वाक्प्रहार करीत होता तरी क्षमाशील वृत्ति स्वीकारून, वसुदेवानें तोंडांतून उत्तरादाखल ब्रही काढला नाहीं. शिव्यांची लाखोली चालली असतां मनाची शांति त्यानें ढळूं दिली नाहीं, हें ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें त्यांनीं खालीं माना घातल्या आणि ‘ धिक्कार धिक्कार ’ असे शब्द अनेक वेळां त्यांचे तोंडातून हलक्या स्वरांत सहजीं बाहेर पडले.

महातेजस्वी अक्रूराला दिव्य दृष्टि असल्या-मुळें सर्व कांहीं कळत होतें. त्या कारणानें, माशाला ज्याप्रमाणें उदक दृष्टीस पडतांच अत्यानंद होतो, त्याप्रमाणें, अक्रूराला मोठा आल्हाद वाटला. कमललोचन श्रीकृष्णाचें दर्शन केव्हां घेईन असें त्याला होऊन गेल्या-मुळें, दानपति अक्रूर तत्क्षणीं गोकुळास जाण्या-करितां मथुरेच्या बाहेर पडला.

---

## अध्याय तेविसावा.

—:•:—

### अंधकाचें भाषण.

वैशंपायन सांगतात:—कंसानें वसुदेवाची चालवलेली निर्भर्त्सना पाहून सर्व यादवश्रेष्ठ सभासदांनीं कानांत बोटें घातलीं. याचीं शंभर वर्षें पूर्ण भरलीं असेंही त्यांना वाटलें. इतक्यांत त्या भर समाजामध्यें कंसाला मोठ्या धैर्यानें व करारीपणानें खडखडीत प्रत्युत्तर देणारा अंधक नांवाचा एक तेजस्वी यादव उठला. तो उत्तम वक्ता कंसाला ह्मणाला.

“ बाबारे मला वाटतें, तूं हा आपले वाणीला वृथा शीण दिलास. हें तुझें बोलणें निंद्य व अयोग्य आहे. भले कधींही असें मर्मभेदक भाषण करीत नाहींत. विशेषतः आपल्या बांधवां-संबंधीं अशी भाषा सज्जनांच्या तोंडांतून केव्हांही

बाहेर पडावयाची नाहीं. तुला जर यादव-कुलांत जन्म झाल्याबद्दल लाज वाटत असेल तर मी सांगतों इकडे लक्ष दे. वीरा, तुझ्या इच्छेविरुद्ध तुला यादव म्हणण्याचा जुलूम करण्यास यादव तयार नाहींत. तूं आम्हां यादवांचा आपणास राजा म्हणवितोस. परंतु तुझ्या दुष्टपणामुळें आम्ही सर्व यादव मात्र लोकनिंदेस पात्र झालों आहों. मला वाटतें कीं, इक्ष्वाकु वंशांतील दुष्ट असमंज राजा, आमच्या वंशाचा उच्छेद करण्याकरितां तुझ्या रूपानें पुन्हां जन्मास आला आहे. असो; तूं, भोज, यादव किंवा कंस, कोणीहि अस. तूं मुंडण कर, जटा राख किंवा आहे तसेंच तुझें मस्तक राहूं दे. पण ज्या कमअस्सलानें तुझ्यासारखा कुलांगार पुत्र उत्पन्न केला, त्या कुलकलंक उग्रसेनाची मात्र कींव केली पाहिजे. बाबारे, शहाणे लोक स्वमुखानें आपले गुणाची महती कधींही सांगत नाहींत. दुसऱ्यांनीं आपल्या गुणांची वाहवा केली म्हणजेच त्या गुणांना वेदार्थाप्रमाणें महत्व येऊन त्यांचें साफल्य होतें.

यदुवंशाला तुझ्यासारखा, पोरकट कुलनाशक व मूर्ख राजा मिळाल्याकारणानें पृथ्वीचे सर्व राजे यादवांची छी थू करीत आहेत. तुझ्या मुखांतून जीं मुक्ताफळें आतां बाहेर पडलीं, त्यांचे योगानें तुला मोठी धन्यता वाटत असेल. परंतु तुझ्या मर्मभेदी भाषणानें तुझें कांहीं चांगलें तर झालें नाहींच; पण तुझें अंतःकरण मात्र कसें आहे तें लोकांच्या उत्तम निदर्शनास आलें. भल्यानांही मान्य झालेल्या निगर्वी गुरूची निर्भर्त्सना म्हणजे दुसरी ब्रह्महत्याच. ती कोणाला आवडणार आहे? बाबारे, अग्नीप्रमाणें, वृद्ध माणसांची पूजा करून त्यांचा सन्मान केला पाहिजे. ते जर का रागावले तर आपण योगबलानें कमाविलेल्या लोकांचाही नाश होईल. बाबारे, उदकामध्यें मत्स्य ज्याप्रमाणें आपला मार्ग शोधून काढतो, त्याप्रमाणें, शहाणीं सुरतीं, संयमी व उदार अंतःकरणाचीं माणसें नेहमीं धर्माचा मार्ग शोधून त्या मार्गानें जातात. पण तुझें पहावें तों, अग्नीसारख्या तेजस्वी थोर वृद्ध पुरुषांना, तूं गर्वानें फुगून जाऊन मर्मभेदक शब्दांनीं ताडण करून मंत्रावांचून दिलेल्या आहुतीप्रमाणें दुःख देत असतोस. तुला न कळवितां वसुदेवानें आपल्या पुत्रांचें रक्षण केल्यामुळें तूं त्याची निर्भर्त्सना चालविली आहेस. पण मी तुझ्या या खोडसाळ प्रलापांचा व अनुदार भाषेचा उघडपणें निषेध करतों. पुत्र जरी दुष्टबुद्धीचा निपजला तरी बापानें तसेंच बनतां कामा नये. पुत्रासाठीं मातापितरांनां अत्यंत कष्ट सोसावे लागतात. आपल्या लहान मुलाला वसुदेवानें लपवून ठेविलें, हा त्यानें मोठा कृतघ्नपणा केला, असें जर तुझें म्हणणें असेल तर ही गोष्ट तूं आपल्या पित्यालाच विचार. वसुदेवाची, किंबहुना सर्व यादववंशाची निर्भर्त्सना करून तूं सर्व यादवांचें वैर मात्र संपादन केलें आहेस. वसुदेवानें कृष्णाचें तुला न कळत रक्षण केलें ही जर त्याची चूक असेल, तर मग मी असें विचारतों कीं, उपजतांच उग्रसेनानें तुला मारून टाकलें नाहीं ही त्याची चूक नव्हे काय? पुत् नामक नरकापासून मुलगा पितरांची मुक्तता करितो म्हणून मुलाला पुत्र अशी संज्ञा धर्मवेत्त्या लोकांनीं देऊन ठेविलेली आहे. कृष्ण व बलराम यांच्याविषयीं तूं आरंभापासून वैर चालविलें आहेस, त्यामुळें त्यांच्याही मनांत तुजविषयीं जन्मापासून हाडवैर बाणलेलें आहे. वसुदेवाचा भर सभेंत धिक्कार करून तूं वासुदेवाचा कोप आपणांवर ओढवून घेतला आहेस व त्यामुळें सर्व यादवांचीं अंतःकरणें देखील तुझ्याविषयीं खव-

ळून गेलीं आहेत. वसुदेवाच्या निर्भर्त्सनेमुळें कृष्ण तुझा वैरी झाला आहे."

"सांप्रत होत असलेलीं अशुभ चिन्हें तुला भय सुचवीत आहेत. पहांटेस दुःस्वप्नें पडून सर्पांचें अशुभ दर्शन होतें, या गोष्टीवरून लवकरच या मथुरेला वैधव्य प्राप्त होणार असें आमचें अनुमान आहे. हा घोर ग्रह राहु आकाशामध्यें स्वाति नक्षत्रांत प्राप्त झाला असून त्या ठिकाणीं आपल्या किरणांनीं चमकत आहे. तसेंच मंगळ नामक पापग्रह वक्री होऊन चित्रानक्षत्रांत आला आहे. बुध ग्रह आपल्या भयंकर तेजानें पश्चिम दिशा व्यापून बसला आहे. आणि शुक्रानें सूर्याच्या मार्गाचें उल्लंघन केलें आहे. भरणीपासून तेरा नक्षत्रें हीं धूमकेतूच्या पुच्छानें विद्ध झालीं असल्याकारणानें त्यापैकीं कोणत्याहि शुभ नक्षत्रांत चंद्र असला तरी तो उत्तम फल देऊं शकत नाहीं. सूर्याला खळें पडलें आहे. पशु व पक्षी कर्कश ध्वनि करून इकडून तिकडे उलट दिशेनें जातात. दुष्ट भालु स्मशानांतून निघून निःश्वासाबरोबर निखारे टाकीत, सकाळसंध्याकाळ आरडत, या आपल्या नगरीच्या सभोंवार पळत जाते. मोठाले गडगडाट होऊन उल्का जमिनीवर पडतात. एकाएकीं भूकंप होतो व गिरिशिखरें हालावयास लागतात. नुकताच राहूनें सूर्याचा ग्रास केला असतां दिवसास काळोख पडून रात्र झाली कीं काय असें वाटूं लागलें. शुष्क दगडांचा वर्षाव होऊन सर्व दिशा धुक्यानें धुंद होतात. मेघांची कडाक्याची गर्जना होऊन रक्ताचा पाऊस पडतो. पक्षी हे वृक्षांवर बसत नाहींसे झाले आहेत. मला वाटतें कीं, देवतांनीं आपआपलें स्थान सोडलें आहे. कारण ज्योतिषी लोकांनीं राजाच्या नाशाचीं सूचक म्हणून जीं जीं अशुभ लक्षणें सांगितलेलीं आहेत तीं सर्व सांप्रत आपल्या प्रत्ययास येत आहेत. तूंही स्वजनांचा द्वेष करतोस, राजधर्म पाळीत नाहींस व विनाकारण क्रोधाच्या तडाक्यांत सांपडतोस; म्हणून तुझा मृत्यु समीप आला आहे असें मला वाटतें. अरे मूर्खा, वसूप्रमाणें पूज्य असलेल्या वृद्ध वसुदेवाला, मोहानें तूं हवें तसें टाकून बोलतो आहेस, त्या तुला मनाची शांति कोठून मिळणार? तुझ्यावर जो आमचा स्नेह होता तो इतःपर आम्हीं काढून घेतला आहे. तूं आपल्याच वंशावर उलटला आहेस. याकरितां यापुढें क्षणभर देखील तुझी चाकरी करण्याची आमची इच्छा नाहीं. अक्रूराला गोकुळानजीकच्या वनामध्यें आज शुद्धाचरणी कमललोचन-श्रीकृष्णाचें पुण्यकारक दर्शन होणार. तो मात्र खरोखर धन्य होय. तुझ्यामुळें सर्व यादववंशाची दाणादाण होईल. परंतु आपल्या ज्ञातीचे सर्व लोक एकत्र जमवून श्रीकृष्ण पुनः यादववंशाची व्यवस्था लावील. वसुदेव शहाणा असल्याकारणानें काळवेळ ओळखून त्यानें तुझें बोलणें मुकाट्यानें सहन करून घेतलें आहे. आणखी तुला वाटेल तें त्याला बोलण्याला तूं मुखत्यार आहेस. परंतु कंसा, वसुदेवाशीं सख्य जोडून तूं कृष्णाच्या घरीं जावेंस व त्याशीं स्नेह संपादन करावास हें मला योग्य वाटतें.

## अध्याय चोविसावा.

—:०:—

### केशिवध.

वैशंपायन सांगतातः—अंधकाचें भाषण ऐकून कंसाचे नेत्र क्रोधानें खदिरांगारासारखे लाल झाले, व एक शब्दही न बोलतां तो आपल्या अंतःपुराकडे रागारागानें निघून गेला. बाकीच्या यादव सभासदांनीं सर्व वृत्तांत समक्ष अवलोकन केला होताच. तेही 'कंसानें केलें हें चांगलें केलें

नाहीं ' असें पुटपुटत आपआपल्या घरोघर चालते झाले. यादवांचा मूळचा बेत अंधकाच्या भाषणानें जागच्याजागीं जिरून गेला.

इकडे कंसाच्या आज्ञानुसार मनोवेगानें चालणाऱ्या एका चांगल्या रथांत बसून अक्रूर गोकुळाकडे चालला होता. त्याला श्रीकृष्णाचें दर्शन केव्हां घेईन असें झालें होतें. उलटपक्षीं, कृष्णाला शुभ शकून होत होते. त्याची व त्याच्या पित्यासारख्या बांधवांची लवकरच भेट होणार असें त्याच्या शरीरावर होणारीं चिन्हें सूचवीत होतीं.

अक्रूराला धाडण्यापूर्वीं, कृष्णाचा वध करविण्याचे हेतूनें मथुरेश्वरानें योजनापूर्वक एका दूताला केशीकडे पाठवून दिलें होतें. दूतानें सांगितलेला निरोप ऐकून, लोकांना नित्य पीडा देणारा दुर्निवार केशी दैत्य वृंदावनामध्यें जाऊन गोपांना त्रास देऊं लागला. तो अश्वरूपी दैत्य मोठा रागीट व दुष्ट असून त्याचें दमन करणें म्हणजे मोठें कठीण काम होतें. मनुष्याचें मांस खाऊन त्यानें गोकुळामध्यें मोठा गोंधळ उडवून दिला होता. त्यानें गाईंचा व गोपाळांचा संहार करण्यास आरंभ केला होता. तो दुर्मद केशी गाईंचें मांस भक्षण करी व निरंकुशपणें वाटेल तिकडे फिरे. अश्वरूपी दुष्टात्मा केशी दैत्याच्या या अघोर करणीनें गोकुळभर अस्थि व मांस यांचा सडा पडून सर्व वृंदावन स्मशानाप्रमाणें भासूं लागलें होतें. तो आपल्या खुरांनीं जमीन खरडून काढी व क्षणार्धांत सपाट्यासरसे वृक्ष उन्मळून टाकी. तसेंच आपल्या खिंकाळण्यानें तो वायूशीं स्पर्धा करी व एकदम आकाशांत उडी मारी. तो दुष्ट व माजलेला अश्व वनामध्यें हिंडूं लागला म्हणजे त्याच्या मानेवरचे केंस एकसारखे हलत. आपल्या करणीनें तो भयंकर व अत्यंत पुष्ट दैत्य जणूं काय त्या वनांत कंसाच्या चरित्राचें अनुकरण करीत होता. त्या दुरात्म्या अश्वानें सर्व गोपांना मारून तेथील अरण्य शून्यवत् करून टाकलें. त्या अमार्गगामी राक्षसानें तें अरण्य व्यापून टाकलें असल्या कारणानें, माणूस किंवा गाई कोणीही तेथें फिरकेनासें झालें. एकसारखा नरमांसावर चरणाऱ्या त्या मदोन्मत्त केशीनें वृंदावनभर धुमाकूळ घातला होता.

असें होतां होतां त्याचा मृत्यु समीप आला तेव्हां आपोआप कोणे एके समयीं तो क्रुद्ध झालेला केशी वनांत फिरत असतां, माणसाच्या शब्दाच्या अनुरोधानें गवळीवाड्याजवळ प्राप्त झाला. प्रत्यक्ष यमराजाकडूनच त्याला तेथें येण्याची बुद्धि झाली असें म्हटलें पाहिजे. त्याला पहातांच बायका, मुलें व पुरुष इत्यादि सर्व जगदीश जो श्रीकृष्ण त्याच्या नांवानें आरोळ्या ठोकीत धूम त्याकडे पळूं लागलीं. बायकामुलांचा रुदनस्वर व गोपाळांची आरोळी ऐकून कृष्णानें त्यांना अभय दिलें व तो एकदम केशीचे अंगावर धांवून गेला. त्याबरोबर केशी देखील मान उंच करून दांत बाहेर काढून व डोळे वटारून मोठ्यानें खिंकाळत सपाट्यानें कृष्णाच्या समोर येऊन उभा राहिला. अश्वश्रेष्ठ आपल्याकडेच चाल करून येत आहे असें अवलोकन करून मेघ जसा चंद्रावर जातो, त्याप्रमाणें श्रीकृष्ण त्याचे अंगावर धांवून गेला. कृष्ण केशी दैत्याच्या जवळ जाऊन उभा राहिला आहे असें पाहून त्याला कांहीं अपाय होऊं नये अशी इच्छा करणारे मनुष्यबुद्धीचे गोप त्याला म्हणूं लागले, "बाबारे, तूं अविचारानें या अधम अश्वाजवळ जाऊं नको. तूं यःकश्चित् बालक असून हा पापी राक्षस दुर्जेय आहे. कृष्णा, हा कंसाबरोबरच जन्माला आलेला असून त्याचा शरीराबाहेर फिरणार जीव कीं प्राण आहे. सर्व अश्वांमध्यें हा अत्यंत श्रेष्ठ

असून युद्धामध्यें याला सामनेवाला कोणीही या भूतलावर नाहीं. हा महासमर्थ अश्व सर्व पापिष्ठांमध्यें अग्रणी असून भूतमात्रांना यानें त्रासवून सोडलें आहे. कोणीही याला मारूं शकणार नाहीं. ”

गोपाळांचें तें भाषण ऐकून वक्तृश्रेष्ठ मधुसूदनाची केशीशीं लढण्याची इच्छा दुणावली. इतक्यांत, उजवीकडून व डावीकडून मंडळाकार गरगर फिरून रागानें केशी दैत्य दोन पायांनीं वृक्ष मोडूं लागला. त्या वेळीं त्याच्या लांब लांब सटा त्याच्या तोंडावर लोंबत होत्या. स्कंध केंसांनीं झांकून गेला होता. त्याच्या कपाळावरील आंठ्या मेघतरंगांप्रमाणें दिसत असून त्या केशीला अत्यंत क्रोध आल्यामुळें त्याच्या कपाळांतून घाम निघत होता. ज्याप्रमाणें थंडीच्या दिवसांत आकाशांतून चंद्रमा द्रवाची वृष्टि करतो, त्याप्रमाणें धुळीनें माखलेल्या केशीच्या तोंडांतून सारखा फेंस निघत होता. भारता ! खिंकाळतांना मुखावाटे बाहेर उडणाऱ्या फेनबिंदूंचे योगानें त्या अश्वानें कमलनयन गोविंदाच्या अंगावर सडा घातला. तो अश्व खुरानें जमीन खरडीत असल्यामुळें ज्येष्ठमधाप्रमाणें पिंगट रंगाची धूळ वर उडत होती. त्या धुळीनें कृष्णाचे मस्तकावरील केंस माखून जाऊन त्यांना देखील पिंगट रंग चढला. पाय उंच करून तो केशी दैत्य उड्या मारूं लागला व खुरांनीं जमीन खरडून दांत कडकडां चावूं लागला. अशा रीतीनें चाल करण्यापूर्वीची तयारी करून केशीनें कृष्णाचे अंगावर उडी घातली. कृष्णाच्या अंगाशीं भिडतांच, त्या तुरगश्रेष्ठानें पुढच्या पायांनीं कृष्णाच्या वक्षस्थळावर लाथा झाडल्या. इतकें करूनही तो बलिष्ठ दानव थांबला नाहीं. त्यानें अतुल सामर्थ्याच्या कृष्णावर आपल्या मागच्या तंगड्यांनीं मधून मधून तडाके लगावण्याची सुरवात केली. त्या क्रोधवश झालेल्या हयानें आपल्या तीक्ष्ण दाढेनें व भयंकर वक्त्रानें कृष्णाच्या खांद्याचा चावा घेतला. त्याचे केंस खालीं लोंबत होते, अशा स्थितींत जेव्हां तो घोडा कृष्णाच्या अंगाशीं भिडला त्यावेळीं मेघयुक्त सूर्याप्रमाणें त्याची शोभा दिसूं लागली. क्रोधामुळें ज्याच्या अंगांत दुप्पट सामर्थ्य आलें होतें, असा तो बलवान् केशी आपल्या उरानें वासुदेवाच्या वक्षस्थळावर प्रहार करण्याचा विचार करीत होता. इतक्यांत अतुलपराक्रमी व महासमर्थ कृष्णानें रागावून आपला दंड फुगवला आणि आपल्याशीं भिडलेल्या अश्वाच्या मुखांत तो कोंबला. श्रीकृष्णाच्या बाहूचा चावा घेण्याची किंवा त्याला अन्य रीतीनें प्रतिबंध करण्याची त्या अश्वाची प्राज्ञा झाली नाहीं. उलट, त्याचे सगळे दांत मुळासकट उखळले जाऊन त्याच्या तोंडांतून फेंसाबरोबर रक्त बाहेर येऊं लागलें. ओंठ फाटून त्याच्या जबड्याचे दोन भाग झाले. अर्थात्, त्याचे डोळे फिरून सर्व सांधे खिळखिळे झाले व हनुवटी फुटून तो मटकन् खालीं बसला. त्याचे नेत्र रक्तबंबाळ झाले. त्याचे कर्णहि ताठ उभे राहून त्याचा वात्रटपणा बंद पडला आणि तो गरगर फिरूं लागला. पुनः पुनः तो उभा राहून उडी मारण्याचा प्रयत्न करी; परंतु त्याचा कांहीं उपयोग न होतां तो खालीं पडे. विष्ठा व मूत्र यांचा उत्सर्ग झाला. आणि तो अत्यंत दमून गेल्यामुळें त्याचे अंगावरील सर्व केंस घामानें भिजून गेले. पायांची धडपड बंद पडली. केशी दैत्याच्या मुखांत कोंबलेला श्रीकृष्णाचा बाहु, ग्रीष्मऋतूच्या शेवटीं, अर्धचंद्राच्या किरणांनीं वेष्टिलेल्या मेघाप्रमाणें शोभत होता. रात्रभर आकाशसंचार करून श्रमलेला चंद्र प्रभातकाळीं निस्तेज होऊन मेरु पर्वताचा आश्रय करून रहातो,

तेव्हां जसा देखावा दृष्टीस पडतो, तसा देखावा सर्व अवयव थंड पडून तो केशी श्रीकृष्णाचे समीप मृतप्राय होऊन पडला असतांना दिसत होता. कृष्णाच्या बाहूच्या तडाक्यानें, केशीच्या तोंडांतील दांत शरदृतूंतील जलशून्य शुभ्र मेघांप्रमाणें एकामागून एक गळून पडले.

याप्रमाणें आधींच जर्जर झालेल्या केशीला, शुद्ध कृत्यें करणाऱ्या कृष्णानें आपली भुजा आणखी फुगवून अधिक घायाळ केलें. युद्धामध्यें श्रीकृष्णानें नुसत्या बाहूचा उपयोग करून केशीला जेरीस आणल्याबरोबर त्याचें मुख छिन्नविछिन्न होऊन त्या दानवाला अत्यंत पीडा झाली व तो मोठमोठ्यानें ओरडूं लागला. त्यानें आपलें अंग जमीनीवर टाकून एकसारखी तडफड चालवली होती. तोंडावाटे रक्तस्राव चालूच होता. मध्येंच तोडलेल्या पर्वताप्रमाणें त्याचें शरीर फाटलें असल्या कारणानें तो विद्रूप दिसत होता. कृष्णाच्या बाहूनें तोंड दुभंगल्यामुळें तो अत्यंत भयंकर राक्षस तोंड चिरलेल्या सर्पाप्रमाणें खालीं पडलेला होता. कृष्णानें केशीचा देह छिन्नविच्छिन्न केल्याकारणानें शंकरानें महिषासुराला मारून टाकल्यानंतर त्याचें धिप्पाड शरीर जसें भयंकर दिसत होतें, त्याप्रमाणें त्या केशीचेंही स्वरूप उग्र दिसूं लागलें. प्रत्येकांत दोन पाय, अर्धी पाठ, अर्धें पुच्छ, एक कान, एक डोळा व एक नाकपुडी इतके अवयव असलेलीं त्या प्राण्याचीं दोन शकलें निरनिराळीं होऊन भूमीवर पडलीं होतीं, तेव्हां त्यांची मोठी मौज दिसली.

उलटपक्षीं केशीच्या दांतांचा तडाका कृष्णाच्या बाहूवर बसून त्या जागीं व्रण उमटले होते, त्यामुळें श्रीकृष्णाचा बाहु अरण्यांत हत्तीनें आपल्या दांतानें ओरबाडलेल्या सालवृक्षाप्रमाणें दिसत होता. एवंच युद्धामध्यें केशीला मारून त्याचे दोन तुकडे केल्यावर तो कमललोचन कृष्ण तेथेंच हंसत उभा राहिला. केशी मरून पडला आहे असें पहातांच गोप व गोपी यांना मोठा हर्ष झाला. आपलें विघ्न टळून हाल चुकले या कल्पनेनें त्यांचीं मुखें प्रफुल्ल झालीं. श्रियायुक्त दामोदराची पुनःपुनः पूजा करीत आपआपल्या वयाच्या व पदवीच्या अधिकाराप्रमाणें सर्वांनीं गोड गोड भाषणांनीं त्याचें अभिनंदन केलें.

गोप म्हणाले:—“ कृष्णारे, तूं आज केवढें अलौकिक कृत्य केलेंस! घोडयाचें रूप घेऊन भूमीवर संचार करून यानें मोठा धुमाकूळ उडविला होता; परंतु याला मारून तूं लोकांच्या सौख्यमार्गांतील एक कांटाच नाहींसा केलास यांत संशय नाहीं. बाबारे, या पापी अश्वासुराला मारून वृंदावनाला तूं सुखासमाधानाची जोड करून दिलीस. कृष्णा, आतां या वनामध्यें पशुपक्षी व माणसें सुखानें संचार करतील. आमचे बरेच गोप व वत्सांवर अत्यंत प्रेम करणाऱ्या गाई या दुरात्म्यानें मारल्या; एवढेंच नाहीं तर दूरदूरच्या दुसऱ्या देशांतही यानें असाच उच्छाद दिला होता. या जगतांतील सर्व माणसें मारून आपल्याला यथेच्छ संचार करतां यावा एतदर्थ जणूं काय, या पापिष्ठानें जगत्प्रळय करण्याचा उद्योग आरंभला होता. जीवाची आशा ठेवून देवांपैकीं देखील कोणाचीही याचेसमोर उभें राहण्याची प्राज्ञा नव्हती. मग पृथ्वीवरील यःकश्चित् माणसांचा पाड काय?

इतक्यांत आकाशांत देखील संचार करण्यास समर्थ असलेले नारद मुनि गुप्त राहूनच कोणासही न दिसतां ह्मणाले “ हे विष्णो, हे देवाधिदेवा कृष्णा, मी तुजवर प्रसन्न झालों आहे. ”

नारद पुढें म्हणतातः---केशीला मारण्याचें जें दुष्कर कृत्य तूं आज केलेंस तें एक तूंच अगर स्वर्गांतील शंकरच करूं जाणे ! बाबारे, तुझ्या ठिकाणीं माझे चित्ताचा लय लागलेला असल्याकारणानें, तुझें व केशीचें युद्ध पहाण्यासाठीं मी स्वर्गाहून येथें आलों. पूतनावधादिक तुझीं यापूर्वींचीं सर्व अलौकिक कृत्यें मीं प्रत्यक्ष पाहिलींच आहेत. परंतु गोविंदा, तुझें हें आजचें कर्म पाहून मला अत्यंत संतोष झाला आहे. प्रसंगीं आपलें शरीर अत्यंत भयंकर करूं शकणाऱ्या दुष्ट केशीपुढें बलीला मारणारा महासमर्थ इंद्र देखील चळचळां कांपे. ज्याचें पेर अतिशय दांडगें अशा बाहूच्या बळानें तूं केशीला फाडलेंस. याच रीतीनें त्याचा मृत्यु घडून यावा अशी ब्रह्मदेवाची योजना होती. ज्या अर्थीं तूं केशीचा वध केलास, त्या अर्थीं मीं आज्ञा करतों ती ऐक. केशव या नांवानें तूं यापुढें जगतामध्यें प्रख्यात होशील. तुझें कल्याण असो ! त्वरित गमन करणारा मी आतां जातों. तुझ्या अवतारकृत्यांपैकीं बाकी राहिलेलीं कार्यें करण्यास तूं पूर्णपणें समर्थ आहेस. तरी आणखी उशीर न लावतां तीं करण्याच्या मार्गालाही तूं लाग. तूं दुसऱ्या कार्यांत गुंतल्याकारणानें तुझ्या बलाचा आश्रय करून राहिलेले देव, मनुष्यरूपानें बाललीला करून तुझें अनुकरण करीत आहेत. भारतीययुद्धाची वेळ नजीक आली आहे. स्वर्गाला जावयाच्या राजांचीं युद्धें होण्याचा काळ हातांत आल्यासारखा जवळ ठेपला आहे. विमानांत बसून स्वर्गाला जाणाऱ्या लोकांसाठीं आकाशांतील रस्ते झाडून स्वच्छ केले आहेत. इंद्रलोकामध्यें, राजांसाठीं पृथक् पृथक् जागा तयार करण्याचें काम चालू आहे. उग्रसेनाचा पुत्र जो कंस त्याचा तुझ्याहातून वध झाल्यावर, केशवा, तुला राज्यपदाचा अभिषेक होईल. नंतर राजे लोकांचें मोठें युद्ध होईल. तुझें सामर्थ्य अलौकिक असल्यामुळें, पांडव तुझा आश्रय करून रहातील. राजांची फूट होण्याची वेळ आली म्हणजे तूं पांडवांचा पक्ष घेशील. तूं राजासनावर बसलास म्हणजे, बाकीचे राजे आपआपल्या राज्यलक्ष्मीचा तुझ्या प्रभावामुळें त्याग करतील यांत शंका नाहीं. जगदीशा कृष्णा, या निरोप श्रुतीमध्यें पूर्वींच ग्रथित होता. तो मी प्रकटपणें तुला सांगितला. यामुळें तो आतां सर्व जगभर व स्वर्गलोकीं देवांमध्यें प्रसिद्ध होईल. हे प्रभो, मीं तुझें अलौकिक सामर्थ्य आतांच प्रत्यक्ष पाहिलें. तसेंच तुझें दर्शनही मला झालें. मी आतां जातों. कंसाला तूं मारलेंस म्हणजे मी पुन्हां येईन.

इतकें बोलून, नारद आकाशमार्गानें निघून गेले. देवांच्या संगीताचा जनक जो नारद त्याचें वरील भाषण श्रवण करून 'तथास्तु,' असें कृष्णानें म्हटलें; व पुनरपि तो गोपांमध्यें येऊन मिळाला. कृष्ण परत येऊन पोंचतांच सर्व गोप व्रजामध्यें शिरले.

## अध्याय पंचविसावा.

—:०:—

### अक्रूरागमन.

वैशंपायन सांगतातः---इकडे कंसाची आज्ञा घेऊन अक्रूर श्रीकृष्णाला आणण्याकरितां मथुरेहून निघाला, तों वाटेंत संध्याकाळ झाली. किरणांची प्रखरता कमी होऊन भगवान् सहस्ररश्मी अस्तास गेला. नभोमंडल संध्यारागानें तांबडें लाल झालें. चंद्रबिंब फिकट फिकट दिसावयास लागलें. पक्षी आपआपल्या घरट्यांत जाऊन बसले. अग्निहोत्री लोकांनीं आपले अग्नि प्रज्वलित केले. सर्व दिशा किंचित्

अंधकारानें व्याप्त झाल्या. गौळवाड्यांतील लहान मुलांची निजानीज झाली. भालू ओरडूं लागल्या. मांस भक्षणासाठीं जिभा चाटणाऱ्या नक्तंचर प्राण्यांना रात्र पडल्यामुळें मोठा आनंद झाला. दिवसभर उन्हांत तापलेल्या इंद्र-गोपांना रात्र आली तेव्हां साहजिकच आनंद वाटला. प्रदोषकाळ आलासा पाहातांच विद्यार्थ्यांनींही वेदाध्ययन बंद ठेविलें. प्रदोष आलासा पाहून रविराजानें संध्यारूपी अंधाऱ्या गुहेमध्यें जणूं दडी मारली आहे कीं काय असें वाटलें. गृहस्थांची अधिश्रयणाची (होमाचें दूध अग्नीवर ठेवण्याची) वेळ झाली. वानप्रस्थाश्रमी जन नीवारादि धान्यांनीं मंत्रोक्त हवन करूं लागले. वनामध्यें चरावयास सोडलेल्या गाई आपआपल्या गोठ्यांत नुकत्याच परत येऊं लागल्या होत्या, त्यांचें गवळी लोक दूध काढूं लागले. ज्या गाईचीं वासरें बांधून ठेवलेलीं होतीं, त्या एकसारख्या हंबरूं लागल्या. कांहीं गवळी हातांत दावीं धरून मोठमोठ्यानें गाईना हाका मारीत होते. कांहीं जण गाईना बांधण्यासाठीं दाव्यापाशीं नेत होते. कांहीं गोप खांद्यांवर घेतलेल्या भल्या मोठ्या लांकडांच्या मोळ्यांमुळें लवत, कांपत नुकतेच घरीं परत आले होते, ते गोठ्यामध्यें जिकडे तिकडे गोमयाचा चूर पेटवूं लागले. हलके हलके चंद्रप्रकाश चांगला दिसूं लागून रजनीनाथ आपल्या शीतल किरणांनीं आकाशामध्यें झळकूं लागला. दिवस पार नाहींसा होऊन हलके हलके थोडथोडी रात्र पडूं लागली. दिवस संपल्यामुळें सूर्यप्रकाश अगदीं नाहींसा झाला होता. रात्रीला नुकतीच सुरवात होऊन चंद्राचें तेज चमकूं लागलें होतें. त्या वेळीं अग्निहोत्र्यांचें हवन कडाक्यानें सुरू झालें. व चंद्रमा दुसऱ्या दिवशीं असलेल्या मृगशीर्ष नक्षत्रांवर प्राप्त झाला[1]. रात्र (विशेषतः रात्रीचें अग्रमुख) अग्नि व सोम यांचे योगानें प्रकाशित होते. म्हणून त्या वेळीं भोक्तृभोग्यात्मक अखिल जगत्, अग्नीषोमात्मक रात्रीच्या पहिल्या प्रहराचा अनुभव घेत होतें; असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें त्या वेळीं आकाशामध्यें थोड्याशा तारका कोठें कोठें मधून मधून चमकत होत्या. पश्चिमेच्या बाजूला नभोमंडळ अग्नीप्रमाणें शोभत होतें व पूर्वेकडे त्याचा रंग रक्तकमलाप्रमाणें दिसत होता. त्यामुळें, सर्व आकाश जणूं काय एखाद्या पेटलेल्या पर्वताप्रमाणें भासूं लागलें. इतक्यांत, परगांवीं दूर गेलेले प्रियजन आपल्या आप्तेष्टांस भेटणार असें सुचविणारे पक्षी व्रजामध्यें जाऊं लागले. त्यांचे बरोबर दानपति अक्रूर हा शीघ्रगामी रथामध्यें बसून गर्दीगर्दीनें व्रजाप्रत प्राप्त झाला. अक्रूर व्रजांत येऊन ठेपतांच, 'श्रीकृष्ण कोठें आहे? रोहिणीचा पुत्र बलराम कोठें रहातो! नंद काय करीत आहे?' इत्यादि प्रश्न तो एकसारखा गोकुळवासी जनांना करूं लागला. देवाप्रमाणें महासमर्थ असलेला तो अक्रूर नंदाच्या गृहासमीप येतां क्षणींच, रथांतून खालीं उतरला आणि निवास करण्याच्या उद्देशानें त्यानें नंदाच्या वाड्यांत प्रवेश केला. आपणांला आज कृष्णदर्शन होणार म्हणून अक्रूराला अत्यंत हर्ष होऊन त्याचें मुख प्रफुल्ल झालें होतें व नेत्रांतून आनंदाश्रु चालले होते. नंदाच्या घरामध्यें प्रवेश करतांना, दारांतच गाईचें दोहन चाललें होतें, त्या ठिकाणीं वासरांमध्यें श्रीकृष्ण बसलेला होता; तो अक्रूराच्या दृष्टीस पडला. सभोंवतीं वासरें असून मध्यें एखादा वृषभ असावा, त्याप्रमाणें श्रीकृष्ण शोभत होता. त्याला पाहून धर्मवेत्ता

१ पूर्वी सांगितल्याप्रमाणें कंसाला हा योग अनिष्ट होता.

अक्रूर हर्षयुक्त व सद्गदित वाणीनें म्हणाला' " बा केशवा, बाळा इकडे येरे. " जगताचा संहार झाल्यानंतर श्रीकृष्णपरमात्मा वटपत्रावर पाठ टेंकून शयन करितो. नंतर दुष्टांचा संहार करण्याकरितां, त्रैलोक्य आक्रमण करण्याच्या शक्तीनें युक्त होऊन तोच वामन रूपानें अवतीर्ण होतो. त्या परमात्म्याचें तें पौगण्डरूप पाहून अक्रूरानें स्तवन करण्यास आरंभ केला. " देवा, तूं सिंव्ह व व्याघ्र यांच्याप्रमाणें पराक्रमी आहेस. तुझी कांति जलपूर्ण मेघासारखी आहे. हिमाचलाप्रमाणें तुझी आकृति आहे. तुझें वक्षःस्थळ श्रीवत्सचिन्हानें युक्त असल्याकारणानें संग्रामांत तुझ्या वक्षःस्थलावर प्रहार करण्याची कोणाचीही प्राज्ञा नाहीं. शत्रूंचा निःपात करण्याला, तुझ्या भुजा पूर्णपणें समर्थ आहेत. उपनिषदांमध्यें ज्या पुरुषाचें वर्णन केलें आहे, व जगतामध्यें जो अग्रपूजेच्या मानाला योग्य आहे, तो पुरुष तूंच. भक्तांचें दर्शन होतांच ज्याच्या अंगावर रोमांच उभे रहातात, तो कमललोचन श्रीविष्णु प्रत्यक्ष तूंच आहेस. केवळ भक्तांना तारण्याकरितां तूं सांप्रत गोपरूपानें अवतीर्ण झाला आहेस. तुझ्या मस्तकावर छत्राप्रमाणें किरीट शोभत असून कर्णांमध्यें उत्तम व योग्य अशीं कुंडलें झळकत आहेत. तुझें वक्षःस्थळ पुष्ट व प्रशस्त असून हार धारण करण्यास अत्यंत युक्त आहे. दीर्घ व वाटोळ्या दोन भुजांनीं तूं फार शोभिवंत दिसत आहेस. तुझ्या शरीरामध्यें नुकतेंच मदनाचें ठाणें बसत असून सहस्रावधि स्त्रिया तुझी सेवा करण्यासाठीं उत्सुक आहेत. तूं दोन पीत वस्त्रें परिधान केलीं आहेस. खरोखर, तूं सनातन विष्णूचाच अवतार आहेस यांत शंका नाहीं. पूर्वीं प्रलयकालीं वटपत्रावर शयन करून हे अरिंदमा, तूंच आपल्या पायांचा आधार देऊन पृथ्वीचें रक्षण केलें. पुढें वामन अवताराचे वेळीं आपल्या पावलांनीं तूं त्रैलोक्य व्यापून टाकलेंस व तोच तूं सांप्रत कृष्णरूपानें अवतरला आहेस. तुझा उजवा हात सुंदर असून चक्रचिन्हानें युक्त आहे. तसेंच दुसरा वर उचललेला डावा हातही गदेच्या संयोगाची इच्छा करीत आहे असें वाटतें. हे त्रिदशधुरंधरा कृष्णा, तूं सांप्रत जगाच्या कल्याणासाठीं भूलोकीं अवतीर्ण झाला आहेस; तुझें हल्लींचें स्वरूप खरोखर अत्यंत मनोहर दिसत आहे. हे श्रीकृष्णा, तूं क्षीण झालेल्या यादववंशाचा विस्तार करशील, असें भविष्यवादी ज्योतिषांनीं पूर्वींच वर्तवून ठेविलें आहे. उदकाचे प्रवाह सर्व बाजूंनीं येऊन ज्याप्रमाणें महासागर भरून टाकतात, त्याप्रमाणें तूं आपल्या तेजानें सहस्रावधि यादव उत्पन्न करून यदुवंशाचा उद्धार करशील. हें अखिल जगत् चिरकाल तुझ्या शासनांत राहील. सर्व शत्रूंचें निर्दलन होऊन कृतयुगाप्रमाणें हें विश्व सुखानें नांदेल. सर्व जगताला आपल्या मुठींत ठेवून तूं सर्व राजांच्या वर होशील. परंतु तूं मात्र राज्यपदाचा स्वीकार करणार नाहींस. पूर्वीं तीन पावलांनीं त्रैलोक्य जिंकून ज्याप्रमाणें तूं इंद्राची राज्यपदावर स्थापना केलीस, त्याप्रमाणें एकवार जिंकलेलें त्रैलोक्य पुनः तसेंच जिंकून तूं उग्रसेनाला फिरून राज्यपद प्राप्त करून देशील यांत शंका नाहीं. तूं उत्पन्न झालेल्या वैराचा शेवट करतोस. प्रश्नोपनिषदांत तुझेंच स्तवन केलें असून ब्रह्मवादी ब्राह्मण तुझेंच चरित्र गातात. पुराणांतरीं देखील तुझेंच गायन केलेलें आहे. मानवांचा उद्धार करण्याकरितां, मनुष्यरूपानें ज्या अर्थीं तूं अवतीर्ण होण्याचें मनांत आणिलेलें दिसत आहे, त्या अर्थीं हे केशवा, तुझें चरित्र अत्यंत स्पृहणीय

१ सोईसाठीं मीं द्वितीय पुरुषी प्रयोग केला आहे.

होईल असें वाटतें. असो. आज मी तुझी यथाविधि पूजा करीन; तूं प्रत्यक्ष विष्णु आहेस, म्हणून मी तुझी मंत्रोक्त मानसपूजा करीन. मी व दुसरे जे दिव्यदृष्टि पुरुष आहेत, त्यांनीं तूं अमानुष आहेस हें ओळखलें आहे. तसेंच तुझी जात व तूं मनुष्यावतार घेण्याचें कारणही आम्ही जाणतों."

पुढें अक्रूर आपल्या मनाशीं म्हणाला, "आज रात्रीं शहाण्या कृष्णाशीं खलबत करून त्याची संमति मिळाली तर सर्व व्रज बरोबर घेऊन मी येथून मथुरेला प्रयाण करीन."

याप्रमाणें पुष्कळ प्रकारें सारासार विचार केल्यानंतर, कृष्णाला बरोबर घेऊन अक्रूर नंदानें बोलावलेल्या सभेंत गेला.

## अध्याय सव्विसावा.

—:०:—

### नागलोककथन.

वैशंपायन सांगतातः—श्रीकृष्णाला बरोबर घेऊन नंदाच्या गृहामध्यें प्रवेश केल्यानंतर, त्या दानशौंड अक्रूरानें गोकुळांतील सर्व वृद्ध वृद्ध गवळी एकत्र जमविले. आणि त्यांचे समक्ष संकर्षणासहवर्तमान बसलेल्या श्रीकृष्णाला उद्देशून तो मोठ्या ममतेनें म्हणाला " बाबांनो, उदयीक आपण सर्वजण मौजेसाठीं मथुरेला जाऊं. व्रजवासी सर्व गवळी देखील कंसराजाची आज्ञा झाल्यावरून आपआपले ठरलेले वार्षिक कराचे पैसे घेऊन सपरिवार तिकडे यावयाचे आहेत. त्या ठिकाणीं एक मोठा धनुर्यज्ञ करण्याचें कंसानें योजिलें आहे. तो तुम्हांस पहावयास सांपडून शिवाय तिकडे आल्यानें तुमच्या व आप्तेष्टांच्या गांठी पडतील. तुमचा पिता जो वसुदेव त्याचे पुत्र कंसानें मारल्यामुळें त्याची अत्यंत दीन व कष्टतर स्थिति झाली आहे. फार काय सांगावें, तो निरंतर दुःखांत आहे. तुम्ही मथुरेला आलां म्हणजे त्याची तुम्हांला भेट घेतां येईल. खरोखर आधींच दुःखानें खिळखिळा झालेल्या व उतारवयामुळें अस्थिचर्म राहिलेल्या त्या वृद्ध वसुदेवाला तो दुष्टबुद्धि कंस सतत पीडा देत असतो, ह्मणून त्या कंसाच्या भयानें तो अगदीं त्रासून गेला आहे. त्यांतही त्याला तुमच्यासारखे पुत्र असून ते पारखे झाले आहेत; त्याकारणानें तुमच्या भेटीसाठीं तो उत्कंठित असून त्याचा अंतरात्मा रात्रंदिवस तळमळत आहे. त्याचप्रमाणें हे गोविंदा, तूं तेथवर आलास म्हणजे ठकलेल्या व निस्तेज झालेल्या देवकी देवीचेंही तुला दर्शन घेतां येईल. जन्मापासून तिच्या पुत्रांची व तिची ताटातूट झाल्यामुळें तिच्या स्तनांतील दुग्ध जसेंच्या तसें राहिलें आहे. पुत्रशोकानें ती अगदीं रोड झाली असून तुझ्या भेटीसाठीं फार आतुर झाली आहे. पुत्रवियोगाच्या दुःखामुळें ती संतप्त झाली असून वत्सावांचून हंबरणाऱ्या गाईप्रमाणें तिची दीनवाणी स्थिति झाली आहे. हे कृष्णा, तुझ्या दीन झालेल्या मातेचे नेत्र खोल गेले असून राहुमुखानें ग्रासलेल्या चंद्राच्या कांतीप्रमाणें ती निस्तेज दिसते. ती नेहमीं मलिन वस्त्रें परिधान करिते. तुझे दर्शनावांचून तिला दुसरा ध्यास नाहीं. तूं केव्हा येशील याची ती एकसारखी वाट पहात बसली आहे. ती तपस्विनी तुझ्याबद्दलच्या दुःखानें अत्यंत कष्टी झालेली आहे. तुझी व तिची जन्मादारभ्य ताडातोड झाल्यामुळें, तुझे बोबडे बोल तिच्या केव्हांहि कानीं पडले नाहींत. खरोखर, हे प्रभो, तुझा हा मुखचंद्र किंवा तुझें रूप देखील तिनें डोळे भरून पाहिलें नाहीं. बाबारे, तुझ्यासारखा पुत्र देवकीला झाला असून तिची ज्या अर्थीं अशी दीन स्थिति झाली आहे, त्या अर्थीं तिला अपत्या-

पासून कांहींएक उपयोग नाहीं असें म्हटलें पाहिजे. यापेक्षां तिला मुळींच पुत्र झाले नसते तरी फार बरें झालें असतें. निपुत्रिक स्त्रियांना फक्त एकच दुःख असतें. परंतु पुत्रवतीचा मुलगा जर तिच्या उपयोगीं पडला नाहीं तर तें दुःख काय सांगावें! धिक्कार असो, कीं पोटीं पुत्र असून त्यामुळें तिला ताप होतो! खरोखर देवकीच्या पोटीं तूं इंद्रासारखा पुत्र जन्मास आला आहेस. गुणांनीं तुझी कोणीहि बरोबरी करूं शकणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर तूं दुसऱ्या लोकांचीं संकटें निवारण करून त्यांना अभय देतोस. असें असतां तुझ्या मातेनें दुःखांत असावें, हें खरोखर अनुचित होय. तुझ्या वृद्ध मातापितरांना दुसऱ्याचें दास्य करण्याचा प्रसंग आला आहे; व दुष्टबुद्धि कंस, तुझ्यासाठीं त्यांचा नेहमीं छल करीत आहे. जर सर्वांना आधार देणाऱ्या भूमातेप्रमाणें देवकी तुला पूज्य असेल, तर दुःखसागरांतून तिची मुक्तता करणें हें तुझें कर्तव्य आहे. पुत्रवेडा वृद्ध वसुदेव वास्तविक सुखांत असावा ( पण तुझ्या वियोगानें तो दुःखी आहे ). म्हणून हे कृष्णा, तूं जर वसुदेवाला येऊन भेटशील तर तुझ्या हातून मोठा धर्मच घडणार आहे. ज्याप्रमाणें तूं यमुना नदीच्या डोहांत कालियाचें दमन केलेंस, किंवा गोवर्धन पर्वत भूमीवरून वर उचललास, अथवा मदोन्मत्त बलिष्ठ अरिष्टासुराचा वध केलास, किंवा दुसऱ्यांच्या प्राणावर उठलेल्या केशी नामक दुष्ट अश्वाला मारून टाकलेंस त्याप्रमाणें जर तूं आपल्या दुःख भोगीत असलेल्या वृद्ध मातापितरांना कंसाच्या त्रासांतून सोडवशील तर बा श्रीकृष्णा, तूं केवढा मोठा धर्म जोडशील याचा तूंच विचार कर. कंसानें भर सभेंत तुझ्या पित्याची कशी निर्भर्त्सना केली हें ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें त्या सर्वांना अत्यंत दुःख होऊन त्यांच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. कृष्णा, कंसाच्या तडाक्यांत सांपडल्यामुळें तुझी माता देवकी उपजत गर्भ कंसानें कापण्यासारखीं अनेक दुःखें निमूटपणें सोशीत आहे. आपल्या आईबापांचें ऋण फेडणें हें प्रत्येक पुत्राचें कर्तव्य आहे असें शास्त्रांत सांगितलें आहे. म्हणून हे अनघा कृष्णा, जर तूं आपल्या मातापितरांवर एवढा अनुग्रह केलास, तर त्यांचा शोक नाहींसा होऊन तुला मोठा धर्म घडेल."

वैशंपायन सांगततातः---अक्रूरानें सांगितलेला वृत्तांत कृष्णाला आधीं माहीत होताच. त्यामुळें त्याला ही हकीकत ऐकून मुळींच क्रोध आला नाहीं. "ठीक आहे" इतकेंच उत्तर, त्या पराक्रमी अक्रूराला तेजस्वी श्रीकृष्णाकडून मिळालें.

इकडे अक्रूराचें भाषण ऐकतांच, नंदादि वृद्ध गोप एकत्र जमले आणि कंसाची आज्ञा शिरसावंद्य मानून त्यांनीं निघण्याचा निश्चय केला. लौकरच सर्व व्रजवासी लोकांनीं जाण्याची तयारी केली, आणि करभाराच्या रकमेची व कंसाला द्यावयाच्या नजराण्याची जुळवाजुळव करून ते मथुरेला निघाले. आपआपल्या सामर्थ्याप्रमाणें व गोसंख्येच्या मानानें कंसाला अर्पण करण्यासाठीं करभार, बैल, टोणगे, व दूध, तूप, दहीं इत्यादिक तयार करून, सर्व गोपपति निघण्यासाठीं सज्ज झाले. कृष्ण व बलराम यांचे बरोबर अक्रूर रात्रभर गोष्टी बोलत बसला होता. शेवटीं बोलतां बोलतां निर्मळ प्रभातसमय प्राप्त झाला. रात्र संपल्यामुळें, चंद्रकिरणांचें तेज नाहींसें झालें. नाना तऱ्हेच्या पक्ष्यांचा किलबिलाट सुरू झाला. नभोमंडल अरुण वर्णानें व्याप्त झालें. ग्रह दिसेनासे झाले. उषःकालच्या आर्द्र वायूच्या योगानें भूतलाला ओल-

सरपणा आला. लहान लहान नक्षत्रांचें तेज नाहींसें झाल्यामुळें त्यांनीं जणूं काय आकाशरूपी शय्येवर शयनच केलें. सूर्य उगवल्यामुळें, रात्रीचीं सर्व चिन्हें लोपून गेलीं. आणखी थोडा वेळ जातांच, चंद्राचें किरण पार मावळून तो अगदीं निस्तेज झाला. एका वस्तूचा नाश होत असतो, तर त्याच वेळीं दुसरी उदयास येते. ( हा जगतांतील न्यायच आहे व तो प्रत्यहीं अनुभवास येतो. )

असो, याप्रमाणें उजाडतांच व्रजांतील सर्व गुरें बाहेर पडलीं. घरोघर ताकाच्या डेऱ्यांतून नाद निघूं लागले. गुराख्यांनीं वांसरें व तरणीं गुरें दाव्याला बांधून टाकलीं. चोंहोकडचे रस्ते गोपांच्या गर्दीनें भरून गेले. सर्व सामानसुमान एका भल्या मोठ्या गाड्यावर घातलें होतें व सभोंवतीं गोप उभे होते. इतक्यांत श्रीकृष्ण, संकर्षण व दानपति अक्रूर हे तिघे रथारूढ होऊन पुढें चालू झाले. त्या वेळीं हे त्रैलोक्याचे राजेच चालले आहेत कीं काय असें वाटलें. यमुनेच्या तीरावर रथ येऊन पोंचतांच अक्रूर श्रीकृष्णाला म्हणाला, “ बाबारे, जरा या घोड्यांवर लक्ष ठेवून रथाकडे पाहा. घोड्यांना दाणापाणी देऊन अश्वभूषणांचें व रथाचें सावधपणानें एक क्षणभर रक्षण कर. तोंपर्यंत या यमुनानदीच्या डोहांतील सर्व लोकांचा नाथ जो सर्पराज, त्याचें मी भागवतमंत्रांनीं स्तवन करतों. तो गुह्य भागवत देव सर्व विश्वाचा स्रष्टा असून त्याचे मस्तकावर स्वस्तिक चिन्ह आहे; त्या सहस्रशीर्ष नीलांबरधारी सर्पराज अनंताला मी प्रणाम करण्यास जात आहें. तो नागपति धर्माचा अधिष्ठाता असून त्याचे ठिकाणीं असलेलें विष परमात्म्याच्या अनुग्रहानें अमृतासारखें झालेलें आहे. तें मी देवांप्रमाणें प्राशन करीन. शेषराज शांतीसाठीं सर्पांची परिषद् भरविणार आहे. तेथें श्री व स्वस्तिकचिन्ह यांनीं युक्त असलेल्या त्या द्विजिव्ह सर्पराजाचें मी दर्शन घेऊन यमुनाडोहांतून परत येईपर्यंत, तुम्ही उभयतां माझी वाट पहात बसा. ”

अक्रूराचें भाषण ऐकून श्रीकृष्णानें प्रत्युत्तर दिलें. “ हे धर्मज्ञा, तूं जा; पण उशीर न लावतां लवकर परत ये. कारण आमच्यानें हें काम झेंपण्यासारखें नाहीं. ”

यावर लागलीच दानपती अक्रूरानें यमुनाडोहांत उडी मारली; तों तळाशीं, भूलोकाप्रमाणें नागलोक त्याच्या दृष्टीस पडला. तेथें सहस्रशीर्ष नागराजाचें त्याला पवित्र दर्शन झालें. उंच स्वर्णमय तालवृक्ष हा त्याचें ध्वजचिन्ह असून त्यानें हातामध्यें नांगर घेतला होता व त्याचे उदरावर मुसळ लटकत होतें. त्यानें नीलवस्त्र परिधान केलें असून त्याचें आसन श्वेतवर्णाचें होतें. त्याच्या शरीराची कांतिही शुभ्र असून, त्यानें कर्णांत एकच कुंडल धारण केलें होतें. तो मत्त व सुप्त असून त्याचे नेत्रकमलासारखे होते. तो आपल्या शरीराचीं वेटोळीं करून बनविलेल्या शुभ्र आसनावर लीलेनें बसला होता. त्याचे शिरावर दोन अति सुंदर स्वस्तिकचिन्हें असून त्यावर, त्यानें सर्व पृथ्वी तोलून धरली होती. त्याचें मस्तक किंचित् डावे बाजूला झुकलेलें असून सुवर्णाच्या चूडेनें फारच शोभिवंत दिसत होतें. त्याच्या वक्षःस्थळावर सुवर्णकमळाची माळ रुळत होती. त्याचे शरीरभर रक्तचंदनाची उटी लावलेली होती. त्याचे बाहु दीर्घ असून नाभीचे ठिकाणीं कमळ होतें. त्या अरिंदमाची अंगकांति शुभ्र अभ्रासारखी असून त्यामुळें त्याचें तेज चोंहोंकडे फांकलें होतें. तो सर्पराज, सर्वव्यापी एकार्णवाचा अधिपति असून वासुकि वगैरे सर्व प्रमुख सर्पगण त्याचें पूजन करीत होते. कंबल

व अश्वतर नामक दोघे नाग हातांतील चवऱ्या धर्मासनावर बसलेल्या आपल्या प्रभूवर ढाळीत होते. कर्कोटक–प्रभृति सचिवांसहवर्तमान पन्नग–राज वासुकि त्याचे समीपच स्थित होता. सागराच्या जलानें जरी त्याला एकसारखें स्नान घडत होतें, तरी त्याचे सेवक कमळांनीं झांकलेल्या सुवर्णकलशांनीं आपल्या राजाला पुनरपि अभिषेक करीत होते. त्या सर्पराज शेषाच्या अंकावर हृदयावरील श्रीवत्सचिन्हानें शोभिवंत दिसणाऱ्या पीतांबरधारी घनश्याम श्रीविष्णूनें शयन केलें होतें; त्याकारणानें अक्रूराला भगवंताचेंही तेथें दर्शन घडलें. त्या ठिकाणीं आसनाशिवाय भूमीवर बसलेला दुसरा एक प्रभु त्याचे दृष्टीस पडला. त्याची कांति चंद्रासारखी असून तो श्रीकृष्णासारखा दिसत होता. हा चमत्कार पाहून अक्रूरानें एकदम तेथील कृष्णाला उद्देशून बोलण्याचा उपक्रम केला. परंतु प्रभूनें आपल्या सामर्थ्यानें त्याच्या वागिंद्रियाचेंच स्तंभन केलें असा अनुभव येतांच अव्यक्त, भगवद्भक्त, जो शेषराज त्याचें नुसतें दर्शन घेऊन दानशूर अक्रूर जलांतून वर आला. तो अद्भुत रूपानें युक्त असलेले रामकृष्ण रथांतच बसलेले असून एकमेकांकडे पहात आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. म्हणून पुनः जिज्ञासेनें, अक्रूरानें जलांत बुडी मारली आणि नीलवस्त्र परिधान केलेल्या श्वेतमुखी शेषाचें ज्या ठिकाणीं पूजन चाललें होतें तेथें तो गेला. तों तेथेंही पुनःसहस्रमुखी शेषाच्या उत्संगावर पूज्य कृष्णप्रभु अक्रूराच्या नजरेस पडला. तेथून पुनः दानपति अक्रूर जो निघाला तो तडक आल्या मार्गानें आपल्या रथाजवळ आला. हा काय चमत्कार असावा हीच गोष्ट येतांना एकसारखी त्याचे मनांत घोळत होती. अक्रूर परत येऊन रथावर बसतांच कृष्णाला फार आनंद झाला व त्यानें अक्रूरास पुसलें " भगवद्भक्ताच्या डोहामध्यें नागलोकीं आपण काय काय पाहिलें ? आपणांला परत यावयास बराच वेळ लागला आणि आपलें चित्तही स्थिर दिसत नाहीं, यावरून, कांहीं तरी मोठा चमत्कार त्या ठिकाणीं आपल्या दृष्टीस पडला असावा, असें मला वाटतें "

यावर अक्रूरानें कृष्णाला उत्तर दिलें, " तुझ्यावांचून या स्थावरजंगम सृष्टीमध्यें दुसरा कोणता चमत्कार असणार ? कृष्णा, या भूलोकीं दृष्टीस पडण्याला फार दुर्लभ असें आश्चर्य मीं त्या ठिकाणीं पाहिलें. परंतु तेंच आश्चर्य मला येथेंही दिसत आहे व त्यामुळें मी परमानंदाचा अनुभव घेत आहें. त्रैलोक्यांतील मोठें आश्चर्य मूर्तिमंत मजपुढें उभें आहे. आतां हे कृष्णा, यापेक्षां निराळें आश्चर्य पहाण्याची मला इच्छाच होत नाहीं. असो. हे प्रभो आतां चलावें, म्हणजे आपण सूर्य अस्ताला गेला नाहीं तोंच कंसाच्या राजधानीप्रत जाऊन पोहोंचूं.

## अध्याय सत्ताविसावा.

—:०:—

### धनुर्भंग.

वैशंपायन सांगतातः—अक्रूर इतकें बोलतांच, त्या सर्व अतुल तेजस्वी वीरांनीं आपला सुंदर रथ जोडून कृष्ण व बलराम यांसह पुढील मार्ग आक्रमण करण्यास सुरवात केली. थोडक्याच वेळांत ते कंसाच्या रमणीय राजधानीपाशीं येऊन पोंचले. पुढें त्यांनीं मथुरेंत प्रवेश केला त्या वेळीं सूर्यबिंब रक्तवर्ण झालेलें होतें. सुबुद्ध अक्रूर, शूर व सूर्यासारख्या तेजस्वी असलेल्या रामकृष्णांना आपल्या घरीं घेऊन गेला व भीत भीत त्या सुंदर बालकांस

ह्मणाला, "बाबांनों,वसुदेवाच्या घरीं जाण्याची इच्छा अजीबात सोडून द्या. कारण तुमच्याकरितां कंस राजा तुमच्या वृद्ध पित्याला तुच्छ करीत असतो. रात्रंदिवस त्यानें वसुदेवाची निर्भर्त्सना चालविली आहे. तूं येथें राहूं देखील नकोस असें ह्मणावयासही त्यानें कमी केलें नाहीं. ह्मणून ह्मणतों कीं, तुमच्या मातापितरांना जेणें करून उत्तम सुख लागेल असें करणें तुमचें कर्तव्य आहे. त्यांना बरें वाटेल असें कांहींतरी हितकर कृत्य तुम्ही करा."

यावर कृष्णानें त्याला उत्तर दिलें "हे धर्मज्ञ वीरश्रेष्ठा, तुला जर पसंत असेल तर आम्ही राजमार्ग व राजधानी पहात पहात, अकल्पित कंसाच्याच घरीं जातों."

वैशंपायन सांगतातः---(कृष्णाचें बोलणें ऐकल्यानंतर तसें करण्यास अक्रूरानें त्यांना परवानगी दिली. व) आपण स्वतः अव्यय कृष्णाचें मनोमय वंदन करून मुदित अंतःकरणानें अक्रूर कंसाकडे गेला. इकडे जाण्याची आज्ञा मिळतांच, बलराम व कृष्ण हे बंधनस्तभांपासून मोकळे झालेल्या व युद्धासाठीं उतावीळ झालेल्या हत्तींच्या छाव्यांप्रमाणें निघाले व राजधानीची शोभा अवलोकन करीत राजवाड्याकडे चालले; तों वाटेत, त्यांना वस्त्रें रंगविणारा एक रजक भेटला. त्याचे पाशीं रामकृष्णांनीं सुंदर वस्त्रें मागितलीं.तेव्हां रजक त्यांना ह्मणाला " अरे वनचरांनो, तुम्ही कोण आहां? मूर्खासारखे मजपाशीं निर्भयपणें राजाचीं वस्त्रें मागतां, तुम्हांला लाज कशी नाहीं वाटत? मी कंसाकरितां निरनिराळ्या देशांत बनणारीं वस्त्रें, शेंकडों तऱ्हेचे त्याचे इच्छेसारखे रंग देऊन तयार करण्याचें काम करतों. तुम्ही कोणत्या रानांत रहातां? बहुत करून तुम्ही पशूंबरोबर वनचरांमध्यें वाढलां असाल. आणि ह्मणूनच मजजवळचें हें लाल वस्त्र पाहून तें आपल्याला पाहिजे अशी तुम्हांला उत्कट इच्छा झाली, असें मला वाटतें. अरे मूर्ख शुंभानो, येथें येऊन तुम्हाला हीं राजाचीं वस्त्रें मागण्याची इच्छा झाली, यावरून तुमचीं शंभर वर्षें पूर्ण भरलीं असें दिसतें."

परंतु त्या अल्पबुद्धीच्या मूर्ख रजकाचींच शंभर वर्षें भरलीं होतीं. त्याचें हें (उन्मत्तपणाचें व) विषतुल्य भाषण ऐकून कृष्णाला फार राग आला आणि त्यानें रजकाच्या डोक्यावर आपल्या वज्रासारख्या हातानें एक तडाखा लगावला. त्यासरशीं रजकाच्या मस्तकाचे तुकडे तुकडे होऊन तो गतप्राण होऊन धाडदिशीं भूमीवर पडला. आपला पति मृत्युवश झाला असें पाहून रजकाच्या स्त्रिया मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागल्या. त्यांनीं आपले केंस मोकळे सोडले आणि झालेलें वृत्त कथन करण्याकरितां त्वरित कंसाच्या वाड्याकडे धांव घेतली.

इकडे रजकाजवळचीं तीं उत्तम वस्त्रें परिधान करून आतां फुलांच्या माळा पैदा करण्याकरितां ते बलराम व कृष्ण फुलबाजाराकडे जाणाऱ्या रस्त्यानें निघाले. त्या वेळीं ते मदोन्मत्त हत्तींसारखे दिसत होते. फुलबाजारामध्यें गुणक नांवाचा एक सुंदर, श्रीमान् व गोड गोड बोलणारा माळी रहात होता. त्याचा फुलांचा फार मोठा व्यापार चालत असे. त्याच्या दुकानीं आल्यावर, कृष्णानें न भीतां त्या माळ्याजवळ नम्र शब्दांनीं फुलांच्या माळा मागितल्या. त्या माळ्याची फुलांच्या धंद्यावरच उपजीविका चाललेली होती. रामकृष्णांवर खुष होऊन त्यानें त्यांना यथेच्छ फुलें व माळा दिल्या. शिवाय हें सर्व दुकान आपलेंच आहे असेंही त्या सुंदर कुमारांपाशीं म्हणावयास तो चतुर माळी चुकला नाहीं. त्याची अदबी पाहून कृष्णाला

देखील संतोष वाटला आणि त्या भरांत "माझी लाडकी लक्ष्मी तुझ्या घरामध्यें पुष्कळ संपत्ति आणून घालीन" असा वर त्यानें त्या विनयी गुणकास दिला. असा उत्तम वर मिळतांच बावरून न जातां, गुणकानें खालीं लवून कृष्णाच्या पायांवर मस्तक ठेवलें आणि कृतज्ञतेनें मिळालेल्या वराचा स्वीकार केला. नंतर राम व कृष्ण हे कोणी तरी यक्ष असावेत असा त्या माळ्याचा ग्रह झाला; तेव्हां बरीक त्याला अत्यंत भीति वाटली व त्यामुळें त्याचे तोंडून एक शब्दही निघाला नाहीं.

इतका प्रकार झाल्यानंतर वसुदेवाचे उभय पुत्र राजमार्गानें पुढें जाऊं लागले, तों कुब्जा नामक राजाची दासी हातांत अनुलेपनपात्र घेऊन त्याच रस्त्यानें चालली होती ती त्यांच्या दृष्टीस पडली. तिला उद्देशून कृष्ण म्हणाला "हे कमललोचने, तूं हें अनुलेपनपात्र कोणाकडे घेऊन चालली आहेस तें मला आधीं सांग पाहूं?" विद्युल्लतेप्रमाणें कुटिल गतीनें चालणाऱ्या कुब्जेनें हा प्रश्न ऐकून किंचित् स्मित केलें. नंतर तिनें कमलासारख्या सुंदर नेत्रांनीं युक्त व मेघाप्रमाणें गंभीर असलेल्या कृष्णाच्या सन्मुख होऊन प्रत्युत्तर केलें "मी कंसाच्या स्नानगृहाकडे निघालें आहें. हें अनुलेपनपात्र तूंच घे. हे वरानना, हे कमललोचना कृष्णा, तुला पाहतांच माझे मनांत मोठा विस्मय उत्पन्न झाला आहे. हे वीरा, माझ्या हातांतील अनुलेपनपात्र आपल्याला मिळावें, अशी तुला इच्छा झालेली दिसते करितां तूंच हें घे. खरोखर तुझ्यासाठींच तें घेऊन मी येथें उभी आहें; तर हे सुंदरा, इकडे ये. तुझें कल्याण असो. माझ्या अंतःकरणाला तूं अत्यंत प्रिय वाटत आहेस. मी महाराजांची अत्यंत आवडती दासी असून उटीच्या कामाकडे माझी योजना झालेली आहे. मी कोण आहें हें तुला ठाऊक नाहीं त्या अर्थीं तूं कोणी परस्थ असावास. म्हणून तुला विचारतें कीं, हे सौम्य, तूं इकडे कोठून आलास?"

इतकें बोलून कुब्जा गालांतल्या गालांत हंसत, तेथेंच उत्तराची वाट पहात उभी राहिली. तेव्हां श्रीकृष्ण म्हणाला, "आमच्या शरीरांना साजेल असें अनुलेपन आम्हांस दे. हे वरानने, आम्हीं मल्ल असून देशांतराहून या ठिकाणीं आलेले आहों. या राज्यांत मोठ्या थाटाचा व दिव्य धनुर्यज्ञ व्हावयाचा आहे तो पहाण्यासाठीं आम्ही येथवर येण्याचें धाडस केलें आहे."

यावर तिनें कृष्णाला उत्तर दिलें. "तुला पहातांच, माझे मनांत तुझ्याविषयीं फार प्रेम उत्पन्न झालें आहे. यामुळें मी हें राजांनाच साजणारें अनुलेपन तुला अर्पण करीत आहें त्याचा तूंही निःशंकपणें स्वीकार कर."

लागलींच उभयतां रामकृष्णांनीं कुब्जेपासून प्राप्त झालेली उटी आपल्या सर्वांगास लावली. आधींच ते फार सुंदर होते. त्यांत राजयोग्य अनुलेपनाचें चर्चन केल्यामुळें चिखलानें सर्वांग माखून दोन खोंड यमुना नदीच्या घाटावर[1] संचार करतांना दिसावे, तद्वत् उभयतां रामकृष्ण अत्यंत शोभिवंत दिसूं लागले. यानंतर चेष्टा करण्यांत फार चतुर असलेल्या श्रीकृष्णानें आपल्या हाताच्या दोनच बोटांनीं कुब्जेच्या वरील पोंकाला हलकेच स्पर्श केला. त्या योगानें तिचें कुबड

१ येथें 'तीर्थ मी' याचा अर्थ नीलकंठांनीं 'पाण्यांत शिरलेले' असा केला आहे. तो आह्मांस मान्य नाहीं आम्ही त्याचा अर्थ—घाटावर किंवा वाटेवर, उतारावर अशा प्रकारचा करितो.

पार नाहींसें होऊन तिचा देह सुंदर लांबलचक झाला. आणि तिच्या शरीराची काठी लतेसारखी सरळ दिसूं लागली. हा चमत्कार पाहून त्या उत्तुंगस्तनी शुचिस्मितेनें हास्य केलें. कृष्णाविषयीं तिचे मनांत प्रेमाचा उद्भव झाला व त्या भरांत ती सुंदरी म्हणाली " प्रियकरा, ( प्रेमरज्जूंनीं ) मी तुला जखडून टाकलें असतां तूं कोठें निघालास ? येथें थांब आणि माझा स्वीकार कर. " कुब्जेचें हें भाषण ऐकून अव्ययस्वरूपी रामकृष्णांना मोठें आश्चर्य वाटून त्यांनीं एकामेकांच्या हातावर टाळी दिली. त्यांना कुब्जेचे गुण (पूर्वचारित्र) माहीत होते त्यामुळें ते तिच्याकडे पाहून हंसूं लागले. नंतर मदनव्यथेनें पछाडलेल्या कुब्जेची कृष्णानें नुसत्या स्मितानेंच समजूत करून तिला पुढें लावून दिलें.

याप्रमाणें कुब्जेपासून सुटका करून घेतल्यावर ते उभयतां राजसभेकडे जावयास निघाले. गोकुलामध्यें हा वेळपर्यंत त्यांचें संवर्धन झालेलें असल्याकारणानें त्यांनीं गोपवेष परिधान केले होते. आपल्या मनांत काय आहे हें त्यांनीं आपल्या चेहऱ्यावरून दिसूं न देतां राजवाड्यासमीप येऊन आंत प्रवेश केला. हिमालयावरील अरण्यांत उत्पन्न झालेल्या सिंहांसारखे ते मदोन्मत्त दिसत होते. नंतर कोणाच्याही दृष्टीस न पडतां ते बालवीर धनुःशाळेंत शिरले. त्या ठिकाणीं ज्या जगद्विख्यात धनुष्याचा यज्ञसमारंभ चालला होता तें पहावें या हेतूनें त्यांनीं आयुधागारावरील कामदारास प्रश्न केला कीं " हे कंसधनुःपालका, आम्ही काय विचारतों तें ऐक. हे सौम्य, ज्या धनुष्याचा यज्ञ सांप्रत येथें कंसानें चालविला आहे तें कोणचें तें तुझी हरकत नसल्यास आम्हांला दाखव. " त्यानें लागलींच तें त्यांस दाखविलें. तें स्तंभासारखें भलें मोठें होतें. इंद्रादि देवांची देखील तें सज्ज करण्याची अथवा त्याचा भेद करण्याची प्राज्ञा नव्हती. परंतु महासमर्थ कमललोचन कृष्णानें त्याला हात घातला व दोन्ही हातांनीं तें सहज लीलेनें वर उचललें. त्या वेळीं त्याचा अंतरात्मा अत्यंत संतुष्ट दिसला. कंसादि दैत्यांचें पूजास्थान होऊन बसलेल्या त्या सर्पाकार धनुष्याला वाटेल तसें व वाटेल तितका वेळ फिरवून झाल्यावर कृष्णानें त्याला दोरी दावून तें पुनः अनेक वेळां वांकविलें. जोरानें वांकवतां वांकवतां, तें विख्यात धनुष्य मधोमध मोडलें व त्याचे दोन तुकडे झाले. याप्रमाणें त्या सर्वोत्तम धनुष्याचा भंग केल्यावर महापराक्रमी व महाचपल कृष्ण बलरामासहवर्तमान तेथून बाहेर पडला. जेव्हां तें धनुष्य मोडलें तेव्हां सोसाट्याचा वारा वाहातांना जसा मोठा शब्द होतो तसा मोठा आवाज झाला. त्या योगानें, सगळें अंतःपुर हालून जाऊन दाही दिशा भरून गेल्या. आयुधगृहांतून निघाल्यावर बलराम व श्रीकृष्ण गोपांमध्यें जाऊन मिसळले.

इकडे शस्त्ररक्षक अत्यंत गोंधळून जाऊन धांवत धांवत कंसापाशीं गेला आणि कावळ्याप्रमाणें धापा टाकीत सांगूं लागला. तो म्हणाला, " धनुर्गृहामध्यें आतांच एक मोठी आश्चर्याची गोष्ट घडली. ती मी आपणांस निवेदन करतों, ऐकण्याची कृपा व्हावी. जो चमत्कार मी आतां सांगणार आहें, तो जगत्प्रलयाप्रमाणेंच अद्भुत आहे. थोडे वेळापूर्वी आयुधागारामध्यें अग्नीसारखे तेजस्वी असे दोन बालवीर माझ्या दृष्टीस पडले. त्यांना कोणाचीच उपमा देतां येण्यासारखी नाहीं. त्यांच्या मस्तकावर केसांच्या पुष्कळ शिखा होत्या. त्यांनीं अनुक्रमें नील व पीत वस्त्रें परिधान केलेलीं असून सर्वांगाला पिवळ्या व पांढऱ्या रंगाची उटी

लावली होती. मला वाटतें त्या देवपुत्रांना वाटेल तो वेष धारण करण्याची शक्ति असून कोणाला न कळत ते अंतःपुरांत शिरले असावे. त्यांचे गळ्यांत सुंदर पुष्पमाळा असून ते मोहक वीर एकाएकीं आकाशांतून अथवा स्वर्गलोकाहून आपल्या धनुर्गृहाचे ठिकाणीं प्राप्त झाले असावे, अशी माझी कल्पना आहे. त्यांच्यापैकीं एकाचे डोळे कमलासारखे असून वर्ण सांवळा होता. त्यानें पीत वस्त्र परिधान केलें असून पिवळ्याच फुलांच्या माळा गळ्यांत घातल्या होत्या. त्यानें देवांना देखील उचलण्यास कठीण असें आपलें येथील तें सर्वोत्कृष्ट धनुष्य लीलेनें हातांत घेऊन त्या लोखंडी यंत्रासारख्या दृढ चापाला गुण लावला आणि एका क्षणांत तें सहज लवविलें. याप्रमाणें तो पराक्रमी मुलगा बाण न लावतां नुसतेंच धनुष्य ओढीत असतां, तें मुठीमध्यें मधोमध मोडून त्याचे दोन तुकडे झाले .त्याबरोबर एक भयंकर आवाज झाला. तेणेंकरून पृथ्वी हादरून गेली. सूर्य दिसेनासा झाला. ( फार काय सांगावें ) धनुष्य मोडतांना झालेल्या आवाजानें नभोमंडल जणूं काय गरगर फिरत आहे असा भास झाला. हा अत्यंत अद्भुत चमत्कार पाहून मला फार आश्चर्य वाटलें. त्या भयंकर शत्रूंची मला मोठी भीति वाटली आणि भयानें गांगरून जाऊन झालेलें वर्तमान महाराजांना कळविण्याकरितां मी इकडे निघून आलों. राजन् , ते अतुलपराक्रमी वीर कोण होते हें मला माहीत नाहीं. एकाची कांति कैलासपर्वतासारखी शुभ्र असून दुसऱ्याचा वर्ण अंजनगिरीप्रमाणें सांवळा आहे. हत्तीनें ज्याप्रमाणें सहज एखादा स्तंभ मोडून टाकावा त्याप्रमाणें त्या श्यामवर्ण बालकानें आपलें सर्वोत्कृष्ट चाप मोडून टाकलें. चापाचे दोन तुकडे केल्यानंतर तो पराक्रमी वीर आपल्या जोडीदारासहवर्तमान वायुवेगानें आयुधागारांतून निघून गेला. महाराज, तो कोण हें मात्र मला ठाऊक नाहीं. ”

याप्रमाणें शस्त्ररक्षकाच्या तोंडून धनुर्भंगाविषयीं साद्यंत वृत्तांत ऐकून घेतल्यानंतर कंसानें त्याला निरोप दिला आणि आपण आपल्या सर्वोत्कृष्ट वाड्याची वाट धरली.

## अध्याय अठ्ठाविसावा.

—:०:—

### कंसवाक्य ( मल्लयुद्धाची तयारी ).

वैशंपायन सांगतातः——भारता, भोजकुलाचा उच्छेद करण्यासाठीं जन्मास आलेला राजा कंस, (एकांतीं जाऊन ) या धनुर्भंगाविषयीं मनामध्यें विचार करूं लागला. त्याचें अंतःकरण गोंधळून गेलें. तोच तोच विचार एकसारखा मनांत घोळूं लागल्यामुळें त्याच्या शोचनीय स्थितीला सीमा राहिली नाहीं. तो स्वतःशीं ह्मणाला “ माझें मोठें थोरलें सैन्य जवळ असतां, त्याला न जुमानतां, तो बालवीर सर्वांच्या देखत निःशंकपणें धनुष्याचे दोन तुकडे करून निघून जातो, याला काय ह्मणावें ? ज्याच्या भयानें पितृभगिनीच्या(सोन्यासारख्या ) सहा वीरपुत्रांचा घात करून मी जगतांतील अत्यंत निंद्य व भयंकर कृत्य केलें तो तर अद्याप जिवंतच आहे. खरोखर जें व्हावयाचें असतें तें मनुष्यानें कितीही यत्न केले तरी चुकणें शक्य नाहीं. नारदानें सांगितलेली प्रत्येक गोष्ट आतां माझ्या डोळ्यांसमोर दिसत आहे. ”

याप्रमाणें विचार करीत, तेथून निघून मंचरचना पहाण्याकरितां, कंस राजा त्वरेनें प्रेक्षागारांकडे[1] निघाला. त्या ठिकाणीं गेल्यावर

१ धनुर्यज्ञ पहाण्याकरितां तयार केलेली जागा. हल्लींचें थिएटर ह्मणावें.

प्रेक्षागार मोठ्या चातुर्यानें तयार केलेलें आहे असें त्या नृपश्रेष्ठाच्या दृष्टीस पडलें.

त्या मंदिरांत मजबूत व सुव्यवस्थित रीतीनें बांधलेलीं अशीं पुष्कळ उच्चासनें एकाजवळ एक ओळीनें तयार केलेलीं होतीं. व त्यांत अनेक लहान लहान सुंदर दालनें केलेलीं असून, चोहों बाजूंनीं सुंदर पाखीं उतरलेलीं होतीं. मधून मधून एकजात उंच सहा खांबी छपऱ्या उचलल्या होत्या त्या योगानें तर तें मंदिर फार शोभिवंत दिसत होतें. त्याच्याबाहेर जे बहालांचे भाग आले होते, ते सर्व मजबूत लांकडाचे बनविलेले स्पष्ट दिसत होते. एकंदरींत तें मंदिर प्रशस्त, सुव्यवस्थित, उंच व भव्य असून त्यांतील मंच किंवा चढत्या बसण्याच्या जागा एकमेकींस लागून असूनही संकुचित नव्हत्या. ठिकठिकाणीं राजकुलोत्पन्न पुरुषांना बसावयास योग्य अशीं पीठें निर्माण केलीं होतीं. मधून मधून सुंदर वाटा ठेवल्या होत्या. तसेंच कोठें कोठें वेदी घातल्या होत्या. आणि असंख्य मनुष्यें लोटलीं तरी भय नाहीं इतकें तें भक्कम बांधलें होतें.

या प्रकारचें मनोहर रंगस्थळ पाहून बुद्धिमान् कंसानें आज्ञा केली कीं, "सेवक जनहो, येथील सर्व उच्चासनें, दालनें व मार्ग, ठिकठिकाणीं चित्रें, पताका व फुलांच्या माळा लावून आणि बिछाइत पसरून उद्यां सुशोभित आणि सुवासित करा. तसेंच मधून मधून, थोर पुरुषांच्या तजबिरी लावा. वाटोवाट, वाळलेल्या गोमयाच्या चुराचे ढीग[1] घालून ठेवा. घंटा व तोरणें बांधून मंदिराला शोभा आणा. तसेंच सरपोस आंथरा, योग्य बळी तयार करून ठेवा. नीट खळगे खणून त्यांत क्रमानें पानकुंभांची स्थापना करा. तसेंच जलभार सहन करण्यास समर्थ असे उत्तम सुवर्णकलश तयार करून सज्ज ठेवा. प्रत्येक कुंभाजवळ खाद्यपदार्थ व कषायरस सिद्ध करून ठेवा. युद्धकलाकोविदांना, सर्व जातींच्या लोकांना आणि त्यांच्यांतील प्रमुख गृहस्थांना उद्यांच्या समारंभाचीं आमंत्रणें द्या. त्याप्रमाणेंच मल्ल व प्रेक्षक यांना वर्दी द्या. सारांश, उत्तम व्यवस्था ठेवून उद्यांच्या समाजांतील मंचबाटा सर्व सामग्रीनें सिद्ध अशा करा."

याप्रमाणें, सभेची सर्वोत्कृष्ट व्यवस्था ठेवण्याविषयीं आज्ञा करून राजा तेथून आपल्या निवासस्थानीं निघून गेला. नंतर त्यानें अप्रतिम मल्ल चाणूर व मुष्टिक या दोघांस तेथें बोलावणें पाठविलें. ते दोघे महापराक्रमी व बलिष्ठ असून त्यांचे बाहू दीर्घ होते. कंसाची आज्ञा शिरसावंद्य मानून ते मोठ्या संतोषानें राजवाड्यांत आले. सर्व जगामध्यें प्रसिद्ध असलेले मल्ल समीप आले असें पाहतांच, त्यांना उद्देशून कंसराजानें पुढील मार्मिक भाषण केलें. "तुम्ही माझे प्रख्यात मल्ल असून तुमच्या बहादुरीबद्दल तुह्मांस तोडे वगैरे बक्षीस मिळून तुह्मी मोठ्या योग्यतेस चढलां आहां. तुमचा यथायोग्य सन्मान होत असून, त्याला तुम्ही सर्वथैव लायक आहां. जर मीं केलेल्या उपकारांचें व सत्कारांचें तुम्हांला विस्मरण झालें नसेल तर तुम्हीं आपल्या सामर्थ्यानें माझी एक मोठी कामगिरी केली पाहिजे. माझ्या गोकुळामध्यें वाढलेले बलराम व कृष्ण या नांवाचे जे दोन गोपाळ आहेत ते लहान आहेत तरी कांहीं केल्या दमत नाहींत. आजपर्यंत त्यांचें वास्तव्य रानावनांतच झालेलें आहे. तेव्हां ते कुस्तीसाठीं आखाड्यांत उतरले म्हणजे जवळ भिडतांच त्यांना तुम्ही पळाचा विलंब न करतां निःशंकपणें मारून टाका. ते लहान आहेत, चपल

[1] हा चूर मल्लांचा घाम जिरविण्याकारितां किंवा मंगलाकारितां ठेवावयाचा असतो. (टीका)

आहेत किंवा अगदीं अशिक्षित आहेत अशावर जाऊन उपेक्षा करूं नका. सारांश, त्यांना नाहींसे करण्याकरितां आपली पराकाष्ठा करा. आखाड्यांत लढत असतांना त्यांचा घात झाला म्हणजे आतां व पुढें (निरंतर) माझें कल्याण होईल."

राजाचें हें प्रेमळ भाषण ऐकून, कुस्तीसाठीं मस्तीस आलेल्या चाणूरमुष्टिकांना मोठा आनंद झाला व (त्या भरांत) त्यांनीं प्रत्युत्तर केलें. "महाराज, ते मरतुकडे बिचारे क्षुद्र गोप आमच्यापुढें नुसते उभे राहिले म्हणजे बापडे मेलेच असें समजा. आमच्यापुढें आल्यानंतर ते जिवंत रहाणें शक्य नाहीं. तीं रानवट पोरें आम्ही क्रोधवश झालों असतां आमच्याशीं युद्ध करूं लागलीं म्हणजे त्यांचें मरण ओढवलें असें समजा."

याप्रमाणें त्या मल्लश्रेष्ठांनीं विषतुल्य कटु भाषण केल्यावर कंसानें त्यांस जाण्याची अनुज्ञा दिली व ते आपल्या स्थानीं परत गेले.

नंतर राजानें महामात्र नामक महाताला (बोलावून घेऊन) म्हटलें "कुवलयापीड नांवाचा जो हत्ती आहे तो तूं उद्यांच्या समारंभाला रंगद्वारीं उभा कर. तो बलिष्ठ व चपल असून त्याच्या गंडस्थळांतून मद वहात आहे व त्यामुळें त्याचे डोळे फिरून जाऊन माणसें किंवा दुसरे हत्ती यांच्यावर तो उलटला आहे. तेव्हां ते वसुदेवाचे रानटी परंतु बलिष्ठ पुत्र उद्यांच्या सभेंत प्रवेश करतील त्या वेळीं तो हत्ती अशा रीतीनें तूं त्यांच्या अंगावर घाल कीं ते तत्काळ तेथें गतप्राण होऊन पडतील. तूं हत्तीच्या साहाय्यानें जर सभेच्या ठिकाणीं त्या उन्मत्त गवळ्याच्या पोरट्यांचे प्राण घेशील तर माझ्या नेत्रांचें पारणें फिटेल. ते मरून गेले असें पहातांच वसुदेवाचा आशांकुर व आश्रय पार नाहींसा होऊन तो, त्याचे बांधव व भार्या हीं सर्व मरून जातील. त्याप्रमाणेंच हे माझे सर्व मूर्ख यादव (फुकट) कृष्णाच्या नादीं लागले आहेत त्यांची मदार ढांसळून तेही कृष्णाची वाट धरतील. हत्तीच्या किंवा मल्लांच्या हातून मी या दोघांचा निःपात करीन. तें न साधलें तर मी स्वतः तें करीन; आणि याप्रमाणें सर्व नगरी निर्यादवी केल्यावर मी निष्कंटकपणें येथें सुखोपभोग घेईन. यादवकुलाचा कैवारी जो माझा पिता त्याचा मीं त्याग केला आहे. तसेंच कृष्णाच्या पक्षाचे जे दुसरे यादव आहेत त्यांना देखील मी सोडलें आहे. खरोखर पहातां, उग्रसेनासारख्या अल्पवीर्याच्या पुत्रेच्छु मनुष्यापासून माझी उत्पत्तीच झालेली नाहीं. नारदांनीं मला असेंच सांगितलें आहे."

महामात्र प्रश्न करतोः—"राजन्, पूर्वीं देवर्षि नारदांनीं आपल्याला काय सांगितलें आहे? हे शत्रुदमना, मी तर हें आश्चर्य आजच तुझ्यापासून ऐकत आहें. तुझा पिता जो उग्रसेन त्याहून निराळ्या मनुष्याकडून तुझी उत्पत्ति कशी झाली! राजा, तुझी माता असें नीच कृत्य कसें बरें करील? दुसरी एखादी प्राकृत स्त्री देखील असलें निंद्य कृत्य करणार नाहीं. करितां तूं काय म्हणतोस, तें सर्व इत्थंभूत श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. खरोखर, या गोष्टीचें मला फार नवल वाटत आहे."

कंस सांगतोः—तुझी ऐकण्याची इच्छा आहे तर ऋषिश्रेष्ठ प्रभु नारदांनीं मला जें जें सांगितलें तें सर्व मी तुला सांगतों.

"एके वेळीं, इंद्राचा मित्र नारदमुनि इंद्रलोकांतून मजकडे आला. त्यानें चंद्रकिरणासारखें शुभ्र वस्त्र परिधान केलें असून त्याचे मस्तकावर जटांचें वेष्टण होतें. त्यानें कृष्णाजिनाचें उत्तरीय धारण केलें होतें व त्याचे

गळ्यांत सुवर्णाचें यज्ञोपवीत होतें. त्याचे हातांत दंड व कमंडलु असून तो दुसरा ब्रह्मदेवच आहे असा भास झाला. त्या अव्यय विद्वद्वर्याला चारी वेदांचें व गांधर्वविद्येचें संपूर्ण ज्ञान होतें व ब्रह्मलोकामध्यें त्याचा (स्वच्छंद) संचार असतो. असो; देवर्षि नारदमुनि माझ्या वाड्यासन्निध येतांक्षणींच मी सामोरा जाऊन त्यांस वाड्यांत घेऊन आलों व त्यांची यथाविधि पूजा करून मी त्यांस आसन, अर्घ्यपाद्य (आचमन) समर्पण केलें. नंतर अंतर्गृहांत नेऊन, त्यांना योग्य स्थानीं बसवून मी त्यांचे शेजारींच बसलों. मग संतोषानें आसनाचा स्वीकार केल्यानंतर, नारदऋषींनीं मला कुशलप्रश्न विचारिले. त्या समयीं, त्या पवित्र देवर्षींचें अंतःकरण फार संतुष्ट दिसत होतें. मग ते मला म्हणाले.

नारद सांगतात:—" वीरा, तूं माझी यथाविधि पूजा केलीस (त्या योगानें प्रसन्न होऊन) मी तुला एक गोष्ट सांगतों, ती ऐकून घे व नीट लक्षांत धर. एके प्रसंगीं, देवांचें निवासस्थान जो सुवर्णमय मेरुपर्वत तिकडे मी (सहज) गेलों होतों. तेव्हां मेरुपर्वताच्या शिखरावर देवांची सभा भरली असून त्यांचें कांहीं कारस्थान चाललें होतें, तें मला ऐकावयास सांपडलें. तुझा व स्वपक्षीय अनुयायांचा नाश कसा होईल याविषयीं कांहींतरी भयंकर उपाय शोधून काढण्यासाठीं देव एकत्र जमले होते. (तेथें मी प्रत्यक्ष हजर होतों. म्हणून, हे कंसा त्यांचें काय ठरलें तें मला समजलें आहे.) त्रैलोक्य ज्याचें पूजन करतें तो विष्णु देवकीच्या पोटीं जन्मास येणार आहे. त्या तिच्या आठव्या गर्भापासून तुला अपाय आहे. तो देवांचें सर्वस्व आहे. त्याच्या वांचून स्वर्गलोकाला दुसरी गति नाहीं. सर्व वेदांचें तो परम रहस्य आहे. त्याचेपासून तुला मृत्यु येईल. म्हणून कंसा, देवकीच्या गर्भांचा नाश करण्याचा यत्न कर. शत्रु दुर्बल आहे किंवा आपला नातेवाईक आहे अशी समजूत करून घेऊन त्याची कधींही उपेक्षा करूं नये. हा बलिष्ठ उग्रसेन तुझा (खरोखरीचा) पिता नाहीं. सौभनगरीचा राजा द्रुमिल तेजस्वी आणि महासमर्थ आहे. तो तुझा पिता होय."

त्यांचें भाषण ऐकून मला किंचित् राग आला आणि मी त्यांना म्हटलें "ब्रह्मन्, असा तो द्रुमिल नामक दानव कोण आहे? हे तपस्वी विप्रवर्या, माझ्या मातेशीं त्याचा समागम कसा झाला, हें सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे."

नारद म्हणाले:—बरें तर, हे राजा, द्रुमिलाचें व तुझ्या मातेचें काय बोलणें झालें व नंतर त्यांचा समागम कसा झाला हें सर्व मी तुला इत्थंभूत सांगतों ऐक.

कोणे एके वेळीं, तुझी माता रजस्वला असतांना तिला जिज्ञासा उत्पन्न होऊन ती इतर स्त्रियांबरोबर सुयामुन नामक पर्वताची शोभा पाहण्याकरितां गेली होती. (सृष्टिसौंदर्य अवलोकन करीत) ती सुयामुन पर्वताच्या रम्य व सुंदर शिखरांवर, गुहांमध्यें आणि नद्यांचे तीरातीरानें फिरूं लागली. त्या ठिकाणीं, किन्नरांच्या गायनासारखे मनोहर, प्रतिध्वनीनें युक्त, कामोत्तेजक आणि कर्णमधुर असे शब्द, तसेंच मयूरांचा टाहो व पक्ष्यांची (मंजुळ) किलबिल, हीं एकसारखीं तिच्या कर्णपथावर येऊं लागलीं. त्या योगानें तिच्या अंतःकरणांत स्त्रीस्वभावास अनुसरून जोराची (अष्टगुण) कामवासना उत्पन्न झाली. इतक्यांत, वनराजींतून निघालेला, पुष्पांच्या सुवासानें दुमदुमलेला व मदनाचा संचार करणारा आल्हादक वायु वाहूं



भीष्माकडून अनुज्ञा मिळतांच सहदेवानें श्रीकृष्णाची पूजा केली. ही गोष्ट शिशुपालास सहन झाली नाहीं. ( सभापर्व अ० ३६ पृष्ठ ९३९ ).

लागला. पावसाच्या संततधारेनें मधुपांनीं भरलेल्या कदंबवृक्षांचीं फुलें मिटलेलीं होतीं त्यांना त्या वायूचा स्पर्श होतांच त्यांचा घमघमाट अधिकच सुटूं लागला. मन्मथबाधा करणारे केसरवृक्ष पुष्पांचा वर्षाव करूं लागले. ज्यांवरील फुलें ( कळे ) कांट्याप्रमाणें तरतरीत उभीं राहिलीं आहेत, असे नीपवृक्ष तेथें दीपासारखे दिसत होते. त्यांतही पृथ्वीवर जिकडे तिकडे (गालिचासारखें ) कोवळें गवत पसरलें असून त्यावर शक्रगोप नांवाचे तांबडे कीटक बसले होते. त्या कारणानें भूदेवीला मोठी शोभा आली होती. हा प्रकार पाहून एखाद्या तारुण्यानें मुसमुसलेल्या युवतीप्रमाणें पृथ्वी देखील ऋतुमती झाली आहे कीं काय असा भास होई.

याच सुमारास सौभनगराचा श्रीमान् स्वामी, द्रुमिल दानव, त्या ठिकाणीं प्राप्त झाला. भावी दैवयोग कांहीं वेगळाच होता; म्हणूनच प्रत्यक्ष विधात्यानें त्याला तेथें जाण्याची बुद्धि दिली असें वाटतें. तो सुयामन पर्वत बघण्याच्याच हेतूनें आपल्या इच्छिलेल्या ठिकाणीं नेणाऱ्या व बालसूर्याप्रमाणें तेजस्वी अशा रथांत बसून आकाशमार्गानें सहज मोठ्या त्वरेनें तेथें आलेला होता. त्या रथाचे अंगीं वाटेल तिकडे जाण्याचें सामर्थ्य असून त्याची गति मनाच्या गतीपेक्षांही शीघ्र होती. त्या पर्वतश्रेष्ठासमीप येतांच द्रुमिल आपल्या सर्वोत्कृष्ट रथांतून खालीं उतरला. नंतर इतर रथांहून श्रेष्ठ ( वरचढ ) असलेला आपला रथ पर्वतावरील उपवनामध्यें ठेवून सारथ्यासहवर्तमान तोही सुयामुनगिरीच्या शिखरांवर संचार करूं लागला. तेथून पुष्कळ काननें व वनें त्यांच्या दृष्टीस पडलीं. पर्वताच्या शिखरांवरील अनेक कंदरें, नद्या व सर्व ऋतुगुणांनीं युक्त असलेलें नंदनवनासारखें उद्यान इत्यादि ( मनोहर ) स्थळें त्यांनीं मनमुराद पाहिलीं. त्या पर्वताचीं शिखरें फार उंच असून नानाप्रकारच्या धातूंनीं आच्छादित झालेलीं होतीं. त्या नगश्रेष्ठावर फिरतां फिरतां नाना प्रकारचे विद्याधर, किंपुरुष, अस्वल, वानर, राक्षस, सिंह, व्याघ्र, वराह, महिष, शरभ, ससे, सृमर[1], चमर[1], न्यंकु[1], मातंग, यक्ष, दैत्य इत्यादि प्राणी त्यांच्या दृष्टीस पडले. तसेंच विविध औषधींनीं युक्त असलेले व सिद्ध आणि ऋषी यांनीं आश्रय केलेले, निरनिराळ्या तऱ्हेचे फलपुष्पांनीं ओथंबलेले वृक्ष त्यांनीं पाहिले. त्या वृक्षांवर पुष्कळ प्राणी व पक्षी बसले असून फुलांच्या बहारामुळें चोहोंकडे अतिशय सुवास सुटला होता. त्यांपैकीं कित्येक वृक्ष कांचनवर्णाचे होते, कित्येकांचा वर्ण अंजनासारखा काळा होता व कित्येक रुप्यासारखे शुभ्र होते.

पर्वताची शोभा पहातां पहातां सख्यांबरोबर फुलें वेंचीत क्रीडत असलेली तुझी देवकन्येसारखी माता द्रुमलराजाच्या दुरून नजरेस पडली. अशा स्थळीं सख्यांसह एक सुंदर स्त्री विहार करीत आहे असें कांहीं अंतरावरून पाहून सौभपतीला फार विस्मय वाटला व तो आपल्या सूताजवळ उद्गारला. "औदार्यादि गुणांनीं संपन्न असलेली ही जी मृगनयना रूपवती स्त्री वनामध्यें हिंडत आहे, ती कोण असावी बरें? मदनाची रती, इंद्राची शची, किंवा अप्सरा तिलोत्तमा यांच्यासारखी ही दिसत आहे; अथवा ही नारायणाच्या ऊरूपासून निर्माण झालेली व सर्व स्त्रियांत सुंदर असलेली पुरूरव्याची वरार्थिनी प्रिया उर्वशी तर नसेलना? अमृतप्राप्तीकरितां, सुरासुरांनीं मंदराचलाचा माथ्यासारखा उपयोग करून क्षीरसागराचें मंथन केलें असें ( पुराणांतरीं ) आमचे ऐकण्यांत आहे. मंथनानंतर ( समुद्रांतून निघालेल्या

[1] या सर्व हरिणाच्या जाती आहेत.

चौदा रत्नांपैकीं ) अमृतापासून जगदंबा लक्ष्मी उत्पन्न झाली व तिनें विष्णूच्या अंकाचा आश्रय केला. तेव्हां आपल्या समोर असलेली सुंदर स्त्री ती लक्ष्मीच आहे कीं काय ? नील-वर्णाच्या मेघांमध्यें विद्युल्लता चमकावी त्या-प्रमाणें या सुंदरीनें आपल्या सौंदर्यानें बरो-बरच्या सख्या, किंबहुना हें सर्व वन सुप्रका-शित केलें आहे. ही रमणी अत्यंत सुकुमार असून हिचें मुख पूर्णचंद्रासारखें ( मनोहर ) आहे. हिचें हें निखोड लावण्य पाहून माझीं इंद्रियें व्याकुल झालीं आहेत; मला कांहीं सुचत नाहीं; मी मदनाच्या तडाक्यांत सांप-डलों आहें; माझें मन अत्यंत विव्हळ झालें आहे; कामदेव आपल्या मृदु शरांनीं माझ्या प्रत्येक गात्राला जणूं काय पीडा देत आहे. त्यानें आपले पांचही बाण माझ्या अंतःकरणा-वर सोडून माझ्या मनाचा निर्दयपणानें घात करण्याचें योजिलें आहे असें वाटतें. अग्नी-मध्यें घृत ओतलें असतां तो जसा अधिकच प्रज्वलित होतो तद्वत् त्याच्या शरप्रहारानें माझ्या हृदयाचा भडका उडाला आहे. मला झालेल्या मन्मथबाधेच्या उपशमाकरितां मी आतां काय करूं? कोणता उपाय केला म्हणजे ही मत्तगामिनी मला वश होईल?" याप्रकारें त्या दानवानें बराच वेळ पुष्कळ विचार केला परंतु त्याला कांहींएक उपाय सुचला नाहीं. ( तेव्हां ) शेवटीं तो सूताला म्हणाला, "हे अनघा, तूं येथेंच थोडा वेळ उभा रहा. या सुंदरीचें दर्शन घेऊन ही कोणाची स्त्री आहे हें पुसण्याकरितां मीं ( एकटाच पुढें ) जातों. मी परत येईतोंपर्यंत तूं माझी वाट पहात येथेंच थांब."

द्रुमिलाचें भाषण ऐकून सूत म्हणाला, "बरें आहे." नंतर त्या दानवश्रेष्ठानें जाण्याचें नक्की ठरविलें. परंतु ( पाऊल टाकण्यापूर्वीं ) त्या बलवंतानें आचमन केलें व तो थोडा वेळ ध्यानस्थ झाला. क्षणभरानें ही उग्रसेनाची पत्नी आहे असें त्यानें अंतर्ज्ञानानें ओळखलें व तत्काळ त्याला मोठा संतोष झाला. लागलींच आपलें रूप टाकून देऊन त्या महा-बाहु दानवेश्वरानें उग्रसेनाचें रूप धारण केलें आणि हंसत हंसत तो तुझ्या मातेपाशीं गेला. पुढें त्या अतुलपराक्रमी राक्षसानें स्मित मुख करून उग्रसेनाच्या वेषांतच तिला धरलें आणि तिच्याशीं समागम केला. तुझ्या मातेचें पतीवर अत्यंत प्रेम असल्यामुळें तो पतीचसें वाटून ( अगोदरच कामुक झालेली ) ती मोठ्या सद्भावानें त्याच्या जवळ गेली. परंतु रतिप्रसंगांत त्याचा राठपणा पाहून तिला लाग-लीच शंका आली. त्यासरशी ती घाबरून उठली व त्याला म्हणाली. खरोखर तूं कांहीं माझा पति नव्हेस. रूप बदलून माझें पातिव्रत्याचा भंग करणारा असा तूं कोणी ( दुरात्मा ) आहेस. माझें 'एकपति'-व्रताला मात्र तूं डाग लावलास. अरेरे ! माझ्या पतीचें रूप धारण करून तूं अत्यंत नीच कर्म केलेंस यांत संशय नाहीं. ही गोष्ट माझ्या बांधवांना कळली म्हणजे ते क्रोधा-विष्ट होऊन मला कुलटेला काय बरें म्हणतील? आतां पतीच्या बाजूचे लोक देखील माझा धिःकार करतील आणि अशा निंद्य स्थितींत मला आतां आपलें आयुष्य कंठलें पाहिजे. ज्या तुझीं इंद्रियें इतकीं अनावर आहेत अशा उतावळ्या व (नीच ) कुलोत्पन्नाला तुला धिःक्कार असो ! तुझ्यावर विश्वास ठेवणें योग्य नाहीं. परदारेशीं व्यभिचार केल्यामुळें तुझें आयुष्य क्षीण होईल!

ती याप्रमाणें त्याच्यावर तोंड सोडीत असतां द्रुमिल त्या निंदेमुळें क्रोधानें लाल होऊन तिला म्हणाला. "हे मूढे, तूं आप-ल्याला मोठी पंडित समजून रागानें माझी

निंदा कां चालवली आहेस ? मी सौभग नगरीचा पराक्रमी राजा आहें. मरणशील व नीच अशा मानवी पतीच्या तूं विनाकारण अंकित होऊन राहिली आहेस. अगे, पातिव्रत्याचा तोरा मिरवणारे स्त्रिये, स्त्रियांची बुद्धि चंचल असते, विशेषतः मानवी स्त्रियांची बुद्धि स्थिर नसते. शिवाय ( माझ्यासारख्या दिव्य पुरुषाशीं ) व्यभिचार घडल्यानें स्त्रिया दूषित होत नाहींत. कुंती, मदयंतीसारख्या अनेक स्त्रियांना व्यभिचारापासून देवांसारखे अढळ पराक्रमी पुत्र झाल्याचें आपण पुराणांतरीं ऐकत नाहीं काय ? स्त्रीजातीमध्यें तूं फाजील पतिनिष्ठ सती दिसतेस ! माझ्यासारख्या शुद्ध केंसांच्या[1] (निष्पाप) पुरुषाची निंदा करून मनास येईल तें तूं बरळत सुटली आहेस. हे वरारोहे, " कस्य त्वं " हे शब्द योजून मी कोण आहें, हा प्रश्न तूं मला केलास, त्या अर्थी, तुझ्या पोटीं " कंस " नामक पुत्र जन्मास येऊन तो सर्व शत्रूंचा फडशा पाडील. "

हें भाषण ऐकतांच तुझी अत्यंत व्यथित झालेली माता रागानें अधिकच संतप्त झाली; व त्या भरांत तिनें त्या दानवानें दिलेल्या त्या वराची निंदा करून धटाईनें बोलणाऱ्या त्या द्रुमिलाला म्हटलें. " आग लागो तुझ्या वर्तनाला ! अरे दुराचारी राक्षसा, तूं सर्व स्त्रियांची सारखीच निंदा करीत आहेस[2]. अरे या जगांत कुमार्गगामी स्त्रिया आहेत, तशा पतिव्रताही पुष्कळ आहेत. कुलधमा, अरुंधती वगैरे ज्या पतिनिष्ठ स्त्रियांचें वर्णन आपण ऐकतों, त्यांच्याच (पुण्याईनें) हें सर्व जगत् व लोक संभाळले आहेत. तूं जो सद्वर्तनाचा उच्छेद करणारा पुत्र मला दिला आहेस, तो मला मुळींच आवडावयाचा नाहीं. शिवाय आणखी मी काय सांगतें तें ऐक. नीचा, माझ्या पतीच्या वंशांतच प्रत्यक्ष परमेश्वर अवतार धारण करणार आहे तो तुझा आणि तूं मला दिलेल्या पुत्राचाही नाश करील. "

पतिव्रतेची ही शापवाणी कानीं पडतांच आपल्या दिव्य रथांत बसून द्रुमिल आल्या मार्गानें आकाशांत गेला. आणि त्याच दिवशीं तुझी दुःखित झालेली माताही मथुरानगरींत परत गेली.

इतकें मला सांगितल्यानंतर मुनिश्रेष्ठ भगवान् नारद सप्तस्वर काढणारी आपली वीणा वाजवीत व गात देवयानमार्गानें ब्रह्मदेवापाशीं गेले. ( त्यांचें तेज काय विचारावें! ) तपाच्या सामर्थ्यानें ते जळजळीत अग्नीप्रमाणें तेजस्वी दिसत होते. तस्मात्, हे महामात्रा, मी काय सांगतों तें नीट ऐकून घे. सुबुद्ध व त्रैलोक्यज्ञ नारदांनीं सांगितलेली गोष्ट खरी आहे. बल, वीर्य, राजनीति, विनय, शरीराची भव्यता, शौर्य, तेज, पराक्रम, सत्य, दान इत्यादिक मजपाशीं यथास्थित असून या बाबतींत माझी बरोबरी करील असा दुसरा कोणी पुरुष नाहीं. माझें हें सर्व ऐश्वर्य मनांत आणून नंतरच मी नारदाच्या भाषणावर विश्वास धरला आहे. हस्तिपालका, मी उग्रसेनाचा क्षेत्रज पुत्र आहें. मातापितरांनीं माझा जरी परित्याग केला ( होता ) तरी मी स्वसामर्थ्यानें या योग्यतेस प्राप्त झालों आहें. उभयतां मातापितरांनीं-विशेषतः बांधवांनीं—माझा फार द्वेष चालवला आहे. ( म्हणून ) मी कृष्णाचा कैवार घेणाऱ्या सर्व यादवांना देखील मारून टाकीन. पण आधीं तूं हत्तीकडून त्या नीच गोपाळांचा नाश कर जा. अंकुश, प्रास व तोमर हीं

---

१ मनुष्याचीं सर्व पातकें त्याच्या केशांत राहतात असा समज आहे. त्यावरून " शुद्ध केशांचा " ह्म० निष्पाप असा अर्थ होतो.

२ परंतु कुंती वगैरे स्त्रियांनीं पापवासनेनें व्यभिचार केला नसून आपद्धर्म ह्मणून केला आहे. (टीका)

आयुधें घेऊन सभेच्या दारापाशीं हत्तीवर धिम्मेपणानें बस. महामात्रा, जाच उशीर लावूं नको.

~~~~~~~

## अध्याय एकुणतिसावा.

—:०:—

### कुवलयापीडाचा वध.

#### ( रंगभूमीचें वर्णन. )

वैशंपायन सांगतातः—तो दिवस जाऊन दुसरा दिवस उजाडतांच, सभास्थान युद्धासाठीं आलेल्या प्रेक्षकांनीं भरून गेलें. तें चित्रांनीं भूषित केलेल्या अष्टकोणाकृति पायांचे आधारावर असलेले, अनेक द्वाविदिकांनीं युक्त, अर्गलायुक्त ठिकठिकाणीं अर्धचंद्राकार गवाक्षें असून बसण्यासाठीं तयार केलेल्या शय्येसारख्या अत्यंत मृदु आसनांनीं अलंकृत अशा मंचांनीं विभूषित होतें. कुस्ती पहाण्याकरितां मांडलेले जे मंच नाना प्रकारांनीं सुशोभित करून त्यांवर मोठ्या व्यवस्थेनें मल्लांना बसविलें होतें. कांहीं मंचांची मांडणी पूर्वाभिमुख केलेली असून त्यांचे-सभोंवार सुंदर जाळीदार पडदे सोडले होते. त्याप्रमाणेंच त्यांना पुष्पमाळा लावल्या होत्या. याप्रकारें अलंकृत झाल्यामुळें मंचांना[2] शरदृतूंतील मेघांची शोभा आली होती. आणि एकंदर सभास्थान तर मेघमालांनीं युक्त असलेल्या सागराप्रमाणें सुंदर दिसत होतें. कांहीं मंडळ्यांकरितां व जमातींकरितां[3] केलेले मंच पुष्कळ शिल्पकारांकडून बनविलेले असल्यामुळें प्रत्येकाच्या वेगवेगळ्या खुणा त्यांस लावलेल्या पताकांवर दृग्गोचर होत होत्या. कित्येक मंच तर पर्वताप्रमाणें विशाल होते.

अंतःपुरांतील परिवारासाठीं निराळीं प्रेक्षागारें तयार केलीं होतीं. सुवर्णाच्या अलंकारांनीं व दाट लावलेल्या रत्नांच्या ज्योतींनीं तीं ( सर्वांहून विशेष ) चमकत होतीं. तीं सर्व मंदिरें रत्नांचीं केलेलीं असून त्यांचे शिखरावर पताका लाविलेल्या होत्या. तसेंच त्यांचे सभोंवार जाळीदार पडदे सोडले होते. त्यामुळें तीं मंदिरें म्हणजे आकाशांत संचार करणारे सपक्ष पर्वतच आहेत असें वाटलें. त्या प्रेक्षागृहांत जिकडे तिकडे रत्नांचें तेज फांकलें होतें. ठिकठिकाणीं चवऱ्या हलत होत्या. नूपुरें झणत्कार करीत होतीं; त्यांतच कोणी मध्येंच बोलत होते; यामुळें सभास्थानाला मोठें वैचित्र्य आलें होतें. गणिकांसाठीं वेगळे मंच केले असून त्यांवर चांगलीं वस्त्रें आंथरलीं होतीं. त्यांचे मंच विमानाप्रमाणें दिसत असून त्यांत मुख्य मुख्य वारांगना बसल्या असल्यामुळें ते फारच खुलत होते.

त्याप्रमाणेंच सभास्थानीं पुष्कळ शिष्टसंमत आसनें, सुवर्णपर्यंक व तऱ्हेतऱ्हेच्या चटया पसरून दिल्या असून त्यांवर पुष्पगुच्छ लावले होते. पानभूमि उत्तम प्रकारें तयार करून तेथें ( भरलेले ) हेमकुंभ ठेवून दिले होते. त्यांत जंबीरपर्णाचा व चुक्रिकपर्णाचा रस पिण्याकरितां ठेवला होता. दुसरे पुष्कळ लांकडी[1] मंचही त्या ठिकाणीं मांडले असून त्यांवर घालावयाचीं झकझकीत वस्त्रें तेथें हजारों पडलीं होतीं. कांहीं प्रेक्षामंदिरांना दुसरे मजले दिले

१ राजस्त्रियांना समारंभ पाहतां यावा म्हणून ही व्यवस्था केली होती.

२ हे मंच म्हणजे केवळ माचे किंवा चौक्या नसून लांबचलांब बंदोबस्ताच्या व नाटकगृहांतील बैठकीप्रमाणें अर्धचंद्राकार अशा उंच बैठकी असल्या पाहिजेत.

३ मुळांत "श्रेणी" व 'गण' असे शब्द आहेत. त्याचा अर्थ, श्रेणी व भिन्नजातीचे परंतु एका कसबाचे लोक, व 'गण' म्हणजे केवळ एकच जातीचे असा चतुर्धरानें दिला आहे.

१ शब्दशः अर्थ केल्यास "काष्ठें एकत्र जळवून केलेले." असा होईल. असल्या बैठका कांहीं बागांत झाडांचे बुंधांशीं केलेल्या आढळतात.
~~~~~~~

असून तेथून लहान लहान जाळ्यांतून सर्व देखावा स्त्रियांना दिसण्यासारखा होता. हीं मंदिरें ह्मणजे जणूं काय आकाशसंचारी राजहंस आहेत असें वाटे.

कंसासाठीं जें प्रेक्षामंदिर तयार केलें होतें त्याची शोभा सर्वांमध्यें विशेष होती. तें पूर्वाभिमुख असून अत्यंत चातुर्यानें बांधलें होतें. त्या मेरुशृंगाप्रमाणें दैदीप्यमान् कंसमंदिराची हेमस्तंभावर रचना केलेली असून नानाविध चित्रें व पुष्पमाळा यांचे योगानें त्याला अवर्णनीय शोभा आणिली होती. फार काय सांगावें, नेहमीं रहाण्यासाठीं जसा राजवाडा बांधावा त्याप्रमाणें हें तात्पुरतें मंदिर बांधलें असून त्यांत सर्व सोई केलेल्या होत्या.

असो ( ठरलेल्या वेळीं ) नाना प्रकारचे लोक मौज पहाण्याकरितां त्या ठिकाणीं प्राप्त झाले. सभास्थान गच्च भरून गेलें. लोकांच्या गर्दीमुळें जिकडे तिकडे गजबजाट माजून राहिला व त्यामुळें त्या वेळीं रंगभूमि खवळलेल्या समुद्राप्रमाणें दिसूं लागली.

इतक्यांत, " कुवलयापीड हत्तीला सभाद्वारीं उभा करा " अशी आज्ञा करून राजा कंसानें आपल्या प्रेक्षागृहांत प्रवेश केला. त्यानें दोन शुभ्र वस्त्रें परिधान केलीं होतीं. पांढऱ्या रंगाचे पंखे व चवऱ्या त्याच्यावर (सेवक जन) वारीत होते. त्याचे मस्तकावरील मुकुट देखील शुभ्र होता. त्या योगानें तो पांढऱ्या ढगांत चंद्रमा असतो त्या सारखा शोभत होता. तो सुबुद्ध राजा सुखानें सिंहासनावर विराजमान होतांच, नागरिक जनांनीं त्याचें अप्रतिम रूप पाहून उत्साहानें ' राजा, तुझा जयजयकार असो ' म्हणून आशीर्वाद केला.

नंतर एकासारखे एक बलिष्ठ मल्ल आखाड्यांत शिरले; व वांटून बगलेच्या तीन सोप्यांत बसले. त्यांचीं वस्त्रें देखील फुरफुरत होतीं. त्यांचेमागून वाद्यांच्या नादांत दंड थोपटीत व फुरफुरवीत हर्षित झालेले वसुदेवाचे दोघे पुत्र सभास्थानाच्या दारापाशीं येऊन थडकले. त्या बलवानांनीं ( सुंदर ) वस्त्रें धारण केलीं होतीं. देवांनीं ( देखील) त्यांना नमस्कार केला. त्यांचे मस्तकावरील शेंडीचे बुचडे उभे बांधिले असून त्यांभोंवतीं पुष्पमाळा बांधल्या होत्या. बाहू हींच त्यांचीं शस्त्रें होतीं. त्यांचे दंड अर्गलेसारखे होते. दंड थोपटीतच ते जावळे सभाद्वारा पुढें सरसावले.

ते सुंदर पुरुष सभास्थानाकडे वेगानें निघाले असतां तों माहूतानें प्रेरिल्याप्रमाणें दारावरील माजलेल्या हत्तीनें त्यांना आंत जाण्यास प्रतिबंध केला. त्या दुष्टात्म्या मत्तहत्तीनें माहूताच्या खुणेसरशीं सोंड वळवून रामकृष्णांना मारण्याचा यत्न केला. हत्ती आपणांस पीडा देत आहे असें पाहून कृष्णानें स्मित केलें आणि "या हत्तीकडून माझा घात करण्याचा कंसाचा हेतु दिसतो त्यापेक्षां कंसाचीं शंभर वर्षें पूर्ण भरलीं" असें बोलून त्यानें दुष्टबुद्धि कंसाच्या कृत्याची हेटाळणी केली.

इतक्यांत तो हत्ती मेघासारखी गर्जना करीत बराच जवळ आला. त्याबरोबर एकदम उडी मारून कृष्णप्रभूनें ( कुवलयापीडाला चिडविण्यासाठीं ) टाळी वाजविली. नंतर त्या हत्तीच्या पुढें सिंहनाद करून व दंड थोपटून त्याची जलतुषार—युक्त सोंड कृष्णानें आपल्या वक्षःस्थलाशीं धरली. वायु ज्याप्रमाणें मेघांना पीडा देतो तद्वत् त्याच्या दांतांमधून व पायांमधून संचार करून श्रीकृष्णानें त्याला त्राहि त्राहि केलें. पुनरपि त्या गजेंद्राच्या शुंडाग्रांतून, दंतांमधून आणि पायांमधून आपली सुटका करून घेऊन त्यानें त्या हत्तीला नकोनकोसें केलें. त्या अगडबंब गजेंद्राचे अंगीं

कृष्णाचा घात करण्याचें त्राण राहिलें नाहीं. तो अगदीं गडबडून गेला. त्याचीं गात्रें वुसळून जाऊन तो केंविलवाणें आरडूं लागला. गुडघे टेंकून तो धाड्कन् जमिनीवर पडला व दोन्ही दांतांनीं जमीन खरडूं लागला. ग्रीष्मकाळ संपल्यानंतर मेघ जसा वर्षाव करतात, त्याप्रमाणें रागामुळें त्यानें गंडस्थळांतून मदाचा वर्षाव केला. बाललीलेनें (आणखी कांहीं वेळ) कृष्णानें त्याच्या चेष्टा केल्या. शेवटीं कंसाच्या द्वेषानें अंतरात्मा पेटून गेल्यामुळें हत्तीला स्वर्गलोक दाखविण्याचा कृष्णानें निश्चय केला.

लागलींच ( कृष्णानें ) त्या हत्तीच्या दोन्ही भुंवयांच्या मध्यें पाय देऊन गंडस्थळाजवळचा दांत त्यानें दोन्ही हातांनीं जोरानें उपटून त्या दांतानेंच त्याला प्रहार केला. वज्रासारख्या आपल्याच दांताचा तडाका बक्षतांक्षणीं त्या कुंजराचा विष्ठामूत्रोत्सर्ग झाला व तो आर्तस्वरानें आरडूं लागला. कृष्णानें हाडें मोकळीं केल्यामुळें त्या व्याकुल झालेल्या गजेंद्राच्या दोन्ही बाजूंच्या गंडस्थळांतून जोरानें रक्ताचा प्रवाह चालू झाला. अशा स्थितींत पर्वताच्या पृष्ठभागावरील बिळामध्यें अर्धवट शिरलेल्या सर्पाला गरुड जसा खसूकन् बाहेर ओढतो त्याप्रमाणें बलरामानें त्याचें शेंपूट धरून जोरानें ओढलें.

याप्रमाणें त्या हत्तीच्याच दांतानें त्याची वाट लावल्यानंतर, कृष्णानें त्याच दांताचा फट्कारा त्या मदोन्मत महाताला लगावून त्यालाही यमलोक दाखविला. ( त्या फट्काऱ्यासरशीं ), दंतहीन झालेल्या गजेंद्रानें आर्तस्वरानें किंकाळीं फोडली व वज्रप्रहारानें दोन तुकडे होऊन पर्वत खालीं पडावा त्याप्रमाणें माहूतासहवर्तमान तो धाड्कन् भूमीवर पडला.

नंतर हातांत बर्हिद्वाराचे अडसर घेऊन त्या रणवीर पुरुषश्रेष्ठांनीं हत्तीच्या पादरक्षकांना ठार केलें. रक्षकांचा समाचार घेतल्यावर ते उभयतां सभास्थानांत प्राप्त झाले. त्यांचे गळ्यांत वनपुष्पांच्या माळा होत्या. त्यांना पाहतांच हे म्हणजे स्वर्गांतून नासत्यनामक अश्विनीकुमारच स्वेच्छेनें भूलोकीं आले आहेत कीं काय असें वृष्णि अंधक व भोज आदिकरून सर्व लोकांस वाटलें. रामकृष्णाच्या भयंकर सिंहनादानें दंड थोपटण्यानें व टाळी वाजविण्यानें सर्व प्रेक्षक जनांस अत्यंत हर्ष झाला. हे भारता, कंसाचे सर्व बेत ढांसळत चालल्यामुळें तो आतां मूर्ख ठरला व जेव्हां का प्रत्यक्ष राम व कृष्ण त्याच्या दृष्टीस पडले आणि त्यांना पाहून झालेला पौरजनांचा आनंद व त्यांवरील त्यांचा अनुराग हें पाहून तर तो फारच उद्विग्न झाला.

शेवटीं त्या कण्हत पडलेल्या गजेंद्राला मारून टाकून कमललोचन श्रीकृष्णानें ज्येष्ठ भ्रात्यासहवर्तमान त्या सागरासारख्या अफाट सभास्थानांत प्रवेश केला.

## अध्याय तिसावा.

—:०:—

### कंसवध.

वैशंपायन सांगतातः—ज्येष्ठ भ्रात्याचे मागून कमल-लोचन श्रीकृष्ण मोठ्या वेगानें सभास्थानीं शिरला. हत्तीच्या दांताचा ओरखडा त्याचे अंगाला लागला होता.त्या देवकीपुत्राचे बाहू अतिसुंदर होते. कुवलयापीडाचा मद व रुधिर लागून त्या वीराचें सर्वांग माखून गेलें होतें. सिंहाप्रमाणें त्याची गर्जना चाललेली होती. ( कंसाला मारण्यासाठीं उतावीळ झाल्याकारणानें ) तो मेघाप्रमाणें गरगर फिरत होता. त्यानें दंड थोपटले ह्मणजे जो आवाज होई त्याचे योगानें सर्व पृथ्वी हादरत होती. त्याचे हातांत त्या हत्तीचा दांत हेंच आयुध

होतें. त्याला पाहून म्लानमुख झालेल्या कंसानें रागानें त्याच्यावर डोळे वटारले. ज्याप्रमाणें एकच शिखर असलेला पर्वत अर्धचंद्राच्या बिंबाशीं भिडलेला दिसतो, तद्वत् हातामध्यें गजदंत घेऊन उभा असलेला श्रीकृष्ण फारच शोभिवंत दिसत होता.

गोविंदानें सिंहनाद केल्याबरोबर सर्व प्रेक्षकसमुदाय जयघोष करी, त्यामुळें तें सगळें सभास्थान प्रतिध्वनीनें दुमदुमून जाई. नंतर त्या रागीट कंसाचे नेत्र क्रोधानें लाल झाले व महाबलिष्ठ चाणूर मल्लास कृष्णाशीं युद्ध करण्याची त्यानें आज्ञा केली. तसेंच, 'तूं बलरामाशीं युद्ध कर ' म्हणून त्या क्रोधाविष्टानें महाप्रबळ, कपटी, पर्वतप्राय धिप्पाड व दुसऱ्यास दिपवून टाकणाऱ्या मुष्टिक नामक मल्लास सांगितलें. ' तूं अधिक चतुर आहेस यासाठीं तूंच कृष्णाचा समाचार पहा ' अशी कंसानें चाणूराला आधींच आज्ञा दिली होती. त्याप्रमाणें लागलीच खदिरांगारासारखे डोळे करून जलपूर्ण मेघाप्रमाणें चाणूर रागानें युद्धासाठीं पुढें सरसावला. इतक्यांत "गडबड बंद करा" असा राजाचा हुकूम सुटल्यामुळें जिकडे तिकडे सामसूम झालें.

नंतर सर्व यादव म्हणाले:—प्रथम ब्रह्मदेवानें हें बाहुयुद्ध निर्माण केलें व त्या संबंधीं त्यानेंच कांहीं नियम लावून दिले आहेत. ते असे:—असलें युद्ध रंगभूमीचे ठिकाणीं करावें; त्यांत पंच असावेत; भित्र्या लोकांनीं या भानगडींत पडूं नये; सर्व योद्धे व पंच यांना क्रिया व बल यांचें ज्ञान असावें; यांत कोणीही शस्त्रांचा उपयोग करूं नये; ठराविक वेळानें, योद्धे दमले असतां, जलाचे योगानें त्यांनीं आपला श्रमपरिहार करावा. त्याचप्रमाणें मधून मधून मल्लांनीं गोमयचूर्ण लावून आपला घाम जिरवावा, असाही एक उत्तम नियम आहे. प्रतिपक्षी ज्या स्थितींत असेल त्याच स्थितींत दुसऱ्यानें युद्ध करावें, म्हणजे प्रतिपक्षी उभा असल्यास उभ्यानें व भूमीवर पडलेला असल्यास भूमीवर पडून दुसऱ्यानें युद्ध करावें, असा एक नियम तज्ज्ञांनीं करून ठेविला आहे. योद्धा लहान आहे कीं वृद्ध आहे, कृश आहे कां मध्यम आहे, बलिष्ठ आहे कीं कसा, तें आपआपल्या भागांतल्या मल्लासंबंधानें परीक्षकांनीं ठरवावें. तसेंच कोणाचें बल किती, कोणाचें चातुर्य किती, या गोष्टींची युद्धकलाकोविदांनीं परीक्षा करून सारख्या मल्लांच्या जोडया लावल्या पाहिजेत; तसेंच एक गडी चीत झाल्यानंतर सुज्ञ प्रतिपक्ष्यानें त्याला कांहींएक करतां कामा नये. परंतु प्रस्तुत रंगभूमिवर, कृष्ण व अंध्रमल्ल यांचें युद्ध व्हावें अशी आज्ञा झाली आहे. पण कृष्ण लहान असून अंध्र तर अति बलिष्ठ आहे. या गोष्टीचा आपण विचार करावयास नको काय?"

यादवांचें हें भाषण ऐकतांच सभासदांमध्यें एकच कुजबूज सुरू झाली. तेव्हां सिंहनाद करून कृष्णानें बोलण्यास आरंभ केला. "मी लहान असून अंध्रमल्लाचा देह पर्वतप्राय धिप्पाड आहे. (हें खरें) पण अशा प्रबल वीरांशींच युद्ध करणें मला फार आवडतें. युद्धाच्या एकाही नियमाचा माझ्याकडून अतिक्रम व्हावयाचा नाहीं. द्वंद्वयुद्धाच्या ज्ञात्यांच्या वचनाला सोडून मी वागणार नाहीं. गोमयाचा भुगा अंगाला चोळणें, मधून मधून जलानें अंग प्रक्षालन करणें, तसेंच सर्व देहाला काव वगैरे फांसणें, हे आखाड्यांतील कुस्तीचे संप्रदाय आहेत. संयम[1],

१ योद्धयांनीं परस्परांस दूर सारणें.

स्थैर्य,[1] शौर्य, व्यायाम,[2] सत्क्रिया व बल इत्यादि रंगभूमीवरील युद्धामध्यें दृष्टीस पडणाऱ्या गुणांवरून, योद्ध्यांचें बलाबल ठरवावयाचें असतें, असें द्वंद्वविशारदांचें मत आहे. परंतु, आकसानें युद्ध करावयाचें नसतें तेव्हांचे हे सगळे नियम आहेत. पण हा अंध्र मल्ल ( नखशिखांत ) आकसानें युद्ध करण्यास सिद्ध झाला आहे; म्हणून धर्मयुद्धाचे सर्व नियम सांप्रत बाजूसच ठेवले पाहिजेत. तथापि याचा वध करून मी अखिल जनांस संतुष्ट करीन. हा महाकुशल चाणूरमल्ल, करूष देशांत उत्पन्न झालेला आहे. याचें शरीरबल व नैपुण्य विशेष आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवा. प्रतिपक्षी चीत झाल्यावर देखील यानें पुष्कळ मल्लांना ठार मारून रंगभूमीवर आपल्या सामर्थ्याचें प्रदर्शन करण्याच्या लालसेनें नियम मोडून मल्लयुद्धाला डाग लावला आहे.

रणामध्यें शस्त्रें घेऊन जे युद्ध करतात त्यांनीं प्रतिपक्षाचा शस्त्रानें घात केला म्हणजे जयापजयाचा निर्णय होतो. परंतु बाहुयुद्धांमध्यें, प्रतिपक्षी चीत झाला म्हणजे युद्धाची समाप्ति होते. संग्रामांत जो विजयी होतो त्याची जगतांत चिरकाळ कीर्ति दुमदुमून रहाते. एवढेंच नव्हे तर रणामध्यें शस्त्रघातानें ज्यास मृत्यु येतो त्यालाही स्वर्गलोकाची प्राप्ति होते असें शास्त्र आहे. एवंच, रणामध्यें मारणाराची व मरणाराची, दोघांची कीर्ति होते. म्हणून रणामध्यें मरण येणें हें सज्जनांना अत्यंत प्रिय वाटतें.

परंतु, कुस्तींत गडी तो चीत झाल्यावर त्याला मारणें हा मार्ग बल व कौशल्य या दोन्ही दृष्टींनीं निंद्य आहे. कारण बाहुयुद्धांत ज्याला मृत्यु येतो, त्याला स्वर्गलोक मिळत नाहीं. एवढेंच नाहीं, तर जो विजयी होतो त्याचे ठायींही लोकांचें मोठेंसें प्रेम जडत नाहीं. ( कारण बोलून-चालून घटकेची गंमत ती. ) अहंमन्य राजाची कीर्ति व्हावी म्हणून जो मल्ल अधर्मानें प्रतिपक्षास ठार मारतो त्याचें पाप मारणारासच लागतें.

याप्रमाणें उभयतांचें बोलणें चाललें आहे इतक्यांत वनांमध्यें हत्तींची झुंज लागावी त्याप्रमाणें उभयतांचें भयंकर व दारुण युद्ध सुरू झालें. एकानें पेंच केला, म्हणजे दुसरा त्याचें निवारण करी. याप्रमाणें त्यांचे बरेच निरनिराळे बाहूंचे डाव झाले. मध्येंच एकमेकांना धरून ते खालीं आदळीत किंवा वर उचलून सोडून देत. थोडा वेळ गेला म्हणजे परस्परांना दूर ढकलून देत. तसेंच परस्परांच्या छातीवर छाती आपटीत. लढतांना ते परस्परांशीं भिडले म्हणजे हे पर्वत आहेत कीं काय असें वाटे. मधून मधून ते परस्परांना ओढीत, ठोसे लगावीत, किंवा पायांमध्यें शिरून खालीं पाडीत. अति दमले म्हणजे मोठ्यानें "हुंः" करूं लागत. कोंपर व गुडघे यांनीं प्रहार करून नखाग्रांनीं एकमेकांना ओरबाडण्यास व जोरानें टांगा मारण्यास देखील त्यांनीं कमी केलें नाहीं.[3] शेवटीं शिळेप्रमाणें कठीण असलेले गुडघे एकमेकांच्या गुडघ्यांवर आपटून परस्परांचीं मस्तकें जोरानें एकमेकांशीं घांसलीं. याप्रकारें शस्त्रावांचून त्यांचें घोर युद्ध चाललें होतें. परंतु त्यांत बाहुबल--चातुर्य उत्तम रीतीनें दिसून येत होतें. सभास्थानीं चाललेलें हें अप्रतिम बाहुयुद्ध पाहून लोकांना मोठी मौज वाटली व त्यांचे तोंडांतून जयघोष निघूं लागले. मंचामध्यें बसलेले लोक देखील धन्यवाद देऊं लागले.

१ पवित्र्यावर कायम असणें.

२ जागच्याजागींच हातपाय चालविणें.

३ झोंबींत देखील मर्मस्थानीं आघात किंवा स्पर्श न करणें.

हें पाहून कंसाचें मुख घामानें डवडवून गेलें. त्याची सारखी कृष्णाकडे नजर लागून राहिली होती. लोकांचा गलबला सुरू होतांच कंसानें उजव्या हातानें खूण करून वाद्यें बंद करावयास सांगितलीं.

मृदंगादि वाद्यें कंसाज्ञेनें बंद होतांच, अंतरिक्षांत हजारों देववाद्यें वाजूं लागलीं. कमललोचनांचा हृषीकेश चाणूराशीं युद्ध करीत असतां, जिकडे तिकडे आपोआप वाद्यघोष सुरू झाले. कृष्णाला जय मिळावा अशी इच्छा करीत, वाटेल तेथें जाणाऱ्या विमानांत बसून विद्याधरांसहवर्तमान देव गुप्तरूपानें आकाशांत फिरूं लागले. ' कृष्णा, या मल्लरूपी चाणूर राक्षसाला पराभूत कर ' असें नभोमंडलांत असलेले सप्तर्षि म्हणूं लागले.

चाणूराबरोबर या प्रकारें खेळण्यांत बराच वेळ घालविल्यावर, कंसाचा नाश जवळ येऊन ठेपला आहे, हें सर्व देवांस व लोकांस सुचविण्याचे हेतूनें देवकीपुत्रानें त्याचें सर्व बल हरण करून टाकलें. त्याबरोबर भूकंप होऊन मंच हालूं लागले. इतकेंच नव्हे तर कंसाच्या मुकुटांतील एक उत्तम मणि खालीं पडला. पुढें जर्जर झालेल्या चाणूराला आपल्या बाहूंनीं वांकवून व त्याच्या वक्षःस्थलावर गुडघ्याची ठोकर देऊन कृष्णानें त्याच्या मस्तकावर मुष्टिप्रहार केला. त्यासरशीं रक्तानें व अश्रूंनीं भरलेले त्याचे नेत्र स-बंध बाहेर पडून त्याच्या खांद्यावर सुवर्णाच्या घंटांसारखे लोंबकळूं लागले. नंतर, ज्याचे नेत्र बाहेर आले आहेत असा चाणूर गतप्राण होऊन रंगभूमीच्या मधोमध धाडकन् पडला. तो रंगमंडप एवढा विस्तीर्ण होता, परंतु तो विशाल चाणूर गतप्राण होऊन तेथें जेव्हां पडला तेव्हां तो मंडप एखाद्या पर्वतानें अडला जावा तसा भासला.

सामर्थ्याच्या अभिमानानें फुगून गेलेल्या चाणूराची कृष्णानें याप्रमाणें वाट लावल्यानंतर बलरामानें मुष्टिकाला पुढें ओढला. आणि कृष्णानें तोसलक नामक मल्लाशीं युद्ध आरंभलें. त्या दोघां मल्लांचा मृत्यु समीप आलेला असल्याकारणानें परस्परांशीं भिडतांच क्रोधानें बेहोष होऊन ते राम व कृष्ण यांच्याशीं युद्ध करूं लागले. आखाड्यामध्यें वांकून ते पवित्र्यावर उभे राहिले व त्यांनीं मोठ्यानें सिंहनाद केला. पहिल्या सपाट्यास गिरिशिखरासारख्या अजस्र तोसलाला उचलून समर्थ कृष्णानें शेंकडो वेळां गरगर फिरविलें आणि शेवटीं भूमीवर हापटिलें. कृष्णानें त्राहि त्राहि केल्यामुळें जर्जर झालेला तो बलिष्ठ मल्ल मरणोन्मुख होऊन त्याचे मुखांतून अतिशय रक्त वाहूं लागलें.

इकडे महाबल व मल्लश्रेष्ठ संकर्षणानें बराच वेळपर्यंत मुष्टिक नामक अंध्र मल्लाशीं दोन हात करून त्याला बरींच मंडळें दाखविलीं. शेवटीं, पर्वताला जसा वज्राचा तडाका द्यावा तद्वत् तेजस्वी बलरामानें, त्याच्या मस्तकावर आपल्या वज्रयुक्त मेघासारख्या मुष्टीचा जोरानें प्रहार केला. त्या बरोबर, त्याचा कपाळमोक्ष होऊन डोळे बाहेर आले आणि गतप्राण होऊन तो जमीनीवर आदळला. त्या वेळीं मोठा आवाज झाला.

याप्रमाणें अंध्र व तोसलक या मल्लांचा वध केल्यावर राम व कृष्ण यांनीं रंगस्थानीं मोठा सिंहनाद केला. क्रोधानें त्यांचे नेत्र लाल झाले होते. प्रख्यात मल्ल चाणूर व मुष्टिक मरून पडल्यामुळें सभास्थान मल्लशून्य होऊन भीषण दिसूं लागलें. नंदादि जे गोप प्रेक्षक म्हणून हा समारंभ पाहण्यासाठीं उभे होते त्यांची भयानें गाळण उडून ते कांपूं लागले. देवकीनें कृष्णाला पाहिलें

तेव्हां तिच्या नेत्रांतून आनंदाश्रु व स्तनांतून दुग्ध वाहूं लागलें. ती भयानें कांपतच होती. इकडे कृष्णदर्शनामुळें वसुदेवाचे नेत्र देखील पाण्यानें भरून आले. तथापि अपत्यस्नेहानें त्याची जरा नाहींशी होऊन त्याला तरुणासारखा जोर आला. सर्व वारवनिता नेत्ररूपी भ्रमरांच्या द्वारां कृष्णाच्या मुखकमलाचें मनसोक्त पान करूं लागल्या. मधून मधून त्यांच्या डोळ्यांची पातीं लवत तेवढ्या वेळीं फक्त कृष्णाचें मुख त्यांचे दृष्टीस पडत नव्हतें.

कंसाच्या मुखाला घाम आला व कृष्ण दृष्टीस पडतांच उत्पन्न झालेल्या क्रोधाच्या ज्वाला त्याचे दोन्ही भुवयांचे मध्य प्रदेशीं स्पष्ट दिसूं लागल्या. रागामुळें तो जे निःश्वास टाकीत होता त्या ( निःश्वासरूपी ) वायूनें पेटलेल्या व कृष्णाविषयींच्या असूयारूपी धूमानें युक्त झालेल्या कंसाच्या मानसाग्नीनें त्याचें अंतःकरण जणूं काय प्रज्वलित झालें. त्याचे ओष्ठ फुरफुरत होते; कपाळाला घाम आला होता आणि तोंडावर रागाची लाल छटा दिसत होती, त्यामुळें त्याचें शरीर जणूं काय तांबड्या सूर्यबिंबाप्रमाणें भासत होतें. ज्याप्रमाणें वृक्षांच्या पर्णांवरील दंवाचे बिंदु बालरवीच्या किरणांच्या स्पर्शानें शोभायमान दिसतात, त्याप्रमाणें रागानें लाल झालेल्या कंसाच्या मुखावरील स्वेदबिंदु सुंदर दिसत होते. शेवटीं क्रोधाविष्ट होऊन कंसानें आपल्या अति भयंकर सेवकांस आज्ञा केली कीं “ ( सेवक जनहो, ) या रानवट गोपांना सभास्थानांतून हांकून द्या. हे पापी दुरात्मे माझ्या दृष्टीसमोर नको आहेत. माझ्या राज्यांत गोपांना रहाण्याचें कारण नाहीं ( त्यांनीं राहूं नये. ) माझ्या वाईटावर असलेल्या या दुष्ट नंदगोपाला लोखंडाच्या खोड्यांत लोहशृंखलांनीं अडकावून टाका. हा दुष्ट वसुदेव नेहमीं माझा द्वेष करतो. दंडाच्या फटक्यांची शिक्षा वृद्धाला योग्य नाहीं, पण याला त्वरित दंडानें शासन करा. या शिवाय दुसरे जे कृष्णाच्या पक्षाचे सामान्य गोपाळ आहेत त्यांच्या गाई व त्यांची संपत्ति त्यांच्यापासून हिसकावून घ्या.”

याप्रमाणें कठोर शब्दांनीं कंस हुकूम करीत आहे असें पाहतांच, सत्याचा वाली जो कृष्ण, त्यानें त्याच्याकडे डोळे वटारून पाहिलें. नंदाचा व वसुदेवाचा कंसानें धिक्कार केल्यामुळें कृष्णाला अत्यंत राग आला. सजातीयांची दुःखद स्थिति अवलोकन करून व देवकीला मूर्च्छा आली आहे असें पाहून कंसाचा नाश करण्याचे हेतूनें पराक्रमी व बलिष्ठ अशा अच्युत कृष्णानें सिंहाप्रमाणें वेगानें उडी मारली व ( क्षणार्धांत ) तो सभास्थानाच्या मध्यभागीं कंस बसला होता तेथें आकाशांत वायूनें जोरानें उडवून दिलेल्या मेघाप्रमाणें जाऊन थडकला. तो इतक्या तडाक्यानें गेला कीं, त्यानें आखाड्यांतून उडी केव्हां मारली तें देखील कोणास समजलें नाहीं. तो जेव्हां कंसाच्या समीप गेला, तेव्हां तो कोठें गेला हें पौरजनांच्या लक्षांत आलें. यमाच्या पाशांत सांपडून व्याकुळ झालेल्या कंसाला देखील कृष्णप्रभु आकाशांतूनच आपल्या समीप आला असें वाटलें.

नंतर कृष्णानें परिघासारखा आपला बाहु लांब करून भर सभेमध्यें कंसाचें केंस धरले. कृष्णानें आपल्या हातानें कंसाचे मस्तकाला स्पर्श करितांच त्याचा हिरे लावलेला कांचनाचा मुकुट खालीं पडला. केंसाचा केशकलाप कृष्णानें घट्ट हातांत धरतांक्षणींच त्याची सर्व हालचाल बंद पडून तो अत्यंत



कंसाला मारल्यानंतर रामकृष्णांनीं वसुदेव देवकीची भेट घेतांच त्यानीं त्यानां आलिंगन दिलें.
( विष्णुपर्व अ० ३० पृष्ठ २६७. )

व्याकुल झाला. केंस धरल्यामुळें तो मृतप्राय झालेल्या मनुष्यासारखे निःश्वास टाकूं लागला. फार काय सांगावें ?—कृष्णाच्या मुखाकडे पहाण्याची देखील कंसाची छाती झाली नाहीं. त्याच्या कर्णांमधील कुंडलें गळून पडलीं; वक्षःस्थळावरील हार तुटून गेला; बाहू लोंबकळूं लागले; सर्वांगावरील भूषणें छिन्नविच्छिन्न झालीं; उत्तरीयवस्त्र अंगावरून खालीं सरून त्या योगानें त्याचा कंठ आंवळून गेला. सारांश, कृष्णाच्या तेजानें घेरून जाऊन तो गोंधळून गेला. ( लोकांस पीडा दिल्यामुळें ) स्वतः पीडेस पात्र झालेल्या कंसाचे जोरानें केंस धरून कृष्णानें त्याला प्रेक्षामंदिरांतून बाहेर ओढून रंगभूमीवर आणिलें. महातेजस्वी कंसराजाला जोरानें ओढीत नेल्यामुळें त्याच्या देहाची भूमीवर खूण रहात गेली. याप्रमाणें थोडा वेळ त्याच्याशीं खेळून कृष्णानें त्याची फरफट काढकाढून त्याचा प्राण घेतला. नंतर त्यानें त्याचा देह जवळच फेंकून दिला. सुखोपभोगामध्यें रुळलेल्या त्याच्या देहाची अशी माती होऊन तो धुळीनें भरून रुक्ष झाला. शूर पुरुषाला अयोग्य अशा रीतीनें त्याला मरण आलें. त्याचे नेत्र मिटलेले असून मस्तकावर मुकुट नव्हता त्यामुळें अव्यवस्थित झालेलें त्याचें तोंड पाकळ्यांशिवाय कमळ दिसतें तद्वत् विशोभित दिसत होतें. कंसाला बाणापासून इजा झाली नाहीं किंवा लढाईमध्यें मरण आलें नाहीं; केवळ केंस ओढून त्याची इतिश्री झाल्यामुळें वीराची गति त्याला मिळाली नाहीं. त्याच्या मांसांत खोल घुसून एकाएकीं त्याचा प्राण हरण करणारे केशवाच्या नखाग्रांचे ओरबाडे त्याच्या सर्व अंगावर स्पष्ट दिसत होते.

कंसाला मारून मार्गांतील सर्व कांटे नाहींसे केल्यावर कमललोचन श्रीकृष्णाला मोठा हर्ष झाला. त्या योगानें त्याचें तेज द्विगुणित झालें. कंसाला मारल्यानंतर कृष्णानें वसुदेवाच्या पायांवर लोटांगण घातलें. नंतर यदुनंदनानें मातेच्या पायांवर डोकें ठेविलें. तेव्हां तिनें आनंदातिरेकानें स्तनांतून वाहणाऱ्या दुग्धाच्या धारांनीं त्याला स्नान घातलें. आपल्या तेजानें चमकणाऱ्या कृष्णानें सर्व यादवांना त्यांची पदवी व त्यांचें वय यांस अनुसरून पायरी पायरीनें कुशल प्रश्न केले. इकडे धर्मात्म्या बलरामानें कंसाच्या सुनामा नामक पराक्रमी भावास बाहुबलानें निमिषार्धांत यमलोकाची वाट दाखविली. याप्रमाणें, सर्व शत्रूंचें निर्दलन केल्यावर उभयतां वीरांनीं क्रोधाचा उपशम केला. हा वेळपर्यंत त्यांना गोकुलांतच रहावें लागलें होतें; परंतु आतां मुदितांतःकरणानें त्यांनीं आपल्या पित्याच्या गृहामध्यें प्रवेश केला.

## अध्याय एकतिसावा.

—:०:—

### कंसाच्या स्त्रियांचा विलाप.

वैशंपायन सांगतातः—आपला पति कंस एखाद्या पुण्यक्षय झालेल्या ग्रहाप्रमाणें (मरून) भूमीवर पडला आहे असें पहातांच, त्याच्या सर्व स्त्रिया त्याचे भोंवतीं गोळा झाल्या. मृगराज मृत होतांच हरिणी जशा शोक करूं लागतात त्याप्रमाणें आयुर्दाय संपल्यामुळें भूमिपति असलेला आपला पति भूमीवरच निश्चेष्ट पडलेला पाहून सर्व स्त्रियांनीं मोठा आकांत मांडला. “ हायरे दैवा, आमचा सर्वस्वी घात झाला. हे महाबाहो, तूं आजपर्यंत वीराचें व्रत अबाधित पाळलेंस. तूं मृत झाल्यामुळें आम्हां वीरपत्न्यांच्या सर्व आशा नष्ट होऊन आम्हांला कोणीही मायेचें राहिलें नाहीं. ही तुझी कायमची शेटवली अवस्था पाहून हे राजशार्दूला,

आम्ही सर्व बांधवांसह दीनस्वरानें हंबरडे फोडीत बसलों आहों. हे विभो, आमचा महाबलिष्ठ नाथ तूं आमचा परित्याग करून पंचत्व पावल्यामुळें आम्ही पाळेंमुळें तुटलेल्या वेलींप्रमाणें निराधार झालों आहों. रतिसुखाच्या लालसेनें कोपयुक्त होऊन आम्ही लतांसारख्या भूमीवर लोळूं लागलों म्हणजे ( आमची समजूत करून ) आम्हांला शयनस्थानीं आतां कोण बरें घेऊन जाईल? हे सौम्य, तुझें हें आल्हादकारक निःश्वासवायूनें पूर्ण असलेलें अनुपम सुंदर[1] वदन सूर्य निर्जल कमला[2]प्रमाणें जाळीत आहे. कुंडलांवाचून ओके झालेले तुझे कान पूर्वीप्रमाणें मनोहर दिसत नाहींत. नेहमीं कुंडलांना आवडणारे तुझे ते कान मानेखालीं दडून गेले आहेत. हे वीरा, तुझ्या मस्तकावर अत्यंत सुशोभित दिसणारा तुझा सूर्यतुल्य तेजस्वी व नानाविध रत्नांनीं विभूषित असलेला मुकुट कोठें रे गेला ! तूं इहलोकचा त्याग करून गेलास. आतां या तुझ्या अंतःपुराला शोभिवंत करणाऱ्या हजारों दीन स्त्रियांचे समूहानें काय बरें करावें! साध्वी स्त्रियांची पतिसुखलालसेविषयीं कधींही निराशा होत नाहीं व पती देखील अशा स्त्रियांचा त्याग करीत नाहींत. परंतु तूं मात्र आम्हांला टाकून गेलास! खरोखर काल हा सर्वांत बलिष्ठ आहे ! त्याचें विध्वंसाचें काम क्रमानें चाललेलें आहे. तूं म्हणजे शत्रूंचा कर्दनकाळ परंतु तुलाही त्यानें स्ववश करून टाकलें. ( तेव्हां कालापुढें कोणाचें चालावयाचें नाहीं, हेंच खरें. ) आह्मी दुःखाला सर्वथा अयोग्य आहों; कारण, तुझ्या बरोबर आम्ही आतांपावेतों सुखांत वाढलों. हे प्रियकरा, आतां आम्ही विधवांनीं अनाथ अवस्थेंत दिवस कसे कंठावे बरें? पतिव्रताधर्माची चाड असणाऱ्या स्त्रियांचें पति हेंच दैवत होय. त्यांना पतींवांचून अन्य गति नाहीं. पण सर्वोपहारी शिरजोर कालानें (तुला ओढून नेऊन) आमची गति नाहींशी करून टाकली. सांप्रत आम्हांला वैधव्यदशा प्राप्त झाली असून आमचीं अंतःकरणें शोकानें पोळून गेलीं आहेत. ( फार काय सांगावें ) आम्ही शोकसागरांत बुडून गेलों आहों. तुजवांचून आतां अशा स्थितींत आम्हीं कोणाचा आश्रय करावा? आजपर्यंत तुजबरोबर आम्ही कालक्रमणा केली. नेहमीं तुझ्या अंकावर बसून आम्हीं क्रीडत होतों. परंतु एका क्षणांत आम्हांला तुझा वियोग झाला. माणसांचें जीवित खरोखर क्षणभंगुर आहे. हे मानद(आह्मांस मान देणाऱ्या), तुझी विपन्नावस्था झाल्यामुळें आम्हींही मृतप्रायच झालों आहों. ज्या अर्थीं एकदम आम्हां सर्वजणींवर वैधव्याची कुऱ्हाड कोसळली आहे, त्या अर्थीं एकाच प्रकारचें दुष्कृत्य आमचे हातून घडलें असावें असें आम्हांला वाटतें. आम्ही कामवासनेनें पछाडलों असतां स्वर्गांतील सुखोपभोग तूं आम्हांला इहलोकीं प्राप्त करून दिलेस. आम्ही सर्वजणी तुजवर कामासक्त होतों असें असतां तूं आम्हांला टाकून कोठें चाललास? हे देवतुल्य प्रभो, आम्हां अनाथांचा तूं नाथ आहेस; हे मानद नृपाला, कुररीं[1]सारखा आमचा करुण विलाप ऐकून तरी आमच्याशीं बोल. हे महाभागा, आपल्या स्त्रियांना व बांधवांना दुःखसागरांत लोटून तूं इहलोक सोडून गेलास ही गोष्ट आम्हांला अत्यंत भयंकर वाटते. हे वीरा, तूं आम्हांला येथेंच सोडून परलोकची वाट

१ कंस कृतीनें असुर असला तरी रूपानें फार सुंदर होता.

२ कमलाला जोपर्यंत खालून जलाचा पुरवठा आहे तोंपर्यंत तें सूर्य किरणांनीं शुष्क होत नाहीं, ह्मणून निर्जल असें येथें म्हटलें आहे.

१ कवि ह्या पक्षाचे करुणस्वराची उपमा नेहमी विलापाला देतात.

धरलीस, त्या अर्थी हे कांता, परलोकीं आमच्यापेक्षां सुंदर स्त्रिया असाव्यात असें वाटतें. हे दातृत्वशाली वीरा, तुझ्या भार्या आर्तस्वरानें रुदन करीत असतांही मूर्च्छा टाकून तूं कां बरें जागृत होत नाहींस? मरणोत्तर पुरुष आपल्या स्वतःच्या बायकांना सोडून निरपेक्षबुद्धीनें परलोकचा रस्ता सुधारतात, त्या अर्थी त्यांची परलोकयात्रा अत्यंत खडतर आहे असें दिसतें! खरोखर स्त्रियांनीं शूर पतींशीं लग्न करण्यापेक्षां मुळींच त्यांचें लग्न न झालेलें चांगलें. कारण, शूर पुरुष स्वर्गीय स्त्रियांना फार आवडतात व त्यांनाही स्वर्गलोकच्या स्त्रिया अत्यंत प्रिय वाटतात. हाय! हाय! तुझ्यासारख्या रणवीराला एकाएकीं ओढून नेऊन अदृश्य कृतांतानें आमच्या सर्वांच्या अंतरात्म्यावर भयंकर घाय घातला आहे. तूं जरासंधाच्या सैन्याचा नायनाट करून युद्धांमध्यें यक्षांना देखील पादाक्रांत केलेलें आहेस; असें असतां एका यःकश्चित् मनुष्यानें हे पृथ्वीपते[1] तुला कसें मारिलें? इंद्राबरोबर तुझें धनुर्युद्ध चाललें होतें तेव्हां देवांना देखील तुला मारण्याची छाती झाली नाहीं; असें असतां एका सामान्य माणसानें तुझा वध केला हें आश्चर्य नव्हे काय? कांहीं केलें तरी खवळावयाचा नाहीं अशा सागराला देखील बाणांचा वर्षाव करून तूं क्षुब्ध केलेंस. वरुणाला जिंकून त्याचीं सर्व रत्नें हिरावून घेतलींस; इंद्रानें बरोबर जलवृष्टि केली नाहीं तेव्हां प्रजाहितासाठीं बाणांनीं मेघांस वश करून त्यांचेकडून जोरानें पाऊस पाडलास. तुझ्या पराक्रमामुळें चीत झालेले सर्व राजे तुझ्यापुढें हात जोडून उभे रहात व उत्तम उत्तम रत्नें व प्रावरणें तुला नजर करीत. याप्रमाणें नानाविध रीतींनें तुझा देवतुल्य पराक्रम शत्रूंच्या प्रत्ययास आलेला असतां, तुझ्यावर हें प्राणांतिक संकट कसें बरें आलें? तूं आमचा नाथ कालवश झाल्याकारणानें आतां 'विधवा' हा शब्द आमचे कपाळीं आला. उन्मत्त झालेल्या कृतांतानें आम्हांला शहाण्याचें वेडें केलें आहे. हे नाथा, तुला जर आम्हांला विसरून परलोकीं जावयाचेंच होतें, तर "जातों" एवढें स्वमुखानें सांगण्याला तुला काय बरें श्रम पडत होते? प्रियकरा, आमच्यावर कृपा करा. आम्ही भ्यालों असून तुमच्या पायांवर लोटांगण घातलें आहे, तरी आतां आपला परलोकचा प्रवास पुरा करून महाराज परत फिरा. वीरा, तूं आज तृण व धूळ यांवर कां शयन केलें आहेस? जमिनीवर शयन केल्यामुळें तुझ्या शरीराला त्रास होत नाहीं काय? आम्ही जणूं काय निद्रावस्थेंत असतांना (संकटाला तोंड देण्याची आमची तयारी नसतांना) एकाएकीं आमच्यावर हा प्रहार कोणीं केला? सर्व स्त्रियांवर हा भयंकर प्रसंग कोणीं आणिला? पतिमरणानंतर जिला जिवंत राहून जन्मभर रडत बसावयाचें असेल तिनें आतांही पाहिजे तर रडावें. आपल्याला जर पतीबरोबर सहगमन करावयाचें आहे तर असें रडत बसण्यांत काय हंशील आहे?"

इतक्यांत, कंसाची दीन माता कांपत कांपत त्या ठिकाणीं आली व माझें बाळ कोठें आहे माझा विसांवा कोठें गेला असें मोठ्यानें आक्रोश करीत विचारूं लागली. निस्तेज चंद्राप्रमाणें गतप्राण होऊन पडलेल्या आपल्या पुत्राला पाहून तिचें हृदय विदीर्ण झालें. वारंवार तिचें चित्त भ्रमण करूं लागलें. पुत्राच्या मुखाकडे पाहून व सुनांचा आर्तस्वर ऐकून "हायरे, माझा सर्वस्वी घात

१ येथे 'जगतीपले' असा पाठ आहे, पण त्यापेक्षा, 'जगतीपते' हा लेखी पाठच आह्मास पटतो.

झाला " असें म्हणत कंसमाता मोठ्यानें विलाप व आक्रोश करूं लागली. पुत्रप्रेमानें व्याप्त झालेल्या कंसमातेनें पुत्राचें दीन वदन अंकावर घेऊन, " अरे माझ्या बाळारे " असें करुण व आर्त स्वरानें ओरडण्यास आरंभ केला. ती आणखी म्हणाली " शूरांचे ब्रीदानें चालणाऱ्या व सजातीयांच्या आनंदाला भरती आणणाऱ्या माझ्या पुत्रा, तूं इतक्या लवकर आपली इहलोकची यात्रा कां संपविलीस? बाळारे, तूं व्रतस्थ नसतांना उघड्या जागीं कां बरें शयन केलें आहेस? वत्सा, तुझ्यासारखे सुलक्षणी पुरुष भूमीवर कधींही शयन करीत नाहींत. राक्षसांची सभा भरली असतां, ( त्रेतायुगामध्यें ) महाबलिष्ठ रावणानें पुढील उद्गार काढले. पण ते उद्गार सर्व सज्जनांना पूर्णपणें संमत होऊन बसले आहेत. ( तो म्हणाला ) मी महापराक्रमी असून देवांना देखील जिंकलें आहे. परंतु मला माझ्या बांधवांपासूनच मोठें व अनिवार्य भय आहे. माझ्या सुबुद्ध पुत्राची ज्ञातिबंधूंवर मोठी ममता होती. परंतु अखेर रावणाप्रमाणें ज्ञातिबंधूच त्याच्या घाताला कारण झाले! पाडस मृत झालें असतां हरिणी जशी आक्रोश करते त्याप्रमाणें, कंसाची माता ( एकसारखी ) रडत होती. ( थोडा वेळ नातांच ) ती शून्यहृदय झालेल्या आपल्या वृद्ध उग्रसेन पतीस म्हणाली. " हे सदाचारी राजा, इकडे ये. वज्राच्या आघातानें पर्वत जसा खालीं पडावा, तद्वत् ह्या तुझ्या नराधीश पुत्रानें वीरासारखें या ठिणाणीं भूमीवर शयन केलें आहे.त्याच्या मुखाकडे एकवार अवलोकन कर. महाराज, हा आपला पुत्र कालवश होऊन प्रेतरूप झाला आहे. याची उत्तरक्रिया आतां आपणांला केली पाहिजे. राज्यें वीरांनींच भोगावीं. आपण आतां पराभूत झालेले आहों म्हणून कृष्णाकडे जाऊन कंसाच्या प्रेतसंस्कारा विषयीं विज्ञप्ति करा. (प्रतिपक्षांपैकीं एकजण) मरेपर्यंतच वैर धुमसत असतें. त्यांतील एकाची समाप्ति झाली म्हणजे तें विझून उभयपक्षांत शांतता नांदते. तेव्हां आतां प्रेतसंस्काराच्या तयारीला लागा. मृत झालेल्या देहाकडे काय बरें दोष आहे? "

याप्रमाणें, आपल्या भोज पतीशीं भाषण केल्यानंतर दुःखानें होरपळलेल्या कंसमातेनें आपले केंस तोडण्यास आरंभ केला व (पुनः पुनः) पुत्राच्या मुखाकडे पाहून ती ओक्सा बोक्शीं रडूं लागली. ती ह्मणाली " राजन्, सुखांत वाढलेल्या या तुझ्या भार्यांनीं आतां काय बरें करावें? तुझ्यासारखा उत्तम पति मिळून देखील यांचे मनोरथ विफल झाले! सरोवरांतील पाणी आटून तें जसें शुष्क होतें त्याप्रमाणें कृष्णाच्या अंकित राहून दिवस कंठणाऱ्या या तुझ्या रोड वृद्ध पित्याकडे मला पहावत देखील नाहीं. बाळा, मी तुझी आईना? मग तूं माझ्याशीं कां बरें मौन धरलें आहेस? व आपल्या प्रियजनांस सोडून तूं परलोकचा बिकट रस्ता कां सुधारलास? तूं नयपटु असून माझें सर्वस्व होतास. पण मी अभागी असल्यामुळें सर्वापहारी कृतांतानें तुला माझे जवळून ओढून नेलें. हे कुलसमुदायसंरक्षका, मानमरातब व देणग्या देऊन तूं आपलेसे करून टाकलेले व तुझ्या गुणांनीं संतुष्ट झालेले तुझे सारे भृत्य सपरिवार आज तुझ्यासाठीं शोक करीत आहेत. हे आजानुबाहो प्रतापी नरशार्दूला, सचेतन हो आणि या अंतःपुरांतील स्त्रियांचें, मथुरानगरीचें व ( तुझ्या मृत्युमुळें ) दीन झालेल्या जनांचें संरक्षण कर. "

याप्रकारें अत्यंत आर्त होऊन कंसस्त्रियांचा लांबलचक विलाप चालू असतां सूर्य अस्तास गेला. त्या वेळीं संध्यारागामुळें सूर्यबिंब तांबडेंलाल झालें होतें.

## अध्याय बत्तिसावा.

—:०:—

### उग्रसेनाचें समाधान व अभिषेक आणि कंसाचा प्रेतसंस्कार.

वैशंपायन सांगतातः—(नंतर) दुःखार्त झालेला उग्रसेन कृष्णापाशीं गेला. पुत्रशोकानें होरपळून गेल्यामुळें विषप्राशन केलेल्या मनुष्याप्रमाणें त्याचे नाकांतून उष्ण श्वास निघत होते. तेव्हां यादवांसहवर्तमान पश्चात्तापबुद्धीनें कंसघाताच्या पापाविषयीं कृष्ण गृहामध्यें विचार करीत बसलेला आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. कंसाच्या स्त्रियांचे करुणाप्रचुर नानाविध विलाप श्रवण करून कृष्णाचे मनाला उद्वेग वाटल्यामुळें यादवसमाजांत तो स्वतांलाच बोल लावून घेऊं लागला. अरेरे, म्यां मूर्खानें रागाचे भरांत दुष्ट कृत्य करण्यास प्रवृत्त होऊन कंसाचा वध केला आणि त्यायोगें मी त्याच्या सहस्त्रावधि स्त्रियांना वैधव्यपंकांत लोटण्यास मात्र कारणीभूत झालों. यांच्या भर्त्याला मीं मारल्याकारणानें या स्त्रिया आर्तस्वरानें आक्रोश करूं लागल्या. स्त्रियांचे करुणस्वर ऐकून यःकश्चित् (सामान्य) पुरुषालाही दया आल्यावांचून रहात नाहीं. अनभिज्ञ स्त्रियांच्या नुसत्या विलापानें (प्रत्यक्ष) कृतांताला करुणा उत्पन्न होऊन तो देखील शोकसागरांत बुडून जातो. कंस पापी व सज्जनद्वेषी असल्याकारणानें त्याचा वध करावा हें मी पूर्वींच ठरविलें होतें. निर्दय, मंदबुद्धि व पापवृत्तीच्या मनुष्याचा क्लेश न देतां वध करणें हेंच श्रेयस्कर होय. ज्याचा लोक द्वेष करितात त्याला जिवंत ठेवणें योग्य नाहीं. कंस (तर बोलून चालून) पापी होता. सज्जनांना त्याची वर्तणूक पसंत नसून त्याचा सर्व लोक धिःकार करीत. अशा माणसाच्या प्राणांविषयीं कोण दया करील? तपोनिष्ठ लोकांनाच स्वर्गलोकाची प्राप्ति होते. स्वर्गवास मिळणें हें पुण्यकर्माचें फल आहे; परंतु इहलोकीं जो यश संपादन करितो त्याला येथेंच स्वर्गवास आहे. लोक सुखी असले, प्रजा धर्मनिष्ठ असली, आणि अधर्माचरणाकडे कोणाची प्रवृत्ति नसली म्हणजे राजेलोकांना अनीतीचा डाग लागत नाहीं. दुष्टवृत्तीच्या लोकांना कृतान्त यथायोग्य प्रायश्चित्त भोगावयास लावतो. धर्मानें वागणारांस पारलौकिक सुख मिळतें. धर्मपरायण मनुष्याचें देव अत्यंत काळजीनें रक्षण करतात. दुष्कृत्यें करणें सुलभ असल्याकारणानें, दुराचारी लोकच जगावर पुष्कळ आढळतात; म्हणून कंसाला मीं मारलें ही चांगली गोष्ट झाली असें समजा. याला मारून याच्या विपरीत कर्मांचा मीं समूळ उच्छेद केला आहे तेव्हां आतां शोकार्त झालेल्या कंसस्त्रियांचें, पौरजनांचें आणि मथुरा नगरींतील शिल्पिजनांचें समाधान करा.

गोविंद याप्रमाणें बोलत आहे तों यादवांना बरोबर घेऊन उग्रसेन त्या ठिकाणीं प्राप्त झाला. लज्जेनें त्यानें मुख खालीं केलें होतें. आपला पुत्र पापी होता व त्याचेकरितां आपण कृष्णाकडे चाललों आहों या भावनेनें तो साशंकमुद्रेनेंच तेथें आला होता. तथापि, यादवसमाजामध्यें कमलनयन कृष्णाला उद्देशून तो दीन व सलज्ज वाणीनें बोलला. बोलतांना त्याचा कंठ दाटून आल्यामुळें त्याचे मुखांतून स्पष्ट शब्द उमटेतना.

(उग्रसेन म्हणाला) "क्रोधवश होऊन तूं माझ्या पुत्राला मारलेंस. शत्रूची यमधर्माच्या दिशेकडे (दक्षिण) पाठवणी केलीस. स्वधर्म पाळून कीर्ति मिळविलीस. आणि आपलें नांव भूलोकीं गाजवून सोडलेंस. (अलौकिक कृत्य करून) सज्जनांमध्यें तूं आपला मोठेपणा प्रस्थापित केलास. (तुझ्या सामर्थ्या-

चा प्रत्यय आल्यामुळें ) तुझे शत्रू तुला आतां चळचळा भिऊं लागले आहेत. यदुवंशाची ( पुन्हां नीट ) स्थापना होऊन त्वत्पक्षीय लोकांचीं मुखें अभिमानानें प्रफुल्ल झालीं आहेत. तुझा प्रताप सामंत राजांमध्यें देखील विख्यात झाला असून आतां राजे लोक तुझ्या भजनीं लागतील. पुष्कळजण तुझा स्नेह संपादन करण्यासाठीं झटतील. प्रजाजन तुझें धोरणानें चालतील. द्विजाति तुझें स्तोत्र गातील. संधिविग्रहकलेमध्यें चतुर असलेले मंत्री तुझ्या अंकित होऊन रहातील. कृष्णा, हत्ती, अश्व, रथ व पदाति या चतुरंग दळानें युक्त असलेलें कंसाचें अव्यय सैन्य तूं आपल्या ताब्यांत घे. कृष्णा, येथें जें कांहीं धन, धान्य, रत्नें, वस्त्रप्रावरणें, ( दास ) दासी, सुवर्ण, वाहनें, किंबहुना यच्चयावत् द्रव्य असेल तें सगळें तूं ज्या पुरुषांची ( राज्याधिकारावर ) योजना करशील त्यांचें च आहे. हे शत्रुनाशका यदुनंदना गोविंदा, तूं जी अलौकिक कृति केलीस, त्या योगानें यादवी नाहींशी होऊन पृथ्वीवर सुखसमाधान नांदूं लागेल. यादवांचें सर्व सुखदुःख तुझ्यावर अवलंबून आहे.

हे वक्तृश्रेष्ठ वीरा, आम्ही दीन झालेले लोक काय सांगतों तें ऐक. गोविंदा, हा जो दुराचारी कंस तुझ्या कोपानलानें दग्ध होऊन येथें पडला आहे त्याचा प्रेतसंस्कार तुझ्या प्रसादानें व्हावा ( एवढेंच आमचें मागणें आहे ). कालवश झालेल्या कंसाची और्ध्वदेहिक क्रिया आटोपल्यानंतर पत्नी व सकल स्नुषा यांसहवर्तमान अरण्यामध्यें पशूंबरोबर वास्तव्य करण्याचा माझा मानस आहे. कृष्णा, प्रेतसंस्कार केला म्हणजे बांधवजन मृताच्या लौकिक ऋणांतून मुक्त होतात. म्हणून कंसाला चितेवर ठेवल्यानंतर विधिपूर्वक शेवटचा अग्नि देऊन व जलांजलि समर्पण करून त्याच्या ऋणांतून मुक्त व्हावें एवढाच माझा हेतु आहे- कृष्णा, इतकीच तुला माझी विज्ञप्ति आहे- मजवर हा अनुग्रह कर आणि या दीन कंसाची उत्तरक्रिया होऊन त्याला सद्गति प्राप्त होईल असें कर."

हें उग्रसेनाचें भाषण ऐकून कृष्णाला मोठा विस्मय वाटला व उग्रसेनाचें समाधान करण्यासाठीं तो म्हणाला: "हे तात, आपण जें आतां बोललांत, तें प्रस्तुतचे समयास उचितच आहे. राजशार्दूला, आपल्या कुलाला व शीलाला साजतील असेच उद्गार आपल्या तोंडून निघाले. गत गोष्टीला कांहीं उपाय नाहीं. हें जाणून तुम्ही यथायोग्य बोलत आहां. ( आपला पुत्र ) कंस जरी प्रेतत्वास पावला आहे तरी राजाला साजेल अशा रीतीनेंच आपण त्याचा प्रेतसंस्कार करूं. आपलें जन्म थोरकुलांत झालें असून जें आपल्याला जाणावयाचें तें पूर्णपणें अवगत आहे. मग ललाटीं असेल तें कधींही चुकत नाहीं हें आपण कां बरें लक्षांत घेत नाहीं ? राजा, स्थावरजंगम भूतमात्रें पूर्वजन्मांत जीं जीं कर्मे करितात, त्यांचें बरें वाईट फल योग्य कालीं ( जन्मांतरीं ) त्यांना भोगावेंच लागतें. (त्यावांचून सुटका नाहीं,) हे नृपश्रेष्ठा, विद्वान्, श्रीमान्, उदार, सुंदर, ब्रह्मनिष्ठ, नीतिमान्, दीनवत्सल, असे इंद्रादि अष्टदिक्पालांसारखे जे महान् पराक्रमी राजे होऊन गेले त्यांनाही कृतांत कालानें स्ववश करण्यास सोडलें नाहीं. तसेंच, जे धार्मिक, चतुर, प्रजापालनदक्ष, निग्रही व क्षात्रधर्माचे अभिमानी राजे होते त्यांनाही मरण चुकलें नाहीं. ही गोष्ट आपण लक्षांत घेतली पाहिजे. देहधारी जीं शुभाशुभ कर्मे करितात त्यांचें

१ येथे छापील पाठ 'वेदान्' असा आहे; परंतु त्यापेक्षा लेखी व कलकत्ता पाठ 'वेद्यं' हाच आम्हास पसंत वाटतो.

शुभाशुभ फल त्यांना ठरल्या वेळीं केव्हां तरी मिळाल्यावांचून रहात नाहीं. हे सर्व अदृश्य मायेचे खेळ आहेत. हिचे सत्य स्वरूपाचा देवांना देखील बोध होणें दुरापास्त आहे. लोक मायेला भुलतात याचें कारण तरी कर्मच आहे.

हा जो कंसाला मृत्यु आला त्याचें कारण तरी कंसाचें पूर्वसंचित होय. त्याच्या नाशाला मी कारण झालों नाहीं. काल व त्याचें पूर्वकर्म या दोन कारणांनींच त्याला मृत्यु आला. बाबा उग्रसेना, सूर्यचंद्रासुद्धां जी अखिल स्थिरचर सृष्टि आहे तिला देखील केव्हां तरी लय हा आहेच. लय झाल्यानंतर कालांतरानें पुनः ती उत्पन्न होते. ( हा सृष्टिक्रम रहाट-गाडग्याप्रमाणें चालू आहे. ) सारांश, काल हा भूतमात्राचा लय व उत्पत्ति करण्यास टपून बसलेला आहे. (म्हणून) भूतमात्रें सर्वस्वी कालाच्या अधीन आहेत ( असें म्हणतात तें खरें आहे. ) नराधिपा स्वतःच्या कर्मदोषानें तुझ्या पुत्राला मरण आलें. मीं त्याला मारलें नाहीं. कालानें त्याचा घात केला. त्याच्या मृत्यूला मी निमित्तमात्र झालों हें खरें. पण काल देखील पराधीन असल्यामुळें त्यालाही निमित्त कारण लागतेंच, त्यावांचून तो काय करणार ?

राजन्, काल हा सर्वांत बलिष्ठ असून त्याची गति कोणाला कळण्यासारखी नाहीं. परात्पर परमात्म्याला ओळखणारे जे समदर्शी पुरुष आहेत, त्यांना मात्र ती कळते. जिच्या योगानें सर्व कांहीं कालाच्या तडाक्यांत सांपडतें तीच कालाची ( अगम्य ) गति होय.

असो. तर हे ताता,आतां मी जें तुम्हांला सांगतों त्याप्रमाणें वागा. मला राज्य घेऊन कांहीं करावयाचें नाहीं. राजा, मला कसलीही इच्छा नाहीं. राज्यलोभानें मीं कंसाचा वध केला नाहीं. लोकहितासाठीं व कीर्तीसाठीं मी तुझ्या सुताला मारलें. यदुकुलाला त्यानें कालिमा आणल्यामुळें त्याचा अनुजांसहवर्तमान नाश झाला. मनसोक्त विहार करणाऱ्या हत्तीप्रमाणें गाई व गुराखी यांचेबरोबर मी वनामध्यें (पूर्ववत्) मोठ्या आनंदानें संचार करीन. मला राजा होण्याची मुळींच इच्छा नाहीं. हें मी पुनःपुन शपथपुरःसर सांगतों. आतां मी तुम्हांला विनंति करतों त्याप्रमाणें मात्र तुम्ही वागा.

हे नृपश्रेष्ठा, तूं यदुकुलाचा अग्रणी व प्रभु आहेस. ह्मणून तूंच राजा हो. ही गोष्ट मला मान्य आहे. स्वराज्यावर तूं स्वतःस अभिषेक करून घेऊन विजय संपादन कर. मी ह्मणतों यापासून जर तुला दुःख होत नसेल व जर तुझ्या मनांत मला संतुष्ट करावयाचें असेल तर मी तुला हें तुझेंच राज्य परत अर्पण करीत आहें, त्याचा स्वीकार करून चिरकाल राज्य कर."

वैशंपायन सांगतातः—कृष्णाचें बोलणें ऐकून उग्रसेनानें कांहींएक उत्तर दिलें नाहीं. त्या यादवसभेंत लज्जेनें त्यानें आपलें मुख खालीं घातलें होतें. नंतर धर्मवेत्त्या गोविंदानें उग्रसेनाला (राज्य) अभिषेक केला. श्रीमान् व महातेजस्वी उग्रसेनाचे डोकीवर राजमुकुट ठेवल्यावर त्यानें कृष्णासहवर्तमान कंसाची उत्तरक्रिया केली. देव ज्याप्रमाणें इंद्राच्या मागून जावे त्याप्रमाणें कृष्णाची आज्ञा शिरसावंद्य मानून प्रमुख यादव मथुरानगरीच्या रस्त्यांतून उग्रसेनाच्या मागून चालले होते.

रात्र संपून सूर्योदय होतांच यदुपुंगवांनीं कंसाचा अंत्यविधि उरकला. कंसाचा मृतदेह कुलपरंपरेस अनुसरून शिबिकेमध्यें घातला आणि नंतर शास्त्रोक्त रीतीनें त्याचा अंत्यविधि करून प्रेतसंस्कार उत्तम प्रकारें करण्यांत आला. राजपुत्र कंसाचें प्रेत यमुनानदीच्या

उत्तरेकडील तीरावर नेल्यानंतर विधिपूर्वक शेवटचा अग्नि देण्यांत आला. त्याचप्रमाणें कृष्णासहवर्तमान सर्व यादवांनीं कंसाचा आजानुबाहु बंधु जो सुनामा त्याचाही ( यथाविधी ) प्रेतसंस्कार केला. प्रेतत्वास पावलेल्या उभयतां बंधूंस 'अक्षय सद्गति मिळो' असें पुनः पुनः ह्मणून वृष्णी व अंधक इत्यादि यादवांनीं उदकांजलि दिल्या. नृपोत्तम उग्रसेनानें व कृष्णानें कंसाच्या नांवानें दहा कोटी सुवर्णाचीं नाणीं व गाई, रत्नें, वस्त्रें आणि मोठाले गांव ब्राह्मणांना दान दिले. "या दानानें मृतांच्या आत्म्यांला सद्गति मिळो" असे शब्द उच्चारून विप्रांना दानें वांटण्यांत आलीं.

मृतांना तिलांजलि दिल्यानंतर उग्रसेन व त्याचे मागून शून्यहृदय झालेले यादव मथुरानगरींत परत गेले.

## अध्याय तेहतिसावा.

—:o:—

### रामकृष्ण गुरुगृहीं जातात व विद्या संपादन करून परत येतात.

वैशंपायन सांगतातः—पुढें बलरामासहवर्तमान महासमर्थ कृष्णानें ( कांहीं कालपर्यंत ) यादवांच्या मथुरानगरींतच सुखानें वास्तव्य केलें. क्रमाक्रमानें कृष्णाला यौवनदशा प्राप्त झाली व राजलक्ष्मीचें तेज त्याचे देहावर झळकूं लागलें. याप्रमाणें रत्नांच्या खाणींनीं खचलेल्या मथुरेमध्यें त्या वीराचे दिवस मोठ्या आनंदानें चालले होते.

या स्थितींत कांहीं काल लोटल्यावर उभयतां रामकृष्ण अवंती नगरींत रहात असलेल्या काशीकर सांदीपनि नामक गुरूपाशीं धनुर्वेद शिकण्याकरितां गेले. उभयतां रामकृष्ण सदाचारसंपन्न व निरभिमानी होते. गुरूला आपलें गोत्र ( कुलशील ) व झालेलें अध्ययन निवेदन केल्यानंतर ते त्याची सेवा करूं लागले. त्या काशीकर गुरूनेंही त्यांना शिष्य म्हणून ठेवून घेऊन केवल विद्या शिकविल्या. त्या वीरांनीं कोणतीही गोष्ट एकदा ऐकिली म्हणजे ती त्यांची बिनचूक पाठ होई. ( त्यांची धारणाशक्ति विलक्षण असल्यामुळें ) त्यांनीं अवघ्या चौसष्ट दिवसांत सांगवेदांचें अध्ययन केलें. पुढें थोडक्याच अवधींत, गुरूनें त्यांना धनुर्वेदाचे[1] चारी खंड व अखिल शस्त्रांचा उपयोग कसा करावा तें सरहस्य पढविलें. त्यांची अलौकिक धारणाशक्ति पाहून हे वीर म्हणजे प्रत्यक्ष सूर्य व चंद्र पृथ्वीवर ( विद्या शिकण्याकरितां ) आले आहेत असें सांदीपनीला वाटूं लागलें. शिवाय पर्वकालीं त्याचे समोर देवश्रेष्ठ विष्णु प्रत्यक्ष येऊन उभा राही व त्याचें हे उभयतां महात्मे शिष्य यथाविधि पूजन करीत, हा चमत्कार त्याचे दृष्टीस पडला होता.

राजा, बलरामासह सर्व विद्या संपादन करून कृतकृत्य झाल्यानंतर, कृष्णानें सांदीपनि गुरूला प्रश्न केला "गुरुवर्य, मी आपल्याला कोणती गुरुदक्षिणा देऊं ?"

शिष्योत्तमांचें सामर्थ्य पाहून मुदित झालेल्या सांदीपनीनें उत्तर केलें "बाळांनो, माझा दत्त नामक पुत्र समुद्रांत बुडून मरण पावला आहे. तो परत यावा अशी माझी इच्छा आहे. मला एकुलता एकच पुत्र झाला होता, परंतु तीर्थयात्रा करीत असतां प्रभासतीर्थाचे ठिकाणीं त्यालाही एका मत्स्यानें मारून टाकलें. हे कृष्णा, तो तूं मला परत आणून दे."

रामाचा होकार मिळतांच कृष्णानें "ठीक आहे" असें म्हणून समुद्राचा मार्ग सुधारला. कांठावर येऊन पोंचतांच तेजस्वी हरीनें

[1] दीक्षा, २ संग्रह, ३ सिद्ध व ४ प्रयोग-हे धनुर्वेदाचे चार खंड समजावे.

जलामध्यें प्रवेश केला. लागलीच हात जोडून समुद्र कृष्णापुढें प्रत्यक्ष येऊन उभा राहिला. तेव्हां कृष्णानें त्याला विचारलें "सागरा, सांदीपनि-गुरूचा पुत्र कोठें आहे?"

समुद्रानें उत्तर केलें. "माधवा, पंचजन नामक महादैत्यानें मत्स्यरूप घेऊन गुरुपुत्राचा वध केला. जलांतून त्याला ओढून घेऊन पंचजनानें त्याला खाऊन टाकलें."

मग पुरुषोत्तमानें पंचजनास शोधून काढून त्याला ठार केलें. तथापि अच्युताला कांहीं गुरुपुत्र मिळाला नाहीं. पंचजनाचा वध केल्यामुळें जनार्दनाला एका उत्कृष्ट शंखाची मात्र प्राप्ति झाली. भूलोकीं व स्वर्गांत हा शंख पांचजन्य नांवानें माहीत आहे.

नंतर पुरुषोत्तम यमलोकीं गेला. लागलींच यमधर्म पुढें आला व त्यानें त्या गदाधराला वंदन केलें. "गुरुपुत्र माझ्या स्वाधीन कर" असें कृष्णानें यमाला सांगितलें; परंतु तें त्याला न पटल्याकारणानें उभयतांचें तेथें घनघोर युद्ध जुंपलें. शेवटीं अच्युत पुरुषोत्तमानें यमधर्माचा पराभव करून त्याचेपासून तरुण गुरुपुत्र परत घेतला. मग (यमसदनास गेल्यामुळें) बरेच दिवस नाहींसा झालेला पुत्र गुरूच्या घरीं कृष्णानें परत आणून पोंचविला.

याप्रमाणें महासमर्थ कृष्णाच्या प्रभावानें सांदीपनीचा प्रेतत्वास पावलेला पुत्र फारा-दिवसांनीं पूर्ववत् देहधारी होऊन परत आला. हा अगम्य व अलौकिक अद्भुत चमत्कार पाहून सर्व प्राणिमात्रांना अत्यंत आश्चर्य वाटलें. अशा प्रकारें पांचजन्य शंख, गुरुपुत्र आणि अमूल्य रत्नें प्राप्त करून घेऊन जगत्प्रभु माधव परत आला. यमदूतांच्या डोक्यावर देऊन जीं बहुमोल रत्नें कृष्णानें बरोबर आणलीं होतीं तीं सर्व त्यानें गुरूला अर्पण केलीं. पुढें लवकरच, उभयतां रामकृष्ण गदा-युद्धांत व अस्त्रकलेंत तरबेज होऊन सर्व धनु-र्धरांमध्यें अग्रगण्य झाले.

उदारधी व आत्मानुभवी कृष्णानें, समवयस्क व समरूप गुरुपुत्राला रत्नांसहवर्तमान सांदीपनीच्या स्वाधीन केल्यावर त्या काशी-कर वेदमूर्तींला आपला फार दिवस नाहींसा झालेला पुत्र परत मिळाला म्हणून अत्यानंद झाला. त्यानें रामकृष्णांची पूजा केली.

नंतर, वसुदेवाचे ते व्रतशील व शूर पुत्र अस्त्रविद्या संपादन करून व गुरूचा निरोप घेऊन परत मथुरेस आले. त्या वेळीं, उग्र-सेनादिक आबालवृद्ध यादव, शिल्पकार, मंत्री, प्रधान, पुरोहित सर्व प्रमुदित होऊन त्या यदु-कुमारांना सामोरे आले. फार काय सांगावें, लहानथोरांसह सर्व मथुरा नगरी त्यांचे स्वाग-तासाठीं पुढें आली होती. नंदि—तुर्यादि वाद्यें वाजत होतीं, सर्व लोक जनार्दनाची स्तुति करीत होते, सर्व राजमार्गांवर पताका लावल्या होत्या, इंद्रोत्सवाचे वेळीं जसे लोक अत्या-नंदांत असतात, त्याप्रमाणें, कृष्ण गुरुगृहा-हून परत आला त्या वेळीं प्रत्येक घरामध्यें आनंद नांदूं लागला. राजमार्गांमध्यें प्रमुदित झालेले गवई यादवांना अत्यंत आवडणारीं कृष्णस्तुतिपर गीतें गाऊं लागले. "महा-विख्यात बलराम व कृष्ण गुरुगृहाहून आज परत आले आहेत, म्हणून सर्वांनीं आज इष्ट-मित्रांसह निर्भयपणें आनंदीआनंद करावा हो" अशी दवंडी पिटण्यांत आली. गोविंद परत आल्यामुळें, हे राजा, मथुरेमध्यें जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला. कोणीही दुःखी अथवा चिंताग्रस्त किंवा साशंक दिसला नाहीं. पक्षी मधुर किलबिल करूं लागले. गाई, घोडे व हत्ती यांनाही अत्यानंद झाला. सर्व पुरुष व स्त्रिया यांचीं मनें आनंदानें प्रफुल्ल झालीं. आल्हादकारी वायु वाहूं लागले. दाही दिशा

निर्मल दिसूं लागल्या. मंदिरांतील देवतांच्या सर्व मूर्तींवर आनंदाची छटा दिसूं लागली. पूर्वी कृतयुगांत जशी लोकांचे तोंडावर सर्वतोपरी सुखासमाधानाचीं चिन्हें दिसत असत, त्याप्रमाणें कृष्ण मथुरेशीं येतांक्षणींच, जिकडे तिकडे शुभ चिन्हें दिसूं लागलीं. नंतर शुभ व मंगलमुहूर्तावर शत्रुंजय कृष्णानें अश्वरथांमध्यें बसून मथुरेंत प्रवेश केला. सर्व देव ज्याप्रमाणें इंद्राचे मागून जावे त्याप्रमाणें अरिंदम उपेंद्र रमणीय मथुरानगरींत प्रवेश करीत असतांना सर्व यादवगण त्याचे मागून चालले होते. ग्रामांत शिरल्यावर त्या यदुनंदनांनीं वसुदेवाच्या गृहामध्यें हर्षित चित्तानें प्रवेश केला. त्या वेळीं हे चंद्रसूर्यच उदयगिरीकडे निघाले आहेत असा भास झाला. रामकृष्ण हे रूपानें देवेंद्रासारखे असून अत्यंत तेजस्वी होते. गृहामध्यें आयुधें योग्यस्थानीं ठेवून दिल्यानंतर ते तेथें स्वैर संचार करूं लागले. वसुदेवाच्या घरीं उभयतां यदुश्रेष्ठ मोठ्या आनंदानें राहिले असतां यादवांसहवर्तमान ते महात्मे नानाविध फलपुष्पांनीं ओथंबलेल्या उद्यानांमध्यें आणि रैवतकपर्वताच्या समीप असलेल्या नद्यांमध्यें ( मनसोक्त ) विहार करीत. त्या नद्यांचें पाणी निर्मळ असून त्यांमध्यें बरींच कमळें फुललेलीं होतीं. शिवाय त्या नदीतीरांवर कारंडव पक्षी मधुर गुंजारव करीत (त्यामुळें तें स्थान फारच रमणीय वाटे).

याप्रमाणें, त्या एक घडणीच्या सुंदर मुखाच्या भावांनीं उग्रसेनाच्या छत्राखालीं मथुरानगरीमध्यें कांहीं कालपर्यंत मोठ्या मौजा मारिल्या.

## अध्याय चौतिसावा.

—:०:—

### मथुरेचा वेढा.

वैशंपायन सांगतातः—रामाबरोबर कृष्णाचा यादवांच्या मथुरानगरींत सुखानें काल चालला असतां त्याला हलकेहलके यौवनावस्था प्राप्त झाली व राजलक्ष्मीचें तेज प्रभूच्या तोंडावर झळकूं लागलें. चोहों बाजूनीं रानावनांनीं वेष्टिलेल्या मथुरेंत प्रीतमनानें त्याचा अनिरुद्ध संचार चालू होता.*

असें होतां होतां कांहीं दिवसांनीं कंसाला मारल्याचें वर्तमान दोघी मुलींच्या तोंडून जरासंधराजाच्या कानीं गेलें. हें वृत्त ऐकून क्रुद्ध झालेला पराक्रमी जरासंध विलंब न करतां सर्व यादव नाहींसे करून कंसाच्या ऋणांतून मुक्त होण्याचे हेतूनें मोठें थोरलें षडंग[1] सैन्य बरोबर घेऊन ( मथुरेवर चाल करून ) निघाला. हे राजा, अस्ति व प्राप्ति या नांवाच्या त्या मगधाधिप जरासंधाच्या दोन सुश्रोणि व सुस्तनी कन्या होत्या. त्यांचेवर जरासंधाचा जीव कीं प्राण असे. बार्हद्रथें[2] जरासंधानें मथुरेश्वर कंसाशीं या दोघींचीही लग्नें करून दिलीं होतीं. आपला पिता जो उग्रसेन त्याला बंदिवासांत टाकून कंस या स्त्रियांसह ( यथेच्छ ) सुखोपभोग घेण्यांत निमग्न असे. जरासंधाच्या जोरावर त्यानें यादवांचा धिःकार करून राजपद मिळविलें हें पूर्वीं तुला कथन केलेंच आहे. आपल्या ज्ञातिबांधवांचा उत्कर्ष व्हावा या बुद्धीनें वसुदेव नेहमीं उग्रसेनाचें हित पहाण्यांत दक्ष असे. परंतु कंसाला हे त्याचें करणें पसंत पडलें नाहीं. पुढें रामकृष्णांनीं मिळून दुरात्म्या कंसाचा वध केल्यानंतर पुनः उग्रसेन राजा झाला. आणि भोज, वृष्णि व अंधक हे त्याचेभोंवतीं पूर्ववत् गोळा झाले. ( यांचा पूर्ववत् जम बसला. )

हा वृत्तांत आपल्या प्रिय कन्यांचे तोंडून

---

* हे दोन श्लोक वांईकरांचे प्रतींत नाहींत.

१ रथ, अश्व, गज, पदाति, पण्य, धान्यबाजार.

२ बृहद्रथाचा पुत्र.

ऐकल्यामुळें बलिष्ठ जरासंधाचे मनांत मथुरेवर चाल करून जाण्याची प्रेरणा उत्पन्न झाली व त्या वीरपत्नींच्या भाषणानें खवळून जाऊन तो मथुरेंत येऊन थडकला. क्रोधामुळें अग्नीसारखा तो जळत होता. ( आपल्या हेतूच्या सिध्यर्थ ) त्यानें अटोकाट तयारी केली होती. त्यानें पादाक्रांत केलेले राजे आणि त्याचे ( इष्ट ) मित्र, आप्तसंबंधी व ज्ञातिबांधव आपआपलीं युद्धार्थ हुटहुटलेलीं सगळीं सैन्यें बरोबर घेऊन जरासंधाचे मदतीस आले. ते सर्व मोठे धनुर्धर व पराक्रमी असून जरासंधाच्या हितावांचून त्यांना दुसरा ध्यास नव्हता.

करुषदेशाधिपति दंतवक्र पराक्रमी चेदिराज ( शिशुपाल ), कलिंगाधिप, महासमर्थ पौंड्र, केशिराज सांकृति, राजा भीष्मक, भीमकाचा पुत्र धनुर्धरश्रेष्ठ रुक्मी, वेणुदारि, श्रुतर्वा, क्रथ, अंशुमान्, अंगराज, बलवान् वंगाधिप, कोशलाधिप, काशिराज, दशार्णाधिपति, पराक्रमी सुखेश्वर, विदेहाधिपति, मद्रराज, बलिष्ठ त्रिगर्तेश्वर, महासमर्थ शाल्वपति, बलिष्ठ दरद, यवनाधिपति वीर्यशाली भगदत्त, सौवीर देशचा शैब्य, महाबलाढ्य पांड्य, गांधारराज, पराक्रमी नग्नजित, काश्मीरेश्वर गोनर्द, दरदेश्वर, दुर्योधनादि पराक्रमी धृतराष्ट्रपुत्र आणखी दुसरे कित्येक महारथी बलिष्ठ (कृष्णद्वेषी) राजे, जरासंधाच्या बरोबर आले होते. त्यांतील रुक्मी याला नेहमीं कृष्णार्जुनांशीं युद्ध करण्याची मोठी ईर्ष्या असे.

या सर्व भूपतींनीं गवत व सर्पण जेथें मुबलक होतें असल्या शूरसेन देशांत प्रवेश केल्यानंतर ते सर्व सैन्यानिशीं मथुरेला वेढा देऊन बसले.

# अध्याय पसतिसावा.

—:०:—

## यादवमागधांचें युद्ध.

वैशंपायन सांगतातः—मथुरेच्या आसमंतात् पुष्कळ राजे तळ देऊन बसले आहेत हें लागलींच कृष्णादि वृष्णींच्या दृष्टीस पडलें. त्यांना पाहून कृष्णाला अत्यानंद झाला व तो बलरामाला म्हणाला, "देवतांचे हेतु लवकरच सफल होणार यांत मला संदेह दिसत नाहीं. कारण, हा जरासंध राजा आपल्या नजीक येऊन भिडला आहे. तसेंच, तीं पहा, वायुगतीनें चालणाऱ्या रथांचीं ध्वजाग्रें येथून दृग्गोचर होत आहेत.

हे आर्य, विजयसंपादनाच्या लालसेनें येथवर आलेल्या राजांचीं उंच व चंद्रासारखीं शुभ्र छत्रें किती सुंदर दिसत आहेत! अहाहा! राजे लोकांच्या रथांवरून हीं जीं असंख्य निर्मल छत्रें फडकत आहेत तीं पाहून आकाशांत हंसपंक्तिच ( जणू काय ) संचार करीत आहेत असें वाटतें.

खरोखर, जरासंध राजानें युद्धाला मोठी नामी वेळ शोधून काढली आहे. ( धनुर्विद्या संपादन करून आल्यानंतर) आपलें युद्धकौशल कसोटीस लावणारा हा पहिलाच युद्धभिक्षु आपणास मिळाला आहे. असो, हे आर्य, आतां मगधाधिपति येथें प्राप्त झाला आहे, याकरितां आपण उभयतां मिळून युद्धाला कसा आरंभ करावयाचा याचा विचार करूं. अगोदर यांचें सैन्य किती आहे तें पाहिलें पाहिजे."

इतकें बोलून संग्रामोत्सुक झालेल्या कृष्णानें जरासंधाचें सामर्थ्य अजमावण्याचे हेतूनें एकवार स्वस्थपणें त्याच्या सैन्याकडे दृष्टि फेंकली. मंत्रकुशल अव्यय यदुवरानें सर्व राजांकडे नजर टाकल्यानंतर मनाशींच विचार केला.

"हे जरी राजे आहेत तरी मानवी

धर्मानुसार यांना मरण चुकावयाचें नाहीं. शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें पूर्वकर्माच्या जोरानें यांचा ( यथाकाल ) विनाश होणारच. यांचें मरण जवळ आल्यामुळें मृत्यूनें या नृपश्रेष्ठांना येथें यज्ञपशूंप्रमाणें खेंचून आणलें आहे असें वाटतें. हीं पहा, यांचीं शरीरें स्वर्गोत्सुक झाल्यासारखीं उज्ज्वल भासत आहेत. या प्रबल राजांच्या अगणित सैन्यांच्या ओघानें पीडित झाल्यामुळें भूमातेला त्यांचा भार असह्य होऊन " भूभार हलका कर " अशी प्रार्थना करण्याकरितां ती ब्रह्मलोकीं गेली, तें खरोखर योग्य झालें. सर्व पृथ्वीवर हीं प्रचंड राष्ट्रीय सैन्यें पसरलीं असल्यामुळें पाय ठेवण्यास जागा उरलेली नाहीं. परंतु थोड्याच अवकाशांत शेंकडों नरेंद्रांचा निःपात होऊन ही पृथ्वी ओस पडेल."

वैशंपायन सांगतातः—यानंतर सहस्रावधि राजांसहवर्तमान राजराजेश्वर महातेजस्वी जरासंध क्रुद्ध होऊन मथुरेवर चालून आला. त्या बलवान् व धृतव्रत जरासंधाबरोबर हस्ती, अश्व, रथ, पदाति इत्यादि प्रचंड चतुरंग दळ होतें. त्याचें सैन्य असंख्य असून तें पहातांच हे सर्प उड्डाण करीत आहेत किंवा ( नभोमंडळांत ) मेघ हालत आहेत असा भास होई.

त्याच्या सैन्यांतील संग्रामरथांना उंच व धिप्पाड अश्व जुंपले असून त्यांची गति जलद, शांत व अकुंठित होती. हत्ती मेघांसारखे अजस्र असून मोठाल्या घंटा व सुवर्णशृंखला यांनीं ते अलंकृत झाले होते. शिवाय, त्या हत्तींना उत्तम प्रतीचें संग्रामविषयक शिक्षण दिलें असून त्यांना वळविण्यास त्यांचेवर कुशल महात बसलेले होते. घोडे देखील मेघांसारखे प्रचंड असून जणूं पांखरांप्रमाणें धांवत त्यांवर चतुर स्वार आरूढ झाले होते. त्यांचें खिंकाळणें एकसारखें चालू असून ते थय्थय् नाचत होते. त्याच्या पायदळांतील पुरुषसुद्धां बलामध्यें कोणालाही हार जाण्यासारखे नसून उंच होते व त्यांनीं हातांत ढालतलवारी लटकाविल्या होत्या.

जरासंधाच्या रथांचा मेघांसारखा प्रचंड घडघडाट चालला होता. हत्तींच्या गंडस्थळांतून मदाचे पूर वहात होते. अश्व खिंकाळत होते आणि पदाति मोठमोठ्यानें सिंहनाद करीत होते. या कारणामुळें मथुरेसभोंवतालचीं अरण्यें व दाही दिशा दुमदुमून जाऊन, जरासंधाचें सैन्य सागरासारखें प्रचंड भासूं लागलें. नानादेशच्या राजांचें सैन्य त्या ठिकाणीं गोळा झालें असून त्यांतील सैनिकांचीं मुखें आनंदित झालेलीं होतीं. ते एकसारखे दंड थोपटून सिंहनाद करीत होते; त्यामुळें दाही दिशा दुमदुमून जाऊन जरासंधाच्या सैन्याला जणूंकाय मेघसैन्याची शोभा आली होती. मथुरेसमीप आलेल्या त्या जरासंधाच्या सैन्यांत वायुगतीनें चालणारे रथ, मेघांसारखे मत्त हत्ती, भरधांव जाणारे अश्व, पक्ष्यांप्रमाणें पळणारें पायदळ, असे अनेक प्रकार असून, तें पाहिलें ह्मणजे ग्रीष्म ऋतु सरतां सरतां मेघपंक्ति जशा सागरावर लोटतात त्याप्रमाणें भास होई.

असो; याप्रमाणें जरासंधादि राजांनीं सैन्यासह मथुरेला वेढा देऊन त्या ठिकाणीं छावणी ठोकली. त्या सैन्याच्या छावणीची शोभा पौर्णिमेच्या दिवशीं भरती आल्यानंतर समुद्राची शोभा दिसते त्याप्रमाणें दिसत होती. रात्र संपून सूर्योदय होतांच युद्धोत्सुक झालेले राजे मथुरेवर चाल करण्यास निघाले. केव्हां एकदां युद्धांला सुरुवात होते यासाठीं उत्कंठित झालेले सर्व राजे यमुनातीरीं बसून लढाईचा बेत करूं लागले. तेव्हां प्रलयकालीं समुद्र खवळून जाऊन जसा भयंकर आवाज व्हावा त्याप्रमाणें जिकडे तिकडे एकच गोंगाट

सुरू झाला. गडबड बंद करण्यारतां राजाची आज्ञा झाल्यामुळें वृद्ध कंचुकी "बोलूं नका" असें ओरडत त्या सभेमध्यें फिरूं लागले. त्यांचे हातांत वेताच्या काठ्या असून त्यांनीं कंचुक व उष्णीष अशीं वस्त्रें परिधान केलीं होतीं. कंचुकींच्या प्रयत्नानें सर्वत्र शांतता होऊन गडबड अगदीं बंद झाली. सागरांतील मीन व मकर यांची हालचाल बंद झाली म्हणजे तो जसा शांत व गंभीर दिसूं लागतो त्याप्रमाणें जिकडे तिकडे शुक्क झाल्याकारणानें त्या राजसभेंतील सैन्य निःशब्द व स्तिमित झालें. योगानें वृत्तिनिरोध केल्याप्रमाणें क्षणार्धांत सर्वत्र सामसूम होतांच, त्या सागरासारख्या प्रचंड सभेमध्यें बृहस्पतीप्रमाणें जरासंध राजा बोलूं लागला. "लोकहो, हीं सर्व राजसैन्यें विलंब न करितां पुढें चालवून चोहों बाजूंनीं मथुरेला माणसांचा गराडा घाला. तसेंच अश्मयंत्रें (गोफणगुंडे) सज्ज करून मुद्गर फेंकण्याची तयारी ठेवा. जमीन सर्वत्र सारखी करून तिजवर सडकून जलसिंचन करा; शिवाय चाप, प्रास व तोमर इत्यादिक आयुधें सरसावून टांक्या, पहारी व कुदळी यांनीं त्वरित सर्व नगरी खणून काढा. युद्धकलेंत जे राजे निपुण असतील त्यांचीं शिबिरें एकमेकांपासून फार दूर ठेवूं नका. आजपासूनच मथुरेला आपल्या सैन्याचा वेढा देऊन युद्धाला सुरवात करा. राम व कृष्ण या नांवाचे वसुदेवाचे जे दोन गोकुलवासी पुत्र आहेत त्यांचा मी आपल्या तीक्ष्ण शरांनीं वध करीपर्यंत हें युद्ध चालावयाचें आहे. मीं आपल्या बाणांच्या वर्षावानें आकाश देखील घेरून टाकीन. (मग या पोरांची कथा काय?) मी आज्ञा करीन त्या त्या ठिकाणीं सर्व राजेलोकांनीं उभें राहून संधि सांपडतांच मथुरेवर हल्ला चढवावा.

मद्रराज, कलिंगपति, चेकितान व बाल्हिक, काश्मीराधिप गोनर्द, करुषेश द्रुमराज, किंपुरुष आणि पर्वतप्रदेशांतील अनामय, इतक्यांनीं मिळून मथुरेच्या पश्चिम दरवाज्यावर चाल करून जावें.

पुरुकुलांतील वेणुदारि, विदर्भाधिपति सोमकराज, भोजेश्वर रुक्मी, सूर्याक्ष व मालवेश, अवंतिदेशाचे विंद व अनुविंद, पराक्रमी दंतवक्र, छागलि, पुरमित्र, राजा विराट, कौरव्य, मालव, शतधन्वा, विदूरथ, भूरिश्रवा, त्रिगर्त, बाण आणि पंचनद इत्यादि वज्रासारख्या पराक्रमी व दुर्गयुद्धकुशल राजांनीं मथुरेच्या उत्तर बाजूनें हल्ला चढवून शत्रूंना जेर करावें.

उलूक, केतव, अंशुमान् राजाचा वीर्यशाली पुत्र एकलव्य, बृहत्क्षत्र, क्षत्रधर्मा, जयद्रथ, उत्तमौजा, शल्य, कौरव, कैकय, वैदिश, वामदेव आणि सिनीदेशचा राजा सांकृति यांनीं पूर्वेकडे मोर्चा बांधून वारे ज्याप्रमाणें मेघांना पिटाळून लावतात त्याप्रमाणें शत्रूंना पळवून लावावें. राजा दरद, पराक्रमी चेदिराज आणि स्वतः मी मिळून निकरानें व सावधगिरीनें दक्षिण बाजूचें संरक्षण करतों.

याप्रमाणें विलंब न होतां चोहोंबाजूंनीं मथुरेला वेढा पडला म्हणजे सर्व नगरावर वज्रपात झाल्याप्रमाणें कठीण प्रसंग ओढवेल.

तात्पर्य, गदाधारी वीरांनीं गदा घेऊन परिघ पेलणारांनीं परिघ घेऊन व बाकीच्यांनीं आपआपलीं शस्त्रें (असतील तीं) सरसावून या मथुरेला जर्जर करून सोडावें. (अशी माझी आज्ञा आहे.) आजच्याआज ही उंचसखल नगरी तुम्ही सर्व राजे मिळून एकसहा जमीनदोस्त करून टाका.

इतकें बोलल्यानंतर जरासंधानें आपलें चतुरंग दळ सिद्ध करून उत्तम प्रकारची व्यूहरचना केली. आणि क्रोधाविष्ट होऊन सर्व राजेलोकांसहवर्तमान तो यादवांवर चालून

गेला. त्यासरशीं, यादवांनींही शस्त्रास्त्रें सरसावून सैन्याची सिद्धता केली. जरासंधाच्या सैन्याला प्रतिबंध केला ( त्यावेळीं ) पूर्वीं सुरासुरांचें युद्ध झालें त्याप्रमाणें जरासंधाच्या सैन्याचें व यादवांचें घनघोर युद्ध झालें. यादव थोडेच होते. जरासंधाच्या सैन्याला मात्र सीमा नव्हती. या यादवमागधांच्या युद्धामध्यें रथाला रथ व हत्तीला हत्ती भिडून तुमुल कंदन सुरू झालें. अशांत वसुदेवाचे उभयतां पराक्रमी पुत्र मथुरेंतून बाहेर पडलेले जेव्हां का जरासंधाच्या सैनिकांच्या दृष्टीस पडले तेव्हां त्यांची अगदीं गाळण उडून गेली. फार काय सांगावें, हस्त्यश्वादि वाहनें देखील भयानें मूढ झालीं. क्रोधवश झालेले रामकृष्ण रथांत बसून निघाले तेव्हां हे दोन चिडलेले मकर, सैन्यरूपी सागराला खवळून टाकीत आहेत कीं काय असा भास झाला.

युद्ध करितां करितां, आपलीं जुनीं आयुधें हातीं घ्यावीं अशी एकाएकीं त्या महात्म्यांच्या मनांत प्रेरणा उत्पन्न झाली.त्याबरोबर युद्धाच्या गर्दींत दिव्य,लखलखीत,तेजःपुंज व मजबूत अशीं भलीं मोठीं आयुधें मूर्तिमंत आकाशांतून खालीं पडलीं. त्यांच्या पाताबरोबरच हिंस्र प्राणी त्या ठिकाणीं आले, त्यामुळें हीं आयुधें रणांत मरून पडलेल्या राजे लोकांचें मांस भक्षण करण्याकरितां हपापलीं आहेत कीं काय, असें वाटलें. तीं दिव्य पुष्पमाळांनीं युक्त असून त्यांच्या संचारानें आकाशगामी प्राण्यांना भय वाटलें. आकाशांतून खालीं पडत असतांना त्यांची प्रभा अत्यंत तेजःपुंज दिसली. संवर्तक नामक हल, सौनंद नामक मुसल, सर्वांत अग्रगण्य असलेलें शार्ङ्ग धनुष्य व कौमोदकी गदा हीं चार विष्णूचीं तेजःपुंज आयुधें, युद्ध चाललें असतां मध्येंच त्या यदुपुंगवांपाशीं आपण होऊन चालत आलीं.

तेव्हां प्रथम बलरामानें हल ( नांगर ) ( आपल्या डाव्या ) हातांत घेतला. तो ध्वजासारखा उंच व दिव्यमालांनीं युक्त असल्याकारणानें हा शेषच सरपटत चालला आहे कीं काय असें वाटे. नंतर उजव्या हातानें त्या श्रीमान् सात्वतश्रेष्ठानें शत्रूंचा आनंददीप मालवून टाकणाऱ्या सौनंद नामक उत्तम मुसलायुधाचा स्वीकार केला. मग वीर्यशाली कृष्णानें एका हातानें त्रैलोक्यांत अत्यंत सुंदर म्हणून गाजलेलें व मेघाप्रमाणें गडगडाट करणारें शार्ङ्ग धनुष्य उचलून घेतलें व त्या कमललोचनाचा अवतारहेतु देवांना ठाऊक असल्यामुळें कौमोदकी गदा त्यांनीं त्याच्या दुसऱ्या हातांत दिली.

याप्रमाणें आयुधें घेऊन सज्ज झाल्यावर ते पराक्रमी व विष्णुतुल्य रामकृष्ण पुनरपि शत्रूंबरोबर लढूं लागले. ते रामकृष्णनामक वसुदेवाचे ज्येष्ठ व कनिष्ठ या संज्ञेनें प्रख्यात असलेले सुरतुल्य उभयतां पुत्र दिव्य आयुधें हातांत धारण करून देवांसारखा पराक्रम करीत व शत्रूंस मागें लोटीत परस्परांच्या आश्रयानें लढूं लागले.

शेषासारखा नांगर हातांत धरून पराक्रमी बलराम क्रोधानें रणामध्यें संचार करूं लागला, तेव्हां तो शत्रूंना कर्दनकाळासारखा वाटला. मोठमोठ्या क्षत्रियांच्या सहस्रावधि रथांना त्यानें खेंचून पाडलें. असंख्य हत्ती व घोडेहि त्याच्या क्रोधाला बळी पडले. हत्तींना नांगराच्या तडाक्यानें ( प्रथम ) वर उडवून व नंतर त्यांजवर मुसळाचे आघात करून बलरामानें रणामध्यें जरासंधाच्या पर्वतप्राय हत्तींचें जणूं काय मंथनच मांडलें त्या वेळीं त्याचें तेज अपूर्व दिसत होतें.

शेवटीं युद्धांत बलरामाचे तडाखे खाऊन जर्जर झालेले क्षत्रियश्रेष्ठ भीतीनें जरासंधापाशीं

आले; तेव्हां क्षात्रधर्मांत चतुर असलेला जरासंध त्यांना ह्मणाला. "रणामध्यें भिऊन तुम्ही पळ काढलात, त्या पक्षीं धिक्कार असो तुमच्या क्षात्रत्वाला. विरथ झाल्यानंतर पाठ दाखवून रणांतून जे पळ काढतात, त्यांना भ्रूणहत्येसारखें घोर पातक लागतें, असें ज्ञाते सांगतात. असें असतां, तुम्ही कां बरें परत फिरतां? धिःकार असो तुमच्या क्षात्रवृत्तीला! आतां माझ्या भाषणानें तरी तुम्हांला धीर येऊन त्वरित सगळेजण परत युद्धभूमीकडे फिरा पाहूं. अथवा, तुम्ही रथारूढ होऊन नुसती युद्धाची मौज तरी पहा. ह्मणजे मीच या उभयतां गोपपुत्रांना यमसदनास पाठवतों."

जरासंधाच्या या उत्साहजनक भाषणानें सर्व क्षत्रियांना मोठा धीर येऊन ते प्रफुल्ल मनानें शरवृष्टि करूं लागले आणि पुनः पूर्ववत् युद्ध सुरू झालें. कोणी सुवर्णाच्या अलंकारांनीं भूषित झालेल्या घोड्यांवर बसून युद्धाच्या गर्दींत शिरले. कोणी मेघाप्रमाणें गडगड वाजणाऱ्या रथांवर आरूढ झाले. कित्येक माहूतांनीं चालवलेल्या मेघप्राय हत्तींवर बसून निघाले. सर्वांनीं अंगांत चिलखतें चढवून हातांत तरवारी घेतल्या होत्या. तूणीर पाठीवर बांधून त्यांनीं आपलीं धनुष्यें सज्ज केलीं होतीं. तोमरादि आयुधें बरोबर घेऊन आपापल्या पताकांसह सर्व वीर रणांगणाकडे निघाले, तेव्हां त्यांचे मस्तकांवर छत्रें असून सेवकगण सुंदर चामरें वारीत होते. ज्याचा त्याचा सारथी ज्याचे त्याचे बरोबर असून सर्व राजे रथारूढ होऊन सर्व इतमामानें युद्धार्थ परत फिरले, तेव्हां खरोखर मोठी अवर्णनीय शोभा दिसत होती.

युद्धाविषयीं पुनरपि लालसा उत्पन्न झाल्यामुळें मोठमोठ्या गदा व मुद्गर हातांत घेऊन (जरासंधाचे) बलिष्ठ योद्धे रथांमधून रणभूमीवर चमकूं लागतांच, देवांच्या आनंदसागरास भरतें आणणारा श्रीकृष्ण सुपर्णचिन्हानें युक्त असलेल्या उत्तम रथांत बसून जरासंधाचे अंगावर गेला व लागलीच आठ बाण सोडून त्यानें त्याचा वेध केला. तसेंच जरासंधाच्या सारथ्यालाही पांच तीक्ष्ण बाणांनीं विंधून टाकून वीरशाली गोविंदानें, संग्रामभूमीवर इतकें झालें तरीही तडफड करणाऱ्या, त्या जरासंधाचे घोडे मारून टाकले. जरासंध संकटांत पडला आहे असें पाहातांच महारथी चित्रसेन व सेनापति कैशिक यांनीं कृष्णावर शरसंधान केलें. आणखी तीन बाण सोडून कैशिकानें युद्धांत गढून गेलेल्या बलरामाला वेध केला. परंतु एकच बाण टाकून रामानें त्याच्या धनुष्याचे दोन तुकडे केले आणि थोड्याच अवधींत सुवर्णभूषित शरांचा विविधप्रकारें वर्षाव करून सभोंवारच्या बऱ्याच पराक्रमी शत्रूंना जर्जर करून सोडलें. त्यामुळें चिडून जाऊन चित्रसेनानें त्याच्यावर नऊ बाण सोडले. तितक्यांतच कैशिकानें पांच व जरासंधानें सात बाण सोडून त्यांनीं बलरामाला विंधून टाकिलें. लागलींच श्रीकृष्णानें त्या तिघांवर प्रत्येकीं तीन व बलरामानें पांच असे तीक्ष्ण बाण सोडले. नंतर पराक्रमी रामानें चित्रसेनाचा रथ मोडून एकाच शरानें त्याच्या धनुष्याचे दोन तुकडे केले. आपला रथ व धनुष्य मोडून गेल्यामुळें जास्तच रागावून वीरशाली चित्रसेनानें गदा हातांत घेतली आणि बलरामाला मारण्याचे हेतूनें त्याच्या अंगावर तो चालून गेला. चित्रसेनाच्या नाशासाठीं त्याचेवर बलराम बाण टाकीत असतां, त्याचे धनुष्याचा बलवान् जरासंधानें छेद करून गदेच्या प्रहारानें रागाच्या आवेशांत त्याचे घोडे मारून टाकले. इतक्यावरच न थांबतां पराक्रमी मगधेश्वर बलरामाच्या अंगावर धांवून गेला. तेव्हां तोही मुसल घेऊन जरासंधावर

धांवला. आपल्या प्रतिपक्षाचा वध करावा अशी उभयतांची इच्छा असल्याकारणानें त्यांचें भयंकर युद्ध जुंपलें. बलराम मगधाधिपाशीं युद्ध करण्यांत गुंतला आहे असें पाहून चित्रसेन दुसऱ्या रथावर आरूढ झाला. आणि त्यानें जरासंधाचे भोंवतीं मोठें थोरलें गजसैन्य व पायदळ आणून उभें केलें. नंतर त्या उभतांमध्यें मोठें तुंबळ युद्ध झालें. जरासंधाच्या सभोंवतीं मोठें थोरलें सैन्य गोळा झाल्यानंतर त्या महाबलानें रामकृष्णांच्या पुढें असलेल्या भोजांवर हल्ला केला. त्या वेळीं खवळलेल्या समुद्रांतून जसा भयंकर आवाज निघतो त्याप्रमाणें दोन्ही सैन्यांतून मोठा ध्वनि निघूं लागला. हे राजा, वेणु, भेरी, मृदंग व शंख हीं अशीं सहस्रावधि वाद्यें दोन्ही दळांमध्यें वाजूं लागलीं व त्यामुळें भयंकर ध्वनि होऊं लागला. त्यांतच वीरांचा सिंहनाद व दंड थोपटणें यापासून निघणारा आवाज मिसळून गेल्यामुळें एकंदर ध्वनि अधिकच मोठा झाला. घोड्यांचे खूर व रथांचीं चाकें यांच्यापासून उडणारी धूळ वर उंच पसरली. ते युद्धांतील वीर आपआपलीं शस्त्रास्त्रें सरसावून व धनुष्यें सज्ज करून परस्परांच्या अंगावर ओरडत होते. सहस्रावधि रथी, वाहनें चालवणारे लोक, पदाति व बलाढ्य हत्ती मारे इकडून तिकडे धांवत होते. सारांश, जरासंधाचे वीर व यादव यांचा जो दारुण संग्राम झाला, त्यांत उभयपक्षांनीं प्राणांची आशा ठेवली नव्हती.

हे भारता, बलदेवाच्या प्रमुखत्वाखालीं शिनि, अनधृष्टि, बभ्रु, विपृथु व आहुक इत्यादि यादववीरांनीं, बरोबर अर्धें सैन्य घेऊन शत्रूच्या दक्षिणेकडील तुकडीवर निकरानें हल्ला केला. हे प्रभो, चेदिराज, स्वतः जरासंध, शल्य, शाल्व व इतर उदीच्य वीर्यशाली राजे हे प्राणांवर उदार होऊन शरसंधान करीत दक्षिण बाजूचें संरक्षण करीत होते.

श्रीकृष्णाच्या आधिपत्याखालीं बाकीचें अर्धें सैन्य घेऊन अवगाह, पृथु, कंक, शतद्युम्न व विदूरथ हे जोरानें शत्रूच्या दुसऱ्या बाजूवर तुटून पडले. राजेंद्रा, त्या बाजूचें रक्षण करण्याचें काम भीष्मक, महात्मा रुक्मी, देवक, मद्रेश्वर आणि गुप्त सामर्थ्य व तेज यांनीं युक्त असलेले प्राच्य व दाक्षिणात्य राजे यांचेकडे सोंपविलेलें होतें. उभय पक्षाच्या वीरांनीं जीवाची पर्वा न करतां, वज्रासारख्या आवाज करणाऱ्या असंख्य शक्ति, ऋष्टि, प्रास व बाण सोडून युद्धाची शर्थ केली. सात्यकि, चित्रक, श्याम, वीर्यशाली युयुधान, राजा अधिदेव, मृदुर, श्वफल्क, सत्राजित् व प्रसेन हेही मोठ्या सैन्यानिशीं जरासंधाच्या व्यूहावर चाल करून गेले व यादवांच्या ज्या तुकडीचें आधिपत्य मृदुराकडे सोंपविलें होतें तिकडे वेणुदारिप्रभृति जरासंधपक्षीय बरेच राजांनीं आपला मोर्चा फिरविला.

## अध्याय छत्तिसावा.

—:०:—

### जरासंधाचा पराभव व प्रयाण.

वैशंपायन सांगतात:——नंतर जरासंधाचें महात व बरोबरचे राजे यांचे यादववीरांसहवर्तमान भयंकर झगडे झाले. हे भरतश्रेष्ठा, श्रीकृष्ण, आहुक, ऋथ, कैशिक, चेदिराज व दंतवक्त्र हे अनुक्रमें, रुक्मी, भीष्मक, वसुदेव, बभ्रु, गद व शंकु यांचेबरोबर युद्ध करूं लागले. यादववीरांच्या सेनेचें जरासंधाबरोबर आलेल्या महात्म्या राजांच्या सैनिकांबरोबर सत्तावीस दिवसपर्यंत दारुण युद्ध झालें. हे राजा, हत्तींशीं हत्ती, घोड्यांशीं

घोडे, पदातींशीं पदाति व रथांशीं रथ भिडवून योद्धे लढत होते. हे भारता, जरासंध व बलराम यांचेमधील युद्ध इंद्रवृत्रांच्याप्रमाणें अंगावर कांटा आणील असें भयंकर झालें. रुक्मीनें कृष्णावर अग्निकिरणांसारखे सूर्याच्या तेजासारखे व सर्पाच्या विषासारखे तीव्र बाण सोडले परंतु रुक्मिणीकडे लक्ष देऊन, रुक्मीला विशेष इजा न देतां श्रीकृष्णानें मोठ्या चातुर्यानें त्याच्या बाणांचें निवारण केलें.

असो, एकंदरींत उभय सैन्यांचा फारच नाश झाला. राजा, जिकडे तिकडे मांस व रक्त यांचा चिखल होऊन गेला होता. चोहों बाजूंनीं असंख्य कबंधें नाचत होतीं. त्यामुळें युद्धाच्या गर्दींत लढणारांची संख्या उगीच फुगलेली दिसे.

होतां होतां बलरामानें रथारूढ होऊन जरासंधाला सर्पतुल्य विषारी शरांनीं वेढून टाकलें. आणि तो वीर मागधाच्या अंगावर चालून गेला. परंतु राजा जरासंध आपल्या आशुगामी रथाचे साहाय्यानें त्वरेनें मागें झाला. विविध अस्त्रांचा परस्परांवर प्रयोग करीत ते मोठ्यानें आरोळ्या देत होते. शेवटीं, उभयतांचीं शस्त्रें संपून जाऊन अश्व व सारथी गतप्राण होऊन पडले. याप्रमाणें दोघेही पराक्रमी वीर विरथ झाल्यामुळें गदा घेऊन एकमेकांचे अंगावर धांवले त्या वेळीं भूमि कंपायमान झाली. हातांतील गदा सरसावून ते महात्मे उभे राहिले तेव्हां ते शिखरयुक्त पर्वतांप्रमाणें दिसत होते. उभयतांहि गदायुद्धांतील श्रेष्ठ आचार्य म्हणून जगांत प्रसिद्ध होते. त्यामुळें त्या महाभुज गदायुद्धकुशल व महाबल वीरांचें चिडीचें युद्ध सुरू होऊन ते एकमेकांचे अंगावर धावूं लागले. तेव्हां बाकीच्या लोकांचें त्यांचेच युद्धाकडे लक्ष वेधून ते युद्ध करण्याचे थांबले. ( त्यांचें युद्ध एकीकडेच राहिलें. ) माजलेल्या दोन हत्तींप्रमाणें त्यांची झुंज सुरू झाली. ती पहावयासाठीं देव, गंधर्व, सिद्ध, महर्षि व सहस्रावधि अप्सरा त्या ठिकाणीं गोळा झाल्या. हे राजा, नक्षत्रांमुळें आकाशाला जशी शोभा येते त्याप्रमाणें देव, गंधर्व, यक्ष व महर्षि यांच्या आगमनानें भूषित झालेलें अंतरिक्ष दिवसा देखील शोभिवंत दिसूं लागलें. प्रतापी जरासंध सव्यमंडल करून रामावर चालून गेला. बलरामानें उजव्या बाजूनें त्याला प्रतिरोध केला. हत्ती लढतांना दांतांचा प्रहार करून जसे दश दिशा दणाणून टाकतात, त्याप्रमाणें ते गदायुद्धनिपुण वीर गदेनें परस्परांवर आघात करूं लागले, तेव्हां दाही दिशा दुमदुमून गेल्या. जरासंधाच्या पायावर रामानें गदेचा प्रहार केला तेव्हां पर्वताचे दोन तुकडे होतांना जसा आवाज होतो त्याप्रमाणें अशनिपाततुल्य ध्वनि उमटला. उलटपक्षीं विंध्याचलाला ज्याप्रमाणें वायु कांपवूं शकत नाहीं त्याप्रमाणें गदाधरश्रेष्ठ बलराम जरासंधाच्या गदाप्रहारानें बिलकुल कांपला नाहीं. जरासंधानें देखील बलरामाच्या गदेचा तडाखा मोठ्या धैर्यानें व आपल्या सामर्थ्याच्या जोरावर सहन केला. एवढेंच नव्हे तर, गदायुद्धांतील पेंचांची चांगली माहिती असल्याकारणानें योग्य उपाय योजून त्यानें त्याचें निवारणही केलें. हे अरिंदमा, या प्रकारें ते महाबल रणभूमीवर लढत असतां नानाविध पवित्र्यांवर फिरत होते. बराच वेळ लढल्यानंतर ते दमून जात व ( थोडा वेळ ) स्तब्ध राहून विश्रांति घेत. थोडा वेळ विसावा घेतल्यावर पुनरपि युद्धास आरंभ करून परस्परांवर प्रहार करूं लागत. याप्रमाणें पुष्कळ वेळ त्या दोघां पराक्रमी वीरांची झटपट झाली. दोघांची बरोबरी झाली. कोणीच युद्धपराङ्मुख झाला नाहीं. जरासंध गदायुद्धांत विशेष कुशल आहे असें अनुभवास येतांच, वीर्यवान् रामानें

रागानें गदा खालीं ठेवून आपलें दुसरें श्रेष्ठ आयुध जें मुसल तें हातीं घेतलें. क्रुद्ध झालेल्या बलरामानें अत्यंत भयंकर व अमोघ असें मुसल ( जरासंधावर टाकण्याकरितां ) तयार करतांच सुस्वर व सर्व लोकांस ऐकूं येईल अशी आकाशवाणी अंतरिक्षांतून उमटली. ज्यानें आपलें हलायुध[1] सरसावलें आहे अशा बलदेवास उद्देशून ती म्हणाली. " रामा, याला तूं मारूं नको. मागधावरील तुझा राग शांत कर. याला कोणाचे हातून मृत्यु यावयाचा आहे तें मला माहीत आहे. म्हणून तूं आपला हात आटोपावास हें बरें. थोडक्याच अवधींत मागधाचा वध होईल."

ही वाणी ऐकून जरासंधाचें मन एकदम व्याकुल व उद्विग्न झालें व बलरामानेंही त्याचेवर प्रहार केला नाहीं. उभयतां बलराम व जरासंध यांनीं युद्ध बंद केलें व इतर राजे आणि वृष्णी यांनीं त्यांचेंच अनुकरण केलें. हे राजश्रेष्ठा, पुष्कळ दिवस एकमेकांवर प्रहार करण्यांत उद्युक्त होऊन त्यांनीं जें भयंकर युद्ध मांडलें होतें, तें आतां समाप्त झालें.

पुढें जरासंध राजा पराभूत होऊन परत फिरला. इकडे सूर्यही अस्तास गेला. यादवांनीं रात्र पडल्यानंतर जरासंधाचा पाठलाग केला नाहीं. केशवाच्या आश्रयछत्राखालीं त्या महावीरांचा हेतु सिद्धीस गेल्यामुळें त्यांनीं आपलें सैन्य एके ठिकाणीं करून मुदित मनानें मथुरेंत प्रवेश केला. आकाशांतून जीं आयुधें पडलीं होतीं तीं ( देखील कार्यभाग सरल्यावर आलीं तशीं ) गुप्त झालीं.

जरासंध राजानें खिन्न मनानें आपल्या राजधानीची वाट धरली व त्याचेबरोबर आलेल्या राजांनींही तोच क्रम स्वीकारला. हे कुरुशार्दूला, जरासंधाचा जरी वरीलप्रकारें पराजय झाला तरी त्याला आपण जिंकलें असें यादव समजले नाहींत. तो राजा खरोखर फार बलाढ्य होता. यादवांनीं एकंदर जरासंधाशीं अठरा वेळां संग्राम केला. परंतु एकाही वेळीं त्या पराक्रमी वीरांना त्याला समरांत जिंकतां आलें नाहीं. हे बुद्धिमंता, जरासंधाचें एकंदर वीस अक्षौहिणी सैन्य असून तें सर्व यावेळीं त्याचेकरितां गोळा झालें होतें. हे भरतश्रेष्ठा, यादवांची संख्या थोडीच होती म्हणून आजपर्यंत इतर राजांची मदत घेऊन जरासंधानें यादवांना पुष्कळ वेळां जिंकलें. परंतु शेवटीं कृष्णाच्या कृपाछत्राखालीं अटोकाट प्रयत्न करून युद्धामध्यें यादवांनीं जरासंधाचा वर सांगितल्याप्रमाणें पराभव केला. आणि महापराक्रमी यदुपुंगव सुखानें मथुरेंत नांदूं लागले.

## अध्याय सदतिसावा.

—:०:—

### हर्यश्वराजाची कथा व यादवांची उत्पत्ति.

वैशंपायन सांगतातः—यादवांच्या मथुरानगरींत महासमर्थ कृष्ण बलरामासहवर्तमान सुखानें नांदत असतां, कालक्रमानें त्याला यौवनावस्था प्राप्त होऊन राजलक्ष्मीचें तेज प्रभूच्या अंगावर झळकूं लागलें. मोठ्या प्रीतीनें तो अरण्यांनीं वेष्टिलेल्या मथुरेंत संचार करी.

कांहीं काळ लोटल्यावर, प्रतापी जरासंध राजाला पुनरपि कंसाच्या निधनवृत्ताचें स्मरण झालें. दोघी कन्यांनीं पुनः युद्ध करण्याविषयीं त्या राजाचें मन वळविलें. यादवांनीं आजपर्यंत जरासंधाला सतरा वेळां लढाया दिल्या, परंतु त्या वीरांच्यानें युद्धांत जरा-

---

[1] सांप्रत बलरामानें मुसल उचललें असून मूळांत ' समुद्यत-हलायुधं ' असेच शब्द आहेत. तेथें निरुपाय आहे. कदाचित् 'ज्यानें आपलें हलायुध नेहमीं उचललेलें असतें' असें म्हटल्यास चालेल.

[1] हेच दोन श्लोक ३४ वे अध्यायारंभींही आहेत!

संधाला मारवलें नाहीं. म्हणून पुनः चतुरंग दळ बरोबर घेऊन अठरावी लढाई देण्याची श्रीमन्मगधेश्वरानें तयारी केली. कृष्णाला मारून कंसवधाचें उट्टें काढतां आलें नाहीं यामुळें लज्जित झालेला जरासंध कृष्णाच्या वधाचा हेतु मनांत धरून पुनः मोठ्या सैन्यानिशीं मथुरेच्या अनुरोधानें निघाला. तो श्रीमान् व बलिष्ठ राजगृहेश्वर[1] जरासंध राजा इंद्रासारखा पराक्रमी होता.

जरासंध राजा पुनः मथुरेकडे येत असल्याचें वर्तमान समजतांच त्याच्या भयानें त्रासलेले यादव पुनः एकत्र जमून (त्याच्या) प्रतिरोधाचा विचार करूं लागले. तेव्हां विकद्रु नामक एका राजनीतिनिपुण व महातेजस्वी यादवानें उग्रसेनाच्या देखत कमललोचन श्रीकृष्णाला उद्देशून पुढील भाषण केलें "बा गोविंदा, या यदुकुलाची उत्पत्ति कशी झाली हें मी तुला सांगतों, ऐक. नंतर प्रस्तुत काय करावयाचें तें मी सांगणार आहें, तेंही ऐकून ठेव. साधो, माझें बोलणें तुला युक्त वाटलें तरच तूं मीं सांगतों त्याप्रमाणें वाग. सर्वज्ञ व्यास ऋषींच्या तोंडून यदुवंशाच्या उत्पत्तीची हकीकत मला जशी कळली आहे, तशीच साग्र मी सांगणार आहें.

"मनूच्या वंशांत पूर्वीं इक्ष्वाकु राजाच्या पोटीं, हर्यश्व नांवाचा विख्यात इंद्रासारखा पराक्रमी राजा होऊन गेला. इंद्राच्या शचीप्रमाणेंच त्याची मधुमती नांवाची प्रिय भार्या होती. ती मधु नामक दैत्याची मुलगी होती. यौवनादि गुणांनीं ती संपन्न असून रूपानें तिच्या बरोबरीची स्त्री या भूतलावर तरी सांपडणें अशक्य होतें. ती सर्वदा राजाच्या मनाप्रमाणें वागत असे, यामुळें ती नेहमीं राजाला प्राणापेक्षांही प्यार वाटे. त्या सुश्रोणीचें जन्म दैत्येंद्राच्या कुलांत झालें असल्याकारणानें तिला इच्छेस येईल तें रूप धारण करतां येत असे. ती रूपानें अंतरिक्षांतील रोहिणीप्रमाणें सुंदर असून एकनिष्ठ पतिव्रता होती. सारांश, त्या कामिनीनें इक्ष्वाकुकुलांतील अत्यंत पराक्रमी हयर्श्व राजाला (आपल्या गुणांनीं) अगदीं लुब्ध करून टाकलें होतें.

माधवा, विश्वासानें ज्येष्ठ बंधूच्या राज्यांत वास्तव्य करीत असतांना कोणे एके दिवशीं हर्यश्वाला त्याच्या ज्येष्ठ भ्रात्यानें राज्याच्या बाहेर घालवून दिलें. तेव्हां त्यानें ताबडतोब अयोध्येचा त्याग करून अगदीं थोडा परिवार बरोबर घेतला आणि कालाचा (प्रतिकूल) ओघ ओळखून तो कमलनेत्र हर्यश्व वनामध्यें भार्येसहवर्तमान सुखानें जाऊन राहिला.

कमलनयना मधुमती एके समयीं भ्रात्याकडून राज्यभ्रष्ट झालेल्या आपल्या पतीला म्हणाली "नरश्रेष्ठा, इकडे या राज्याविषयींची आशा पार सोडून द्या. वीरा, आपण उभयतां माझा पिता मधुदैत्य त्याचे घरीं जाऊं या. (माझ्या पित्याच्या राज्यांत) इच्छिलेलीं फलें व पुष्पें देणाऱ्या वृक्षांनीं भरलेलें 'मधुवन' नांवाचें अरण्य आहे; त्या ठिकाणीं जाऊन स्वर्गलोकीं गेल्याप्रमाणें आपण उभयतां (यथेच्छ) क्रीडा करूं. हे राजा, माझ्या पित्याचें व मातेचें तुम्हांवर पूर्ण प्रेम असून मला सुख व्हावें या बुद्धीनें माझा भ्राता लवण तुम्हांवर फारच ममता करितो. कोणत्याही प्रकारचें नियंत्रण न रहातां स्वराज्याप्रमाणें आपण उभयतां तेथें जाऊन नंदनवनांत देवांचें जोडपें जसें रहातें तसें राहूं. राजश्रेष्ठा, तुमचें कल्याण असो! स्वर्गलोकाप्रमाणें आपण मी म्हणतें तसे तेथें जाऊन सुखोपभोग घेऊं. महाराज, आपणां उभयतांचा द्वेष करणाऱ्या

[1] 'राजगृह' हें मगध देशांतील राजधानीचें नांव. ही पाटण्यापासून अजमासें वीस योजनांवर होती.

रागानें गदा खालीं ठेवून आपलें दुसरें श्रेष्ठ आयुध जें मुसल तें हातीं घेतलें. क्रुद्ध झालेल्या बलरामानें अत्यंत भयंकर व अमोघ असें मुसल ( जरासंधावर टाकण्याकरितां ) तयार करतांच सुस्वर व सर्व लोकांस ऐकूं येईल अशी आकाशवाणी अंतरिक्षांतून उमटली. ज्यानें आपलें हलायुधं सरसावलें आहे अशा बलदेवास उद्देशून ती म्हणाली. “ रामा, याला तूं मारूं नको. मागधावरील तुझा राग शांत कर. याला कोणाचे हातून मृत्यु यावयाचा आहे तें मला माहीत आहे. म्हणून तूं आपला हात आटोपावास हें बरें. थोडक्याच अवधींत मागधाचा वध होईल.”

ही वाणी ऐकून जरासंधाचें मन एकदम व्याकुल व उद्विग्न झालें व बलरामानेंही त्याचेवर प्रहार केला नाहीं. उभयतां: बलराम व जरासंध यांनीं युद्ध बंद केलें व इतर राजे आणि वृष्णी यांनीं त्यांचेंच अनुकरण केलें. हे राजश्रेष्ठा, पुष्कळ दिवस एकमेकांवर प्रहार करण्यांत उद्युक्त होऊन त्यांनीं जें भयंकर युद्ध मांडलें होतें, तें आतां समाप्त झालें.

पुढें जरासंध राजा पराभूत होऊन परत फिरला. इकडे सूर्यही अस्तास गेला. यादवांनीं रात्र पडल्यानंतर जरासंधाचा पाठलाग केला नाहीं. केशवाच्या आश्रयछत्राखालीं त्या महावीरांचा हेतु सिद्धीस गेल्यामुळें त्यांनीं आपलें सैन्य एके ठिकाणीं करून मुदित मनानें मथुरेंत प्रवेश केला. आकाशांतून जीं आयुधें पडलीं होतीं तीं ( देखील कार्यभाग सरल्यावर आलीं तशीं ) गुप्त झालीं.

जरासंध राजानें खिन्न मनानें आपल्या राजधानीची वाट धरली व त्याचेबरोबर आलेल्या राजांनींही तोच क्रम स्वीकारला. हे कुरुशार्दूला, जरासंधाचा जरी वरीलप्रकारें पराजय झाला तरी त्याला आपण जिंकलें असें यादव समजले नाहींत. तो राजा खरोखर फार बलाढ्य होता. यादवांनीं एकंदर जरासंधाशीं अठरा वेळां संग्राम केला. परंतु एकाही वेळीं त्या पराक्रमी वीरांना त्याला समरांत जिंकतां आलें नाहीं. हे बुद्धिमंता, जरासंधाचें एकंदर वीस अक्षौहिणी सैन्य असून तें सर्व यावेळीं त्याचेकरितां गोळा झालें होतें. हे भरतश्रेष्ठा, यादवांची संख्या थोडीच होती ह्मणून आजपर्यंत इतर राजांची मदत घेऊन जरासंधानें यादवांना पुष्कळ वेळां जिंकलें. परंतु शेवटीं कृष्णाच्या कृपाछत्राखालीं अटोकाट प्रयत्न करून युद्धामध्यें यादवांनीं जरासंधाचा वर सांगितल्याप्रमाणें पराभव केला. आणि महापराक्रमी यदुपुंगव सुखानें मथुरेंत नांदूं लागले.

## अध्याय सदतिसावा.

—:०:—

### हर्यश्वराजाची कथा व यादवांची उत्पत्ति.

वैशंपायन सांगतात:——यादवांच्या मथुरानगरींत महासमर्थ कृष्ण बलरामासहवर्तमान सुखानें नांदत असतां, कालक्रमानें त्याला यौवनावस्था प्राप्त होऊन राजलक्ष्मीचें तेज प्रभूच्या अंगावर झळकूं लागलें. मोठ्या प्रीतीनें तो अरण्यांनीं वेष्टिलेल्या मथुरेंत संचार करी.[1]

कांहीं काळ लोटल्यावर, प्रतापी जरासंध राजाला पुनरपि कंसाच्या निधनवृत्ताचें स्मरण झालें. दोघी कन्यांनीं पुन: युद्ध करण्याविषयीं त्या राजाचें मन वळविलें. यादवांनीं आजपर्यंत जरासंधाला सतरा वेळां लढाया दिल्या, परंतु त्या वीरांच्यानें युद्धांत जरा-

१ सांप्रत बलरामानें मुसल उचललें असून मूळांत ‘ समुद्यत-हलायुधं ’ असेच शब्द आहेत. तेथें निरुपाय आहे. कदाचित् ‘ज्यानें आपलें हलायुध नेहमीं उचललेलें असतें’ असें म्हटल्यास चालेल.

१ हेच दोन श्लोक ३४ वे अध्यायारंभींही आहेत !

संधाला मारवलें नाहीं. म्हणून पुनः चतुरंग दळ बरोबर घेऊन अठरावी लढाई देण्याची श्रीमन्मगधेश्वरानें तयारी केली. कृष्णाला मारून कंसवधाचें उट्टें काढतां आलें नाहीं यामुळें लज्जित झालेला जरासंध कृष्णाच्या वधाचा हेतु मनांत धरून पुनः मोठ्या सैन्यानिशीं मथुरेच्या अनुरोधानें निघाला. तो श्रीमान् व बलिष्ठ राजगृहेश्वर[1] जरासंध राजा इंद्रासारखा पराक्रमी होता.

जरासंध राजा पुनः मथुरेकडे येत असल्याचें वर्तमान समजतांच त्याच्या भयानें त्रासलेले यादव पुनः एकत्र जमून (त्याच्या) प्रतिरोधाचा विचार करूं लागले. तेव्हां विकद्रु नामक एका राजनीतिनिपुण व महातेजस्वी यादवानें उग्रसेनाच्या देखत कमललोचन श्रीकृष्णाला उद्देशून पुढील भाषण केलें "बा गोविंदा, या यदुकुलाची उत्पत्ति कशी झाली हें मी तुला सांगतों, ऐक. नंतर प्रस्तुत काय करावयाचें तें मी सांगणार आहें, तेंही ऐकून ठेव. साधो, माझें बोलणें तुला युक्त वाटलें तरच तूं मीं सांगतों त्याप्रमाणें वाग. सर्वज्ञ व्यास ऋषींच्या तोंडून यदुवंशाच्या उत्पत्तीची हकीकत मला जशी कळली आहे, तशीच साग्र मी सांगणार आहें.

"मनूच्या वंशांत पूर्वीं इक्ष्वाकु राजाच्या पोटीं, हर्यश्व नांवाचा विख्यात इंद्रासारखा पराक्रमी राजा होऊन गेला. इंद्राच्या शचीप्रमाणेंच त्याची मधुमती नांवाची प्रिय भार्या होती. ती मधु नामक दैत्याची मुलगी होती. यौवनादि गुणांनीं ती संपन्न असून रूपानें तिच्या बरोबरीची स्त्री या भूतलावर तरी सांपडणें अशक्य होतें. ती सर्वदा राजाच्या मनाप्रमाणें वागत असे, यामुळें ती नेहमीं राजाला प्राणांपेक्षांही प्यार वाटे. त्या सुश्रोणीचें जन्म दैत्येंद्राच्या कुलांत झालें असल्याकारणानें तिला इच्छेस येईल तें रूप धारण करतां येत असे. ती रूपानें अंतरिक्षांतील रोहिणीप्रमाणें सुंदर असून एकनिष्ठ पतिव्रता होती. सारांश, त्या कामिनीनें इक्ष्वाकुकुलांतील अत्यंत पराक्रमी हयश्व राजाला (आपल्या गुणांनीं) अगदीं लुब्ध करून टाकलें होतें.

माधवा, विश्वासानें ज्येष्ठ बंधूच्या राज्यांत वास्तव्य करीत असतांना कोणे एके दिवशीं हर्यश्वाला त्याच्या ज्येष्ठ भ्रात्यानें राज्याच्या बाहेर घालवून दिलें. तेव्हां त्यानें ताबडतोब अयोध्येचा त्याग करून अगदीं थोडा परिवार बरोबर घेतला आणि कालाचा (प्रतिकूल) ओघ ओळखून तो कमलनेत्र हर्यश्व वनामध्यें भार्येसहवर्तमान सुखानें जाऊन राहिला.

कमलनयना मधुमती एके समयीं भ्रात्याकडून राज्यभ्रष्ट झालेल्या आपल्या पतीला म्हणाली "नरश्रेष्ठा, इकडे या राज्याविषयींची आशा पार सोडून द्या. वीरा, आपण उभयतां माझा पिता मधुदैत्य त्याचे घरीं जाऊं या. (माझ्या पित्याच्या राज्यांत) इच्छिलेलीं फलें व पुष्पें देणाऱ्या वृक्षांनीं भरलेलें 'मधुवन' नांवाचें अरण्य आहे; त्या ठिकाणीं जाऊन स्वर्गलोकीं गेल्याप्रमाणें आपण उभयतां (यथेच्छ) क्रीडा करूं. हे राजा, माझ्या पित्याचें व मातेचें तुम्हांवर पूर्ण प्रेम असून मला सुख व्हावें या बुद्धीनें माझा भ्राता लवण तुम्हांवर फारच ममता करितो. कोणत्याही प्रकारचें नियंत्रण न रहातां स्वराज्याप्रमाणें आपण उभयतां तेथें जाऊन नंदनवनांत देवांचें जोडपें जसें रहातें तसें राहूं. राजश्रेष्ठा, तुमचें कल्याण असो! स्वर्गलोकाप्रमाणें आपण मी म्हणतें तसे तेथें जाऊन सुखोपभोग घेऊं. महाराज, आपणां उभयतांचा द्वेष करणाऱ्या

[1] 'राजगृह' हें मगध देशांतील राजधानीचें नांव. ही पाटण्यापासून अजमासें वीस योजनांवर होतों.

व राज्यमदानें धुंद झालेल्या आपल्या गर्विष्ठ भ्रात्याचा आपण त्याग करूं. खरोखर, सांप्रत आपण सेवकासारखे दुसऱ्यांवर अवलंबून राहिलों आहों. हें आपलें जिणें अत्यंत निंद्य आहे. धिःकार असो या आपल्या दुःस्थितीला! वीरश्रेष्ठा, चला तर आपण दोघें माझ्या बापाच्या घरीं जाऊन राहूं."

ज्येष्ठ भ्रात्याविषयींची हर्यश्वाची सरळ भावना जरी सुटलेली नव्हती, तरी सुखोपभोगासाठीं हपापलेल्या त्या राजाला पत्नीचें भाषण फार मानवलें, आणि कामवासनेनें ग्रासलेला तो पुरुषश्रेष्ठ हर्यश्व राजा तत्काळ त्या रूपवती भार्येसहवर्तमान मधुपुरास गेला.

तेथें दैत्येंद्र मधूनें प्रेमानें त्याला म्हटलें, 'बा हर्यश्वा, तुझें स्वागत असो. तुझ्या दर्शनानें मला फार आनंद झाला आहे. राजेंद्रा, मधुवन खेरीज करून माझें हें जें राज्य आहे तें सर्व मी तुला अर्पण करितों. तूं आतां येथेंच वास्तव्य कर. या वनांत हा लवण तुला ( सर्व प्रकाची ) मदत करील. शत्रूंना जिंकण्याचे कामीं तो तुला योग्य सल्लामसलत देईल. या समृद्ध राष्ट्राचें तूं ( योग्य रीतीनें ) पालन कर. या राज्याच्या सीमेवर समुद्र असून येथें गाई विपुल आहेत. येथील जमीन पिकाऊ असून वस्ती प्रायः गौळ्यांची आहे. बाबारे, या ठिकाणीं तूं राहिलास म्हणजे येथें या किल्ल्याचें टोलेजंग डोंगरी शहर बनेल आणि राजांचें वास्तव्य होऊन हा देश म्हणजे एक मोठें सुराष्ट्रच बनून जाईल. समुद्राच्या सीमेपर्यंत सगळी भूमि सुपीक व आरोग्य--दायी असल्यामुळें या ठिकाणीं आनर्त नामक विस्तृत राष्ट्राचा उदय होईल.'

राजा, हें सर्व कालांतरानें होणार आहे. परंतु, मला ( मात्र ) तें भविष्य आजच समजून चुकलें आहे. राजाचा जो उत्तम प्रकारचा आचार ( शास्त्रामध्यें सांगितला ) आहे, त्याप्रमाणें तूं कालाकडे दृष्टि देऊन आपलें वर्तन ठेव. ययातीच्या यदुपुत्रापासून उत्पन्न झालेल्या यादववंशांत तुझा वंश पुढें मिळून जाईल. तूं जरी सूर्यवंशांत उत्पन्न झाला आहेस तरी तुझा वंश सोमवंशाची एक शाखा होईल. बाबारे, असा माझा मनोदय आहे कीं हा माझा उत्तर प्रदेश तुला अर्पण करून मी लवणालय समुद्राच्या तीरीं तपश्चर्या करण्याकरितां जाणार आहें आणि आपल्या वंशाची वृद्धि करण्यासाठीं लवणासहवर्तमान या माझ्या उत्तम प्रदेशाचें तूं पालन कर."

हर्यश्वानें "ठीक आहे" असें म्हणून मधु नगर आपल्या स्वाधीन करून घेतलें. मधुदैत्यही नंतर वरुणालय नामक तपोभूमीकडे निघून गेला. इंद्रतुल्य व महातेजस्वी हर्यश्वानें दिव्य गिरिवरश्रेष्ठावर आपल्या निवासाकरितां एक नगर बसविलें. थोडक्याच अवधींत हर्यश्वाचें आनर्त राष्ट्र सुसंपन्न होऊन गाई वगैरेंची त्यांत समृद्धि झाली. त्याच्या सुपीक राज्यांत प्रदेश पाणथळ असल्यानें उत्तम प्रकारचीं धान्यें पिकूं लागून पुष्कळ शहरें उदयास आलीं व नगरांना तटबंदी झाली. लतावेली व वनें यांनीं अलंकृत झालेल्या आपल्या समृद्ध राज्याचा, राष्ट्रवृद्धि करणाऱ्या हर्यश्व राजानें, राजधर्मानें ( पुष्कळ दिवस उत्तम प्रकारें ) कारभार केला. त्याची सर्वतोपरी कीर्ति होऊन प्रजांना देखील त्याच्या कारभारापासून संतोष झाला. महात्म्या हर्यश्वाच्या न्यायीपणाच्या वागणुकीनें त्याचे राज्यांत कसलीही गडबड न होतां राष्ट्रांत अवश्य असणारे सर्व गुण तेथें उदयास आले. राजाला योग्य अशा आचारामुळें त्याची कीर्ति होऊन शिवाय त्यानें उत्तम वागणुकीनें व न्यायीपणानें राज्यकारभार हांकल्यामुळें कुलाला साजेल अशी संपत्तीही त्याला प्राप्त झाली.

(कालांतरानें) त्या सुशील, सुबुद्ध व पुत्रेच्छु राजाला मधुमतीपासून यदु[1] नामक महाकीर्तिमान् पुत्र झाला. तो महातेजस्वी यदु (हलके हलके चंद्रकलेप्रमाणें) वाढूं लागला. त्याचा आवाज दुंदुभीसारखा असून तो सर्व राजलक्षणांनीं संपन्न होता. शत्रूंना दुर्जय असलेला हर्यश्वाचा राजलक्षणयुक्त पुत्र यदु, हा पूर्णपणें आपल्या महाविख्यात पुरु नामक पूर्वजासारखा होता. महात्म्या हर्यश्वाला एवढा एकच पृथ्वीपति, ओजस्वी व सुंदर असा पुत्र होता. धर्मनिष्ठपणांत जगामध्यें अप्रतिम कीर्ति मिळवून हर्यश्वराजा दहा हजार वर्षें निष्कंटकपणें राज्य केल्यावर स्वर्गवासी झाला.

पित्याच्या निधनानंतर महात्म्या व श्रीमान् यदूला प्रजांनीं राज्याभिषेक केला. (ऐहिक) क्रमानुसार (त्याच्या भाग्योदयाची वेळ येऊन) तो सूर्याप्रमाणें वैभवास चढूं लागला. तस्करादिक सर्व प्रकारचीं भयें नाहींशीं करून त्या इंद्रतुल्य यदूनें या पृथ्वीचें (उत्तम प्रकारें) पालन केलें. या यदूपासून उत्पन्न झाल्यामुळें आपणा सर्वांना यादव ही संज्ञा प्राप्त झाली आहे.

असो; एके समयीं, तारकायुक्त चंद्राप्रमाणें आपल्या गुणसंपन्न स्त्रियांसह जलक्रीडा करावयाकरितां तो यदु महासागरांत गेला. तेव्हां त्या जलक्रीडेच्छु पराक्रमी राजावर धूम्रवर्ण सर्पराजानें एकाएकीं झडप घातली व त्वरेनें त्यानें त्याला जलांतील मोठ्या सर्पपुरांत ओढून नेलें. तेथील स्तंभ व गृहद्वारें मणिमय असून मोत्यांच्या माळांनीं त्यांना विशेष शोभा आणलेली होती. शुभ्रवर्ण नानातऱ्हेचे शंख, रत्नांच्या राशी, कोवळे अंकुर व पानें यांनीं गच्च भरलेले वृक्ष, इत्यादिकांनीं तें सर्पपुर संपन्न व सुशोभित दिसत होतें. समुद्राच्या उदरांत रहाणारे असंख्य पन्नगश्रेष्ठ तेथें इकडे तिकडे वावरत होते. चंद्रासारख्या तेजःपुंज व कनकवर्ण स्वस्तिकानें त्या नगराला फारच शोभा आली होती. जमीनीवर जशी नगराची रचना करतात त्याप्रमाणें समुद्राच्या निर्मळ उदकामध्यें तें पन्नगनगर वसलेलें होतें. सर्पराजाबरोबर जातां जातां अशा स्वरूपाचें सर्पपुर त्या राजश्रेष्ठाच्या दृष्टीस पडलें. नंतर असंख्य सर्पस्त्रियांनीं भरलेल्या त्या अगाध, स्वच्छ व मेघतुल्य नगरामध्यें राजा यदूनें प्रवेश केला. जलामध्येंच तयार केलेलें मण्यांचें उत्तम आसन त्याला बसण्याकरितां देण्यांत आलें. त्या आसनावर कमलाच्या पाकळ्या उत्तम रीतीनें पसरल्या असून शिवाय कमलसूत्रांचेंच त्यावर अस्तर घातलें होतें. त्या श्रेष्ठ पन्नगासनावर यदुराज स्थित झाल्यावर सावधान चित्तानें धूम्रवर्ण सर्पराज त्याला ह्मणाला. "राजा, या श्रेष्ठ वंशाची स्थापना करून व तुझ्यासारखा तेजस्वी राजपुत्र निर्माण करून तुझा पिता स्वर्लोकीं गेला. यदुपुंगवा, जगत्कल्याणाकरितां तुझ्या पित्यानें या यदुवंशाची तुझ्या नांवानें स्थापना केली. या वंशांत अनेक राजे जन्मास यावयाचे आहेत; ह्मणून या वंशाला राजांची खाण असेंच ह्मटलें पाहिजे. विभो, या तुझ्या वंशांत देव, ऋषी व उरग हे मनुष्यरूपानें तुझे अव्यय पुत्र ह्मणून

[1] हा प्रकार मोठा घोटाळ्याचा आहे. कारण, सोमवंशीय ययातिपुत्र 'यदु' हा यादवांचा पूर्वज असें पूर्वीं सांगितलें असून येथें सूर्यवंशीय हर्यश्वाचा तोच 'यदु' पुत्र होऊन यादवांचा पूर्वजही होतो! याचें समाधान नीलकंठानीं असें केलें आहे कीं, ज्याप्रमाणें वसिष्ठ हा प्रथम ब्रह्मदेवाचा मानसपुत्र असतांना त्यानेंच कांहीं निमित्तानें मित्रावरुणांचे पोटीं पुनः जन्म घेऊनही आपलें पाहिलेंच वसिष्ठत्व योगबलानें चालू ठेविलें, तशांतलाच हा प्रकार समजावा. ह्मणजे तोच यदु सोम व सूर्य दोन्हीही वंशांत जन्मून त्यानें योगबलानें आपलें एकत्व कायम राखिलें. आह्माला याचें समाधान सुचत नाहीं.
म. ह. मो.

जन्मास यावयाचे आहेत. नृपश्रेष्ठा, यौवनाश्वाच्या भगिनीच्या पोटीं माझ्यापासून या पांच सदाचारसंपन्न मुली जन्मास आलेल्या आहेत. यांचें तूं धर्मांत सांगितलेल्या प्राजापत्य विवाहविधीनें पाणिग्रहण कर. मी तुला वर देतों. वरप्रदानास तूं योग्य आहेस अशी माझी खात्री आहे. भौम, कुकुर, भोज, अंधक, यादव, दाशार्ह व वृष्णी अशा तुझ्या वंशजांच्या सात शाखा प्रख्यात होतील."

इतकें बोलून धूम्रवर्णानें त्या इंद्रतुल्य यदूला संकल्पपूर्वक हातावर उदक घालून आपल्या अविवाहित कन्या अर्पण केल्या. शिवाय त्या पन्नगश्रेष्ठानें संतुष्ट होऊन आपल्या कन्यांस ऐकूं येईल अशा रीतीनें त्याला पुढील वर दिला. "हे सन्मान्य राजा, आपापल्या मातापितरांचे गुणधर्म घेऊन या माझ्या मुलींपासून तुला पांच पुत्र होतील. माझ्या वरप्रदानानें तुझ्या वंशांत जे राजे उत्पन्न होतील त्यांना इच्छिलीं रूपें घेतां येऊन जलांत संचार करण्याचें सामर्थ्य प्राप्त होईल."

पांच कन्या व शिवाय (उत्तम) वर यांची प्राप्ति झाल्यावर लागलीच यदुराज चंद्राप्रमाणें जलांतून वर आला. त्या पांच स्त्रियांच्या मध्यें स्थित असतांना तो राजा पांच तारकांनीं युक्त असलेल्या चंद्रासारखा (शोभिवंत) दिसत होता. त्या नृपश्रेष्ठानें विवाहवेष असल्यानें दिव्य माळा धारण करून उटी लावलेली होती. त्याच स्थितींत अंतःपुरांत जाऊन त्यानें आपल्या अग्नीसारख्या तेजस्वी (नवोढा) भार्यांचें (पितृवियोगाबद्दल) समाधान केलें आणि नंतर तेथून मोठ्या संतोषानें आपल्या नगरास तो परत गेला."

## अध्याय अडतिसावा.

—:०:—

### यदूचें वंशज व त्यांचे पराक्रम.

वैशंपायन सांगतातः—"या गोष्टीला बरेच दिवस लोटल्यावर त्या पांच नागकन्यांपासून यदु राजाला महाबाहु, मुचुकुंद, पद्मवर्ण, माधव, सारस व राजा हरित, असे पांच कुलदीपक व पराक्रमी पुत्र झाले. जगतांतील पंचमहाभूतांसारख्या आपल्या पराक्रमी पुत्रांकडे पाहून अतुलपराक्रमी यदूला मोठा संतोष झाला. ते वयांत आल्यावर पांच पर्वतांसारखे दिसूं लागले. आपल्या सामर्थ्याच्या अभिमानानें प्रेरित होऊन एके समयीं ते आपल्या पित्याला म्हणाले, "बाबा, आम्ही आतां वयांत आलों असून आमचें सामर्थ्यही अचाट आहे; तुमच्या हुकुमानें आतां आम्ही कोणती कामगिरी करावयाची त्याबद्दलची आम्हांला सत्वर आज्ञा मिळावी, अशी आमची इच्छा आहे."

आपल्या व्याघ्रासारख्या पराक्रमी पुत्रांच्या सामर्थ्याचें कौतुक वाटून त्या नृपशार्दूलाला मोठा आनंद झाला व तो म्हणाला, "मुचुकुन्दानें विंध्य व ऋक्षवान् या पर्वतांच्या सभोंवतीं यत्नपूर्वक पर्वतांचेच आश्रयानें दोन शहरें वसवावीं. पद्मवर्णानें तसेंच विलंब न करितां सह्याद्रीच्या वर दक्षिणेकडे एका नगराची स्थापना करावी. त्याच पर्वतावर चंपक वृक्षांनीं अलंकृत झालेल्या पश्चिमेकडील सुंदर प्रदेशांत सारसानें एका रमणीय नगरीची योजना करावी. आजानुबाहु हरितानें हिरव्या उदकाच्या सागरामधील सर्पराजाच्या द्वीपाचें पालन करावें आणि माझा ज्येष्ठ पुत्र जो

---

१ यदूचा बाप हर्यश्व हा यौवनाश्वाचा भाऊ असल्यानें या सर्पकन्यांची आई ती हर्यश्वाचीही बहीणच झाली. अर्थात् यदूला ह्या मुली आतेबहिणी झाल्या. तेव्हां हा सपिंडांचा विवाह शास्त्रनिषिद्ध आहे. तथापि, देशस्थांत मामेबहीण चालते त्यांतलेंच हें समजावें, असें नीलकंठ म्हणतो. किंवा हा यौवनाश्व दुसराच कोणी मानावा असेंही सुचवितो.

महाबाहु व धर्मज्ञ माधव त्यानें यौवराज्याचा स्वीकार करावा व येथेंच राहून आपल्या नगरीचें रक्षण करावें."

याप्रमाणें पित्याची आज्ञा होतांच, राजलक्ष्मीनें संपन्न व अभिषेक होऊन चामरयुक्त झालेले ते दिक्पालतुल्य चारी राजपुत्र आपआपल्या आदिष्ट दिशेनें नगरें वसविण्याकरितां रमणीय स्थलांचा शोध करीत निघाले. विंध्याद्रीच्या मध्यभागीं मोठमोठ्या शिलाखंडांनीं आवृत झालेल्या नर्मदातीरावरील प्रदेशांतील स्थान आपल्या कार्यासाठीं राजर्षि मुचुकुंदानें पसंत केलें. नंतर त्यानें तेथील जागा साफसुफ करून मोकळी केली. नदीला सेतु बांधून सर्व प्रदेश सारखा केला. चोहोंबाजूंनीं परिखा तयार केल्या; त्यांत विपुल जल होतें. नगराच्या वेगवेगळ्या भागांत त्यानें देवालयें बांधून, राजमार्ग, माणसें जाण्याचे मार्ग, उपवनें व चव्हाटे तयार करविले. सारांश, थोडक्या अवधींत त्या नृपश्रेष्ठानें आपली नगरी संपन्न करून तिला इंद्राच्या अमरावतीची शोभा आणिली. स्वतःच्या हिमतीनें वसविलेल्या नगरीला त्या देवासारख्या पराक्रमी राजश्रेष्ठानें माहिष्मती असें शुभ नांव दिलें. ही नगरी ऋक्षवान् पर्वताच्या आश्रयानें वसलेली असून मोठमोठ्या शिलांचें हिला चोहोंकडून संरक्षण आहे, म्हणून माहिष्मति[1] असें अन्वर्थक नांव हिला प्राप्त झालें आहे. त्या धर्मात्म्यानें विंध्याद्रि व ऋक्षवान् यांच्या पायथ्याशीं दुसरी पुरिका नांवाची अमरावतीसारखी फारच शोभिवंत नगरी वसविली. त्या नगरींतही शेंकडों उपवनें, बाजार व चव्हाटे यांची रेलचेल होती. पुरिका नगरी देखील (माहिष्मतीप्रमाणेंच) ऋक्षवान् पर्वताच्या समीप व नर्मदेच्या निरामय तीरावर मुचुकुंद राजानें स्थापिली होती. असो; पुढें तो धर्मात्मा देवांनींच उपभोगण्यास योग्य असलेल्या या दोन्ही शुभ व समृद्ध नगरींचें शास्त्रोक्त राजधर्मानें परिपालन करीत राहिला.

सह्याद्रिच्या पठारावर वेणानदीच्या तीरीं तरु व लता यांनीं निबिड असलेल्या प्रदेशांत राजर्षि पद्मवर्ण यानें एक उत्तम नगर वसविलें. त्या ठिकाणीं दाट झाडी असल्यामुळें मोकळा प्रदेश थोडा होता. ही गोष्ट लक्षांत घेऊन त्या राजानें तेथें एक संपूर्ण उत्तम राष्ट्रच वसवून त्याची रचना मोठ्या थोरल्या प्राकाराप्रमाणें केली. त्यानें त्वष्ट्या[1]सारख्या कौशल्यानें वसविलेल्या नगराचें नांव करवीर असून त्या सबंध राष्ट्राला पद्मावत असें म्हणतात.

सारसानें क्रौंचपुर नामक मोठें रमणीय व सर्वतोपरी उत्कृष्ट असें नगर बांधिलें. त्याच्या नगरांत चंपक, बकुल व अशोक इत्यादि वृक्षांची समृद्धि असून तेथील मृत्तिका ताम्रवर्णाची होती. त्या नगराच्या सभोंवारचा विस्तृत व समृद्ध प्रदेश 'वनवासी' या नांवानें प्रसिद्ध असून त्यांत सर्व ऋतूंमध्यें फलेंपुष्पें येणारे वृक्ष पुष्कळ असल्यामुळें तो (सहाजिकच) फार संपन्न होता.

यदूचा चौथा पुत्र हरित समुद्रद्वीपाचें परिपालन करूं लागला. त्या द्वीपांत असंख्य रत्नें भरलेलीं असून तेथील स्त्रियाही सुंदर असल्यामुळें त्या द्वीपाला मोठी शोभा आली होती. त्याच्यापाशीं मद्गुर नामक विख्यात धीवर होते. ते समुद्रांत जसे कांहीं सदैव बुडी दिलेलेच असत. ते जळांत नित्य बुडचा मारून हरितास शंख आणून देत. त्याचे दुसरे कित्येक धीवर होते ते नेहमीं दक्षतेनें प्रवाल

[1] माहिष्मति=महा+अश्म (शिला)-वती. मोठमोठ्या दगडांनीं घेरलेली.

[1] देवांचा कारागीर.

व अंजन यांचे मणि आणि तेजस्वी मोत्यें गोळा करीत. आणखी निषाद जातीचे लोक होते, तेही होडक्यांत बसून सागरांतील जलज रत्नें मोठ्या मेहेनतीनें जमा करीत. त्या सर्व लोकांची नित्य मत्स्यमांसावर उपजीविका असे. रत्नद्वीपांत रहाणारे वाणी लोक त्या लहान होड्यांतून जमविलेलीं सर्व प्रकारचीं रत्नें घेऊन नौकांच्या साह्यानें दूरदेशीं जात व (तेथें रत्नें विकून) तेथून अलोट पैसा आणून (यक्ष) जसे कुबेराला त्याप्रमाणें हरिताला त्या द्रव्यानें संतुष्ट करीत.

याप्रमाणें इक्ष्वाकुवंशापासून यदुवंश निघालेला आहे. यदूच्या चार पुत्रांपासून त्याच्या पुनः चार[1] शाखा झाल्या.

पुढें कालांतरानें यदुश्रेष्ठ माधवावर राज्याचा भार सोंपवून यदुराजा इहलोकीं देह ठेवून स्वर्गवासी झाला. माधवाला सत्वत नांवाचा वीर्यवान् पुत्र झाला होता. तोही सात्विक वृत्तीचा व सद्गुणसंपन्न असून शिवाय राजाला अवश्य असणारे गुण त्याचे अंगीं पूर्ण होते. सत्वतानंतर त्याचा पराक्रमी पुत्र भीम बापाचे गादीवर बसला. सात्वताचे व भीमाचे आपण (यादव) वंशज असल्यामुळें सात्वत व भैम या नांवानीं आपण संबोधिले जातों. भीम राजा (आनर्त देशावर) राज्य करीत असतां, राजा रामचंद्र अयोध्येचें परिपालन करीत होता. त्याचा कनिष्ठ बंधु जो शत्रुघ्न त्यानें लवणाला मारून मधुवनाचा उच्छेद केला. सुमित्रेच्या आनंदसागरास भरती आणणाऱ्या प्रभु शत्रुघ्नानें मधुवनाच्या जागीं आपल्या मथुरानगरीची स्थापना केली. राम, भरत व सुमित्रेचे लक्ष्मण आणि शत्रुघ्न यांचें अवतारकृत्य समाप्त झाल्यानंतर भीमराजानें तें वैष्णवस्थान प्राप्त करून घेतलें. लवण निपुत्रिक मृत झाल्याकारणानें भीमराजा हाच मधुदैत्याच्या कन्येचा वंशज म्हणून शास्त्रोक्त वारस होता. सबब त्यानें ही मथुरा नगरी आपले स्वाधीन करून घेऊन तेथेंच वास्तव्य केलें. नंतर कुश हा (अयोध्येचा) राजा व लव हा युवराज असतांना भीमाच्या अंधक नामक पुत्रानें मथुरेचें राज्य केलें. अंधकानंतर त्याच्या रैवत नांवाच्या पुत्रानें राजपद भोगिलें. रमणीय पर्वतशिखरावर रैवताला ऋक्ष नामक पुत्र झाला. समुद्राच्या समीप असलेला हा पर्वत रैवतक ह्मणून पृथ्वीवर प्रसिद्ध आहे. रैवतराजाला तेथें पुत्र झाल्यामुळें त्या पर्वताला रैवतराजाचें नांव मिळालेलें आहे. रैवताचा पुत्र (जो ऋक्ष तोच) महाविख्यात विश्वगर्भ राजा होय. या श्रेष्ठ राजानें पृथ्वीवर मोठा नांवलौकिक संपादन केला. केशवा, त्याच्या तिघी अत्यंत रूपवती भार्यांपासून विश्वगर्भराजाला वसु, बभ्रु, सुषेण व वीर्यवान् सभाक्ष, असे चौघे दिक्पालांसारखे तेजःपुंज पुत्र झाले. यदुवंशांतील या चारी वीरांनीं प्रतिदिक्पाल अशी कीर्ति मिळविली. कृष्णा, या जगांत ज्या ज्या राजांना संतति झाली त्या सर्वांनीं या यादव वंशाचा विस्तार करण्याच्या कामीं हातभार लाविला आहे. शूर हें दुसरें नांव धारण करणाऱ्या वसुराजाला वसुदेव नांवाचा पराक्रमी पुत्र व कुंती आणि श्रुतश्रवा या नांवाच्या दोन तेजस्वी कन्या झाल्या. ह्या वसूचा मित्र राजा कुंतिभोज यानें दत्तक घेतल्यानें त्याचे ताब्यांत गेल्या. त्यांतील कुंती तर भूमीवर संचार करण्याकरितां आलेल्या देवतेसारखी असून पांडूची राज्ञी झाली. दुसरी कांतिमती कन्या श्रुतश्रवा चेदि देशाचा राजा दमघोष याची पत्नी झाली.

कृष्णा, मीं पूर्वीं कृष्णद्वैपायनांचे तोंडून

[1] यदूच्या पांच पुत्रांपैकीं एकानें मूळ वृक्ष कायम ठेवला. बाकीच्या चारांपासून चार शाखा झाल्या.

यदुवंशाच्या उत्पत्तीचा इतिहास जसा ऐकिला तसाच आतां निवेदन केला आहे. हे श्रेष्ठ-वंशोद्धारका, आमच्या नामशेष झालेल्या कुलांत तूं स्वयंभूसारखा आमच्या कल्याणा-करितां व जयप्राप्तीकरितां उत्पन्न झाला आहेस. तूं सर्वाधारी व सर्वज्ञ असून देवांचीं गुह्यें देखील तुला अवगत आहेत. तूं एक सामान्य पुरवासी असें म्हणून तुझें सत्य-स्वरूप (जरासंधापासून) दडवून ठेवतां येणें आम्हांला शक्य नाहीं. विभो, जरासंध राजाशीं सामना देण्यास तूं समर्थ आहेस व आम्ही देखील तुझ्या सांगण्याप्रमाणें वागण्यास तयार असून युद्धाच्या तयारीनें सज्ज आहों. परंतु बलवान् जरासंध हा सर्व राजांचे शिरा-वर पाय देत असून त्याचें सामर्थ्य अपार आहे. उलटपक्षीं आपली सामग्री अगदीं अल्प आहे. आपल्या नगरीला एक दिवस देखील वेढा सहन करण्याचें त्राण उरलेलें नाहीं. कारण, हिला तटबंदीचा आश्रय नसून आपली धान्यसामग्री व जळण हीं संपुष्टांत आलीं आहेत. मथुरेच्या भोंवतालच्या खंदकांतील जल निर्मळ केलेलें नाहीं; दरवाजांवरचीं हत्यारें नाहींतशीं झालीं आहेत; शिवाय बऱ्याच दूरवर तटबंदी व भिंती उभारणें जरूर आहे. त्याचप्रमाणें आयुधागारें म्हणजे मेस्त्री-खानेही दुरुस्त केले पाहिजेत व त्याकरितां त्यांच्या भिंती पुष्कळशा विटा घालून भक्कम केल्या पाहिजेत. पूर्वीं कंस फारच बलिष्ठ असल्यामुळें त्याचे कारकीर्दींत लोकांनीं मथुरे-च्या रक्षणाची विशेष तजवीज कधींच केली नाहीं.

सांप्रत कंस मृत झालेला असून आपलें राज्य बाल्यावस्थेंतच आहे. करितां, कर वसूल करण्यासाठीं गांवांना तगादा बसतो तो जसा सहन करतां येत नांहीं, त्याप्रमाणें आपल्या मथुरेला आतां जरासंधाचा हल्ला सहन करणें शक्य नांहीं. मला वाटतें कीं, या वेळीं आपले सैन्याचा लढाईचे गर्दींत नाश होऊन शत्रु आपल्याला पुरे खेंचणार. आणि शेवटीं या नवीन उदयास येणाऱ्या राष्ट्राचा व त्यांतील लोकांचा सर्वस्वी नायनाट होणार. आम्ही राज्यलोभानें ज्या लोकांना जिंकलें तेच सर्व आतां आह्मां यादवांत फूट पाडण्याची इच्छा करीत आहेत. तेव्हां अशा समयीं जें करणें योग्य दिसेल तेंच करावें अशी माझी सूचना आहे. राज्यकारणामुळें आपण राज्याच्या घोंटाळ्यांत पडलों असतां जरासंधाच्या भयानें जर्जर होऊन पळत सुटलेले राजे आपणास खास सोडून जातील. केशवा, वेढ्यांत सांपड-लेले नागरीकही भयानें गांगरून गेल्यानंतर आपल्याला म्हणतील कीं, यादवांच्या आप-सांतील दुहीनें आमचा मात्र सर्वस्वी नाश झाला. कृष्णा, हें माझें मत तुझ्यावर माझा भरंवसा असल्यामुळें तुला सांगण्याचें मी धाष्टर्य केलें. तुला उपदेश करून चीड आण-ण्यासाठीं मीं बोललों नाहीं. मी विज्ञप्तिरूपानें माझें म्हणणें तुझ्यापुढें मांडलें आहे. कृष्णा, जें अशा स्थितींत आपल्याला हितकर होईल तेंच तूं कर. तूं आमच्या सेनेचा नायक असून आम्ही तूं आज्ञा करशील तसें वागण्यास तयार आहों. या विरोधाचें मूळ तूंच असल्यामुळें तूं आपलें स्वतःचें या संकटापासून रक्षण कर.

## अध्याय एकुणचाळिसावा.

—:०:—

### परशुरामाची भेट.

वैशंपायन सांगतातः—विकद्रूचें भाषण ऐकून घेतल्यानंतर, महाविख्यात वसुदेव संतुष्ट मनानें पुढीलप्रमाणें बोलला.

" कृष्णा, ज्याला संधि, विग्रह, यान, आसन द्वैधीभाव व आश्रय या षड्विध राजनीतीचें सप्रमाण व्याख्यान करितां येतें, त्याचप्रमाणें ज्याला राजकारणांतील गूढमसलतींचें पूर्ण रहस्य समजतें, असला पुरुष ( राजकारणदृष्टीनें )प्रति राजाच समजावा. ( आणि आपला विकद्रु हा असा पुरुष आहे. ) ह्या बुद्धिमंतानें जें कांहीं सांगितलें, तें तत्त्वाला धरून आणि हितकर असें आहे. यदुश्रेष्ठा, विकद्रूनें सत्य व जगताला हितकर असेच राजधर्म आपल्याला सांगितले. आतां तुला जें हितकर वाटेल तें कर."

महात्म्या विकद्रूचें तथ्य भाषण व पित्याचें हें तद्विषयक समर्थन ऐकून घेऊन नंतर पुरुषोत्तमानें एकाग्रचित्तानें योग्य उत्तर केलें. "सांप्रतच्या वैराचें कारण, शत्रूचा पराक्रम, वैराचें मूळ नाहींसें करून संकटपरिहार करण्याची न्यायाची युक्ति, दुर्बलानें मागें पाय घ्यावा अशी शास्त्रोक्त आज्ञा, इत्यादि हेतु, क्रम, न्याय व शास्त्र यांस अनुसरून प्रस्तुत प्रश्नाच्या सर्व बाजूंचा भावी कार्यावर नजर देऊन जो तुम्हीं विचार सांगितलांत, तो सर्व मीं ऐकला. आतां मी त्यावर उत्तर देतों तें ऐकून त्याचा तुम्हीं विचार करा. राजधर्माप्रमाणें राजानें नीतीनें वर्तावें. (असें शास्त्र आहे.) संधि, विग्रह, यान, आसन, दुही व आश्रय या सहा गोष्टींचा राजाला नेहमीं विचार करावा लागतो. शहाण्यानें बलवंताच्या संनिध कधीं राहूं नये ( दुर्बलानें ) प्रतिकूल काल आला आहे असें ओळखतांच, समर्थाला भिऊन पलायनाचा अवलंब करावा. आणि ज्याचे अंगीं शक्ति असेल त्यानें बलिष्ठाशीं सामना द्यावा. (अशी नीति आहे व ती योग्य आहे.) ( तीस अनुसरून) याच क्षणीं मी समर्थ असतांही दुर्बलाप्रमाणें बलरामासह-वर्तमान जीव वांचविण्यासाठीं येथून निघून जातों. येथून निघून मी व बलराम उभयतां सह्याद्रीनें युक्त असलेल्या अक्षय व शोभिवंत दक्षिणप्रदेशामध्यें प्रवेश करूं. त्या ठिकाणीं गेल्यानंतर करवीर व क्रौंच या दोन नगरांचें व गोमंत नामक पर्वतश्रेष्ठाचें आम्ही दर्शन करूं. आम्ही मथुरेंतून निघून गेलों असें कळतांच तो जयानें चढलेला राजा जरासंध नगरींत न शिरतां गर्वानें आमचा पाठलाग करील. सह्याद्रीच्या वनांपर्यंत तो राजा अनुयायांसह आह्मांला धुंडीत येईल व आह्मांला धरण्यासाठीं फार प्रयत्न करील. एतावता, ही आमची दक्षिणापथाकडील यात्रा आह्मांला व यादवांना श्रेयस्कर होऊन मथुरापुरीला, पुरवासी जनांना, किंबहुना या आमच्या देशाला त्यापासून फार सुख लागेल. शत्रु हातचा सुटल्यावर जयाकांक्षी राजे स्वस्थ न बसतां, परराष्ट्रांत त्यांचा पाठलाग करीत जातात. कारण, शत्रूचा निःपात केल्यावांचून त्यांना चैन पडत नाहीं."

इतकें झाल्यानंतर, महाशक्तिमान् व पराक्रमी राम व कृष्ण हे उभयतां यत्किंचित्‌ही न बावरतां खुशाल दक्षिणापथाकडे निघून गेले. इच्छेस येतील तीं रूपें घेऊन दक्षिण दिशेच्या अनुरोधानें सुखानें मार्गक्रमण करीत असतांना शेंकडों राष्ट्रें त्यांना वाटेंत लागलीं. दक्षिणापथाकडे सह्याद्रीच्या रमणीय पठारांवरून जात असतां त्यांना अत्यंत आनंद वाटला. शेवटीं ते वीर सरळ मार्गाला लागले. पुढें थोड्याच अवधींत ते सह्याद्रीच्या सान्निध्यानें शोभिवंत दिसणाऱ्या व यदुवंशीयांनीं अलंकृत केलेल्या करवीर नगरापाशीं येऊन पोंचले. तेथें गेल्यानंतर वेणानदीच्या तीरावर एक फार विस्तारलेला जुनाट व मोठा वटवृक्ष त्यांचे दृष्टीस पडला. त्या वृक्षाच्या खालीं मंदराचलावर सूर्य ज्याप्रमाणें देदीप्यमान् दिसतो त्याप्रमाणें तेजः

[1] या श्लोकाचे वांईकर व दत्त यांनीं केलेले अर्थ आम्हास चिंत्य वाटतात.

पुंज दिसणारा अपरिश्रांत व अव्यय भार्गवराम बसला होता; त्याचेंही त्यांस दर्शन झालें. त्या जटिल ऋषीचें तपोबल कडकडीत असून त्यानें खांद्यावर परशु व अंगावर वल्कलें धारण केलीं होतीं. तो गौरवर्ण असून अग्निशिखेसारखी त्याची आकृति होती. तो तेजानें प्रति सूर्यासारखा असून त्यानें ( आपल्या अवतारकालीं ) सर्व पृथ्वी निःक्षत्रिय केली होती. त्याच्या अप्रतिम गांभीर्यामुळें हा देहधारी सागरच आहे कीं काय असें वाटे. त्याचा त्रेताग्निविस्तार[1] समारोपामुळें कमी पडला होता तरी यथाकालीं अग्नि प्रदीप्त करून तो हवन करीत असे. त्रिकालजलस्नानानें त्याचें शरीर आर्द्र दिसत असून तो आद्य देवगुरूप्रमाणें ( तेजस्वी ) दिसत होता. रामकृष्ण तेथें आले त्या समयीं दुधाची केवळ अरणी ह्मणजे उत्पत्तिस्थानच अशा आपल्या सवत्स व पांढऱ्या शुभ्र, होमार्थ दूध काढावयाच्या, कामधेनूला महेंद्रगिरीकडे तो घेऊन जात होता. त्याचें दर्शन घेऊन स्थानस्थित अग्नीप्रमाणें दिसणारे उभयतां पराक्रमी वसुदेवपुत्र त्याच्या पायांपाशीं बसले. नंतर वक्तृश्रेष्ठ व व्यवहारचतुर कृष्णानें त्या ऋषिशार्दूलाला मधुर व नम्र शब्दांनीं प्रश्न केला.

" भगवन्, आपण जमदग्निपुत्र भार्गवराम आहां, हें मला ठाऊक आहे. आपण सर्व ऋषींमध्यें अग्रगण्य असून ( अवतारकालीं ) क्षत्रियकुलांचा ( अनेक वेळां ) नायनाट केला आहे. तसेंच, भार्गवा, एक शीघ्रगामी बाण मारून तुम्ही समुद्र मागें हटविला व बाण ज्या ठिकाणीं पडला तेथें शूर्पारक नांवाचें नगर वसविलें. त्या नगराचें क्षेत्र पांचाशें धनुष्यें[2] लांब व पांचशें बाण[3] रुंद इतकें आहे. खरोखर बाणानें समुद्राची सीमा मागें हटवून पश्चिमसमुद्राच्या तीरावर सह्याद्रीच्या निबिड अरण्यांत तूं एक मोठा थोरला विस्तृत देशच निर्माण केला आहेस. पित्याच्या वधाचें उट्टें काढण्यासाठीं, तूं कार्तवीर्य सहस्रार्जुनाचें सहस्र बाहुरूपी अरण्य आपल्या परशूनें तोडून काढलेंस. तूं आपल्या परशूनें दुष्ट क्षत्रियांचा वध केल्यामुळें जे रक्ताचे पाट वाहिले ते अद्याप ओले असून त्या कारणानें ही वसुंधरा सांप्रतही रक्तमय दिसत आहे.

सारांश, पृथ्वीवरील क्षत्रियराजांना ज्यानें आपल्या रोषास बळी दिले, तोच तूं रेणुकेचा पुत्र परशुराम आहेस हें मी जाणतों. रणामध्यें ज्याप्रमाणें तूं हा परशु धारण केला होतास तसाच तो अद्यापिही आहे. ह्मणून, हे विप्रा, तुला कांहीं गोष्ट विचारावयाची आमची इच्छा आहे; ती ऐकून निःशंकपणें तूं त्याचें योग्य उत्तर आह्मांला दे.

रामा, यमुनातीराला शोभा देणारी मथुरा नगरी ही आमची जन्मभूमि होय. हे मुनिश्रेष्ठा, आम्ही दोघे यादव आहों. कदाचित् तुला ही गोष्ट माहीतही असेल. यदुश्रेष्ठ व व्रतधारी वसुदेव हा आमचा पिता होय. कंसाच्या भयानें शंकित झाल्यामुळें जन्मा-दारभ्य आम्हांला व्रजामध्यें ठेवून तेथेंच आमचें संवर्धन करण्यांत आलें. पुढें आम्ही जेव्हां मोठे झाल्यावर प्रथम मथुरेला आलों तेव्हां भरसभेमध्यें आम्हांवर उठलेल्या कंसाचा आम्ही स्वपराक्रमानें वध केला. नंतर त्याच्याच पित्याची पुनरपि राजस्थानीं योजना करून आम्हीं आपला गुरें पाळण्याचा धंदा पूर्ववत् सुरू केला. परंतु जरासंधानें आमच्या नगरीचा रोध करून आमचा ( विनाकारण ) पिच्छा पुरविला. आमचे त्याच्याशीं अनेक वेळां संग्राम होऊन आम्हांला नेहमीं सिद्धीही

१ आह्वनीय, दक्षिण व गार्हपत्य यांचा समारोप केला होता. आतां कायमचें अग्निहोत्र ठेविलें नव्हतें.

२ पांचशें धनुष्यें. धनुष्य= ४ हात.

३ पांचशें बाण. बाण= २ हात.

मिळत गेली. पण अखेर, हे धृतव्रता, आमच्या प्रजेचें व प्रिय नगरीचें संरक्षण व्हावें या हेतूनें, जरासंधाच्या प्रचंड उद्योगास भिऊन, कृतार्थ न होतां किंबहुना सामन्याला तोंड देखील न देतां, चिलखत, आयुधें किंवा रथ यांवांचून पायींच आम्ही दोघे मथुरेंतून पळून आलों आहों. सांप्रत आमच्यापाशीं सैन्याचें वगैरे साधन कांहींएक नाहीं. सेनेची सर्व जुळवा-जुळव ( यापुढें ) आम्हांस करावयाची आहे. म्हणून हे मुनिसत्तमा, आम्ही तुझ्या चरणांपाशीं आलों आहों. करितां आम्हांला उत्तम प्रकारची मसलत सांगून तूं आमच्यावर कृपा कर. ”

रेणुकानंदन जो परशुराम त्यानें हें रामकृष्णांचें निष्कपट भाषण श्रवण केल्यानंतर त्यांना धर्माला धरून प्रत्युत्तर दिलें. तो म्हणाला, “ सर्वशक्तिमान् कृष्णा, तुम्हांला मसलत सांगण्याकरितां तर शिष्य बरोबर घेतल्याशिवाय मी केवळ एकटा पश्चिमसमुद्राच्या तीरावरून आतांच येथें आलों. कमलनयना, गोकुलांतील तुझें वास्तव्य आणि तेथें व मथुरेमध्यें तूं दुरात्म्या कंसाचा व इतर दानवांचा केलेला वध, इत्यादि सर्व हकीकती मला विदित आहेत. वरानना पुरुषोत्तमा, तुझा व बलरामाचा जरासंधाशीं विरोध चालला आहे, हें जाणूनच मी येथें आलों आहें. कृष्णा, तूं जगताचा अव्यय प्रभु व पालक आहेस हें मी ओळखतों. देवांचा कार्यार्थ सिद्धीस जावा एवढ्याच करितां तूं वस्तुतः बाल नसूनही बालत्व स्वीकारिलें आहेस. तिन्ही लोकांत तुला माहीत नाहीं अशी एकही गोष्ट नाहीं. तथापि भक्तीनें मी जें कांहीं तुला सांगतों तें ऐकून घे. गोविंदा, पुरातन कालीं तुझ्याच पूर्वजांनीं हें करवीरपुर व त्या भोंवतालचें राष्ट्र वसविलें. महाविख्यात वसुदेवपुत्रा कृष्णा, या पुरीचा शृगाल-नामक राजा आहे. तो नेहमीं फार रागांत असतो. त्याला दुसऱ्या वीरांचा उत्कर्ष सहन होत नाहीं. हे गोविंदा, तुझ्या कुलांत उत्पन्न झालेल्या व या नगरीचें राज्य करणाऱ्या तुझ्या सर्व दायादांना त्या राजानें द्वेषामुळें मारून टाकिलें. तो अत्यंत गर्विष्ठ, मत्सरी व संयमरहित असून राज्याच्या व ऐश्वर्याच्या धुंदीनें फार चढून गेला आहे. प्रत्यक्ष पोटच्या पोरांशींही तो नैष्ठुर्यानें वागतो. म्हणून नरोत्तमा, तुह्मी या दुष्ट राजाच्या अमलांतील भयंकर करवीर नगरांत रहावें हें संमत नाहीं. आतां कोणच्या ठिकाणीं राहून तुह्मी उभयतां शत्रुत्रासकांनीं बलानें उन्मत्त झालेल्या जरासंधाशीं युद्ध करावें तें मी तुम्हांला सांगतों ऐका. आतांच्या आतां आपल्या बाहुबलानें ही पुण्यकारक वेणा नदी तरून जाऊन या देशाच्या सीमेवरील दुर्गम गिरीवर आपण निवासाकरितां जाऊं. त्या रमणीय पर्वताचें यज्ञगिरि असें नांव असून तो सह्याद्रीचीच एक दूरवर गेलेली शाखा आहे. तो मांसभक्षक व घोर कर्में करणारे चोर यांचें निवासस्थान असून त्यावर नाना प्रकारच्या वृक्षवेली उगवतात. त्या पर्वतावरील तरु पुष्पित झालेले आहेत त्यामुळें तो चित्रविचित्र दिसतो. त्या पर्वतावर आजची रात्र काढून नंतर दुसरे दिवशीं आपण खट्वांग नामक नदी ओलांडून पुढें जाऊं. ती नदी मोठ्या पर्वतापासून खालीं पडत असून निकषग्रावांनीं[१] अलंकृत झालेली आहे व तिचा धबधबाही गंगेसारखा आहे. त्या नदीच्या प्रपातापाशीं तपोवन असल्यामुळें त्या तपोवनाला अलंकारभूत असलेला तो धबधबा पाहून नंतर आपण

१ सोनें, चांदी घांसण्याचे कसोटीचे दगड हे बहुधा नदींतलेच असतात.

थोडी विश्रांति घेतल्यावर पुढल्या पर्वतावर आरोहण करूं. तेथें त्या पर्वतावर तपश्चर्या करीत बसलेल्या मानार्ह असूनही मानाची इच्छा न करणाऱ्या तपोधन विप्रांचें दर्शन केल्यावर पुढें जातां जातां शेवटीं आपल्याला रमणीय व अत्युत्तम असें क्रौंचपुर लागेल. कृष्णा, त्या नगराचा महाकपि नामक विख्यात राजा तुझ्याच कुलांतील असून सदा धर्मरत असतो. त्याची प्रजा वनचर लोकांची आहे. परंतु त्या राजालाही न भेटतां आपण पुढेंच जाऊं. सूर्यास्त होईपर्यंत आनडुह् नामक तीर्थापर्यंत मजल गांठून नंतर तेथेंच आपण सर्व मिळून विश्रांति घेऊं. तेथून मार्गस्थ झाल्यावर आपण सह्याद्रीच्या दरींतील प्रख्यात गोमंत नामक गिरीवर गमन करूं. त्या पर्वताला अनेक शिखरें असून त्यांतीलच एक फार उंच व पक्ष्यांना देखील दुर्लंघ्य असें आहे. त्या शिखराभोंवतीं नक्षत्रांचें वेष्टण असून त्या ठिकाणींच देव विश्रांति घेतात. तें शिखर ह्मणजे स्वर्गाच्या सोपानासारखें असून गगनाद्रीप्रमाणें उंच आहे. तो गोमंत गिरि प्रति मेरुच आहे. त्यावर विमानें उतरतात.

या सर्वोत्कृष्ट महाशृंगावर तुह्मी उभयतां तेजस्वी व देवरूपी भ्राते सुखानें संचार करा. ह्मणजे त्या नगाग्रावरून नक्षत्रराज चंद्र, अपारद्वीपांना भूषविणारा व ऊर्मिमंत समुद्र, आणि सूर्य यांचें उदयास्ताचे वेळीं तुम्हांला दर्शन होईल. गोमंत पर्वताच्या शिखरावर वनचरांसारखे संचार करून तुह्मी दुर्गयुद्धाच्या पद्धतीनें जरासंधाला जिंकाल. शैलाचा आश्रय करून तुह्मी निकरानें युद्ध करीत आहां असें दृष्टीस पडतांच जरासंधाचे हातपाय गळतील. शैलयुद्ध करण्याचे कामीं त्याचा निरुपाय होईल. तुह्मी निकरानें युद्ध करूं लागतांच तुम्हांला थोड्याच अवकाशांत आयुधें प्राप्त होतील, हें मला अंतर्दृष्टीनें आतांच प्रत्यक्ष दिसत आहे. कृष्णा, यादवांचा व तदितर राजांचा मोठा घनघोर संग्राम होऊन मांस व रक्त यांचा भूमीवर चिखल पडेल, असा दैवी संकेत आहे. तो संग्राम चालू असतां, चक्र, हल, कौमोदकी गदा व सौनंद मुशल हीं विष्णूचीं चार आयुधें कालासारख्या मूर्तींच्या रूपानें प्रकट होऊन कालवश झालेल्या राजे लोकांचें रुधिर प्राशन करतील. कृष्णा, तो संग्राम चक्रमुशल या नांवानें प्रख्यात राहील. परमेश्वरी संकेतानें, व त्यास अनुसरून कृतांत काळाच्या आज्ञेनें, तो घडून येत असल्यामुळें 'कालाचा आदेश' असेंही नांव त्या संग्रामाला प्राप्त होईल. त्या वेळीं, हे सुरजनका कृष्णा, संग्रामामध्यें तुझें विष्णुरूप उत्तम प्रकारें व्यक्त होऊन सर्व देवांच्या व रिपूंच्या दृष्टीस पडेल. ( तूं त्यांना विष्णुरूप दिसशील. ) कृष्णा, ती गदा व बरेच दिवसपर्यंत जरूर न लागल्यामुळें मागें पडलेलें चक्र हीं आयुधें व स्वतःचें विष्णुरूप, देवांच्या जयप्राप्तीकरितां तूं धारण कर. त्याचप्रमाणें हा लोकस्रष्टा बलराम, भयंकर हल व रिपूंचें दमन करणारें मुशल, हीं आयुधें देवांच्या शत्रूंचा निःपात करण्याकरितां आपल्या हातांत धारण करो. वासुदेवा, पृथिवीचा भार हलका करण्यासाठीं या लोकीं राजांबरोबर तुझा हा पहिला संग्राम होईल असें देवांच्या बोलण्यांत आलें होतें. याच वेळीं, आयुधें, विष्णुरूप, लक्ष्मी व तेज यांची तुला प्राप्ति होऊन तूं शत्रूंच्या सैन्यांचा धुव्वा उडवशील. गोविंदा, 'भारतीय—युद्ध' म्हणून शस्त्रांच्या योगानें झालेल्या ज्या भयंकर संहाराला भूमीवर नांव मिळणार आहे त्याचा या संग्रामापासूनच ओनामा व्हावयाचा आहे. केशवा, म्हणून तूं आतां उत्तम व श्रेष्ठ अशा गोमंत

नामक पर्वताच्या अनुरोधानें जा. जरासंधाशीं होणाऱ्या युद्धांत विजयश्री तुलाच माळ घालील. होमधेनूचें हें अमृतासारखें दुग्ध प्राशन करून तुह्मी मार्गस्थ व्हा. ( चला ) तुमचें कल्याण असो !

## अध्याय चाळिसावा.

—:०:—

### गोमंतवर्णन.

वैशंपायन सांगतातः—परशुरामाच्या (आज्ञे-प्रमाणें ) त्या धेनूचें दुग्ध प्राशन केल्यानें ते यदुपुंगव सामर्थ्य व दर्प यांनीं युक्त झाले. नंतर ते वक्तृश्रेष्ठ दोघे यादव भार्गवरामासहवर्तमान गोमंत पर्वताचें दर्शन घेण्याकरितां जामदग्नीनें पूर्वीं वर्णिलेल्या मार्गानें तेथून निघाले. त्यांची गति मत्त हत्तीसारखी होती. देवांमुळें स्वर्ग ज्याप्रमाणें शोभिवंत दिसतो त्याप्रमाणें, तीन अग्नींसारखे असलेल्या त्या तिघांच्या ( जामदग्नि, बलराम व कृष्ण ) संचारानें तो मार्ग अत्यंत शोभिवंत दिसूं लागला. मानवी गतीनें चालतां चालतां अखेर देव जसे मंदराचलापाशीं जाऊन पोंचतात, तसे ते सायंकालीं गोमंत पर्वतासमीप येऊन पोंचले. त्या पर्वतावर नानाप्रकारचे वृक्ष असून लतावेलींनीं तो सुंदर व चित्रविचित्र दिसत होता. अनेक अगुरू वृक्षांनीं त्याचा पृष्ठभाग झांकून गेला असून मनोहर मयूरांच्या संचारानें तो नानावर्णांनीं युक्त झालासा दिसत होता. भ्रमरांच्या समुदायांनीं तो ( पूर्णपणें ) व्यापला होता. त्यावरील वृक्ष दगडींच्या अडचणींत उगवले होते. मेघ दृष्टीस पडतांच त्यावरील मयूरांनीं मत्त होऊन टाहो फोडण्यास सुरुवात केली होती, त्या कारणानें तो दुमदुमून गेला होता. त्याचीं शिखरें आकाशाला जाऊन भिडलीं असून वृक्ष इतके उंच होते कीं, त्यांचे शेंडे मेघमंडलाला चिकटले होते. मदोन्मत्त हत्तींनीं आपले अणकुचीदार दांत दगडांवर घांसल्याकारणानें त्याचे ओरखाडे तेथील शिलांवर दृग्गोचर होत होते. पक्षिसमुदायांच्या किलबिलाटानें तो प्रतिनादित झाला होता. त्यांतही आणखी दरींतून खालीं पडणाऱ्या जलप्रवाहांचे ध्वनि उमटत होते. गवत व वृक्षपल्लव यांच्या योगानें त्याचा पृष्ठभाग अगदीं झांकून गेला होता. त्यांतच नील मण्यांच्या राशी असल्यानें तो आकाशाप्रमाणें बहुवर्ण झाला होता. त्या पर्वताचे अंगभर धातूंचे रस जिकडे तिकडे माखलेले होते. अनेक शिखरें व वरून वाहणारे झरे यांनीं तो भूषित झाला होता. देवांच्या मनोहर समुदायांच्या संचारानें तो भरून गेला होता. मैनाकाप्रमाणें तो इच्छेस येईल तिकडे गमन करण्यास समर्थ असून त्याच्याचसारखा उंच होता. त्याचीं शिखरें विशाल असून पायथ्याच्या चारी बाजूंनीं जलौघांचा वेढा पडला होता. काननें, दऱ्या व शिखरें यांनीं तो युक्त असून श्वेतवर्ण मेघपटलांनीं त्याला फार शोभा आली होती. पनस, आम्रातक, आम्र, वेत्र, कांचन व चंदन इत्यादि वृक्षांनीं तो व्यापलेला असून त्यावर तमाल व ऐला या वृक्षांचीं व मिऱ्याच्या वेलींचीं बनें लागून गेलीं होतीं. पिंपळीच्या वेलींमुळें तो मलिन ( काळसर ) दिसत होता व इंगुदि वृक्षांमुळें त्याला वैचित्र्य आलें होतें. जिकडे तिकडे राळेचे वृक्ष ( देवदार ) लागून गेले होते. उंच उंच सुरूच्या बनांनीं व नानाप्रकारच्या चित्रवनांनीं त्या पर्वताचा पृष्ठभाग झांकून टाकला होता. सर्ज, निंब, अर्जुन, पाटलीचीं बेटें, हिंताल, तमाल व पुन्नाग इत्यादि विविध वृक्षांनीं त्याला मोठी शोभा आणिली होती. जलौघांत जलज कमलें व भूमिभागांवर स्थलज कमलें

दाट उगवलीं होती. वृक्षांचे असंख्य समुदाय हेंच त्या पर्वताचें भूषण होतें. जंबू, जंबूल, कद्रु, कंदल, चंपक, अशोक, बकुल, बिल्व व तिंदुक इत्यादि सुंदर सुंदर वृक्षांचें त्या पर्वतावर वैपुल्य असून कुंज व नागपुष्प यांनीं तो सर्व बाजूंनीं फार शोभिवंत दिसत होता. हत्ती व हरिण यांचे त्यावर मोठाले कळप असून त्यामुळें त्या पर्वताच्या सौंदर्यांत अधिकच भर पडलेली होती. सिद्ध, चारण, राक्षस, गंधर्व व गुह्यक यांनीं त्या पक्षियुक्त पर्वताच्या गुहा व्यापून टाकल्या होत्या. तेथील शिलातलांवर प्रायः विद्याधरांचे थवे बसलेले असत. सिंह व व्याघ्र यांच्या आरोळ्यांनीं नेहमीं तो पर्वत दुमदुमून जाई. त्यावरून एकसारख्या जलधारा वहात असल्यानें चंद्रकिरणांनीं तो फार शोभिवंत दिसे. देव व गंधर्व हे त्या पर्वताचें नेहमीं वर्णन करीत. त्यावर सुंदर अप्सरा देखील राहिल्या होत्या. दिव्य वनस्पतींचीं लहान-मोठीं फुलें त्यावर गळून पडलीं होतीं. या पर्वताला इंद्राच्या वज्राचा प्रहार कसा तो माहित नव्हता. वणवा किंवा झंझावात यां-पासूनही त्याला भय नव्हतें. प्रपातांपासून निघा-लेल्या नद्यांची शोभा अपूर्व होती. ( वन ) श्रीला खुलावट आणणारीं, आननाच्या आका-राचीं काननें, जल व शेवाल, यांच्या योगानें त्या पर्वताचीं शिखरें सौंदर्यानें ओथंबलेलीं दिसत होतीं. पुष्कळ सुंदर ठिकाणीं हरिण स्थित झाले होते. बाजूच्या शिला या मेघां-प्रमाणें मनोहर दिसत होत्या. तरुण स्त्रियांनीं परिवेष्टित असल्यानें पति जसा सुंदर दिसतो त्याप्रमाणें सुंदर दऱ्या, गुहा व ज्यांतील भूमि वृक्षाच्छादित झाली आहे अशा पुष्पयुक्त वनराजी, यांच्या योगानें तो पर्वत शोभिवंत दिसत होता. कांहीं ठिकाणीं तो स्त्रीसहित असलेल्या पुरुषाप्रमाणें सुंदर दिसत होता. त्याच्या शिखरांवर औषधी चमकत होत्या. कित्येक वानप्रस्थाश्रमी लोक तेथें येऊन राहिले होते. सारांश, तो सुवर्णाच्या कृत्रिम काननां-प्रमाणें रमणीय दिसत होता. त्याचा पायथा विशाल असून शिखर उंच होतें, त्यामुळें पृथ्वी व अंतरिक्ष या दोहोंमध्यें बुडी मारून तो पर्वत बसला आहे कीं काय असें वाटे.

असो; अशा त्या रमणीय व पर्वतांतील अग्रगण्य गोमंताचलापाशीं येऊन पोंचल्यानंतर त्या देवतुल्य तिघांस तें स्थान वास्तव्य कर-ण्यास फार पसंत वाटलें. गरुडासारखे ते पराक्रमी असल्यामुळें पक्षी ज्याप्रमाणें आका-शांत उड्डाण करतात त्याप्रमाणें, पर्वताला स्पर्श न करितां, वेगानें त्यांनीं त्या गिरिश्रे-ष्ठावर आरोहण केलें. देवांप्रमाणें पर्वताच्या उत्तर शिखरावर चढून गेल्यावर त्या ठिकाणीं त्यांनीं मनानें निर्माण करावें इतक्या थोड्या अवधींत एक गृह तयार केलें.

मग रामकृष्ण त्या ठिकाणीं सुखानें स्थित झाले आहेत, असें पाहून महामति जामदग्न्य परशुरामानें योग्य व स्पष्ट भाषण करण्याचा उपक्रम केला. तो ह्मणाला "बा सर्वशक्तिमान् कृष्णा, मी आतां शूर्पारक नगराला परत जातों. संग्रामामध्यें देव जरी लढावयास आले तरी तुमचा पराजय केव्हांही व्हावयाचा नाहीं. गोविंदा, तुह्मी माझ्या मागून ( शूर्पारकपुरा-पासून गोमंतचलापर्यंत ) आलां, त्यामुळें माझ्या मनाला जो संतोष झाला आहे त्या योगानें या माझे जुनाट शरीराला देखील फायदा झाला आहे. ज्या ठिकाणीं तुह्मांला आयुधप्राप्ति होईल असा पर[1]लोकांत ठरलेला देवांचा संकेत आहे, तेंच हें ठिकाण मीं तुम्हांस दाखवून दिलें

१ येथें ' समयः सांपरायिकः ' याचा ' युद्धासंबंधीं संकेत' असा अर्थ करण्यास हरकत दिसत नाहीं. पण नीलकंठानें पारलौकिक असा केला आहे.

आहे. हे देवाधिदेवा वैकुंठवासी कृष्णा, तुझी देव देखील स्तुति करतात. गोविंदा, सर्व लोकांसाठीं मीं सांगतों त्या तात्विक वचनाप्रमाणें वाग. कृष्णा, मनुष्यांच्या हितासाठीं जगामध्यें मनुष्यावतार धारण करून भूभार हरण करण्याचें जें तूं प्रस्तुत अलौकिक सत्कृत्य आरंभिलें आहेस, त्याचा हा सांप्रत प्राप्त झालेला जरासंधाबरोबरचा सामना मुख्य भाग होय व तो कालाच्या ओघानेंच प्राप्त झाला आहे. केशवा, म्हणून त्या वेळीं तूं आयुधसामग्री व रणकर्कश स्वरूप स्वसामर्थ्यानेंच धारण कर. एका हातांत चक्र व दुसऱ्या हातांत गदा अशीं [ दिव्य ] आयुधें सरसावून तूं युद्धाचे ठिकाणीं उभा राहिलास म्हणजे तुझें पुष्ट अशा अष्टभुजांनीं युक्त असलेलें स्वरूप पाहून [ प्रत्यक्ष ] इंद्र देखील भिऊन जाईल. हे मानदा, तूं अस्त्रें धारण केलींस म्हणजे आजपासून पृथ्वीवरील राजांची स्वर्ग लोकची यात्रा सुरू झाली असें समजण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. हे वक्तृश्रेष्ठा, आजानुबाहु गोविंदा, आतां विलंब न करतां तूं रथावर स्थित होण्याकरितां गरुडाला हांक मार. स्वर्गवासी होण्यास उद्युक्त झालेले रणवीर व युद्धोत्सुक राजे दुर्योधनाच्या अधीन होऊन बसले आहेत. पृथ्वीपति राजे आतां मरून जाणार हें लक्ष्यांत येऊन चुकल्यामुळें वैधव्यावस्थेंतील वेष अगोदरच धारण करून ही एकवेणीधरा पृथ्वी [ केशसंस्कार न करितां ] तुझी वाट पहात [ बसली ] आहे. हे अरिमर्दना गोविंदा, तूं मनुष्यरूपानें अवतरून युद्धास ठाकलास म्हणजे [ क्रूर ] ग्रह व नक्षत्र यांनीं ग्रासलेले राजे पराङ्मुख न होतां आनंदानें मृत्यूला कवटाळतील. म्हणून हे कृष्णा, दानवांचा निःपात करण्याकरितां, नरेंद्रांना स्वर्गलोक दाखविण्याकरितां व देवांना सुखाची जोड करून देण्याकरितां, अविलंबेंकरून तूं युद्धास सिद्ध हो. नारायणा, तूं विश्वात्मा असून तूंच ज्या अर्थी माझा सत्कार करीत आहेस त्यापेक्षां तुझ्या सत्कारांतच चराचरांसह सर्व त्रैलोक्याकडून माझा सत्कार झाला असें मी समजतों. महाबाहो, तुझ्या कार्यसिद्धीसाठीं मी यत्न करतों. राजांबरोबर तुझें कांतारामध्यें युद्ध होईल तेव्हां नेहमीं माझें स्मरण कर. ”

सदाचारी कृष्णाला उद्देशून याप्रमाणें भाषण केल्यावर जामदग्न्यानें त्याला जयप्राप्तीसाठीं आशीर्वाद दिले. आणि नंतर तो अभीप्सित दिशेनें निघून गेला.

---

# अध्याय एकेचाळिसावा.

—:०:—

## बलरामाचें सुरापान, जरासंधाचें गोमंताचलाकडे आगमन.

वैशंपायन सांगतातः—जमदग्नीचा पुत्र परशुराम तेथून निघून गेल्यावर उभयतां यदुकुलदीपक इच्छेस येईल तीं रूपें घेऊन गोमंताचलाच्या रमणीय शिखरावर ( निर्भयपणें ) वावरूं लागले. त्यांच्या वक्षःस्थलांवर वनमाला लोंबत होत्या. उभयतांच्या शरीराचा वर्ण नील ( राम ) व श्वेत ( कृष्ण ) असून ते आकाशस्थ मेघांसारखे दिसत होते. त्यांनीं नील व पीत वस्त्रें परिधान केलीं होतीं. पर्वतावरील धातूंच्या रसानें त्यांनीं आपलीं शरीरें माखलीं होतीं. अशा प्रकारें शिखरावर वास्तव्य करून ते क्रीडेच्छु तरुण वीर पर्वतावरील रमणीय वनांमध्यें हिंडत असतां नक्षत्रराज चंद्राचा उदय व इतर ग्रहांचे अस्तोदय त्या गोमंताचलावरून ते निरीक्षण करीत असत.

एके समयीं नगतुल्य पराक्रमी व श्रीमान् संकर्षण कृष्णाला बरोबर घेतल्यावांचून एकटाच

त्या शिखरावर हिंडत असतां, फुललेल्या कदंब वृक्षाच्या सुंदर छायेखालीं स्थित झाला. तेथें बसला असतां मंद सुगंध वायूची सुखदायक झुळुक मधून मधून त्याचे शरीरावरून जात होती. वायूचा याप्रमाणें तो आस्वाद घेत बसला असतां, मद्याच्या गंधानें युक्त झालेली वायूची झुळुक त्याचे शरीराला स्पर्श करून घ्राणेंद्रियापर्यंत आली. त्याबरोबर मद्याचा वास येऊन वारुणीपानाची त्याला त्वरित उत्कट इच्छा उत्पन्न झाली. आदल्या दिवशीं जो मद्य पिऊन मत्त झालेला असतो त्याचे तोंडाला जशी दुसरे दिवशीं कोरड पडते, तसें बलरामाला झालें व त्या विभूला पूर्वीं अमृतप्राशन केल्याचें स्मरण झालें. मग मदिरापानाच्या इच्छेनें ग्रासलेल्या त्या बलरामानें ती मदिरा मिळण्याच्या बुद्धीनें कदंबवृक्षाकडे दृष्टि फेंकली. पावसाळ्यांत त्या वृक्षाला फुलांचा बहार आला असतां, त्याच्या ढोलींत मेघांचें जें जल सांठलें होतें ( त्याचा गळून पडलेल्या पुष्पांशीं संयोग होऊन ) त्याचें सुंदर मद्य बनून राहिलें होतें. मदिरातृष्णेनें पछाडल्यामुळें आर्त झाल्याप्रमाणें पुनः पुनः त्यानें तें मद्य प्राशन केलें आणि त्यामुळें धुंदी येऊन त्याच्या चर्येंत अंतर पडलें. उन्मत्त झाल्याकारणानें त्याचे नेत्र किंचित् घुमारूं लागले व मुख शरत्कालीन इंदूसारखें फिरूं लागलें. कदंबवृक्षाच्या ढोलींत उत्पन्न झाल्यामुळें त्या मूर्तिमती वारुणीला कादंबरी हें नांव पडलें. हीच वारुणी देवांच्या अमृताची जननी होय. याप्रकारें कृष्णाचा ज्येष्ठ भ्राता कादंबरी पिऊन धुंद झाल्यामुळें अस्पष्ट पण मधुर वाणी बोलूं लागला. ती कानीं पडतांच, मूर्तिमती मदिरा, चंद्राची प्रिया कांति, व सर्वांत श्रेष्ठ असलेली कमलध्वजा देवी श्री, अशा तिघी प्रियभाषिणी देवस्त्रिया येऊन उभ्या राहिल्या. त्यांतील देवी वारुणी बलरामापुढें हात जोडून उभी राहिली आणि मदिरेच्या मदानें धुंद झालेल्या त्याला उद्देशून हितवचन बोलली.

ती म्हणाली:—" हे दिवीश्वरा बलदेवा, दैत्यांच्या सैन्याचा तूं आतां निःपात करण्यास समर्थ आहेस. ही मी तुझी सुंदर दयिता वारुणी तुझ्यापुढें उभी आहें. हे विमलानना, पातालामध्यें शेषरूपानें[1] तूं यावच्चंद्रदिवाकरौ गुप्त होऊन राहिला आहेस, असें समजून क्षीणपुण्य स्त्रीप्रमाणें मी पृथ्वीच्या पाठीवर भटकत आहें. कांहीं कालपर्यंत फुलांमध्यें असणाऱ्या केसरांचे ठिकाणीं व हस्तस्पर्श न झालेल्या पुष्पगुच्छयुक्त अतिमुक्तलतांमध्यें मीं वास्तव्य केलें. परंतु सुख मला फार प्रिय असल्याकारणानें अखेर मी आपलें स्वरूप अंतर्हित करून पावसाळ्याचे आरंभीं तुझी चातकासारखी मार्गप्रतीक्षा करीत या कदंबवृक्षावर लीन होऊन राहिलें. अनघा, अमृतमंथनसमयीं माझा पिता जो वरुण त्यानें मला जशी तुजकडे पाठविली होती, त्याप्रमाणें सर्वांग—संपत्तीनें युक्त करून पुनरपि आज पाठविली आहे. क्षीरसागरांत असतांना जशी तुझ्या उपभोगाची मी इच्छा करीत होतें तद्वत् पातालांतही तुझाच समागम व्हावा अशी माझी इच्छा आहे. तूंच स्वामी मला संमत आहेस. निष्पाप अनंता, तूं जरी आतां माझा त्याग केलास, तरी मी तुला सोडणार नाहीं. देवा, तुझ्यावांचून इतर कोणाचाही आश्रय करण्याची माझी इच्छा नाहीं. " वारुणीच्या नंतर आदिपद्म व पद्मांकयुक्त दिव्य कर्णभूषण आणि समुद्रांतून गमन करण्यास देखील योग्य असलेलीं नीलवर्ण रेशमी वस्त्रें, हीं परि-

१ वाजपेय, सौत्रामणि इत्यादि यज्ञांमध्यें हिच्या आस्वादानें स्वर्गांत अमृतपानाची प्राप्ति होते, म्हणून ही अमृताची जननी होय असें म्हटलें आहे.

१ बलराम हा शेषाचा अवतार म्हणून.

धान केलेली कांति बलरामासमीप आली. मदानें तिच्या श्रोणी किंचित् नम्र होऊन हालत होत्या व तिचे नेत्र तारवटले होते. नंतर त्या कांतीनें प्रेमपूर्वक हात जोडून प्रथम रामाचा जयजयकार करून हंसत हंसत पुढील अर्थपूर्ण उद्गार काढले. "रामा, मदिरेप्रमाणें मीही तुजवर स्वगुणांसह अनुरक्त झालें आहें. खरोखर तूं सहस्रशीर्ष प्रभु चंद्रापेक्षांही श्रेष्ठ आहेस."

नंतर, नेहमीं श्रीविष्णूच्या वक्षःस्थलाला अलंकृत करणारी पद्मालया देवी श्री, रौहिणेयाच्या वक्षःस्थलावर शुभ पुष्पमालेप्रमाणें विराजमान झाली. बलरामाच्या उरःस्थलीं स्थित झालेली ती कमलहस्ता व कमलमुखी हातांत एक निर्मळ माळ घेऊन त्या संकर्षणाला ह्मणाली. "देवाधिदेवा रामा, वारुणीच्या योगानें अलंकृत झालेला व मी आणि कांति यांच्याशीं युक्त झालेला तूं चंद्रासारखा स्त्रियांना फार मनोहर दिसतोस. तुझ्या सहस्र मस्तकांवर जो सूर्याप्रमाणें शोभे, तो हा तुझा मुकुट मी वरुणलोकाहून तुझेसाठीं आणला आहे. देवा, हें वज्रभूषित व कनकमय एकच कुंडल, आदिपद्म, पद्माक्ष नामक दिव्य कर्णभूषण, समुद्र तरण्यास योग्य अशीं हीं निळीं रेशमी वस्त्रें आणि समुद्राच्या पोटांतून काढलेल्या ठसठशीत व ढाळदार मोत्यांचा हा हार, हीं तुझीं जुनीं भूषणें मीं मोठ्या आदरानें बरोबर आणिलीं आहेत, त्यांचा स्वीकार कर. महाबाहो, भूषणें घालून आपलें शरीर अलंकृत करण्याचा आतां समय आलेला आहे."

या विनंतीस अनुसरून अलंकारांसह त्या तिघी देवस्त्रियांचा बलरामानें स्वीकार करतांच तो शारदीय चंद्रासारखा तेजःपुंज दिसूं लागला. नंतर सजल मेघाच्या कांतीनें युक्त असलेला कृष्ण तेथें आला. त्या वेळीं राहूचे तावडींतून सुटलेल्या शशीप्रमाणें, रामाला फारच आनंद झाला. ते दोघे घरांत असल्याप्रमाणें तेथें परस्परांशीं संभाषण करीत बसले आहेत, इतक्यांत गरुड मोठ्या त्वरेनें त्याच रस्त्यानें चालला होता. त्या देवांच्या जयेच्छु व तेजस्वी गरुडानें दिव्यमाला धारण केली असून उटी लाविलेली होती. दैत्यांनीं केलेल्या शस्त्रप्रहाराचें चिन्ह त्याचे अंगावर दिसत होतें त्यावरून तो नुकताच कोठें तरी संग्राम करून परत चालला होता असें दिसत होतें. (व तेंच खरें होतें. कारण,) क्षीरसागराचे ठिकाणीं आपल्या दिव्य शयनावर श्रीविष्णु निद्रिस्त असतां, वैरोचन (विरोचनाचा पुत्र) दैत्यानें त्याचा किरीट चोरून नेला. तो किरीट परत मिळविण्यासाठीं भरसमुद्रामध्यें दैत्यसमुदायांशीं मोठ्या शौर्यानें गरुडानें युद्ध केलें. शेवटीं श्रीविष्णूचा किरीट त्यांचेपासून परत मिळवून पाक्षिश्रेष्ठ गरुड देवांचें गृह जें अंतरिक्ष त्यांतून वेगानें विष्णुलोकीं चालला होता. तों आपला स्वामी विष्णु दुसऱ्या कांहीं कार्यासाठीं गोमंतपर्वतावर आलेला आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या वेळीं त्याच्या स्कंधावर श्रीविष्णूचा किरीट झळकतच होता. शैलराज गोमंतपर्वताच्या शिखरावर विष्णु किरीटाशिवाय व ज्याच्या योगानें तो देवसा ओळखतां येईल असें कांहीं न करितां मनुष्यरूपानें बसला आहे, असें पाहून पाक्षिश्रेष्ठ गरुडानें त्याचा भाव ओळखिला आणि मोठ्या आनंदानें त्यानें विष्णूच्या मस्तकावर आपल्याजवळचा किरीट अंतरिक्षांतून खालीं टाकला. तो किरीट उपेंद्राच्या बरोबर

---

१ येथें छापील पाठ ग्रहयुक्तः 'शशी' असा आहे व कृष्णाचा रामाशीं एथें संयोग असल्यानें ग्राह्यसा वाटतो. तथापि कोणालाहि प्रिय संगमापेक्षा बंधमुक्ततेचा आनंद अधिक असतो, ह्मणून लेखी पोथींतील 'ग्रहमुक्तः' हाच पाठ येथें घेतला आहे.

मस्तकावर बसला. मेरुशिखरावर माध्यान्ह समयीं सूर्य जसा शोभिवंत दिसतो त्याप्रमाणें किरीटयुक्त कृष्ण दिसूं लागला.

किरीट येथें चालत आला हा गरुडाचा पराक्रम असला पाहिजे हें ओळखून कृष्णाचें मुख प्रफुल्ल झालें व तो रामाला ह्मणाला. " आपण या ठिकाणीं जी संग्रामाची तयारी केली आहे, (त्यांत मुकुटाची आपोआप भर पडली यावरून ) देवांच्या कार्यसिद्धीचा समय समीप आला आहे यांत संशय नाहीं. मीं क्षीरसागरामध्यें निजलों असतां, इंद्रासारखें दिव्य रूप घेऊन, वैरोचनानें ग्राहरूपानें क्षीरोदधींतून हा माझा किरीट चोरून नेला होता, तो माझा शेषशयनावरून नाहींसा झालेला किरीट गरुडानें परत आणून माझ्या मस्तकावर घातला.

राजा जरासंधही समीप आला आहे असें स्पष्ट वाटतें. कारण, वायुगतीनें चालणाऱ्या रथांचीं ध्वजाग्रें दिसूं लागलीं आहेत. हीं पहा, विजिगीषु राजांचीं चंद्रासारखीं शुभ्र छत्रें व चिलखतें घालून सज्ज झालेलीं सैन्यें झळकूं लागलीं आहेत. ओहो ! या पहा, आकाशांतील हंसपंक्तींप्रमाणें राजांच्या रथांवरील विमल व शुभ्र छत्रपंक्ति आपणांकडे येत आहेत. तसेंच, ही जरासंधाचे योध्यांच्या झगझगीत शस्त्रांचे तेजाची प्रभा आकाशासारखी निर्मल दिसते आहे व ती निर्मल प्रभा सूर्यप्रभेशीं मिश्रित होऊन दाही दिशा पसरली आहे असें वाटतें ! पण खरोखर, आतां होणाऱ्या संग्रामामध्यें राजे लोकांनीं आपलीं शस्त्रें मजवर फेंकिलीं म्हणजे ( मला कांहीं न होतां ) त्या सर्व शस्त्रांचा मात्र नाश होईल. हा जरासंध राजा अगदीं वेळेवर या ठिकाणीं संग्राम देण्यासाठीं आला आहे. याच्याशीं होणाऱ्या युद्धानें आमची कसोटी व्हावयाची आहे. खरोखर, हा आमचा समरांगणावरील पहिला अतिथि होय. दादा, आपण एकमेकांना सोडूं नये. तसेंच जरासंध येथें येईतों युद्धालाही आरंभ करूं नये. ( तसें करण्यापूर्वीं ) त्याचें सैन्यबल किती आहे याचाही पण विचार केला पाहिजे. "

इतकें बोलून कृष्ण संग्रामाची वाट पहात स्वस्थ बसला. परंतु त्या अवकाशांत जरासंधाचा वध करण्याचे इच्छेनें त्याच्या सैन्याकडे नजर फेंकून त्यानें त्याच्या बलाचा अजमास केला. अव्यय यदुवर श्रीकृष्ण जरासंधाबरोबर आलेल्या राजांकडे पहात असतां, स्वगीत पूर्वीं ठरलें होतें, त्याचाच त्यानें पुनः आपल्या मनाशीं उच्चार केला. तो असाः " सुकृत संपल्यामुळें, पूर्वकर्मानुसार ज्यांचा आतां विनाश होणार आहे, तेच हे राज्याधिकार भोगीत असलेले राजे होत. मला वाटतें या नृपश्रेष्ठांना मृत्यूनें ( यज्ञीय पशूंप्रमाणें ) येथवर खेंचीत आणलें आहे. यांचीं शरीरें लौकरच स्वर्गाप्रत जाणार अशीं चिन्हें यांचे देहांवर स्पष्ट दिसत आहेत. या नृपसिंहांच्या सेनासमूहानें पीडित झालेली वसुंधरा भार सहन न होऊन स्वर्गलोकीं ( गाऱ्हाणें सांगण्याकरितां ) गेली, तें खरोखर तिनें योग्यच केलें. थोड्याच अवकाशांत असंख्य नरेंद्रांनीं हें अंतरिक्ष भरून जाऊन पृथ्वी ( यांच्या भारापासून ) मोकळी होईल.

## अध्याय बेचाळिसावा.

—:०:—

### गोमंतदाह.

वैशंपायन सांगतातः—इतकें झाल्यानंतर महातेजस्वी राजाधिराज जरासंध व सेनाबलानें युक्त असलेले त्याचे अनुयायी राजे हे गोमंत पर्वतासमीप येऊन थडकले. बलवान् व धृतव्रत

जरासंध राजा चालत्या मेघांप्रमाणेंच जणूं काय दिसणारें चतुरंग दळ बरोबर घेऊन तेथें आला होता. संग्रामासाठीं तयार ठेवलेल्या त्याच्या रथांना अश्वशास्त्रविदांनीं शिकवून निपुण केलेले उंच व रुंद पाठीचे घोडे जुंपले असून त्यांची गति अप्रतिहत होती. सुवर्ण-शृंखला व मोठाल्या घंटा यांनीं अलंकृत केलेले त्याचे हत्ती मेघतुल्य असून त्यांचेवर कुशल महात आरूढ झाले होते. त्यांनाही उत्तम शिक्षण दिलें असल्यामुळें युद्धासाठीं ते अगदीं धडपडत होते. त्याचे बरोबरचे घोडे वायू-सारखे शीघ्रगामी असून पक्ष्यांप्रमाणें उड्डाण मारीत आहेत कीं काय असें वाटे. ते घोडे सारखे खिंकाळत असून उडचा मारीत होते व त्यांच्यावर तरबेज स्वार आरूढ झाले होते. त्याचे असंख्य पदाति हातांत खड्ग व ढाल घेऊन अंगच्या सामर्थ्याच्या जोरानें पक्ष्यां-प्रमाणें आपल्या सिंहनादानें आकाश दणाणून टाकीत होते. त्यांची एकंदर तयारी पाहून हे नुकतीच कांत टाकलेले उडणारे सर्पच आहेत असा भास होई. रथचक्रांच्या खडखडाटानें, हत्तींच्या मदघोषानें, घोडचांच्या खिंकाळण्यानें व पदातींच्या भयंकर सिंहनादानें दाही दिशा व गुहा दणाणून टाकीत राजा जरासंध आपल्या सागरोपम सैन्यासह गोमंताकडे येत आहे असें दृष्टीस पडलें. त्या राजेलोकांच्या सैन्यांतील योद्ध्यांना अत्यानंद झाला होता त्यामुळें ते दंड थोपटून एकसारखा सिंहनाद करीत होते. त्या कारणानें जरासंधाचें सैन्य मेघसैन्यासारखें भासत होतें. तसेंच, त्या सैन्यांत पवनगतीनें चालणारे रथ, मेघतुल्य प्रचंड हत्ती, शुभ्र मेघांसारखे घोडे व त्वेषानें चिड-लेले पदाति इत्यादिकांची एकच गर्दी असल्या-मुळें तें हस्त्य(श्व)रथपदातियुक्त ( चतुरंग ) दळ ग्रीष्मऋतूचे शेवटीं मेघसमूह सागरा-समीप जमूं लागतात त्यासारखें दिसूं लागलें. जरासंधाचे आधिपत्याखालीं सर्व राजांनीं आपा-पल्या सैन्यासह पर्वताला वेढा घालून छावणी ठोकण्याचा उपक्रम केला. पृथक् पृथक् शिबिरें करून राहिलेल्या त्या सैन्याची शोभा पौर्णि-मेच्या दिवशीं पूर्ण भरती आलेल्या महासागरा-सारखी दिसत होती.

रात्र सरतांच प्रस्थानसमयींचा मंगल-विधि आटोपून युद्धासाठीं हपापलेले ते सर्व राजे पर्वतावर आरोहण करण्याकरितां, एके ठिकाणीं जमले. पर्वताच्या पायथ्याशीं सर्व राजे एकत्र जुळल्यानंतर कोणत्या वेळीं युद्धास प्रारंभ करावा याविषयीं त्यांनीं कौतुकानें विचार सुरू केला. प्रलयकालीं तुफान होणाऱ्या सागरांचा जसा (प्रचंड) आवाज होत असतो, त्याप्रमाणें त्या राजसभेंत एकच गोंगाट सुरू झाला. कंचुक व उष्णीष परिधान केलेले वृद्ध छडीदार " बोलूं नका " अशी द्वाही राजा-ज्ञेनें फिरवूं लागले. त्यांच्या प्रयत्नानें निःशब्द व स्तिमित झालेल्या सैन्याचें स्वरूप आंतील मीन व भुजंग लीन (निद्रिस्त) झाले असल्यानें शांत दिसणाऱ्या समुद्राप्रमाणें दिसूं लागलें. याप्रमाणें जादूनें भारल्यासारखा तो सेनासागर शांत व निश्चल होतांच, जरासंधानें बृहस्पती-प्रमाणें आपलें भारदस्त भाषण सुरू केलें.

" लोकहो, हीं राजांचीं सैन्यें विलंब न करितां पुढें चालवून या पर्वताला आपल्या असंख्य सेनेचा चौफेर गराडा द्या. अश्म-यंत्रें ( गोफणगुंडे ) व फेंकावयाचे मुद्गर सज्ज करा. प्रास व तोमर हीं आयुधें वर वाहून न्या. आपलीं शस्त्रें वर फेंकलीं म्हणजे तशींच खालीं पडूं नयेत, म्हणून शिल्पि लोकांकडून लहान मोठीं साधनें त्वरित तयार करून घ्या. सर्व शूर व प्रमत्त योद्ध्यांनीं राजा शिशुपाल जसें सांगेल तसें अविलंबेंकरून चालावें.

टांक्या व कुदळी यांनीं हा नगश्रेष्ठ फोडून काढा. दुर्गयुद्धामध्यें जे राजे कुशल आहेत त्यांनीं एकमेकांना सोडूं नये. ( जवळच रहावें. ) आजपासून या पर्वताला सैन्याचा वेढा देऊन उभयतां वसुदेवपुत्रांचा आपण निःपात करीतोंपर्यंत हें वेढ्याचें काम असेंच चालवावयाचें आहे. शिलांपासून निर्माण झालेल्या पर्वतावर अशा निकरानें हल्ला चढवा कीं, यावरील पक्षी देखील जागच्या जागीं बसावेत. आकाशामध्यें सुद्धां असंख्य बाणांचा वर्षाव करून चिट् पाखरालाही बाहेर पडतां येणार नाहीं अशी शरांची दाटी करून सोडा. मी आज्ञा करीन त्याप्रमाणें राजांनीं पर्वताच्या पायथ्याशीं जागजागीं राहून संधि सांपडेल तसतसा, विलंब न करतां, वर चढण्याचा मार्ग आक्रमण करावा.

मद्र, कलिंगाधिपति, चेकितान, बाल्हिक, काश्मीरराज गोनर्द, करुषाधिपति, किंपुरुष द्रुम व पार्वतीय मालव राजे, इतक्यांनीं मिळून लौकरच पर्वताच्या पश्चिम बाजूनें चढूं लागावें. पौरव, वेणुदारि, वैदर्भराज, सोमक, रुक्मी, भोजाधिपति, सूर्याक्ष, मालव, पांचालेश्वर द्रुपदराज, अवंतीदेशाचे विंद व अनुविंद, पराक्रमी दंतवक्त्र, छागलि, पुरमित्र, राजा दरद, कौशांबी देशाचा मालवराज, शतधन्वा, विदूरथ, भूरिश्रवा, त्रिगर्त, बाण आणि पंचनद, इत्यादि दुर्गयुद्धकुशल व वज्रासारख्या पराक्रमी राजांनीं शत्रूला रेंटीत रेंटीत पर्वताच्या उत्तर बाजूनें वर चलावें. उलूक, कैतवेय, अंशुमान् राजाचा पुत्र वीर, एकलव्य, दृढाश्व, क्षत्रधर्मा, जयद्रथ, उत्तमौजा, शाल्व, केरलाधिप, कैशिक, वैदिश, वामदेव आणि पराक्रमी सुकेतु, यांचेकडे पूर्व बाजू सर करण्याची कामगिरी सोंपवून द्या. वायु जसे मेघांना पळवून उडवून लावतात त्याप्रमाणें उलूकादि राजांनीं शत्रूंचा धुव्वा उडवावा. मी, दरदराज व वीर्यवान् शिशुपाल मिळून निकरानें हल्ला चढवून दक्षिण बाजू सर करतों.

याप्रमाणें वेळ न गमवितां चोहोंबाजूंनीं या गोमंत पर्वताला सैन्यानें वेढून टाका म्हणजे त्याच्यावर वज्रपातासारखें भयंकर संकट आल्यासारखी त्याची स्थिति होईल.

गदावंतांनीं गदेनें, परिघ धारण करणाऱ्यांनीं परिघानें, व इतरांनीं त्यांच्यापाशीं जीं विविध शस्त्रें असतील त्यांनीं या पर्वतश्रेष्ठाचें विदारण करावें. या नतोन्नत भूमीनें युक्त असलेल्या पर्वतावरची जमीन आजच्या आज तुम्ही सर्व राजांनीं मिळून सारखी ( सपाट मैदानासारखी ) करा.[1]

सागरानें जसा चोहों बाजूंनीं पृथिवीला गराडा दिला आहे, त्याप्रमाणें जरासंधाचें भाषण ऐकून घेतल्यानंतर राजाज्ञा शिरसा वंद्य मानून सर्व नराधिपांनीं गोमंताचल वेढून टाकला. मात्र देवेंद्रासारख्या ( पराक्रमी ) चेदिराज शिशुपालानें जरासंधाच्या भाषणानें संतुष्ट न होतां प्रश्न केला कीं, राजा, या दुर्गम पर्वतश्रेष्ठ गोमंताचलावर युद्ध करून तुला कोणता लाभ होणार ? उंच उंच वृक्ष व कांटे यांनीं या पर्वताचें शिखर व्यापलें असल्याकारणानें यावर चढून जाणें फार कठीण आहे. मला वाटतें, या गिरीच्या सभोंवार पुष्कळ लांकडें व गवत रचून याला आतांच्या आतां विलंब न लावतां आग लावून द्यावी. आणि दुसरे सर्व प्रयत्न तूर्त बाजूला ठेवावेत. रणामध्यें बाण—युद्ध करणारे क्षत्रिय सुकुमार असतात, त्यांना पायीं दुर्गम पर्वतावर चढावयास लावणें युक्त नव्हे. नुसता वेढा घालून किंवा वर चढून जाऊन हा पर्वत सर करणें

१ अध्याय ३५ मध्यें मथुरेच्या वेढ्याचे वेळचें जरासंधाचें भाषण पंधरा आणे हेंच आहे!

देवांना देखील शक्य नाहीं. एखादा दुर्ग जेव्हां सर करावयाचा असतो तेव्हां वेढा घालणें हा उपाय होय. पर्वताच्या आश्रयानें राहिलेल्या राजांचा ( शत्रूंचा ) धान्य, उदक व जळण इत्यादिकांचा पुरवठा नाहींसा केला म्हणजे त्यांना ( सहज ) पराभूत करितां येतें. आपण संख्येनें पुष्कळ आहों या घमेंडीवर जाऊन स्वस्थ बसणें सांप्रत शहाणपणाचें व राजनीतीस अनुसरून होणार नाहीं. आपल्याशीं युद्धास ठाकलेले यादव जरी दोघे आहेत तरी त्यांची यःकश्चित् म्हणून उपेक्षा करतां कामा नये. त्यांचें सामर्थ्य किती आहे याचा आपणास अजमास नाहीं. उलट हे देवतुल्य आहेत असें ऐकण्यांत आहे. उभयतां यदुश्रेष्ठांनीं ( आजवर ) दुष्कर कृत्यें केलीं आहेत. त्यांवरून हे बालक महासमर्थ किंबहुना देवच असावेत असें वाटतें. म्हणून वाळलेल्या लांकडांचा व गवताचा सभोंवार ढीग करून या पर्वतोत्तमाला अग्नि लाविला म्हणजे हे ( आगीच्या भडक्यांत ) जळून जाऊन गतप्राण होतील अशी माझी कल्पना आहे. यदाकदाचित् अंग पोळूं लागतांच ते आगीच्या फोफाट्यांतून निसटून बाहेर पडले तरी आपण सर्व मिळून त्यांस मारून टाकूं. मला वाटतें या युक्तीनें त्यांचा घात आपल्याला ( त्वरित ) करितां येईल."

याप्रमाणें, राजांच्या कल्याणाविषयीं दक्ष असलेल्या चेदिराजानें जें भाषण केलें, तें ससैन्य सर्व राजांना फार पसंत वाटलें. लागलींच, त्यांनीं लांकडें, गवत, कळक व सुकलेल्या फांद्यांचीं झाडें जमा करून पेटवून दिलीं. त्यामुळें सूर्यकिरणांनीं जसा मेघ प्रदीप्त झाल्यासारखा दिसतो त्याप्रमाणें तो पर्वतराज प्रदीप्त दिसूं लागला. (जरासंधाबरोबर आलेल्या) चलाख[1] पावलांच्या (गतीच्या) राजांनीं चटकन् वाऱ्याच्या झोंकानें व योग्य ठिकाणें पाहून गोमंताचलाला सर्व बाजूंनीं पेटवून टाकलें. मग वायूच्या योगानें अग्नि जास्त जास्त प्रदीप्त होऊन चोहोंकडे पसरला. आगींतून धूमयुक्त असंख्य ज्वाला निघूं लागल्या. व त्यांच्या प्रभेनें अंतरिक्ष देखील प्रकाशमान झालें. लांकडांच्या ढिगांतून प्रथमतः उत्पन्न झालेला अग्नि वायूच्या योगानें सर्वतः पसरून त्यानें सुंदर वृक्षांनीं युक्त असलेल्या शोभिवंत गोमंताचलाची राखरांगोळी केली. तो शैलेंद्र जळत असतां पुष्कळ मोठमोठाल्या शिलांचे शेंकडों तुकडे होऊन भयंकर उल्कापाताप्रमाणें ते सगळीकडे उडूं लागले. सूर्य आपल्या तेजानें मेघाला ज्याप्रमाणें लिंपून काढतो त्याप्रमाणें सर्वत्र पसरलेल्या ज्वालांच्या योगानें त्या शैलेंद्राचें स्वरूप भयंकर होऊन त्यानें आपल्या ज्वालांच्या तेजानें आसमंतात् भाग नीटपणें व्यापून टाकिला. आगीमुळें धातूंचा रस होऊन त्या शिजूं लागल्या; वृक्षांनीं पेट घेतला. तेव्हां त्या पर्वतराजावरील श्वापदें गोंधळून जाऊन सैरावैरां आरडत ओरडत धावूं लागलीं. त्या वेळीं कांहीं तरी पीडा झाल्यामुळें तो गिरिश्रेष्ठच आरडत आहे असा भास झाला. आगीच्या योगानें जळून तो पर्वत तप्त झाल्यावर सुवर्ण, रौप्य, अयस् इत्यादि धातूंचा रस होऊन त्याच्या चिळकांड्या उडूं लागल्या. त्या पर्वताचे पृष्ठावर जरी अग्नीची प्रभा फांकली होती तरी धुराचे काळे लोळ त्यांतच उठत असल्यामुळें तो मेघांत बुडाल्याप्रमाणें फारसा शोभेना.

---

१ मुळांत 'लघुविक्रमाः' असें पद आहे. त्याचा अर्थ वाईकरांनीं 'महापराक्रमी' असा केला आहे. आम्हांस फार तर 'अल्पपराक्रमी' एवढा अर्थ करवेल. परंतु तो येथें अप्रस्तुत वाटतो, म्हणून वरीलप्रमाणें अर्थ करणें भाग वाटलें.

त्यावरील दगड फुटून त्यांचे तुकडे उडत होते. तसेंच त्या पर्वतावरून रखरखीत निखारे खालीं येत होते. या दोन कारणांमुळें हा पर्वत म्हणजे उल्कावृष्टि करणारा मेघच आहे कीं काय असें वाटे. आगीमुळें पर्वतावरील जलसंचय कोरडे ठणठणीत होऊन धुराच्या लोटामुळें त्याचा मध्यभाग मोठा विस्तीर्ण दिसूं लागला. फार काय सांगावें, प्रलयाग्नीनें होरपळल्याप्रमाणें त्याची अगदीं राखरांगोळी झाली. शरीर अर्धें जळल्यामुळें विव्हल होऊन सुस्कारे टाकणारे व ज्यांचीं मस्तकें (फणा) विशाल असून नेत्र भयंकर झाले आहेत असे सर्प त्या पर्वताच्या पार्श्वभागीं वावरत असतांना दृष्टीस पडूं लागले. आगीनें त्रासून जाऊन सिंह व व्याघ्र वारंवार अंतरिक्षांत उड्या मारण्याचा यत्न करीत, परंतु त्यांचे प्रयत्न फसून ते पुनःपुन खालीं आदळले म्हणजे गांगरून जात व तशा स्थितींत भयंकर आर्तस्वर काढून मोठ्यानें ओरडत. (ओलीं) झाडें जळूं लागलीं, तेव्हां त्यांतून पाणी निघूं लागलें. राख व निखारे यांच्या प्राचुर्यानें पिंगट झालेला वायु ऊर्ध्वगतीनें वाहूं लागला. अंतरिक्षांत पसरलेली धुराची छाया दर्पित मेघासारखी दिसूं लागली. मोठमोठ्या शिखरांनीं युक्त असलेल्या त्या गोमंतपर्वताचा पशुपक्ष्यांनीं त्याग केला. सारांश, आगीच्या प्रखरतेमुळें तो पर्वत हैराण झाला. इंद्रानें वज्रप्रहार करून विदारण केल्याप्रमाणें त्या पर्वतावरील उंच व विशाल शिलासमूह हालूं लागून असंख्य शिला खालीं येऊं लागल्या. गोमंताचल पेटवून दिल्यानंतर लढाईच्या व्यवस्थेनें उभे राहिलेल्या व रागावलेल्या जरासंधपक्षीय क्षत्रियांना जेव्हां आगीचा त्रास होऊं लागला, तेव्हां ते अर्धा कोस मागें हटून तेथें उभे राहिले.

पर्वतोत्तम गोमंतानें पेट घेतला तेव्हां मोठमोठाले वृक्ष उन्मळून जाऊन धुराच्या लोटांनीं कांहींएक दिसेनासें झालें व पर्वताचा पायथा शिथिल होऊन हालूं लागला. पर्वताची अशी अवस्था पाहतांच प्रत्यक्ष मधुसूदनच असलेल्या केशिसूदन कमलनेत्र श्रीकृष्णास उद्देशून बलराम रोषानें बोलला. "बा कृष्णा, जरासंधानुयायी बलिष्ठ राजांनीं आपल्या दोघांच्या वैरानें प्रेरित होऊन हा गोमंत पर्वत शिखरें, पठारें व त्यावरील वृक्ष यांसहवर्तमान पेटवून दिला आहे. कृष्णा, हे पहा पर्वतावरील पक्षी आगीमुळें तापून गेलेल्या व धूमयुक्त झालेल्या वनांच्या भोंवतीं आर्तस्वरानें आरडत घिरट्या घालीत आहेत ! आपल्याकरितां या पर्वताची अशी राखरांगोळी उडत आहे यामुळें (आपण कांहीं न करितां स्वस्थ बसलों तर) जगामध्यें आपली अपकीर्ति व छीः थू होईल. ह्मणून हे नगतुल्य वीरश्रेष्ठा, या पर्वताच्या ऋणांतून मुक्त होण्यासाठीं तरी, बाहुबलानें आपण या क्षत्रियांना मारलें पाहिजे. पर्वताला आग लावून देऊन हे क्रोधाविष्ट झालेले सर्व क्षत्रिय राजे रथारूढ होऊन युद्धाची (च जणूं काय) आपआपल्या ठिकाणीं वाट पहात उभे आहेत असें दिसतें."

मेरुशिखरावरून नक्षत्रराज चंद्र जशी उडी मारतो, त्याप्रमाणें, वरील भाषण केल्यानंतर गोमंताचलाच्या शिखरावरून श्रीमान् बलरामानें खालीं उडी टाकिली. त्या तरुणानें (कंठांत) वनमाला धारण केली असून कादंबरी सेवनानें तो नीलांबरधारी व सुंदर मुख बलराम धुंद झाला होता. त्याचें वक्षःस्थल वनमालांनीं गच्च भरलें असून कर्णामध्यें त्यानें एकच सुंदर कुंडल घातलें होतें व मस्तकावर रमणीय मुकुट धारण केला होता. आपलें मुख खालीं करून कृष्णाच्या ज्येष्ठ भ्रात्यानें

(शिखरावरून) जरासंधपक्षाच्या राजांच्या गर्दींमध्यें (एकदम) उडी मारली. बलरामानें खालीं उडी घातली असें पहातांच, अतुल पराक्रमी व वर्णानें नीलमेघाप्रमाणें असलेल्या श्रीमान् कृष्णानेंही गोमंताचलाच्या शिखरावरून खालीं उडी टाकिली. नंतर त्या हरीनें आपल्या पायांनीं त्या पर्वतश्रेष्ठाला दाबलें. दाब बसतांच तो पर्वत सर्व बाजूंनीं ओला होऊन मदस्रावी हत्तीप्रमाणें त्यावरील सर्व दगडांतून जल निघूं लागलें. त्या पाण्यानें एका क्षणांत आग विझली. प्रलयकालीं पाण्याची मुसळधार लावून मेघसमुदाय ज्याप्रमाणें सूर्याला शांत करतात, त्याप्रमाणेंच वरील प्रकार झाला.

असो. याप्रमाणें रामाच्या मागोमाग वीर्यशाली कृष्णानें खालीं उडी घातली. सिंहाच्या आरोळीप्रमाणें त्या पीतांबरधारी व मेघाकृति कृष्णाचा आवाज (भयंकर) होता. त्याचें मुख सुंदर असून नेत्र कमलासारखे होते. मस्तकावर त्यानें किरीट घातला होता. त्याच्या वक्षःस्थलावर श्रीवत्स चिन्ह होतें. फार काय सांगावें, त्या सुंदर–मुख कृष्णाची प्रभा सूर्यासारखी होती. दोघांनीं खालीं उडी घातल्यानंतर पुनः पायांनीं त्यांनीं त्या पर्वताला दाबलें. त्या बरोबर, त्या पर्वतावरील तीव्र अग्नि शांत करण्याकरितां त्यांतून पाण्याचे लोट वाहूं लागले. ते पाण्याचे प्रवाह पहातांच जरासंधानुयायी राजांच्या तोंडचें पाणी पळालें.

## अध्याय त्रेचाळिसावा.

—:०:—

### जरासंधाचा पराभव.

वैशंपायन सांगतातः——उभयता वसुदेवपुत्रांनीं पर्वतावरून खालीं उड्या टाकिल्या असें पहातांच मात्र जरासंधपक्षीय राजांच्या सैनिकांची गाळण उडाली. इतकेंच नव्हे तर त्या सैन्यांतील हस्त्यश्वादि वाहनें देखील भिऊन गेलीं. रामकृष्णांपाशीं बाहूंशिवाय दुसरीं आयुधें नव्हतीं. अशा स्थितींत ते जेव्हां इकडेतिकडे संचार करूं लागले तेव्हां ते (सैन्यरूपी) सागर खवळून सोडणाऱ्या व चिडलेल्या दोन मकरांप्रमाणें दिसले. पुढें ते दोघे यादववीर रणभूमीवर जाऊन युद्धाकरितां सज्ज झाले, तेव्हां आपलीं जुनीं आयुधें हातीं घेऊन आजचा संग्राम करावा अशी त्यांस बुद्धि झाली. बुद्धि होण्याचा अवकाश, तों त्या आयुधेच्छु व संग्रामाला शोभा देणाऱ्या महात्म्यांपुढें शेंकडों राजांच्या देखत जीं आयुधें पूर्वीं मथुरेनजीकच्या युद्धांत त्यांना प्राप्त झालीं होतीं तींच पुनः अंतरिक्षांतून खालीं येऊन पडलीं. युद्धाच्या गर्दींत आकाशांतून पडलेलीं तीं आयुधें दिव्य, लखलखीत, शोभिवंत व अग्नीसारखीं तेजःपुंज असून मथुरायुद्धानंतर जीं गुप्त झालीं होतीं तींच हीं पुनः त्या यादवश्रेष्ठांना प्राप्त झालीं. युद्धामध्यें राजांचें मांस खाण्यासाठीं हपापलेल्या त्या भल्यामोठ्या व मूर्तिमंत आयुधांबरोबर हिंस्र पशूंचीही टोळधाड आली. तीं आयुधें दिव्य पुष्पमाळांनीं युक्त असून त्यांच्या मार्गक्रमणानें आकाशसंचारी प्राण्यांना भय वाटलें. त्या तेजःपुंज आयुधांच्या प्रभेनें दाही दिशा प्रकाशित झाल्या. त्या महायुद्धांत रामकृष्णांकरितां अवतरलेलीं आयुधें म्हणजे संवर्तक नामक हल, सौनंद नामक मुसल, सुदर्शन चक्र आणि कौमोदकी गदा. हीं चार आयुधें श्रीविष्णूचीं प्रत्यक्ष तेजेंच होतीं.

रामानें प्रथम दिव्य माळांनीं अलंकृत असलेला, सर्पराज शेषाप्रमाणें जणूं काय सरपटणारा व रणाला ललामभूत असलेला, हल डाव्या हातांत घेतला. नंतर त्या बलवान् सात्वतश्रेष्ठानें शत्रूंच्या आनंदाचें वाटोळें कर-

णारें सौनंद नामक उत्तम मुसल उजव्या हातांत घेतलें. ( आयुधप्राप्तीमुळें ) प्रमुदित झालेल्या केशवानें त्रैलोक्यसुंदर व सूर्याच्या तेजानें युक्त असलेलें सुदर्शन चक्र एका हातांत घेतलें. ( दुसऱ्या हातानें ) त्या वीर्यशाली यादवानें त्रैलोक्यांत सुंदर म्हणून गाजलेलें व मेघासारखें गडगडाट करणारें शार्ङ्ग धनुष्य उचलून घेतलें. त्या कमलनेत्राचा अवतार-हेतु कळून चुकला असल्यामुळें देवांनीं त्याच्या तिसऱ्या हातांत कौमोदकी गदा दिली[१].

याप्रमाणें साक्षात् विष्णुतुल्य व पराक्रमी रामकृष्णांनीं आयुधांचा स्वीकार केल्यावर शत्रूंशीं युद्ध करण्यास आरंभ केला. ते सायुध झालेले वीर अन्योन्यमयच होते. किंबहुना ते श्रीविष्णूचेच दोन अर्ध होते. असे ते राम व कृष्ण-रूपी दोघे बंधु रणांत आपणांस अनुक्रमें पूर्वज व अनुज असें ह्मणवीत. ते युद्धांत बिनतोड होते. शत्रूंना मागें हटवीत असतांना त्यांचा पराक्रम ईश्वरासारखा दिसून आला. क्रोधाविष्ट झालेला बलराम वीर आपला सर्पेंद्रतल्य हल सरसावून लढूं लागला. तेव्हां हा शत्रूंचा कृतांतकाळच समरभूमीवर आला आहे असें वाटलें. महात्म्या क्षत्रियांचे असंख्य रथ ओढून ओढून त्यानें अनेक हत्ती व अश्व आपल्या रोषास बळी दिले. हत्तींना प्रथम नांगरानें वर उडवून व नंतर त्यांच्यावर एक मुसळाचा तडाका लगावून त्या पर्वततुल्य व रमणीय रामानें समरभूमीवर हत्तींचें मंथन सुरू केलें. रणामध्यें जेव्हां रामाचा मार खाऊन गतप्राण होण्याची वेळ आली तेव्हां जरासंधाचे महान् महान् क्षत्रिय वीर रथ सोडून भीतीनें जरासंधापाशीं पळून आले. त्यावेळीं क्षात्रधर्म उत्तम प्रकारें जाणणारा जरासंध त्यांना म्हणाला "समराला भिऊन तुम्ही पळत सुटलां तेव्हां धिक्कार असो या तुमच्या क्षात्रवृत्तीला ! पराक्रमी मनुष्यानें रथ सोडून समरांतून पळ काढला म्हणजे त्याला भ्रूणहत्येसारखें महापातक लागतें असें शहाणे सांगतात. अरे, एका अल्पबलाच्या व पादचारी लढवय्या गोपपुत्राला भिऊन तुम्हीं शत्रूला पाठ दाखवावी काय ? धिक्कार असो तुमच्या क्षात्रतेजाला. अरे, माझ्या भाषणानें तरी चेव येऊन तुम्ही परत फिरून रणांत नुसतें रहा; म्हणजे मींच एकटा ( लढून ) या गोपालांना यमसदन दाखवितों ( पहा ). "

जरासंधाच्या या भाषणानें चीड येऊन सर्व क्षत्रिय हृष्ट मनानें बाणांचा वर्षाव करीत पुनः युद्धाला उभे राहिले. कित्येक चंद्रतुल्य तेजस्वी रथामध्यें बसले होते. कित्येक सुवर्णमालांनीं अलंकृत केलेल्या अश्वांवर आरूढ झाले होते. कांहीं माहूतांनीं चालविलेल्या मेघ-तुल्य हत्तींवर बसून चालले होते. सर्वांनीं चिलखतें चढवून हातांत खड्ग धारण केले होते. सगळ्यांनीं आपापले वस्त्रालंकार घालून आयुधें सरसावलीं होतीं. तूणीर व बाण घेऊन त्यांनीं आपलीं धनुष्यें सज्ज केलीं. सर्वांवर छत्रें धरलीं असून सेवकजन त्यांचेवर सुंदर चवऱ्या ढाळीत होते. सारांश, रथारूढ होऊन पुनरपि रणभूमीवर प्राप्त झालेले ते राजे आपल्या तेजानें त्या ठिकाणीं झळकूं लागले. तेव्हां लागलींच महाबाहु व पराक्रमी रामकृष्ण युद्ध-भूमीवर युद्धोत्सुक होऊन इतस्ततः संचार करीत होते ते त्या राजांच्या दृष्टीस पडले.

---

१ अध्याय ३५ त हेंच वर्णन आहे.

२ मूळांत विष्णुतनूपमौ असें पद आहे. त्याचा अर्थ चतुर्धरानें " ब्रह्मदेवाप्रमाणें कर्तुमकर्तुं मन्यथाकर्तुम् ", असा केला आहे. बाकी ' तनु ' शब्दाचा ' तनुज ' या अर्थीं प्रयोग कोशकार देत नाहींत. चतुर्धरांनीं तरी दिला आहे एवढेंच. पुढील श्लोकांत श्री विष्णूचेच ते दोन अर्ध होते असें जर चक्क म्हटलें आहे तर येथेंहि "विष्णुतनूपमौ " याचा अर्थ " विष्णूचे शरीराप्रमाणें " असा करण्यास आह्मास बाध दिसत नाहीं.

त्या ठिकाणीं त्यांचें व रामकृष्णांचें मोठें युद्ध होऊन पुष्कळ बाणांची उभयपक्षांकडून भयंकर वृष्टि झाली. युद्धाच्या दंगलींत परस्परांनीं केलेले भयंकर गदाप्रहारही मधून मधून ऐकूं येत होते. पर्वतांवर वृष्टि होत असतांही ते जसे अचल राहातात त्याप्रमाणें सहस्रावधि बाण त्यांच्यावर पडत असतां न डगमगून ते रणेच्छु वीरश्रेष्ठ स्वस्थ उभे राहिले होते. मोठाल्या गदांच्या प्रहारांनीं किंवा मुद्गरांच्या फेंकींनीं ते महाधनुर्धर यादववीर किंचित्ही चळले नाहींत.

इतकें झाल्यानंतर, शंख, चक्र व गदा हीं आयुधें धारण केलेला महापराक्रमी व मेघतुल्य श्रीकृष्ण वायुप्रेरित अग्निप्रमाणें वाढूं लागला. नंतर तेजानें सूर्यासारखा चमकणाऱ्या चक्राच्या योगानें त्या वीरानें हत्ती, अश्व, महारथी व इतर सामान्य मनुष्यें मारून टाकण्याचा सपाटा उडवला. इकडे रामानें अनेक पार्थिवांवर गदाप्रहार करून व अनेकांना नांगरानें ओढून ओढून इतका त्रास दिला कीं त्यामुळें कांहीं सुचेनासें होऊन राजे लोकांच्यानें रणांत टिकाव धरवेनासा झाला. सुदर्शनाचे तीक्ष्ण धारेनें कापले गेल्यामुळें नृपतींचे चित्रविचित्र असंख्य रथ भग्न होऊन पुढें फिरकेनासे झाले. पावसाळ्याचे शेवटीं मेघ जसे गडगडाट करूं लागतात, त्याप्रमाणें मुसळाच्या तडाक्यानें भग्नदंत झालेले साठ साठ[1] वर्षांचे हत्ती आर्तस्वरानें आरडूं लागले. चक्राग्नीच्या ज्वालांनीं घोडेस्वार व पदाति होरपळून जाऊन वज्रप्रहार झाल्याप्रमाणें गतप्राण होऊन खालीं पडले. चक्र व हल यांनीं दग्ध होऊन जरासंधाच्या सर्व सैन्याची दुर्दशा झाली. प्रलयसमयीं सर्व सृष्टि ज्याप्रमाणें अचेतन दिसावी त्याप्रमाणें तेथें रणभूमीवर मरून पडलेल्या सैन्याची अवस्था झाली. खरोखर ती रणभूमि म्हणजे त्या ठिकाणीं मूर्तिमंत प्रगट झालेल्या श्रीविष्णूच्या दिव्य आयुधांची क्रीडाभूमि बनली होती. अशा त्या रणभूमीकडे नुसती नजर फेंकण्याची देखील जरासंधानुयायी राजांची प्राज्ञा झाली नाहीं. ( मग लढाईची गोष्ट कशाला). कितीएक रथांचा चुराडा झाला, कित्येक रथांतील राजे मारले गेले व कित्येकांचें एक एक चाकच मोडलें. याप्रकारें विशोभित झालेले असंख्य रथ रणभूमीवर पसरले होते. चक्र व हल या आयुधांचें वरीलप्रमाणें भयंकर कंदन चाललें असतां, अनेक राक्षस व उत्पात त्या ठिकाणीं उत्पन्न झाले. किती मनुष्य, हत्ती, रथ व घोडे, आर्त झाल्यामुळें रणभूमीवर ओरडत होते, व कितीकांच्या वेळूप्रमाणें चिरफळ्या झाल्या होत्या, याचा अंत लागणें अशक्य होतें. मरून पडलेल्या राजांच्या रुधिरानें आर्द्र झालेली ती भयाण रणभूमि, चंदनाची उटी लावल्या कारणानें जिचें अंग आर्द्र झालें आहे अशा स्त्रीप्रमाणें दिसूं लागली. मृत झालेल्या हत्तींच्या रुधिरौघानें व माणसांचे केंस, आस्थि, मज्जा व आंतडीं इत्यादिकांच्या योगानें पृथ्वी आच्छादित झाली. माणसें व हस्त्यश्वादि वाहनें यांचा त्या महाभयंकर रणभूमीवर ( मारे ) संहार चालला होता. म्हणून तें ठिकाण अत्यंत घोर दिसूं लागलें व भालूंचे अमंगल शब्द व मेघगर्जनेसारखे आर्तजनांचे स्वर त्या ठिकाणीं कानीं पडूं लागले. फार काय सांगावें, जिकडे तिकडे रक्ताचे डोह बनून तें स्थान यमधर्माच्या क्रीडाभूमीप्रमाणें दिसूं लागलें. हत्तींचे मृत देह जागोजाग पडले असून हात तुटलेले योद्धे व विदीर्ण झालेले अश्व यांनीं ती रणभूमि भरून गेली होती. कंकपक्षी व बलिष्ठ गृध्र यांच्या आवाजांनीं तें रणक्षेत्र दुमदुमून गेलें. शेंकडों राजे तेथें मरून पडत होते. सारांश, मृत्यूशि-

१ हत्तींचें हें वय म्हणजे भर तारुण्य समजावें.

वाय त्या ठिकाणीं दुसरी गोष्ट दिसत नव्हती. अशा स्थितींत तेथें कृतांततुल्य कृष्ण शत्रूंचा संहार करीत इतस्ततः संचार करीत होता. प्रलयकालीन सूर्यासारखें तेजस्वी चक्र व लोखंडी काळी गदा हातांत घेऊन रणांगणावर तळपत असलेला श्रीकृष्ण राजांना उद्देशून ह्मणाला.

"शूरहो, तुमचेपाशीं हत्ती, अश्व व रथ इतकी सामुग्री असतांना तुम्ही युद्ध कां करीत नाहीं? मी व माझा ज्येष्ठ भ्राता रथविरहित, पायीं, तुमच्या समोर उभे असतांना तुम्ही अस्त्रपारंगत व दृढनिश्चयी शूर योद्धे पाठ दाखवून पळत कां सुटलां आहां? रणामध्यें दैवदुर्विलासानें जो तुमचें संरक्षण करीत आहे तो जरासंध आतां आम्हांपुढें कां येत नाहीं?"

कृष्णाचें असें भाषण चाललें आहे इतक्यांत पराक्रमी दरद राजा सैन्याच्या मध्यभागीं स्थित असलेल्या व हलाग्र हातीं धरल्यामुळें ज्याची भुजा उग्र दिसत आहे अशा बलरामावर चालून गेला व कृषीवल ज्याप्रमाणें आपल्या लाल नेत्रांच्या बैलाला बोलावतांना म्हणतो त्याप्रमाणें त्याला म्हणाला. "हे अरिंदमा रामा, ये पुढें ये आणि माझ्याशीं युद्ध कर" नंतर दोन हत्तींची झुंज होते त्याप्रमाणें लोकश्रेष्ठ राम व दरद यांचें त्या रणक्षेत्रांत मोठ्या निकराचें युद्ध झालें. युद्ध चालतां चालतां बलिश्रेष्ठ रामानें दरदाच्या खांद्यावर आपला हल ठेवून त्याला आपल्या मुसळाचा एक तडाखा दिला. मुसळाचा प्रहार होतांच त्याचें मस्तक त्याच्या शरीरांत घुसून दरदराज मघोमघ वज्राघात झाल्यानें दुभंगलेल्या पर्वताप्रमाणें गतप्राण होऊन भूमीवर पडला.

राजश्रेष्ठ दरदाला बलरामानें परलोक दाखविल्यानंतर त्याचें व जरासंधाचें इंद्रवृत्रांप्रमाणें दारुण व लोमहर्षण युद्ध झालें. हातांत गदा घेऊन ते पराक्रमी वीर एकमेकांच्या अंगावर धांवले तेव्हां भूकंप होऊन ते गदाधारी महात्मे शिखरयुक्त अचलांसारखे भासूं लागले. गदायुद्धांत प्रख्यात असलेले ते पुरुषश्रेष्ठ चिडून जाऊन धावूं लागले तेव्हां बाकीच्या लोकांचीं युद्धें बंद पडलीं व गदायुद्धांतील मोठे आचार्य म्हणून त्रैलोक्यांत गाजलेले ते पराक्रमी व मत्त वीर युद्ध करूं लागले तेव्हां सहस्रावधि देव, गंधर्व, सिद्ध, ऋषिश्रेष्ठ, यक्ष व अप्सरा त्या ठिकाणीं प्राप्त झाल्या. हे राजा, देव, यक्ष, गंधर्व व महर्षि यांच्या संचारानें अलंकृत झालेलें नभोमंडल नक्षत्रगणांनीं जणूं काय युक्त असल्याप्रमाणें अधिक शोभिवंत दिसूं लागलें. जरासंधराजानें डाव्या पवित्र्यानें रामावर चाल केली व रामानें उजव्या मंडलाचा आश्रय केला. दंतप्रहार करून हत्ती ज्याप्रमाणें युद्ध खेळतात त्याप्रमाणें त्या गदायुद्धकुशलांनीं एकमेकांवर गदाप्रहार करून दशदिशा दणाणून सोडल्या. त्या युद्धांत रामाच्या गदाप्रहाराचा आवाज वज्राघातासारखा होई व जरासंधाचा पर्वत दुभंगल्याप्रमाणें होई. वायु ज्याप्रमाणें विंध्यपर्वताला कांपवूं शकत नाहीं त्याप्रमाणें जरासंधाच्या हातांतून सुटलेल्या गदेनें गदाधारी वीरांमध्यें अग्रगण्य असलेल्या रामाला काडीमात्र इजा होईना. उलटपक्षीं, त्या मगधेश्वरानेंही रामाचा तीव्र गदाप्रहार धैर्यानें सहन करून मोठ्या कौशल्यानें परत फिरविला.

इतकें झाल्यानंतर लोकांना ऐकूं येईशी सुस्वर आकाशवाणी झाली. ती अशी, "मानद रामा, तूं याला मारूं नकोस. याबद्दल वाईट वाटण्याचें कारण नाहीं. कारण, मी याच्या मृत्यूची योजना करून ठेविली आहे; ह्मणून तूं आतां युद्ध बंद करावेंस हें बरें. थोडक्याच

अवधींत जरासंधराजा ( भीमाच्या हातानें ) मृत होईल."

ती वाणी ऐकून जरासंधराजा खिन्न झाला. बलरामानेंही त्याला आणखी प्रहार केला नाहीं. तदनंतर वृष्णी व जरासंधपक्षीय राजे युद्धापासून परावृत्त झाले. राजश्रेष्ठा, बहुत कालपर्यंत त्यांनीं परस्परांशीं युद्ध केलें. शेवटीं जरासंध राजाचा पराभव होऊन तो निघून गेल्यानंतर महारथी परत फिरले व लौकरच तेथील सैन्यही नाहींसें झालें. वाघाला भिऊन हरिण जसे पळत सुटतात त्याप्रमाणें भीतिग्रस्त झालेले राजे कोणी रथारूढ होऊन, कोणी घोड्यावर बसून व कोणी हत्तींवर आरूढ होऊन जलदीनें आपापली वाट सुधरूं लागले. महारथी राजेंद्रांचा अभिमान गळून जाऊन ते युद्धभूमीवरून निघून जातांच रणभूमि घोर व भयंकर दिसूं लागली. मग असंख्य हिंस्र प्राणी तेथें गोळा झाले.

याप्रमाणें मुख्य मुख्य योद्धे पलायन करीत असतां महातेजस्वी चेदिराज यादवांशीं असलेला आपला आप्तसंबंध मनांत आणून कृष्णापाशीं आला. हे अनघा, कारुष सैन्य व चेदिदेशचें सैन्य यांनीं परिवेष्टित असलेला दमघोष राजा, यादवांशीं असलेला संबंध दृढ करण्याच्या इच्छेनें प्रेरित होऊन कृष्णाला म्हणाला.

"यदुनंदना, मी तुझ्या पितृभगिनीचा पति आहें. प्रभो, तूं माझा प्रिय आप्त असल्यामुळें सैन्यासह मीं तुजपाशीं आलों आहें. "दुर्बुद्धे, कृष्णाशीं रणामध्यें तूं विरोध करूं नकोस," असें मी या अल्पबुद्धि जरासंध राजाला सांगितलें होतें. परंतु त्यानें माझ्या सांगण्याचा धिक्कार केला म्हणून आज आतां मीं त्याचा पक्ष सोडला आहे. युद्धामध्यें तूं पराभूत केल्यामुळें अनुयायांसह तो पळत सुटला आहे. असें आहे तरी हा राजा वैरभाव सोडून आपल्या नगरास परत जाणार नाहीं. तो पुनरपि तुझ्याविषयीं मनांत द्वेष ठेवील व दुसऱ्या मार्गानें तुला त्रास देईल. म्हणून, कृष्णा, तूं या रणभूमीचा त्वरित त्याग कर. कारण येथें मरून पडलेल्या माणसांचीं प्रेतें पडलेलीं असून मांसभक्षक प्राण्यांनीं त्यांवर सपाटा उडवला आहे. आतां मनुष्यांनीं येथें राहाण्याची सोय नाहीं. यास्तव कृष्णा, आपण आपल्या सैन्यासह व अनुयायांसह करवीरपुराला जाऊं. त्या ठिकाणीं वासुदेव शृगाल राजा आहे त्याची आपली गांठ पडेल. हे दोन अति उंची रथ मी तुमच्या करितां ( मुद्दाम ) तयार करविले असून त्यांना चपल अश्व जुंपले आहेत. या रथांचीं चाकें, आंख, जोकड व इतर भाग सुंदर आहेत. केशवा, तुझें कल्याण असो! बलदेवासहवर्तमान तूं या रथांवर शीघ्र आरोहण कर. म्हणजे करवीरपुरच्या राजाला भेटण्याकरितां आपण हांहां म्हणतां जाऊं."

वैशंपायन पुढें सांगतातः—आपल्या आतेचा नवरा जो चेदिराज, त्याचें भाषण श्रवण करून जगद्गुरु श्रीकृष्णाला अत्यंत आनंद झाला व त्या भरांत तो म्हणाला, "अहाहा! देशकाल जाणणारे आम्हीं उभयतां युद्ध करून संतप्त झालों असतां आम्हांवर बांधवाला शोभेल असें वचनामृत तूं शिंपडलेंस. हे चेदिश्रेष्ठा, देशकालास अनुसरून हितकर व मधुर भाषण करणारे वक्ते जगामध्यें फारच क्वचित् आढळतात. चेदिराज, तुझ्या दर्शनानें आम्ही आतां सनाथ झालों. तुझ्यासारखा पाठीराखा असल्यावर आम्हांला आतां दुर्लभ अशी कोणतीही गोष्ट उरली नाहीं. हे चेदिकुलजा, जरासंध किंवा त्याच्यासारखे दुसरे राजे, या सर्वांचा निःपात करण्याला तुझी मदत मिळाल्यामुळें

आतां आम्ही समर्थ आहों. तूं यादवांना ( आम्हांला ) प्रथम येऊन मिळालास म्हणून तूं आमचा पहिला बंधु आहेस. इतउत्तर हे चेदिश्रेष्ठा, राजेलोकांबरोबर आमचे बहुत संग्राम होतील ते तुझ्या दृष्टीस पडतील. या संग्रामांतून जे रणशूर राजे जिवंत सुटले आहेत ते याला 'चाक्रमौशल संग्राम' असें नांव देतील. या पर्वतश्रेष्ठ गोमंतावर युद्ध होऊन राजेलोकांचा पराजय झाला, ही कथा जे श्रवणपठण करतील त्यांना स्वर्गलोकाची प्राप्ति होईल. राजश्रेष्ठा चेदिपते, चला तर आतां तूं सांगशील त्या मार्गानें आपल्या हितासाठीं आपण करवीर नामक सर्वोत्कृष्ट नगरास जाऊं."

त्यांच्या रथांना पवनगतीनें चालणारे अश्व जुंपले असल्याकारणानें स्यंदनारूढ झाल्यानंतर, मूर्तिमंत अग्नीसारखे दिसणारे ते तिघे ( राम, कृष्ण व दमघोष ) तो दूरचा रस्ता आक्रमूं लागले. मार्गांत तीन रात्रीं वस्ती केल्यानंतर चवथ्या दिवशीं ते करवीर नामक सर्वोत्तम नगरास जाऊन पोंचले. नंतर देवतुल्य त्या तिघांनीं त्या शुभ प्रदेशांत स्वतःच्या हितसंवर्धनाकरितां प्रवेश केला.

## अध्याय चवेचाळिसावा.

—:०:—

### शृगालवध.

वैशंपायन सांगतातः—ते ( राम, कृष्ण व दमघोष ) आपल्या नगरापाशीं आले आहेत, असें कळतांच त्यांनीं आपल्या नगरावर चाल केली आहे अशी कल्पना करून युद्धांत दुर्जय असलेला व इंद्रतुल्य पराक्रमी राजा शृगाल नगराबाहेर पडला.

तो ज्या सर्वोत्कृष्ट रथांत बसला होता; त्याचा वर्ण सूर्यासारखा असून तो तेजस्वी व संग्रमांत चालणाराही होता. त्यांत सर्व प्रकारचीं आयुधें ठेवलेलीं असून त्याच्या धांवांचा जो ध्वनि होत होता त्या योगानें तो हंसतच आहे कीं काय असें वाटे. नानाप्रकारच्या आभरणांनीं तो रथ युक्त असून मंदराचलासारखा प्रचंड होता. त्यांतील तूणीरांमध्यें अक्षय्य बाण असून समुद्रासारखा त्याचा गंभीर आवाज होत होता. त्याला शीघ्र चालणारे अश्व जुंपले होते. पर्वताच्या शिखरांवर देखील त्याची गति कुंठित होत नसे. त्याच्या जोकडाचा भाग सोन्याचा असून आंस मजबूत होते. सारांश, तो अत्यंत शोभिवंत, रमणीय व तेजस्वी असून गरुडासारखा शीघ्रगामी होता. त्या शृगाल राजाचा ह्या स्वरूपाचा रथ पाहून हा इंद्राचा हर्यश्वांनीं युक्त असलेला पर्वततुल्य रथच अंतरिक्षांतून चालला आहे कीं काय असें वाटे. सूर्यकिरणांप्रमाणें तेजस्वी दोऱ्यांनीं त्या रथाच्या अश्वांचें नियमन केलें जात असून सवित्याची पूर्ण आराधना झाल्यानंतर प्रसन्न होऊन प्रत्यक्ष सूर्यनारायणानें तो शृगालाला दिला होता. त्या रथांत बसलें असतां शत्रूंच्या रथांचा पार चुराडा होऊन जाई.

अशा ( दिव्य ) रथावर आरूढ होऊन पतंग जसा दिव्यावर झडप घालतो त्याप्रमाणें राजा शृगाल कृष्णावर चालून गेला. त्यानें हातांत चाप व प्रखर बाण घेतले असून अंगांत कवच घातलें होतें. त्याच्या कंठांत सुवर्णमाला असून त्याचें प्रावरण व उष्णीष हीं शुभ्र होतीं; त्याचे नेत्र अग्नीसारखे लालभडक असून तो वारंवार आपल्या दुर्धर धनुष्याची दोरी ओढून टणत्कार करूं लागला. अग्निज्वालांनीं युक्त असलेले रोषजन्य (उष्ण) श्वास त्याचे नासिकापुटांतून वहात होते. त्याच्या अंगावरील असंख्य भूषणांच्या तेजामुळें तो सूर्यकिरणांनीं युक्त झालेल्या मेरुपर्वतासारखा दिसे. फार काय

सांगावें, शृगाल ह्मणजे एक पर्वतच रथारूढ झाला आहे असा भास होई. त्यानें फोडलेल्या सिंहनादानें, रथचक्राच्या खणखणाटानें व त्याच्या भारानें पृथ्वी खालीं दबून भयानें कांपूं लागली. श्रीमान् शृगाल राजा मूर्तिमंत पर्वतासारखा किंवा दिक्पालासारखा होता. तो आपणाकडे येत आहे असें पाहून कृष्ण मुळींच डगमगला नाहीं. उलटपक्षीं, चिडून जाऊन शृगालच शीघ्रगामी रथामध्यें बसून युद्ध करण्याच्या लालसेनें कृष्णासमीप येऊन ठेपला. ( आपण आलों असतांही ) वासुदेव ( निर्भयपणें ) स्थित आहे असें दृष्टीस पडतांच, मेघराशि ज्याप्रमाणें पर्वतावर लोटतात त्याप्रमाणें युद्धासाठीं हपापलेला शृगाल वेगानें कृष्णाचे अंगावर धांवून गेला. वासुदेवही स्मित करून त्याचा प्रतीकार करण्यास सिद्ध झाला. नंतर, वनामध्यें दोन मत्त हत्तींची जशी झुंज होते त्याप्रमाणें त्या दोघांचें समरांगणावर पहावयास भयंकर असें युद्ध झालें. मोहामुळें जो आपल्या थोरपणापासून ढळला आहे, असा तेजस्वी शृगाल समरभूमीवर त्याचा प्रतिकार करण्यास उभा राहिलेल्या कृष्णाला युद्धाच्या लालसेनें ह्मणाला.

" कृष्णा, निर्नायक व मूर्ख राजांच्या दुर्बल सैन्यांशीं गोमंताचलावर युद्ध करून तूं जो पराक्रम केलास आणि कृपण, निःसत्व व रणभीरु क्षत्रियांना पराभूत करून पळवून लावलेंस, ती सर्व हकीकत मला विदित झालेली आहे. परंतु हा मी येथें राजपदाचा निष्कंटक उपभोग घेणारा पार्थिव तुझ्या समोर उभा आहें. तर आतां तूं माझ्यापुढें उभा रहा पाहूं. युद्ध करण्याचे कामीं तूं कसलेला नाहींस तेव्हां मी तुला प्रतिरोध केला असतां तूं कोठें बरें पळून जाणार ? समरामध्यें तुझ्या एकट्याशीं मीं ससैन्य लढणें योग्य नाहीं. म्हणून तूं एकटा व मी एकटा, असे आपण दोघेच युद्ध करूं. पराभूत झालेल्या लोकांशीं आपणांस काय करावयाचें आहे ? तूं व मी धर्मयुद्धानें लढूं. आज आपणांपैकीं कोणीतरी एकजण या समरांत मेला पाहिजे. तुला मीं मारलें तर या जगतांत मीं एकटाच वासुदेव होईन. तुझ्या हातून मला जर मृत्यु आला तर तूं एकटा वासुदेव होशील. "[1]

शृगालाचें भाषण ऐकून क्षमाशील कृष्ण त्या ईर्ष्या करणाऱ्या शृगालाला म्हणाला " (तुला वाटेल तसा) तूं मजवर प्रहर कर. " इतकें बोलून कृष्णानें चक्र सरसावलें. त्या सरशीं, क्रोधानें बेहोष होऊन त्या शीघ्रपराक्रमी शृगालानें कृष्णावर भयंकर बाणांचा वर्षाव केला. आणखी त्या प्रतापी शृगालानें चाललेल्या झटापटींत मुसलादि जीं अनेक शस्त्रें त्याचे पाशीं होतीं तीं सर्व गोविंदावर सोडिलीं. शृगालानें याप्रमाणें अग्निज्वालांनीं युक्त असलेल्या अस्त्रांनीं निर्घृणपणें कृष्णाला प्रहार केले असतां, तो पर्वतासारखा स्थिर राहिला होता. अस्त्रप्रहारानें अभिहत झालेल्या कृष्णाला शेवटीं किंचित् राग येऊन त्यानें आपलें चक्र शृगालावर फेंकलें. अभिमानी, बलिष्ठ व युद्धदुर्मद शृगाल चक्रभयानें पळून न जातां निर्भयपणें रथामध्यें बसला होता त्याला त्या चक्रानें ठार मारलें. आणि तें सुदर्शन चक्र पुनरपि ( आपलें कार्य केल्यानंतर ) आपल्या स्वामीच्या हातांत परत आलें. चक्रानें शृगालाचें वक्षःस्थल विदीर्ण होऊन त्याचा सर्व आनंद मावळला व तो गतप्राण होऊन वज्राघात झालेल्या पर्वताप्रमाणें भूमीवर पडला. त्याचे देहांतून सारखा रक्तस्राव चालला होता.

वज्रपात होऊन पर्वत जसा खालीं पडावा त्याप्रमाणें आपला शृगाल राजा गतप्राण हो-

१ कारण, शृगालहि आपणास ' वासुदेव ' ह्मणवीत होता.

ऊन पडला, असें कानीं पडतांच त्याचे सैनिक उद्विग्नचित्त होऊन राजा मेला म्हणून तेथून निघून गेले. ( हें राजनाशाचें ) संकट कोसळल्यामुळें दुःखसंतप्त होऊन कित्येकांनीं नगरांत प्रवेश करून स्वामीशोकानें रडून भुई थोडी केली. कित्येक तेथेंच राहून आपल्या स्वामीचे उपकार आठवीत शोक करूं लागले. दुःखावेगामुळें, आपल्या मृत स्वामीला त्यांच्याच्यानें सोडवेना.

नंतर मेघनिनादाप्रमाणें स्वर काढून अरिमर्दन व कमलनयन कृष्णानें लोकांना अभय दिलें.त्यानें आपला सुंदर अंगुलिनीं व चक्रानें युक्त असा हात वर करून त्यांना आश्वासन दिलें कीं, " भिऊं नका; भिऊं नका. या पातकाच्या दोषासाठीं निरुपद्रवी लोकांना मी मारणार नाहीं. कारण, तसें करणें हें शूरांचे ब्रीद समजलें जात नाहीं. "

तोंडावरून अश्रूंचें ओघळ चालले आहेत असे ते दीन जन " हा आमचा शृगाल राजा दीनमानस व गतप्राण होऊन पडला आहे " असें म्हणत मोठ्यानें रडूं लागले. चक्रानें त्याचें वक्षःस्थल विदीर्ण होऊन तो शृगाल राजा शिखर तुटलेल्या पर्वताप्रमाणें धरणीवर मृत होऊन पडलेला आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्याला पाहून शृगालाचे सचिव व प्रजा दीन व शोकार्त होऊन विलाप करूं लागले. त्यांचे नेत्रांतून सारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. पौरजनांचें गद्गद रडणें ऐकून शृगालाच्या राण्या पुत्रांसहवर्तमान रडत रडत तेथें आल्या. आपला प्रशंसनीय पति राजा शृगाल तेथें मरून पडलेला आहे असें पाहून त्यांचें दुःख दुणावलें व नखांनीं त्या आपले वक्षोज ओरबाडून घेऊन अत्यंत शोक करूं लागल्या. वक्षःस्थळें, स्तन व मस्तकावरील अविरल केशकलाप यांचे ताडन करून शृगालराजस्त्रिया करुणस्वरानें रडूं लागल्या. छिन्नमूल झालेल्या लतांप्रमाणें व्याकुल व अत्यंत शोकार्त झालेल्या त्या स्त्रिया हात वर उचलून पतीच्या उरावर पडल्या. त्यांचे नेत्र अश्रुपूर्ण झाले होते. त्या नृपस्त्रियांचे ते बाष्पयुक्त नेत्र त्या कालीं दवानें म्लान झालेल्या कमलाप्रमाणें दिसत होते. भूमीवर पडलेल्या पतीच्या नांवानें रडत व हृदयाला ताडन करून त्या करुणस्वरानें विलाप करणाऱ्या स्त्रियांनीं पुष्कळ पुष्कळ शोक केला. शृगालाचा शक्रदेव नामक अल्पवयी पुत्र होता तोही डोळ्यांतून पाणी गाळीतच होता. त्याला पुढें करून व शृगालाच्या बाजूला बसून त्या स्त्रिया दुप्पट वेगानें आक्रंदूं लागल्या. त्या म्हणाल्या, " हे वीरा, हा तुझा पराक्रमी पुत्र अद्याप लहान आहे. त्याला अजून कळूं लागलें नाहीं. तुझ्यावांचून आतां हा पैतृक ( वडिलार्जित ) राजपदावर कसा बरें आरूढ होईल ? अरे आमचें श्रेष्ठ अंतःपुर सोडून तूं एकदम कसारे निघून गेलास ? तुझ्या समागमसौख्याची आमची आशा अतृप्त राहिल्यामुळें, पतिरहित झालेल्या आम्ही तुझ्या भार्यांनीं आतां काय बरें करावें ? "

याप्रमाणें स्त्रियांचा शोक चालला असतां, त्यांतील एक पद्मावती नांवाची शहाणी राणी आपल्या शक्रदेव पुत्राला घेऊन रडत रडत वासुदेवापाशीं आली व त्याला म्हणाली. " वीरा, युद्ध करून ज्याला तूं मारलेंस त्या प्रेतरूप झालेल्या शृगाल राजाचा हा पुत्र तुला शरण आला आहे. जर या आमच्या पतीनें तुला प्रणाम केला असता किंवा तुझी आज्ञा शिरसा वंद्य मानली असती तर तुझ्या एकाच प्रहारानें याचा असा भयंकर शेवट झाला नसता; अथवा जर हा तुझ्याशीं बांधव-प्रेमानें वागता, तर अशी विपरीत स्थिति होऊन एखाद्या

हीन मनुष्याप्रमाणें याला मातींत लोळावें लागलें नसतें. असो, हे अनघा, या विपद्ग्रस्त बांधवाचा हा पुत्र आहे. वीरा, तूं स्वतःच्या पुत्राप्रमाणें याचें संरक्षण कर."

पद्मावतीराणीचें हें भाषण ऐकून वक्तृश्रेष्ठ यदुनंदनानें सौम्यपणानें उत्तर दिलें. "राज-भार्ये, या दुरात्म्याबरोबरच माझा सर्व राग नाहींसा झाला आहे. आम्ही आतां शांत झालों आहों. देवि, आतां मी तुमचा आप्तच आहें. साध्वि, तुझ्या निष्पाप भाषणानें माझा रोष पार नाहींसा झाला आहे. जो शृगालाचा पुत्र तो माझाच पुत्र आहे. यांत संशय नाहीं. मी याला अभय देऊन याच्या हितासाठीं राज्याभिषेक करवितों. मंत्री, पुरोहित व सचिव यांना बोलावा. त्याच्या पित्याच्या व पितामहाच्या राज्यावर तुझ्या पुत्राला आम्ही अभिषेक करणार आहों."

तदनंतर, रामकृष्ण स्थित होते त्या ठिकाणीं सर्व सचिव, मंत्री व पुरोहित अभि-षेकाकरितां प्राप्त झाले. लागलेंच पराक्रमी जनार्दनानें राजपुत्राला सिंहासनावर बसवून दिव्य अभिषेक केला. याप्रमाणें शृगालाच्या पुत्राला करवीर नगरांत अभिषेक केल्यानंतर, कृष्णानें त्याच दिवशीं त्वरेनें प्रस्थान ठेवलें. युद्धांत संपादन केलेल्या शृगालाच्या हर्यश्वयुक्त रथांत बसून केशवानें वृत्रहंता इंद्र जसा स्वर्गाचे मार्गाला जातो त्याप्रमाणें पुढील मार्ग सुधारला.

परंतपा, इकडे धर्मात्म्या शक्रदेवानें माते-सहवर्तमान सर्व आबालवृद्ध स्त्रीपुरुषांना व सचिवांना बरोबर घेऊन युद्धदुर्मद शृगालाला शिबिकेंत घातलें. आणि नंतर सर्व मिळून पश्चिमाभिमुख होऊन दूरच्या मार्गानें निघाले. त्याचा योग्य प्रकारें अंत्यविधि करून सर्वांनीं राजपुत्राकडून पितरांची पारलौकिक क्रिया व राजाप्रीत्यर्थ सहस्रावधि श्राद्धें करविलीं. इत-रांनीं त्याच्या नामगोत्रादिकांचा उच्चार करून त्याला पाणी दिलें. आपल्या घोर पित्याचा अशा प्रकारें शेवट झाल्यानंतर त्याला जलांजलि देऊन शोकानें उद्विग्नचित्त झालेल्या राजानें आपल्या सर्वोत्तम राजधानींत प्रवेश केला.

## अध्याय पंचेचाळिसावा.

—:०:—

### रामकृष्ण मथुरेला परत येतात.

वैशंपायन सांगतातः—दमघोषासहवर्तमान करवीरपुर सोडून रामकृष्ण निघाले, ते वाटेंत पांच मुक्काम करून दमघोषाच्या राजधानी-प्रत प्राप्त झाले. त्या ठिकाणीं त्याच्या सहवा-सांत आणखी एक रात्र काढून थोड्याच वेळानें परम संतुष्ट झालेले उभयतां पराक्रमी वसुदेव-पुत्र पुनरपि मथुरेसमीप येऊन पोंचले. त्या-बरोबर, उग्रसेनप्रभृति सर्व यादव, सैन्यासह मोठ्या आनंदानें त्या यदुश्रेष्ठांस सामोरे आले. किंबहुना, शिल्पी, शहाणे, मंत्री व सचिव आदिकरून सर्व आबालवृद्धांसह सगळी मथुरा-नगरी त्यांचे स्वागताकरितां लोटली होती असें म्हटलें असतां चालेल. नंदि—तूर्यादि मंगल वाद्यें वाजूं लागलीं. त्या पुरुषश्रेष्ठांची सर्वतो-मुखीं स्तुति सुरू झाली. राजमार्गावरून पता-कांच्या माला लावल्या होत्या, त्यामुळें फार शोभा आली होती. हे उभयतां बंधु परत आले म्हणून इंद्रमहोत्सवाप्रमाणें सर्व मथुरा-नगरीला अत्यानंद होऊन ती फार रमणीय दिसूं लागली. राजमार्गांवर अत्यंत हर्षित झालेले गवई ( भाट ) स्तुति व आशीर्वाद यांनीं भरलेलीं ( ओथंबलेलीं ) व यादवांना फार आवडणारीं गाणीं गाऊं लागले. "आज जग-विख्यात भ्राते रामकृष्ण हे सुखरूप मथुरेला

परत आले म्हणून यादवहो, तुह्मी निर्भयपणें आजचा दिवस यथेच्छ क्रीडा करा ” अशी दवंडी पिटविण्यांत आली. रामकृष्ण परत मथुरेला आल्यामुळें त्या दिवशीं सगळ्या मथुरेंत कोणी दीन, दु:खी किंवा चिंतामग्न दिसला नाहीं. पक्षी आनंदानें मंजूळ गुंजारव करूं लागले. गाई, अश्व व हत्ती हीं देखील प्रमुदित झालीं. सर्व स्त्रीपुरुषांच्या मनाला अत्यंत आनंद झाला. शुभसूचक वारे वाहूं लागले. दाही दिशा निरभ्र झाल्या. देवालयांतील सर्व देवतांना देखील हर्ष वाटला. रामकृष्ण येतांक्षणींच, पूर्वीं कृतयुगामध्यें जीं लक्षणें लोकांच्या वृत्तीमध्यें दिसत म्हणून सांगतात, तीं सर्व मथुरेमध्यें एकसमयावच्छेदेंकरून दृग्गोचर झालीं.

नंतर सुमुहूर्त व पुण्यकाल पाहून त्या रिपुघ्न वीरांनीं हर्यश्व जोडलेल्या रथावर आरूढ होऊन मथुरानगरींत प्रवेश केला. सर्व देव ज्याप्रमाणें इंद्राच्या मागून गमन करितात त्याप्रमाणें मथुरेंत प्रवेश करतांना सर्व यादव रामकृष्णांच्या पाठीमागून चालले होते. चंद्रसूर्य जसे उदयाचलावर आरूढ होतात, तसे हर्षित झालेले यदुश्रेष्ठ आपला पिता जो वसुदेव त्याच्या गृहामध्यें प्रविष्ट झाले. नंतर योग्यस्थानीं आयुधें ठेवून दिल्यावर यदुवर रामकृष्ण आनंदानें आपल्या घरांत स्वेच्छेनें वावरूं लागले. मग आधीं वसुदेवाच्या चरणावर मस्तक ठेवून नंतर त्यांनीं उग्रसेन राजाला व इतर यदुपुंगवांना यथान्याय मान दिला. उलटपक्षीं सर्वांनीं त्या उभयतांचें अभिनंदन केलें. इतकें झाल्यावर ते आनंदित चित्तानें मातेच्या भवनाकडे गेले.

याप्रमाणें, एकाच विभूतीचे अंश असलेले असे ते सुंदर रामकृष्ण उग्रसेनाचे अनुयायी होऊन कांहीं कालपर्यंत ( पुनः ) मथुरेंत आनंदानें राहिले.

## अध्याय शेचाळिसावा.

—:०:—

### यमुनाकर्षण

### ( रामाचें गोकुलाप्रत पुनरागमन ).

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें कांहीं काल लोटल्यावर एके दिवशीं बलरामाला आपल्या गोकुलांतील बालमित्रांची आठवण झाली व कृष्णाची अनुज्ञा घेऊन तो एकटाच व्रजामध्यें गेला. तेथें गेल्यावर रमणीय, प्रशस्त व पूर्वपरिचित अरण्यें आणि सुंदर सरोवरें त्याच्या दृष्टीस पडलीं. सर्व शक्तिमान् बलरामानें रमणीय वन्य वेष धारण करून मोठ्या उत्कंठेनें गोकुलांत प्रवेश केला. तेथें गेल्यावर तो अरिंदम बलराम अगदीं पूर्वीप्रमाणें मोठ्या प्रीतीनें व यथायोग्यपणें व ज्याच्या त्याच्या वयास अनुरूप असें आपल्या बालमित्रांशीं बोलला. त्यांच्यांशीं पूर्ववत् बोलून पूर्वीसारखेंच त्यानें त्यांस आपल्या वाणीनें हर्षित केलें. त्याचप्रमाणें गोपस्त्रियांशींही त्यानें गोड गोड भाषण केलें.

फारा दिवसांनीं गोकुलांत परत आलेल्या, दुसऱ्यांना संतुष्ट करण्यांत अग्रगण्य असलेल्या, मधुरभाषी व आपल्या लाडक्या बलरामाला उद्देशून वृद्ध गोप म्हणाले. “ हे महाबाहो यदुकुलनंदना, तुझें स्वागत असो. आज तूं आमच्या दृष्टीस पडलास त्यामुळें आम्हांला मोठी धन्यता वाटत आहे. वीरा, तूं पुनः आमच्या गोकुळांत आलास या कारणानें आम्हांला मोठा आनंद झाला आहे. रामा, तूं शत्रूंना भयंकर असून त्रैलोक्यांत तुझी कीर्ति दुमदुमून राहिली आहे. शूर यदुपुत्रा, तूं आमचा अशा रीतीनें परामर्ष

घेणें अवश्य आहे. अथवा सर्वच प्राण्यांचें आपल्या जन्मभूमीचे ठायीं मन रमतें हीच गोष्ट खरी. हे विमलनयना ! तुझ्या आगमनाची आम्ही आजवर मार्गप्रतीक्षा करीत होतों. आज तुझें आम्हांला दर्शन घडलें,( तूं आम्हांला येऊन भेटलास ) त्यामुळें खरोखर देव देखील आतां आमचा सन्मान करतील. मुष्टिक व चाणूर या मल्लांना मारून कंसाचा तुम्हीं वध केलात आणि नंतर उग्रसेनाची राज्यस्थानीं स्थापना केलीत. या तुमच्या पराक्रमाच्या आनंदजनक गोष्टी आम्हांला विदित झाल्या आहेत. समुद्रामध्यें ( सांदीपनीच्या पुत्रासाठीं ) तिमिरूपानें राहिलेल्या पंचजन राक्षसाशीं तुमचें युद्ध होऊन त्यांत पंचजनाला तुमच्या हातून मृत्यु आला; ही हकीकतही आम्हांला कळली आहे. त्याप्रमाणेंच, जरासंधाबरोबर तुमचा झालेला विग्रह, गोमंताचलावर क्षत्रियांसहवर्तमान तुम्हीं केलेला संग्राम, दरदाचा वध, जरासंधाचा पराजय, युद्ध चाललें असतां आकाशांतून तुम्हांला प्राप्त झालेलीं आयुधें, इत्यादि सर्व इतिहास आमचे कानीं आला आहे. पुढें सर्वोत्कृष्ट करवीर नगरांत शृगालाचा वध करून तेथील नागरिकांचें तुम्ही सांत्वन केलेंत व शेवटीं त्याच्या पुत्राला राज्याभिषेक करून तुम्ही मथुरेंत परत आलांत, या सर्व गोष्टी देखील आम्हांला कळल्या आहेत. खरोखर तुमच्या मथुराप्रवेशाचें सुरश्रेष्ठांनीं देखील वर्णन केलें पाहिजे. तुमच्या पराक्रमांच्या योगानें राजे तुमचे अंकित झाले असून डळमळूं लागलेली पृथिवी पुनरपि दृढमूल झालेली आहे. तूं येथें आलास हें पाहून पूर्वीचें आमचें भाग्य पुनः परत आलें आहे असें आम्हीं समजतों. तुझ्या आगमनानें बांधवांसहवर्तमान आम्ही संतुष्ट झालों असून आमचा आनंद पोटांत मावेनासा झाला आहे. ”

यानंतर बलरामानें आपल्या सभोंवार उभे असलेल्या सर्व गोपालांना प्रत्युत्तर दिलें “ सर्व यादवांपेक्षां तुम्हांलाच मी माझे खरे बांधव समजतों. याच ठिकाणीं आमचें सर्व बालपण गेलें. लहान असतांना आम्ही येथेंच खेळत होतों. तुम्हीच ( कृपेनें ) आमचें संवर्धन केलें. असें असतां हें सर्व विसरून जाऊन आम्ही कृतघ्न कसे बरें होऊं ? तुमच्या घरांमध्यें आम्ही अनेकवार जेवलों व तुमच्या आम्हीं गाई राखिल्या. अशा तऱ्हेचे तुमचे आमचे दृढ संबंध असल्यामुळें तुम्हीच आमचे खरे बंधु आहां.

याप्रमाणें बलराम गोपमंडळीमध्यें यथार्थ भाषण करीत असतां, गोपस्त्रियांचीं मुखें अतिशय हर्षयुक्त दिसूं लागलीं.

नंतर महासमर्थ बलराम वनामध्यें जाऊन क्रीडा करूं लागला. इतक्यांत (तो क्रीडा करीत असतां ) देशकाल जाणणाऱ्या गोपालांनीं, वारुणी मद्य विदितात्म्या रामाला आणून दिलें. शुभ्र अभ्रासारख्या तेजस्वी रामानें गोपमंडळींत बसून तें मद्य तत्काळ प्राशन केलें. वनांत येऊन रामानें तें मदोत्पादक मद्य सेवन केल्यानंतर त्याला गोपालांनीं वनांत पैदा होणारीं विविध व सुंदर पुष्पें-फळें, सेवन करण्यास योग्य असे गंध व हृदयंगम भक्ष्यें, तशींच ताजीं काढून आणलेलीं शुभ्र कमलें व विकासणारीं उत्पलें आणून दिलीं.

त्याच्या मस्तकावरील केशकलाप सुंदर असून त्याचा किरीट किंचित् झुकला होता; त्याच्या एकाच कानांत एक कुंडल असून त्याचे योगानें तो फार शोभिवंत दिसत होता. त्याच्या पीनोन्नत वक्षःस्थलावर वनमाला लोंबत असून चंदन चर्चिल्यामुळें तें आर्द्र व पीतवर्ण

होतें. ज्याप्रमाणें कैलासपर्वताच्या योगानें मंदराचल शोभिवंत दिसतो, त्याप्रमाणें असल्या वक्षःस्थलानें व मस्तकानें युक्त असलेला राम शोभिवंत दिसत होता. त्याचे शरीराचा गौर वर्ण असून त्यानें नूतन मेघासारखी ज्यांची शोभा आहे अशीं दोन नीलवर्ण वस्त्रें परिधान केलीं होतीं. यामुळें अंधःकारानें परिवेष्टित असतां जसा चंद्र विशेष मनोहर दिसतो त्याप्रमाणें तो राम विराजमान दिसत होता. सर्पशरीराकृति असलेला हल खांद्यावर टाकून भुजाग्रामध्यें त्यानें चमकणारें मुसल धारण केलें होतें. त्या-योगानें शिशिर-ऋतूंतील रात्रीच्या समयीं दंवबिंदूंनीं चंद्र जसा मंद परंतु मनोहर दिसतो, त्याप्रमाणें तो मत्त, बलवंतांतील अग्रगण्य व मद्यानें घुमारलेल्या चेहऱ्याचा राम शोभिवंत दिसत होता.

असो; ( अशा प्रकारें मद्यानें धुंद झालेला ) राम यमुनेला म्हणाला. "हे महानदि, तुझ्या जलामध्यें स्नान ( करून तुझ्याशीं परिणय[1] ) करण्याची मला इच्छा झाली आहे. म्हणून हे सागरंगमे, तूं मूर्तिमती होऊन माझ्या समोर ये." संकर्षणाच्या मत्तावस्थेंतील या भाषणाचा अवमान करून, स्त्रीस्वभावानुरूप मूर्खपणानें, यमुना नदी ( त्याच्या म्हणण्याप्रमाणें ) तेथें आली नाहीं. त्यामुळें रागावून जाऊन मदोन्मत्त झालेल्या बलवान् रामानें हातांतील नांगर यमुनेवर फिरविण्याच्या बुद्धीनें त्याचा फाळ खालीं केला. इतक्यांत त्या हलापासून पृथ्वीवर ज्या कमलाच्या माला पडल्या, त्यांतून सुगंधित परागांनीं लाल झालेलें मदिरेसारखें जल गळूं लागलें. नंतर अवनत केलेला नांगराचा फाळ यमुनेच्या तीरावर रोंवून त्या योगानें बलरामानें एखाद्या स्वैर चालणाऱ्या स्त्रीला ओढावी त्याप्रमाणें यमुनेला ( आपलेकडे ) ओढली. त्यासरशीं, तिचा जलप्रवाह बिघडून जाऊन तींतील मत्स्यादि जलचर प्राणी क्षुब्ध झाले. इतकेंच नव्हे, तर भयभीत होऊन यमुनानदी हीं ( निमूटपणें ) नांगरानें करून दिलेल्या मार्गानें जाऊं लागली. संकर्षणाच्या भयानें त्रस्त होऊन भोंवऱ्यांनीं युक्त असलेली व मोठ्या वेगानें नांगरानें आंखलेल्या मार्गानें जाणारी यमुना, स्त्रीप्रमाणें व्याकुळ झाली. पुलिन हें जिच्या श्रोणीस्थानीं आहे, लाल कमल हें जिच्या ओष्ठाचे ठिकाणीं आहे, ( हलन ) पाण्याचें पीडन व ताडन केल्यामुळें उत्पन्न होणारी फेनरेषा हें जिचें मेखलासूत्र आहे, तरंग ही जिचे डोक्यांतील वेडीवांकडी माला आहे, चक्रवाकपक्षी हे जिचे उन्मुख स्तन आहेत, वेगाच्या योगानें जी गंभीर व वांकडी झाली आहे, त्रस्त झालेले मीन हीं जिचीं भूषणें आहेत, शुभ्र हंस हे जिच्या नेत्रांच्या अपांगांचे ठिकाणीं आहेत, काशपुष्पांचे गुच्छ हीं जिचीं रेशमी वस्त्रें आहेत, तीरावरील वनस्पती या जिच्या उडणाऱ्या केशाग्रांचे ठिकाणीं आहेत, ( वांकडा वांकडा जाणारा ) जलप्रवाह हा जिच्या स्खलित

---

१ येथें मुळांत ' स्नातुपिच्छेमहानदि ' एवढींच पदें आहेत. परंतु चतुर्धरानें आपल्या टीकेंत ' स्नातुं ' या पदावर ' स्नानपूर्वकं त्वां परिणेतुं ' अशी मुद्दाम मखलाशी केली आहे. बहुधा ' तूं मूर्तिमती ' मजकडे ये असें पुढें म्हटलें आहे, एवढ्यावरून हा चतुर्धरानें तर्क केला असावा. परंतु ती जर सागरगामिनी (समुद्रपत्नी) आहे तर परपरिणीत स्त्रीशीं परिणय करण्याची रामासारख्या धर्मज्ञानें इच्छा दाखविणें गर्ह्य दिसतें. बरें एकवेळ धर्मनीति बाजूस राहिली तथापि ज्या परस्त्रीवर शब्द टाकणें ती तरी तशा ढंगांची असावी, पण, येथें तर यमुनेची रामावर फिर्याद आहे कीं, तूं हें काय विपरीत करितोस, मला मार्गभ्रष्ट करूं नको. मला माझ्या सवती हंसतील. किंवा ' मद्यपाः किं न जल्पंति ' असें समजावें. परंतु मुळांत तितकें व्यक्तपद नसतां असला द्राड अर्थ मुद्दाम कां लादावा हें आम्हांस कळत नाहीं. वाईकरांनीं या अर्थाचा अनादर केला आहे. तें ठीकच दिसतें. भागवतांत यमुनाकर्षण आहेच पण तेथेंही चतुर्धर म्हणतो अशा अर्थाला पुष्टि देणारें कांहीं आढळत नाहीं.

गतीचे ठिकाणीं आहे, नांगराचे ओरखाडे हे जिच्या नेत्रांचे बाहिर्भागांचे ठिकाणीं आहेत, अशी सर्व स्त्रीगुणांनीं ( रूपकाश्रयानें ) संपन्न असलेली, क्षुब्ध व सागराकडे वहात असलेली यमुना नदी, राजमार्गानें जाणाऱ्या मत्त व कुटिल स्त्रीप्रमाणें ( तंतोतंत ) दिसत होती. प्रवाह वारंवार स्खलन पावत असतांही रामानें तिला जोरानें खेंचून चालविली होती. पाणी स्वभावतः उंचावर चढत नसतें तरी त्यानें यमुनेला (आपल्या बलानें) चढत्या मार्गानेंच नेऊन वृंदावनापर्यंत रेंटीत आणिली. वृंदावनामधून त्यानें यमुनेला खेंचीत आणिलें, तेव्हां जलनिवासी पक्षी तिच्या मागोमाग आले. त्यांच्या योगानें ती आक्रोश करीत येत आहे कीं काय, असा भास झाला.

अखेर वृंदावन ओलांडून जेव्हां ती गेली तेव्हां शेवटीं स्त्रीरूप धारण करून यमुना बलरामाला म्हणाली. " नाथा, आतां प्रसन्न हो. तुझ्या या उलट करणीनें मी अगदीं भयभीत झालें आहें. हा माझा प्रवाह व माझें जल पहा कसें फिरून गेलें आहे. रौहिणेया, तुझ्या कृतीनें सर्व नद्यांत मी भ्रष्ट ठरलें आहें. कारण हे महाबाहो, नांगरानें ओढून तूं माझा प्रवाह फिरविलास तेणेंकरून मी आपल्या मार्गापासून भ्रष्ट झाल्यामुळें व्यभिचारिणी बनलें आहे. वेगानें गर्वित झालेल्या माझ्या सवती ( समुद्राला मिळणाऱ्या अन्य नद्या ) पूर्वीं मी सागराला मिळालेली असून आतां माझा जलप्रवाह भलत्याच दिशेनें वाहूं लागला म्हणून फेनरूपी हास्य करून आतां मला हंसतील. यास्तव हे वीरा, कृष्णपूर्वजा, प्रसन्न हो, मी तुझ्यापुढें पदर पसरतें. सुरश्रेष्ठा, ( आतां तरी ) निरंतर तुझें मन सुप्रसन्न असूं दे. हे हलायुधा, नांगरानें ओढून तूं माझा जलप्रवाह फिरवून टाकलास, आतां तरी, माझ्यावरील रोष सोडून दे. ही मी तुझ्या चरणांवर आपलें मस्तक ठेवीत आहें. तूं सांगशील त्या मार्गानें जाण्यास मी कबूल आहें. महाभुजा, सांग तर मी आतां कसकशी जाऊं ? "

वैशंपायन सांगतात:—" याप्रमाणें समुद्रपत्नी यमुना नदी भक्तीनें लीन झाली आहे असें पाहून मदोन्मत्त हलायुधानें तिला प्रत्युत्तर दिलें. " प्रियदर्शने, हलानें निर्दिष्ट केलेल्या मार्गानें वहात राहून जलप्रदानानें हा सर्व प्रदेश तूं भिजवून सुपीक कर. हे सुभ्रु सुंदरी, हे सागरंगमे, ही माझी तुला आज्ञा आहे. महाभागे, आतां शांत हो आणि तुला सुख होईल अशा रीतीनें वहात रहा. जोंपर्यंत हें जगत् चालू आहे तोंपर्यंत ही माझी कीर्ति जगभर स्थिर राहो. "

रामानें यमुनेचा जलप्रवाह फिरविला हें अवलोकन करून व्रजवासी जनांनीं " साधु, साधु "( ठीक झालें, उत्तम गोष्ट झाली, ) असें म्हणत रामाला प्रणाम केला. नंतर वीरश्रेष्ठ बलरामानें त्या महाभाग नदीला व सर्व गोकुलवासीयांना निरोप दिला. आणि मग थोडा वेळ मनाशीं विचार करून त्या रोहिणीपुत्रानें पुनरपि त्वरेनें मथुरेप्रत गमन केलें. मथुरेला गेल्यावर पृथ्वीवरील सारभूत व अविकारी मधुसूदन घरामध्यें वावरत होता, त्याचें आधीं बलरामानें दर्शन घेतलें. रामानें वन्यवेष धारण केला असून त्याचे वक्षःस्थलावर ताज्या वनपुष्पांची माळ विराजत होती. याच स्थितींत त्यानें कृष्णाला आलिंगन दिलें. हलधारी राम त्वरेनें आपणांकडे येत आहे असें पहातांच गोविंदही लागलाच उठला आणि त्यानें रामाला आपलें आसन बसावयास दिलें. राम आसनोपविष्ट झाल्यावर जनार्दनानें त्याला गोकुलांतील सर्व गोधनांचें व गोपबांधवांचें कुशल पुसलें. लागलींच त्यानें आपल्या प्रियंवद

भ्रात्याला उत्तर केलें. " कृष्णा, ज्यांचें ज्यांचें तूं कुशल विचारतो आहेस, त्यांची सर्वतः कुशलता आहे. " नंतर वसुदेवाच्या देखत त्या रामकृष्णांच्या विचित्रार्थांनें भरलेल्या जुन्या काळच्या पुष्कळ गोष्टी झाल्या.

## अध्याय सत्तेचाळिसावा.

—:०:—

### रुक्मिणीस्वयंवराची प्रस्तावना.

वैशंपायन सांगतातः—रामकृष्णांच्या अशा गोष्टी चालल्या आहेत इतक्यांत जगतांतील बातम्या काढणारे (गुप्त) हेर त्या ठिकाणीं प्राप्त झाले. तें चक्रायुध श्रीकृष्णाचें घर म्हणजे हुबेहुब दिक्पालांच्या भवनांसारखें होतें. ज्या वार्तेपासून पुढें मोठा कलह सुरू होणार होता अशी बातमी आलेल्या हेरांनीं आणली होती. ते येतांच सर्व यदुश्रेष्ठांस सूचना होऊन ते कृष्णाच्या आज्ञेनें भरलेल्या सभेंत आपापल्या स्थानीं येऊन बसले. सर्व मुख्य मुख्य यादव सभास्थानीं जमल्यावर वार्ताहर हेरांनीं पार्थिवांच्या विनाशास कारण होणारी बातमी सांगण्यास आरंभ केला. ते म्हणाले " जनार्दना, पृथिवीवर राज्य करणारे सर्व नरपति एके ठिकाणीं लौकरच जमावयाचे आहेत. पुंडरीकाक्षा, भोजपुत्राच्या निमंत्रणावरून नानादेशचे राजे त्वरेनें कुंडिणपुराकडे जात आहेत. तेथें लोक (आपसांत) बोलत होते तें आमच्या कानीं पडून वरील प्रकारचें कारण आम्हांला विदित झालें आहे. जनार्दना, रुक्मिणी नांवाची रुक्मीची ज्येष्ठ भगिनी आहे. तिचा (लौकरच कुंडिनपुरीं) स्वयंवर व्हावयाचा आहे; त्या करितां, हे सर्व राजे ससैन्य तिकडे निघाले आहेत. यदुनंदना, आजपासून तिसऱ्या दिवशीं कनकालंकारांनीं युक्त असलेल्या त्या त्रैलोक्यसुंदरीचा स्वयंवर व्हावयाचा आहे. हत्ती, अश्व व रथ यांपैकीं कशावर तरी आरूढ होऊन त्या ठिकाणीं प्राप्त झालेल्या महात्म्या राजांचीं शेंकडों शिबिरें तेथें आमच्या दृष्टीस पडलीं. ते परस्पर विद्वेषी व सदा युद्धप्रिय असलेले राजे व्याघ्रसिंहाप्रमाणें दर्पयुक्त असून त्यांचें चालणें देखील मत्त हत्तींसारखें आहे. जयप्राप्तीकरितां (रुक्मिणी आपल्याला मिळावी म्हणून) हे सर्व राजे आपआपलीं सैन्यें बरोबर घेऊन जर त्वरेनें तिकडे जाऊन बसले आहेत तर आपण तरी भिल्लांसारखे जनावेगळे राहून निरुत्साही कां व्हावें? यदुनंदना, आपणही तिकडे जाऊं चला. "

हृदयाला शल्याप्रमाणें टोंचणारें हें हेरांचें भाषण श्रवण केल्यानंतर लागलींच यदुश्रेष्ठ केशवही सर्व यादवदळ बरोबर घेऊन तिकडे (कुंडिनपुराकडे) जाण्याकरितां निघाला. संग्रामासाठीं हुरूपलेले व आपल्या सामर्थ्याच्या गर्वानें फुगून गेलेले यादव उत्तम उत्तम रथांवर आरूढ होऊन दर्पित झालेल्या देवांप्रमाणें कृष्णाच्याबरोबर जाण्याकरितां सिद्ध झाले. सर्व सैन्य सिद्ध होऊन आज्ञेप्रमाणें त्याच्यापुढें निघालें. तेव्हां हातांत गदा व चक्र धारण केलेला शंकरप्रिय[1] कृष्ण फारच सुंदर दिसूं लागला. इतर यादव आपआपल्या सूर्यासारख्या देदीप्यमान रथांत बसून कृष्णाच्या मागून चालले होते. त्यांच्या रथांना लावलेल्या घुंगुर घंटा कर्णमधुर वाजत होत्या.

मथुरेहून प्रयाण करण्याच्या वेळीं निश्चित, दूरदर्शी गोविंद उग्रसेनाला म्हणाला " हे निष्पाप नृपशार्दूला, तूं व बलराम येथेंच रहा.

---

१ येथे या विशेषणाचें औचित्य आम्हास नीटसें कळलें नाहीं. कदाचित्, ' ईशानसंमत ' या मूळ शब्दाचा अर्थ " शंकर तूल्य " पराक्रमी असा केल्यास कांहीं तरी बरे असें वाटतें.

नाहींतर, हे वीरा, आपण सर्वच निघून गेलों म्हणजे ही नगरी शून्य झाली असें पाहून कपटपटु व राजनीतिकोविद क्षत्रिय राजे हिच्यावर हल्ला करितील. देव ज्याप्रमाणें स्वर्गलोकीं निर्भयपणें वास करितात त्याप्रमाणें आपल्याला भिणारे जरासंधानुयायी राजे कुंडिनपुरामध्यें सुखानें आनंदोत्सव करीत आहेत.

वैशंपायन सांगतातः–कृष्णाचें हें वाक्य श्रवण करून महायशस्वी भोजराजानें कृष्णावरील प्रेमानें सद्गदित होऊन जाऊन अमृतासारखें ( पुढील ) मधुर भाषण केलें. तो म्हणालाः " हे कृष्णा, अरे महाबाहु कृष्णा, यादवानंदवर्धका, रिपुसूदना, मीं आतां जें कांहीं सांगतों तें ऐकून घे. अरे, पतीवांचून स्त्रियांना ज्याप्रमाणें कोणतीही गोष्ट गोड लागत नाहीं त्याप्रमाणें तूं नसलास ( तुझ्यावांचून ) म्हणजे या मथुरेमध्यें किंवा या भोजदेशांत आम्हांला सुख लागणार नाहीं. बाबारे, तुझ्या बाहुबलाचा आश्रय आम्हांला असला म्हणजे तुझ्या छत्राखालीं राहून हे मानदा, इंद्राची मदत घेऊन जरी सर्व राजे आमच्यावर चाल करून आले तरी आम्ही त्यांना भिणार नाहीं. म्हणून म्हणतों कीं, हे यदुश्रेष्ठा, तूं विजयसंपादनाकरितां जेथें जेथें जाशील तेथें तेथें आम्हांलाहि तूं घेऊन चल." उग्रसेनराजाचें हें भाषण ऐकून देवकीनंदन कृष्ण स्मित करून म्हणाला "बरें तर, आतां तुम्हाला इष्ट होईल तसें मी सर्व कांहीं करितों. तुम्ही बिलकूल शंका मनांत आणूं नका."

वैशंपायन सांगतातः--इतकें बोलल्यानंतर कृष्ण जो रथांत बसून जलदीनें निघाला, तो सूर्यास्त[1] होण्याच्या सुमारास, भीष्मकराजाच्या नगरामध्यें येऊन पोंचला. त्या ठिकाणीं जिकडे तिकडे शिबिरें पसरलीं असून बरेच राजे समारंभाकरितां आले आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेथील प्रशस्त सभास्थान पाहून त्याचे मनांत राजस–विचार[1] उत्पन्न झाले. राजेलोकांना त्रासवून सोडण्यासाठीं व आपला पुरातन कालापासून अनेकशः प्रगट झालेला प्रभाव पुनरपि लोकांच्या प्रत्ययास आणून देण्यासाठीं, त्यानें मनामध्यें महाबल वैनतेयाचें स्मरण केलें. स्मरण करतांक्षणींच स्वामीचा भाव ओळखून विनतानंदन गरुड सौम्य स्वरूप धारण करून केशवापाशीं येऊन स्तब्ध झाला. जरी गरूडानें सौम्य रूप धरलें होतें, तरी तो श्रीकृष्णापाशीं पंख फडफडवीत येत असतां क्षुब्ध झालेल्या वायूनें सर्व माणसें कांपूं लागून जमिनीवर उपडीं पडलीं. त्यांची वर उडण्याची शक्ति पार नाहींशी होऊन गरुडाच्या तडाक्यांत सांपडलेले सर्व मानवप्राणी सर्पासारखे वळवळ करूं लागले. गरुडाच्या पंख फडफडवण्यानें सर्व राजांनीं भूमीवर लोटांगणें घातलीं आहेत असें दिसत असतां कृष्ण मात्र पर्वताप्रमाणें निश्चळ राहिला होता. परंतु या चिह्नावरून गरुड येत आहे असें अनुमान करून त्यानें त्या पतत्रिवराचा मनोमय सत्कार केला. इतक्यांत दिव्य माळा व उटी यांनीं युक्त असलेला गरुड तेथें प्रत्यक्ष प्राप्त झाला आहे असें श्रीकृष्णाच्या दृष्टीस पडलें. तो एकसारखा पंख हालवीत होता त्यामुळें पृथ्वी कांपत होती. त्याच्या पाठीवरील आयुधें सर्पाप्रमाणें जणूं काय त्याला चाटीत होतीं. श्रीकृष्णाचा हस्तस्पर्श व्हावा या हेतूनें तो किंचित् अवनत झाला होता व आपल्या पायांनीं शुभ्रवर्ण सर्पश्रेष्ठास ओढीत होता. त्याचा देह

[1] मूळांत 'लोहितायति भास्करे' असे शब्द आहेत. त्यांचा शब्दशः अर्थ 'सूर्य लाल झाला असतां' असा होतो.

[1] काम, क्रोध, जमलेल्या राजांविषयीं असूया, रुक्मिणीविषयीं ममत्व इत्यादि, कारण, हे रजोगुणाचे परिणाम.

सुवर्णवर्णाचे पंखांनीं फुगला असल्यामुळें तो धातुयुक्त पर्वताप्रमाणें दिसत होता. या गरुडानेंच सर्पेंद्रांचा निःपात करून व सर्व दैत्यांना त्रासवून प्रथम अमृत हरण करून आणलें. आपल्या ध्वजावर आरूढ होणारा, व प्रसंगीं आपलें वाहन होणारा, किंबहुना कोणत्याही संकटकालीं सहाय्य करणारा आपला मंत्रीच, असा आपला धैर्यशील व प्रतिदेवतुल्य गरुड आपल्या चिन्हांसह ( स्मरण करतांच ) समीप आलेला पाहून श्रीकृष्णाला अत्यानंद झाला व आपल्या सामर्थ्यास अनुरूप अशी वाणी उच्चारून तो गरुडाला ह्मणाला.

श्रीकृष्ण बोलतोः—"हे खेचरश्रेष्ठा, हे सुरसेनारिमर्दना, हे विनतानंदहृदया, हे केशवप्रिया, तुझें स्वागत असो. हे पक्षिश्रेष्ठा, आतांच्या आतां भीष्मकराजाचा पिता जो कैशिक त्याच्या भवनाकडे ( मला घेऊन ) चल. त्या ठिकाणीं जाऊन आज आपण स्वयंवराची वाट पहात राहूं. हत्ती, अश्व व रथ यांवर आरूढ होऊन कोण कोण व किती महात्मे राजे तेथें गोळा झाले आहेत, तेंही तेथें गेल्यावर आपल्याला समजेल."

याप्रमाणें महाबल गरुडाला आज्ञा करून श्रीमान् व गरुडाचा सखा कृष्ण महारथी यादवांसह महाबाहु महात्म्या कैशिकाच्या नगरीप्रत गेला. देवकीचा पुत्र कृष्ण विदर्भनगरीमध्यें येऊन पोंचतांच, आयुधें व शस्त्रें धारण करणारे सर्व बलशाली राजे हर्षित होऊन निवासस्थानें तयार करूं लागले.

वैशंपायन सांगतातः—इतकें होत आहे तों नीतिकुशल कौशिकराजानें मुदितचित्तानें कृष्णाला उत्थापन देऊन स्वतः अर्घ्य व आचमन समर्पण केलें. विधिपूर्वक त्याचा एकंदर सत्कार केल्यावर कैशिकानें कृष्णाला आपल्या विदर्भनगरींत आणिलें. कैशिकानें त्याच्यासाठीं एक दिव्य मंदिर अगोदरच तयार करविलें होतें. त्यांत त्या श्रीमान् कृष्णानें शंकर जसा कैलासपर्वतावर आरूढ होतो त्याप्रमाणें सैन्यासहवर्तमान प्रवेश केला. त्या मंदिरामध्यें उपेंद्रासाठीं खाद्यपेयादि पदार्थ व असंख्य रत्नें तयार ठेविलीं होतीं. एवंच, कृष्णानें मोठ्या सुखानें त्या कैशिकाच्या मंदिरामध्यें वास्तव्य केलें. कैशिकानेंही मोठ्या सन्मानानें व स्नेहपूर्ण चित्तानें कृष्णाचा गौरव केला.

## अध्याय अठ्ठेचाळिसावा.

—:०:—

### जरासंध व सुनीथ यांचीं भाषणें.

वैशंपायन सांगतातः—वैनतेयासह अच्युत कृष्ण विदर्भनगरीमध्यें प्राप्त झाला आहे असें पाहून सर्व नृपतिश्रेष्ठांना मोठी चिंता उत्पन्न झाली. राजन्, त्या मंत्रकुशल व महापराक्रमी राजांना नीति व शास्त्रार्थ उत्तम प्रकारें अवगत असल्यामुळें त्यांनीं पुढें कसें करावयाचें हें सर्वांनीं मिळून ठरविण्याकरितां सभा भरविण्याची योजना केली. देव जसे देवसभेमध्यें आपआपल्या स्थानीं विराजमान होतात, त्याप्रमाणें भीष्मक राजाच्या सुवर्णभूषित रमणीय सभास्थानीं, ज्यांवर चित्रविचित्र आस्तरणें घातलीं आहेत, अशा विविध सिंहासनांवर सर्व नृपश्रेष्ठ ( आपआपल्या दरजाप्रमाणें ) अधिष्ठित झाले. नंतर इंद्र जसा देवांना उद्देशून भाषण करतो त्याप्रमाणें सर्व राजे लोकांत विशेष बलिष्ठ व तेजस्वी असलेला महाबाहु जरासंध त्या राजसभेंत बोलूं लागला:

जरासंध बोलतोः—"हे वक्तृश्रेष्ठ नृपवरहो, हे महाबुद्धिमंत भीष्मकराजा, मी आपल्या समजुतीप्रमाणें जें कांहीं सांगतों तें सर्वजण ( कृपेनें ) ऐकून घ्या. हा जो कृष्ण या नांवाचा

वसुदेवाचा बलिष्ठ व महातेजस्वी पुत्र गरुडाला बरोबर घेऊन सर्व यादवांसहवर्तमान रुक्मिणी आपल्याला प्राप्त व्हावी या हेतूनें कुंडिनपुराला आला आहे, तो रुक्मिणीप्राप्तीसाठीं शक्य ते यत्न केल्यावांचून रहावयाचा नाहीं. म्हणून हे नृपशार्दूलांनो, सरळ राजनीतीस अनुसरून या बाबतींत स्वोत्कर्षार्थ कांहीं तुम्हांला करणें असेल तर बलाबलाचा पूर्ण विचार करून मग काय तें करा. महापराक्रमी उभयतां वसुदेवपुत्रांनीं गरुडाचें व रथाचें साहाय्य नसतांना देखील पर्वतश्रेष्ठ गोमंतावर केवढा महाभयंकर रणसंग्राम केला तो तुम्हांला विदितच आहे. सांप्रत त्यांचे बरोबर भोज, अंधक इत्यादि महारथी वृष्णी व यादव वीर आलेले आहेत. तेव्हां हे सर्व मिळून युद्ध करूं लागले म्हणजे केवढा पराक्रम करतील याचा नीट विचार करा. गरुडावर अधिष्ठित होऊन प्रत्यक्ष श्रीविष्णु ( कृष्ण ) कन्याप्राप्तीसाठीं यत्न करूं लागला म्हणजे त्याच्यापुढें ( नुसतें ) उभें राहण्याची तरी कोणाची ताकद आहे? सर्व देवांसहवर्तमान इंद्राची सुद्धां त्याचा प्रतिकार करण्याची प्राज्ञा नाहीं ( मग इतरांची काय कथा? ) जरी याला कदाचित् ( सुखानें ) कन्या अर्पण केली नाहीं तरी हा बलात्कारानें तिचें हरण करण्यास समर्थ आहे. आमच्या असें ऐकण्यांत आहे कीं, ( जलप्रलय होऊन ) ही पृथ्वी भयंकर महार्णवांत बुडून पातालाच्या तळाशीं गेली होती, त्या वेळीं सर्वशक्तिमान् व जगत्स्रष्ट्या विष्णूनें वराहरूप धारण करून तिला जलांतून वर काढलें, त्या कामीं वराहरूपी विष्णूनें हिरण्याक्ष नामक दैत्येंद्राचा वध केला; तसेंच हिरण्यकशिपु नामक एक महाबलिष्ठ व पराक्रमी दैत्य होऊन गेला. देव, दैत्य, ऋषि, गंधर्व, किन्नर, यक्ष, राक्षस किंवा नाग इत्यादिकांपासून पृथ्वीवर, अंतराळीं किंवा आकाशांत, रात्रीं अगर दिवसा, किंवा शुष्क अथवा आर्द्र वस्तूपासूनही त्याला मरणाचें भय नव्हतें. याप्रमाणें त्रैलोक्यामध्यें अवध्य व अपराभूत असलेल्या दैत्यश्रेष्ठालाही पुरातन कालीं विष्णूनें नरसिंह रूप घेऊन ठार मारलें. पुढें कश्यपापासून अदितीच्या पोटीं वामन रूपानें बलाढ्य अवतार धारण करून श्रीविष्णूनें असुरश्रेष्ठ बलीला सत्याच्या ( वचनाच्या ) पेंचांत घालून पाताललोकीं पाठवून दिलें. यानंतर पृथ्वीतलावर सहस्रबाहु व महापराक्रमी कार्तवीर्य, दत्तात्रेयाच्या प्रसादानें व राज्यमदानें फार उन्मत्त झाला; तेव्हां त्रेता व द्वापर या युगांच्या संधीला जमदग्नीपासून रेणुकेच्या पोटीं गर्भसंभव होऊन शस्त्रधारी वीरांतील श्रेष्ठ व महातेजस्वी परशुराम जन्मास आला व त्यानें आपल्या वज्रप्राय परशूनें सप्तद्वीपांचा स्वामी जो राजा सहस्रार्जुन त्याला यमसदन दाखविलें. तात्पर्य, पुनरपि विष्णूनें अवतार धारण करून हैहयाला नाहींसा केला. परशुरामाचे मागून इक्ष्वाकु कुलामध्यें दाशरथि राम जन्मास येऊन त्यानें त्रैलोक्यविजयी पराक्रमी रावणाचा उच्छेद केला.

याशिवाय, अगदीं आरंभीं कृतयुगामध्यें तारकासुराबरोबर झालेल्या संग्रामांत पराक्रमी विष्णूनें गरुडावर आरूढ होऊन वरप्रदानानें फुगून गेलेल्या दैत्यांस आपल्या अष्टभुजांनीं स्वर्गलोक दाखविला. कालनेमि नामक दैत्यानें देवांना अत्यंत त्रासवून सोडलें होतें त्यालाही विष्णूनें आपल्या रवितुल्य चक्रानें युद्धामध्यें ठार केलें.

याप्रमाणें वेळोवेळीं आपल्या अपूर्व योगबलानें अनंत रूपें धारण करून श्रीविष्णूनें ज्यांची कालमर्यादा भरली अशा बहुत असुरांचा वध केला आहे. ( फार लांब कशाला? ) या कृष्णानेंही लहान असतांना, प्रलंब, अरिष्ट

व धेनुक या महाबलिष्ठ व पराक्रमी वनचर दैत्यांना वनामध्यें ठार केलें आहे. बहुत काय सांगूं, या देवकीनंदन कृष्णानें गोपरूप धारण करून (क्रमानें) शकुनी, केशी, यमलार्जुन, कुवलापीड नामक हत्ती व चाणूर व मुष्टिक हे मल्ल आणि शेवटीं बलिश्रेष्ठ कंस व त्याचे अनुयायी यांचें लीलेनें हनन केलें. सारांश, याप्रकारें सर्वशक्तिमान् व चक्रधारी विष्णूनें अनेक दिव्य व छद्मरूपें धारण करून अद्भुत पराक्रम केले आहेत. म्हणून मला जें कांहीं वाटत आहे तें मी तुमचें हित व्हावें या हेतूनें तुम्हांला सांगतों.

हा कृष्ण म्हणजे प्रत्यक्ष केशव, विष्णु, आदिदेव व असुरांतक नारायण, जगज्जनक, शाश्वत पुराणपुरुष, सर्व भूतांचा स्रष्टा, व्यक्ताव्यक्त, सनातन, सर्व लोकांना अगोचर, जगद्वंद्य, अनाद्यनंत, मध्यरहित, क्षर, अक्षर, शाश्वत, स्वयंभू, अज, स्थाणु, चराचरांस अजेय, त्रिविक्रम, त्रिलोकेश, देवेंद्र व रिपुघ्न आहे, असें मला वाटतें. मथुरेमध्यें ज्यांत पुष्कळ चक्रवर्ती राजे होऊन गेले अशा विख्यात व प्रचंड कुलांत हा ईश्वरच जन्मास आला आहे, अशी माझी पूर्ण समजूत झाली आहे. नाहींतर, एखाद्या मर्त्य मनुष्याला गरुडासारखें वाहन कसें प्राप्त होईल? कन्याप्राप्तीसाठीं प्रत्यक्ष जनार्दन आपलें अलौकिक सामर्थ्य प्रगट करूं लागला म्हणजे मोठा बलिष्ठ असला तरी कोणता पुरुष त्याच्या गरुडापुढें टिकाव धरील? रुक्मिणीच्या स्वयंवरासाठीं प्रत्यक्ष विष्णु या ठिकाणीं प्राप्त झाला आहे. कोठेंही विष्णु प्राप्त झाला म्हणजे मोठा अनर्थ ओढवतो असा सिद्धांत आहे. म्हणून पुढें जो संकेत ठरवावयाचा असेल तो या सर्व गोष्टींचा विचार करून मग ठरवा. (एवढेंच माझें तुम्हांला सांगणें आहे.)"

वैशंपायन सांगतातः—मागधराज जरासंधानें याप्रमाणें भाषण केल्यानंतर महाप्राज्ञ सुनीथ बोलूं लागला.

सुनीथ बोलतोः—"महाबाहु मगधाधिपति जरासंध जें सांगत आहे, तें अगदीं बरोबर आहे. गोमंताचलावर झालेल्या युद्धांत मनुष्य व देव यांच्या समक्ष रामकृष्णांनीं मोठा अलौकिक पराक्रम केला. त्या वेळीं आपल्या मोठ्या प्रचंड थोरल्या सैन्यामध्यें हत्ती, अश्व, रथ, ध्वज (पताका) व पायदळ यांची गर्दी असूनही चक्र व हल यांच्यापासून उत्पन्न झालेल्या आगीनें तें सर्व सैन्य जळून खाक झालें. त्या वेळीं राजसेनेचा जो भयंकर नाश झाला तो मनांत आणून पुनः असें पुढें होऊं नये या इच्छेनें श्रीमान् मागधराजानें आपले (दूरदर्शी) विचार प्रकट केले आहेत. गोमंताचलावरील युद्धांत रामकृष्ण जरी (रथविरहित) पायींच लढत होते, तरी त्या समयीं आपल्या सैनिकांचा भयंकर नाश झाला. कोणाच्यानेंही त्यांचें निवारण करवलें नाहीं. नृपोत्तमहो, कृष्णाचा गरुड जेव्हां इकडून गेला तेव्हां काय चमत्कार झाला तो तुम्हांला विदितच आहे. त्याच्या पंखांच्या वेगामुळें उत्पन्न झालेल्या वायूनें उडून आकाशसंचारी प्राणी गरगर फिरूं लागले. सागर खवळून जाऊन पृथ्वी व पर्वत हीं वारंवार कंपायमान होऊं लागलीं. इतकेंच नव्हे, तर आपल्याला भेदरी बसली व हा कसला उत्पात आहे असें वाटून आपण एकंदरीनें फार विव्हल झालों. अशा गरुडावर आरूढ होऊन व चिलखत चढवून कृष्ण युद्ध करूं लागला म्हणजे रणामध्यें त्याच्या समोर उभें राहाण्याची आपल्यासारख्या दुर्बलांची काय ताकद आहे? वस्तुतः स्वयंवर म्हटला म्हणजे, राजांना तो मोठा आनंदोत्सव वाटला पाहिजे. पूर्वकालीन राजांनीं

( आपल्या पराक्रमानें ) हा यश व धर्म संपादन करण्याचा मार्ग आहे, असें सिद्ध केलें आहे. परंतु हे नृपहो, कृष्ण आज कुंडिनपुरास आला असल्याकारणानें पुनः महापुरुषांचा या ठिकाणीं संग्राम होणार कीं काय अशी भीति वाटते. जर या नृपात्मजेनें ( रुक्मिणीनें ) ( कृष्णाशिवाय ) दुसऱ्या एखाद्या राजाला वरलें तर कृष्णाच्या बाहुबलाचा मार कोणता वीर सहन करणार आहे ? स्वयंवर महोत्सवामध्यें हा मोठा दोष आहे ( कीं तेथें लढाई जुंपावयाचीच ) असें सांगितलें आहे. स्वयंवराकरितां तर कृष्ण व आपण सर्व राजे या ठिकाणीं प्राप्त झालों आहों. ( एकंदर गोष्टींचा विचार केला असतां, ) जरासंध म्हणतो त्याप्रमाणें कन्याप्राप्तीसाठीं कृष्ण या ठिकाणीं आला आहे, ही गोष्ट अगदीं घातक आहे असें मलाही वाटतें. ”

## अध्याय एकुणपन्नासावा.

—:o:—

### दंतवक्राचें भाषण व भीष्मकराजाचा निश्चय.

वैशंपायन सांगतातः—महात्म्या सुनीथाचें याप्रमाणें भाषण झाल्यावर करूष देशच्या पराक्रमी राजा दंतवक्रानें बोलण्यास आरंभ केला.

दंतवक्र बोलतोः—“नराधिपहो, सुनीथ व जरासंध यांनीं आपल्या हिताचे जे दोन शब्द आपल्याला सांगितले ते अगदीं सयुक्तिक आहेत, असें माझें देखील मत आहे. त्यांच्या द्वेषानें, ( स्वतःच्या बुद्धिसामर्थ्याच्या ) अभिमानानें, किंवा आपली दुसऱ्यांवर सरशी व्हावी या हेतूनें, मी त्यांच्या वचनामृताला दोष लावीत आहें असें समजूं नका. राजसभेमध्यें, सागरासारखें गंभीर व खोल आणि नीतिशास्त्रास धरून असें भाषण करण्याची त्यांच्यावांचून दुसऱ्या कोणाची ताकद आहे ? परंतु मीही तुह्माला ( झालेल्या गोष्टींचें ) स्मरण देण्याकरितां जें काय सांगतों तेंही ऐकून घ्या. नराधिपहो, मी ह्मणतों कीं, कृष्ण या ठिकाणीं आला यांत तुह्मांला आश्चर्य तें कसलें वाटतें ? आपण जसे येथें रुक्मिणीच्या प्राप्तीसाठीं आलों आहों तसाच कृष्णही आला आहे. यांत दोष अगर गौणपणा तो काय झाला ? तसेंच आपण सर्वांनीं संगनमत करून गोमंतपर्वताला वेढा दिल्यानंतर त्यांनीं आपल्याशीं युद्ध केलें यांत त्यांच्याकडे दोष कसा येतो ? राजन्, उभयतां रामकृष्ण वनवासी होऊन वृंदावनामध्यें ( निमूटपणें ) राहिले होते. परंतु, नारदाच्या सांगण्यावरून कंसाला व्यामोह उत्पन्न होऊन त्यानेंच ( प्रथम ) त्यांचा वध करण्याकरितां त्यांस मथुरेस बोलवून घेतलें. नंतर त्यांच्या अंगावर ( रंगद्वारीं ) कुवलयापीड नामक हत्ती घातल्यामुळें चिडून जाऊन त्या वीरांनीं हत्तीला मारून रंगसभेमध्यें प्रवेश केला. मग तेथें मृतप्राय गाफील होऊन बसलेल्या कंसाला व त्याच्या अनुगांना त्यांनीं स्वपराक्रमानें ठार मारलें. बरें, कंसाला मारून आमच्यासारख्या वयोवृद्ध राजांशीं त्यानें विरोध केला ह्मणून आपण सर्वांनीं मिळून जर त्याला उपरोध केला तर यांत आपली तरी काय चूक ? आपलें प्रचंड सैन्य पाहून बलराम व कृष्ण भयभीत झाले व त्यांनीं आपलें सैन्य व नगर यांचा त्याग करून गोमंताचलाची वाट धरली. परंतु त्यांची पिच्छा न सोडतां त्यांचा वध करण्याकरितां आपण रणशूर राजे तेथपर्यंत गेलों. ते दोघे बालवीर पायावरच युद्ध करीत होते, ह्मणून हत्ती, अश्व, रथ किंवा पदाति इत्यादिकांनीं त्यांच्याशीं संग्राम न करितां क्षात्रधर्मास अनुसरून आपण गोमंताचलाला वेढा घालून आग लावून दिली. कारण तप-

स्व्यांना दावाग्नीनें मरण येणें चांगलें. परंतु त्यांनीं तपस्वीधर्म पाळला नाहीं. कृष्ण तपस्व्यास अनुरूप असें वर्तन करील व नरम येईल अशी आपणां सर्व क्षत्रियश्रेष्ठांची समजूत होती पण तसें न वागतां त्यानें उलट आमच्याशीं युद्ध केलें, ह्मणून आपण जनार्दनाला दोष देत आहों. ( हें योग्य आहे काय ? याचा तुम्हीं विचार करा. )

आपण ज्या ज्या ठिकाणीं जातों, तेथें तेथें कलह उत्पन्न होतो (असें आजपर्यंत घडून आलें आहे ). ह्मणून मी ह्मणतों कीं, या वेळीं आपण सर्व राजांनीं कृष्णाशीं मैत्री करण्याचा प्रयत्न करूं या. कृष्ण जो कुंडिनपुराला आला आहे तो कांहीं कलह करण्याचे हेतूनें आलेला नाहीं. कन्याप्राप्तीसाठीं जर तो या ठिकाणीं प्राप्त झालेला आहे तर दुसऱ्याशीं युद्ध करण्याचें त्याला प्रयोजन काय? या मर्त्यलोकांतील तो यःकश्चित् प्राकृत मनुष्य नसून सर्वांत अग्रगण्य आहे. किंबहुना तो पुरुषोत्तम देवलोकांतील देवांमध्यें देखील श्रेष्ठ आहे. फार काय सांगूं, तो या जगताचा व देवांचा जनक आहे. याची बुद्धि बालिश नसून याला ईर्ष्या किंवा मत्सर यांचा स्पर्श देखील नाहीं. याला गर्व नाहीं. हा कृपण अगर आर्तही नाहीं. परंतु, याला मात्र जे आर्त लोक शरण येतात त्यांचा दुःखभार हरण करण्याकरितां हा नेहमीं तत्पर असतो. हा सर्वशक्तिमान् कृष्ण प्रत्यक्ष विष्णु ( असून ) देवांचा देव आहे. स्वयंवराच्या मिषानें आपल्या सत्यस्वरूपाचा लोकांना प्रत्यय आणून देण्याच्या हेतूनें हा गरुडासह येथें प्राप्त झाला आहे. शत्रूंचा विनाश करावयाचा असला ह्मणजे कृष्ण नानाप्रकारचीं अस्त्रें बरोबर घेऊन जातो. सांप्रत भोज, वृष्णी, अंधक इत्यादि यादवश्रेष्ठांसह कृष्ण येथें आला आहे तो कलह उकरून काढण्यासाठीं आलेला नाहीं प्रीतिसंपादनासाठींच आला आहे, असें समजा. नराधिपहो, अर्घ्याचमन समर्पण करून आपण सर्व मिळून या कृष्णाचें आतिथ्य करूं या. याप्रमाणें कृष्णाशीं आपण सामोपचारानें वागलों ह्मणजे आपल्याला कोणतीही चिंता, भय किंवा त्रास बाळगण्याचें कारण नाहीं."

सुबुद्ध दंतवक्राचें भाषण संपल्यानंतर वक्तृश्रेष्ठ शाल्व त्या राजांना उद्देशून बोलला.

शाल्व सांगतोः--"कृष्णाला भिऊन त्याच्याशीं संधि करावयाचा म्हणजे त्याच्या भयानें आपण शस्त्रत्याग करावयाचा कीं काय ? दुसऱ्याची स्तुति करून किंवा आपल्या सामर्थ्याची निंदा करून आपल्याला कोणता फायदा होणार ? खरोखर असें करणें हा क्षात्रवृत्तीच्या नरेंद्रांचा धर्म नव्हे. विख्यात राजांच्या वंशांमध्यें आपापल्या कुलाची कीर्ति वृद्धिंगत करण्यासाठीं आपण जन्मास आलों आहों. तेव्हां आपल्याला अशी भित्र्या माणसासारखी बुद्धि व्हावी हें कांहीं चांगलें नाहीं. कृष्ण हा सनातन आदिदेव, सर्व देवेंद्रांचा प्रभु, प्रत्यक्ष वैकुंठवासी व अजिंक्य नारायण, चराचराचा गुरु, साक्षात् लोकवंद्य हरि किंवा विष्णु, कंसराजाचा वध करण्याकरितां, ( दुष्टांचा वध करून ) पृथ्वीला झालेला भार हलका करण्याकरितां, आमच्या ( सारख्या दुष्कर्मी लोकांचा ) उच्छेद करण्याकरितां आणि जगत्संरक्षणासाठीं, देवकीच्या पोटीं अवतीर्ण झाला आहे हें मला विदित आहे. कृष्णावतार धारण करून श्रीविष्णु जीं अघटित कृत्यें करणार तींही सर्व मला ठाऊक आहेत. आपला राजेलोकांचा त्याच्याशीं अतुल संग्राम होऊन अखेर त्याच्या चक्रानलानें दग्ध होत्साते आपण कालवश व्हावयाचे आहों. परंतु, मला एक तत्व माहीत आहे. राजेंद्रांनो, आयुर्दाय संपल्यावांचून कोणी मरत नाहीं.

मृत्यु अकालीं ( घडी भरल्याशिवाय ) कोणालाही ओढून नेत नाहीं व वेळ भरल्यावर कोणालाही येथें ठेवीत नाहीं. आणि हाच मनाचा निश्चय करून कोणी कोणाचें भय बाळगूं नये.

दैत्येंद्रांच्या पुण्याचा क्षय झाला व त्यांच्या पापाचे घडे भरले म्हणजे योगवेत्ता भगवान् विष्णु त्यांचा उच्छेद करतो. विरोचनाचा महाबलाढ्य व अवध्य पुत्र जो बली त्याला बांधून देवाधिदेवानें ( विष्णूनें ) घडी भरतांच पातालामध्यें नेऊन घातलें. नराधिपहो, या प्रकारचे विष्णूनें अनेक अद्भुत पराक्रम केले आहेत. तेव्हां कलह होईल किंवा नाहीं याची जी तुम्हीं चिकित्सा चालविली आहे त्यांत कांहीं एक अर्थ नाहीं. वस्तुतः कृष्ण येथें संग्रामासाठीं आलेला नाहीं. स्वयंवरांत कन्या ज्याला खुषीनें वरील त्याची ती स्त्री होईल. यांत कलह होण्याचें कारण काय ? मला वाटतें कीं, या गोष्टीनें सर्व राजेलोकांचें सख्य उलट वृद्धिंगत होईल."

वैशंपायन सांगतातः--याप्रमाणें बुद्धिशाली राजे आपआपल्या परीनें बुद्धिवाद सांगत असतांना भीष्मकराजा पुत्राच्या भीतीनें कांहीं एक न बोलतां स्तब्ध बसला होता. आपला रणशूर व अतिरथी पुत्र महापराक्रमी असल्यामुळें मदोन्मत्त झाला असून त्याला परशुरामाच्या अस्त्रांची प्राप्ति झालेली असल्याकारणानें आपल्या जीविताची बिलकूल काळजी नाहीं, इत्यादि गोष्टी मनांत आणून भीष्मक ( स्वतःशीं ) म्हणाला "सामर्थ्याच्या वृथाभिमानानें फुगून गेलेल्या माझ्या पुत्राला कृष्णाचा उत्कर्ष कधींही सहन होत नाहीं. गर्विष्ठपणामुळें त्याला रणामध्यें कोणाचीही भीति वाटत नाहीं. कृष्णाच्या बाहुबलानें[1] रुक्मिणी कृष्णाचे हातीं जाणार यांत संशय नाहीं आणि या गोष्टीमुळें मला वाटतें कीं येथें पराक्रमी लोकांमध्यें मोठें रण माजून रहाणार. मग त्या रणांतून हा माझा कृष्णद्वेषी व अभिमानी पुत्र कसचा जिवंत सुटतो ? कृष्णाच्या हातून माझा पुत्र जिवंत सुटेल असें मला तर दिसत नाहीं. पूर्वजांना संतोष देणाऱ्या माझ्या ज्येष्ठ पुत्राबरोबर कृष्णाला किंवा कृष्णाबरोबर माझ्या पुत्राला कन्येनिमित्त युद्ध करावयास मी कसा बरें लावूं ? रुक्मीला कृष्णदेव हा वर पसंत नाहीं.[2] बरें, रुक्मी मूर्ख व मदोन्मत्त आहे. रणामध्यें पाठ दाखवून कांहीं तो पळावयाचा नाहीं आणि म्हणूनच अग्नीच्या योगानें कापसाचा ढीग जसा क्षणार्धांत जळून खाक होतो तद्वत्, माझ्या पुत्राची निःसंशय रणामध्यें रक्षा होणार असें मला वाटतें. चित्रयोधी ( नाना प्रकारांनीं युद्ध करणाऱ्या ) व बलिष्ठ केशवानें करवीरपुराच्या शूर शृगालराजाला एका क्षणामध्यें भस्म केलें. बलवंतांतलि अग्रगण्य श्रीमान् कृष्ण वृंदावनामध्यें वास्तव्य करीत असतांना त्यानें एका बोटानें ( हातानें ) गोवर्धन पर्वत सात दिवसपर्यंत उचलून धरला. त्याच्या एक एक अघटित कृत्याची आठवण झाली म्हणजे माझें मन अगदीं खिन्न होऊन जातें. प्रत्यक्ष वृत्रहंता शचीपति इंद्र देवतांसहवर्तमान गोवर्धन पर्वतावर आला व त्यानें कृष्णाला अभिषेक करून 'उपेंद्र' अशी संज्ञा दिली. त्याचप्रमाणें यमुनानदीच्या डोहामध्यें विषाग्नीचे

[1] किंवा कृष्णाचें बाहुवीर्य पाहतांच हा माझा पुत्र युद्धांत ओढला जाणार, आपण होऊन युद्धांत पडणार, असाहि अर्थ संभवतो. वांईकरांनीं 'न्हियते' याचा अर्थ 'लाज वाटते' असा केला आहे (?).

[2] आमचा पाठ 'नच नारायणं' हा आहे. वांईकरांचा 'स च०' आहे (?).

फूत्कार सोडणारा कालांतकासारखा भयंकर व घोर कालिया नाग होता, त्याचें या नारायणानें खेळतां खेळतां दमन केलें. देवांना देखील अजिंक्य इतका महापराक्रमी व अश्वदेहधारी केशी नामक राक्षस होता, त्याचाही वासुदेवानें ( क्षणार्धांत ) वध केला. सांदीपनि गुरूचा पुत्र सागरामध्यें नाहींसा होऊन पुष्कळ दिवस लोटले होते. त्यानंतर पुष्कळ दिवसांनीं पंचजन दैत्याचा वध करून कृष्णानें त्या गुरुपुत्राला यमलोकांतून परत आणिलें. गोमंताचलावर पुष्कळ राजांनीं ( ससैन्य ) त्या उभयतांस वेढलें असतां मोठें तुंबळ व भयप्रद युद्ध होऊन हत्ती, अश्व व रथ इत्यादिकांचा भयंकर नाश झाला. त्या वेळीं या दोघां महावीर्यशाली वसुदेवपुत्रांनीं गजारूढ होऊन हस्ती-समूहास, रथारूढ होऊन रथांत बसलेल्या योद्ध्यांस, अश्वारूढ होऊन घोडेस्वारांस व पायीं लढून पदातींस ठार मारलें. इतका हत्ती, अश्व व रथ यांचा भयंकर नाश, ( आजपर्यंत ) देव, दैत्य, गंधर्व, यक्ष, उरग, राक्षस, नाग, दैत्येंद्र, पिशाच किंवा गुह्यक यांतील कोणींही केलेला नाहीं. त्या संग्रामाचें स्मरण झालें म्हणजे मन फार उद्विग्न होतें. या जगतांत सुरोत्तम वासुदेवासारखा ( पराक्रमी ) मनुष्य मीं पाहिलेला नाहीं किंवा माझ्या ऐकण्यांतही नाहीं. महाबाहु दंतवक्र राजा जें सांगत आहे तें अगदीं बरोबर आहे. महापराक्रमी कृष्णाला प्रसन्न करून मग जें उचित असेल तें आपण करूं."

वैशंपायन सांगतातः—याप्रकारें साधकबाधक गोष्टींचा आपल्या मनाशीं विचारपूर्वक निश्चय करून श्रीकृष्णाला प्रसन्न करण्याकरितां त्याच्यापाशीं जाण्याचें भीष्मक राजानें ठरविलें.

याप्रमाणें पुष्कळ नयशाली राजांबरोबर तो राजेंद्र विचार करीत बसला असतां सूत, मागध व बंदिजन यांचे स्तुतिपाठ व मंगल गीतें ऐकूं येऊं लागलीं; त्या योगानें पहांट झाली असें सर्वत्रांस विदित झालें. रात्र संपून प्रभात कालाला आरंभ झाल्यावर पूर्वाह्णिक कृत्यें आटोपून सर्व राजे आपआपल्या शिबिरांमध्यें जाऊन बसले. नंतर हे राजन्, नराधिपांनीं विदर्भ नगरीस पाठविलेले हेर परत आले व त्यांनीं आणलेल्या बातम्या आपआपल्या स्वामींस निवेदन केल्या.

कैशिक राजानें स्वतःच्या बुद्धीनें श्रीकृष्णाला अभिषेक केला ही वार्ता हेरांपासून कळतांच कित्येक राजांना हर्ष झाला; परंतु कित्येक दीन, भयभीत व उदासीन झाले. फार काय सांगावें! हत्ती, अश्व व पदाति हे तीन विभाग असलेला सर्व प्रचंड सेनासागर कृष्णाच्या अभिषेकाची वार्ता ऐकून एकदम हलून गेला.

कृष्णाच्या अभिषेकाची बातमी कळतांच राजांमध्यें अशी मोठी खळबळ उडून गेली आहे, असें पाहून कैशिकानें स्वतःच्या बुद्धीनें वर्तन करून जमलेल्या राजांचा कल्पनेच्या बाहेर अवमान केला असावा ही गोष्ट राजश्रेष्ठ भीष्मकाच्या लक्षांत आली. लागलींच मनामध्यें ( थोडासा ) विचार करून राजांची समजूत करण्याकरितां जळफळत तो राजसभेकडे निघून गेला.

इतक्यांत कृष्णाला अभिषेक करा अशा आशयाची इंद्राची लेखाज्ञा मस्तकावर धारण

---

१ या ठिकाणीं "लेखमुध्दृत्य शिरसा" याचा अर्थ 'आपल्या मस्तकावरील लेख काढून' असा वांईकरांनीं चतुर्धराला धरून केला आहे; परंतु 'शिरसा' ही तृतीया या अर्थाला प्रतिकूल आहे असें आम्हांस वाटतें. 'मुंडाशांतून चिठ्ठी' काढून देण्याची चाल ध्यानीं येऊन हा अर्थ काढावासा वाटणें साहजिक आहे; परंतु व्याकरण आड येतें त्याला काय करावें ? 'राज्यधुर मुद्धर्तुं' येथें 'उद्धृ' या धातूचा अर्थ लक्षांत आणावा.

करून इंद्राचे दूत क्रथकैशिकाकडे आले (होते) तेही त्या सागरतुल्य राजसभेमध्यें शिरले.

## अध्याय पन्नासावा.

—:०:—

### श्रीकृष्णराज्याभिषेक.

जनमेजय प्रश्न करतोः—देवांना देखील दुर्जय असलेल्या पराक्रमी कंसाचा वध केल्यानंतर स्वतः श्रीकृष्णाला राज्याभिषेक कां केला नाहीं व तोही राज्यासनावर बसल्यावांचून स्वस्थ कसा राहिला? कुंडिनपुरीं कन्याप्राप्तीसाठीं श्रीकृष्ण आला असतां तेथेंही त्याचें योग्य प्रकारें स्वागत झालें नाहीं. बरें, अशा प्रकारें त्याचा अत्यंत अपमान झाला तरी तो त्यानें (क्षमावृत्ति धरून) काय कारणानें सहन केला? तसेंच, महाबल व पराक्रमी विनतापुत्र गरुड त्याचे बरोबर होता, त्यानें देखील क्षमावृत्ति स्वीकारली, याचें कारण काय? हे भगवन्, या प्रकाराचें मला मोठें कोडें पडलें आहे. करितां तूं माझ्या शंकांचें निराकरण कर.

वैशंपायन सांगतातः—वैनतेयासह अच्युत श्रीकृष्ण विदर्भनगरीप्रत प्राप्त होतांच कैशिकानें वासुदेवाचें मनामध्यें स्मरण केलें व तो आपल्या मनाशीं म्हणालाः—"मी सर्व राजांना असें सांगेन कीं, श्रीकृष्णाचें दर्शन होऊन त्याचा अपूर्व अभिषेक आपण आपल्या नेत्रांनीं पाहिला म्हणजे निःसंशय आपल्या सर्व पापाचा क्षय होईल. आम्हां उभयतां भ्रात्यांना[1] श्रीकृष्णाचें शुद्ध स्वरूप कळलेलें आहे. खरोखर कमलनयन, देवाधिदेव जो जनार्दन कृष्ण त्यापेक्षां या त्रैलोक्यांत अधिक सत्कारार्ह कोण आहे? राजा, आपण त्याला काय समर्पण करून त्याचें आदरातिथ्य करावें? बरें, राजन्, असला सत्पात्र अतिथि मिळाल्यावर आपल्याला कमीपणा येणार नाहीं असा सत्कार आपल्याकडून झाला पाहिजे."

याप्रकारें क्रथ व कौशिक या उभयतां बंधूंनीं आपसांत खल करून आपलें राज्य श्रीकृष्णाला समर्पण करण्याचा निश्चय केला व त्या बुद्धीनें ते केशवापाशीं गेले. ते विदर्भ देशचे पराक्रमी राजे कृष्णापाशीं गेल्यानंतर हरीला शिरसा वंदन करून ते उभयतां महाभाग त्याला उद्देशून ह्मणाले "देवा, खरोखर आज आमच्या जन्माचें साफल्य झालें. आज आमची पुण्याई फळास आली. आज तुझे पाय आमच्या घराला लागले त्यामुळें आमच्या पितरांना धन्यता वाटेल. आमचें चामर, व्यजन, ध्वज, छत्र, सिंहासन, सैन्य आणि आमची ही समृद्ध व धनवती नगरी आम्हीं तुला अर्पण करीत आहों. आतां हीं सर्व तुझीं झालीं. महाबाहो, तूं उपेंद्र आहेस. प्रत्यक्ष देवेंद्रानें तुला अभिषेक केला आहे. आतां येथें आमच्या राज्यावर तुला अभिषिक्त करून आम्ही हें राज्य तुला समर्पण करितों. आम्ही हें जें करीत आहों तें फिरविण्याची येथें गोळा झालेल्या सर्व राजांची किंबहुना प्रत्यक्ष जरासंधाची देखील प्राज्ञा नाहीं. तुझा शत्रु व राजांना अभय देणारा महापराक्रमी मागध राजा जरासंध नेहमीं तुझ्याविषयीं असें म्हणतो कीं, "या देवकीपुत्राला राज्य नाहीं. याला केव्हांही सिंहासनावर अभिषेक झालेला नाहीं. मग हा राजसमाजामध्यें बसण्याला कसा अधिकारी होतो? किंवा मला वाटतें कृष्ण मोठा पराक्रमी, अभिमानी व तेजस्वी असल्याकारणानें या स्वयंवरामध्यें कन्याप्राप्तीसाठीं येथें येणारच नाहीं. कारण, आपआपल्या सिंहासनांवर जे ते राजे अधिष्ठित झाले म्हणजे कमी प्रतीच्या आसनावर बसणें त्या तेजस्वी पुरुषाला कसें रुचेल?"

1 क्रथ व कैशिक.

"जरासंधराजाचें हें बोलणें भीष्मक राजानें ऐकलें. नंतर त्यानें आमची सल्ला घेऊन कलह टाळण्यासाठीं तुझ्या वास्तव्याकरितां हें सुंदर मंदिर बांधविलें. कृष्णा, तूं जगद्वंद्य व देवाधिदेव आहेसच. परंतु नरेंद्रांच्या सभेंत तूं कोठें बसावेंस याविषयीं अडचण उत्पन्न होऊं नये म्हणून तूं या जगांत तुझ्या मनुष्यावताराला साजेल अशा प्रकारें राजेंद्रत्वाचा स्वीकार कर. या आमच्या विदर्भनगरींत तूं सार्वभौमत्व चालीव. हे महाद्युते, उद्यां प्रभातसमयीं तूं शुभ्र आसनावर अधिष्ठित हो व आज तूं शास्त्रोक्त विधीनें राज्याभिषेकाचे पूर्वांग संस्कार करून घे. इंद्राच्या आज्ञेनें सर्व राजे तुझ्या अभिषेकसमयीं येथें येतील अशी मी तजवीज करतों."

इतकें बोलल्यानंतर दोघां वीरांनीं हात जोडून कृष्णाला प्रणाम केला व तेथून त्यांनीं इंद्राची आज्ञा दूतांकरवीं राजांनीं भरलेल्या रंगामध्यें पाठवून दिली. इंद्रानें दूताला ज्याप्रमाणें सांगितलें होतें, त्याप्रमाणें कागदावर लिहून महातेजस्वी कैशिकानें ते देवशासन तयार करून वांचून दाखविलें.

कैशिकानें तें शासन वाचून दाखविलें, तें असें:—राजे हो, वैनतेयासहवर्तमान श्रीकृष्ण अतिथिरूपानें विदर्भनगरीला आलेला आहे हें तुम्हांला विदितच आहे. वासुदेव या ठिकाणीं प्राप्त झालेला आहे असें कळतांच हा सत्पात्र अतिथि आला आहे हें ध्यानीं आणून राजानें (क्रथानें) आपलें राज्य, आलेल्या अतिथीस व आपल्या शीलास अनुरूप, असा सत्कार करण्याचे बुद्धीनें त्याला समर्पण केलें. परंतु, 'या ( राज्या )—आसनावर बैस ( अधिष्ठित हो ).' असें माझ्या भ्रात्यानें त्याला म्हणतांक्षणीं, अंतरिक्षांतून जाणाऱ्या कोणा तरी अशरीरी देवदूतानें असें म्हटलें ( देवदूत सांगतो:—) कीं "हे नराधिपा, तूं ज्यावर अनेकवार बसलेला तें आसन या देवाधिदेवाला समर्पण करणें योग्य नव्हे. हें पहा, स्वतः विश्वकर्म्यानें तयार केलेलें सिंहलक्षणांकित, कनकमय व रत्नजडित, शुभ्र आणि दिव्य सिंहासन प्रत्यक्ष देवेंद्रानें याचेकरितां पाठवून दिलें आहे. चराचरवंद्य देवाधिदेवाला यावर बसवून तुम्ही सर्व राजांसहवर्तमान त्याला राजेंद्रपदावर अभिषेक करा. रुक्मिणीच्या स्वयंवरासाठीं जे राजे कुंडिनपुराला आलेले आहेत, त्यांचेपैकीं जो कोणी या समारंभाला हजर रहाणार नाहीं तो इंद्राला वध्य होईल. सुवर्णमय, रत्नजडित, दिव्य आभरणांनीं युक्त असलेले व निधींपासून अंशरूपानें उत्पन्न झालेले हे, महात्म्या व राजाधिराज कुबेराचे अक्षय व तेजःपुंज अष्ट कलश, राजांनीं परिवेष्टित होत्साते कृष्णाच्या अभिषेक समारंभासाठीं इकडे येतील. या माझ्या लेखास अनुसरून सर्व राजांना बोलवून केशवाला अभिषेक करा!" हा इंद्राचा संदेश नराधिप हो, त्याच्या आज्ञेप्रमाणें मीं तुम्हांस कळविला आहे."

कैशिक पुढें वाचतो:—याप्रमाणें सांगून व बालसूर्यासारखें तेजःपुंज असें आसन कृष्णाला अर्पण करण्याकरितां मजपाशीं देऊन तो आकाशस्थ देवदूत देवलोकीं निघून गेला. हा चमत्कार मीं स्वतः अवलोकन केला असल्यामुळें तुम्हांला सांगतों कीं, येथें जे तुम्ही जमलां आहां त्या सर्वांना देवेंद्रानें केलेली ही भयंकर आज्ञा पाळण्यावांचून गत्यंतर नाहीं. स्वतः इंद्र अंतरिक्षांतून कलशांनीं श्रीकृष्णाला अभिषेक करील. हा इहलोकीं क्वचित् दृष्टीस पडणारा अद्भुत चमत्कार तुम्हीं अवलोकन करणें उचित आहे. हें आश्चर्य पाहिलें म्हणजे आपल्या सर्वांच्या पापाचा

निःसंशय क्षय होईल. नृपश्रेष्ठांनो, देवाधिदेव कृष्णस्वरूपी विष्णूला अभिषेक करण्याकरितां तुम्ही येण्यास अनमान करूं नका. कसलीही भीति मनांत बाळगण्याचें कारण नाहीं. तुमच्यासाठीं आम्ही उभयतांनीं जनार्दनाशीं सख्य केलें आहे. कृष्णानें सर्व राजेंद्रांना अभय दिलें आहे. कृष्णाचें मन पूर्णपणें शुद्ध आहे, असें आम्हांला दिसून आलें आहे. जरासंधाच्या मनांतही त्याच्याशीं वैर करावें असें दिसत नाहीं असें आहे. या उप्पर, कोणता मार्ग स्वीकारावयाचा याचा तुमचा तुम्ही विचार करा."

वैशंपायन सांगतातः—नंतर शापभयानें भिऊन गेलेले राजे कैशिकाच्या भाषणाचा विचार करूं लागले. इतक्यांत देवेंद्राच्या आज्ञेनें महात्म्या केशवाविषयीं मेघासारख्या गंभीर स्वरानें आकाश दणाणून सोडणारी आकाशवाणी अंतरिक्षांत उमटून ती एकाएकीं राजेंद्रांच्या कानीं पडली.

चित्रांगद (देवदूत) बोलला:—"प्रजेचें व तुमचें हित व्हावें, या बुद्धीनें त्रैलोक्याधिपति इंद्राची तुम्हांला अशी आज्ञा आहे कीं, कृष्णाशीं द्वेष करून तुम्ही रहातां हें कांहीं तुम्हांला योग्य नाहीं. नृपश्रेष्ठ हो, परस्परांशीं गुण्यागोविंदानें वागून तुम्ही आपआपल्या राष्ट्रांमध्यें (सुखानें) नांदा. कृष्ण हा शरणागतांच्या दुःखांचें हरण करतो. परंतु शत्रुसैन्याचा तो कृतांत काळ आहे म्हणून त्याच्याशीं प्रेमानें वागून तुम्ही खुशाल आनंदोपभोग घ्या. राजे हे मनुष्यांचे देव होत. स्वर्गीय अमर हे राजांचे देव होत व देवांचा राजा इंद्र होय. परंतु जनार्दन (कृष्ण) हा इंद्राचाही देव आहे.

हा कृष्ण प्रत्यक्ष देवाधिदेव प्रभु विष्णु असून इहलोकीं सांप्रत तो मनुष्यरूपानें अवतीर्ण झालेला आहे. मनुष्य, देव अगर दैत्य या सर्वांना तो अजिंक्य आहे. किंबहुना कार्तिकेयाला साह्य घेऊनही प्रत्यक्ष शंकराची देखील त्याला जिंकण्याची प्राज्ञा नाहीं. त्या देवाधिदेव महात्म्या केशवाला अभिषेक करण्याची देवांसहवर्तमान स्वतः माझी सुद्धां इच्छा आहे, यापेक्षां जास्त काय सांगूं? राजेंद्राला अभिषेक करण्याचा देवांना अधिकार नाहीं. त्यामुळें त्या जगद्वंद्य कृष्णाला मला अभिषेक करितां येत नाहीं. एखाद्याला राजेंद्रपदीं अधिष्ठित करणें हा खरें पाहूं गेलें असतां राजांचा अधिकार होय. ह्मणून हे नृपश्रेष्ठहो, तुह्मी विदर्भनगरीप्रत जाऊन क्रथ व कैशिक यांच्या विचारानें शास्त्रोक्त रीतीनें कृष्णाला अभिषिक्त करा. नरेंद्रहो, हा राजेलोकांचें सख्य दृढ करण्याचा सुसमय आहे असें मनांत आणून इंद्रानें तुम्हांला बोध करण्यासाठीं मला तुमचेकडे पाठविलें आहे. विदर्भनगरीमध्यें कृष्णाला पूर्वांगसंस्कार करण्याविषयीं सांगितलें असून क्रथ कैशिकांना, त्याला राजेंद्रपदीं अभिषेक करण्याविषयीं कळविलें आहे. राजश्रेष्ठांनो, त्यांच्यासहवर्तमान मोठा महोत्सव करून कृष्णाला राज्याभिषेक करा. त्याचा सत्कार केल्यानंतर दक्षिणा घेऊन आनंदित होत्साते पुनः स्वयंवराकरितां (परत या ठिकाणीं) या. येथील सभास्थान अगदींच शून्य होऊं नये म्हणून जरासंध, सुनीथ, महारथ रुक्मी व सौभदेशाचा शाल्व या चार प्रमुख राजांनीं येथेंच रहावें."

वैशंपायन सांगतातः—या प्रकारची सुरेंद्राची आज्ञा चित्रांगदाचे तोंडूनच ऐकल्यानंतर सर्व राजांनीं जाण्याचा विचार ठरविला. बुद्धिमंत राजाधिराज जरासंधाची अनुज्ञा घेतल्यानंतर भीष्मकाला पुढें करून सर्व राजे आपआपलीं दळें बरोबर घेऊन विदर्भ नगरीकडे निघाले. महाबाहु भीष्मकराजा आपल्या सैन्या-

सह राजांबरोबर चालला होता. परंतु त्याचें अंतःकरण पुत्राच्या चिंतेनें सारखें पोळत होतें. ती सर्व मंडळी कैशिकाच्या मंदिरांत महाबाहु कृष्ण ज्या ठिकाणीं बसला होता तेथें येऊन दाखल झाली. तेव्हां दुरूनच ध्वजपताकादिकांनीं मंडित झालेली सुंदर, रमणीय व तेजःपुंज देवसभा, कृष्णाच्या अभिषेकसमारंभासाठीं तेथें प्राप्त झाली होती, ती त्यांच्या दृष्टीस पडली. दिव्यरत्नांची प्रभा, दिव्य ध्वज, दिव्य अंबर पताका, दिव्य आभरणें, दिव्य पुष्पमाला व दिव्य गंध इत्यादिकांनीं ती देवसभा युक्त असून सभोंवार सुंदर विमानांशिवाय दुसरें कांहीं दिसत नव्हतें. स्वर्गीय अप्सरासमूह, विद्याधरगण, गंधर्व, मुनि व किन्नर हे अंतरिक्षाचा आश्रय करून देवाधिदेव श्रीकृष्णाच्या सभोंवार गायन करूं लागले. मुनिसिद्ध व ऋषिश्रेष्ठ यांनीं त्याचें स्तवन करण्यास आरंभ केला. आकाशामध्यें देवांच्या दुंदुभी आपोआप वाजूं लागल्या. मंदार, पारिजातक, संतान, कल्पवृक्ष व हरिचंदन या पांच देवतरूंच्या सुगंधित कुसुमरेणूंचा सकल देव आकाशांतून त्याच्यावर वर्षाव करूं लागले. स्वतः शचीपति देवेंद्र उत्तम विमानांत बसून देवांसह तेथें येऊन अंतरिक्षांत चमकत होता. आठहि दिक्पाल आपआपल्या दिशांवर स्थित होऊन श्रीकृष्णाचे सभोंवतीं गायन व नर्तन करून त्याची स्तुति करूं लागले.

असो; तेथें पोचल्यानंतर राज्याभिषेकासाठीं तयार केलेल्या सुंदर सभेमध्यें सर्व नराधिपांनीं प्रवेश केला. त्या वेळीं हा अत्यंत तुमुल नाद श्रवण करून त्यांचे नेत्र विस्मयानें उत्फुल्ल झाले. पराक्रमी व महाबाहु कैशिक राजा सर्व नराधिपांना सामोरा आला व प्रत्येकाचें यथाविधि पूजन केल्यावर सर्व राजांना तो आंत घेऊन गेला.

सर्व राजेलोक जमले आहेत असें सुरश्रेष्ठ कृष्णाला श्रुत केल्यानंतर सर्व—मंगल—पूजित होऊन श्रीमान् हरि अभिषेकसमारंभासाठीं बाहेर निघाला. लागलींच ज्यांच्या कंठाभोंवतीं वस्त्रें गुंडाळलीं आहेत व ज्यांच्यावर आंब्याचे टहाळे ठेवले आहेत, असे दिव्य कलश, श्रीकृष्णाच्या मस्तकावर, दिव्य पुष्पें व सुगंधित केसर यांनीं युक्त असलेलें व दिव्य कांचन व रत्नें यांनीं मिश्रीजल याची मेघांप्रमाणें अंतरिक्षांतून वृष्टि करूं लागले. अभिषेकसमयीं जनार्दनाला राजेंद्रपदीं शास्त्रोक्त विधीनें अभिषिक्त केल्यावर जमलेल्या राजांनीं दिलेले सुंदर व दिव्य अलंकार, चित्रविचित्र दिव्य वस्त्रें व दिव्य गंधानुलेपन यांचा त्यानें स्वीकार केला. नंतर ते वस्त्रालंकार धारण करून जनार्दनानें जमलेल्या राजांचा दिव्य गंध-माल्य-आभरणांनीं यथाविधि सत्कार केला व मग तो अभिषेकाकरितां तेथें प्राप्त झालेल्या रमणीय व सुंदर सिंहासनावर अधिष्ठित झाला. नंतर सर्व यादवमंडळी व विदर्भादि देशचे राजे यांनीं त्याचें पूजन केलें. महाबल, वाटेल तें रूप घेणारा व बलवान् वैनतेय, मनुष्यरूप घेऊन कृष्णाच्या उजव्या बाजूला एका आसनावर स्थित झाला. कृष्णाच्या अर्ध्या वचनांत असलेले महात्मे वीर, क्रथ व कैशिक, या दोघा बंधूंनीं डावीकडील आसनाचा स्वीकार केला. त्याचप्रमाणें डाव्या बाजूस आणखी वृष्णि, अंधक व सात्यकि प्रभृति महारथी आणि महाबल व पराक्रमी राजे बसले होते. श्रीकृष्ण सर्व राजे लोकांनीं परिवेष्टित होत्साता सूर्य-तुल्य, दिव्य व विस्तृत आसनावर अधिष्ठित झालेला होता. त्यामुळें श्रीमान् इंद्र जसा देवमंडळीमध्यें आपल्या आसनावर सुखानें ऊपविष्ट झाला असतां सुंदर दिसतो त्याप्रमाणें तो श्रीकृष्ण शोभिवंत दिसत होता.

नंतर सचिवांनीं नामनिर्देश करून सर्व राजांची श्रीकृष्णाला ओळख करून दिली. त्यांनींही आपआपल्या पदवीप्रमाणें कृष्णाचें पूजन केलें व मग ते आपआपल्या आसनांवर विराजमान झाले.

सर्वांचा सत्कार झाल्यानंतर, महाप्राज्ञ, सर्वशास्त्रार्थवेत्ता व वक्तृश्रेष्ठ कैशिक यानें श्रीकृष्णाचें पूजन केलें व मग तो म्हणाला.

कैशिक म्हणतोः—"प्रभो, तूं मनुष्य आहेस अशी मिथ्या कल्पना करून घेऊन या अज्ञानी राजांनीं तुझा मोठा अपराध केला आहे. देवा, परंतु तूं त्यांना कृपाळु होऊन क्षमा कर."

श्रीकृष्ण उत्तर करितोः—"कैशिका, माझ्या मनांत कोणाविषयीं एक दिवस देखील वैर टिकत नाहीं. मग क्षात्रधर्मानुयायी राजेंद्रांची गोष्टच कशाला? रणपराङ्मुख झालें असतां अधर्म होतो, यास्तव केवळ धर्म म्हणून युद्ध करावयाचें हें ज्यांचें ब्रीद, अशा पुरुषांवर कोप करण्याचें मला प्रयोजन काय? राजश्रेष्ठहो, जें झालें तें होऊन गेलें. ज्यांना ( रणांत ) मृत्यु आला त्यांना स्वर्गप्राप्ति झाली. **या मृत्युलोकीं जन्मास येणें आणि मरणें, हें सर्वांच्या पाठीस लागलें आहे. म्हणून, नराधिपहो, मृत झालेल्या लोकांविषयीं वृथा शोक करूं नका.** मलाच तुम्ही क्षमा करा आणि सर्व वैरभाव सोडून द्या."

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें बोलून महातेजस्वी मधुसूदनानें सर्व राजांस आश्वासन दिलें आणि कैशिकाच्या मुखाकडे पाहून आपलें भाषण संपविलें.

इतक्यांत सिंहासनस्थ भगवान् श्रीकृष्णाचें यथान्याय पूजन करून लागलींच वक्त्यांतील अग्रगण्य व नयपटु भीष्मकानें बोलावयास प्रारंभ केला.

१ जातस्यहि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्यच ।
तस्मादपरिहार्येर्थे कातत्र परि-देवना ।

## अध्याय एकावन्नावा.

—:०:—

### श्रीकृष्णाचा राज्याभिषेक.

भीष्मक बोलतोः—"देवाधिदेवा, आपल्या भगिनीचा स्वयंवर ( पद्धतीनें ) विवाह करावा असा माझ्या पुत्रानें पोरबुद्धीनें विचार चालविला आहे. परंतु मला मात्र तो विचार पसंत नाहीं. कन्येचा स्वयंवर करणें हा अत्यंत मूर्खपणा आहे असें माझें मत आहे. तिनें एकच वर पाहून त्याला वरावें हें मला युक्त वाटतें. माझ्या पुत्राच्या ह्या दुर्वर्तनाबद्दल मी तुझी क्षमा मागतों. देवाधिदेवा, मजवर प्रसन्न हो. हे प्रभो, तूं आमचे अपराध कृपेनें पोटांत घाल."

श्रीकृष्ण प्रत्युत्तर देतातः—"तुझ्या मुलाचें अद्यापि पोरपण आहे, तों त्यानें सर्व नृपमंडल हालवून सोडलें आहे. मग तो प्रौढ झाल्यावर काय दांडगाई करील कोण जाणे! एका राजाच्या देखतच कां होईना, पण जो मोहानें असत्य भाषण करतो तो स्वतःला व इहलोकीं राजकुलांत जन्मास आल्या कारणानें विश्वजितादि क्रतू करून त्या योगानें मिळविलेल्या चंद्रसूर्यतुल्य लोकांना व तपानें संपादिलेल्या संपत्तीला यमयातनारूप दंडवन्हीनें जाळून टाकतो. प्रभो, हा नरेंद्रांचा धर्म आहे, हें तुला विदितच आहे. पूर्वी स्वयंभू ब्रह्मदेवानें लोकधर्म कथन केले तेव्हां राजधर्म असाच असल्याविषयीं सांगितलें आहे. राजधर्म असा असतां, हे श्रेष्ठ राजा, या नृपसभेमध्यें सर्व राजांच्या देखत तुझ्या पुत्रानें असत्य भाषण करणें युक्त आहे काय? बरें, हें असो. परंतु तुझा पुत्र स्वयंवरासाठीं निर्माण केलेलें अप्रतिम रंगस्थान तयार करवीत असतां, ही गोष्ट तुला

कळली नाहीं असें तूं ह्मणतोस, याविषयींही मला मोठा संशय वाटतो. रथ, अश्व, नाग व पदाति यांची तुझ्या नगरींत मोठी दंगल उडाली. प्रत्यक्ष अग्नि, सूर्य व चंद्र यांसारखे तेजस्वी राजे तुझ्या नगरीप्रत आले असतां, तूं त्यांचे यथोचित पूजन करून आदरातिथ्य केलेंस. अशी धडधडीत प्रत्यक्ष वस्तुस्थिति असतां तुझ्या पुत्राचें कृत्य तुला विदित झालें नाहीं, हें तुझें ह्मणणें युक्त दिसतें काय? चतुरंगदळ तुझ्या नगरामध्यें येऊन थडकलें असतां थोडा का बखेडा माजला असेल? राजा, एवढी ( सहज लक्ष वेधण्यासारखी महत्वाची ) गोष्ट तुला कळली नाहीं, याचा माझ्या बुद्धीला उलगडा होत नाहीं. नरेश्वरा, मला तर असें वाटतें कीं, माझें येथें आगमन होणें तुला मुळींच पसंत नव्हतें. आणि ह्मणूनच (तुझ्या मतें सत्कारास ) अपात्र असलेल्या माझें तूं आदरातिथ्य केलें नाहींस. राजा, तूं आपली कन्या मला न देतां, तुला जे दुसरे कोणी योग्य वाटतील, त्यांना तूं आपली समर्पण कर कशी. मी आलों एवढ्याच कारणानें तूं आपल्या कन्यादानाच्या संकल्पापासून कां परावृत्त होतोस? जो एखाद्या मुलीच्या लग्नाला व्यत्यय आणतो त्याला (आपल्या पापाच्या परिमार्जनाकरितां ) नरकामध्यें खितपत पडावें लागतें, असें मन्वादिक श्रेष्ठ स्मृतिकारांनीं सांगितलें आहे. 'हे विदर्भाधिपति राजा, तुझ्या घरीं ( माझें ) आतिथ्य व्हावयाचें नाहीं हें जाणूनच मी ( तुझ्या ) रंगसभेमध्यें प्रवेश केला नाहीं. राजेंद्रा, जर मी हें भवितव्य जाणून सैन्यासह या विदर्भनगरामध्यें तळ न देतां तुझ्या रंगस्थानीं आलों असतों, तर मी राजांचा राजा असूनही माझा अनादर होऊन फजिती झाली असती."

" परंतु, कैशिक राजाला अतिथींचा सत्कार करणें फार आवडतें म्हणून माझें व गरुडाचें त्यानें येथें यथोचित आदरातिथ्य केलें. यामुळें स्वर्गामध्यें गरुड व श्रीविष्णु जसें सुखानें नांदतात, त्याप्रमाणें आम्ही येथें सुखानें राहिलों आहों."

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें, अग्नीप्रमाणें संतप्त होऊन श्रीकृष्ण, भीष्मक राजावर, वाग्रूपी वज्राचे प्रहार करीत असतां, वाक्जल शिंपून, भीष्मकानें, त्याचा क्रोधाग्नि शांत केला."

भीष्मक म्हणालाः—"बा देवेंद्रा, मजवर प्रसन्न हो. लोकशासना, माझें रक्षण कर. अज्ञानांधकारांत मी बुडून गेलों असल्याकारणानें मला ज्ञानचक्षु दे. आम्हां मानवांना चर्मचक्षूंनीं यथार्थ ज्ञान होत नाहीं. आम्ही कोणतेंही कृत्य अविचारानें करतों म्हणून तें नीटपणें सिद्धीस जात नाहीं. देवांचेंही दैवत असलेल्या तुला मी आतां शरण आलों आहें. आतां तरी माझी दृष्टि शुद्ध होऊन माझीं कर्में सफल होवोत. कुशल सेनापतीप्रमाणें शहाणे (मोठ्या चातुर्यानें ), अर्धवट राहिलेली परंतु न्यायाची, गोष्ट सिद्धीला नेतात. तुझ्यासारख्याचा आश्रय मिळाल्याकारणानें मला आतां मुळींच भय वाटत नाहीं. ( सांप्रत ) मनामध्यें जी गोष्ट मीं योजिली आहे ती कृपेनें ऐकून घे. तूं समक्ष आल्यावर रुक्मिणी तुलाच वरील हें माहीत असल्यामुळें माझा पुत्रही आतां तिचें स्वयंवर करणार नाहीं. देवेशा, मजवर कृपाळु होऊन कोप करूं नको."

श्रीकृष्ण सांगतातः—"हे बुद्धिमंता राजा, तुझ्या बोलण्यांत कांहीं अर्थ आहे असें मला वाटत नाहीं. अनघा, तूं आपल्या कन्येचें स्वयंवर करणार नाहींस कशावरून? या कामीं तुला नियंता कोण? 'रुक्मिणी दुसऱ्या कोणाला देऊं नको, किंवा मलाच दे ' असें म्हणणें मला युक्त नाहीं. परंतु रुक्मिणी ही (सामान्य स्त्री नसून) स्वर्गस्थ देवी ( लक्ष्मी ) इहलोकीं अवतीर्ण झाली आहे. ह्यामुळें तिच्या माझ्या संबंधाचें कारण आहे.

द्वापरारंभीं मेरुकूट पर्वतावर देवांनीं जेव्हां (भूभार हरण करण्याकरितां ) पृथ्वीवर अवतीर्ण होण्याचा संकेत केला, तेव्हां प्रथम लक्ष्मीला आज्ञा केली कीं, "हे सुश्रोणि, तूं पतीसहवर्तमान भूलोकीं जा; तेथें कुंडिननगरांत भीष्मक राजाच्या पत्नीच्या उदरामध्यें, इंद्राच्या स्थितीकडे लक्ष देऊन मनुष्यजन्म घे." राजन्, ही सत्य गोष्ट मी तुम्हांला सांगत आहें, ती ऐकून घेऊन नंतर जें करणें तुला योग्य दिसेल तें विचारपूर्वक कर. रुक्मिणी नामक जी तुझी कन्या आहे, ती यःकश्चित् सामान्य स्त्री नाहीं; ती प्रत्यक्ष लक्ष्मी असून ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें कांहीं एका कार्यासाठीं इहलोकीं अवतीर्ण झाली आहे. राजेलोक जुळवून तिचा स्वयंवर करणें हें तिच्या पदवीला कमीपणा आणणारें आहे. कोणी तरी एक वर पसंत करून त्याला ती अर्पण करणें हाच खरा धर्म होईल. राजा, रुक्मिणीरूपी लक्ष्मीचें स्वयंवर तुझ्या हातून होणें शक्य नाहीं म्हणून अनुरूप वर पाहून धर्मविधीनें तूं तिचें कन्यादान कर. देवराजाच्या आज्ञेनें हा वैनतेय येथें विघ्न करण्याकरितां[1] कुंडिननगरांत आलेलाच आहे. कमल खेरीजकरून बाकी साक्षात् लक्ष्मीच असलेली तुझी उपवर कन्या व राजांचा महोत्सव हीं पहावयाच्या हेतूनें मी या ठिकाणीं प्राप्त झालों आहें. राजन्, "मला क्षमा करा" हे जे शब्द तूं माझ्यासमोर उच्चारलेस ते मनापासून आहेत असें मी मानतों. राजा, त्यांमध्यें तुझा कांहीं दुष्ट हेतु नाहीं असें मी घेऊन चालतों. मी तुझ्या राज्यांत कां आलों आहें हें निवेदन केलेंच आहे. विभो, मी येथें सौम्यरूपानें आलों आहे यावरून मीं तुला क्षमा केली आहे हें उघड आहे. क्षमावंत पुरुषांचे ठिकाणीं पुष्कळ गुण वास करीत असतात. क्षमा ही दोष नाहींसे करिते; मग राजन्, आमच्या सारख्याचे मनामध्यें किल्मिष कसें बरें राहील? त्याचप्रमाणें हे विदर्भाधिपते, तुझ्यासारख्या कुलवान्, सत्त्वसंपन्न, धर्मज्ञ व सत्यवादी पुरुषांमध्यें तरी वांकडा भाव कोठून दिसून येणार? मीं पूर्णपणें क्षमावृत्तीचा स्वीकार केला आहे यांत किमपिही संदेह बाळगूं नकोस. मी या ठिकाणीं सैन्यासह आलों आहें व शत्रूवर चाल करून जाण्याचे वेळीं मी कधींही सैन्य बरोबर घेत नाहीं. (हें तुला ठाऊकच आहे.) मी जेव्हां शांत नसतों तेव्हां हातांत सूर्यचंद्रासारखीं ( तेजस्वी ) आयुधें घेऊन व गरुडावर आरूढ होऊन मी शत्रुसेनेवर चालून जातों. राजन्, आमचा पूज्य पिता तुझ्याच वयाचा आहे,[1] यास्तव न्यायानें आपल्या नगरीचें पालन करून क्षत्रियांशीं पित्यासारखें वर्तन ठेव. राजेंद्रा, कुत्सित पुरुषांचे ठिकाणीं कलुषित भाव दृष्टीस पडतो. सरळ मनाच्या शूर पुरुषांचीं अंतःकरणें नेहमीं शुद्ध असतात. माझी वृत्ति अशीच ( शुद्ध ) आहे, पित्याची जशी पुत्रांविषयीं वृत्ति असते, तशीच आमची

---

१ येथे सर्व पाठ 'विघ्नकारणहेतुना' असेच असून वांईकर व 'ज्वाला प्रसाद' यांनीं विघ्ननिवारणार्थ, असा अर्थ केला आहे, पण 'रुक्मीनें स्वयंवर केल्यास त्यांत विघ्न करून तो हाणून पाडावा' ह्मणून इंद्रानें गरुडाला पाठविलें हेंच ह्मणणे आह्मांस सयुक्तिक दिसतें. कदाचित्, कन्यादानास कोणी विघ्न केल्यास तें निवारण्या करितां असा अर्थ होईल परंतु 'कारण' या शब्दाचा 'निवारण' हा अर्थ जुलमाचा होईल.

१ 'मान्योऽस्माकं त्वयाराजन् वयसाच पितासमः'। असा पाठ आहे. याचा अर्थः वयानें तुझ्या बरोबरीच्या आमच्या पित्याला हे राजा, तूं मान दे (मी वयानें लहान आहें मला देण्याचें कारण नाहीं.) असाही करितां येईल, 'किंवा' मला मान्य जो आमचा पिता तो वयानें तुझे बरोबरीचा आहे ( अर्थात् तूंहि मान्य आहेस हा ध्वनि )

२येथें 'मान्योऽस्माकं त्वंचराजन् वयसाच पितासमः। असाहि पाठ आहे. त्याचा, तूंहि तुझे समानवयाचे आमचे पित्याबरोबर मला मान्य आहेस' असा अर्थ होतो. तो वावगा नाहीं.

तुमचेविषयीं आहे. या विदर्भनगरीच्या दोघा राजांनीं आमचें आतिथ्य करून आम्हांला आपलें राज्य समर्पण केलें. या त्यांच्या दानाच्या पुण्याईनें त्यांचे दहा पूर्वजांना स्वर्गप्राप्ति झाली आहे. नराधिपहो, त्याचप्रमाणें यांचे पुत्रपौत्रादि पुढचे दहा पुरुष ( वंशज ) असेच स्वर्गलोकाला जातील. हे उभयतां बहुतकालपर्यंत निष्कंटकपणें राज्याचा उपभोग घेतील आणि मोक्षपदाची इच्छा होतांच तें श्रेष्ठ सुखही यांना प्राप्त होईल. जे महाभाग राजश्रेष्ठ या ठिकाणीं माझ्या अभिषेकसमारंभाकरितां आले आहेत तेही यथाकाली देवांचे स्वर्गलोकास जातील. नराधिपहो, तुमचें कल्याण असो. मीही आतां वैनतेयासहवर्तमान, भोजराजांच्या रमणीय मथुरानगरीप्रत गमन करतों "

वैशंपायन सांगतातः--याप्रमाणें भीष्मकराजाला प्रत्युत्तर दिल्यानंतर सर्व राजांस विचारून क्रथकैशिकांसह यदुनंदन सभागृहांतून निघून आपल्या रथापाशीं गेला. केशव गेला असें पाहून राजर्षि भीष्मक व सर्व राजे यांचीं वदनें म्लान झालीं.

ज्याचे मस्तकावर सहस्रावधि मुकुट झळकत आहेत, ज्यानें दिव्य पुष्पमाळा व वस्त्रें धारण केलीं असून दिव्य गंधाची उटी लाविलेली आहे, ज्याचे शरीरावर दिव्य आभरणें विराजत आहेत, ज्यानें अनेक आयुधें सरसावलीं आहेत आणि ज्याचे नेत्र रक्तकमल, सूर्य, चंद्र व अग्नि यांचेप्रमाणें तेजस्वी आहेत, अशा आदिदेव, स्वयंभू, सुरासुरवंद्य, सहस्रपात्, सहस्राक्ष, सहस्रबाहु व सहस्रशीर्ष कृष्णदेवाचें दर्शन घेऊन भीष्मकराजानें हात जोडले व त्या राजश्रेष्ठाला प्रणाम करून कायावाचामनानें त्या देवाधिदेवाचें स्तोत्र करण्यास प्रारंभ केला.

भीष्मक म्हणतोः--हे देवाधिदेवा, तूं अनाद्यनंत, शाश्वत व आदिदेव आहेस. हे नारायणा, हे परमगते, तुला माझा नमस्कार असो. तूं स्वयंभू आहेस, तूं विश्वरूप आहेस, तूं स्थाणु आहेस, तूं वेधस् आहेस, तुझी नाभी कमलासारखी असून तूं जटी दंडी व पिंगल आहेस तरी तुझी प्रभा हंसासारखी आहे. तूं हंस आहेस, तूं चक्ररूप आहेस, तुला मी प्रणाम करितों. तूं अज, परमात्मा असून वैकुंठलोकीं वास करितोस. तुला माझा प्रणाम असो. तूं सदसद्भावयुक्त पुराणपुरुष, योगी व निर्गुण पुरुषोत्तम आहेस. तुला मी नमस्कार करतों. सुरोत्तमा, या तुझ्या भक्तावर तूं अनुग्रह कर. जगत्पते, तूं त्रैलोक्याचा स्वामी आहेस. ज्ञाते " तूं प्रत्यक्ष विष्णु आहेस " हें जाणतात.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें, सर्व राजांसमक्ष त्या देवाधिदेवाची स्तुति केल्यावर भीष्मकराजानें कृष्णाला हिरे व वैडूर्यमणि यांस मागें टाकणारा, मौल्यवान् रत्नें व मोत्यें यांसह असलेला, सुवर्णराशि, अर्पण केला. नंतर ( पुनरपि) महाबल वैनतेयाला नमस्कार करून भीष्मक म्हणाला " त्या खगेंद्राला माझा प्रणाम असो. वायुवेगानें चालणाऱ्या वैनतेयाला माझा नमस्कार असो. कामरूपी व दिव्य काश्यपाला माझा नमस्कार असो."

वैशंपायन सांगतातः——याप्रमाणें संक्षेपानें गरुडाची स्तुति करून भीष्मकराजानें त्याला उत्तमोत्तम भूषणें अर्पण केलीं व नंतर कमललोचन कृष्णाला निरोप दिला. उपेंद्र कृष्ण चालूं लागतांच सर्व राजे ( त्याला पोंचविण्यासाठीं ) त्याचे मागून निघाले. (कांहीं अंतरापर्यंत ) या बहुमानाचा स्वीकार करून नंतर पराक्रमी कृष्णानें राजांचा निरोप घेतला आणि सौम्यरूप धारण केलेल्या खगोत्तम गरुडाला पुढें करून त्यानें मथुरानगरीकडे प्रयाण केलें.

त्याच्या तेजानें दाही दिशा प्रकाशित दिसत होत्या; मोठमोठे असंख्य रथ त्याचे सभोंवार चालले होते. सर्व मंडळी निघतांच भेरी, पटह, शंख व दुंदुभी इत्यादि वाद्यांच्या नादानें, हत्तींच्या ओरडण्यानें, अश्वांच्या खिंकाळण्यानें, शूर वीरांच्या सिंहनादानें व रथचक्रांच्या खणखणाटानें प्रचंड मेघांच्या गडगडाटासारखा फार मोठा भयंकर आवाज सुरू झाला.

उत्तम आसनाचा स्वीकार करून महावीर श्रीकृष्ण तेथून निघाल्यानंतर देवमंडळीही आपल्या सभास्थानासह स्वर्गलोकीं गेली.

एक कोसपर्यंत आपलें प्रचंड चतुरंग दळ बरोबर घेऊन सर्व राजे श्रीकृष्णाला पोंचविण्याकरितां गेले होते; नंतर त्याची अनुज्ञा घेऊन ते पुनरपि स्वयंवरस्थानीं परत आले.

## अध्याय बावन्नावा.

—:०:—

### कालयवनाला बोलावण्याचा संकेत.

वैशंपायन सांगतातः—कृष्णानें तेथून प्रयाण केल्यानंतर भूषणालंकृत झालेल्या इंद्रतुल्य राजांनींही जाण्याचा निश्चय केला व आपला मनोदय जरासंधाला कळविण्याच्या बुद्धीनें ते रंगस्थानीं आले.

सभास्थानीं प्राप्त झालेले सोमसूर्यांसारखे तेजस्वी राजे आपआपल्या आसनांवर सुखानें उपविष्ट झाले आहेत असें अवलोकन करून नयपटु राजश्रेष्ठ भीष्मक त्यांना म्हणाला, "नराधिपहो, माझ्या कन्येचा स्वयंवर केला असतां केवढा अनर्थ होणार आहे हें लक्षांत घेऊन व माझ्या वार्धक्याकडे नजर देऊन माझ्या अदूरदर्शीपणामुळें ओढवलेल्या प्रसंगाबद्दल या दुर्दैव्याला क्षमा करा.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें विनवून भीष्मकानें सर्व राजांचा यथाविधि सत्कार केला व नंतर त्यानें मध्य, पूर्व, पश्चिम व उत्तर या देशांतील सर्व राजांना निरोप दिला. (भीष्मकाच्या विनयशील स्वभावानें ) सर्व धनुर्धर राजांनाही फार आनंद झाला. नंतर त्या नरपुंगवांनीं (शिष्टाचाराप्रमाणें ) भीष्मकाचा सत्कारपूर्वक निरोप घेऊन आपआपला मार्ग सुधारला.

परंतु जरासंध, सुनीथ, पराक्रमी दंतवक्त्र, सौभ देशाचा अधिपति शाल्व, राजा महाकूर्म, क्रथकैशिक प्रभृति विख्यात वंशांतील राजे, राजर्षि वेणुदारि, काश्मीराधिपति आणि दक्षिण देशचे कित्येक राजे हे त्याचें एकांतांतील ह्मणणें ऐकावें या इच्छेनें भीष्मकापाशींच थांबले. ते राजे (मार्गस्थ न होतां) मागें राहिले आहेत असें पाहिल्यानंतर राजश्रेष्ठ व पराक्रमी भीष्मकानें स्नेहपूर्णमनानें व प्रेमळ आणि गंभीर स्वरानें त्यांना उद्देशून (येणेंप्रमाणें) मधुर, षड्गुणसंपन्न, सुंदर, धर्मार्थकामयुक्त व नीतिप्रचुर भाषण केलें.

भीष्मक सांगतातः—"तुम्ही पृथिवीपतींनीं जी नीतिप्रचुर मसलत मला सांगितलीत त्याप्रमाणें मीं हें वर्तन करीत आहें. तुम्ही सज्जनांनीं मला क्षमा करावी; कारण मी तुमचा ( नित्य ) अपराधी आहें."

वैशंपायन सांगतातः—इतकें बोलल्यावर नीतिविशारद भीष्मक राजा त्या राजसभेमध्यें पुत्राला उद्देशून बोलला.

भीष्मक म्हणालाः—"या पुत्राची चेष्टा पाहून माझे नेत्र भयानें व्याकुळ झाले आहेत. मी सर्वांना पोरें समजतों. फक्त हा श्रीकृष्ण काय तो सर्वश्रेष्ठ पुरुष होय. कीर्तिमंतांमध्यें श्रेष्ठ, यशस्वी व पराक्रमी पुरुष भूलोकीं आपलें प्रखर बाहुबल, कीर्ति व यश हीं स्थापन करील. महासाध्वी देवकी ही खरोखर धन्य आहे! तिनें श्रीकृष्णासारखा त्रैलोक्यश्रेष्ठ पुत्र गर्भांत धारण केला. कमललोचन, श्रीपुंज व सुरार्चित अशा

आपल्या पुत्राचें मुखकमल स्नेहपूर्ण नेत्रांनीं जिनें अवलोकन केलें आहे, त्या माउलीचें महाभाग्य काय वर्णावें ?"

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें राजसभेमध्यें भीष्मक राजा बडबड करीत असतां महाद्युति शाल्व राजा मधुर वाणीनें त्याला बोलला.

शाल्व म्हणालाः—"रिपुमर्दना राजेंद्रा, पुत्राविषयींचा खेद आतां पुरे कर. राजा, क्षत्रियाला रणामध्यें जय किंवा अपजय यांपैकीं कांहींतरी प्राप्त व्हावयाचेंच. मर्त्य जनांची ही ठरलेली गति आहे. किंबहुना, हा सनातन धर्म आहे. बलराम व कृष्ण यांवांचून कोणत्या तिसऱ्या पुरुषाची तुझ्या बलिष्ठ पुत्रांशीं युद्ध करण्याची प्राज्ञा आहे? रथी व अतिरथी यांच्या समूहांमध्यें हा एकटा महाभुज वीर हातांत धनुष्य घेऊन लढण्यास उभा राहिला ह्मणजे सर्व शत्रूंना पीडा देण्यास तो समर्थ आहे. त्यानें आल्या बाहुबलानें देवांनाही दुर्धर असलेलें व अत्यंत भयंकर भार्गवास्त्र सोडलें ह्मणजे त्याचा मार कोणाच्यानें सहन करवणार आहे ? परंतु, कृष्ण हा अव्यय व अनाद्यनंत पुरुष असल्यामुळें त्याला जिंकण्यासाठीं स्वतः शूलधर शंकर जरी या मर्त्यलोकीं आले तरी तो पराभूत होणार नाहीं. राजश्रेष्ठा, तुझा पुत्र सर्व शास्त्रार्थ यथार्थपणें जाणतो आणि म्हणूनच कृष्ण हा प्रत्यक्ष सर्व शास्ता देव आहे असें ओळखून तो त्याच्याशीं युद्ध करीत नाहीं. राजा, आज जर कृष्णाला कोणी जेता असेल, तर तो माझ्यामतें कालयवन नामक यवनाधिपच आहे, कारण तो कृष्णाला अवध्य आहे.

बारा वर्षेपर्यंत लोहपिष्ट भक्षण करून पुत्रप्राप्तीसाठीं गार्ग्य मुनीनें घोर, भयंकर ( खडतर ) व अत्यंत दुर्धर तपश्चर्या केली. त्याच्या आराधनेनें रुद्र संतुष्ट होऊन प्रसन्न झाला. तेव्हां गार्ग्यमुनीनें शंकरापाशीं मथुरेंतील वीरांना अवध्य होईल असा पुत्र दे म्हणून वर मागितला. ' तथास्तु ' असें बोलून रुद्रानेंही त्यानें इच्छिल्या प्रकारचा पुत्र त्याला दिला. विशेषेंकरून मथुरेमध्यें माथुर वीरांना अवध्य असलेला व गार्ग्यमुनीला रुद्रवरानें प्राप्त झालेला श्रीमान् पुत्र तोच हा कालयवन होय.

हा कृष्ण जरी बलवान् आहे, तरी तो मथुरेमध्यें वाढला आहे; म्हणून मला वाटतें, कालयवन जर मथुरेवर चाल करून आला तर तो कृष्णाला पराभूत करील.

नराधिपहो, मी सांगतों हें जर तुम्हांला सयुक्तिक वाटत असेल तर त्या यवनेंद्राच्या नगराला दूत पाठवा."

वैशंपायन सांगतातः—सौभाधिपति शाल्वराजाचें भाषण ऐकून सर्व नृपश्रेष्ठांना अत्यानंद झाला, व आपण शाल्व म्हणतो त्याप्रमाणें करावें असें त्यांनीं महाबल जरासंध राजाला सांगितलें. राजन् , त्यांची अनुमति पाहून जरासंध राजाला ब्रह्मदेवाच्या वाक्याची ( आकाशवाणीची ) आठवण झाली व त्या योगानें खिन्न होऊन तो म्हणाला.

जरासंध म्हणालाः—दुसऱ्या राजांच्या भयानें पीडित झालेले राजे, आजपर्यंत माझा आश्रय करून आपलें गेलेलें राज्य, भृत्य, सैन्य व वाहन यांसकट परत मिळवीत. जिला आपला पति आवडेनासा होतो अशी स्त्री ज्याप्रमाणें अन्य पुरुषाशीं रममाण होते, त्याप्रमाणें आज मला हे सर्व राजे पराश्रय करण्याचा उपदेश करीत आहेत. अरेरे, कृष्णाच्या भयानें मला आज माझ्यापेक्षां बलिष्ठ असलेल्या पुरुषाचा आश्रय करण्याची वेळ आली आहे, त्यापेक्षां दैवाची गति दुर्निवार आहे असेंच खरें. ललाटीं लिहिलेलें टाळणें केव्हांही शक्य नाहीं. दुसरा उपाय नाहीं, म्हणून तुम्ही मला खरोखर पराश्रय करावयास लावणार; परंतु राजश्रेष्ठहो,

पराश्रयापेक्षां मला मरण (शतपटीनें) बरें वाटतें. नराधिपहो, कृष्ण अथवा बलराम किंवा आकाशवाणीस अनुसरून जो दुसरा कोणी माझा मारता ठरला असेल, त्याच्याशीं मी युद्ध करण्यास तयार आहें. हा माझा पुरा निश्चय होऊन चुकला आहे; किंबहुना हेंच सत्पुरुषाचें ब्रीद होय. तात्पर्य, पराश्रय करण्याचा माझा हेतु नाहीं. परंतु, तुम्हां सज्जनांना माझ्या निश्चयापासून त्रास व्हावा असेंही करण्याची माझी इच्छा नाहीं. नृपांच्या रक्षणासाठीं कालयवनाकडे दूत पाठविण्याची माझी तयारी आहे. आपल्या दूताला तिकडे जातांना कृष्णापासून त्रास होऊं नये म्हणून त्यानें आकाशमार्गानें गमन करावें हें बरें. नृपश्रेष्ठहो, याचा विचार करून कोण तो दूत पाठवा.

हा अग्नी, चंद्र व सूर्य यांच्यासारखा पराक्रमी असलेला बलवान् सौभाधिपति आपल्या नगराला जात आहे. त्यानें आमचा दूत म्हणून कालयवनाकडे जाऊन आपला कृष्णाशीं संग्राम होईल तेव्हां तो आपल्याला (राजांना) येऊन मिळेल अशी योजना करावी."

वैशंपायन सांगतातः—पुनः जरासंध राजा तेजस्वी सौभपतीला म्हणाला, "मानद शाल्वराजा, कालयवनाकडे जाऊन सर्व राजांना अशी मदत कर कीं, जेणेंकरून कालयवन आपल्या सहाय्याला येऊन कृष्णाला पराभूत करील व त्यामुळें आपणां सर्वांला आनंद होईल. सारांश, अशा युक्तीचें त्याच्याशीं मोठ्या चातुर्यानें बोलणें कर."

याप्रमाणें सर्वांना आज्ञा केल्यानंतर भीष्मक राजाचें शिष्टाचारानुरूप पूजन करून जरासंध राजा आपल्या सैन्यासह राजधानीकडे निघून गेला. राजश्रेष्ठ शाल्वानेंही उभयतांचें (जरासंध व भीष्मक) पूजन करून वायुगतीनें चालणाऱ्या रथावर आरोहण केलें व नंतर आकाशमार्गानें त्यानें आपला रस्ता सुधारला. दक्षिण देशचेही सर्व राजे जरासंधाच्या मागोमाग आपआपल्या राजधानीप्रत गेले.

पुत्राच्या दुर्वर्तनाचा विचार करीत दीन झालेला भीष्मकराजा पुत्रासह कृष्णस्मरण करून आपल्या गृहामध्यें राहिला.

इकडे कृष्णाच्या आगमनामुळें मोठा अनर्थ ओढवणार असें राजे लोकांना वाटून सर्वांनीं आपल्या स्वयंवराचा बेत रहीत केला, हें वर्तमान साध्वी रुक्मिणीला विदित होतांच ती लज्जित होऊन सख्यांमध्यें गेली व त्यांना म्हणाली, "सख्यांनो, मी तुम्हांला खरेंच सांगतें कीं, एका कमलपत्राक्ष कृष्णावांचून दुसऱ्या कोणत्याही नरेंद्राची पत्नी होण्याची माझी इच्छा नाहीं."

## अध्याय त्रेपन्नावा.

—:०:—

### शाल्वदौत्य—जरासंधाचा संदेश.

वैशंपायन सांगतातः—यवनांचा अत्यंत बलिष्ठ राजा कालयवन हा आपल्या पौरजनांचें धर्मानें पालन करीत होता. तो त्रिवर्गज्ञाता[1], प्राज्ञ, षड्गुणप्रवीण[2] व सर्वगुणसंपन्न असून त्याला सप्तव्यसनांपैकीं[3] एकाचाही विटाळ नव्हता. शिवाय तो मोठा श्रुतिमान्, धर्मशील, सत्यवादी, जितेंद्रिय, युद्धकलानिपुण, दुर्गयुद्धकुशल व अप्रतिम शूर असून उत्तमोत्तम मंत्री त्याचे सेवेंत होते.

एके समयीं सचिवांसहवर्तमान तो आपल्या रमणीय सभेमध्यें त्यांच्याशीं नानाप्रकारच्या दिव्य गोष्टी बोलत बसला असतां, एकाएकीं

१ पद, स्थान व वृद्धि.
२ संधि, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव व आश्रय.
३ द्यूत, मांस, सुरा, वेश्या, दिवा निद्रा, परनिंदा, मृगया.

वायूची सुखशीतल झुळुक सुटून जिकडे तिकडे सुगंध फांकला व त्यामुळें त्या ठिकाणीं सर्वत्रांच्या अंतःकरणांत मदनसंचार झाला. त्या वेळीं आत्मज्ञानी व विचक्षण यवन सेवक त्या कालयवनाची सेवा करीत होते. असा सुगंध सुटतांच चोहोंकडे सामसूम झालें व हा काय चमत्कार असावा; असें वाटून सभास्थानीं बसलेल्या सर्व लोकांचे नेत्र आश्चर्यानें प्रफुल्ल झाले. ते वर पाहातात तों, एक सूर्यतुल्य दिव्य रथ आकाशमार्गानें दक्षिणदिशेकडून आपल्याकडेच येत आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें.

त्या रथाचीं चक्रें शुद्ध सुवर्णाचीं असून त्याला दिव्य रत्नें लावलीं असल्यामुळें त्यांचें तेज त्याच्यावर पसरलेलें दिसत होतें. त्या रथावरील ध्वजपताकाही दिव्य होत्या. शिवाय त्या रथाला मन किंवा वायु यांच्यासारखे शीघ्रगामी दिव्य अश्व जोडले होते. सुवर्णाचीं चंद्रसूर्यासारखीं बिंबें करून स्वतः विश्वकर्म्यानें त्या रथाची योजना केली होती. त्या रथाला व्याघ्रांबरानें भूषित केलें होतें. तो रथ पाहिला म्हणजे शत्रू भयभीत होत व मित्रांना आनंद होई. त्या रथाच्या योगानें दुसऱ्यांच्या रथांचा चुराडा होई.

सौभदेशचा पराक्रमी राजा शाल्व हा त्या रथावर आरूढ झाला होता. त्याला पाहून यवनेंद्राच्या मंत्रीश्रेष्ठाला फार आनंद झाला व "अर्घ्य आणा, पाद्य तयार करा" असें तो अनेकशः ( एकसारखा ) ( सेवकजनांस ) म्हणूं लागला. शाल्व आला आहे असें पाहातांच स्वतः महाबाहु कालयवन राजा आपल्या सिंहासनावरून उठून त्याला सामोरा गेला व हातांत अर्घ्य घेऊन रथांतून ( आलेले ) लोक ज्या ठिकाणीं उतरतात तेथें जाऊन उभा राहिला.

शक्रतुल्य पराक्रमी कालयवन राजा मोठ्या संतोषानें स्वतः आपल्याला सामोरा येत आहे हें अवलोकन करून महातेजस्वी शाल्वराजा पूर्ण विश्वासानें एकटाच रथांतून खालीं उतरला व त्यानें मित्राचें दर्शन घेण्याच्या इच्छेनें मोठ्या प्रेमानें कालयवनाच्या मंदिरांत प्रवेश केला. आपल्यासाठीं यवनेंद्रानें अर्घ्य तयार केलें आहे असें पाहून राजर्षिश्रेष्ठ शाल्व मधुर वाणीनें त्याला म्हणाला. "महाद्युते, या वेळीं तूं माझा अर्घ्यसत्कार करावा इतकी माझी योग्यता नाहीं. मी राजांचा दूत आहें. सुबुद्ध जरासंधानें पुष्कळ राजांच्या अनुमतानें मला तुजकडे ( दूत म्हणून ) पाठविलें आहे. म्हणून हे राजश्रेष्ठा, राजसभेमध्यें मी अर्घ्यसत्काराला पात्र नाहीं अशी माझी समजूत आहे.

कालयवन ह्मणालाः—"महाबाहो, तूं येथें दूत या नात्यानें आलेला आहेस व मी नरेंद्रांना साहाय्य करावें असें बोलणें लावण्यासाठीं जरासंधानें तुला इकडे पाठविलें आहे, हें मी जाणतों. आणि म्हणूनच हे बुद्धिमंत राजा, अर्घ्यपाद्यादि सत्कार व आसन देऊन मी तुझी मुद्दाम यथाविधि पूजा करणार आहें. कारण, या वेळीं तुझी पूजा केली म्हणजे सर्व राजांचें सत्कारपूर्वक पूजन केल्याचें श्रेय मला मिळणार आहे. जनेश्वरा, माझ्या बरोबरीनें तूं या शुभ्र आसनावर अधिष्ठित हो."

वैशंपायन सांगतातः—नंतर यवनेंद्रानें शाल्वाच्या हातांत हात घालून त्याला कुशल प्रश्न विचारले. मग ते उभयतां एकाच रमणीय सिंहासनावर अधिष्ठित झाल्यानंतर—

कालयवन म्हणाला "देव जसे इंद्राच्या आश्रयछत्राखालीं ( सुखानें ) राहातात त्याप्रमाणें आपण सर्व राजे ज्याच्या बाहुबलाचा आश्रय करून निर्भयपणानें वास्तव्य

करतों, त्या जरासंधराजानें तुला मजकडे (साहाय्यासाठीं) पाठविण्याइतकें कोणतें असाध्य संकट प्राप्त झालें आहे? त्यानें तुला जें सांगितलें असेल तें निर्भीडपणें मला सांग. जरासंधराजाची मला काय आज्ञा झालेली आहे? त्यानें सांगितलेलें कार्य कितीही दुष्कर असलें तरी मी तें केल्याशिवाय रहाणार नाहीं."

शाल्व ह्मणाला:-"हे राजश्रेष्ठ यवनाधिपा, जरासंधानें मला जें सांगितलें आहे तें तसेंच मी तुला ( अक्षरशः ) निवेदन करतों, ऐक.

जरासंध ह्मणाला:—कृष्णनामक परमदुर्जय यादव जगताला पीडा देण्यासाठीं येथें उत्पन्न झालेला आहे. त्याचें दुर्वर्तन माझ्या कानीं आल्यानंतर त्याचा वध करण्यासाठीं मी उद्युक्त झालों. समग्र वाहनें व सैन्य बरोबर घेऊन पुष्कळ राजांसहवर्तमान मी आपल्या हाताखालील प्रचंड सैन्यांचा गोमंत नामक पर्वतश्रेष्ठाला गराडा दिला. नंतर चेदिराजाच्या अर्थपूर्ण उपदेशाप्रमाणें मीं रामकृष्णांचा विनाश व्हावा म्हणून तो पर्वत पेटवून सोडला. त्यामुळें लक्षावधि ज्वाला उत्पन्न होऊन प्रलयकालीन अग्निप्रमाणें त्या पर्वताची प्रभा दिसूं लागली. परंतु ( या योगानें किंचितूही न भितां ) स्वर्णमय तालध्वजधारी बलरामानें त्या पर्वताच्या शिखरावरून खालीं आमच्या सेनासागरामध्यें उडी घातली. नंतर त्या दुर्धर वीरानें हत्ती, अश्व, रथ व पदाति यांचा सप्पा उडविण्याचा प्रारंभ केला. सरपटणाऱ्या शेषासारख्या आपल्या नांगरानें असंख्य गज, अश्व व पदाति यांना खरडून किंवा ओढून नंतर मुशलाच्या तडाख्यांनीं त्यांना त्यानें ठार मारलें. फार काय सांगूं? त्या शेंकडों सूर्यतुल्य राजांनीं व्याप्त झालेल्या समरभूमीवर ग्रीष्मऋतूंतील सूर्याप्रमाणें तो महातेजस्वी बलराम गजानें गजाचा, रथानें रथयोद्ध्याचा, अश्वानें अश्वारूढाचा व पदातीनें पदातीचा, याप्रमाणें नाना तऱ्हांनीं निःपात करीत इकडून तिकडे वावरूं लागला.

बलरामानंतर चक्रधारी वीरांमध्यें अग्रगण्य असलेल्या प्रतापी व पराक्रमी श्रीकृष्णानें आपलें सूर्यासारखें तेजःपुंज चक्र हातांत धारण करून सिंह जसा यःकश्चित् हरणाला धरतो त्याप्रमाणें लीलेनें तो पर्वत पायांच्या जोरानें हालवून उंचावरून खालीं शत्रुसैन्यांत उडी घातली. त्याबरोबर लागलींच त्या पर्वतावर पावसाची धार लागून तत्काळ आग शमन झाली. त्या वेळीं तो पर्वत भ्रमण करीत जणूकाय नाचत असल्याप्रमाणें भूमींत शिरला. सारांश, राजन्, त्या पेटलेल्या पर्वतशिखरावरून खालीं उडी टाकल्यानंतर जनार्दन हातांतील चक्रानें आमच्या सेनेचा विध्वंस करूं लागला. प्रथम प्रचंड चक्र फेंकून व गदेचे आघातानें खालीं पाडून मग मुशलानें त्यानें असंख्य नर, नाग व अश्व यांचा चुराडा उडविला. त्याच्या क्रोधरूपी वायूनें पेटविलेल्या चक्रलांगलरूपी अग्नीनें सूर्यतुल्य नरेंद्रांच्या छत्राखालील प्रचंड सेना जळून खाक झाली. फार काय सांगू, आमच्या रथसैन्यामध्यें नर, नाग, अश्व, पदाति व ध्वज यांची गर्दी होती; परंतु त्या दोघांनीं पायांवर लढून एका क्षणांत आमच्या रथसैन्याचा पार धुव्वा उडविला. चक्ररूपी अग्नीच्या भयानें पीडित झालेल्या आमच्या सैन्याची अशी दाणादाण उडालेली पाहून प्रचंड रथसमुदायांनीं परिवेष्टित होत्साता मी तेथें ( निकरानें ) युद्ध करूं लागलों. तेव्हां, श्रीकृष्णाचा बलिष्ठ ( पराक्रमी ) व शूर भ्राता बलराम हा हातांत गदा व हल हीं आयुधें घेऊन माझ्यासमोर प्राप्त झाला. माझ्या बारा अक्षौहिणी दळाचा विध्वंस केल्यानंतर त्यानें हल व सौनंद मुसळ हीं आयुधें बाजूला ठेवून

सिंहाप्रमाणें चवताळून जाऊन मला गदेनें प्रहार केला. वज्रपातासारखा गदेचा जोराचा प्रहार माझ्या शरीरावर केल्यानंतर पूर्वी क्रौंचासुरावर शक्तिप्रहार रोखून भगवान् कार्तिकेय ज्याप्रमाणें पहात उभा राहिला त्याप्रमाणें पुनरपि मजवर शक्तिप्रहार करण्याच्या हेतूनें डोळे वटारून तो मजकडे पाहूं लागला. त्या वेळीं तो मला जाळून टाकतो कीं काय असेंही वाटलें. समरांगणावरील बलरामाचें तें उग्र स्वरूप पाहून जीवाची आशा असलेल्या कोणत्या मर्त्य पुरुषाची त्याच्या समोर उभें रहाण्याची प्राज्ञा आहे ?

असो. आपल्या हातांतील कालदंडासारखी भयंकर गदा सरसावून हलरूपी अंकुशानें तो ती गरगर फिरवीत माझ्यापुढें ( प्रहार करण्याच्या बुद्धीनें ) उभा राहिला असतां, एकाएकीं प्रत्यक्ष ब्रह्मदेव आपल्या मेघासारख्या गंभीर स्वरानें नभोमंडळ दणाणून आकाशवाणीच्या रूपानें म्हणाला. " अनघा, ह्या जरासंधराजाला तुझ्या हातून मृत्यु यावयाचा नसल्याकारणानें याच्यावर प्रहार करूं नको. हे हलायुधा, याचा मृत्यु दुसऱ्याच्या हातून व्हावा असा ईश्वरी संकेत ठरलेला आहे; म्हणून हें ध्यानीं आणून तूं आपला हात आटोप." हें सर्वांचा प्राण हरण करणारें घोर ब्रह्मवाक्य कानीं पडतांच चिंतामग्न होऊन मी युद्धापासून परावृत्त झालों.

यास्तव, हे राजेंद्रा, राजांवरील हें कृष्णरूपी संकट दूर होऊन त्यांचें हित व्हावें या हेतूनें जें कांहीं तुला सांगणार आहें, तें ऐकून कृपेनें तूं त्याप्रमाणें वाग. ( आम्हांला साहाय्य कर. ) गार्ग्यमुनीनें पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें खडतर तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतलें तेव्हां हे नरदेवा, मथुरावासी जनांनीं अवध्य असलेला तुझ्यासारखा पुत्र त्याला प्राप्त झाला. खरोखर, सुरासुर देखील ज्याच्या पदकमलाची स्तुति करतात अशा त्या गार्ग्यमुनिश्रेष्ठानें लोहपिष्ट भक्षण करून बारा वर्षेंपर्यंत तपश्चर्या केली तेव्हां त्याचा ईप्सित हेतु सिद्धीस गेला. महात्म्या गार्ग्यमुनीच्या तपोबलानें व चंद्रमौली शंकराच्या वराच्या प्रभावानें, बर्फ जसें सूर्यकिरणांचा स्पर्श होतांच वितळून जातें त्याप्रमाणें, जनार्दन तुझ्या समोर येतांच नष्ट होईल. राजांच्या संदेशानें प्रेरित होऊन तूं प्रयत्न कर व कृष्णाला जिंकण्यासाठीं दूरवर प्रवास करण्याची तसदी घे. मथुरेच्या राज्यांत सेनेसहवर्तमान प्रवेश करून व श्रीकृष्णाला मारून तूं आपली दिगंत कीर्ति करून घे. हा वासुदेव मथुरानिवासी आहे. बलराम त्याचाच ज्येष्ठ भ्राता आहे. ते उभयतां याप्रमाणें माथुर असल्यामुळें मथुरेला गेल्यावर तूं त्यांचा सहज पराभव करूं शकशील."

शाल्व म्हणाला:—याप्रमाणें, राजांच्या हितासाठीं सूर्यतुल्य जरासंधराजानें तुला निवेदन करण्याकरितां मला जें सांगितलें होतें तें सर्व जसेंच्या तसेंच मीं तुला विदित केलें आहे. मनुजेंद्रा, जरासंधाच्या या विनंतीचा सचिवांसहवर्तमान चांगला विचार करून मग तुझ्या बुद्धीला जें स्वहिताचें व उचित दिसेल त्याप्रमाणें तूं कर.

## अध्याय चौपन्नावा.

—:०:—

### कालयवनाचें उत्तर ( अनुमति ).

वैशंपायन सांगतात:—या प्रकारें जरासंध राजाच्या आज्ञेनें शाल्वराजानें वरीलप्रमाणें राजसंदेश निवेदन केला असतां त्यावर परम संतुष्ट होऊन यवनाधिपति कालयवन म्हणाला.

कालयवन म्हणाला:—कृष्णाला पराभूत

करण्यासाठीं अनेक राजांनीं मला आज्ञा केली आहे, त्यापेक्षां मी आज धन्य झालों! खरोखर त्यांचा हा मजवर मोठा अनुग्रहच झाला. आज माझ्या जन्माचें सार्थक झालें. मला जयाशीर्वाद चिंतून, त्रैलोक्यांतील सुरासुरसमूहांना देखील जो दुर्जय अशा कृष्णाला जिंकण्यासाठीं त्यांनीं माझी योजना केली आहे! नृपशार्दूलांनीं प्रमुदित होऊन 'मला जयप्राप्ति होईल अशी इच्छा प्रदर्शित केली आहे' त्या अर्थी त्यांच्या (मंगलकारक) वाग्रुपी जलसिंचनानें मला खचित विजयश्री प्राप्त होईल, असें मी समजतों. नृपश्रेष्ठांनीं आज्ञापिल्याप्रमाणें मी वागण्यास तयार आहें. राजेंद्रा, या कामीं माझा जरी पराजय झाला, तरी तो मला जयासारखाच आहे. राजन्, आज तिथि, नक्षत्र, मुहूर्त व करण हीं सर्व शुभकारक आहेत. तेव्हां, आजच्या आजच मी रणामध्यें कृष्णाला जिंकण्यासाठीं मथुरेला जाण्याकरितां प्रयाण करतों.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें सौभदेशाच्या तेजस्वी शाल्वराजाला आश्वासन दिल्यानंतर यवनेंद्रानें मौल्यवान् रत्नालंकार समर्पण करून त्याचा यथान्याय सत्कार केला. मग हे राजश्रेष्ठा, जयाशीर्वाद मिळण्यासाठीं ब्राह्मणांना त्यानें दक्षिणा दिली. आपल्या पुरोहिताला देखील त्या यवनराजानें बहुत द्रव्य दिलें. यथाविधि अग्नीमध्यें हवन केल्यानंतर कौतुकमंगल करून लागलीच त्या राजानें कृष्णाला पराभूत करण्याचा हेतु मनांत धरून प्रयाण केलें. भरतश्रेष्ठा, इकडे शाल्वराजालाही आपला कार्यभाग सिद्धीस गेला यामुळें मोठा आनंद झाला व मग त्या यवनराजाला आलिंगन देऊन तो आपल्या राजधानीकडे निघून गेला.

१ 'कालयवन' हा गर्गमुनीच्या वीर्यापासून जन्मला होता.

## अध्याय पंचावन्नावा.

—:०:—

### द्वारावतीला जाण्याचा संकेत.

जनमेजय विचारतोः—इंद्रतुल्य पराक्रमी कृष्ण विदर्भनगराहून मथुरेकडे यावयास निघाला तेव्हां त्यानें आपल्याबरोबर गरुडाला कशासाठीं घेतलें? वैनतेयानें त्या वेळीं कोणती कामगिरी केली? तसेंच हे ब्रह्मन्, त्या समयीं भगवान् महाबल गरुडावर आरूढ कां झाले नाहींत! मुनिश्रेष्ठा, मला या (तीन) गोष्टींविषयीं मोठा अचंबा वाटत आहे (करितां माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन) तूं माझ्या शंका दूर कर.

वैशंपायन सांगतातः—राजा, महाद्युति वैनतेय सुपर्णानें विदर्भनगरीला जाऊन कोणतें अलौकिक कृत्य केलें तें मी तुला निवेदन करतों ऐक. प्रभो, देवाधिदेव मधुसूदनानें मथुरा नगरीला जाण्यासाठीं निघण्यापूर्वीं "मी आतां भोजराजांच्या अंमलांतील रमणीय मथुरा नगरीला गमन करतों," असें त्या राजसभेंत भाषण केलें, तेव्हां महाद्युति गरुड आपल्या मनाशीं कांहीं तरी विचार करीत होता. श्रीकृष्णाचें मथुरेला जाण्याचें बोलणें संपतांच, आपला एक विचार नक्की ठरवून श्रीमान् गरुडानें हात जोडले व मग आपल्या स्वामीला प्रणाम करून म्हटलें.

गरुड म्हणालाः—"देवा, रैवत नामक रमणीय पर्वत व त्याच्या संनिध असलेलें नंदनतुल्य वन यांच्या समीप असलेल्या कुशस्थली नामक नगरीस जाण्याचा माझा विचार आहे. ती रमणीय नगरी रैवतपर्वताच्या पायथ्याशीं बसलेली असून समुद्रकिनाऱ्याच्याही नजीक आहे. परंतु सांप्रत तिचा राक्षसांनीं विध्वंस करून टाकल्यामुळें जिकडे तिकडे तेथें झाडें, झुडुपें व वेली यांची गर्दी झाली असून कुसु-

१ 'रुक्मिणोद्वासितां' असाहि पाठ आहे.

मरेणु पडले आहेत त्या योगानें तें स्थान विभूषित दिसत आहे. त्या ठिकाणीं सांप्रत गजेंद्र, भुजंग, अस्वल, वानर, वराह, महिष व नानाप्रकारचे दुसऱ्या पशूंचे कळप यांचीच वसती आहे. तेथील सभोंवरचा प्रदेश ( बारकाईनें ) अवलोकन करून तें स्थान निवासासाठीं योग्य आहे किंवा नाहीं हें मी प्रथम पहातों; आणि जर ती रमणीय व प्रशस्त ( परंतु सध्यां उजाड झालेली ) नगरी तुझ्या निवासाला योग्य आहे असें मला दिसून आलें तर लागलींच तेथील काटेकुटे नाहींसे करून मी ( त्वरित ) तुझ्या संनिध परत येतों. "

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें देवाधिदेव जनार्दनाला प्रणामपूर्वक विज्ञप्ति करून तो पराक्रमी पक्षिश्रेष्ठ पश्चिम दिशेकडे निघून गेला. इकडे कृष्णही यादवांसहवर्तमान मथुरानगरीमध्यें येऊन पोंचला. त्या वेळीं सर्व बाजूंनीं नर्तकी वेश्या, उग्रसेन व नागरिक त्याला सामोरे गेले. व त्यांनीं हर्षित झालेल्या लोकांनीं परिवेष्टित असलेल्या कृष्णाचें ( यथाविधि ) पूजन केलें.

जनमेजय विचारतोः—अनेक राजांनीं मिळून श्रीकृष्णाला राजेंद्रपदीं अभिषेक केला, ही (शुभ) वार्ता ऐकून महाबाहु उग्रसेन राजानें त्याचा कोणत्या प्रकारें सत्कार केला ?

वैशंपायन सांगतातः—प्रत्यक्ष इंद्रानें आपला चित्रांगद नामक दूत पाठवून राजांचा समेट घडवून आणल्यावर अनेक राजश्रेष्ठांनीं मिळून श्रीकृष्णाला राजेंद्रपदाचा अभिषेक केला व तेथें त्यानें मांडलिक राजांला प्रत्येकीं लक्ष, राजेंद्रांला अर्बुद (दश कोटी ) व इतर सामान्य माणसांना प्रत्येकीं दशसहस्र, याप्रमाणें द्रव्य दिलें; इतकेंच नव्हे तर त्या ठिकाणीं आलेला कोणीही मनुष्य रिक्त हस्तानें परत घरीं गेला नाहीं. निधिपति श्रीमान् शंखानें, देवांच्या आज्ञेस अनुसरून यादवरूप घेऊन, श्रीकृष्णानें मनांत आणल्याप्रमाणें, सकल जनांस अभिषेकसमयीं धन दिलें, इत्यादि वार्ता आपल्या हेरांच्या तोंडून समजतांच सर्व देवालयांमध्यें उग्रसेनानें महापूजा बांधिली. वसुदेवाच्या भवनद्वारीं दोन्हीं बाजूंना तोरणें बांधून नटांना नर्तन—गायन, व वाजंत्र्यांना वाद्यें सुरू करण्याची त्यानें आज्ञा केली. नंतर तऱ्हेतऱ्हेच्या वस्त्रांनीं शोभिवंत दिसणाऱ्या पताका, ध्वज व माला कंसराजांच्या[1] सभेमध्यें त्यानें लावून दिल्या. भोजराजाच्या आज्ञेनें जिकडे तिकडे विविध आकृतींच्या पताका फडकूं लागल्या. उग्रसेनानें नंतर श्रीकृष्णाच्या असनालयाला ( बसावयाच्या खोलीला ) तोरणें बांधून सफेती दिली. सारांश, थोडक्या अवकाशांत राजाज्ञेनें नटांचें नृत्य व गायन सुरू होऊन जिकडे तिकडे वाद्यें वाजूं लागलीं. चोहोंकडे वनमालायुक्त पताका चमकूं लागून जागोजाग भरलेले उदककुंभ दृग्गोचर होऊं लागले. फार काय सांगावें, राजेंद्रा, राजमार्गांवर चंदनोदक शिंपडून राजा उग्रसेनानें भूवर पायघड्या पसरून दिल्या. रस्त्याच्या दोन्ही बाजूंस चंदन, अगुरु व गुग्गुल यांचा धूप आणि गूळ व सर्जरस इत्यादि पदार्थ जाळण्यांत आले. वृद्ध वृद्ध स्त्री-पुरुष कृष्णाप्रीत्यर्थ स्तुतिमंगल गाऊं लागले. आपआपल्या दारांमध्यें स्त्रिया अर्घ्य हातांत घेऊन कृष्णागमनाची वाट पहात उभ्या राहिल्या.

याप्रमाणें सर्व मथुराभर आनंदोत्सव सुरू करून राजा उग्रसेन वसुदेवाच्या घरीं गेला. तेथें त्याला हें आनंदाचें वर्तमान निवेदन केल्या-

[1] वास्तविक या वेळीं कंस गेला मेलेला असतां त्या सभेला ' कंस राजाच्या ' सभेंत अशा शब्दांनीं निर्देश करणें यांत विशेष मुद्दा आहे. हें चतुर वाचकांचे लक्षांत दिल्लीचे तक्ताला आजकाल ' युधिष्ठिराची गादी ' असें म्हणणें तशांतलेंच हें. आतां कंस दुष्ट होता व श्रीकृष्ण समर्थ होता, या गोष्टी वेगळ्या.

नंतर बलरामाशीं खलबत करून तो रथापाशीं गेला. राजन्,इतकें होत आहे तों मोठ्यानें शंख वाजूं लागला. पांचजन्याचा आवाज ऐकतांच हे राजा, मथुरानिवासी सर्व आबालवृद्ध, स्त्रीपुरुष, सूत, मागध व बंदिजन आणि सगळे सैनिक कृष्णाला सामोरे जाण्याकरितां निघाले. सर्वांच्या पुढें बलराम व सुबुद्ध उग्रसेन हे असून उग्रसेनानें हातांत अर्घ्य व पाद्य घेतलें होतें. श्रीकृष्ण दिसूं लागतांच राजा उग्रसेन आपल्या शुभ्र रथांतून खालीं उतरून पायीं चालूं लागला. तेव्हां सूर्यासारखा तळपत असलेला देवाधिदेव श्रीकृष्ण अंगावर दिव्य व शोभिवंत रत्नें आणि अलंकार व वक्षःस्थलावर सुंदर वनमाला धारण करून आपल्या रमणीय रथामध्यें बसला आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्याच्या अंगावरील दिव्य रत्नांच्या तेजानें तो झळकत असून छत्र, चामर, व्यजन व उंच खगेंद्र ध्वज इत्यादि राजलक्षणांनीं तो युक्त होता. त्या वेळीं तो सुंदर देवाधिदेव बालसूर्याप्रमाणें उज्ज्वल दिसत असून त्याच्याकडे पहाण्याची देखील सोय नव्हती.

राजेंद्रा, श्रीकृष्णाला पाहून उग्रसेन राजा हर्षानें कंठ भरून आल्यामुळें अडखळत वाणीनें शत्रुसैन्याचा धुव्वा उडविणाऱ्या कमललोचन बलरामाला ह्मणाला.

" कृष्णासमोर मी रथांत बसणें योग्य नाहीं असा विचार करून मी आधींच रथांतून खालीं उतरलों. महाभागा, तूं ( मात्र ) रथांत बसूनच तिकडे चल. आपल्या मायेनें मथुरेमध्यें कृष्णावतार धारण करून विष्णूनें आपलें देवेंद्रत्व असंख्य राजांच्या समोर प्रकट केलें. त्या केशवाची अनन्य भावानें स्तुति गाण्याची माझी इच्छा आहे."

कृष्णाच्या महातेजस्वी ज्येष्ठ भ्रात्यानें बलरामानें उग्रसेन राजाला प्रत्युत्तर दिलें " राजा, तो देवश्रेष्ठ वाट चालत असतां, त्याचें स्तोत्र करणें तुला उचित नाहीं. राजन्, स्तोत्रावांचूनच कृष्ण तुझ्यावर संतुष्ट आहे. तुझ्यावर प्रसन्न असलेल्या कृष्णाची आणखी स्तुति करून तुला फायदा काय? तूं त्याच्या दर्शनासाठीं सामोरा आलास यांतच त्याची स्तुति झाली. तूं जरी त्याची अमानुष व दिव्य शब्दांनीं स्तुति केली नाहींस तरी राजेंद्रपद मिळवून तो आज तुझ्या दाराशीं आपण होऊन येत आहे. "

याप्रमाणें परस्परांशीं बोलत ते कृष्णासमीप आले. उग्रसेन राजा हातांत अर्घ्य घेऊन तत्परतेनें उभा राहिला असें पाहून वक्तृश्रेष्ठ कृष्ण आपला उत्कृष्ट रथ थांबवून धरून त्याला म्हणाला, " मथुराधिपते, तूं मथुरेचा राजा हो"असें ह्मणून मी तुला राज्याभिषेक केला असून, त्याच्या[१] उलट वागून माझ्या करण्याला मीच बट्टा लावणें हें योग्य नाहीं. राजन्, माझ्यासाठीं जें अर्घ्य, पाद्य व आचमनीय तूं आणलें आहेस तें मला तूं समर्पण करूं नयेस अशी माझी मनापासून इच्छा आहे. हें सर्व मी तुला अर्पिलेले आहे. भोजराजा, तूंच मथुरेचा राजा आहेस. यासाठीं त्याविरुद्ध आचरण करूं नकोस. मी हें तुझा अभिप्राय जाणूनच बोलत आहें. नृपाला ज्याप्रमाणें बाकीच्या राजांना प्रत्येकीं एक लक्ष याप्रमाणें मीं द्रव्य दिलें त्याप्रमाणें वस्त्राभरणांशिवाय तुझाही द्रव्यभाग वेगळा काढून ठेवला आहे. मनुजेश्वरा, तूं आपल्या सुवर्णभूषित रथावर आरूढ हो. महाभागा, चामर, छत्र, व्यजन, ध्वज व दिव्याभरणांनीं युक्त असलेला मुकुट, अशीं

१ तुझा आदरसत्कार स्वीकारून.

(सर्व राजचिन्हें) धारण करून तूं या पुरीचें राज्य कर. पुत्रपौत्रांसहवर्तमान (वंशपरंपरा) संतुष्ट चित्तानें तूं या मथूरेचें परिपालन कर. सर्व शत्रुसमुदायांना पराभूत करून भोजवंशाची अभिवृद्धि कर. वज्रपाणि देवेंद्रानें देवाधिदेव बलराम व वसुदेव यांच्यासाठीं दिव्य आभरणें व वस्त्रें पाठविलीं आहेत; तसेंच सर्व मथुरा-निवासी जनांकरितां प्रत्येकीं दहा सहस्र सूत, मागध व बंदीजन यांना प्रत्येकीं एक सहस्र, वृद्ध, स्त्रिया व गणिका यांना प्रत्येकीं शंभर शंभर, आणि राजाबरोबर रहाणाऱ्या विकद्रु-प्रभृति लोकांना प्रत्येकीं दशसहस्र, याप्रमाणें माझ्या अभिषेकानिमित्त सुवर्णभाग अर्पण करण्यासाठीं इंद्रानें निराळे काढून ठेविले आहेत.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें सैन्याच्या अग्रभागीं मथुरेश्वराचें पूजन करून मधुसूदनानें मथुरेमध्यें आनंदीआनंद करून सोडला. कृष्ण हा दिव्य आभरणें, माला, वस्त्रें व विलेपन यांच्या योगानें तेजःपुंज दिसत होता. त्याच्या सभोंवतीं स्वर्गांतील देवांसारखे सर्व यादव उभे राहिले होते. त्या समयीं भेरी, पटह, शंख, व दुंदुभी हीं मंगलवाद्यें वाजूं लागलीं. हत्ती ओरडूं लागले, अश्व खिंकाळूं लागले, शूर वीर सिंहनाद करूं लागले आणि त्यांतच रथांच्या चाकांचा खणखणाट होऊं लागला. या सर्व निनादांचा एकच कल्लोळ होऊन आकाशांतील मेघनादाप्रमाणें मोठा तुंबळ कोलाहल सुरू झाला. बंदीजनांनीं कृष्णाची स्तुति करण्यास प्रारंभ केला व प्रजाजन त्याला प्रणाम करूं लागले. अपार दान केल्यानें श्रीकृष्णाला मुळींच विस्मय वाटला नाहीं. तो स्वभावतःच थोर मनाचा असल्यामुळें,त्यानें पूर्वीं असे पुष्कळ प्रसंग पाहिलेले असल्यामुळें व अहंकाराचा त्याला किंचितही विटाळ नसल्यामुळें, त्याला आपल्या दानाविषयीं मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. देदीप्यमान् शरीरानें युक्त असलेला भास्करतुल्य श्रीकृष्ण (हलके हलके) मार्ग आक्रमण करीत आहे असें पाहून मथुरानिवासी स्त्रिया त्याला पदोपदीं प्रणिपात करून म्हणूं लागल्या, "हा कृष्ण प्रत्यक्ष क्षीराब्धिनिवासी श्रीमान् नारायण असून सांप्रत त्यानें शेषशयन सोडून (कांहीं विशिष्ट हेतूनें) या मथुरेमध्यें अवतार धारण केला आहे. यानेंच पूर्वीं देवांनाही अजिंक्य झालेल्या महापराक्रमी बलीला बांधून त्रैलोक्याचें राज्य वज्रपाणि इंद्राला समर्पण केलें. (प्रस्तुत अवतारामध्यें) यानें केशि वगैरे अनेक दैत्य व शेवटीं बलि-श्रेष्ठ कंस यांचा वध करून मथुरेचें राज्य उग्रसेनाला प्राप्त करून दिलें. कंसाला मारून रिकाम्या पडलेल्या राज्यावर यानें आपल्याला अभिषेक करून घेतला नाहीं किंवा हा आपण होऊनच त्या राजसिंहासनावर अधिष्ठित झाला नाहीं[1]; परंतु सांप्रत राजेंद्रपद प्राप्त होऊन हा मथुरेमध्यें प्रवेश करीत आहे."

याप्रमाणें पुरवासी जनांचे परस्परांशीं चाललेले संल्लाप श्रवण करून बंदीजन, मागध व सूत इत्यादिकांचे अधिप बोलले, "हे गुण-सागरा, तुझ्या (अनंत) गुणांच्या प्रभावाचें, उत्साहाचें व उत्पत्तीचें आम्हीं पामरांनीं एका जिव्हेनें काय वर्णन करावें? देवा, कदाचित् बुद्धिमान् सर्पश्रेष्ठ वासुकि आपल्या दोन सहस्र जिव्हांच्या साहाय्यानें तुझ्या गुणांचें वर्णन करूं शकेल. या भूतलावर राजेंद्रांना इंद्राकडून आसन येणें, असली अद्भुत गोष्ट यापूर्वीं कधीं घडली नाहीं व पुढेंही कधीं घडावयाची नाहीं.

१ श्रीकृष्णानें अनेक राजे जिंकले, पण कोणाचीहि गादी बळकाविली नाहीं, ही नीति व हें निरभिलाषित्व स्पृहणीय आहे. नाहीं तरी खऱ्या शूरांचें लक्षण कालिदासानें म्हटल्याप्रमाणें 'यशसे विजिगीषूणाम्' असेंच आढळतें.

देवसभा राजेंद्राच्या अभिषेकसमयीं खालीं येणें व अभिषेककलश आपोआप प्राप्त होणें या गोष्टी आम्हाला अश्रुतपूर्व व अदृष्टपूर्व असल्याकारणानें आम्ही यांना अद्भुत चमत्कार असें म्हणतों. जिनें आपल्या पोटामध्यें श्रीकृष्णासारख्या देवश्रेष्ठ, कमललोचन, देववंदित व श्रीमान् श्रीकृष्णाला धारण केलें व जिला आपल्या स्नेहपूर्ण नेत्रांनीं त्याच्या मुखकमलाचें यथेच्छ दर्शन घेतां आलें, ती सर्व स्त्रियांमध्यें महाभाग्यशाली व श्रेष्ठ असलेली देवकी देवी खरोखर धन्य आहे!"

याप्रमाणें स्तोत्र गाणाऱ्या भाटांचें स्पष्ट भाषण श्रवण करीत उभयतां बंधु, राम व कृष्ण, हे उग्रसेनाच्या मागून मार्गक्रमण करितां करितां एकदांचे कोटाच्या दारापाशीं आले. त्या ठिकाणीं त्यांना सुबुद्ध उग्रसेनानें अर्घ्याचमन समर्पण केलें व पाद्य आणा, पाद्य घेऊन या, (अशी आपल्या सेवकांना) आज्ञा केली. नंतर कृष्णाच्या रथापाशीं जाऊन त्या पराक्रमी राजानें त्याला शिरसा वंदन केलें. मग हत्तीवर आरूढ होऊन मेघ ज्याप्रमाणें जलवृष्टि करतात त्याप्रमाणें त्यानें सुवर्णरूपी जलाची वृष्टि केली. (सहस्त्रावधि सुवर्णमुद्रा उधळल्या.)

याप्रमाणें द्रव्याचा वर्षाव चालला असतां अखेर तो पित्याच्या गृहापाशीं आला. तेथें प्राप्त झाल्यानंतर श्रीमान् उग्रसेन त्या मधुसूदनाला म्हणाला, "प्रभो, प्रत्यक्ष देवेंद्रानें तुझ्यासाठीं सिंहासन पाठवून दिलें. शिवाय तूं आतां राजेंद्र झाला आहेस. या करितां तुझी आतां राजगृहामध्यें स्थापना करणें हें माझें कर्तव्य आहे. देवा, मथुरेश्वर कंसानें स्वपराक्रमानें निर्माण करून ठेविलेल्या सभेमध्यें मी तुला घेऊन जातों. भगवन्, तूं प्रसन्न होशील असेंच वर्तन मी करणार आहें. मजवर (कृपाळु होऊन) तूं कोप करूं नको. नृपाला, वसुदेव, देवकी व रोहिणी हीं हर्षातिरेकानें किंकर्तव्यतामूढ झालीं असल्याकारणानें यावेळीं कोणतीही गोष्ट करण्याचें त्यांना सामर्थ्य राहिलें नाहीं.

राजन्, यानंतर, कंसाच्या मातेनें कृष्णाचें पूजन केलें व कंसानें दिग्विजय करून नाना देशांतील संपादन करून आणलेलें द्रव्य देशकाल ओळखून त्याच्या चरणकमलांवर समर्पण केलें. मग कृष्ण उग्रसेनाला उद्देशून मधुर वाणीनें म्हणाला.

श्रीकृष्ण:—मथुरेचें राज्य संपादन करण्याकरितां किंवा हें द्रव्य प्राप्त करून घेण्याकरितां मी तुझ्या पुत्राचा वध केला नाहीं. त्याचा आयुर्दाय संपल्यामुळें कालवशात् त्याला मरण आलें. माझ्या बाहुबलाच्या आश्रयानें तूं पुष्कळ यज्ञ करून हें अपार द्रव्य दान कर. व शत्रूंच्या सैन्यावर जय मिळव. राजा, तुझ्या अंतःकरणाला कंसाच्या मृत्यूमुळें झालेलें भयंकर दुःख आतां सोडून दे. आणि मीं हा द्रव्यनिधि तुला पुनः समर्पण करतों तो घेऊन जा."

याप्रमाणें उग्रसेनाचें समाधान केल्यानंतर श्रीमान् कृष्ण बलरामासहवर्तमान आपल्या मातापितरांच्या संनिध गेला. मग प्रथम त्या पराक्रमी पुत्रांनीं नम्र होऊन आनंदपूर्ण अंतःकरणानें आपल्या मातापितरांच्या चरणांवर मस्तक ठेवलें.

राजा, खरोखर त्या वेळचें मथुरा नगरीचें स्वरूप पाहून ही मथुरा म्हणजे प्रत्यक्ष इंद्राची अमरावती स्वर्गलोक सोडून भूलोकीं अवतीर्ण झाली आहे कीं काय, असा भास झाला. फार काय सांगावें, वसुदेवाचें भवन पाहून आपण भूतलावर नसून देवलोकांतच आहों, अशी पुरवासी जनांच्या मनामध्यें भावना उत्पन्न झाली.

असो. मग पत्नीसहवर्तमान उग्रसेन राजाला निरोप देऊन पराक्रमी रामकृष्णांनीं वसुदेवाच्या गृहामध्यें प्रवेश केला. नंतर (सुरक्षित ठिकाणीं) आपलीं शस्त्रें ठेवून ते आपल्या घरामध्यें इतस्ततः स्वैरमनानें संचार करूं लागले. मग योग्य समयीं आपलें आन्हिक आवरून सुखानें ते गोष्टी बोलत बसले असतां, एकाएकीं मोठा उत्पात झाला. आकाशामध्यें मेघ भ्रमण करूं लागले. पृथ्वीवरील पर्वत डळमळावयास लागले. सर्व समुद्र खवळून गेले. भूधर सर्पश्रेष्ठ देखील गोंधळून गेला. फार काय सांगावें, सर्व यादव कंपायमान होऊन पटापट भूमीवर खालीं उपडे पडले. ते जरी खालीं पडले, तरी बलराम व कृष्ण मात्र अचळ राहिले. पंखांचें जोराचें फडफडणें ऐकून पक्षिश्रेष्ठ गरुड परत आला असावा, हें त्यांनीं ओळखलें. इतक्यांत दिव्य माला व अनुलेपन धारण केलेला वैनतेय समोर येऊन उभा राहिलेला प्रत्यक्षच त्यांच्या दृष्टीस पडला. येतांक्षणींच आपल्या स्वामीला शिरसावंदन करून तो सौम्यरूपी गरुड खालीं बसला. आपला वैकुंठांतील धीट व शूर मंत्री गरुड परत आला आहे असें पाहून कृष्ण म्हणालाः—

"हे विष्णुभक्ता पक्षिश्रेष्ठा, तुझें स्वागत असो. हे असुरसैन्यमर्दना, हे विनताहृदयानंदा, मी तुझें स्वागत करतों." याप्रमाणें त्या आसनाधिष्ठित देवतुल्य वैनतेयाचें स्वागत केल्यानंतर त्याला साजेल अशा समर्थ वाणीनें कृष्ण त्याला बोलला.

श्रीकृष्ण म्हणालाः—"पक्षिश्रेष्ठा, आपण भोजराजाच्या विस्तीर्ण अंतःपुरांत जाऊन तेथें सुखानें आपल्या मनास वाटेल तसे बोलत बसूं."

वैशंपायन म्हणतातः—नंतर महापराक्रमी बलराम कृष्ण आणि वैनतेय असे तिघे अंतःपुरांत जाऊन गुप्त खलबत करूं लागले.

श्रीकृष्ण म्हणालाः—(वैनतेया,) जरासंध राजा आह्मांला अवध्य आहे. (असें आकाशवाणीनें अनेकवार सांगितलें आहे.) शत्रूचें सैन्यही प्रचंड असून तो नेहमीं मोठमोठे राजे व अवाढव्य सैन्य बरोबर घेऊन येतो. शेंकडोशें वर्षें युद्ध केलें तरी देखील जरासंधाच्या अगाध सैन्याचा नाश करणें किंवा त्याचें सैन्य थोडें बहुत तरी कमी करणें आपल्याला शक्य नाहीं. ह्मणून मी तुला (स्पष्ट) सांगतों कीं, यापुढें आम्ही दोघांनीं मथुरेमध्यें रहाणें श्रेयस्कर नाहीं, असें माझ्या मनाला वाटतें.

गरुड म्हणालाः—देवाधिदेवा, तुला प्रणाम केल्यानंतर तुझी आज्ञा घेऊन जो मी निघालों, तो तुझ्यासाठीं निवासस्थान पहाण्याकरितां एकदम कुशस्थलीला गेलों. तेथें गेल्यानंतर, हे देवश्रेष्ठा, अंतरिक्षांतूनच प्रथम मीं ती सुलक्षण नगरी सर्व बाजूंनीं अवलोकन केली. ती सुपीक व विस्तीर्ण नगरी सागराजवळ असून पूर्वेकडील जलप्रवाहानें तेथें नेहमीं थंड हवा असते. त्या सर्वतोपरी रमणीय नगरीच्या सभोंवार सागराचें परिवेष्टन असल्याकारणानें देवांना देखील ती अभेद्य आहे. तिच्यामध्यें सर्व प्रकारच्या रत्नांच्या खाणी आहेत. त्या ठिकाणीं नेहमीं इच्छिलीं फळें देणारे वृक्ष असून कोणत्याही ऋतूमध्यें त्यांना फुलें येतात. नरनारींनीं गजबजून गेलेली ती नगरी, सर्व (चारी) आश्रमांतील लोकांना रहाण्याजोगी असून मनांत येईल ती इच्छा तेथें परिपूर्ण होते. फार काय सांगूं, तेथें राहिलें ह्मणजे आपला आनंद नित्य वाढत जातो. त्या नगरीच्या भोंवतीं कोट व पाण्यानें भरलेला खंदक असून आंतमध्यें गोपुरें व दुकानें यांचीं ठेल लागून गेली आहे, असें दृष्टीस पडतें. मधून मधून चित्रविचित्र रस्ते व चौक काढलेले आहेत व तेथील दरवाजे व वेशीही प्रशस्त आहेत. अर्गलादिक नाना-

तऱ्हेच्या यंत्रांचा देखील तेथें ठिकठिकाणीं उपयोग केलेला दृष्टीस पडतो. तिच्या सभोंवारचा कोट सुवर्णाचा आहे. त्या नगरीमध्यें नर, नाग, अश्व, रथ व एकंदर सैन्य यांची गर्दी आहे. सर्व देशांत पैदा होणाऱ्या वस्तूंचा तेथें संग्रह आहे. तेथील वृक्षांना दिव्य पुष्पें व फळें येतात. ध्वज व पताका इत्यादिकांची तेथें रांगच लागलेली दिसते. तेथील भवनें देखील प्रचंड असून ती नगरी शत्रूंना भयंकर व मित्रांना आनंददायी वाटते. एकंदरीनें ती सुंदर नगरी (तुझ्यासारख्या) नरेंद्राला रहाण्याला फार योग्य आहे. देवा, (त्या)नगरीच्या समीप रैवतनामक जो उत्कृष्ट पर्वत आहे, तेथें नंदन वनासारखें दिव्य व पुरद्वाराला भूषण देणारें उपवन तयार करून त्या पर्वताला स्वर्गलोकाची शोभा आण. सुरश्रेष्ठा, त्या ठिकाणीं जाऊन, तेथें तूं अधिवास कर. हें स्थान कुमाराना[1] विशेष रमणीय असें 'क्रीडाभवन' होईल. इंद्राच्या अमरावतीप्रमाणें त्रैलोक्यामध्यें ती रमणीय नगरी द्वारावती या नांवानें प्रसिद्ध होईल. जर या नगरीच्या सभोंवार समुद्र आणखी जमीन देईल, (ह्मणजे समुद्र मागें हटवून भूमि तयार करितां येईल) तर त्या ठिकाणीं विश्वकर्म्याला आपलें चातुर्य विविध प्रकारें दाखवितां येईल. हे प्रभो, त्रैलोक्यांतील दिव्य, मनासारखीं रत्नें, मोत्यें, प्रवाल, वज्र व वैडूर्य यांच्या सहाय्यानें विश्वकर्म्याकडून शेंकडों दिव्य स्तंभांचे, सर्व रत्नभूषित, दिव्य ध्वजपताकांनीं युक्त, स्वर्गांतील देवसभा व चंद्र आणि सूर्य यांच्या सारखे तेजस्वी व सुंदर असे अनेक सुवर्णमय प्रासाद तूं तेथें तयार करीव."

वैशंपायन सांगतात:—याप्रमाणें कृष्णाला आपला विचार सांगून व उभयतांना शिरसावंदन करून वैनतेय आपल्या आसनावर बसला. बलराम व कृष्ण यांनीं गरुडाच्या हितकर म्हणण्याचा विचार करून त्याप्रमाणें आपला बेत सर्व लोकांस कळविण्याचा निश्चय केला. नंतर फार मौल्यवान् व उंची भूषणें त्याला समर्पण करून त्याचा सत्कार केल्यावर त्यांनीं वैनतेयाला निरोप दिला. (हा निश्चय कायम झाल्यावर) स्वर्गांतील देवांप्रमाणें ते अत्यंत आनंदित झाले. पुढें भोजराजाला त्यांनीं आपला विचार विदित केल्यानंतर महायशस्वी उग्रसेन स्नेहपूर्वक कृष्णाला म्हणाला "कृष्णा, हे महाबाहो कृष्णा, हे यादवांच्या आनंदवर्धना, हे मधुसूदना, मी आतां जें कांहीं सांगतों तें तूं (कृपेनें) ऐकून घे. पतिहीन स्त्रियांप्रमाणें तुझ्यावांचून या नगरींत अथवा अन्य ठिकाणीं आम्हांला चैन पडावयाचें नाहीं. तुझ्यामुळें आम्ही सनाथ आहों. बाबारे, तुझ्या बाहुबलाचा आश्रय असला म्हणजे हे मानदा, प्रत्यक्ष इंद्राची मदत घेऊन जरी सर्व राजे आमच्यावर चालून आले तरी आम्हांला त्यांची भीति नाहीं. यदुश्रेष्ठा, तूं विजय संपादन करण्यासाठीं जेथें जेथें जाशील, तेथें तेथें आम्हांला बरोबर घेऊन जा. (एवढी आमची तुला प्रार्थना आहे.)

उग्रसेन राजाचें हें भाषण श्रवण केल्यानंतर देवकीपुत्रानें स्मित करून तुम्हास जसें सुखावह पडेल त्याचप्रमाणें मी निःसंशय वागेन असें त्याला आश्वासन दिलें.

---

[1] येथें वाईकर व व्यंकटेस यांचा पाठ 'कुमारीणां प्रचारश्च सुरमण्यो भविष्यति ।' असा आहे. परंतु आमचे छापील पोथीचा व कलकत्ता प्रतीचा पाठ 'कुमाराणां० ।' असा आहे. हाच आम्हास अधिक सभ्य वाटतो. कारण, 'पोरींत खेळण्याची कृष्णाला बापडी हौसच होती हें जरी खरें आहे. तरी गरुडासारख्या नम्र सेवकानें धन्याच्या वर्तनांतला असला नाजूक मुद्दा मुद्दाम बाहेर काढणें अयोग्य होय. त्यापेक्षां राजा कुमारांना संचार करण्यास तो पर्वत सर्वथा रमणीय होईल. हें म्हणणें अधिक सभ्य होय.

# अध्याय छप्पनावा.

—:०:—

## कालयवनाची स्वारी व द्वारकेला प्रयाण.

वैशंपायन सांगतात:—वरील गोष्टीला कांहीं काल लोटल्यावर एके समयीं सर्व यादव सभेमध्यें जमले असतां त्यांना उद्देशून कमलनयन श्रीकृष्णानें पुढील उत्तम व मुद्देसूद भाषण केलें.

श्रीकृष्ण म्हणाला:—"यादवहो, अनेक राष्ट्रांनीं परिवेष्टित असलेली ही मथुरा नगरी तुमची आहे. आमचेंही जन्म येथेंच झालें, परंतु आम्हांस गोकुळामध्यें वाढविलें. सांप्रत आपले सर्व शत्रु पराभूत होऊन आपल्या दुःखाचा परिहार झालेला आहे. आपण राजांशीं वैर मांडून जरासंधाबरोबर युद्ध सुरू केलें. हल्लीं आपल्यापाशीं पदाति, वाहनें व तऱ्हेतऱ्हेचीं रानें असंख्य असून आपण पुष्कळ मित्र जोडले आहेत, परंतु या मथुरेचें क्षेत्र (आपल्या वाढत्या प्रपंचाच्या मानानें) अल्प असून शत्रूला हिच्यावर वाटेल तेव्हां सुलभपणें चालून येतां येतें; शिवाय आपले मित्र व सैन्य हीं उत्तरोत्तर वृद्धिंगत होत आहेत; हे आपले कोट्यावधि कुमार, मुलेंबाळें व असंख्यात पदाति यांना येथें रहावयाला मोठी अडचण होते. या सर्व कारणांकरितां यदुपुंगवहो, इतउत्तर या ठिकाणीं रहाणें मला पसंत नाहीं. तुम्हांला मी बोलतों हें मान्य असेल तर एक नवीन नगरी वसविण्याचा माझा विचार आहे. या माझ्या मनोदयाबद्दल तुम्ही मला कृपेनें क्षमा करा. (एवढेंच माझें मागणें आहे.) यादवसभेमध्यें मी जो आपला हा दूरदर्शी व योग्य विचार तुम्हांला निवेदन करीत आहें, तो अखेर तुमच्या कल्याणाला कारण होईल."

कृष्ण निमूट बसल्यावर सगळे यादव हर्षित होऊन म्हणाले, "देवा, आम्हां सर्व जनांच्या हितासाठीं तुला जें योग्य दिसेल त्याप्रमाणें कर. (त्याला आमची पूर्ण अनुमति आहे.)"

यानंतर सर्व यादववीर या सुचनेविषयीं आपआपसांत विचार करूं लागले. जरासंध आम्हांला अवध्य आहे. शत्रूचें सैन्यही प्रचंड आहे. नराधिपांनीं या ठिकाणीं कांहीं थोडें-थोडकें सैन्याचें कंदन उडविलें नाहीं. खरोखर शेंकडों वर्षें युद्ध चाललें तरी देखील यांच्या विविध व प्रचंड सैन्याचा आपल्याला नाश करतां यावयाचा नाहीं. या गोष्टी मनांत आणूनच श्रीकृष्णानें येथून दुसऱ्या कोठें तरी जाण्याचें मनांत आणिलें असावें.

यादवांचा याप्रमाणें विचार चालला आहे इतक्यांत जरासंधराजा कालयवनासहवर्तमान पूर्वीप्रमाणें प्रचंड सैन्य बरोबर घेऊन पुनः चाल करून आला आहे, असें त्यांना कळलें. कालयवनाच्या साहाय्यानें जरासंधाच्या सैन्याचें सामर्थ्य अधिकच दुर्निवार झालें आहे व कालयवन अगदीं नजीक येऊन ठेपला आहे, असें पहातांच त्यांनीं कृष्णाच्या उपदेशाप्रमाणें द्वारावतीस जाण्याचा निश्चय ताबडतोब कायम केला. (ही यादवांची तयारी पाहून) सत्यनिष्ठ कृष्ण पुनः त्यांना म्हणाला. "यादवहो, आजच शुभ दिवस आहे. करितां आजच्या आज, आपण (आपल्या ठरलेल्या संकेताप्रमाणें) सैन्य व अनुयायी बरोबर घेऊन (द्वारावतीस जाण्यासाठीं) येथून निघण्याचें करूं."

कृष्णाची आज्ञा होतांच, अपरिमित सैनिकांच्या योगानें प्रतिनादित होत्साते वसुदेव प्रभृति सर्व यादव आपआपलीं कुटुंबें घेऊन सर्व ज्ञातिबांधवांसहवर्तमान दुंदुभी वाजवीत, मथुरेचा त्याग करून बाहेर पडले. आपले सुसन्नद्ध मत्त गज, रथ व सजवलेले अश्व, इत्यादि सर्व वाहनें त्यांनीं आपल्या बरो-

बर घेतलीं होतीं. भरतश्रेष्ठा, सुवर्णमय रथ, मत्त गजश्रेष्ठ, आणि सारथ्यांचे चाबूक व टांच बसतांच उड्या मारणारे अश्व, यांवर आरूढ होऊन आपआपल्या सैन्याच्या तुकड्यांना शोभविणारे यादव आनंदित होत्साते पश्चिम दिशेच्या अनुरोधानें गमन करूं लागले. त्यांत वसुदेवप्रभृति मुख्य व रणपटु यादव सैन्याच्या तुकड्या आपापल्या मागून नेत होते. याप्रमाणें मार्गक्रमण करितां करितां, ते यदुपुंगव नानाप्रकारच्या लता व नारळीचें बन यांनीं युक्त असलेल्या समुद्राच्या जलप्राय प्रदेशाप्रत जाऊन पोंचले. तो प्रदेश नागबेला[1] व केतकीचीं बनें यांनीं मंडित असून, मधून मधून त्यांत ताल, पुन्नाग, बकुल व द्राक्ष यांची गर्द झाडी लागून राहिलेली होती.

तो रमणीय प्रदेश अवलोकन करून स्वर्गस्थ देवांप्रमाणें, त्या सुखलोलुप यादवांना अत्यानंद झाला. शत्रूच्या वीरांचा फडशा पाडणाऱ्या कृष्णानें नूतन नगराचें गांवठण कोठें करावें या बुद्धीनें चौफेर नजर टाकली, तों वाहनांना हितकर व सिकता आणि ताम्रमृत्तिका यांनीं युक्त असा एक सागर-परिवेष्टित विस्तृत प्रदेश त्याच्या दृष्टीस पडला. तो प्रदेश सर्व नगरलक्षणांनीं संपन्न असून प्रत्यक्ष लक्ष्मी त्या ठिकाणीं वास्तव्य करीत आहे कीं काय, असा भास होई. त्या सिंधुराजाच्या प्रदेशावर सागरावरून येणारी वाऱ्याची झुळुक सतत वाहती असून त्याभोंवतीं समुद्राचें जल प्राप्त होतें व कोणत्याही नगरलक्षणाची तेथें उणीव नव्हती. त्या ठिकाणापासून नजीकच रैवतक नामक एक सुंदर पर्वत असून, त्याचीं शिखरें मंदरासारखीं प्रशस्त होतीं. त्या पर्वतावर एकलव्य व द्रोण यांनीं दीर्घकालपर्यंत वास्तव्य केलें असल्याकारणानें त्याला तीर्थाची शोभा आली होती. दुसरेही पुष्कळ लोक त्यावर रहात असून सर्व प्रकारच्या रत्नांचें तेथें वैपुल्य होतें. त्याच ठिकाणीं सोंगट्यांच्या पटासारखी द्वारवती नामक त्या राजाची विस्तीर्ण विहारभूमि तयार केली होती. तेंच स्थान नवीन नगर वसविण्याकरितां कृष्णानें पसंत केलें व यादवांनाही आपल्या सैन्याचा तळ तेथेंच देणें रुचलें. सूर्यास्ताच्या सुमारास, सेनापालांनीं व यादवश्रेष्ठांनीं आपआपल्या उपयोगासाठीं तेथें शिबिरें निर्माण केलीं. आणि यदुश्रेष्ठ प्रभु कृष्ण नूतन नगरी वसवून यादवांसहवर्तमान तेथेंच कायमचा राहिला. विधिपूर्वक त्या नूतन नगरीचें नामकरण केल्यानंतर, गदापाणि यादवोत्तम पुरुषश्रेष्ठानें त्या ठिकाणीं संकल्पमात्रेंकरून पुष्कळ भवनें निर्माण केलीं.

राजा, याप्रमाणें बांधवांसह द्वारवतीप्रत येऊन सर्व यादव स्वर्गस्थ देवांसारखे सुखानें तेथें राहिले. केशिरिपु कृष्ण देखील जरासंधाच्या भयानें व कालयवन आतां मथुरेवर चाल करून येत आहे असें ऐकून, द्वारवती पुरीमध्येंच ताबडतोबच रहाण्यासाठीं आला.

## अध्याय सत्तावन्नावा.

—:०:—

### कालयवनाचा वध.

जनमेजय ह्मणालाः—हे भगवन्, सुबुद्ध व महात्म्या यदुश्रेष्ठ कृष्णाचें चरित्र सविस्तर ऐकावें असें मला वाटतें. ( हें मी पूर्वीं आपल्याला अनेकवार सांगितलेंच आहे. ) हे द्विजश्रेष्ठा, मथुरा नगरी म्हणजे मध्यदेशाचें नाक, लक्ष्मीचें माहेरघर, पृथ्वीचें जणूं शिखर, धनधान्यादिकांनीं समृद्ध, विपुल जलानें युक्त व उदारधी पुरुषांनीं गजबजलेलें सर्वोत्कृष्ट निवासस्थान,

[1] ही एक चिकण्याची जात आहे, हिलाच गांगेरूकी म्हणतात.

असें असतांना, युद्ध होण्यापूर्वींच दाशार्ह कृष्णानें त्या नगरीचा कां बरें त्याग केला? कृष्णानें मथुरेहून द्वारवतीस प्रयाण केलें असें पाहून कालयवनानें पुढें काय केलें? जलवेष्टित द्वारवतीप्रत प्राप्त झाल्यानंतर, महाबाहु महातपस्वी व योगिश्रेष्ठ जनार्दनानें कोणता उपक्रम केला? कालयवनाला दुर्जय समजून जनार्दन देखील पळून गेला, असें त्याच्यापाशीं कसलें सामर्थ्य होतें? व असला वीर्यवान् पुत्र कोणापासून पैदा झाला? (इत्यादि सर्व हकीगत हे भगवान् मला कृपेनें सांगा.)

वैशंपायन सांगतातः—वृष्णी व अंधक यांचा गार्ग्य नामक महा विचारी गुरु होता. तो नेहमीं ब्रह्मचर्य व्रताचें पालन करीत असल्यानें त्याला पत्नी असूनही मुळींच ठाऊक नव्हती. याप्रमाणें तो अव्यय ऊर्ध्वरेता मुनि (दुसऱ्या कोणाला पीडा न देतां) कालक्रमणा करीत असतांना एके समयीं भर राजसभेमध्यें, "तूं पुरुष नाहींस "असें म्हणून श्यालानें त्या गार्ग्य ऋषीचा धिःकार केला. राजा, या प्रकारें अवमान झाल्यामुळें क्रुद्ध होऊन स्त्रीची इच्छा न करितां, त्यानें अजितंजय नामक नगरामध्यें महाभयंकर तपाचरण करण्यास प्रारंभ केला. द्वादशवर्षेंपर्यंत लोहपिष्ट भक्षण करून अचिंत्य व शूलपाणि महादेवाची त्यानें आराधना केली. तेव्हां रुद्रानें प्रसन्न होऊन "वृष्णी व अंधक यांना युद्धामध्यें पराभूत करील असा अत्यंत तेजस्वी व समर्थ पुत्र तुला प्राप्त होईल," असा त्याला वर दिला. त्या वेळीं यवनाधिपति राजा दैवयोगानें निपुत्रिक असून पुत्रप्राप्ति व्हावी अशी त्याला मोठी इच्छा होती. त्यानें हा शंकरानें गार्ग्यमुनीला पुत्राविषयीं दिलेला वर ऐकिला. तेव्हां त्या यवनराजानें त्या द्विजश्रेष्ठाला आणवून व त्याचा कोप दूर करून त्याला गौळवाड्यांतील गोपस्त्रियांमध्यें सोडून दिलें. त्या ठिकाणीं गोपाली नामक अप्सरा गोपस्त्रीचा वेष धारण करून प्राप्त झाली व तिनें गार्ग्याचा तो न ढळणारा व दुर्धर गर्भ आपल्या पोटामध्यें धारण केला. राजा, शंकराच्या योजनेनें गार्ग्याशीं भार्येप्रमाणें वागणाऱ्या त्या मानवस्त्रीरूपी अप्सरेचे ठिकाणीं उत्पन्न झालेला शूर व महाबल पुत्र तोच हा कालयवन होय.

पुढें तो कालयवन त्या निपुत्रिक यवनराजाच्या अंतःपुरामध्यें लहानाचा मोठा झाला. कालवशात् तो राजा मृत झाल्यानंतर राज्यसूत्रेंही कालयवनाच्या हातीं आलीं. नंतर युद्ध करण्याच्या हेतूनें तो राजा द्विजश्रेष्ठांपाशीं वृष्णी व अंधक यांच्या कुलाविषयीं चौकशी करूं लागला; तेव्हां नारदानें त्याला ती माहिती दिली व गार्ग्यमुनीपासून रुद्रप्रसादानें (यदुकुलाला पुरून उरणारा कालयवन नामक) पुत्र उत्पन्न झाला आहे, ही हकीकतही नारदानेंच कृष्णाला निवेदन केली. असो. तो यवन दिवसेंदिवस प्रबळ होत चालला तरीही तेजस्वी कृष्णानें त्याची उपेक्षाच केली. पुढें तो यवनांचा बलाढ्य राजा जसजसा जोरावत चालला तसतसे शक, तुषार, दरद, पारद, शृंगल, खस, पल्हव, हैमवत (हिमालयावर रहाणारे) इत्यादि शेंकडों म्लेंछ राजे त्याचा आश्रय करून त्याचे अनुयायी बनले. नंतर त्यानें (शाल्वराजाच्या संदेशास अनुसरून) विविध वेष व आयुधें धारण करणारे सर्व भयंकर दस्यू बरोबर घेऊन मथुरेवर चाल केली. त्याच्या बरोबरचे सहस्रावधि किंबहुना कोट्यावधि गज, अश्व, खर, उष्ट्र इत्यादि वाहनें व असंख्य सैनिक यांच्या योगानें पृथ्वी कंपायमान झाली. इतक्यांच्या चालण्यानें वर उडालेल्या धुळीनें सूर्यमार्ग आच्छादित होऊन सैन्यांतील वाहनें व पदाति यांच्या मूत्रशकृ-

ताची नदी वाहूं लागली. राजा, अश्व व उष्ट्र इत्यादिकांच्या शकृताच्या राशीपासून उत्पन्न झाल्याकारणानें त्या नदीला 'अश्व-शकृत्' असें नांव पडलें.

याप्रकारें कालयवनाचें प्रचंड सैन्य ( मथुरेवर चालून ) येत आहे असें कळतांच, सर्व प्रमुख वृष्णींना व अंधकांना बोलावून आणून वासुदेव म्हणाला. " हे वृष्ण्यन्धकहो, हें आपणांवर मोठें भयंकर संकट आलें आहे. शंकराच्या वरप्रभावामुळें, या शत्रूचा आपल्याला वध करतां येणें शक्य नाहीं. सामादि सर्व उपाय आपण करून पाहिले परंतु तो बलानें मदोन्मत्त झाला असल्यामुळें युद्धावांचून दुसरी गोष्ट बोलत नाहीं. कालयवन येईपर्यंतच मी मथुरेमध्यें रहावें, असें नारदानें मला सांगितलें आहे. हा वेळपर्यंत या कालयवनाशीं युद्ध न करितां, सामाचेंच बोलणें करावें हें मला परम संमत होतें. बरें, राजा जरासंधाला आम्ही सदाच अक्षम्य वाटतों. इतर राजेही आपल्या मंडळीचे प्रतापामुळें नेहमीं आपला द्वेष करितात. दुसरे कांहीं राजे, आपण कंसाचा वध केला म्हणून रागावून जाऊन जरासंधाच्या आश्रयाला गेले आहेत, त्यांचीही आपल्याला नेहमीं त्रास देण्याची इच्छा आहे. आजपर्यंत आपले पुष्कळ ज्ञातिबंधु यादव या राजांनीं मारले आहेत. अशा परिस्थितींत या मथुरेमध्यें राहून आपली वाढ होणें शक्य नाहीं. ( आपला निभाव लागणें शक्य नाहीं.)

याप्रमाणें बोलून केशवानें मथुरेचा त्याग करण्याचा निश्चय केला. नंतर, एका घटामध्यें काळ्याकुट्ट अंजनराशीप्रमाणें कृष्णवर्ण असलेला एक भयंकर विषारी सर्प घालून व त्या ( घटावर ) मुद्रा करून, तो घट कृष्णानें कालयवनाकडे स्वतःच्या दूताकरवीं पाठवून दिला. हा घट म्हणजे कालयवनाच्या मनामध्यें भय उत्पन्न करण्याचा गोविंदाचा एक इशाराच होता. त्याप्रमाणें दूतानें तो घट त्या कालयवनाला दाखविला. परंतु, हे भरतश्रेष्ठा, त्या योगानें भिऊन न जातां " कृष्ण हा ( या ) कालसर्पासारखा आहे " असें म्हणून हें कृत्य यादवांनीं मला भिवविण्याकरितां केलें आहे असें कालयवनानें ओळखलें. मग उलट त्यानें त्या घटामध्यें भयंकर दंश करण्याऱ्या मुंग्या घालून व पूर्वींप्रमाणें मोहोरबंद करून आपलें असंख्यत्व सूचित करण्याच्या हेतूनें तोच घट कृष्णाकडे परत पाठविला. त्या घटांतील मुंग्यांनीं कालसर्पाच्या सर्व शरीराला तीक्ष्ण चावे घेतल्यामुळें तो मृत झाला.आपली युक्ति फसली असें पाहून लागलीच मथुरेचा त्याग करून वासुदेव द्वारकेला गेला. राजन् द्वारकेमध्यें जाऊन महायशस्वी व पुरुषव्याघ्र वासुदेवानें यादवांना आश्वासून तेथें ठेवलें व नंतर आपण एकटाच बाहुबलानें कालयवनाचा नाश करून वैराचा अंत करण्याच्या बुद्धीनें कांहीं एक शस्त्र बरोबर न घेतां तेथून निघून पायींच मथुरेला आला. तेथें महापराक्रमी मधुसूदनाला पाहतांक्षणींच आनंदित होऊन कालयवन रागानें त्याच्या अंगावर धांवून गेला. त्याबरोबर महाबल कृष्ण पुढें पळूं लागला व त्याला धरण्यासाठीं यवनेंद्र त्याच्या मागोमाग धांवत सुटला. मधून मधून गोविंद मागें पाही व मग पुनः पळत सुटे. असें करून त्यानें कालयवनाला दूरवर फसवून नेलें. त्या यवनेंद्रानें कृष्णाला पकडण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न केले. परंतु तो योगनिपुण गोविंद ( कांहीं ) त्याच्या हातीं लागला नाहीं.

१ विष्ठा.

१ तूं कालसर्पासारखा प्रबल असलास तरी आम्हीं संख्येनें पुष्कळ असल्यामुळें मुंग्यांप्रमाणें तुझा नाश करूं. ( हा भावार्थ )



असल्या अजिंक्य पुंडरीकाक्षाला तूं बांधायाला पहातोस या तुझ्या मुर्खत्वाला काय म्हणावें. ( उद्योगपर्व अ० १३० पृष्ठ २६९.)

पूर्वी सुरासुरांचें युद्ध झालें, त्या वेळीं मांधात्याचा महायशस्वी व बलाढ्य पुत्र जो राजा मुचुकुंद, त्यानें मोठा पराक्रम केला. तेव्हां ( त्याच्या कर्तृत्वानें प्रसन्न होऊन ) देवांनीं त्याला वर मागावयास सांगितला असतां, ( युद्धाच्या दगदगीमुळें ) अत्यंत श्रमित झाल्यामुळें ' आपणास सपाटून निद्रा यावी ' हाच वर त्यानें मागितला व तो म्हणाला. " देवहो, जो कोणी मी निजलों असतां मला जागृत करील, त्याकडे मी आपल्या रागानें लाल झालेल्या नेत्रानें पाहतांच त्याचें भस्म करीन असें सामर्थ्य मला द्या. " त्यानें हे शब्द पुनः पुनः उच्चारले. यावर " तथास्तु " असें म्हणून इंद्रादि देवांनीं त्याला निद्रित होण्याची अनुज्ञा दिली. श्रांत झालेल्या मुचुकुंदानें लागलीच, एका उत्तम पर्वताच्या गुहेमध्यें प्रवेश करून श्रमपरिहारासाठीं निद्रा-सौख्य घेण्याला प्रारंभ केला. तेव्हांपासून तो जो निद्रित होता, तो कृष्ण ( वरकांतीं काल-यवनाच्या भीतीनें ) त्या ठिकाणीं येईपावेतों निद्रिस्तच होता. या मुचुकुंद राजाचें सामर्थ्य व देवांपासून त्याला प्राप्त झालेला वर, या-विषयींची माहिती नारदांकडून वासुदेवाला कळली होती.

असो; म्लेंच्छ शत्रूच्या भयानें कृष्ण पुढें पळत असतां, शेवटीं बऱ्याच कालानें तो मुचु-कुंद ज्या गुहेमध्यें निजलेला होता, त्या गुहे-मध्यें हलकेच शिरला. नंतर मुचुकुंदाच्या दृष्टीस पडूं नये अशा बेतानें महा बुद्धिमंत कृष्ण त्या राजर्षीच्या मस्तकाकडे जाऊन उभा राहिला. कृष्णाच्या मागून दुष्टबुद्धि कालयवनही, त्या गुहेंत शिरतो न शिरतो, तों कृतांतासारखा तेजस्वी राजा मुचुकुंद तेथें निद्रिस्त झालेला होता, तो त्याच्या नजरेस पडला. तो वासुदेवच आहे असें वाटून पतंग जसा दिव्यावर झडप घालतो त्याप्रमाणें आ-त्मनाशार्थ कालयवनानें त्या मुचुकुंद राजाला आपल्या पायानें लत्ताप्रहार केला. त्याच्या पादस्पर्शानें जागृत होऊन तो मुचुकुंद राजर्षि निद्राभंग झाल्यामुळें, फार संतप्त झाला. लाग-लींच त्याला इंद्राच्या वराचें स्मरण होऊन त्यानें कालयवनाकडे दृष्टिक्षेप केला. तों तत्काल त्याच्या क्रोधाग्नीनें त्या यवनेंद्राच्या अंगाचा भडका झाला व उल्कापातानें जसा वृक्ष जळावा त्याप्रमाणें मुचुकुंदाच्या नेत्रांच्या ते-जांतून बाहेर पडलेल्या अग्नीनें तो क्षणांत जळून खाक झाला. याप्रकारें तो युक्तिवान् कृष्ण कृतकृत्य झाला असतां, फार दिवसांनीं जा-गृत झालेल्या राजाला उद्देशून त्यानें असें मधुर भाषण केलें. " राजन्, तूं दीर्घकालपर्यंत या ठिकाणीं निद्रासुखाचा अनुभव घेत असल्या-विषयीं मला नारदानें सांगितलें. तूं माझा मो-ठाच कार्यभाग केलास. तुझें कल्याण असो, मी आतां जातों. "

वासुदेवाच्या शरीरावयवांचें प्रमाण फारच लहान पाहून ' आपण निद्रिस्त झाल्याला बराच काळ लोटून युगांचेंही परिवर्तन झालें असावें, असा मुचकुंद राजानें तर्क केला. नंतर तो गोविंदाला म्हणाला " आपण कोण आहां? व येथें कशासाठीं आलां आहां ? मी किती कालपर्यंत निद्रित आहें, हें जर तुम्हांला माहीत असेल तर मला ( कृपेनें ) सांगा. "

श्रीकृष्ण ह्मणालाः—नहुषाचा पुत्र ययाति, या नांवाचा सोमवंशामध्यें एक राजा होऊन गेला. त्याच्या ज्येष्ठ पुत्राचें नांव यदु. याशिवाय त्याला

[1] हा नेमका कधीं निजला हें जरी माहीत नाहीं तरी हा त्रेतायुगींच्या दाशरथी रामाचा एकेचाळिसावा पूर्वज आहे. तेथपासून श्रीकृष्णावतारांतील प्रस्तुत प्रसंगापर्यंत म्हटलें तरी किती दीर्घकाल झाला. कुंभकर्णाचा यापुढें उगाच बोभाटा म्हणावयाचा.

आणखी धाकटे चार पुत्र होते. विभो, यदुवंशांत उत्पन्न झालेल्या वसुदेवाचा मी वासुदेव नामक पुत्र आहें. राजा, मी तुझ्याकडेच आलों होतों. तूं त्रेतायुगामध्यें निद्रिस्त झालास असें नारदाच्या तोंडून मला कळलें आहे. सांप्रत [1]कलियुग चाललें आहे, आणखी आतां मी तुझ्यासाठीं काय करूं तें सांग. राजा, मी जरी शेंकडों वर्षें युद्ध केलें असतें, तरी देखील माझ्याच्यानें शंकराच्या वरामुळें ज्याला मारवलें नसतें, त्या माझ्या शत्रूला तूं दग्ध केलेंस.

वैशंपायन सांगतातः-कृष्णाचें भाषण ऐकल्यानंतर तो गुहेच्या मुखांतून बाहेर आला. कालयवन मेल्यामुळें कृतकार्य झालेला बुद्धिमंत कृष्णही त्याच्या मागोमाग चालला होता. ( बाहेर येऊन पहातो तों ) सर्व पृथ्वीवर लहान बांध्याचीं, कमी उत्साहाचीं, अल्प बलाचीं, लहान पराक्रमाचीं आणि कमी सामर्थ्याचीं माणसें जिकडे तिकडे पसरलेलीं असून आपलें राज्य देखील दुसऱ्या कोणीं अधिष्ठित केलें आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. नंतर त्यानें संतोषानें गोविंदाला जावयास सांगून तपाचरण करण्याच्या निश्चयानें हिमाचलावरील महावनामध्यें प्रवेश केला. त्या ठिकाणीं तपश्चर्या करून त्यानें आपला देह ठेविला व त्याच्या शुभ कर्मांनीं त्या राजाला स्वर्गप्राप्ति झाली. युक्तीनें आपल्या शत्रूचा घात करून महाथोर व धर्मनिष्ठ वासुदेव असंख्य रथ, हत्ती, अश्व, चिलखतें, शस्त्रें, आयुधें व ध्वज यांनीं युक्त असलेल्या सैन्यापाशीं आला. नंतर तें स्वामीरहित झालेलें सैन्य बरोबर घेऊन कृतकृत्य व सुबुद्ध कृष्ण तेथून निघून मथुरेला आला व त्यानें सर्व हकीकत उग्रसेनाला निवेदन केली. मग ( कालयवनापासून ) प्राप्त झालेल्या विपुल धनानें जनार्दनानें द्वारवती नगरीला शोभा आणली.

## अध्याय अठ्ठावन्नावा.

—:०:—

### द्वारकेची स्थापना.

वैशंपायन सांगतातः—नंतर सूर्योदय झाल्यावर, सुप्रभातींच जपजाप्य आटोपून हृषीकेश वनाच्या सीमेवर अधिष्ठित झाला. तेथून त्यानें दुर्गस्थानासाठीं ( सोईवार ) जागा पहाण्याच्या हेतूनें सभोंवारच्या प्रदेशावर नजर टाकिली. त्याच्याबरोबर मुख्य मुख्य यादवही आलेले होते. मंदवारीं रोहिणीनिक्षत्राचे सुमुहूर्तावर द्विजश्रेष्ठांकडून विपुल पुण्याहवाचन व स्वस्तिवाचन करवून त्यानें दुर्ग बांधण्यास प्रारंभ केला. नंतर इंद्र ज्याप्रमाणें देवांना आज्ञा करतो, त्याप्रमाणें केशिसूदन, कमललोचन व वक्तृश्रेष्ठ कृष्ण यादवांना ह्मणाला.

" ही पहा, मीं या ठिकाणीं स्वर्गासारखी भूमि पसंत केली आहे! या नगरीचें मीं द्वारवती असें नांव ठेविलें आहे. हिच्या नांवाची फार प्रसिद्धि होईल. मी पृथ्वीवर निर्माण केलेली ही नगरी इंद्राच्या अमरावतीसारखी फार रमणीय होईल. चौक, राजमार्ग, अंतःपुरें इत्यादि जीं जीं चिन्हें व भवनें अमरावतीमध्यें आहेत तशींच मी येथें हुबेहुब तयार करविणार. आपल्या शत्रूंना पीडा देऊन, उग्रसेनप्रभृति तुम्ही सर्वजण या नगरीमध्यें निर्भयपणें आनंदोपभोग घ्या. यादवहो, आपआपल्या घरांसाठीं जागा पसंत करून घेऊन तिवाठे व चवाठे कोठें करावयाचे तें ठरवा. तसेंच राजमार्ग आंखून राजवाड्याचें ठिकाण कायम करा. गृहकर्मांमध्यें कुशल असलेल्या प्रमुख शिल्प्यांना बोलावून आणण्यासाठीं सर्व देशभर दूत पाठवा. "

---

[1] हें द्वापरांत कलियुग कसें यावें?—याचा उलगडा ' युग ' शब्दाची प्रचलित कालमर्यादा बदलल्यावांचून होणें नाहीं.

कृष्णाचें भाषण ऐकून, घरें बांधण्याला उत्सुक झालेल्या यादवांनीं आपआपल्या घरापुरती जागा मोठ्या संतोषानें पसंत केली. राजश्रेष्ठा, नंतर शुभ दिवशीं ब्राह्मणजातींचें पूजन केल्यावर हातामध्यें सूत्र घेऊन यादवोत्तमांनीं जागा मोजून घेतली व मग तेथें त्यांनीं विधिपूर्वक वास्तुदेवतेची पूजा केली.

इतकें होत आहे तों, महामति गोविंद वास्तुकर्मांत कुशल असलेल्या कारागिरांना म्हणाला. "लोकहो, आमच्याकरितां येथें एक सर्वोत्कृष्ट देवालय बांधा व त्यांत इष्टदेवतेची उत्तम प्रकारें स्थापना करा. त्या मंदिरांतील चौक व मार्ग अत्यंत निर्दोष असे तयार करा."

"बरें आहे" असें महाबाहु कृष्णाला उत्तर देऊन त्या स्थपतींनीं यथाविधि दुर्ग बांधण्याच्या सामुग्रीची जुळवाजुळव केली. नंतर, त्यांनीं यथान्याय दुर्ग व देवालयें निर्माण करून, शास्त्रोक्त क्रमानें ब्रह्मदेव प्रभृति गृहबलिदेवता, वरुण, अग्नि, सुरेंद्र यांचीं स्थानें व पाटावरवंटा, उखळ इत्यादिकांसाठीं स्थानयोजना केली. मग शुद्धाक्ष, ऐंद्र, भल्लाट आणि पुष्पदंत अशीं चार देवांचीं नांवें देऊन, ( चारी दिशांना ) त्यांनीं चार वेशी बांधून काढल्या.

याप्रकारें गृहादिकांचीं कामें करण्यामध्यें सर्व यादव गुंतले असतां, द्वारवती नगरीची यापेक्षां त्वरित निर्मिति कशा प्रकारें होईल याविषयीं माधव आपल्या मनाशीं विचार करीत होता; तों त्याला सुदैवानें एकाएकीं यादवांच्या अभिवृद्धीस कारणीभूत होणारी, नगरीला हितकर आणि ईप्सित हेतु शीघ्र तडीस नेणारी अशी विमल युक्ति सुचली. देवांचा मुख्य शिल्पी व ब्रह्मदेवाचा समर्थ पुत्र विश्वकर्मा हा या नगरीची आपल्या बुद्धीनें हां हां म्हणतां रचना करील ही युक्ति मनांत येतांच, त्यानें तेथें प्रगट व्हावें म्हणून, एकांत स्थळीं जाऊन व स्वर्गाभिमुख होऊन, कृष्णानें विश्वकर्म्याचें ध्यान केलें. त्याबरोबर लागलींच महाबुद्धिमंत शिल्पाचार्य व सुरश्रेष्ठ विश्वकर्मा कृष्णाच्या संमुख येऊन उभा राहिला व म्हणाला.

विश्वकर्मा ह्मणाला:—"हे विष्णो, मला इंद्रानें तुझ्याकडे पाठविलें आहे. हे धृतव्रता, हा मी तुझा दास तुझ्या समोर उभा आहें. मी तुझी कोणती कामगिरी करावयाची, याची मला आज्ञा कर. जसा मला अव्यय व देवाधिदेव शंकर, तसाच तूंही वंद्य आहेस. हे प्रभो, मी तुम्हां उभयतांमध्यें भेदभाव मानीत नाहीं. हे महाबाहो, त्रैलोक्याला आज्ञा करण्याचा तुझ्या वाचेचा अधिकार आहे. तुझ्या जें मनांत आलें असेल, तें ( खुशाल ) मला निवेदन कर. हा मी तुझ्या समोर उभा आहें. मी काय करूं तें मला सांग."

विश्वकर्म्याचें याप्रकारचें विनयशील भाषण श्रवण करून यदुश्रेष्ठ व कंसारि कृष्णानें अनुपम शब्दांनीं प्रतिभाषण केलें. "हे सुरश्रेष्ठा, तुला देवसभेमध्यें पूर्वीं गुप्त ठरलेला संकेत विदितच आहे. आपण प्रस्तुत जेथें स्थित आहों, तेथें माझ्यासाठीं एक भवन निर्माण करण्याची आवश्यकता आहे. हे सुव्रता, माझ्या पराक्रमाला अनुरूप अशीं भवनें सभोंवार निर्माण करून व माझ्याकरितां या ठिकाणीं एका ( सुंदर ) नगरीची रचना करून तूं आपलें चातुर्य ( या भूतलीं ) प्रगट कर. हे महामते, स्वर्गांतील अमरावतीसारखी या पृथ्वीवर तूं अत्युत्तम नगरीची रचना कर. खरोखर, हें कार्य ( मी सांगतों त्याप्रमाणें ) तडीस नेण्याला तूं ( पूर्णपणें ) समर्थ आहेस. वैकुंठ लोकांतील माझ्या भवनाप्रमाणें, हुबेहुब

तूं या द्वारवतीमध्यें माझें स्थान निर्माण कर; म्हणजे या नगरीचें, यदुकुलाचें आणि माझें ऐश्वर्य मर्त्य लोकांच्या दृष्टीस पडेल."

हें ऐकून, महा बुद्धिमान् विश्वकर्मा शुद्धाचरणी व असुरविनाशक कृष्णाला म्हणाला "प्रभो, तूं सांगितल्याप्रमाणें सर्व कांहीं मीं करितों. परंतु एवढ्या जागेंत वसविलेली नगरी तुझ्या अनुयायांना पुरेशी होणार नाहीं. जर हा जलनिधि समुद्र मागें हटून, थोडीशी जागा देण्याची कृपा करील, तर मात्र हे पुरुषोत्तमा, ही नगरी फार मोठी, विस्तीर्ण, शोभिवंत व सर्वलक्षणसंपन्न होईल. फार काय सांगूं, मग प्रत्यक्ष चारी समुद्र मनुष्यरूप घेऊन हिच्यावर संचार करूं शकतील."

कृष्णानें समुद्रापासून भूमि मिळविण्याचा पूर्वींच निश्चय केला होता. त्यांत विश्वकर्म्यानें जेव्हां भर दिली, तेव्हां ( लागलींच ) त्या वक्तृश्रेष्ठानें सरित्पति सागराला म्हटलें (विनंती केली ) "जर माझ्याविषयीं तुझ्या मनांत कांहीं आदर असेल, तर हे सागरा, तूं मागें हटून जलांतील द्वादश योजन भूमि मोकळी करून दे. तूं याप्रमाणें जागा दिलीस म्हणजे या माझ्या रमणीय नगरीचें क्षेत्र वाढून तिच्या ठिकाणीं माझें सर्व सैन्य अडचण न होतां राहूं शकेल."

कृष्णाच्या वचनास अनुसरून लागलींच नद व नद्या यांच्या पतीनें ( सागरानें ) वायूच्या साहाय्यानें आपल्या जलाचा संकोच करून, जागा खुली करून दिली. याप्रमाणें गोविंदाच्या विज्ञप्तीचा सागरानें आदर करून बरीच जागा मोकळी करून दिली असें पाहून विश्वकर्म्याला मोठा संतोष झाला, व तो यदुनंदनाला म्हणाला, "हे गोविंदा, मी आपल्या मनामध्यें, या सर्वोत्कृष्ट नगरीची रूपरेषा आंखली आहे. विभो, थोडक्याच अवकाशांत या रमणीय नगरींत असंख्य गृहांची मालिका लागून पृथिवीला ही ककुदाप्रमाणें अलंकृत करील. तसेंच, उत्तम वेशी, तोरणें, बाजार हाट, दुकानें व चौक इत्यादिकांनीं युक्त होईल."

असो. इतकें म्हणून विश्वकर्म्यानें त्या सुरपूजित प्रदेशांतील द्वारवती नगरीमध्यें श्रीकृष्णासाठीं स्नानगृहांनीं युक्त असलेलें विस्तीर्ण अंतःपुर तयार केलें व नंतर त्यानें आपल्या मानसिक सामर्थ्यानें त्या रमणीय वैष्णवी नगरीची रचना केली. त्या नगरीला कुशलतेनें वेशी बांधून, तिच्यासभोंवार त्यानें उत्कृष्ट तट ( प्राकार ) निर्माण केला. शिवाय तिला भोंवतालून पाण्याचा खंदक व मृत्तिकेचे कोट यांचें संरक्षण असून, सुंदर नरनारींचे गण व वणिक्जन यांच्या संचारानें तिला बरीच शोभा आली होती. विकण्यासाठीं जिकडे तिकडे तऱ्हेतऱ्हेच्या वस्तु मांडलेल्या दिसत असल्यामुळें ती आकाशस्थ नगरीच भूतलीं आली आहे कीं काय, असा भास होई. तेथील पाणलोट व विहिरी यांतील जल प्रसन्न असून सभोंवार उद्यानांची सुंदर मालिका लागलेली असल्याकारणानें, ती नगरी बुरखा घेतलेल्या विशालनेत्र वनितेप्रमाणें दिसत होती. त्या नगरीमध्यें पुष्कळ प्रशस्त चौक असून तींतील उत्तमोत्तम भवनें मेघमंडळाला जाऊन भिडलीं होतीं. रस्ते व शुभ्र राजमार्ग तेथें किती होते याची गणतीच नव्हती. अमरावती जशी स्वर्गाला भूषा देते, त्याप्रमाणें तिनें पश्चिम सागराला शोभा आणिली होती. खरोखर तेथें पृथ्वीवरील सर्व प्रकारच्या रत्नांच्या खाणी असून देवांना देखील ती सुक्षेत्राप्रमाणें वाटण्यासारखी होती. ती नगरी पाहून सामंतराजांच्या मनामध्यें मत्सर उत्पन्न होई. त्या नगरींतील उंच उंच प्रासादांमुळें आकाश देखील प्रकाशरहित झालें. पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांतील

असंख्य माणसांची तेथें गर्दी उडून राहिली होती. ( सर्व राष्ट्रांतील लोक धंद्यासाठीं तेथें आलेले होते. ) सागराच्या जलौघावरून द्वारवतीमध्यें वारा येत असल्याकारणानें तो नेहमींच शीतळ असे. रमणीय समुद्रकिनारा व उपवनें यांच्या योगानें मनोहर दिसणारी द्वारका, तारकायुक्त अंतरिक्षाप्रमाणें शोभिवंत दिसत होती. तिच्यासभोंवार सुवर्णाचा सूर्यतुल्य कोट होता. तेथील हेममय गृहांनीं व गंभीर ध्वनि करणाऱ्या मेघांसारख्या (प्रचंड) द्वारांनीं आणि सौधांनीं (गच्च्या) तिला विशेष शोभा आली होती. मधून मधून कांहीं गच्च्या इतक्या विशाल होत्या कीं, त्यांच्या छायेमुळें मोठाले राजरस्ते देखील आच्छादित होऊन गेले होते.

असो. आपल्या इष्टजनांनीं गजबजून गेलेल्या त्या द्वारवती नगरीमध्यें सर्व यादवांसह कृष्णानें वसती करून चंद्र जसा आकाशाला शोभवितो त्याप्रमाणें तिला शोभा आणिली. विश्वकर्म्यानें या प्रकारें अमरावतीसारखी नगरी निर्माण केल्यानंतर गोविंदानें त्याचा सत्कार केला व मग तो आपल्या स्वर्गलोकाप्रत निघून गेला.

इतक्यांत या द्वारकावासी जनांना मी अगणित द्रव्याची प्राप्ति करून दिली तर त्यांना फारच आनंद होईल असा विचार त्या आत्मज्ञानी कृष्णाच्या मनामध्यें आला. लागलींच त्या उपेंद्र प्रभूनें कुबेराच्या सर्व निधींमधील शंख नामक श्रेष्ठ निधीला रात्रीं आपल्या भवनामध्यें पाचारण केलें. द्वारकाधीश आपल्याला बोलावीत आहे असें समजतांच तो निधिश्रेष्ठ स्वतः कृष्णासमोर येऊन उभा राहिला. कुबेराच्या पुढें हात जोडून व साष्टांग प्रणिपात करून तो जसा उभा रहात असे, तद्वत् श्रीकृष्णाच्या समोर विनयानें स्थित होऊन त्यानें विज्ञप्ति केली. "हे भगवन्, या देवांच्या वित्तरक्षकाला काय आज्ञा आहे? हे महाबाहो यदुनंदना, (तुझ्यासाठीं ) मी काय करूं तें मला सांग."

यावर हृषीकेश त्या गुह्यकश्रेष्ठ शंखाला म्हणाला "या (माझ्या) नगरींत जे लोक दरिद्री असतील त्यांना तूं धनसंपन्न कर. या नगरीमध्यें उपाशी, कृश, मलिन किंवा "(मला कांहींतरी) द्याहो" असें म्हणून भिक्षा मागणारा एकही निर्धन मनुष्य दृष्टीस पडूं नये अशी माझी इच्छा आहे."

वैशंपायन सांगतातः—श्रीकृष्णाची आज्ञा शिरसावंद्य मानून "द्वारकेंतील प्रत्येक घरीं अगणित द्रव्याचा पाऊस पाडा" अशी शंखानें आपल्या सर्व निधींना आज्ञा केली. त्यांनीं लागलींच त्याप्रमाणें केलें; तेव्हां महात्म्या केशवाच्या द्वारवती नगरीमध्यें कोणीही मनुष्य कृश, मलिन, भाग्यहीन किंवा निर्धन म्हणून राहिला नाहीं.

यानंतर तेथूनच, यादवांच्या हितसंवर्धक पुरुषोत्तम प्रभूनें वायूचें स्मरण केलें. तेव्हां (काय सांगावें) भूतमात्रांचें प्राणसर्वस्व असलेला वायु देखील, देवांचें गुह्य जाणणारा कृष्ण एकांतामध्यें बसला होता, त्या ठिकाणीं येऊन त्याच्यासमोर उभा राहिला व ह्मणाला, "देवा, या विश्वसंचारी व शीघ्रगामी सेवकाला तुझी काय आज्ञा आहे? अनघा, देवांप्रमाणें तुझाही मी (सर्वस्वीं) दूत (च) आहें." हें वाक्य ऐकून दुःखहारी व पुरुषश्रेष्ठ कृष्ण, त्या एकांतस्थलीं प्राप्त झालेल्या जगत्प्राणरूप मारुताला ह्मणाला "मारुता, येथून स्वर्गलोकीं जा आणि देव व देवेंद्र यांना माझे प्रणाम सांगून व त्यांच्यापासून सुधर्मा नामक सभा मागून घेऊन येथें परत ये. (हे) माझे सहस्रावधि धर्मनिष्ठ व पराक्रमी यादव त्याच सभेमध्यें बसतील. (यादवांना बसण्याकारितां ती

सभा येथें आणावयाची आहे. ) कृत्रिम सभेमध्यें यादववीर कधींही बसावयाचे नाहींत. इच्छागामी, कामरूपी, रमणीय व अक्षय अशा त्या देवसभेमध्येंच माझे यादव देवांप्रमाणें स्थित होतील."

शुद्धात्म्या कृष्णाची आज्ञा श्रवण करून, वायु लागलींच आपल्या निरुपम वेगानें स्वर्गलोकीं गेला. नंतर सर्व देवांना प्रणामपूर्वक कृष्णाचा संदेश निवेदन करून त्यानें सुधर्मा नामक देवसभा प्राप्त करून घेतली व ती बरोबर घेऊन पुनरपि भूलोकीं तो परत आला. मग सदाचारी व सद्धर्मशील कृष्णाला ती सुधर्मानामक देवसभा समर्पण करून वायुदेव अंतर्धान पावला.

नंतर, केशवानें द्वारकेमध्यें त्या देवसभेची स्थापना केली. स्वर्गलोकीं असतांना देव तिच्यामध्यें बसत असत. आतां त्या सुधर्मा सभेमध्यें प्रमुख यादववीर बसूं लागले.

असो; पति जसा पत्नीला नानाप्रकारच्या अलंकारांनीं भूषित करतो, त्याप्रमाणें याप्रकारें, दिव्य भोग व जलज द्रव्यें इत्यादिकांनीं अव्यय कृष्णानें द्वारकेला मोठी शोभा आणिली. तिच्यांतील चतुर्वर्णांच्या मर्यादा नियत करून त्यानें शिल्प करणारे, मुत्सद्दी, सेनाध्यक्ष व प्रकृतिश्रेष्ठ ( मुख्य मुख्य मंत्री ) यांची योजना केली. उग्रसेनाला राज्यपद दिलें. काशीमध्यें वास्तव्य करणाऱ्या सांदीपनीला पुरोहित नेमलें. अनाधृष्टि व विकद्रू यांची अनुक्रमें सेनापति व मुख्य प्रधान या पदांवर योजना करून, महाबुद्धिमान् कृष्णानें सर्व ( महत्वाच्या ) कामांमध्यें मसलत घेण्याकरितां यदुकुलांतील, दहा वृद्ध व श्रेष्ठ मनुष्यांची एक मंत्रिसभा निर्माण केली. रथखान्यावरील दारुक नामक मुख्य अधिकाऱ्याची केशवानें आपल्या सारथ्यकर्माकडे नेमणूक केली व योद्ध्यांमध्यें अग्रगण्य असलेल्या सात्यकीला सर्व योद्ध्यांवर मुख्य नेमण्यांत आलें.

यात्रमाणें व्यवस्था करून निर्दोष व जगत्स्रष्टा कृष्ण यादवांसहवर्तमान द्वारकेमध्यें आनंदानें राहूं लागला. पुढें कृष्णाच्या संमतीनें रैवतपर्वताच्या रेवतीनामक सुशील कन्येबरोबर प्रतापी बलरामानें विवाह केला.

१ उद्धव, वसुदेव, कंक, विपृथु, श्वफल्क, चित्रक, गद, सत्यक, बलभद्र व पृथु-हे ते दहा मंत्री.

## अध्याय एकुणसाठावा.

—:०:—

### रुक्मिणीहरण.

वैशंपायन सांगतातः—( याप्रमाणें श्रीकृष्ण द्वारकेमध्यें कालक्रमणा करीत असतां, ) भीष्मक राजाच्या रुक्मिणी नामक कन्येचा आणि चेदिदेशच्या शिशुपाल राजाचा, स्वर्णालंकारयुक्त ( सालंकृत ) विवाह होऊन त्याचें कल्याण व्हावें या बुद्धीनें, दंतवक्राचा अमितवीर्यशाली व युद्धांतील शेंकडों डावपेंचांत निपुण असलेला इंद्रतुल्य पुत्र सुवक्त्र, पौंड्राधिपति वासुदेवाचा स्वतंत्र एका अक्षौहिणी सैन्याचा स्वामी असलेला महाबलवान् व पराक्रमी पुत्र सुदेव, एकलव्याचा पराक्रमी व बलिष्ठ पुत्र, पाण्ड्यराजाचा पुत्र, कलिंग देशाचा राजा, कृष्णानें ज्याचा अपमान केला होता तो वेणुदारि राजा, अंशुमान् राजा, क्राथ, श्रुतधर्मा, ज्यानें आपल्या शत्रूंचा नायनाट करून टाकला होता असा कालिंग, गांधारदेशाचा अधिपति आणि कौशांबीचा पराक्रमी राजा, इत्यादि राजांना व राजपुत्रांना प्रतापी जरासंधानें स्वयंवरार्थ उद्युक्त केलें. याशिवाय प्रचंड सैन्याचा अधिपति असलेला राजा भगदत्त, शल, महाबल शाल्व, महासेन भूरिश्रवा व पराक्रमी कुंतिवीर्य इत्यादि राजे रुक्मिणी-

च्या स्वयंवरासाठीं, भोजराजाच्या भवनामध्यें प्राप्त झाले.

जनमेजय विचारतोः—" द्विजश्रेष्ठा, वेद-वेत्त्यांतील श्रेष्ठ व तेजस्वी राजा रुक्मी हा कोणत्या देशामध्यें व कोणाच्या वंशामध्यें उत्पन्न झाला तें मला सांग ( बरें ) ? "

वैशंपायन सांगतातः—राजर्षि यादवाला विदर्भ नामक एक पुत्र होता. त्यानें विंध्यपर्वताच्या दक्षिण बाजूला विदर्भ नामक नगरीची स्थापना करून विदर्भानें तेथेंच वास्तव्य केलें. ऋथ-कौशिक प्रभृति राजे हे त्या विदर्भाचेच पराक्रमी पुत्र होत. त्या महाबल राजांपासून पुढें वेगवेगळे वंश निर्माण झाले. भीमाच्या वंशामध्यें वृष्णी-राजे उत्पन्न झाले. ऋथापासून अंशुमान् राजा जन्मास आला; आणि कैशिकाच्या वंशामध्यें भीष्मक राजाची उत्पत्ति झाली. दुसरे राजे या दाक्षिणात्य (दक्षिणेकडील) भीष्मक राजाला हिरण्यरोम असें म्हणतात. अगस्त्य[1] ऋषीनें संरक्षित असलेल्या दक्षिण दिशेकडील कुंडिनपुरामध्यें राहून भीष्मक राजा आपला राज्यकारभार हांकीत असे. राजन्, या भीष्मकाचींच रुक्मी व रुक्मिणी हीं अपत्यें होत. महाबल रुक्मीनें द्रुम ऋषीपासून दिव्य अस्त्रांची व जमदग्निपुत्र परशुरामापासून ब्रह्मास्त्राची प्राप्ति करून घेतली होती, त्यामुळें (त्या जोरावर) रुक्मी हा नेहमीं अद्भुत कृत्यें करणाऱ्या कृष्णाशीं स्पर्धा करीत असे. हे राजा, भीष्मकाची कन्या रुक्मिणी ही सर्व भूलोकांत अत्यंत रूपवती होती. तिच्या सौंदर्याची (नुसती) ख्याति ऐकूनच महाद्युति वासुदेवाचें मन तिजविषयीं मोहित (आसक्त) झालें. जनार्दनाचें तेज, पराक्रम व सामर्थ्य इत्यादिकांची महती श्रवण करून हाच आपल्याला पति प्राप्त व्हावा, असें रुक्मिणीलाही वाटूं लागलें. परंतु काय सांगावें, महातेजस्वी कृष्णानें रुक्मिणीसाठीं मागणी घातली असतां देखील, त्यानें कंसाचा वध केला असल्याकारणानें हा कंसाचा शत्रु होय अशी कारणपरंपरा मनांत आणून, रागानें व कृष्णाविषयींच्या द्वेषानें रुक्मीनें आपली भगिनी त्याला देण्याचें नाकबूल केलें.

पुढें जरासंध राजानें चेदिदेशाच्या सुनीथ राजाच्या शिशुपाल नामक पुत्रासाठीं अतुल पराक्रमी भीष्मक राजाजवळ रुक्मिणीविषयीं मागणी केली. पूर्वीं वसु नामक चेदिदेशाच्या राजाचा बृहद्रथ नांवाचा एक पराक्रमी पुत्र होऊन गेला. त्यानेंच मगध देशामध्यें या गिरिव्रजाची स्थापना केली असून महाबल जरासंध राजा हा त्याच्याच वंशामध्यें उत्पन्न झाला. चेदिदेशाचा दमघोष राजा देखील वसूचाच वंशज होय. वसुदेवाच्या श्रुतश्रवा नामक भगिनीचे पोटीं दमघोषाला शिशुपाल, दशग्रीव, रैभ्य, उपदिश व बली असे पांच अत्यंत पराक्रमी पुत्र झाले. ते सर्व वीर अस्त्रविद्येमध्यें निपुण असून फार पराक्रमी व बलिष्ठ होते. सुनीथानें (दमघोष) आपला शिशुपाल नामक पुत्र आपल्याच ज्ञातींत व कुलांत उत्पन्न झालेल्या जरासंधाच्या स्वाधीन केला होता. त्यानेंही त्याचें स्वतःच्या पुत्राप्रमाणें संवर्धन केलें. वृष्णींना त्रास देण्याच्या बुद्धीनें यादवांशीं शत्रुत्व करणाऱ्या महाबल जरासंधाचा आश्रय करून शिशुपालानें त्याचे बरेच अपराध केले. कंस हा जरासंधाचा जामात असल्यामुळें कृष्णानें कंसाचा वध केल्याची वार्ता समजतांच जरासंधाचें यादवांशीं मोठें वैर जुंपलें. त्यामुळेंच मुद्दाम जरासंधानें शिशुपालासाठीं भीष्मकराजाजवळ रुक्मिणीची मागणी केली. वीर्यवान् भीष्मकानेंही ( जरा-

[1] आकाशांत दक्षिणदिशेला अगस्तीचा ठळठळीत तारा दिसतो.

संधाच्या शब्दाला मान देऊन ) आपली कन्या शिशुपालाला देण्याचें कबूल केलें. नंतर त्या चेदिदेशच्या राजपुत्राला बरोबर घेऊन, दंतवक्त्रासहवर्तमान जरासंध राजा विदर्भ नगरीला जाण्याकरितां निघाला. त्या अंग, वंग व कलिंग देशांच्या स्वामीनें ( जरासंधानें ) या कामीं पौंड्राधिपति सुबुद्ध वासुदेवाची संमति घेतली होती.

असो. जरासंध राजाला सामोरा येऊन, रुक्मीनें सर्व राजांचा उत्कृष्ट रीतीनें पूजा-सत्कार केला व मग तो सर्वांना आपल्या विदर्भनगरीमध्यें घेऊन गेला. उभयतां रामकृष्ण देखील आपल्या आतेच्या हितासाठीं सर्व पराक्रमी यादवांना बरोबर घेऊन रथांतून विदर्भ नगरीला येऊन पोंचले. तेव्हां क्रथ व कैशिक या देशांचा स्वामी त्यांना सामोरा आला. नंतर त्या पूजार्ह पाहुण्यांचें यथाविधी पूजन केल्यावर, त्यानें त्यांना रहाण्यासाठीं नगराच्या बाहेरच, एका सुंदर मंदिराची व्यवस्था करून दिली.

दुसरे दिवशीं विवाहसमारंभ व्हावयाचा असल्यामुळें, ( कुलाचारास अनुसरून ) चार घोडयांच्या रथामध्यें अधिष्ठित होऊन रुक्मिणी इंद्राच्या मंगलदायक देवालयामध्यें जाण्याकरितां निघाली. तिचा कौतुकमंगल विधि पुरा होऊन, नंतर ती इंद्राणीचें पूजन करण्यासाठीं नगराबाहेर पडली होती. तिच्याबरोबर पुष्कळ सैन्य होतें. याप्रमाणें देवदर्शनाकरितां देवालयासमीप प्राप्त झाली असतां, ती देदीप्यमान् व अत्यंत रूपवती रुक्मिणी ( सहज ) श्रीकृष्णाच्या दृष्टीस पडली. त्या वेळीं ही साक्षात् लक्ष्मीच आपल्या समोर उभी आहे, असें त्याला वाटलें. ती रुक्मिणी म्हणजे जणूं काय, अग्नीची देदीप्यमान् ज्वाला किंवा भूलोकीं अवतीर्ण झालेली माया अथवा भूतल सोडून वर स्त्रीरूपानें आलेली प्रत्यक्ष गंभीर पृथ्वी यांप्रमाणें दिसत होती. फार काय सांगावें. तिला पाहून ही चंद्राची प्रभा सौम्य प्रमदेचें रूप धारण करून पृथ्वीवर आली आहे कीं काय, असा भास होत होता. कमल तेवढें कमी बाकी ती तंतोतंत लक्ष्मीसारखी, किंवा लक्ष्मीच्या भावी मैत्रिणीसारखी दिसत होती. देवांनाही तिचें रूप अगोचर होतें. परंतु कृष्णानें तिला अंतःचक्षूंनीं पाहिलें. ती वर्णानें निर्मळ असून ऐन ज्वानींत (सोळा वर्षी) होती. तिचे नेत्र विशाल, सुंदर व दीर्घ होते. ओष्ठ व डोळ्यांचे कोंपरे रक्तवर्ण होते. तिचे जघन, ऊरु व स्तन हे सर्व अवयव पुष्ट होते. त्या सर्वांग सुंदरीचें मुख चंद्राप्रमाणें शुभ्र असून ती थोराड परंतु सडपातळ होती. तिचीं नखें लांबट व तांबडीं होतीं. तिच्या भुंवया सुंदर

१ हा कृष्णाची स्पर्धा करणारा पौंड्रक वासुदेव नामक राजा होय.

१ या ठिकाणीं ' श्यामावदातां असें मूळ आहे. याचा अर्थ ती श्याम व शुद्ध ' ' अशा वर्णानें युक्त ' असा वांईकर, यांनीं केला आहे. ज्याला प्रसाद व मन्मथनाथ यांनीं अनुक्रमें ' श्याम--सुंदर ' व ' काळसांवळी ' असा केला आहे. परंतु, पुढल्याच श्लोकांत शशिसितानना ' ह्मणजे जिचें मुख चंद्राप्रमाणें ' शुभ्र ' असें स्पष्ट म्हटलें आहे, तेव्हां तोंडापुरती शुभ्र व बाकी काळी होती असें ह्मणावें कीं काय ? आमचे मतें स्त्रियांचें इतर सर्वांग वस्त्राच्छादित असल्यानें सदैव उघड्या राहणाऱ्या मुखापेक्षाही तेंच अधिक उजळ असतें. यास्तव ' श्यामा ' याचा अर्थ ' कृष्णवर्ण ' हा आम्हांस संमत नाहीं. त्याचा अर्थ श्यामा षोडशवर्षि कीं हा किंवा मेघदूतांतील तन्वी श्यामा या श्लोकांतल्याप्रमाणें ऐन ज्वानींत असलेली असा, किंवा कामशास्त्रांत विशिष्ट लक्षणान्वित ह्म० जी ( जिचा स्पर्श ) शीतकालीं उष्ण व उष्णकालीं शीत व सुखावह लागतो व जिचें मुख स्वर्णकांति असतें, अशी स्त्री असा करावा. भागवतांतही तिचा वर्ण श्याम होता असें सांगितलें नाहीं. याखेरीज पुढेंच जें ' अवदांत ' पद आहे त्याचाही अर्थ ' श्याम ह्म० काळसर ' या अर्थाला विरोधी आहे. कारण अमरसिंहानें "अवदांतः सितो गौरो वलक्षो धवलोऽर्जुनः " असें ' अवदांताचे ' पर्याय दिले आहेत.



रुक्मिणी देवालयांतून बाहेर येत असतां एकदम तिला उचलून श्रीकृष्णानें आपल्या रथामध्यें आणून बसविलें. ( विष्णुपर्व अ० ५९ पृष्ठ ३६१ ).

होत्या. केंस नीलवर्ण परंतु किंचित् वक्र झालेले होते. सारांश, त्या सुश्रोणीचें रूप सर्व बाजूंनीं अत्यंत सुंदर होतें. त्या सुस्तनीचे दांत तीक्ष्ण, शुभ्र व देदीप्यमान होते. फार काय सांगूं! शुभ्र रेशमी वस्त्र परिधान केलेल्या त्या अत्यंत रूपवती रुक्मिणी देवीची रूप, गुण व यश इत्यादिकांमध्यें बरोबरी करील, अशी एकही स्त्री या जगतामध्यें सांपडणें अशक्य होतें. अग्नीची ज्वाला घृताहुतीनें ज्याप्रमाणें अधिकच प्रदीप्त होते, त्याप्रमाणें त्या सुंदरीला पाहतांच कृष्णाची तिजविषयींची आसक्ति द्विगुणित होऊन त्याचें तिच्यावर पूर्ण मन बसलें. नंतर महाबल कृष्णानें, बलरामाशीं संकेत करून रुक्मिणीला हरण करून नेण्याचा निश्चय केला व लागलींच त्यांनीं आपला बेत सर्व यादवांना सांगूनही टाकला.

पुढें देवताकृत्य आटोपून रुक्मिणी देवालयांतून बाहेर येत असतां एकदम तिला उचलून कृष्णानें आपल्या सर्वश्रेष्ठ रथामध्यें आणून बसविलें. इकडे बलरामानें एक वृक्ष उपटून त्याच्या योगानें कृष्णाच्या मागोमाग जे शत्रूचे वीर धांवून आले त्यांचा समाचार घेतला. आज्ञेचा अवकाश, तों उंच ध्वजांनीं युक्त असलेल्या विविधाकृति रथांमध्यें बसून किंवा हत्ती, अश्व इत्यादिकांवर आरूढ होऊन सज्ज झालेले सर्व यादववीर साह्यार्थ बलरामाच्या सभोंवतीं गोळा झाले. बलराम, वीर्यशाली सात्यकि, अक्रूर, विपृथु, गद, कृतवर्मा, चक्रदेव, सुदेव, महाबलिष्ठ सारण, पराक्रमी निवृत्तशत्रु, भंगकार, विदूरथ, उग्रसेनाचा पुत्र कंक, शतद्युम्न, राजाधिदेव, मृदुर, प्रसेन, चित्रक, अतिदांत बृहद्दुर्ग, श्वफल्क, सत्यक, पृथु व यांशिवाय सर्व प्रमुख वृष्णी आणि अंधक यांचेवर युद्धाचा सर्वस्वीं भार टाकून पराक्रमी कृष्णानें द्वारकेचा रस्ता सुधारला.

इकडे दंतवक्त्र, जरासंध व वीर्यवान् शिशुपाल हे क्रुद्ध होऊन जनार्दनाला मारून टाकण्याच्या इच्छेनें त्याच्या पाठोपाठ निघाले. त्यांच्या बरोबरच आपले महारथ भ्राते व अंग, वंग, कलिंग आणि पौंड्र इत्यादि देशचे राजे यांच्यासहवर्तमान, चेदिराज कृष्णाचा पाठलाग करण्याकरितां निघाला. देव ज्याप्रमाणें इंद्राच्या आधिपत्याखालीं कोणतेंही कार्य करितात त्याप्रमाणें बलरामाच्या नेतृत्वाखालीं, खवळून गेलेल्या व पराक्रमी यादववीरांनीं त्यांना प्रतिबंध केला.

नंतर त्या ठिकाणीं घनघोर युद्ध सुरू झालें. त्यांत सात्यकीनें चापल्यानें चालून येणाऱ्या पराक्रमी जरासंधाला सहा बाणानें वेध केला. अक्रूरानें दंतवक्त्रावर नऊ बाण सोडले; परंतु त्यावर शीघ्रगामी दहा बाण टाकून त्या कारुषाधिपानें अक्रूराचा प्रतिकार केला. विपृथु राजानें शिशुपालाला सात बाणांनीं विंधिलें, तेव्हां त्या प्रतापी वीरानेंही उलट आठ बाण त्याच्यावर टाकले. गवेषण, अतिदांत व बृहद्दुर्ग या राजांनीं चैद्यराजाचा अनुक्रमें सहा, आठ व पांच बाणांनीं वेध केला. परंतु प्रत्येकीं पांच बाण टाकून चैद्यराजानें त्या सर्वांचा समाचार घेतला. नंतर आणखी चार बाण सोडून त्या शत्रुहंत्या चैद्यानें विपृथूचे चारी अश्व मारले. इतकेंही करून तो थांबला नाहीं, तर आणखी एक एक बाण सोडून त्यानें अनुक्रमें बृहद्दुर्गाचें व गवेषणाच्या सारथ्याचें मस्तक छेदून त्यांना यमसदनास पाठविलें. आपले अश्व मरून पडले आहेत, असें पाहतांच आपल्या रथाचा त्याग करून महाबल विपृथूनें लागलींच पराक्रमी बृहद्दुर्गाच्या रथाचा आश्रय केला आणि विपृथूच्या सारथ्यानें गवेषणाच्या सूतरहित झालेल्या रथावर आरूढ होऊन त्याच्या वेगवान् अश्वांचें नियमन करण्यास आरंभ केला.

याप्रमाणें दोघांची अडचण दूर झाल्यानंतर उभयतां विपृथु व गवेषण यांनीं हातांत चाप व बाण घेऊन रणभूमीवर जणूं काय नर्तन करीत असलेल्या सुनीथावर रागानें शरवर्षाव करण्यास सुरुवात केली. इकडे चक्रदेवानें दंतवक्त्राच्या वक्षःस्थलावर एक बाण टाकून त्याला जर्जर केलें, व षड्रथाला पांच बाणांनीं वेध केला. परंतु त्या दोघांनीं मर्मभेद करणारे दहा दहा तीक्ष्ण बाण सोडून त्याला उलट प्रहार केला. इतकें होत आहे तों, इकडे बलीनें दहा बाणांनीं चक्रदेवाला जर्जर करून दूर अंतरावर असलेल्या विदूरथावर तेथूनच पांच बाण सोडले. विदूरथानेंही उलट सहा तीक्ष्ण बाण टाकून बलीला प्रतिकार केला. तेव्हां, पुनः बलीनें तीस बाणांनीं त्या महाबलाला प्रहार केला. नंतर कृतवर्म्यानें तीन बाणांनीं पौंड्र देशच्या राजपुत्राला वेध करून त्याच्या सारथ्याला ठार केलें व त्याच्या उंच रथाचा विध्वंस केला. तेव्हां रागावून पौंड्राधिपानें सहा बाण टाकून त्याच्यावर प्रतिवेध केला व एका बाणानें कृतवर्म्याच्या धनुष्याचे तुकडे तुकडे केले.

निवृत्तशत्रूनें कलिंगाधिपावर प्रखर बाणांचा वर्षाव केला. त्याबरोबर त्यानें निवृत्तशत्रूच्या खांद्यावर तोमराचा तडाखा लगावला. गजारूढ होऊन पराक्रमी कंक अंगराजाच्या हत्तीवर चालून गेला. त्यानें त्याला तोमरानें प्रहार करतांच, अंगराजानेंही त्याच्यावर शरवृष्टि केली. इकडे चित्रक, श्वफल्क व महारथ सत्यक यांनीं शेंकडों बाणांचा सारखा वर्षाव करून कलिंगराजाच्या सैन्याची धूळधाण उडविली.

इतक्यांत, खवळून गेलेल्या पराक्रमी बलरामानें हातांतील वृक्षाच्या फटकाऱ्यानें वंगराज व त्याचा हत्ती या उभयतांना स्वर्गलोकची वाट धरावयास लावून पुनः रथाचा आश्रय केला. रथारूढ झाल्यावर उग्र शरांची वृष्टि करून संकर्षणानें कैशिकाच्या असंख्य अनुयायांना ठार मारलें. नंतर त्या वीर्यवानानें सहा बाणांनीं महा धनुर्धर कारूषांना मारून शिवाय मागधसैन्यांतील शंभर वीरांना रागानें कंठस्नान घातलें. मग तो महाबाहु जरासंधाकडे वळला. त्याबरोबर मागधानें त्याच्यावर तीन बाण टाकले. परंतु मुसलायुधानें क्रोधाविष्ट होऊन लागलींच त्याच्यावर आठ बाणांचा वर्षाव करून आणखी एका बाणानें त्याच्या सुवर्णालंकृत रथाचा विध्वंस केला. ते परस्परांवर शरवृष्टि करून आयुधादिकांचे प्रहार करीत होते, त्या वेळचें उभयतांमधील युद्ध खरोखर सुरासुरांच्या युद्धाप्रमाणें घनघोर भासत होतें. प्रमत्त झालेले सहस्रावधि गज, प्रतिपक्षीय गजांवर तुटून पडूं लागले. रथारूढ वीर रथारूढांशीं व अश्वारूढ अश्वारूढांशीं लढूं लागले. शक्ति, ढाल, तरवार इत्यादि आयुधें धारण करणारे पदाति, समानशस्त्रांनीं युक्त असलेल्या आपल्या प्रतिस्पर्ध्यांशीं झगडूं लागले. प्रत्येक दळांतील वीर सजातीय योद्ध्यांचीं मस्तकें उडवीत वेगवेगळे लढून रणांगणावर जणूं काय थयथयाट करीत होते. तरवारी कवचावर आदळत तेव्हां मोठा आवाज होई. शरांची वृष्टि सुरू झाली म्हणजे चोहोंकडून पक्ष्यांच्या आरडण्यासारखे आवाज निघत. फार काय सांगावें, महान् महान् वीर शस्त्रें सरसावून टणत्कार करूं लागले म्हणजे होणाऱ्या ध्वनीमध्यें भेरी, शंख, मृदंग व वेणु इत्यादि रणवाद्यांचे आवाज पार लोपून जात.

## अध्याय साठावा.

—:o:—

### श्रीकृष्णाचा संसार.

वैशंपायन सांगतातः—कृष्णानें रुक्मिणीला पळवून नेली, असें ऐकतांच अत्यंत क्रुद्ध होऊन

रुक्मीनें भीष्मकाच्या समोर (घनघोर) प्रतिज्ञा केली.

रुक्मी म्हणतोः--युद्धामध्यें गोविंदाला मारून रुक्मिणीला परत आणल्याशिवाय मी या कुंडिनपुरांत प्रवेश करणार नाहीं. खरोखर हें मी सत्य बोलत आहें.

इतकें बोलून रागानें लाल झालेला तो पराक्रमी रुक्मी, सायुध व उंच अशा आपल्या रथामध्यें बसून मोठ्या सैन्यानिशीं वेगानें (कृष्णाचा पाठलाग करीत) निघाला. तेव्हां दक्षिण देशचे राजे, क्राथ, अंशुमान्, श्रुतर्वा, वीर्यवान्, वेणुदारि, भीष्मकाचे दुसरे रथिश्रेष्ठ पुत्र आणि क्रथकैशिक प्रभृति सर्व रथी, महारथी रुक्मीच्या मागून त्याच हेतूनें निघाले.

नर्मदानदीच्या तीरातीरानें बराच मार्ग आक्रमण केल्यानंतर श्रीकृष्ण आपल्या प्रियेसहवर्तमान (स्वस्थ) बसला आहे असें त्यांच्या शेवटीं दृष्टीस पडलें. त्याला पाहून त्यांना फार राग आला. लागलीच आपल्या सैन्याला थांबवून मदोन्मत्त व पराक्रमी रुक्मी द्वैरथ युद्ध करण्याच्या इच्छेनें एकटाच मधुसूदनावर चाल करून गेला. प्रथम त्यानें चौसष्ट तीक्ष्ण बाण टाकून कृष्णाला वेध केला; परंतु जनार्दनानें उलट सत्तर बाणांनीं रुक्मीला प्रतिकार केला. तो आपली शिकस्त करीत असतांही वीर्यवान् व महाबल कृष्णानें रुक्मीच्या ध्वजाचा विध्वंस करून त्याच्या सारथ्याचें मस्तक धडापासून वेगळें केलें. रुक्मी याप्रमाणें संकटांत पडला आहे असें पाहून सगळ्या दाक्षिणात्य राजांनीं जनार्दनाचा वध करण्याच्या हेतूनें त्याच्या सभोंवार गराडा घातला. इतकेंच करून ते थांबले नाहींत, तर, महाबाहु अंशुमान्, श्रुतर्वा व क्रोधाविष्ट झालेला वेणुदारि यांनीं अनुक्रमें दहा, पांच व सात बाण फेंकून कृष्णाला वेध केला; पण अतुलपराक्रमी कृष्णानें अंशुमानाच्या वक्षःस्थळावर शरप्रहार करतांक्षणींच तो राजा व्यथित होऊन रथाच्या मागच्या बाजूला झाला. आणखी चार बाणांनीं त्यानें श्रुतर्वा राजाचे चारी घोडे मारून टाकले; नंतर वेणुदारीच्या ध्वजाचा विध्वंस करून त्यानें त्याच्या उजव्या हातावर शरवेध केला. इतकेंच नव्हे, याशिवाय पांच बाण सोडून त्यानें खुद्द श्रुतर्व्याला विंधिलें. तेव्हां शरप्रहारानें श्रमी व व्यथित होऊन श्रुतर्वाराजा, रथध्वजाचा आश्रय करून (मटकन्) खालीं बसला.

याप्रमाणें तिघांची वाट लागली, तेव्हां क्रथकैशिक प्रभृति सर्व प्रमुख योद्धे शरवर्षाव करीत कृष्णावर चालून आले; परंतु उलट शरप्रहार करून युद्धभूमीवर त्या सर्वांचे बाण जनार्दनानें (लीलेनें) तोडून टाकले. खवळून गेलेल्या कृष्णानें बाणांचा सारखा वर्षाव करून पलायन करीत सुटलेल्या सर्वांचा फडशा पाडला. नंतर आणखी तीक्ष्ण असे चौसष्ट बाण सोडून क्रोधानें त्याच्या अंगावर चालून आलेल्या शत्रुपक्षाच्या वीरांना त्या महाबलानें पळावयास लावलें.

आपलें सैन्य पळत सुटलें आहे असें पहातांच अत्यंत संतप्त होऊन रुक्मीनें केशवाच्या वक्षःस्थळावर पांच तीक्ष्ण बाण सोडले. आणखी तसलेच तीन बाण टाकून त्याच्या सारथ्याला वेध केल्यानंतर एका नमत्या पेरांच्या बाणानें त्यानें कृष्णाच्या ध्वजाचाही विध्वंस केला. हें रुक्मीचें युद्धचापल्य पाहून कृष्णाला क्रोध आला व त्या भरांत त्यानें देखील उलट शरवृष्टि करून त्याला वेध केला आणि त्याचें धनुष्य मोडून टाकलें.

नंतर दुसरें धनुष्य घेऊन वीर्यवान् रुक्मीनें कृष्णाला मारण्याच्या हेतूनें दुसरीं दिव्य अस्त्रें बाहेर काढलीं; परंतु त्यांवर प्रतिअस्त्रांची

योजना करून महाबल कृष्णानें रुक्मीच्या अस्त्रांचें निवारण केलें. मग पुनः आणखी तीन बाणांनीं रुक्मीचें दुसरें धनुष्य व त्याच्या रथाचे अश्व यांचा कृष्णानें विध्वंस केला.

याप्रमाणें धनुष्य मोडून रुक्मी विरथही झाला, तेव्हां त्या वीरानें हातामध्यें ढाल व तरवार घेऊन पराक्रमी गरुडाप्रमाणें रथांतून उडी मारली. हातामध्यें खड्ग घेऊन रुक्मी आपल्यावर चाल करून येत आहे असें अवलोकन करतांच क्रुद्ध झालेल्या केशवानें त्याच्या खड्गाचे तुकडे करून तीन बाणांनीं वक्षःस्थलावर प्रहार केला. त्याबरोबर इंद्राच्या वज्राचा तडाका मिळालेल्या असुरश्रेष्ठाप्रमाणें तो महाबाहु रुक्मी मूर्च्छित व संज्ञारहित होऊन धाडकन् जमिनीवर आदळला. नंतर पुनरपि इतर राजांकडे वळून माधवानें पूर्ववत् बाणांचा वर्षाव करण्यास प्रारंभ केला. आपला स्वामी रुक्मी मृत होऊन पडल्याचें अवलोकन करून त्याच्या बरोबर आलेल्या नराधिपांनींही ( प्रतिबंध करण्याचें सोडून देऊन ) पाठ फिरवून पलायन केलें.

आपला भ्राता विव्हळत भूमीवर पडला आहे असें पाहून त्याच्या जिवाच्या काळजीनें रुक्मिणीनें कृष्णाचे पाय धरले. तेव्हां तिला उठवून व आलिंगन देऊन कृष्णानें तिचें समाधान केलें, आणि रुक्मीला अभय देऊन त्यानें द्वारकेची वाट धरली. इकडे यादवांनीं देखील बलरामाच्या नेतृत्वाखालीं जरासंधाची व तत्पक्षीय राजांची खोडकी जिरवून मोठ्या आनंदानें द्वारकेमध्यें प्रवेश केला. कमलनेत्र कृष्ण रणभूमी सोडून निघून गेल्यानंतर, श्रुतर्व्यानें जवळ येऊन रुक्मीला रथामध्यें घातलें व आपल्या नगरीचा मार्ग धरला. भगिनीला घेतल्यावांचून कुंडिनपुरांत प्रवेश करावयाचा नाहीं, अशी मानी व मदोन्मत्त रुक्मीची प्रतिज्ञा होती, ती फलद्रूप न झाल्यामुळें कुंडिनपुराला परत जाण्याची त्याची इच्छा नव्हती, म्हणून विदर्भदेशामध्यें दुसऱ्या एका विस्तृत नगरीची त्यानें स्वतःला रहाण्यासाठीं स्थापना केली. ती नगरी भोजकट या नांवानें जगामध्यें प्रसिद्ध झाली आहे. त्या ठिकाणीं राहून मोठ्या पराक्रमानें महातेजस्वी रुक्मीनें दक्षिण दिशेचें राज्य केलें. इकडे महाभुज भीष्मकराजानें मात्र ( पूर्ववत् ) कुंडिनपुरामध्येंच वास्तव्य केलें.

यदुसैन्यासहवर्तमान बलराम द्वारकेला परत आल्यावर, कृष्ण प्रभूनें रुक्मिणीचें यथाविधि पाणिग्रहण केलें. पुरातन कालीं इंद्रानें शचीसह किंवा रामचंद्रानें सीतेबरोबर ज्याप्रमाणें सुखोपभोग घेतला, त्याप्रमाणें कृष्णानें आपल्या प्रियकर पत्नीसहवर्तमान यथेच्छ सुखानुभव घेतला. रुक्मिणी ही कृष्णाची सर्वांत ज्येष्ठ पत्नी झाली. तिचे ठायीं पतिव्रतेचे सर्व धर्म असून रूप, शील इत्यादि सर्व गुणांनींही ती संपन्न होती. तिचे ठिकाणीं कृष्णाला चारुदेष्ण सुदेष्ण, महाबल प्रद्युम्न, सुषेण, चारुगुप्त, वीर्यवान् चारुबाहु, चारुविंद, सुचारु, भद्रचारु आणि बलिश्रेष्ठ चारु, असे दहा महारथ पुत्र व चारुमती नामक एक कन्या अशीं एकंदर अकरा अपत्यें झालीं. कालक्रमानुसार कृष्णाचे सर्व पुत्रांनीं धर्मार्थादिकांत व अस्त्रविद्येंत नैपुण्य संपादन केल्याकारणानें युद्धामध्यें ते दुर्जय झाले. यानंतर महाबाहु मधुसूदनानें कालिंदी, मित्रविंदा, नाग्नजिती सत्या, जांबवताची सुता जांबवती, कामरूपी रोहिणी, मद्रराजाची शुभनेत्री व सुशील कन्या लक्ष्मणा, व सत्राजिताची चारुहासिनी कन्या सत्यभामा या सात सुंदर, गुणसंपन्न व कुलीन स्त्रियांबरोबर लग्न केलें. याशिवाय शैब्य राजाच्या अप्सरेसारख्या रूपवती कन्येबरोबरही त्याचा विवाह

झाला. आणखी हे राजन्, त्या निरुपम वीरानें दुसऱ्या सोळा सहस्र नारी विवाहविधीनें वरल्या; परंतु (विशेष हें कीं) हृषीकेशानें आपल्या सर्व स्त्रियांसह सारखा उपभोग घेतला. अत्यंत मूल्यवान् वस्त्राभरणांनीं त्यांना अलंकृत करून कृष्णानें प्रत्येकीच्या मनाप्रमाणें वर्तन केलें. त्यांच्या ठिकाणीं त्याला सहस्रावधि पराक्रमी पुत्र झाले. ते सर्व फार बलवान्, महारथी, यज्ञकर्ते, पुण्यशील, महाभाग, महापराक्रमी व सर्व प्रकारच्या शास्त्रार्थामध्यें कुशल होते.

## अध्याय एकसष्टावा.

—:o:—

### रुक्मीचा वध.

वैशंपायन सांगतात:—हे अरिंदमा, याप्रमाणें बहुत काल लोटल्यानंतर, पराक्रमी रुक्मीनें आपल्या कन्येचा स्वयंवर मांडला. रुक्मीच्या आमंत्रणावरून त्याच्या नगरीमध्यें दिगंतराहून अनेक वीर्यशाली व श्रीमान् राजे आणि राजपुत्र गोळा झाले होते. त्यांतच श्रीकृष्णाचा पुत्र प्रद्युम्न हा आपल्या इतर भावंडांस बरोबर घेऊन तेथें आला होता. रुक्मीच्या कन्येचें प्रद्युम्नावर व प्रद्युम्नाचें तिच्यावर फार प्रेम जडलें होतें. रुक्मीच्या सुलोचन कन्येचें नांव शुभांगी असें होतें. ती विदर्भ राजपुत्री सौंदर्यानें व तेजानें अप्रतिम असल्याकारणानें सर्व जगभर तिच्या सौंदर्याची फार प्रसिद्धि झाली होती. स्वयंवर सभेमध्यें सर्व महान् महान् राजे आपापल्या स्थानीं बसल्यानंतर, या विदर्भराजकन्येनें शत्रुंजय प्रद्युम्नाला माळ घातली. तो कृष्णाचा पुत्र प्रद्युम्न सर्व प्रकारच्या अस्त्रांमध्यें तरबेज असून सिंहाप्रमाणें बलवान् आणि रूपानें अप्रतिम सुंदर होता. विदर्भकन्या प्रद्युम्नाला रूप, गुण व वय इत्यादिकांत अगदीं साजेशी असून नारायणी[1] इंद्रसेनेप्रमाणें तिचें त्याच्यावर प्रेम जडलें होतें.

स्वयंवर पुरा होऊन, सर्व राजे आपआपल्या राजधानीकडे परत गेल्यानंतर, प्रद्युम्नही विदर्भराजकन्येला घेऊन द्वारकेला परत आला. नलराजानें दमयंतीसह सुखविलास केले त्याप्रमाणें त्या वीरानें तिच्याशीं क्रीडा केली. कालांतरानें तिच्या पोटीं त्याचेपासून देवगर्भाप्रमाणें अनिरुद्ध नामक महाविख्यात पुत्र जन्मास आला. तोही वेद, धनुर्विद्या, नीतिशास्त्र यामध्यें पारंगत झाला. तो, पराक्रमामध्येंही साऱ्या जगांत अप्रतिम होता. हे राजा, कालक्रमानुसार तो जेव्हां वयांत आला, तेव्हां त्यानें रुक्मीची रुक्मावती नामक सुंदर व स्वर्णकांती नात आपल्याला विवाहविधीनें मिळावी म्हणून रुक्मीजवळ मागणी घातली. रुक्मी हा जरी नेहमीं कृष्णाचा द्वेष करीत असे तरी, रुक्मिणीच्या आग्रहामुळें, प्रद्युम्नावरील प्रेमामुळें व अनिरुद्धाच्या रूपादि गुणसंपन्नत्वामुळें त्यानें त्या वेळीं कृष्णविषयक मत्सर टाकून देऊन रुक्मावती अनिरुद्धाला देण्याचा निश्चय केला. जनमेजया, 'मी आपली नात अनिरुद्धाला देतों,' असें रुक्मीनें प्रेमानें सांगतांक्षणींच, रुक्मिणी, बलराम, आपले सर्व पुत्र, इतर यादव व सगळें सैन्य यांसहवर्तमान कृष्ण विदर्भ नगरीला प्राप्त झाला. रुक्मीच्या आमंत्रणावरून त्याच्या ज्ञातीचे लोक, मित्र व इतर राजे हे सर्व त्या ठिकाणीं आले. हे राजश्रेष्ठा, नंतर शुभ तिथि व नक्षत्र पाहून सुमु-

---

[1] मुंबईप्रत व वांईकरांचा पाठ 'नारायणीचंद्रसेना' असा आहे, पण तो अनर्थ आहे. आमचा पाठ 'नारायणी इंद्रसेना' असा आहे त्याचा अर्थही समंजस होतो, कारण इंद्रसेना ही मुद्गल ऋषीची स्त्री होती व तिलाच कधीं कधीं 'नारायणी' ही म्हणत.

र्हूतावर अनिरुद्धाचा परममंगल विवाह झाला. अनिरुद्धानें विदर्भराजाच्या नातीचें पाणिग्रहण करण्याबरोबर विदर्भदेशचे लोक व यादव यांना अत्यानंद झाला. यादवांचा तेथें सारखा सत्कार चालू होता. तेही देवांसारखे त्या ठिकाणीं सुखोपभोगांत दंग झाले.

पुढें एके दिवशीं, अश्मकाधिप, उदारधी वेणुदारि, अक्ष श्रुतर्वा, चाणूर, क्राथ, अंशुमान्, कलिंगाधिप, महाबल जयत्सेन, पांड्यराज आणि श्रीमान् ऋषीकाधिपति इत्यादि वैभवसंपन्न दाक्षिणात्य राजांनीं आपसांत संकेत करून, त्यांनीं आपला बेत एकांतीं जाऊन प्रभु रुक्मीला निवेदन केला. ते म्हणाले " स्वामिन्, तूं अक्षविद्येंत निपुण आहेस. आम्हांलाही द्यूत खेळण्याची इच्छा आहे. बलराम हा द्यूतांत जरी कुशल नाहीं, तरी त्याला द्यूत खेळण्याची फार आवड आहे. म्हणून म्हणतों कीं, तुला पुढें करून बलरामाला द्यूतांत जिंकण्याची आमची इच्छा आहे. "

महारथ रुक्मीला हा त्यांचा बेत पूर्णपणें आवडला. नंतर ते सर्वजण मोठ्या आनंदानें सुंदर व सुवर्णस्तंभयुक्त द्यूतगृहामध्यें शिरले. त्या सभेचें अंगण पुष्पांनीं भूषित केलें असून जिकडे तिकडे चंदनयुक्त पाणी शिंपडलें होतें. सभास्थानीं प्रवेश केल्यावर शुभ्र पुष्पमाळा घालून चंदनचर्चेनें युक्त झालेले विजयेच्छु राजे आपआपल्या सुवर्णासनांवर अधिष्ठित झाले.

नंतर त्या द्यूतकुशल व अक्षकोविद राजांनीं बलरामाला ( द्यूत खेळण्याकरितां ) बोलावणें पाठविलें. तेव्हां, धैर्यशील बलराम " बरें आहे; आपण परस्परांसह द्यूत खेळूं या " असें म्हणाला. कपटानें रामाला जिंकण्याची इच्छा करणाऱ्या दाक्षिणात्य राजांनीं सहस्रावधि, रत्नें, मोत्यें व पुष्कळ सुवर्ण त्या ठिकाणीं आणून ठेवलें.

मग त्या ठिकाणीं कलहाला कारणीभूत होणारें, दुर्बुद्ध लोकांच्या नाशाला प्रवर्तक होणारें, आणि आनंदाचा उच्छेद करणारें महा भयंकर द्यूत सुरू झालें. रुक्मीबरोबर खेळतांना, बलरामानें प्रथमच सहस्र निष्क व दश सुवर्ण मुद्रा एवढ्याचा पण लावला. परंतु पराक्रमी रामानें शिकस्त केली असतांही रुक्मीनें पण जिंकला. पुनः तेवढ्याच रकमेचा पण लागला; परंतु त्यांतही बलरामच हरला. याप्रमाणें अनेकवेळां बलरामाला जिंकल्यानंतर मध्येंच रुक्मीनें त्या महात्म्याशीं कोटी सुवर्णमुद्रांचा पण लावला. त्याबरोबर त्या कुटिलमतीनें फांसे टाकून 'हं, जिंकलें' असे शब्द उच्चारले. तो आत्मश्लाघा करीत होता, व बलरामाला हंसत होता. युद्धामध्यें अजिंक्य परंतु अक्षविद्येंत मूर्ख व दुर्बल असलेल्या या बलदेवाला मी द्यूतांत पराभूत केलें, अशी तो प्रौढि मारूं लागला.

रुक्मीचें हें भाषण ऐकून कलिंगराज मोठ्या आनंदानें दांत काढून हंसूं लागला. तेव्हां मात्र हलयुधाला अत्यंत क्रोध आला. भीष्मक पुत्र रुक्मीचे पराजयविषयक मर्मभेदी शब्द ऐकून बलरामाच्यानें स्वस्थ बसवेना. त्या धर्मवेत्त्यानें जरी क्रोध जिंकलेला होता, तरी वरील धिःकार शब्द असह्य होऊन महाबल रौहिणेय रागानें संतप्त झाला. तथापि (पुनः) मोठ्या धैर्यानें मनाचा निग्रह करून राम म्हणाला, " निखर्व सुवर्णमुद्रांचा मी आणखी एक पण लावतों, तो तूं जिंक व हे राजा, या धुलिधूसर द्यूतस्थानीं फिरून एकवार ते कृष्णवर्ण व रक्तवर्ण ठिपक्यांचे फांसे मजकडे फेंक. " याप्रमाणें बलरामाचें आव्हान ऐकून विशेष भाषण न करितां, रुक्मी फक्त " ठीक आहे " एवढेंच बोलला. नंतर विदर्भराज रुक्मीनें आनंदानें फांसे टाकले; परंतु या

वेळीं रामाला चार काण्यांचा फांसा पडला. त्यामुळें द्यूताचे नियमांप्रमाणें खरोखर रुक्मी हरला. पण आपण पराभूत झाल्याची गोष्ट त्यानें कबूल केली नाहीं. इतकें झालें तरी मन स्थिर ठेवून रामानें कांहींएक भाषण केलें नाहीं. तरीही पुनरपि 'मी पण जिंकला' असेंच गालांतल्या गालांत हंसून रुक्मी म्हणूं लागला. हें त्याचें कपटी भाषण ऐकून बलदेवाला फार राग आला, परंतु त्यानें तोंडावाटे ब्र देखील काढला नाहीं. इतक्यांत "रामा, खरोखर तुझाच जय झाला असून, रुक्मी हरला आहे, कांहीं एक न बोलतांही कर्मानें जयप्राप्ति होते. तुझ्या प्रतिपक्ष्यांचीं मनें आपण हरलों अशीच त्यांना साक्ष देत आहेत. तूंच पण जिंकला आहेस, यांत संशय नाहीं." अशी एकाएकीं गंभीर आकाशवाणी झाली; त्या योगानें मात्र महात्म्या बलरामाचा क्रोध दुणावला. अंतरिक्षांतून उमटलेली ही सत्य व मधुर वाणी श्रवण करतांच, बलवान् संकर्षण हातामध्यें सोन्याचा पट घेऊन उठून उभा राहिला, आणि तत्काळ वरील बोलाचालीनें क्रुद्ध झालेल्या त्या रामानें आपला अधिक्षेप करणाऱ्या रुक्मी नामक रुक्मिणीच्या ज्येष्ठ भ्रात्याला ठार मारून भूमीवर हापटलें. फार काय सांगावें त्या यदुनंदनानें रुक्मीला घुसळून घुसळून हातांतील सुवर्णपटानें त्याचा प्राण घेतला.

नंतर कलिंगाधिपतीकडे वळून क्रोधानें त्यानें त्याचे दांत पाडले व रागाच्या आवेशांत सिंहाप्रमाणें गर्जना करण्यास आरंभ केला. मग खड्ग सरसावून त्यानें सर्व राजे त्रासवून सोडले. इतकेंच नव्हे, तर पुनः एखाद्या गजेंद्राप्रमाणें सभागृहाचा एक सोन्याचा खांब उपटून घेऊन बलिश्रेष्ठ संकर्षण सभागृहाच्या दरवाजांतून बाहेर पडला. आपल्या भीषण स्वरूपानें, कैशिकादिक वीरांना त्यानें "त्राहि भगवान्" करून सोडलें. कपटी रुक्मीला ठार मारून व सिंह जसा क्षुद्र मृगांना त्रासवून सोडतो, तद्वत्, सर्व राजांना व्याकूळ करून यदुश्रेष्ठ बलराम सर्व लोकांसहवर्तमान आपल्या शिबिराप्रत गेला. तेथें गेल्यानंतर घडलेली इत्थंभूत हकीकत त्यानें श्रीकृष्णाला निवेदन केली. त्यावर महाद्युति कृष्ण कांहींएक बोलला नाहीं. त्यानें आपलें मन आंवरून धरलें, परंतु त्याच्या डोळ्यांवाटे दुःखाश्रु गळूं लागले. रुक्मिणीवरील प्रेमामुळें तिचा ज्येष्ठ भ्राता जो शत्रुंतप रुक्मी, त्याला कृष्णानें मागल्या वेळीं ठार मारलें नाहीं; पण, द्यूतगृहामध्यें या प्रसंगीं बलरामाच्या हातांतील सुवर्णपटाच्या तडाक्यानें इंद्रतुल्य व बलवान् रुक्मीराजाला मृत्यु आला. द्रुम व भार्गव यांच्यापासून विद्या शिकलेला, त्यांच्याच तोडीचा, पुण्यशील, शूर, यज्ञकर्ता आणि अत्यंत पराक्रमी, अशा भीष्मकपुत्राला याप्रकारें मरण आल्याचें वर्तमान श्रवण करून सर्व वृष्णी व अंधक यांना फार दुःख झालें.

वैशंपायन सांगतातः—महासाध्वी रुक्मिणी तर हें वृत्त ऐकतांच धाय मोकलून आक्रोश करूं लागली. तिचा विलाप पाहून कृष्णानें तिचें सांत्वन केलें. हे भरतश्रेष्ठा, रुक्मीबरोबर यादवांचें वैर कसें सुरू झालें व शेवटीं त्यांत रुक्मीचा कसा अंत झाला, हें सर्व मी तुला साद्यंत निवेदन केलें. राजश्रेष्ठा, यानंतर लवकरच सगळीकडून अपार संपत्ति संपादन करून, बलराम, श्रीकृष्ण व त्यांच्या आश्रयछत्राखालीं वास्तव्य करणारे यादव द्वारकेला परत आले.

[1] जय कृतीवर अवलंबून आहे, पुष्कळशा वाचाळपणावर नाहीं.

## अध्याय बासष्टावा.

—:०:—

### बलदेवाचें माहात्म्य

जनमेजय प्रश्न करतोः—हे विप्रर्षे, धरणीधर शेषाचा ( अवतार ) जो सबुद्ध बलराम, त्याचा महिमा श्रवण करण्याची मला फार उत्कट इच्छा उत्पन्न झाली आहे. पुराणवेत्ते लोकांनीं बलराम हा अत्यंत तेजस्वी व दुर्जय महात्मा होता, असें वर्णन केलें आहे. ब्रह्मन्, ज्याला आदिदेव, जनेश्वर, नाग व अनंत, इत्यादि नांवानीं ओळखतात, त्या बलरामाचे पराक्रम यथार्थ रीतीनें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

वैशंपायन सांगतातः—पुराणांतरीं नागराज धरणीधर, शेष, तेजोनिधि, श्रीमान्, अकंप्य, पुरुषोत्तम, योगाचार्य[1], महावीर्य, देवतंत्रमुख व बली इत्यादि अनेक शब्दांनीं याचा उल्लेख केलेला आहे. गदायुद्धामध्यें जरासंधाला यानें अनेकदां जिंकलें, पण मारलें नाहीं. पृथ्वीतलावरील जे अनेक विख्यात राजे जरासंधाच्या पाठीशीं होते, त्या सर्वांचा त्यानें रणामध्यें चांगला समाचार घेतला. दशसहस्र नागबली ( दहा हजार हत्तींच्या इतकें सामर्थ्य अंगीं असलेला ) व महापराक्रमी भीमाला देखील त्यानें अनेकवार बाहुयुद्धामध्यें पराजित केलें. जांबवतीचा पुत्र सांब हा दुर्योधनाची कन्या बलात्कारानें हरण करून नेत असतां सर्व राजांनीं त्याला चोहोंकडून वेढलें. ते त्याला पुढें मागें जाऊं देईनात. हें वृत्त समजतांच, रागावून जाऊन महाबल राम त्याला सोडविण्याकरितां निघाला. परंतु ( कांहीं केलें तरी ) सांब कोठें आहे हें त्याला कळेना. त्यामुळें त्याचा क्रोध अनावर होऊन त्यानें फारच मोठें अद्भुत कृत्य केलें. आपलें अप्रतिम शक्तीचें, अनिवार्य, दिव्य व अभेद्य लांगलास्त्र हातीं घेऊन व ब्रह्ममंत्रानें तें प्रोक्षण करून महाद्युति बलरामानें तें कौरवांच्या नगरीच्या प्रकारावर ठेवलें. आणि त्याच्या योगानें तो ती सबंध नगरीच्या नगरी गंगानदीमध्यें फेंकून देण्याचा विचार करूं लागला. लांगलास्त्र प्राकार भित्तीवर ठेवतांच ती कौरवनगरी हलूं लागली. हा ( विपरीत ) प्रकार पाहून दुर्योधनानें सांब व त्याची भार्या या उभयतांस ( मुकाट्यानें ) सुबुद्ध बलरामाच्या स्वाधीन केलें. शिवाय दुर्योधनानें आपला देह शिष्यभावानें महात्म्या बलरामाला अर्पण केला. त्यानेंही कौरवराजाला आपला शिष्य करून गदायुद्धाची कला शिकविली. राजेंद्रा, त्या वेळेपासून या चलित झालेल्या हस्तिनापुराचें, गंगेकडे तोंड किंचित् फिरल्यासारखें दिसतें. राजा, रामाचें हें अलौकिक कृत्य भूतलावर विश्रुत आहे. भांडीर अरण्यांत या हलायुध शौरीनें एका मुष्टिप्रहारासरशीं प्रलंबासुराला ठार मारल्याचें असेंच विलक्षण वृत्त मीं तुला पूर्वीं सांगितलेंच आहे. तसेंच गर्दभरूपानें संचार करणाऱ्या महावीर्यशाली धेनुकाला यानें पर्वताच्या शिखरावरून खालीं फेंकून दिलें व त्यासरशीं तो भूमिवर गतप्राण होऊन पडला, हीही हकीकत तुला माहीत आहे. याप्रमाणेंच, एके समयीं या हलायुधानें समुद्राकडे वहात चाललेल्या आणि शीघ्रगतीनें उमटणाऱ्या जलतरंगांच्या मालेनें युक्त असलेल्या यमभगिनी व महानदी यमुनेचा ओघ फिरवून तिला मथुरेकडे वहावयास भाग पाडलें.

---

1 योगशास्त्राचें प्रणेतृत्व नागराजाकडे आहे. पातंजल सूत्रांवरील भाष्याचे आरंभीं भगवान् भाष्यकार व्यासमुनी यांनीं पुढीलप्रमाणें मंगलाचरण केलें आहे:—
“ यस्त्यक्त्वारूपमाद्यं प्रभवतिजगतोऽनेकधाऽनुग्रहाय । प्रक्षीणक्लेशराशिर्विषमविषधरोऽनेकवक्त्रः सुभोगी । सर्व ज्ञानप्रसूतिर्भुजगपरिकरः प्रीतये यस्य नित्यं । देवोऽहीशः सवोऽव्यात्सितविमलतनु र्योगदोयोगयुक्तः ॥ १ ॥

मूर्तिमंत धरणीधर शेषच असलेल्या अनंत व अप्रमेय बलरामाच्या महत्कृत्यांची कथा मीं तुला निवेदन केली. राजन्, याहून आणखी पुष्कळ या पुरुषोत्तम हलायुधाच्या पराक्रमांची कहाणी आहे. ती तुला मीं आतां कथन केली नाहीं. ती तूं दुसऱ्या महापुराणांतून समजून घे.

## अध्याय त्रेसष्टावा.

—:०:—

### नरकवध.

जनमेजय विचारितोः—मुनिवर्या, रुक्मी मृत झाल्यावर, द्वारकेला येऊन वीर्यवान् व महाबाहु कृष्णानें आणखी कोणते चमत्कार केले ते मला ( कृपेनें ) सांगा.

वैशंपायन सांगतातः—वीर्यवान्, श्रीमान् व भगवान् यदुनंदन कृष्ण यादवसमूहांत बसला असतां, द्वारकेकडे एकदां त्याचें लक्ष गेलें. तेव्हां त्या पुंडरीकाक्षानें जीं जीं मौल्यवान् विविध रत्नें व द्रव्यें ठिकठिकाणीं संपादन केलीं होतीं तीं सर्व राक्षसांकडून त्यांच्या योग्यतेप्रमाणें आपल्या भांडारांत आणवून ठेवण्याचा क्रम सुरू केला. पण त्या कामांत वरप्रसादानें उन्मत्त झालेले असुरमुख्य, दैत्य आणि दानव त्याला विघ्न करीत; मग अशा सर्वांना तो महाबाहु मारून टाकी. परंतु त्यांत एक नरक नामक मोठा पराक्रमी दानव होता, त्याचें इंद्राशीं अत्यंत वैर असून त्यानें सर्व देवांस सळोकापळो करून सोडलें होतें. त्यानें एके समयीं कृष्णाला प्रतिबंध केला. देवांना त्रासवून सोडणारा तो राजा मूर्तिलिंग[1] नामक नगरीमध्यें ( मोठ्या प्रौढीनें ) राज्य करीत होता. देव व ऋषी यांच्या उलट त्याचें नेहमीं वर्तन असे. (त्यांना तो नित्य पीडा देत असे.)

[1]हिलाच ' प्राग्ज्योतिषपुर ' म्हणत.

एके समयीं नरकासुर, कशेरु[1] नामक स्थळीं त्वष्ट्याच्या कन्येपाशीं गेला व त्या चवदा वर्षांच्या सुंदरीला त्यानें हत्तीचें रूप घेऊन धरलें ( पकडलें ). नरकासुराला शोक व भय हीं कशीं तीं ठाऊक नसल्यामुळें त्या रूपवतीला पुनः पुनः व्याकुळ करून, तो प्राग्ज्योतिष नगराचा राजा मोहानें तिला म्हणाला. " सुंदरि, आजपासून यच्चयावत् दैत्य, दानव व नैर्ऋत हे या पृथ्वीवर, सागरांच्या पोटांत, किंवा देव अथवा मर्त्य लोकांमध्यें जेवढें द्रव्य व जितकीं विविध प्रकारचीं रत्नें आहेत, तेवढीं सर्व मला आणून देतील. " आणि खरोखर याप्रमाणें त्या भूमिपुत्रानें उत्तम उत्तम प्रकारचीं रत्नें व विविध वस्त्रें सर्व ठिकाणांहून हरण करून आणलीं. परंतु ( मौज ही कीं ) त्यानें त्यांपैकीं कशाचाही उपभोग घेतला नाहीं. राजन्, त्या बलिष्ठ नरकासुरानें गंधर्व, देव, यांच्या व अप्सरांचे साती समुदायांतील मिळून एकंदर सोळा सहस्र एकशें कन्या हरण करून आणल्या होत्या. पण त्या सर्व कुमारिका असून सतीच्या रीतीस अनुसरून अव्यभिचारी राहिल्या होत्या. त्यानें भोगिल्या नव्हत्या.

वैशंपायन सांगतातः—दीनपण म्हणजे काय हें ज्याला माहित नव्हतें, अशा त्या भौमासुरानें, मरुदैत्याच्या राज्यांतील अलका नगरीनजीक असलेला मणिपर्वत हेंच उत्तम ठिकाण त्या सर्व कुमारींना रहाण्यासाठीं, पसंत केलें होतें. तेथें मरुदैत्याच्या दहा कन्या व

[1] ' कशेरु ' याचा अर्थ वांईकरांनीं त्वष्ट्याची कशेरु नामक कन्या असा धरिला आहे. मूळावरून तसा अर्थ करण्याचा मोह पडणें स्वाभाविक आहे. परंतु एक तर ' कशेरु ' हें नांव असें अन्यत्र आढळलें नाहीं. दुसरें, नीलकंठानें ' स्थान विशेषम् ' अशी त्या शब्दावर टीप दिली आहे. तिसरें, जंबुद्वीपाचे नऊ विभागांपैकीं हा एक भाग होता असें कोशकार देतात.

त्याचे प्रमुख नैर्ऋत, त्यांचेवर नजर ठेवून नरकासुराची सेवा करीत असत. वरप्रसादानें उन्मत्त झालेला तो महासुर, नीलसमुद्राच्या पलीकडे वास्तव्य करीत होता. सर्व असुरगणांनीं मिळून सुद्धां जें घोरकर्म पूर्वीं झालें नाहीं तें या नरकदैत्यानें केलें. देवी पृथ्वीनें ज्याला जन्म दिलें होतें त्या प्राग्ज्योतिषराज नरकानें, अदितीचाही, कुंडलांसाठीं अपमान केला. हयग्रीव, निसुंद, पराक्रमी पंचनद, आणि सहस्र पुत्रांनीं युक्त असलेला वरदत्त व असुरश्रेष्ठ गुरु असे त्याचे रणामध्यें दुर्जय असलेले चार द्वारपाल होते. आपल्या विरूप राक्षसांसहवर्तमान देवयानापर्यंतचा मार्ग व्यापून टाकून पुण्यशील लोकांना त्यानें त्रासवून सोडलें होतें. त्याचा वध करण्यासाठीं शंख, चक्र, गदा व असि हीं चार आयुधें हातामध्यें धारण करणारा महाबाहु जनार्दन, यादवकुलामध्यें वसुदेवापासून देवकीच्या पोटीं अवतीर्ण झाला होता. त्या लोकविख्यात व तेजस्वी पुरुषश्रेष्ठासाठीं, द्वारका नगरीची देवांनीं मोठ्या प्रयत्नानें स्थापना केली होती. इंद्राच्या अमरावतीपेक्षां, समुद्रपरिवेष्टित व पर्वतपंचकानें उपशोभित असलेली श्रीकृष्णाची द्वारका अधिक रमणीय होती. त्या अमरावतीतुल्य शोभिवंत नगरीमध्यें दाशार्ही नामक एक योजन ( औरस चौरस ) विस्ताराची व सुवर्णाच्या तोरणांनीं युक्त असलेली एक सभा ( गृह ) तयार केलेली होती. त्या सभागृहामध्यें संकेत करून रामकृष्णप्रभृति सर्व वृष्णि व अंधक सर्व लोक व्यवहारतंत्र चालवीत स्वस्थ राहिले होते.

भरतर्षभा, एके समयीं सर्व यादव दाशार्ही सभेमध्यें अधिष्ठित झाले असतां, एकाएकीं सुगंध वायु वाहूं लागला व पुष्पवृष्टि सुरू झाली. लागलींच तेजाचें परिवेष्टन असलेला किलकिल असा शब्द एक क्षणभर अंतरिक्षामध्यें उमटला. थोड्या वेळानें तो तेजोगोलक भूमीवर आला. त्या तेजाच्या आवरणामध्यें शुभ्र ऐरावतावर आरूढ होऊन इंद्र सर्व देवांसहवर्तमान येत असल्याचें दृष्टीस पडलें. तत्काल सर्व वृष्णि व अंधक यांसह बलराम, श्रीकृष्ण व राजा उग्रसेन महात्म्या देवेंद्राला सामोरे झाले व त्यांनीं त्याचें पूजन केलें. पूजासत्कार होतांक्षणींच, गजावरून खालीं उतरून इंद्र कृष्ण, बलराम व आहुक राजा यांना अनुक्रमें कडकडून भेटला. नंतर वेळेचे सवडीप्रमाणें व वयोनुरूप क्रमानें इतर वृष्णींची त्यानें भेट घेतली. मग रामकृष्णांचा सत्कार घेत तो सभागृहामध्यें येऊन पोंचला. आपल्या आगमनानें सभेला अलंकृत केल्यावर तो आपल्या स्थानीं अधिष्ठित झाला. नंतर त्याला अर्घ्यादिक योग्य सत्कार यथाविधि अर्पण करण्यांत आले त्यांचाही त्यानें स्वीकार केला.

वैशंपायन सांगतातः—मग महातेजस्वी इंद्रानें आपल्या हातानें सांत्वनपूर्वक श्रीकृष्णाच्या शुभ मुखाला स्पर्श करून म्हटलें, " हे देवकीपुत्रा मधुसूदना, मी काय म्हणतों तें ऐक. हे शत्रुनाशका, मी कोणत्या हेतूनें तुजकडे आलों आहें तें श्रवण कर. नरकासुर नामक एक राक्षस ब्रह्मदेवाच्या वरप्रसादानें फार उन्मत्त झाला आहे. त्या दैत्यानें प्रत्यक्ष अदितिमातेचीं कुंडलें मूर्खपणानें हरण करून नेलीं. देव व ऋषि यांचें अप्रिय करण्याविषयीं तो सदा टपून बसलेला असतो. तुझेंही तो नेहमीं उणें पहातो. म्हणून हे उपेंद्रा, तूं त्या पापपुरुषाचा वध कर. अंतरिक्षांतून संचार करणारा व वाटेल तेथें नेऊन सोडणारा हा तुझा अत्यंत पराक्रमी आणि तेजस्वी वैनतेय गरुड तुला नरकासुर असेल तेथें घेऊन जाईल.

भूमिपुत्र नरकासुर सर्व भूतांना अवध्य आहे. एतदर्थ तूं त्या पाप्याला मारून त्वरित परत ये."

याप्रमाणें देवेंद्राचें भाषण श्रवण करून महाबाहु व कमलनेत्र केशवानें नरकासुराला मारण्याची प्रतिज्ञा केली. आणि लागलींच सत्यभामेसहवर्तमान गरुडावर आरूढ होऊन शंखचक्रगदासिधारी श्रीकृष्ण इंद्राबरोबर (नरकाला मारण्याकरितां प्राग्ज्योतिषनगरीकडे) निघाला. मुख्य यादव मंडळीच्या देखत देखत इंद्रासह बलवान् कृष्णानें क्रमशः मरुद्गणांचे[1] साती मजले ओलांडून उंच भागीं प्रवेश केला. पृथ्वीपासून ते बरेच उंच अंतरावर गेल्यामुळें ऐरावतारूढ असलेला इंद्र व गरुडारूढ कृष्ण असे उभयतां सूर्यचंद्रांप्रमाणें दिसूं लागले. याप्रमाणें अंतरिक्षांतून जातां जातां अप्सरा व गंधर्व यांच्याकडून स्तविले जाणारे इंद्र व कृष्ण दोघेही दिसेनासे झाले. "सावधानपणें आपली कामगिरी कर" असें कृष्णास सांगून, थोड्या वेळानें देवेंद्र आपल्या लोकीं परत गेला आणि कृष्णानें प्राग्ज्योतिष नगरीची वाट धरली. गरुडाचे पंख हलत होते, त्यामुळें वायूला गति मिळून तो उलट दिशेनें वाहूं लागला; मेघांचा भयंकर गडगडाट सुरू झाला. आकाशसंचारी प्राणी गोंधळून इतस्ततः भ्रमण करूं लागले. असो. जातां जातां शेवटीं आकाशसंचारी गरुडावर बसून एका क्षणांत श्रीकृष्ण प्राग्ज्योतिषपुरीप्रत येऊन पोंचला. दैत्य कोठें आहेत हें त्याचे दृष्टीस दुरूनच पडलें. म्हणून तो तडक तिकडेच निघाला. द्वारापाशीं हस्त्यश्वरथपदाति इत्यादि चतुरंग दळ व गुरुदैत्यानें केलेले वसतऱ्यांसारखे सहा सहस्र तीक्ष्ण पाश त्याच्या नजरेस पडले.

वैशंपायन सांगतातः—शंखचक्रगदाधारी श्रीमान्, नीलमेघासारख्या आकाराचा, पीत वसन परिधान केलेला, चतुर्भुज, प्रतिसूर्य किंवा विद्युद्युक्त चंद्रासारखा असलेला, धनुष्याच्या दोरीचा टणत्कार करणारा आणि ज्याच्या मस्तकावर किरीट आहे व वक्षःस्थलावर श्रीवत्सांकित भूषण असून, तें वनमालांनीं व्याप्त आहे असा प्रत्यक्ष श्रीविष्णु गरुडावर बसून आपल्याकडे येत आहे असें त्याच्या वज्रतुल्य भयंकर गर्जनेवरून ओळखून, मुरु नामक असुरश्रेष्ठ व कालांतकतुल्य दानव हातांत शक्ति घेऊन वेगानें कृष्णाचा प्रतिकार करण्यासाठीं, त्याचे अंगावर धांवून गेला. त्याचे आधींच रक्तवर्ण असलेले नेत्र क्रोधानें दुप्पट लाल झाले होते. त्या दानवानें आपले हातांतील वज्र व कांचन यांनीं भूषित केलेली प्रखर शक्ति कृष्णावर फेंकली. जळजळीत उल्केसारखी ती महाशक्ति आपल्यावर येऊन पडत आहे असें पाहून जनार्दनानें सुवर्णपुंखाचा एक बाण सोडला. त्याबरोबर वीर्यवान् वसुदेवानें त्या शराच्या योगानें मुरूच्या महाशक्तीचे दोन तुकडे केले. श्रीकृष्णानें देदीप्यमान् विद्युत्पुंजासारख्या आपल्या शक्तीचा छेद केला असें पाहून मुरूचे नेत्र क्रोधानें अधिकच संतप्त झाले. त्यानें लागलींच हातामध्यें गदा घेतली. तेव्हां इंद्रानें आवाज न करतां सोडलेल्या वज्राप्रमाणें सुरश्रेष्ठ वासुदेवानें धनुष्याची दोरी आकर्ण ओढून एक अर्धचंद्र बाण सोडला. त्या योगानें मुरूच्या सुवर्णभूषित गदेचे मधोमध दोन तुकडे झाले. आणखी एक बाण सोडून श्रीकृष्णानें रणांगणावर मुरुदैत्याचें मस्तक तोडून खालीं पाडलें.

मुरूचे सर्व पाश मोडून, बांधवांसहवर्तमान मुरुदैत्याला व नरकासुराच्या दुसऱ्या असंख्य पराक्रमी व प्रमुख राक्षसांना ठार केल्यानंतर भगवान् कृष्णानें पर्वताचें अतिक्रमण केलें. तेव्हां महाबल निसुंद व त्याचें सैन्य आणि

[1] वायुप्रदेशांतील सात थर.

हयग्रीवासुर व दुसरे विविध प्रकारच्या युद्धांत कुशल असलेले वीर त्याचे दृष्टीस पडले. महाबल व पराक्रमी निसुंदानें आपल्या सैनिकांकडून श्रीकृष्णाचा मार्ग अडवून आपल्या रथावर त्वरेनें आरोहण केलें आणि हातामध्यें सुवर्णाच्या पाठीचें दुरासद व दिव्य धनुष्य घेऊन त्यानें मधुसूदनाला दहा बाणांनीं वेध केला. लागलीच केशवानेंही सत्तर तीक्ष्ण बाण टाकून त्याचा प्रतिकार केला. निसुंदानें सोडलेले बाण आपल्यानजीक अंतरिक्षांतून येऊन पोंचण्यापूर्वींच कृष्णानें मधल्यामध्यें त्यांचें खंडन केलें. त्याच्या सर्व सैनिकांनीं माधवाला वेढून सोडलें. सुरश्रेष्ठ कृष्णाच्या सभोंवार असंख्य बाणांचें जाळें पडून त्यांत तो दिसेनासा झाला. त्यामुळें चवताळून जाऊन मधुसूदनानें एकवार त्या सर्व राक्षसांकडे नजर फेंकली. नंतर पार्जन्य नामक दिव्य अस्त्राच्या सहाय्यानें जनार्दन मोठी शरवृष्टि करून, ( आपल्यावर कोसळलेल्या सैन्याचें निवारण केलें. ) पार्जन्यास्त्राच्या प्रभावानें कित्येकांवर पांच पांच व बहुतेकांवर एक एक असे बाण सोडून त्यानें सर्वांच्या मर्मस्थानीं प्रहार केला. या भयंकर शरवर्षावानें त्रस्त व भयभीत होऊन सर्व दानव पळूं लागले. आपलें सैन्य पळत सुटलें आहे असें पाहून निसुंद पुनः रणस्थानीं प्राप्त झाला आणि असंख्य शरांची वृष्टि करून कृष्णाला त्यानें झांकून टाकलें. त्यावेळीं रणांगणावर सूर्य दिसेनासा झाला, आकाश व दशदिशाही कळेनात. निसुंदानें आपल्याला बाणांनीं आवृत्त केलें असें पाहून गरुडध्वज पुरुषोत्तमानें सावित्र नामक दिव्यास्त्र हातीं घेतलें. त्या अस्त्राच्या सहाय्यानें सोडलेल्या बाणानें निसुंदाचे सर्व बाण तोडले. याप्रमाणें बाणांस बाणांचा जबाब देऊन, महाबल कृष्णानें निसुंदाच्या सर्व बाणांची वाट लावल्यावर पुनरपि एका बाणानें त्याचें छत्र व तीन बाणांनीं त्याचे रथाचा जूं व दांडा मोडून आणीक चार बाण सोडून त्याचे चारी घोडे नाहींसे केलें. (इतकेंच करून तो थांबला नाहीं, तर) पुनः पांच बाणांनीं सारथ्याला मारून आणखी एका शरानें त्या सुरश्रेष्ठानें त्याच्या ध्वजाचा समाचार घेतला; आणि शेवटीं एका अत्यंत तीक्ष्ण शरानें त्याचें शरीर जर्जर करून दुसऱ्या एकाच बाणानें जो एकटा सर्व देवांशीं सहस्र वर्षें लढत होता, त्याचें मस्तक तोडलें.

निसुंद मृत होऊन पडला असें पाहून, प्रतापी हयग्रीवासुरानें लीलेनें एक मोठी थोरली पर्वतप्राय शिला उचलून ती एकदम कृष्णावर झोंकली. अस्त्रवेत्त्यांमध्यें अग्रगण्य असलेल्या कृष्णप्रभूनें दिव्य पार्जन्यास्त्र हातीं घेऊन त्याच्या तेजानें हयग्रीवानें फेंकलेल्या शिलेचे सात तुकडे केले. ती शिला याप्रमाणें विदीर्ण होऊन भूतलावर पडल्यानंतर त्या ठिकाणीं हे भरतश्रेष्ठा, सुरासुरांप्रमाणें घनघोर युद्ध माजलें. शार्ङ्ग नामक धनुष्यापासून नाना वर्णांच्या मोठमोठाल्या शरांची तेथें वृष्टि होऊन नाना प्रकारचीं अस्त्रें प्रतिपक्षी वीरांनीं एकमेकांवर सोडलीं.

महाबाहु गरुडारूढ विष्णूनें शार्ङ्ग धनुष्यापासून अनेक वर्णांचे मोठाले बाण सोडून असुरश्रेष्ठांना ठार मारलें. महा लांगलाच्या आघातानें किंवा शंख आणि शक्ति यांच्या प्रहारानें दानव नुसते वासुदेवाच्या समोर येतांच नष्ट होत. चक्राच्या आगीनें कित्येक दानव दग्ध होऊन अंबरांतून खालीं पडूं लागले. कित्येक त्याच्या स्पर्शानें गतप्राण किंवा विकृतानन होऊन भूतलावर आपटले. कृष्णानें चालविलेल्या शरवृष्टीनें पीडित होऊन, विकलांग झालेले असुर वर्षाव करणाऱ्या मेघांसारखे खालीं पडूं लागले. कित्येकांचीं

शरीरें रक्तानें माखून गेल्यामुळें ते पुष्पित किंशुकासारखे दिसत होते. सारांश, हयग्रीवाचे अनुयायी तऱ्हेतऱ्हेचें युद्ध करण्यांत जरी कुशल होते, तरी श्रीकृष्णाच्या प्रभावापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. त्यांचीं अस्त्रें भग्न होऊन, भीतीनें व त्रासानें त्यांनीं पळ काढला. तेव्हां पुनरपि चेव येऊन, क्रोधानें ज्याचे नेत्र आरक्त झाले आहेत, अशा त्या मेघाकृति हयग्रीवासुरानें वायुगतीनें धांव मारून दहा वांवा उंच असलेल्या एका वनस्पति वृक्षावर आरोहण केलें आणि झटकन् एक वृक्ष उपटून घेऊन मोठ्या चातुर्यानें त्यानें तो कृष्णावर फेंकला. वृक्ष उपटण्यानें गतियुक्त झालेल्या वायूचा फार मोठा आवाज झाला. परंतु सहस्र बाण सोडून जनार्दनानें त्या वृक्षाचे अनेक तुकडे केले. पण ते अशा रीतीनें केले कीं त्यांची एक चमत्कृतिजनक आकृति झाली. नंतर एका बाणानें हयग्रीवाच्या वक्ष:स्थलावर श्रीकृष्णानें वेध केला. तो जाज्वल्य बाण हयग्रीवाच्या स्तनयुग्मामधून मोठ्या वेगानें छातींत घुसून हृदय फोडून बाहेर पडला. अशा प्रकारें अपार तेजस्वी व दुर्जय यदुनंदनानें महाघोर व महाबल हयग्रीवाला ठार मारलें.

याप्रमाणें लोहितगंग प्रदेशांतील जलपरिवेष्टित नगरीमध्यें पुरुषश्रेष्ठ, पुरुषव्याघ्र भगवान् देवकीपुत्रानें त्या पापी विरूपाक्षाची व त्याच्या बरोबर आणखी आठ लक्ष दानवांची वाट लाविल्यावर, हे परंतपा, तो प्राग्ज्योतिष नगरीवर चाल करून निघाला.

१ वनस्पति वृक्ष याचा अर्थ सामान्यांस कळणारा नाहीं. ज्या वृक्षाला फुलें आलेलीं न दिसतां केवळ फळेंच येतात त्याला वनस्पति वृक्ष ह्मणतात. उ० औदुंबर. (बाकी अलीकडील शास्त्रज्ञ उंबराचें फळ हें फूलच आहे, निराळें फळ त्याला नाहीं असें ह्मणतात. तें असो )-वड. ज्या वृक्षाला फुलें येऊन नंतर फळें येतात त्याला वानस्पत्य ह्मणतात. उ० आंबा.

प्रथम पंचनद नामक नरकाच्या असुरश्रेष्ठाला ठार मारल्यानंतर मग तो श्रियायुक्त असल्याप्रमाणें देदीप्यमान् असलेल्या प्राग्ज्योतिष नगरीप्रत प्राप्त झाला. त्या ठिकाणीं मोठें घनघोर युद्ध झालें. प्रथमारंभीं महाबल कृष्णानें पांचजन्य शंख वाजविला. त्याचा प्रलयकालीन मेघांसारखा मोठा आवाज झाला. इतका कीं, तो भयंकर व गंभीर स्वर तिन्ही लोकांमध्यें ऐकूं गेला. तो शंखध्वनि ऐकून नरकासुराला अत्यंत क्रोध आला. त्याचे नेत्र खदिरांगारासारखे लाल झाले. तो पराक्रमी नरकासुर आपल्या रथामध्यें अधिष्ठित झाला असतां, संध्यायुक्त भास्कराप्रमाणें शोभिवंत दिसत होता. त्याच्या रथाला लोखंडी आठ चाकें असून तो तीन नल्व ह्मणजे **बाराशें हात लांब होता.** त्याला अनेक रत्नखचित व सुवर्णाचीं चित्रें जडविलीं होतीं. त्यांतील बसण्याची जागा ( गाभारा) विस्तृत होता. त्यावरील सुवर्णाचा विशाल वज्रध्वज अत्यंत मनोहर दिसत होता. सोन्याच्या दंडांना लावलेल्या अनेक पताका त्या रथावर झळकत असून त्याचा कूबर ( पोल) वैदूर्यमण्यांचा बनविलेला होता. फार काय सांगावें, लोखंडी जाळ्यांनीं वेष्टिलेला व चित्र योजनेनें मनोहर दिसणारा त्या नरकासुराचा रथ ह्मणजे शत्रूंच्या रथाचा कर्दनकाळ असून, त्याला एक सहस्र अश्व जोडलेले होते. शिवाय त्या रथाला सुवर्णाचा मुलामा असून त्यामध्यें नाना प्रकारचीं शस्त्रें सज्ज ठेविलेलीं होतीं.

अशा रथांत तो वीर ( नरकासुर ) बसला असतां संध्यारागासहित खुलणाऱ्या सूर्याप्रमाणें शोभूं लागला. त्या नरकासुराचें उरच्छद म्हणजे छातीवरील आच्छादन वज्राप्रमाणें दृढ, चंद्राप्रमाणें शुभ्र व कोलतीचे

अंग्नीप्रमाणें जाज्वल्य असून तें छातीभोंवतीं घट्ट कसून बांधलें होतें. त्याच्या मस्तकावर किरीट असून त्याची कांति सूर्य किंवा अग्नि यांच्यासारखी होती. त्याचप्रमाणें त्याच्या दोन्ही कानामध्यें देदीप्यमान् कुंडलें विराजमान झालेलीं होतीं.

नरकासुराबरोबर त्याचे धूम्रवर्ण, धिप्पाड, रक्ताक्ष व विकृतानन दैत्य, दानव व राक्षस अनुयायी सज्ज होऊन लढाईकरतां नगराबाहेर निघाले. त्यांनीं नानाप्रकारचीं कवचें धारण केलीं होतीं. त्यांतील कित्येकांनीं हातामध्यें ढालतरवार घेतली असून कांहींनीं धनुष्यबाण धारण केले होते. कित्येकांच्या हातांत शक्ति तर कांहींच्या हातांत शूल होते. ते हत्ती, अश्व किंवा रथ यांपैकीं कशावर तरी आरूढ होऊन पृथ्वी दणाणीत रणांगणाकडे निघाले. आपल्या असंख्य दैत्यगणांनीं परिवेष्टित झालेला कृतांतासमान नरकासुर रणभूमीकडे चालला असतां मेघांच्या गडगडाटाप्रमाणें भेरी, शंख, मृदंग, पणव इत्यादि सहस्रावधि रणवाद्यांचा भयंकर गजर त्याच्या कर्णरंध्रामध्यें दुमदुमूं लागला.

असो. याप्रमाणें ते विकृतानन राक्षस ज्या ठिकाणीं श्रीकृष्ण होता तेथें गेले व गरुडाभोंवतीं गराडा घालून ते सर्व मिळून एकदम युद्ध करूं लागले. नरकासुराच्या सैनिकांनीं भयंकर शरवृष्टि करून श्रीकृष्णाला आच्छादित केलें. इतकेंच नव्हे, तर त्यांनीं शक्ति, शूल, गदा, प्रास, तोमर व नानाविध व असंख्य बाण सोडून सर्व गगनमंडळ व्यापून टाकलें.

इकडे कृष्णवर्ण मेघाप्रमाणें शोभणाऱ्या वासुदेवानें हातामध्यें अतिश्रेष्ठ शार्ङ्ग धनुष्य घेऊन त्याचा मेघगर्जनेप्रमाणें भयंकर टणत्कार करण्यास आरंभ केला. नंतर जनार्दनानें सर्व दानवसैन्यावर शरवर्षाव करण्यास सुरुवात केली. त्याच्या ( घोर ) शरवृष्टीपुढें नरकाचें सैन्य त्या प्रख्यात रणांगणाला पाठ दाखवून पळत सुटलें. त्या भूमीवर श्रीकृष्णाचें व घोररूपी राक्षसांचें भयंकर कंदन झालें. कृष्णाच्या बाणांच्या तडाख्यानें पीडित झाल्यामुळें राक्षसांची दाणादाण उडाली. ( त्यांची व्यूहरचना विस्कळीत झाली ) कित्येकांच्या भुजा तुटल्या, कित्येकांच्या ग्रीवा, मस्तकें किंवा आननें विदीर्ण झालीं. कांहींच्या चक्राच्या मारानें दोन चिरफळ्या झाल्या, तर कित्येकांना वक्षःस्थलावर बाणांचा तडाखा बसला. गज, अश्व किंवा रथ यांवर आरूढ झालेल्यांपैकीं कांहींचीं शक्तिप्रहारानें दोन शकलें झालीं. कित्येकांना कौमोदकी गदेचा किंवा चक्राचा मार बसून ते गतप्राण झाले. याप्रमाणें नरकाच्या हस्त्यश्वरथपदातियुक्त चतुरंग दळाचा फडशा पडला.

आतां त्या रणभूमीचे ठिकाणीं परमदारुण युद्ध झालें तें मी तुला संक्षेपतः सांगतों ऐक. सुरसमुदायाला पीडा देणारा मेघतुल्य व तेजस्वी नरकासुर पुरुषोत्तम मधुसूदनाशीं मधुदैत्याप्रमाणें युद्ध करूं लागला. त्याचे डोळे रागानें लाल झाले होते. त्या पराक्रमी राक्षसानें इंद्रधनुष्यासारखें उंच धनुष्य हातीं घेतलें. इकडे केशवानें सूर्यकिरणासारखा बाण हातीं घेतला व समरांत दिव्यास्त्रांनीं त्याचा रथ भरून टाकिला. त्यावर, बलिष्ठ नरकासुरानें ज्याचा प्रहार मोठा आहे असलें उत्तम अस्त्र श्रीकृष्णावर फेंकलें. वज्रपातासारखें भयंकर अस्त्र आपल्यावर येत आहे, असें पहातांच महाभाग मधुसूदन केशवानें चक्राच्या सहाय्यानें

१ येथें ' उल्कानलतुल्यतेजः " असा आमचा पाठ आहे. वांईकरांचा पाठ "उ० तेजाः" असा आहे. तथापि त्यांना अर्थाची तड पडली नाहीं हें आश्चर्य आहे.

नरकाच्या अस्त्राचे तुकडे केले. नंतर जनार्दनानें एक बाण टाकून त्याच्या सारथ्याचा प्राण घेतला. मग आणखी दहा बाणांनीं त्याच्या रथाचे अश्व मारून शिवाय त्याच्या ध्वजासहित रथाचाही विध्वंस केला. इतकेंच नव्हे, तर मधुसूदनानें आणीक एका शरानें त्याचें कवच ( चिलखत ) नाहींसें केलें.

याप्रमाणें रथाचे घोडे मरून, कांत टाकलेल्या सर्पाप्रमाणें स्वतः कवचरहित झाल्यानंतर त्या पराक्रमी दानवानें एक देदीप्यमान भक्कम लोखंडी शूल एकदम नेम धरून श्रीकृष्णावर फेंकला. परंतु सुवर्णवेष्टित शूल येत आहे असें समजतांच अलौकिक कर्में करणाऱ्या श्रीकृष्णानें आपल्या क्षुरप्रासारख्या तीक्ष्ण चक्रानें, ( क्षणार्धांत ) त्याचे दोन तुकडे केले. खरोखर त्या घोररूपी राक्षसाशीं श्रीकृष्णाचें त्या वेळीं घनघोर युद्ध झालें. त्यामध्यें अनेक शस्त्रास्त्रांचा परस्परांनीं परस्परांवर आघात केला. असो. याप्रमाणें मुहूर्तमात्र नरकासुराशीं युद्ध केल्यानंतर, चक्रायुध मधुसूदनानें आपल्या देदीप्यमान् चक्राच्या सहाय्यानें नरकासुराच्या शरीराचे दोन तुकडे केले. वज्राघातानें गिरिशृंगाचे दोन भाग व्हावे, त्याप्रमाणें दुभंग होऊन त्याच्या शरीराचीं दोन्ही शकलें भूमीवर पडलीं. नरकासुर देवाधिदेव कृष्णाप्रत प्राप्त होऊन सूर्य अस्तास जावा त्याप्रमाणें अस्तगत झाला. वज्रप्रहारानें दुभांगलेल्या गैरिकपर्वताप्रमाणें चक्रानें विकलांग झालेला तो दानव रणभूमीवर पडला.

आपला पुत्र मृत होऊन धरणीवर पडला आहे, असें पाहून व त्याचे कर्णांतील कुंडलें हातामध्यें घेऊन, भूमि गोविंदापाशीं आली व ह्मणाली, "गोविंद, तूंच हा पुत्र मला दिलास. आणि तूंच सांप्रत याच्या नाशास कारणीभूत झाला आहेस. मला वाटतें, एखादें लहान मूल आपलीं खेळणीं घेऊन जसें खेळतें, त्याप्रमाणें तुझा हा खेळ चालला आहे. देवा, तुझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणें वर्तन करण्यास तूं समर्थ आहेस. हीं तुझीं कुंडलें आपल्यापाशीं घे. आणि या नरकासुराच्या प्रजेचें (पुत्रवत्) पालन कर.

## अध्याय चौसष्टावा.

—:०:—

### पारिजातहरण.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें इंद्रतुल्य पराक्रमी भूमिपुत्र नरकासुराला ठार मारल्यानंतर उपेंद्र श्रीकृष्णानें त्याचा वाडा बघितला. वाडा पहातां पहातां, जनार्दन नरकासुराच्या जामदारखान्यापाशीं आला, तेव्हां त्यामध्यें अपार धन, विविध रत्नें, मणी, मोत्यें, प्रवाल, वैदूर्यराशि, सुवर्ण, चंद्रकांतमणि व हिरे यांचे ढीग, जांबुनद व शातकुंभ ( स्वर्ण ) यांचीं बनविलेलीं व प्रदीप्त अग्नीसारखीं आणि चंद्रकिरणाप्रमाणें देदीप्यमान् असलेलीं अशीं महामौल्यवान् शयनें व सिंहासनें, तसेंच सुवर्ण दंडानें शोभिवंत दिसणारें चंद्रकिरणासारखें तेजस्वी व जणूं शुभ्र रौप्याच्या शेंकडों हजारों धारा सोडणाऱ्या जलवर्षी मेघाप्रमाणें मोठें थोरलें छत्र त्याच्या दृष्टीस पडलें. हें (छत्र) नरकासुरानें वरुणापासून हरण केलें होतें, असें आमच्या ऐकण्यांत आहे. फार काय सांगावें, नरकासुराच्या जामदारखान्यांत जेवढीं रत्नें व जितकें धन श्रीकृष्णाच्या दृष्टीस पडलें,

१ येथें 'उत्तम' असा लेखी पोथीचा व कलकत्याचा पाठ आहे. त्याचा अर्थ, त्या दानवाचें उत्तम-(अंग) ह्म० मस्तक असा होतो व हा पाठ अधिक बरा. याच श्लोकांत आमचा दुसरा पाठ 'यथा गैरिक पर्वतः' असा आहे. वाईकरांचा 'य० पर्वतम्' असा असून व त्यांच्या श्लोकांत 'दानवः ।' हें प्रधान पद असून, हा पाठ त्यांना कसा खपला?

तितका रत्नसमूह यक्षराज कुबेर, इंद्र किंवा यमधर्म ( यांपैकीं ) कोणाच्याही भांडारांत असल्याचें कोणीं पाहिलें नाहीं अथवा कोणाचे ऐकण्यांत नाहीं.

असो; हयग्रीव, निसुंद व भूमिपुत्र नरकासुर हे मृत झाल्यानंतर, उरलेल्या कोशरक्षक दानवांनीं नरकासुराच्या भांडारांतील रत्नें व मौल्यवान् वस्त्रें आणि अंत:पुरांतील स्त्रिया हीं सर्व केशवाला अर्पण केलीं.

दैत्य म्हणाले:—जनार्दना, हीं अनेक प्रकारचीं व असंख्य रत्नें आणि मणि, ज्यांचे अंकुशांना मधून प्रवाळ जडले आहेत व ज्यांवर चापतोमरादि शस्त्रें घातलीं आहेत, जे सुंदर पताकांनीं युक्त असलेले, ज्यांचे नानावर्णाचे रुचिर अंकुश आहेत असे हे जरतारी झुली घातलेले मोठ्या कुशींचे ( ढेरपोट्ये ) भीमरूपी वीस सहस्र हत्ती व ह्या चाळीस हजार हत्तीणी, हे अन्यदेशांतून आणलेले अठरा हजार उत्कृष्ट अश्व, ( तुला आम्ही अर्पण करितों. ) या गाईंपैकीं तूं सांगशील तितक्या गाई आम्ही वृष्णि व अंधक यांच्या घरीं ( द्वारकेमध्यें ) नेऊन पोंचवितों. तसेंच हे नारायणा, उत्तम कारागिरांनीं केलेलीं सूक्ष्म शयनें व आसनें, शिक्के, स्वैरसंचारी रमणीय पक्षी, चंदन, अगरु व कालागरु वृक्षांचीं काष्ठें, किंबहुना त्रैलोक्यांतून हरण करून आणलेली जेवढी म्हणून संपत्ति या नरकासुराच्या भांडारांत आहे, ती सर्व तूं नरकासुरास मारल्याकारणानें न्यायानें तुझ्या मालकीची झाली आहे. ती सर्व आम्ही द्वारकेमध्यें नेऊन पोंचवितों. या नरकासुराच्या जामदारखान्यांत सांप्रत देव, गंधर्व व पन्नग या तिन्ही लोकांतील अखिल संपत्ति भरलेली आहे.

वैशंपायन सांगतात:—त्या सर्व संपत्तीचा स्वीकार करून व ती नीट तपासून घेऊन श्रीकृष्णानें दैत्यांकरवीं सर्व वस्तु द्वारकेमध्यें आणविल्या. नंतर, नरकानें वरुणापासून हरण करून आणलेलें व सुवर्णवर्षाव करणारें छत्र, स्वत:साठीं उचलून घेऊन माधवानें मूर्तिमंत मेघाप्रमाणें दिसणाऱ्या पक्षिश्रेष्ठ गरुडावर आरोहण केलें; आणि तेथून निघून तो तडक गिरिश्रेष्ठ मणिनामक पर्वतावर प्राप्त झाला. त्या ठिकाणीं पुण्यपावन वारे वहात होते. तेथील हेमवर्ण मण्यांची विमल प्रभा जिकडे तिकडे पसरली असून, तिनें जणूंकाय प्रत्यक्ष सूर्यनारायणाला देखील मागें टाकलें होतें. तेथें वैदूर्यरत्नें, तोरणें व पताका यांनीं युक्त असलेलीं द्वारें आणि शिखरें मधुसूदनाच्या दृष्टीस पडलीं. एकंदर मणिपर्वत, विद्युद्युक्त मेघाप्रमाणें शोभिवंत दिसत असून त्यावरील प्रासादांमध्यें चोहोंकडे छत्तें व हेमचित्रें लावून दिलीं होतीं, त्याकारणानें तो अधिक रमणीय दिसत होता.

तेथेंच, नरकासुरानें हरण करून आणून त्यांनीं पळून जाऊं नये म्हणून गिरिकंदरामध्यें कोंडून ठेवलेल्या, प्रमुख गंधर्व व देव यांच्या स्वर्णकांति सुश्रोणी प्रिय कन्या श्रीकृष्णाला दृग्गोचर झाल्या. स्वर्गतुल्य प्रदेशामध्यें, देवीप्रमाणें प्रवेश करून, त्या अपराजिता, अव्यभिचारी व कामविकारहीन स्त्रिया तेथें सुखानें राहिल्या होत्या. त्या सर्व जितेंद्रिय असून, त्यांनीं काषायवस्त्रें परिधान केलीं होतीं. महाबाहु कृष्ण तेथें येतांक्षणींच, सर्वजणी त्या यदुसिंहाच्या भोंवतीं गोळा झाल्या. व्रतोपवासादिकांनीं त्यांचीं शरीरें कृश झालेलीं असून कृष्णदर्शनासाठीं त्या फार आतुर झालेल्या होत्या. यानेंच नरक, मुर, हयग्रीव व निसुंद इत्यादि मोठमोठ्या असुरांना मारलें

१मूळांत शब्द 'हिरण्य' असा आहे याचा अर्थ "रौप्य" ही होतो व मागें छत्राचें वर्णन आलें आहे त्यावरून रौप्य घेणें क्षम्य होईलसें वाटतें.

हें ठाऊक असल्यामुळें ( कृतज्ञतेनें ) अंजुली जोडून त्या कृष्णाच्या सभोंवार उभ्या राहिल्या. त्यांचें रक्षण करण्यासाठीं ज्या वृद्ध दानवांची योजना झालेली होती, ते जरी वयानें कृष्णापेक्षां ज्येष्ठ होते, तरी त्यांनीं देखील अंजलि जोडून त्याला नमस्कार केला. त्या ऋषभाक्षाला पाहून, त्या सर्व श्रेष्ठ स्त्रियांच्या मनांत श्रीकृष्ण हाच आपल्याला पति असावा, अशी भावना उत्पन्न झाली. त्याचा मुखचंद्र पाहून त्यांच्या इंद्रियांना परम आल्हाद झाला. त्या प्रमुदित होऊन महाबाहु श्रीकृष्णाला म्हणाल्या. " असिशंखचक्रगदाधारी देवाधिदेव नारायण विष्णु-हा भूमिपुत्र नरकाला मारून, तुमचें पाणिग्रहण करील असें सर्व भूतमात्रांचा हेतु जाणणारा देवर्षि नारद व वायुदेव यांनीं जें आम्हांला पूर्वी सांगून ठेवलें आहे तें खरोखर खरें ( होत ) आहे. अहाहा ! ज्याचें वर्णन आम्ही या पूर्वीच ऐकलेलें आहे तो भक्तप्रिय अरिंदम आज प्रत्यक्ष आमच्यापुढें येऊन उभा राहिला आहे. देवा, आम्हांला दर्शन देऊन तूं आज खरोखर धन्य केलें आहेस. "

यानंतर उपेंद्रानें त्या सर्व कमलपत्राक्षी प्रमदांचें सांत्वन केलें. मग त्यांच्याकडे पाहून माधवानें पदवीनुसार अनुक्रमें सर्वांची विचारपूस केली. शेवटीं मधुसूदन—केशव—यानें यानांमध्यें बसवून सर्व स्त्रियांची द्वारकेप्रत रवानगी करून दिली. त्यांचे बरोबर रक्षणाकरितां सेवकजन दिले. त्या वेळीं वायुगतीनें शिबिका वाहून नेणाऱ्या राक्षसांचा व बरोबरच्या सहस्रावधि किंकरांचा मोठा गोंगाट उडून गेला.

मणिपर्वताचें तें परमपूजित शिखर विमल सूर्यचंद्रांसारखें असून त्यावर मणि, कांचन व तोरणें यांचें वैपुल्य होतें. शिवाय त्यावर अनेक पक्षिसमुदाय, हत्ती, मृग, सर्प, वृक्ष व शाखामृगांचे समूह असून पुष्कळ प्रशस्त शिला होत्या. न्यंकु, वराह व रुरु इत्यादि प्राणी त्या प्रपातयुक्त व उंच शिखरांच्या पर्वतावर आश्रय करून राहिले होते. तें अद्भुत व अचिंत्य शिखर आणखी विचित्र प्रकारच्या वृक्षांनीं युक्त असून मृगवृंद, जीवंजीवक प्राण्यांचे समुदाय आणि मयूर यांच्या निनादानें दुमदुमून गेलें होतें. अशा प्रकारचें तें शिखर प्रचंड असतांना अति सामर्थ्यवान् श्रीकृष्णानें तें सहज समूळ उपटून पक्षिश्रेष्ठ गरूडाच्या पाठीवर ठेवलें. त्या पक्षिराज गरुडानेंही तें मणिपर्वताचें शिखर व शिवाय श्रीकृष्ण आणि सत्यभामा, या सर्वांना लीलेनें पाठीवर घेऊन द्वारकेप्रत चालविलें. याप्रमाणें चालत असतांना हिमाद्रिशिखरप्राय पक्षिराजानें आपले प्रबल पंख जोरानें फडफडविले. त्या कारणानें दाही दिशांत त्यानें मोठा गोंधळ उडवून दिला. त्याच्या गमनाच्या वेगानें पर्वतांचीं शिखरें ढांसटलीं. वृक्ष उन्मळून पडले. मोठमोठ्या ढगांचे तुकडे झाले. आणि कांहींचे ( पहिले ) आकार साफ बदलून गेले. जातां जातां जनार्दनाच्या तळीं असलेला पक्षिराज, वायुवेगानें सूर्य व चंद्रमंडळांच्या पलीकडील प्रदेश ओलांडून मेरुपर्वतासन्निध येऊन ठेपला. त्या पर्वतावर देवांचें वास्तव्य असल्याकारणानें तेथें सर्व देवांचीं घरें मधुसूदनाच्या अवलोकनांत आलीं. हे परंतप राजा, यानंतर क्रमानें विश्वेदेव, साध्य व आश्विनीकुमार इत्यादिकांचीं देदीप्यमान् गृहें ओलांडल्यावर पक्षिश्रेष्ठ गरुड पुण्यतमलोकीं पोंचून त्यांतील देवलोकीं पोंचला. हे अरिंदमा, तेथें लागलींच जनार्दनानें इंद्राच्या भवनामध्यें प्रवेश केला. गरुडाचे पाठीवरून खालीं उतरून श्रीकृष्णानें देवेंद्राची भेट

घेतली. शतक्रतु अमरनाथानें ही मोठ्या आनंदानें त्याचा सत्कार केला. नंतर पत्नीसहवर्तमान, अच्युतानें बरोबर आणलेलीं दिव्य कुंडलें इंद्रांच्या स्वाधीन करून त्याला नमस्कार केला. मग नरश्रेष्ठ जनार्दनाचाही देवेंद्रानें रत्नादिक अर्पण करून मोठा पूजासत्कार केला. इकडे पौलोमीनें सत्यभामेचेंही यथोचित स्वागत केलें.

इतकें झाल्यानंतर उभयतां वासव व वासुदेव देवमाता जी अदिति तिच्या वैभवसंपन्न दिव्य मंदिराकडे गेले. तेथें जातात तों, महाभागा तपस्विनी अदिति माता अप्सरांनीं सेवित अशी त्या महात्म्यांच्या दृष्टीस पडली. लागलींच अतिदिपुत्र जो शचीपति इंद्र त्यानें तिचीं नाहींशीं झालेलीं दिव्य कुंडलें तिला प्रथम अर्पण केलीं. आणि मग आपल्या मातेला त्या पुरंदरानें वंदन केलें. जनार्दनानें अद्भुत साहस करून कुंडलें कशीं परत मिळवून आणिलीं इत्यादि कथाही त्यानें तिला कृष्णप्रशंसापूर्वक निवेदन केली. ती हकीकत श्रवण करून अदितीला परमानंद झाला. त्या भरांत आपल्या उभयतां पुत्रांना शाबासकी देऊन तिनें आलिंगन दिलें आणि दोघांनाही उत्तम आशीर्वाद दिले.

नंतर पौलोमी व सत्यभामा या दोघींनीं मोठ्या प्रेमानें त्या श्रेष्ठ देवीचे शुभ चरणांना वंदन केलें. यशस्विनी देवमाता त्यांनाही शुभ आशीर्वचनें देऊन जनार्दनाला म्हणाली, " ज्याप्रमाणें हा जगद्वंद्य इंद्र अजिंक्य आहे, त्याप्रमाणें तूंही भूतमात्रांना अधृष्य व अवध्य आहेस. त्याप्रमाणेंच ही तुझी मनोरमा व दिव्यगंधा पत्नी सत्यभामा सदैव सुंदर राहील. या वरारोहेचें यौवन नित्य स्थिर राहून तूं जावत्कालपर्यंत या मनुष्यरूपानें वास्तव्य करशील, तेथपर्यंत या तुझ्या त्रैलोक्यसुंदरीला जरा स्पर्श करणार नाहीं. " याप्रमाणें महाबल कृष्णाचा देवमातेनें सत्कार केल्यानंतर देवेंद्रानेंही रत्नादिकांनीं त्याला पूजासत्कार समर्पण करून जाण्याची अनुज्ञा दिली.

हा कार्यभाग आटोपल्यावर सत्यभामेसहवर्तमान पुनरपि गरुडावर आरूढ होऊन, सुरर्षिपूजित नंदनवनावरून मार्गक्रमण करीत असतां पारिजात नामक महावृक्ष श्रीकृष्णाच्या दृष्टीस पडला. तो सुरार्चित व पुण्यगंध वृक्ष नेहमीं फुललेला असे. त्याच्यापाशीं गेलें असतां मनुष्यप्राण्याला पूर्वजन्मांतील जातीचें स्मरण होतें म्हणून या उत्तमोत्तम वृक्षाचें देव मोठ्या काळजीनें रक्षण करीत असत. असो, तो वृक्ष दृष्टीस पडतांच, अमितपराक्रमी विष्णूनें तो जोरानें उपटून गरुडाचे पाठीवर घातला. नंतर सर्व अप्सरा आपल्याकडे पहात आहेत असें पाहून श्रीकृष्ण व दिव्य सुंदरी सत्यभामा उभयतां अंतरिक्ष मार्गानें द्वारकेकडे निघून गेलीं.

हें कृष्णाचें कृत्य देवराजाला समजतांच, त्या महाबाहूनें याविषयीं नापसंती न दाखवितां, उलट कृष्ण यानें योग्य कृत्य केलें असे शब्द उच्चारले. हे अरिंदमा, याप्रमाणें देवांचा पूजासत्कार घेऊन सप्तर्षिगणांचे स्तोत्रपाठ चालू असतां कृष्ण स्वर्गाहून द्वारकेला जावयाला निघाला. हें जरी बरेंच अंतर होतें, तरी त्या इंद्रपूजित महाबाहूनें तें अल्पावकाशांत गांठून ( ओलांडून ) द्वारकेमध्यें आगमन केलें.

याप्रमाणें अद्भुत पराक्रम करून भगवान्, श्रीमान्, गरुडवाहन व उपेंद्र कृष्ण द्वारकेमध्यें प्रवेश करिता झाला.

# अध्याय पांसष्टावा

—:०:—

## पारिजातकानिमित्त सत्यभामेचा कोप.

जनमेजय विचारतोः—हे वैशंपायना, बुद्धिमान् श्रीकृष्णानें मथुरेंत प्रकट होऊन तेथें जी लीला केली ती ऐकतांना माझी तृप्ति होत नाहीं, अशी मला कृष्णकथेची चटक लागली आहे. याकरितां श्रीकृष्णानीं विवाह करून, नंतर द्वारकेंत वस्ती केल्यावर तेथें जें षड्गुणयुक्त[1] चरित्र केलें तें मला सांगा. कारण, आपणांस सर्व कांहीं माहितच आहे.

वैशंपायन सांगतातः—हे भारता जनमेजया, श्रीकृष्णानें दारसंग्रह केल्यावर जें चरित्र केलें तें खरोखरच अति आश्चर्यकारक, केवळ श्रीकृष्णालाच अनुरूप असें आहे. याजकरितां तूं मजपासून समजावून घे.

हे राजा, महातपस्वी प्रतापी वासुदेव मागें सांगितलेल्या स्त्रिया प्राप्त झाल्यावर पट्टस्त्री रुक्मिणीसह रैवतक पर्वतावर गेला. तेथें त्यानें रुक्मिणीच्या उपवासाची पारणा मोठ्या अगत्यानें करून त्या कामीं स्वतः ब्राह्मणांची पूजा करून त्यांना संतुष्ट केलें. तेथें असतां नारदाच्या उपदेशावरून स्वतःचे बंधु व पुत्र यांस कृष्णानें बोलाविलें, याकरितां ते तेथें जमले. आणि केवळ श्री विष्णूलाच योग्य अशा श्रेष्ठ वैभवानें युक्त असलेल्या त्या चतुर कृष्णाच्या सोळा सहस्र स्त्रियाही तेथें जमल्या. नंतर त्या अधोक्षजानें तेथें द्विजांचे मनोरथ पूर्ण केले. त्याचप्रमाणें सदैव धर्मनिष्ठ असे जे याचक, गोड बोलणारे स्तुतिपाठक, तसेंच ज्यांचीं नामें व गोत्रें शुभ असून ज्यांचें आचरण पवित्र व ज्यांचे योनिसंबंध, अध्ययनसंबंध व यज्ञांतील ऋत्विकसंबंध सर्वथा शुद्ध आहेत अशा ब्राह्मणांची त्यांना इष्ट पदार्थ देऊन तृप्ति केल्यावर सज्जनांना प्रियकर व सज्जनांची अखेरीची गति अशा त्या भक्तवत्सलानें आपल्या जातभाईचाही ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें देणग्या देऊन संतोष केला.

याप्रकारें उपवासाच्या पारण्याची व्यवस्था लावल्यावर भगवानानें आपली प्रिय भार्या जी भीष्मकराजाची कन्या रुक्मिणी हिचा बहुतच गौरव केला. मग तो अमिततेजस्वी कृष्ण आपल्या स्त्रियांसह तेथें वसति करीत असतां एके दिवशीं नारदमुनि त्याजकडे आले; त्या वेळीं तो रुक्मिणीसह एकासनावर बसला होता. मुनि येतांच अप्रमेय स्वरूप जो तो उपेंद्र कृष्ण त्यानें शास्त्रांत सांगितलेल्या विधीप्रमाणें अर्चन केलें. वासुदेवानें याप्रमाणें अर्चन करितांच सज्जनांना पूज्यतम अशा त्या नारदमुनीनें, हे भारता, पारिजात वृक्षाचें पुष्प श्रीकृष्णास दिलें. हे राजश्रेष्ठा, त्या वेळीं भोजकन्या रुक्मिणी ही कृष्णाच्या बाजूलाच बसली असल्यामुळें त्यानें तें वृक्षराजाचें पुष्प सहजच तिला दिलें. त्या पुष्पाचा स्वीकार करून श्रीकृष्णाचें इंगित जाणणाऱ्या व कामाची केवळ अरणीच असूनही जी अनिंदित होती अशा त्या रुक्मिणीनें निर्मल पत्रांनीं युक्त असें तें पुष्प आपल्या मस्तकांत खोविलें. श्रीकृष्णाचें चित्त चोरणारी ती भीमकी स्वभावतःच त्रैलोक्यांतील सौंदर्याचें सर्वस्व होती. त्यांतून तें स्वर्गपुष्प मस्तकीं धारण करितांच तिचें रूप द्विगुणित खुललें. तें पाहून ब्रह्मपुत्र नारदमुनि तिला ह्मणाले, हे देवि, हे पतिव्रते, हें पुष्प तुलाच योग्य आहे. कारण, तुझ्या संसर्गानें या पुष्पाला सर्वथा शोभा आली आहे. हे व्रतस्थे, या पुष्पाच्या योगानें तूं फारच योग्य दिसत असून मला मान्य झाली आहेस. हे शुभगुणयुते, हे भर्तृ-

---

[1] सर्वज्ञता; तृप्ति; अनादिज्ञान; स्वातंत्र्य; शक्तिप्रकाशन व अनंतशक्तित्व या सहा गुणांनीं युक्त.

वत्सले, हे सुंदरि, ( माझे आशीर्वादानें ) हें केव्हांही कोमेजणार नाहीं. हे कालज्ञे, हे मान्यगुणे, हें पुष्प एक वर्षपर्यंत तुजजवळ राहील आणि हे वक्तृत्वनिपुणे, तोंपर्यंत तुझ्या इच्छेस येतील तसतशा प्रकारचे सुगंध हें तुला देईल. त्याचप्रमाणें, हे देवि, हें पुष्प तुला उष्णता किंवा थंडी हवी असेल तशी देईल. त्याचप्रमाणें, षड्सांतून जो तुला वाटेल तो उत्तम रस हें देईल. हे शोभनांगि, या पुष्पाचें धारण करणाऱ्या स्त्रीला हें अहेवपण देतें. त्याचप्रमाणें प्रेमवृद्धि करणारे असे इष्ट सुगंधही हें देतें. इतकेंच नव्हे, तर, हे देवि, हें वृक्षराजाचें पुष्प तुला जीं जीं अन्य पुष्पें आवडत असतील तीं तीं देईल. हे धर्मिष्ठे, यापासूनच ऐश्वर्यप्राप्ति होऊन पुत्रलाभही होतो. हे कल्याणि, हें धारण करणाऱ्याला कधींही दुर्बुद्धि सुचत नाहीं. तुला ज्या तऱ्हेचा वर्ण हवासा वाटेल त्या तऱ्हेचा वर्ण हें धारण करील. आणि तुझी मर्जी लागेल तसें हें लहान किंवा मोठें होईल. या पुष्पाच्या योगानें घाणेरडे वास नाहींसे होऊन सर्वत्र सुगंध वाढतील. हे कमलनयने, रात्रौ दिव्याची कामगिरीही हेंच पुष्प करील. कल्पवृक्षाच्या पुष्पमाला तशीच अक्षय्य टिकणारीं पुष्पवस्त्रें व पुष्पमंडपप्रभृति वस्तु तुझ्या नुसत्या संकल्पानें हें पुष्प तुला देईल. हें पुष्प जोंपर्यंत तूं धारण करीत आहेस तोंपर्यंत देवांप्रमाणेंच भूक, तहान, थकवा किंवा वार्धक्य हीं तुला वाढतील तरच प्राप्त होतील. तूं चिंतन करतांच तुला मान्य असतील असलीं गीतें, अनुगीतें व मधुर वाद्यें हीं हें पुष्प तुला ऐकवील. आणि, हे देवि, एक संवत्सर पूर्ण होतांच मूळच्या ठरावाप्रमाणें हें पुष्प त्या श्रेष्ठ पुरुषाकडे परत जाईल. हे सुव्रते, तुझें कल्याण असो; असल्या प्रकारचा हा पारिजात वृक्ष सृष्टिकर्त्यानें आपण होऊनच देवांच्या सत्कारार्थ निर्माण केला. हे सुप्रभे, शंकराची प्रिया व हिमालयाची कन्या जिला उमा, सती व ईश्वरीही म्हणतात, ती हीं पारिजात-पुष्पें नित्य धारण करिते. देवेंद्राचें रतिस्थान अशी जी शचि, तीसह त्याची माता अदिति, देवमाता सावित्री व सर्वगुणपात्र लक्ष्मी, त्याचप्रमाणें दुसऱ्या अन्य देवांच्या स्त्रिया व वसुनामक देवता या सर्वांना एक संवत्सर हाच काल ठरवून दिलेला आहे. हे भोजनंदिनि, कृष्णाच्या एवढ्या सोळा हजार स्त्रियांत आजकाल लाडकी अशी तूंच आहेस, असें माझ्या ध्यानांत येतें. हे भामिनि, हे गुणसंपन्ने, तूं आज सर्वेश्वराची आवडती झाल्यानें तुझ्या सवतींना अपमानरूपी जलानें भिजवून टाकलें आहेस. ज्या अर्थी मधुमर्दनानें आज तुला हें स्वर्गपुष्प दिलें, त्या अर्थी तुझें सौभाग्य प्रकट झालें असून यशही अनावर पसरलें आहे. हें सर्वदा आपल्यालाच मोठी भाग्यवान् व सुभग असें मानणारी जी सत्राजिताची सुंदर कन्या देवी सत्यभामा तिला कळून येईल. सांबमाता गांधारी तशाच कृष्णाच्या दुसऱ्या स्त्रिया आज निराश होऊन पतिप्रेमसंपादनाची हांव सोडून देतील. हे देवि, तुझा हा जो सौभाग्य-( पतिप्रेम ) रूपी विजयी रथ बाहेर पडला आहे, तो आज इतर स्त्रियांच्या मनोरथरूपी सहस्र रथांनाही अजिंक्य आहे. हे भामिनि, हे भोजकन्ये, हे सर्वमंगले, मला तर आज असें वाटतें कीं, तूं कृष्णाचा केवळ दुसरा प्राणच आहेस. कारण, त्रैलोक्यांतील सर्व रत्नांचें सार असें हें पुष्प श्रीकृष्णानें आज ज्या अर्थी तुला दिलें त्या अर्थी हे हरिप्रिये, जन्मास येऊन जी भाग्याची कमाल ती तुला मिळाली. ”

हे नराधिपा, याप्रमाणें नारदांनीं केलेलें जें हें सत्यभाषण तें सत्यभामेनें त्यास्थळीं आपल्या ज्या दासी पाठविल्या होत्या त्यांचे

कानीं पडलें. त्याचप्रमाणें हे राजा, कृष्णाच्या इतर राण्या म्हणजे रुक्मिणीच्या अन्य सवती यांच्या चारांच्याही तें कानीं गेलें. त्या परिचारिकांनीं त्या रुक्मिणीला पाहून व नारदांनीं जें कांहीं विशेष भाषण केलें तें सर्व ऐकून घेऊन स्त्रीस्वभावाप्रमाणें अक्षर निअक्षर जाऊन आपल्या मालकिणीला सांगितलें. या प्रकारें हें वृत्त कृष्णाच्या अंतःपुरांतील यावत स्त्रियांना कळलें. त्या वेळीं कृष्णाच्या स्त्रियांचे जागजागीं थवे जमून एखाद्या निंद्य गोष्टीप्रमाणें, रुक्मिणीच्या उत्कर्षाची ही गोष्ट चकित होऊन त्या एकमेकींच्या कानांत कुचकुचूं लागल्या. व त्यांपैकीं बहुतेक कृष्णस्त्रिया एकत्र मिळून आनंदानें रुक्मिणीही मोठी पूज्य, पुत्रमाता व ज्येष्ठ आहे असें म्हणूं लागल्या. परंतु, अतुलतेजस्वी कृष्णाची नेहमींची आवडती स्त्री जी सत्यभामा तिला हा आपल्या सवतीचा उत्कर्ष सहन झाला नाहीं. कारण, सत्यभामा ही स्वतः अत्यंत सुंदर व तरुण असून हिला आपले सौभाग्याचा मोठा गर्व असे. यामुळें रुक्मिणीची ही गोष्ट कानीं पडतांच ती अभिमानी स्त्री ईर्ष्येस पडली. त्या शुचिस्मितेनें नेसूंचें केशरी वस्त्र सोडून टाकून क्रोधयुक्त अंतःकरणामुळें एक साधें पांढरें पातळच वेढून घेतलें. आणि ईर्ष्येपासून उत्पन्न झालेल्या आणि अधिकाधिक वाढणाऱ्या क्रोधाग्नीमुळें इंधन घातल्यानें अधिकच चेतलेल्या अग्निज्वालेप्रमाणें ती जळूं लागली. आणि सजल मेघांत जशी एखादी तारा शिरते त्याप्रमाणें ती ( अपमानानें ) जणूं काय निस्तेज होऊन, क्रोधाच्या भरांतच एकान्तांतील क्रोधगृहांत शिरली. आपल्या प्रियावर रागावल्याची खूणच कीं काय, ह्मणून हिम किंवा चंद्र यांप्रमाणें धवधवित शुभ्र वस्त्रानें तिनें आपलें कपाळ आंवळून कानशिलांवर ओल्या रक्तचंदनाचा लेप दिला व आपला झालेला अपमान वारंवार आठवून आणि सर्व भूषणें काढून टाकून आणि वेणीचा एकच पेड. वळून क्रोधानें वारंवार मस्तकाला आंसडे देत जीवर लांबचलांब उशी टाकली आहे अशा गादीवर ती बसली. ती थोर कुळांत उत्पन्न झाली असतांही दासींवर विनाकारण रागावूं लागली. व खाली तोंड घालून वारंवार सुस्कारे सोडून नखांनीं कमल[1] कुसमडूं लागली.

## अध्याय सासष्टावा.

—:०:—

### सत्यभामेची समजूत घालण्याचा यत्न.

वैशंपायन सांगतातः—नारदमुनि रुक्मिणीशीं बोलत बसले आहेत, हें ध्यानांत आणून सर्वज्ञ व अप्रमेयस्वरूप श्रीकृष्ण कांहीं निमित्त काढून तेथून निघाला आणि घाईघाईनें त्या रैवतक पर्वतावरील एका रमणीयभागीं स्वतः

१ येथें कमल याचा अर्थ 'मुखकमल' असा नीलकंठांनीं अध्याहार करून दिला आहे. परंतु, तो आह्मांस मान्य नाहीं. कारण, राग झाला तरी आपल्या नखांनीं आपलें तोंड ओरखाडीत बसणें हें कांहीं समंजस नव्हे. रागाचे भरांत आपले तोंडांत भडकावून घेणारीं माणसें आढळतात; तथापि, नखानें तोंड ओरबडल्यानें विरूपता येण्याचा संभव असल्यानें सत्यभामेसारख्या रूपाभिमानिनी स्त्रियेला हें पटेलसें वाटत नाहीं. आमच्या मतें तिचे हातांत असलेलें कमलच ती चुरडून टाकीत होती. कारण, जवळच्या वस्तूवर आपला राग काढण्याची चाल स्त्रियांत सर्वत्र आढळते. सासूच्या रागावर घरांतील भांडीं, प्रसंगीं पोटचीं पोरेंही आदळणाऱ्या स्त्रिया पाहण्यांत आहेत. आतां तेथें कमल कुठलें म्हणून कोणी म्हणेल तर विलासिनी स्त्रिया क्रीडेसाठीं कमलपुष्पें ठेवीत; असा सर्वत्र उल्लेख आहे. कालिदासाचे मेघदूत काव्यांतील 'हस्ते लीलाकमलमलके बालकुंदानुविद्धं' हा श्लोक पहा. शिवाय, याच प्रकरणांत पुढील अध्यायांतील सातव्या श्लोकांत 'करजाग्रावलीढंतु पंकजं मुखपंकजे' या शब्दांवरून त्या वेळीं सत्यभामेचे हातांत कमल असून तें नखांच्या अग्रांनीं कुरतुडलेलें होतें असें स्पष्ट दिसतें.

विश्वकर्म्यानें निर्मिलेल्या सत्यभामेच्या विस्तीर्ण गृहांत गेला; मात्र आपल्याला प्राणाहूनही अधिक अशी ती सत्राजिताची कन्या देवी सत्यभामा मोठी मानिनी आहे, हें जाणून तो तिचे मंदिरांत फार चोरट्या पाउलानें शिरला आणि ती देवी आपणावर रुसली असेल अशी केवळ अतिप्रेमामुळें स्वतःच कल्पना केल्यासारखें दाखवून, तो यदुनंदन भीतभीतच बेतानें तिचे खोलींत गेला. आंत जाण्यापूर्वीं त्यानें "तूं दाराशींच उभा रहा" म्हणून दारुकाला सांगितलें व " तूं नारदांची व्यवस्था ठेव " म्हणून प्रद्युम्नाला आज्ञा केली होती.

आंत शिरतो आहे तों दुरूनच त्यानें पाहिलें कीं, आपली प्रिया क्रोधगृहांत गेली असून आपले दासीजनांचे मध्यभागीं बसली आहे व वरचेवर सुस्कारे टाकीत आहे. व हाताचे नखांनीं कुरतुडलेलें तें लीलाकमल आपलें मुखकमलाशीं धरून व श्वास टाकून पुनःपुनः ( सवतीचा मजहूनही वरचढपणा व्हावा आँ, असें आपल्याशीं म्हणून विस्मयानें ) हंसत होती. पायांचीं बोटें किंचित् मोडून त्यांनीं भूमी खरवडीत व तोंड मागें फिरवून पुनःपुनः आश्चर्यानें हंसत आहे व ती सर्वांगसुंदरी कमलनेत्रा आपलें मुखकमल आपले वाम करकमलावर ठेवून ती नतांगी ध्यानस्थासारखी बसून दासीचे हातून सरस चंदन घेऊन आपले हृदयावर ठेविते आहे व त्या दासीला त्या कामगिरीबद्दल आतां शाबासकी देत आहे व त्याचक्षणीं भ्रमिष्टासारखी तिला टाकून बोलते आहे व शयनावरून वारंवार उठून पुनःपुनः धाडकर अंग टाकीत आहे. या व अशा प्रकारच्या आपल्या प्राणप्रियेच्या अन्य चेष्टा कृष्णानें पाहिल्या. इतक्यांत तिनें आपलें तोंड वस्त्रांत लपवून ( पाठमोरें ) उशीवर टेंकलें.

असें जेव्हां त्यानें पाहिलें तेव्हां जवळ जाण्यास हाच अवसर ठीक आहे असें पाहून तो हरि आपली चाहूल तिला लागेल या भीतीस्तव मोठ्या हलके पावलानें तिचे पाठीशीं जाऊन ठेपला. तत्पूर्वीं त्यानें दासीजनांना सुचविलें कीं, मी आल्याचा इषारा तुह्मीं कोणीही तिला देऊं नका. मग हातीं पंखा घेऊन आणि बाजूला उभा राहून तो हळू हळू वारा घालीत होता. व एकीकडे हळू हळू हंसत होता. परंतु, त्या पारिजातपुष्पाचा स्पर्श झालेला असल्यामुळें मनुष्यांना दुर्लभ असा दिव्य गंध त्या भगवंताचे अंगावर होता. तो अत्यद्भुत गंध नाकांत जातांच आश्चर्यचकित होऊन त्या सत्येनें आपले मुखावरील बुरखा काढिला व ' हें काय म्हणून विचारलें. 'बाजूला असलेल्या देवाकडे न पहातां तशीच उठून त्या शुचिस्मितेनें " हा वास कोठून गे आला " म्हणून आपले दासींना प्रश्न केला. परंतु, त्या उत्तर न देतां केवळ भूमीवर गुडघे टेंकून, हात जोडून खालीं मान घालून बसल्या. त्या अपूर्व गंधाचा कोठेंच उगम दिसेना तेव्हां, कदाचित् ही भूमीच असला हा लोकोत्तर गंध सोडीत नसेलना ! अशी शंका येऊन हा असला गंध या भूमीला यावा तरी कसा म्हणून ती चारी बाजूंनीं पहात सुटली असतां, एकाएकीं लोककर्ता कृष्ण तिचे दृष्टीस पडला. तेव्हां " आतां ठीक जुळलें " असें म्हणून

---

१ अतिस्नेहः पापशंकी—अशी म्हण आहे.

२ रुसून बसण्याचें एक स्वतंत्र गृहच असणें ह्मणजे राजस्त्रियांचें रुसणें हें महत्वाचें खातेंच होतें ह्मणायचें !

३ येथें ' विविक्ते ' 'वनितां ' व ' विनतां ' असे तीन पाठ आहेत. आह्मी ' विनतां ' हा घेतला आहे.

१ या ठिकाणीं वांईकरांचा पाठ ' मुह्यन्ती ' असा आहे. आमचा पाठ 'युज्यति ' असा आहे. त्याचप्रमाणें उत्तरार्धांत त्यांचा पाठ ' अवतिक्ता ' आहे आमचा ' अवासिक्ता ' आहे.

तिनें रडून आपले डोळे गढूळ करून घेतले. आणि फार प्रेमळ असल्यानें त्याला पाहून ती क्रोधानें घामाघूम झाली. तिचे ते सुंदर ओष्ट स्फुरण पावूं लागले. तोंड खालीं घालून ती सुस्कारे टाकूं लागली. व ती कृष्णनेत्रा, कल्याणी कांहीं वेळ कृष्णाला सोडून दुसरेकडेच तोंड करून पहात राहिली.

तेव्हां हरि तिला म्हणाला, ' हे प्रिये, नेत्र वटारून, डावी भुवई आंखडून आणि मुखकमल हातावर टेंकून बसलेली तूं आज फारच खुलतेस गडे, ' हे शब्द कानीं पडतांच कमलाच्या पानावरून जसें दंवाचें जमलेलें पाणी टपटप गळावें त्या प्रमाणें तिचे नेत्रांतून प्रणयकोपामुळें सारखी वारिधारा वाहूं लागली. तें पाहून तो कमललोचन हरि टुणादिशी उडी मारून लगबगीनें तिचे जवळ गेला व तिचे मुखकमलापासून गळणारें तें पाणी ओंजळींत धरूं लागला. तो श्रीवत्सचिन्ह धारण करणारा कमलनेत्र कृष्ण प्रियेच्या वक्षस्थलावर पडणारें तें तिचे नेत्रांतील जल मग हातांनीं पुसून तिला म्हणाला, हे नीलकमलनेत्रे, हे कल्याणि, हे सुंदरी, कमलांतून उदक पडावें त्याप्रमाणें तुझ्या या नेत्रांतून हें पाणी कां म्हणून गळतें आहे बरें? सर्वदा माझें मन हरण करणारें हें तुझें मुख व शरीर आज प्रभात कालींचा चंद्र किंवा भर मध्यान्हींचें कमल यांची निस्तेजता व ग्लानी कां धारण करीत आहे? हे सुश्रोणि, आज नेहमींचे तुझे केशरी किंवा कुसुंबी[1] वस्त्रावर अवकृपा कां? आज निव्वळ पांढरें पातळ घेतले आहे, याला काय म्हणावें? एकतर तुजसारख्या सुवासिनी स्त्रियांनीं देवपूजेखेरीजकरून इतरत्र असलें पांढरें वस्त्र नेसूं नये अशी शास्त्राज्ञा आहे; आणि दुसरें, तुला स्वतःलाच केशरी आणि कुसुंबी रंगी वस्त्रांची फार आवड आहे. असें असून आज हा प्रकार काय? बरें, हे सुगात्रि, आज हें शरीर अलंकाररहित कां? मला सांग तरी. शिवाय या गालांवर वेलबुट्टी रंगवावयाची त्या ठिकाणीं सर्व अश्रूंचेच ओघळ चालले आहेत हें तरी काय? आणि आज ही अंगकान्ति तरी अशी धूसर वर्णावर कां फिरली? हे प्रिये, असल्या या सुंदरमुखकांतीची आज तूं धुळधाण केल्यानें माझें मन मात्र ग्लान ( निरुत्साही ) करून टाकीत आहेस, असें कां? हे प्रियदर्शने, हे हृदयवल्लभे, आज आपलें कपाळ पांढऱ्या पट्टीनें आंवळून भोंवतीं सुगंधी, सुरस व सुंदर चंदनाचा लेप दिला आहे, हें काय? तुझे गालांवर ओघळलेला हा चंदनरस तेथील पत्रलेखेची जरी स्पर्धा करूं पहातो तरी तो तेथें मुळींच खुलत नाहीं. आज तुझे कंठाभोंवतीं रत्नहार नसल्यानें ग्रहनक्षत्रांनीं रहित अशा शरत्कालीन मलिन आकाशाप्रमाणें तो खुलत नाहीं. ( ओका दिसतो ) पौर्णिमेच्या चंद्राची स्पर्धा करणारें, कमलाचा सुगंध असणारें, सदैव हंसरें व बोलकें असें जें हें तुझें मुख, त्यानें आज मला कांहींच बोलत नाहींस हें काय? शिवाय, आज डोळा किलकिला करून देखील मला पहात नाहींस, केवळ सुस्कारे टाकीत आहेस आणि काजळानें काळें झालेलें असें अश्रुजल सोडीत आहेस, हा प्रकार काय? हे कमलश्यामले, हे मनस्विनि, आतां हें रडणें पुरे. तुझ्या या ( गोड ) मुखाला न शोभणारें हें काजळानें काळें कुट्ट झालेलें अश्रुजल ढाळीत बसूं नको. हे देवि, हे सुंदरि, मी तुझा आज्ञाधारक दास: ह्मणून जर सगळ्या जगांत महशूर आहें, तर मग आज पूर्वींप्रमाणें मला कामागिरी कां सांगत नाहींस? हे देवि,

---

१ आमचा पाठ ' महारजनं ' असा आहे. कोठें ' महारजतं ' असा आहे, त्याचा अर्थ करणें तर 'जरतारी ' असा करावा.

हे कोपने, मी असें तुझें काय अप्रिय केलें बरें? म्हणून, हे सुंदरी, तूं आपल्याला आज असे क्लेश करून घेत आहेस? हे सर्वांगमनोहरे, मी कायेनें, वाणीनें किंवा मनानेंही तुझे आज्ञेबाहेर तिळमात्र चालत नाहीं. हें मी सत्य बोलतों. हे शोभने, माझा त्वदितर सर्व स्त्रियांविषयींहि आदर आहे हें खरें; परंतु, आदर आणि प्रेम या दोन्हीही गोष्टींची एकत्र जोड मात्र तुजवांचून अन्यत्र कोणाविषयीं नाहीं. हे देवकन्यासदृशे, मी तुला माझें ठाम मन सांगतों कीं, माझा हा जो मदन आहे तो मी मेलों तरी तुला सोडून जाणार नाहीं. हे कमलगर्भाभे, ज्याप्रमाणें क्षमा आणि गंध हे दोन गुण पृथ्वीचे ठिकाणीं आणि शब्दादि गुण आकाशाचे ठिकाणीं, दीप्ति अग्नीचे ठिकाणीं, दिव्य प्रभा सूर्याचे ठिकाणीं व कान्ति चंद्राचे ठिकाणीं शाश्वत आहेत, त्याचप्रमाणें माझा स्नेह तुझे ठिकाणीं नित्य आहे.

याप्रमाणें, जनार्दन जेव्हां आपल्या मनाजोगें गोड बोलला, तेव्हां ती सुंदर सत्यभामा डोळ्यांचें पाणी पुसून हळूच त्याला म्हणाली, 'हे प्रभो, आजपर्यंत तूं एकटीचा माझाच आहेस, असें माझे मनानें कायमचें घेतलें होतें. परंतु, आजच्या वर्तनावरून तूं दहाजणींसारखेंच मजवरही प्रेम ठेवितोस असें मला कळून आलें. काळाची गति सदा बदलत असते, हें मला यापूर्वी कळलें नव्हतें. पण, आज मला असें समजून आलें कीं, या लोकांतील एकही गोष्ट शाश्वत नाहीं. आणि मी जरी आज मेलें नाहीं तरी (तुझ्या प्रेमांत बदल झाल्यानें) आज माझा सर्व प्रकारें दुसरा जन्म आहे, असें मी समजतें. हे अच्युता, या कामीं फार बोलून काय फायदा, खरें काय तें तुझें हृदयें जाणतच आहे. तूं जी ही गोडी दाखवितो आहेस ती केवळ शब्दाची आहे हें मला स्पष्ट दिसतें. मजवरील तुझा जो स्नेह आहे तो केवळ कृत्रिम असून अन्यत्र मात्र तसा नाहीं. हे पुरुषोत्तमा, मी केवळ सरळ स्वभावाची आणि तुजविषयीं अत्यंत आसक्त आहें हें तूं जाणत असूनही असली कपटबुद्धि धरून माझा अपमान करितोस हें (तुझ्या पुरुषोत्तमत्वाला) उचित आहेना? बरें, असो; झालें तितकें पुष्कळ. जें कांहीं पहावयाचें होतें तें एकदांचें पाहून सोडलें व ऐकायचें होतें तें ऐकूनही घेतलें. इतका स्नेह करून त्याला किती उंची फळ आलें तेंही मीं पाहिलें. अजूनही जर, हे पुरुषोत्तमा, मी कृपेस पात्र असेन तर मला आपण संमति द्यावी म्हणजे मी पूर्ण निश्च-

१ या ठिकाणीं 'नैवत्वाम् मदनो जह्यादमृते मयिमामकः' असा पाठ लेखी पोथींत आहे. याचा अर्थः– मी मेलों नाहीं तोंपर्यंत माझा मदन तुला सोडणार नाहीं. असा होतो. हा अर्थ कमी जोराचा. तथापि, कमी कडू आहे. कारण, स्त्रियांना पतिमुखांतून 'मी मेलों तरी' हे शब्द विनोदानें किंवा संकेतार्थानेंही ऐकण्यास गोड लागत नाहींत. याकरितां 'अमृतेमयि' हाच पाठ घेऊन त्याचा अर्थः 'मी जीवमान आहें तों' असा गोड शब्दांनीं करावा हें आम्हास बरें वाटतें. वर आम्हीं 'मृतेपिमयि' असा पाठ धरून अर्थ केला आहे. याचें कारण, तो पाठ दोन पुस्तकांचा व वरील पाठ एकाच पोथीचा; इतकेंच.

१ या ठिकाणीं 'अमृताया द्वितीयोपि जन्मैहि मम सर्वथा' असा पाठ दोन पोथ्यांतून असून नीलकंठांनीं तो घेऊन विद्वत्तेच्या जोरानें त्यांतून अर्थही काढिला आहे. तो असा–'आमरणांत मी जशी तुजशीं अनन्य तसाच तूंही मजशीं अनन्य रहाशील. व असाच माझा जन्म जाईल असा मीं तर्क केला होता.' परंतु हा अर्थ सहज नसून कष्टाचा आहे. म्हणून आम्हीं बंगालचे आशियाटिक सोसायटीचे प्रतीचा पाठ स्वीकारला आहे.

२ या ठिकाणीं 'हृदयंवेत्थि' असाही पाठ सांपडतो. त्याचा अर्थः 'तुझें हृदय मी जाणतें' तथापि 'हृदयंवेत्तिते' हा पाठ अधिक खुबीदार आहे.

यानें तपश्चर्या करीन. कारण, स्त्रियांनी तप किंवा व्रत करणें तें पतीच्या मर्जीनेंच केलें पाहिजे. तसें न केल्यास तें करणें फुकट आहे.

इतकें हें बोलून पुनरपि ती कल्याणि शुचिस्मिता साध्वी श्रीहरीच्या पीतांबराचा पदर आपले मुखावर घेऊन नेत्रांवाटे अश्रु ढाळीत बसली.

## अध्याय सदुसष्टावा.

—:०:—

### पारिजातोत्पत्तिकथन.

हे भारता, प्रेमास्तव रागावलेली व अभिमानिनी जी सती सत्यभामा हिला कृष्ण पुनरपि म्हणाला:—हे कमलनेत्रे, हा तुझा शोक माझीं अंगें जणू जाळतो आहे. पण, तूं इतकी जी व्याकूळ झालीस याचें कारण काय? हे सर्वांगसुंदरि, तुझ्या या भक्तिमान् पतीला ही गोष्ट ऐकवावी असें जर तुला वाटत असेल व असें करण्यांत तुझा जर मर्यादातिक्रम होत नसेल, तर तूं ज्या कारणानें इतकी अत्यंत विव्हळ झालीस तें एवढें कारण तरी कोणतें तें मला सांग. माझे प्राणांची तुला शपथ आहे.

यानंतर सत्यव्रत धारण करणाऱ्या आपले पतीला सत्यभामा ही तशीच खालीं मान घातलेली बाष्पगद्गद वाणीनें म्हणाली, ' हे केशिनाशना, हे कमलपत्राक्षा, हे मानदा, लोकांत मला जो एवढा मान आहे, तो पूर्वीं तूंच होऊन मला दिलास आणि प्रसिद्धही तूंच केला आहेस. हे देवा, मी तुझी लाडकी असल्यामुळें मला मोठा गर्व वाटून मी अशी प्रौढी मिरवीत होतें कीं, यावत् स्त्रियांत मीच धन्य आहें. पण त्या माझा आज माझ्या सवतींनीं व लोकांनीं उपहास मांडला आहे, अशी माझ्या दासींनीं बित्तम बातमी ऐकून येऊन मला सांगितलें आहे. नारदांनीं तुला जें पारिजातपुष्प दिलें तें तूं आपले आवडतीला देऊन मला मात्र वगळलेंस. आणि असलें उत्कृष्ट रत्न देऊन तिचे ठिकाणीं तुझा प्रेमा व बहुमान् मजवरच्यापेक्षां अधिक आहे असें तूंच स्पष्ट करून दाखविलेंस. शिवाय, नारदांनीं तुझ्या समक्ष तुझ्या लाडकीचे गोडवे गाइले आणि तूं ते ऐकत असतांना तुला गुदगुल्या होत होत्या. तुझ्या तोंडासमोर नारदाला जर तिची स्तुति करावयाची होती तर त्या ओघांत मजसारख्या अभागिनीचें नांव त्यानें रिकामें ओढून कशाला आणावें? बरें, हे प्रभो, मला एकवार प्रेमरस अर्पण करून पुढें जर असा तापच द्यावयाचा आहे तर मजवर कृपा करा आणि आपली तप करण्यास मोकळीक द्या. हे कमलेक्षणा, तुझें प्रेम मदन्यत्र आहे ही गोष्ट मी योगमय निद्रेंत पाहूनही मला खरी वाटतीना. पण असली गोष्ट धडधडीत तुजसमक्ष झाली असें मीं ऐकलें. मी म्हणतें, रुक्मिणीची स्तुति करण्याविषयीं एक वेळ त्या अतुल तेजस्वी नारद मुनींची इच्छा असेल; तीबद्दल माझें कांहीं बोलणें नाहीं. पण ती स्तुति तूं तेथें उभा राहून निमुटपणें ऐकून घेत होतास याबद्दल माझा तुजवर राग आहे. तूंच मला सांगितलेंस कीं, या जगांत भले लोक मानासाठीं प्राण धारण करितात. हें जर खरें, तर आजच्याप्रमाणें माझी मानखंडना झाली त्या अर्थीं आतां मी जगण्याची इच्छा करीत नाहीं. आजपर्यंत जेथून माझें मानरक्षण झालें तेथूनच मला मानहानीचें भय उत्पन्न झालें आहे. आणि जो गृहस्थ माझें सर्व बाजूंनीं रक्षण करीत होता तोच आज मजविषयीं उदासीन झाला आहे. हरहर! हे समर्था, हे देवा, तूं माझा असा अव्हेर केल्यावर माझी काय गति होईल बरें? खचित, तूं माझी संगती सोडल्यानें चंद्रवियो-

गिनी कुमुद्वतीची अवस्था होईल. ( मी सुकून जाईन ) मी मोहानें देवांचें असें ( प्रथम ) प्रिय व ( पश्चात् ) अप्रिय काय केलें होतें कीं, ज्यामुळें, हे मानदा, एकवार मी तुझी आवडती होऊन पुढें आतां नावडती झालें ? आतां मला कोकिलरवानें मिश्र व पुष्पगंधानें युक्त अशा शुद्ध वायूचें सेवन कसें गोड लागेल ? मी पूर्वीं तुझी लाडकी होतें, तेव्हां वसंतकुसुमांनीं चित्रित झालेल्या या रैवतक पर्वताकडे नित्य पहात असें; पण आतां तुझी नावडती झाल्यावर त्याकडे मला कसें पहावेल ? हे देवा, तुझ्या अंकावर बसून मी पूर्वीं सागरांत जलक्रीडा केली, त्या मला असल्या दौर्भाग्यांत ( तूं त्याग केल्यावर ) त्या सागराकडे नुसतें बघवेल तरी कसें ? ' हे सत्राजित कन्ये, तुजहून मला प्रियतर अशी दुसरी कोणतीही स्त्री नाहीं ' हीं अक्षरें तूंचना आपले मुखानें बोलला होतास, मग तीं आज कोठें गेलीं ? अथवा बोलण्याचें स्मरण कोण धरितो ! तुझें प्रेम मजवर असल्यामुळें आजपर्यंत सासू मला पाहून आनंदित होई व माझा बहुमान करी; परंतु, तूं माझा असा अवमान केल्यावर ती मी फुटक्या कपाळाची म्हणून माझी उपेक्षा करील. हे मानदा, आपण मजवर कदाचित् अतिशय दाट प्रेम मनांतून करीत असाल, पण ज्या अर्थीं इतर जनांकडून माझा मान राखला जावा याची काळजी आपण ठेवीत नाहीं. त्या अर्थीं मला त्या गूढप्रेमाचा काय उपयोग? हे शत्रुमर्दना, तूं असा कपटी व धूर्त असशील हें आजपर्यंत मी जाणलें नव्हतें. मला हें आज कळलें कीं, तूं माझ्या सवतींच्या बाजूचा असून अति चपळ व फसव्या आहेस. हे देवा, तूं तुझी लबाडी बाहेर न पडावी म्हणून मोठ्या यत्नानें तुझा स्वर, वर्ण, इंगित व आकार हीं झांकून मजपाशीं वागलास. तथापि, हे चोरा, मीं आज ओळखलें कीं, तूं अंतर्यामीं त्या पक्षाचा असून केवळ तोंडानें माझ्यापाशीं गोड बोलणारा; पण, लुच्चा आहेस.

याप्रकारें ईर्ष्येस चढलेल्या त्या अभिमानी सत्राजितकन्येला तो देव हरि गोंजारून बोलला, ' हे प्रिये, हे मम प्राणेश्वरि, हे कमलपत्राक्षि, असें भलभलतें बोलूं नको. या कामांत अधिक बोलून काय करावयाचें ? मी केवळ तुझा आहें, एवढें ध्यानांत घे म्हणजे झालें. हे देवि, ही गोष्ट खरी कीं, त्या निर्मल वर्तनाच्या नारदमुनींनी मला गोड वाटावें म्हणून, किंवा माझ्या भिडेनें अथवा सरळपणानें तें पारिजातपुष्प माझे समक्ष तिला दिलें. एवढाच काय तो माझा अपराध आहे. तर हे शुचिस्मिते, तूं प्रसन्न होऊन तेवढा माफ कर. हे अतिकोपने, तुला पुष्कळशीं पारिजातकाचीं पुष्पेंच जर हवीं असतील तर हे सुश्रोणि, मी तुला देईन. हें अगदीं खरें सांगतों. अग, मी तो पारिजाताचा श्रेष्ठ वृक्षच आणवून तुझी इच्छा असेल तितके दिवस तुझ्या घरीं लावून ठेवीन. मग तर झालें ना ?

या प्रकारें कृष्ण बोलला असतां ती कृष्णप्रिया हरीला म्हणाली; ' हे अच्युता, आपण म्हणतां त्याप्रमाणें माझ्या दारीं तो वृक्ष आणणें जर शक्य असेल, तर हा माझा राग मीं सोडून दिला. कारण, माझें तर आयतें ( एका फुलापेक्षां ) शतपटीनें कल्याण होईल व तेणेंकरून मी, हे अधोक्षजा, सर्व स्त्रियांत अधिक होईन[१]. ' त्यावर तो जग-

१ नीलकंठांनीं सत्यभामेनें कृष्णाला दिलेल्या ' धूर्त ' चंचल, वंचक, इत्यादि द्वाड विशेषणांचा अध्यात्म दृष्टीनें प्रतिष्ठित अर्थ केला आहे. पण त्याचें आम्हांस विशेष महत्व वाटत नाहीं. प्रणयकोपांत प्रियाला टाकून बोलणें हें सर्व कविसंमत आहे, तेव्हां सत्यभामेला इतकें बचावून नेण्याचें कांहीं कारण नाहीं.

ताचा उत्पत्तिलयकर्ता अप्रतिम देव मधुसूदन म्हणाला, 'तथास्तु, फार नामी गोष्ट.' हे संग्रामविजयी राजा, याप्रमाणें कृष्णानें जेव्हां तिचे इच्छेचा अंगीकार केला त्यावेळीं सज्जनांना प्रिय व कंसशत्रूची लाडकी जी सत्यभामा ती संतुष्ट झाली. नंतर सज्जनांच्या सर्व इच्छा पुरविणारा, सर्वात्मा, सर्वकर्ता व जगताचा नाथ अशा त्या कृष्णानें तेथेंच स्नान करून सर्व अवश्य तें आह्निक कर्म केलें. हे राजा, नंतर कृष्णानें देवमुनि नारदांचें ध्यान केलें. त्याबरोबर ते मुनिश्रेष्ठ त्या समुद्रांत स्नान करून तेथें आले. हे नरपते, मुनि येतांच सज्जनांना गति देणारा असा जो धर्मात्मा कृष्ण यानें सत्यभामेसह त्या मुनीची यथाविधि पूजा केली. पुजेचे वेळीं सत्यभामेनें स्वतःच मुनीचे पाय धुतले. व देव श्रीकृष्णानें स्वहस्तें झारीनें पाणी घातलें. मग नारदमुनि सुखांत आसनावर बसले असतां शुद्धचित्त व जगद्गुरु केशवानें त्या मुनीला (भक्षणार्थ) खीर अर्पण केली. लोककर्त्यानें याप्रमाणें सत्कारपूर्वक अर्पण केलेलें तें पायसान्न त्या उदारबुद्धि व वक्त्यांत श्रेष्ठ नारदानें मोठ्या आवडीनें खाल्लें. नंतर आचमन करून, तृप्त झालेल्या नारदानें कृष्णाला आशिर्वाद दिले. त्यांचा कृष्णानें प्रसन्न मनानें स्वीकार केला. नंतर कमलनेत्रा सत्यभामा नारदमुनीला नमस्कार करून उभी असतां नारदमुनि आपला जलयुक्त[१] दक्षिणहस्त पुढें करून म्हणाले, "हे देवि, तूं जशी या क्षणीं पतिपरायण आहेस, अशीच सर्वदा रहाशील आणि माझ्या तपाच्या बळानें तूं विशेष भाग्यास चढशील."

याप्रमाणें मुनिश्रेष्ठानें सांगितल्यावर ती हरिप्रिया सत्यभामा मोठ्या आनंदानें युक्त होऊन उठली. नंतर हे कौरवा, त्या अप्रमेय पराक्रमी बुद्धिमान् कृष्णानें त्या मुनिश्रेष्ठाची आज्ञा घेऊन देव, ब्राह्मण यांस अर्पण करून बाकी राहिलेलें अन्न सेवन केलें. नंतर सत्यभामा ही अवश्य तें कृत्य करून' हे भारता, भर्त्याच्या आज्ञेनें आनंदानें अंतर्गृहांत शिरली. नंतर, अंतर्गृहांतून परत येऊन ती देवी कृष्णाच्याच आज्ञेनें त्या महामुनीला नमस्कार करून कृष्णाच्या बाजूला उभी राहिली. मग कांहीं वेळ विसांवा घेऊन नारद कृष्णाला म्हणाले, 'हे अधोक्षजा, आतां मीं तुझा निरोप घेऊन इंद्रलोकाला जातों. कारण, आज तेथें आदिदेव महेश्वर ईशान यास नमस्कार करून देव, गंधर्व, अप्सरागण गायन करणार आहेत. हे प्रभो, देवेंद्राच्या गृहांत देवदेवाच्या पूजेनिमित्त प्रतिमासीं असेंच नृत्य व गायन होतें आणि तें योग्यच आहे. त्यावेळीं आपले गणांसह व उमेसह तो देवाधिदेव शंकर आड राहून पर्वतच्छेद करणाऱ्या देवेंद्रानें भक्तिपूर्वक करविलेलें हें नृत्यगायन पहात असतो. हे महाद्युते, तुझें कल्याण असो. त्या महात्म्या तरुराज पारिजातांचें पुष्प मला द्यावें म्हणून मला काल स्वर्गांत आमंत्रण झालें होतें. तेथें मला मिळालेलें हें पुष्प मी स्वर्गांतून तुजसाठीं येथें घेऊन आलों. कारण, तरुश्रेष्ठापासून उत्पन्न झालेलें हें पुष्प देवांनींच भोगण्यास योग्य आहे. हे कमलनेत्रा, तो पारिजात इंद्राणीला सर्वदा इष्ट वाटतो. कारण, त्याच्या नित्य पूजनानें सौभाग्य प्राप्त होतें. पूर्वीं महात्मा धर्मनिष्ठ कश्यप यानें अदितीचें पुण्यक नांवाचें व्रत संपन्न व्हावें ह्मणून हा पारिजात महावृक्ष निर्माण केला. कारण, पूर्वीं एकदां अदितीनें तपोनिधि महातेजस्वी कश्यप याचा अपल्या कृतीनें संतोष केला असतां त्या

१ आचमन करितांना ओला झाला होता, तो न पुसतां.

मारीचानें तिला पाहिजे तो वर माग म्हणून सांगितलें. त्या वेळीं ती म्हणाली, "हे मुनिश्रेष्ठा, जेणेंकरून मी भाग्यवती होईन, माझ्या मनाप्रमाणें सर्व प्रकारच्या भूषणांनीं अलंकृत होईन व मला इष्ट तें नृत्यगीत प्राप्त होईल; आणि हे तपोनिधे, मी सर्वदा रजोरहित व शोकरहित अशी कुमारीच राहीन आणि पतिपरायण व धर्मशील होईन, असा वर मला द्या."

तें ऐकून अदितीचें प्रिय संपादण्याकरितां कश्यपानें हा पारिजात वृक्ष उत्पन्न केला. तो सर्वदा सुवास देणाऱ्या व सर्व इच्छित पुरविणाऱ्या अशा पुष्पांनीं सर्वदा भरलेला असे. त्याला सर्वदा तीन शाखा असत. तो प्राणिमात्रांचें मन हरण करणारा असून सर्वदाच दर्शनीय होता. कारण, त्या महावृक्षावर सर्वप्रकारचीं पुष्पें आढळत. त्या तीन शाखांपैकीं एका अति सुंदर शाखेवर हीं असल्या प्रकारचीं सुंदर पुष्पें येतात. दुसरीवर नाना जातींचीं व तिसरीवर केवळ कमळेंच लागतात. हा तरु कश्यपानें मंदारनामक कल्पवृक्षाचेंही सार काढून निर्माण केला असल्यामुळें सर्व वृक्षांत श्रेष्ठत्व पावला आहे. नंतर अदितीनें कश्यपाला त्या वृक्षाशीं बांधून त्यासकट तो वृक्ष स्वतःला पुण्य व सौभाग्य प्राप्त व्हावें ह्मणून मला दान दिला. अदितीनें पुण्यप्राप्त्यर्थ कश्यपाच्या कंठांत पुष्पमाला घालून मला त्याचें दान केलें. व कश्यप शहाणा असल्यामुळें त्यानें ती गोष्ट पतकरिली. मग मी अदितीपासून किंमत घेऊन तिचा कश्यप तिला परत दिला. याच रीतीनें इंद्राणीनेंही सौभाग्यप्राप्त्यर्थ आपला इंद्र मला दान दिला. तसेंच रोहिणीनें सोमाचें दान केलें व ऋद्धीनें कुबेराचें केलें. यावरून हा पारिजात वृक्ष स्त्रियांना सौभाग्य देणारा आहे यांत कांहीं संशय नाहीं. गंगानदीच्या 'पारा' वर म्हणजे 'परतीरावर' 'हा जात' म्हणजे 'उत्पन्न झाला' ह्मणून याला पारिजात असें नांव पडलें. हा मंदारें पुष्पांनीं युक्त असल्यानें याला मंदार असेंही म्हणतात. शिवाय, अज्ञानी लोक हा वृक्ष कोणता हें न ओळखल्यानें 'कोऽपि अयं दारुः' 'हा कोणता तरी वृक्ष आहे,' असें म्हणूं लागल्यामुळें त्याला कोविदार असें नांव पडलें. एवंच, ज्याचें हें मी उत्तम पुष्प आणलें आहे, तो दिव्य वृक्ष मंदार; पारिजात व कोविदार या तिन्ही नामांनीं प्रसिद्ध आहे.

१ कश्यप हा मरीचि ऋषीचा पुत्र होता.

~~~~~~~~

## अध्याय अडुसष्टावा.

—:०:—

### नारद-कृष्णसंवाद.

वैशंपायन सांगतातः—नंतर, नारद स्वर्गास जाणार हें ऐकून अप्रमेय पराक्रमी हरि त्यांना म्हणाला, 'हे निष्पापा, धर्म-तत्वज्ञा महर्षे, आपण स्वर्गास गेल्यावर त्रिपुरांतक जो धीमान् महादेव त्याचे सभासदांची प्रथम भेट घेऊन नंतर, माझें इंद्राशीं जुनें भाऊपण आहे तें आपणास माहीतच आहे, त्याची इंद्राला आठवण देऊन माझे सांगण्यावरून म्हणून त्यास पुढीलप्रमाणें विनंती करावी. मात्र ती विनंती आज्ञेच्या पद्धतीची असूं नये. विनंती अशी कीं, "पूर्वीं महाधार्मिक मुनि भगवान् कश्यप यांनीं अदितीचे सुखार्थ जो पारिजात वृक्ष उत्पन्न केला आहे तो पुण्य व अत्यंत सौभाग्य देतो. (असें कळतें) हे अमरोत्तमा, सदैव धर्मरत असणाऱ्या देवस्त्रियांनीं व्रत करून तुझ्या या श्रेष्ठ वृक्षाशीं तुला

१ या शब्दाची व्युत्पत्ति नीलकंठांनीं फार गमतीची केली आहे. तीप्रमाणें याचा भावार्थ 'वियोग नाहींसा करून दंपत्याचा संयोग करून देणारा.' असा होतो.
~~~~~~~~

बांधून धर्मप्राप्त्यर्थ तुजसह त्याचें दान (नारदांस) दिलें. हे प्रभो, ही दानाची गोष्ट ऐकून माझ्याही पत्न्या तसलेंच दान देऊं इच्छित आहेत. त्या दानानें दान, धर्म, पुण्य व माझें प्रेम इतकीं साधणार आहेत. याकरितां तो पारिजात महावृक्ष माझ्या या द्वारकानगरीस पोंचविण्याची तजवीज करावी. माझे पत्न्यांनीं त्याचें दान दिलें ह्मणजे पुनरपि तो आपण स्वर्गीं घेऊन जा." याप्रकारें त्या बलशत्रु इंद्राला माझी विनंती सांगून, हे महामुने, आपणही या कामीं असा झटून यत्न करावा कीं, तेणेंकरून तो सुरश्रेष्ठ मला हा वृक्ष देईल. 'हे तपोधना, या प्रकरणीं दूताची कामगिरी करण्याचा गुण आपणामध्यें उत्तम प्रकारें आहे, असें मला दिसतें आणि आपणच माझीं सर्व कार्यें पार पाडण्यास समर्थ आहां असें माझें मत आहे.'

याप्रकारें नारायणानें म्हटल्यावर भगवान् तपोधन नारदऋषि हंसून केशवाला म्हणाले, 'हे यदुश्रेष्ठा सुरोत्तमा, ठीक आहे. मी असा निरोप सांगेन. पण कांहीं केलें तरी इंद्र हा पारिजात वृक्ष देणार नाहीं. कारण, पूर्वीं देव आणि दानव यांनीं पर्वतश्रेष्ठ मंदर याला समुद्रांत (मंथनार्थ) घालून हा पारिजात बाहेर काढिला. शिवाय, हे जनार्दना, प्रत्यक्ष लोककर्त्या शंकरानें हा पारिजात आपले मंदरपर्वतावर आणून लावावा म्हणून तो नेण्यासाठीं (इंद्राकडे) आपला दूत पाठविला होता. त्या वेळीं इंद्रानें अंगीं जाऊन शंकराला विज्ञप्ति केली कीं, हा पारिजात वृक्ष शचीचा क्रीडाद्रुम म्हणून तिच्याच उद्यानांत रहावा अशी माझी याचना आहे. तेव्हां, हे अनघा, महादेवांनीं 'बरें आहे राहूं दे' असा वर दिला. आणि तो पारिजात, ज्याच्यांत विचित्र गुहा आहेत, अशा मंदरपर्वतावर नेला नाहीं. सारांश, हे महाबाहो, हा पारिजात शचीचा क्रीडावृक्ष आहे. या सबबीवर इंद्रानें पूर्वीं महादेवापासून सोडविला. मग शंकरानें आपल्या उमेच्या हौसेकरितां त्या मंदरपर्वताच्या दरींतच दोनशें कोश विस्तीर्ण असें पारिजात—वन निर्माण केलें. हे कृष्णा, तेथें त्या पर्वतश्रेष्ठावर सूर्यप्रकाशाचा प्रवेश नाहीं, चंद्राची शीतल प्रभाही पोंचत नाहीं, किंवा वायूलाही शिरकाव नाहीं. कारण, त्या वनांतील हवामान उमेच्या इच्छेप्रमाणें थंड किंवा उष्ण रहात असतें. तेथें महादेवाच्या तेजाचा स्वयंभू प्रकाशच असतो (चंद्रसूर्यांची अपेक्षा नाहीं). हे यदुवर्धना, त्या दिव्य वनांत गणांसहित शंकर आणि मी (नारद) यांशिवाय अन्य कोणाचा कसाही प्रवेश होत नाहीं. हे वार्ष्णेया, त्या वनांत आपले मनास वाटतील तशीं सर्व प्रकारचीं उत्तम उत्तम रत्नें, तेथील पारिजात वृक्ष सभोंवार ढाळीत असतात. व हे केशवा, देवाधिदेव लोकनाथ शंकर याच्या आज्ञेनें त्या रत्नांचा उपभोग शंकराचे प्रमुख गण घेत असतात. या प्रकारें इंद्राचे पारिजाताहून या शंकरनिर्मित पारिजाताचें फल तसेंच बनही बहुगुणित असून त्याचें 'अभिमान' ह्मणजे गराडा किंवा परीघ व प्रभाही त्या पारिजाताहून अनेकपट आहे व गुण तर बहुगुणितच आहेत. हे केशवा, तेथील ते मूर्तिमंत वृक्ष उमेसहित असणारा जो वृषभध्वज शंकर त्याची त्या प्रथमगणांसह स्वतः उपासना करितात. मंदरावरील या वृक्षांवर पार्वतीची कृपा असल्यामुळें ते शंकराच्या तेजानें संतुष्ट असून व्याधिरहित व सुखयुक्त असतात. एकदां या वृक्षांच्या वनांत वरदानानें गर्वित झालेला असा अंधक नांवाचा एक मोठा बलाढ्य, घोर व पापबुद्धि दैत्य शिरला. तो वृत्रासुराहून दसपट बळकट असून कोणाचेही हातून

मारला जात नव्हता. तथापि, शत्रुमर्दन शंकरानें त्याला मारिलें. एवंच, ( पारिजाताचें इतकें महत्व असल्यामुळें ) हे कमलनेत्रा देवा, तो सहस्राक्ष इंद्र तुला पारिजात मोठ्या कष्टानेंच देईल. हें मी तुला खास सांगतों. त्या सर्व कामना पूर्ण करणाऱ्या महावृक्षाची अमिततेजस्वी इंद्र व शचि हीं उभयता सतत पूजा करीत असतात.

कृष्ण म्हणतोः—हे मुने, महादेव खराच शहाणा. त्यानें शचीची सबब ऐकल्यावर आपलेकडे तो पारिजात नेला नाहीं हें ठीकच केलें. कारण, शंकर हा सर्व भूतांचा ज्येष्ठ असून लोककर्ता व जगताचा शाश्वत उद्गम आहे. तेव्हां त्यानें जें वर्तन केलें तें लोकमर्यादेस उचित केलें असा माझा समज आहे. पण माझी गोष्ट वेगळी आहे. कारण, बलशत्रु जो इंद्र त्याचा मी सर्वथा धाकटा भाऊ असल्यानें त्यानें स्वतःचा पुत्र जो जयंत त्याच्या प्रमाणेंच माझे लाड पुरवावेत, हें न्याय्य आहे. म्हणून, हे तपोधना, आपण नाना प्रकारचे दीर्घ यत्न करून मजप्रीत्यर्थ एवढें करा. आपण या कामीं समर्थ आहां. हे समर्था मुने, तुझ्या पुण्यकव्रतासाठीं मीं तुला स्वर्गाहून पारिजात वृक्ष आणून देईन अशी सत्यभामेशीं प्रतिज्ञा केली आहे. हे तपोधना, ती प्रतिज्ञा मला मिथ्या कशी करितां येईल? हे निष्पापा विप्रा, मी आजपर्यंत कधींही मिथ्या भाषण केलें नाहीं. कारण, मींच प्रतिज्ञाभंग सोसूं लागलों तर लोकांतीलही सत्य बुडून जाईल. आणि हे मुनिश्रेष्ठा, गुणयुक्त सर्व लोकधर्म मर्यादेंत राखणें माझेंच कर्तव्य असल्यामुळें, मी अनृत बोलून कसें चालेल? हे मुने, आपलें बरें असो; मी आपणांस सांगतों कीं, माझी प्रतिज्ञा हाणून पाडण्यास देव, गंधर्वगण, राक्षस, असुर, यक्ष किंवा पन्नग यांपैकीं कोणीही समर्थ नाहीं. तुम्ही मजसाठीं याचना करूनही तो अमरपति जर पारिजात न देईल तर शचीनें उटी लाविलेल्या त्या पुरंदराच्या वक्षःस्थळावर मी माझी गदा मारीन; असें आपण तो बऱ्या बोलानें याचना करूनही वृक्ष न देईल तर त्याला सांगावें. व मग मी अंगींच तेथें ( वृक्षप्राप्त्यर्थ) खचीत येणार असा माझा निश्चय तेथें आपण कळवून ठेवावा.

## अध्याय एकुणसत्तरावा.

—:०:—

### इंद्राचा कृष्णास परत निरोप.

वैशंपायन सांगतातः—कृष्णानें असा निरोप सांगितल्यावर नारदमुनि महेंद्राच्या सदनांत जाऊन तेथील महोत्सव पहात ती रात्र तेथेंच राहिले. त्या उत्सवार्थ तेथें महात्मे आदित्य, देवश्रेष्ठ वसु, स्वतःच्या पुण्यकर्मांनीं स्वर्गास पोंचलेले विद्वान् राजर्षि, नाग, यक्ष, सिद्ध, चारण, शेंकडों तपोधन महर्षि, देवर्षि, मनु, महात्मे सुपर्ण, महाबल मरुत व इतर स्वर्गवासी देवांचे शेंकडों समुदाय जमले होते. त्या सर्व मंडळीच्या फारच वर आपले गणांनीं परिवृत झालेला अमित पराक्रमी देव महेश्वर उमेसह बसला होता. त्या सर्वकारण देवाभोंवतीं मुनिश्रेष्ठ देवर्षिही बसले होते. त्या देवर्षींना कल्पसहस्रांतींही क्षय नसून इंद्रतुल्य देवही त्यांची

१ या ठिकाणीं ' महितः ' असा दोन पुस्तकांचा पाठ असल्यानें तो धरिला आहे. तथापि, लेखी पोथीवर ' सहितः' असा पाठ असून त्याचा अर्थ ' इष्टसुख देणारा ' असा नीलकंठांनीं केला आहे. तोही पाठ आदरणीय आहे.

सर्वदा पूजा करितात व ते आत्मज्ञानी, सत्यप्रतिज्ञ व धर्ममार्गीं स्थिर असतात. हे भारता, त्याचप्रमाणें रुद्र, काश्यप, त्याचप्रमाणें कार्तिकस्वामी, भगवान् अग्नि, सरिच्छ्रेष्ठ गंगा, अर्चिष्मान्, तुंबरु, वक्तृश्रेष्ठ भारिनामक गंधर्व, जे सर्व तपोनिष्ठ असून देवदेवांचेही मार्गदर्शी आहेत ते तसेच, हे नृपा, सर्व देवगणही ज्याचें अनुसरण करितात, जे धर्मनित्य, तपोनित्य व सन्मार्गानें जाणारे व शुभार्थी मनुष्य ज्याप्रमाणें देवांची पूजा करितात, त्याप्रमाणें शुभेच्छु देव ज्यांची पूजा करितात, जे देवपितृकार्यांत असून जे सन्यासाचें अनुष्ठान करितात व जे स्वाध्यायनिरत असून सर्वदा नियमानें चालतात, असे ते सर्व शंकरांच्या भोंवतीं जमले होते. त्या प्रसंगीं गंधर्वाधिपति श्रीमान् चित्ररथ हा तेथें आपल्या पुत्रांसहवर्तमान् येऊन आनंदानें वाद्यें वाजवीत होता. या शिवाय, ऊर्णायु, चित्रसेन, हाहा, हूहू, डुंबर व तुंबुरु, हे स्निग्ध, मधुर, सस्मित इत्यादि सहा प्रकारचें गायन गात होते. त्याचप्रमाणें हे भारता, उर्वशी, विप्रचित्ति, हेमा, हेमदंता, घृताची व सहजन्याप्रभृति अप्सरा नृत्यादि परिचर्या करीत होत्या. त्या परिचर्येचें आत्मज्ञ शंकरानें प्रीतिपूर्वक ग्रहण केलें. आणि इंद्रानें त्या दिवशीं केलेल्या वर्तनानें संतुष्ट होऊन तो जगद्गति देव स्वस्थानीं गेला. तो भूतपति गेल्यावर इतरही सर्व राजे व देव इंद्राचा सत्कार घेऊन आल्याप्रमाणें आपआपल्या जागीं गेले.

याप्रकारें सर्व मंडळी गेल्यावर देवेंद्र आपले सभासदांसह सुखांत बसला असतां नारदमुनि त्या सान्निध गेले. इंद्रानें त्यांना अभ्युत्थान देऊन त्या तपोधनाचा सत्कार केला. व आपले आसनासारखेंच एक दर्भयुक्त आसन त्यांना देवविलें. नंतर महातेजस्वी नारद त्या इंद्राला म्हणाले कीं, "हे देवश्रेष्ठा, मी अतुलतेजस्वी विष्णूचा दूत म्हणून आलों आहें. त्या महात्म्यानें मला आज आपली कांहीं कामगिरी पुढें करून आनर्त देशाहून तुजकडे पाठविलें आहे. ही कामगिरी साधल्यास त्या निर्मल तेजस्वी कृष्णाची पीडा दूर होणार आहे." हें नारदांचें वाक्य ऐकून भगवान् इंद्र आनंदित होऊन व मुनीला हृदयंगम अशीं प्रीतिवचनें बोलून म्हणाला कीं, हे मुने, आज कृष्णाला माझी बहुतांदिवशीं आठवण झाली म्हणावयाची. याकरितां त्या पुरुषश्रेष्ठानें काय सांगितलें आहे, तें मला सत्वर कथन करा.

नारद म्हणाले:—हे महेंद्रा, तुझा भ्राता, जो आपणाला इंद्रानुज म्हणवितो व ज्यानें कश्यपवंशाची कीर्ति वाढविली आहे, त्या कृष्णाला भेटण्यासाठीं मी कसाबसा द्वारकेस गेलों. परंतु, त्या वेळीं तो शत्रुमर्दक वीर शंकराची स्तुति करीत रुक्मिणीसहित रैवतकपर्वतीं बसलेला मला आढळला. नंतर, त्या महातेजस्वी कृष्णाच्या स्त्रियांना नवल वाटावें म्हणून, हे निष्पापा, मी पारिजात तरूचें पुष्प त्याला दिलें. तें अनेक इच्छा पुरविणारें वृक्षराजाचें पुष्प पाहून कृष्णस्त्रियांना फारच आश्चर्य वाटलें. हे मानदा, मीं त्यांना या पारिजाताच्या पुष्पाचे गुण सांगून त्या वृक्षाची उत्पत्ति महात्म्या कश्यपानें केली हेंही सांगितलें. शिवाय, अदितीनें पुण्यक व्रतासाठीं आत्मज्ञानी

---

१ या ठिकाणीं लेखी पोथीचा पाठ 'आत्मज्ञानावलेपान्धाः' असा आहे. व त्यांतील 'ज्ञानावलेपान्धाः' या पदावर 'गर्वहीनाः' अशी नीलकंठांची टीप आहे. परंतु, ती असमंजस आहे. यापेक्षां 'आत्मज्ञाः' व 'नावलेपान्धाः' (म्हणजे 'आत्मज्ञानी व गर्वानें आंधळे' नव्हत असे ) असा अर्थ करणें आम्हांस प्रशस्त दिसतें. आम्हीं स्वीकारलेला पाठ 'आत्मज्ञाः सत्यसंधाश्च' हा कलकत्ता प्रतींतील आहे.

कश्यपाला गळ्यांत माळ घालून या वृक्षासह मला दान दिलें व शचीनें तुझें दान याच रीतीनें केलें; त्याचप्रमाणें अन्यदेवांचेंही त्यांचे ( स्त्रियांनीं ) दान केलें आणि मग कश्यपादि महर्षींनीं मला मोबदला द्रव्य देऊन आपणास सोडवून घेतलें, या सर्व गोष्टी हे सुरेश्वरा, मीं त्या स्त्रियांना सांगितल्या. तें ऐकून तुझ्या धाकट्या भावाची सत्यभामा नांवानें प्रख्यात एक लाडकी स्त्री आहे तिचे मनांत आपणही पुण्यक व्रत करावें असें आलें. मग त्या कामीं तिनें आपले भर्त्याची प्रार्थना केली. आणि हे मानदा, तुझ्या धाकट्या भावानें धर्माकरितां तिची प्रार्थना पुरी करण्याची प्रतिज्ञा केली. व बलिश्रेष्ठ वीर विष्णु मला जें कांहीं ह्मणाला तें मी जसेंच्या तसेंच सांगतों. तें हे सुरश्रेष्ठा, तूं ऐक. अच्युत तुला प्रणिपात करून म्हणालाः—धाकट्या भावाचे आपण लाड पुरविले पाहिजेत. व यासाठीं वृक्षश्रेष्ठ पारिजात मी इकडे आणणार आहें. हे असुरमर्दना, या योगानें तुझ्या भावजयीचा हेतु पूर्ण व्हावा आणि विशेषतः तुझें भावजयीनें योजलेलें हें कृत्य, धर्मकृत्य आहे यास्तव तिचा हेतु पूर्ण करावा. हे लोकनायका, या मृत्युलोकांत असल्या कल्याणकारक वस्तूंची वाण आहे, तेव्हां माझ्या बलानें या मनुष्यांना ही देवलोकांतील कल्याणकारक वस्तु पहावयास मिळो अशी माझी मनीषा आहे."

वैशंपायन सांगतातः—हे कुरुनंदना, श्रीकृष्णाचा तो निरोप ऐकून महेंद्र त्या वक्तृश्रेष्ठ नारदास म्हणाला. ' हे द्विजश्रेष्ठा, आपलें बोलणें मी ऐकलें. आपण अगोदर आसनावर बसावें. मग मीं परमतेजस्वी कृष्णाला उलट निरोप काय तो सांगतों. या विनंतीवरून नारदांनीं आसनपरिग्रह केला. नंतर, हे राजा, त्यांची आज्ञा मिळाल्यावर इंद्रही आपले योग्यतेला अनुरूप अशा श्रेष्ठ आसनावर बसला. नंतर तो वृत्रशत्रु देवेंद्र आपलें स्वतःचें बल व वीर्य ध्यानांत आणून आणि आपले पार्षदांकडे पाहून त्या तपोधनाला म्हणाला, ' हे धर्मज्ञ महर्षे, भूतमात्राला सुख देणारा जो जनार्दन त्याला प्रथम कुशल प्रश्न करून मग आपण म्हणावें कीं, माझे पश्चात् तूंच ( उपेंद्र असल्यानें ) जगताचा स्वामी होणार हें निःसंशयच आहे. आणि हे अच्युता, त्या वेळीं पारिजात व इतर सर्व रत्नें अनायासेंच तुझीं होतील. हे देवा, तूं पृथ्वीचें भारावतरण करण्यासाठीं म्हणून भूतलीं गेलास व ती कार्यसिद्धि व्हावी ह्मणून तूं सर्व कामांत मनुष्यांची रीति स्वीकारून राहिला आहेस. तेव्हां तूं केलेली ( भूभारहरणाची ) प्रतिज्ञा पुरी करून परत स्वर्गास आलास म्हणजे, हे अधोक्षजा, तुझे स्त्रीचे इष्ट हेतु मी पुरवीन. हे अच्युता, असल्या शुष्क कारणास्तव स्वर्गांतील रत्नें तूं मनुष्यलोकीं नेणें उचित नाहीं. कारण, पूर्वीच्यांनीं अशी मर्यादाच घातली आहे. हे समर्था महाबला, ही मर्यादा उल्लंघून जर मी वागलों तर मला हे प्रजापति काय म्हणतील बरें ? महात्म्या ब्रह्मदेवानें स्वतःचे पुत्र व पौत्र यांचे संमतीनें जगतांतील सर्व कृत्यांचे शाश्वत ( अलंघ्य ) असे नियम घालून ठेविले आहेत. आणि प्रजापतीनें आंखलेला मार्ग सोडून मी चाललों असें जर चतुर व समर्थ अशा प्रजापतीचे कानावर गेलें तर तो मला शापही देईल. आम्हीच जर नियमरूप सेतुबंधनाचा भेद केला तर मग दैत्य व दैत्यानुयायी दुसरे लोकही अर्थातच तसें करतील. आणि हे मानदा,

१ यावरून नारदांनीं श्रीकृष्णाचा निरोप जातांच बसण्यापूर्वीच सांगितला असें वाटतें.

स्त्रीचे निमित्तानें त्वां येथून हा पारिजात वृक्षश्रेष्ठ मृत्युलोकीं नेल्यास स्वर्गवासी लोक हिरमुष्टि होतील. कालाचे गतीकडे दृष्टि देऊन माझे भावानें, स्वयंभूमनूनें मनुष्यांचे ह्मणून जे उपभोग निर्माण केले आहेत त्यांतच संतुष्ट असावें. हे ताता, ह्या स्वर्गलोकीं जी कोणती माझी म्हणून वस्तु आहे तिचा उपभोग कृष्णानें येथें स्वर्गांत येऊन खुशाल घ्यावा. ह्या जनार्दनाला मांसाचे पदार्थ खाऊन फुरफुरी आली आहे व यामुळें धर्म सोडून तो पापाचरण करूं लागलासें दिसतें. मला तर वाटतें कीं, कृष्णासारखा महात्मा बाईलबुद्ध्या आहे असें स्थापित होणें म्हणजे लोकांत त्याचा मोठाच दुर्लौकिक होईल. हे नारदा, ज्या अर्थीं या मधुसूदनानें मनुष्यलोकीं जाऊन मनुष्यत्व स्वीकारिलें आहे, त्या अर्थीं त्याचा वडील भाऊ जो मी त्या माझा निर्बंध त्यानें ऐकलाच पाहिजे. ( पारिजातासारखें ) स्वर्गीय रत्न हिसकून नेल्यास माझा मोठाच उपमर्द होणार आहे. स्वजातीचे हातून झालेला उपमर्द फारच निंद्य समजला जातो. मधुसूदनानें धर्म, अर्थ व काम हे यथाक्रम ठेवावे. कारण, ब्रह्मदेवानें भल्यांना असाच मार्ग लावून दिला आहे. मीं जर हा पारिजात भूलोकीं पाठविला तर शचिप्रभृति मला कोणीच मान देणार नाहींत. मनुष्यांना हा पारिजात भूलोकीं दिसला आणि त्याला त्यांनीं स्पर्शही केला म्हणजे स्वर्गलोकाचें फल आपल्या भूलोकींच आलें असें पाहून ते मग स्वर्गासाठीं खटपटच करणार नाहींत. हे नारदा, मृत्युलोकचे प्राणी पारिजाताचें सेवन करूं लागले तर मग देव आणि मनुष्य यांच्यांत अंतरच उरलें नाहीं. ( रीत म्हटली म्हणजे ) भूलोकीं जें कर्म करावें त्याचें फल या स्वर्गलोकीं भोगावें. पण मनुष्यांना पारिजाताचे गुण ( भूलोकींच ) भोगण्यास प्राप्त झाले म्हणजे ते स्वर्गप्राप्त्यर्थ यत्नच काणार नाहींत. हे तपोधना, हा पारिजात म्हणजे स्वर्गांतील निखिल रत्नांत श्रेष्ठ आहे. हा जर मर्त्यांना भोगावयास मिळाला तर मग सर्व एकच गोलंकार झाला म्हणावयाचा. भूमीवरच स्वर्गफल मिळूं लागलें म्हणजे मनुष्य यज्ञादिकांनीं आमचें यजन करणार नाहींत. आणि त्यांना भूलोकींच देवांची बरोबरी करण्यास मिळाल्यामुळें पूर्तादि कर्में करणार नाहींत. हे तपोधना, सांप्रत मनुष्यांस स्वर्गाची इच्छा असल्यामुळें ते श्रद्धापूर्वक यत्न, जपजाप्य, आन्हिककृत्यें वगैरे करून आम्हांस नित्य संतुष्ट करीत असतात. परंतु पारिजाताचे गुण त्यांना लब्ध झाले म्हणजे हें कांहीं ते करणार नाहींत. आणि या गोष्टी आम्हांला कमी पडल्या म्हणजे आम्हीं अर्थात्‌च निस्तेज होऊं. सध्या येथून मनुष्यांकरितां भूलोकीं सुंदर वृष्टि होते व तिनें धान्य उत्पन्न होऊन मनुष्यांचें जीवन होतें. आणि मग तेही आह्मांस ( परत ) दानें व यज्ञ यांनीं तृप्त करितात. परंतु, हे धर्मज्ञा, ( पारिजातप्राप्तीनें ) जर मर्त्यांना क्षुधा, तृषा, रोग, जरा, मृत्यु, कामेच्छा, दुर्गंध व कर्मापासून उद्भवणाऱ्या ईति[2] बाधत नाहींतशा झाल्या तर ते काय म्हणून उद्योग करितील ? एवंच, पारिजात भूलोकीं नेणें कोण-

---

१ कलकत्ता पाठ याचे उलट आहे. त्याचा अर्थः—माझी म्हणून जी वस्तु आहे तिचा उपभोग कृष्णानें स्वर्गांत देखील घेणें उचित नाहीं असा आहे.

१मनुष्याला 'इष्ट' आणि 'पूर्त' अशीं दोन कर्में सांगितलीं आहेत. त्यांत 'इष्ट' म्हणजे 'अग्निहोत्रं तपः सत्यं वेदानांचैव पालनं। आतिथ्यं वैश्वदेवश्च इष्टमित्यभिधीयते॥' असें अत्रिऋषींचें वचन आहे व 'पूर्त' म्हणजे 'वापीकूपतडागादि देवतायतनानिच। अन्नप्रदानमारामः पूर्तमित्यभिधीयते॥' असें मनूचें वचन आहे.

२अतिवृष्टिरनावृष्टिः शलभा मूषकाः शुकाः। प्रत्यासन्नाश्च राजानः षडेते ईतयः स्मृताः॥ मनुस्मृति

त्याही दृष्टीनें शक्य नाहीं." असें, हे द्विजश्रेष्ठा, आपण त्या निर्मळ आचरणाच्या विष्णूला सांगावें. हे मनुष्यश्रेष्ठा, माझें प्रेम आपणावर रहावें अशी इच्छा असेल तर ही गोष्ट माझा बंधु जेणेंकरून खुषी राहील अशा खुबीनेंच आपण त्याला सांगावी. त्याचे स्त्रियांकरितां आपण येथून हार, मणि, रत्नें, चंदन, अगरु व विचित्र वस्त्रें इत्यादि वस्तु द्वारकेस न्याव्या. ( मी त्या देतों ) इतकेंच नव्हे; परंतु, मनुष्यांस योग्य अशा इतरही ज्या कांहीं वस्तु केशवास वाटतील त्या त्यानें येथून न्याव्या. ( माझी मना नाहीं. ) परंतु, पारिजात नेऊन स्वर्गाला नागविणें हें केशवास योग्य नाहीं. हे मुने, मी केशवाची इच्छा असेल तितकीं रत्नें व अनेक विचित्र भूषणेंही देईन. परंतु, सर्व स्वर्गवासी यांचा आवडता जो पारिजात वृक्ष तो मात्र कांहीं केल्या देणार नाहीं.

## अध्याय सत्तरावा.

—:०:—

### नारदाचा इंद्राशीं बुद्धिवाद.

वैशंपायन सांगतात:—हे कुरुनंदना, इंद्राचें हें बोलणें ऐकून धर्मज्ञांत श्रेष्ठ असा महात्मा नारद ह्मणाला, हे महाबाहो इंद्रा, तूं मला फार मान्य आहेस आणि यासाठीं तुझें हिताचें जें कांहीं असेल तें मी अवश्य बोलेन. तें माझें काम. तुझा अभिप्राय मला अवगत असल्यामुळें मी प्रथमच कृष्णाला सांगितलें कीं, प्रत्यक्ष शंकराला देखील इंद्रानें पूर्वीं हा पारिजात दिला नाहीं. आणि असें करण्याला कारणें काय होतीं, तींही मीं त्याला थोडक्यांत दाखविलीं. परंतु मी तुला सत्य सांगतों कीं, त्याची समजूत झाली नाहीं. माझे शब्दावर तो कमलनेत्र तत्काल असें ह्मणाला कीं, मी जर उपेंद्र आहें तर त्या महेंद्रानें माझे लाड पुरविलेच पाहिजेत. हे वृत्रशत्रो, मी पुनःपुनः तुला पारिजात देतां कां येणार नाहीं, याचीं कारणें दाखविलीं परंतु त्याची बुद्धि मिळून फिरेना. हे वासवा, इतकेंच नव्हे तर माझे भाषणाचे शेवटीं तो मधुसूदन रागावल्यासारखा होऊन उपहासानें मला ह्मणाला, 'हे मुने, तुझें कल्याण असो; माझी प्रतिज्ञा हाणून पाडण्यास देव, गंधर्व, गण, राक्षस, असुर किंवा श्रेष्ठ पन्नगही समर्थ नाहींत. तूं मजपक्षीं याचना करूनही अमरेश्वर जर पारिजात देणार नाहीं तर शचीनें उटी लावलेल्या त्या पुरंदराच्या वक्षःस्थळावर मी ही गदा मारीन. हे महेंद्रा, अशा प्रकारचा तुझे भावाचा निश्चय आहे. तर अशा स्थितींत कसें वागणें योग्य आहे याचा नीट विचार करून तसें कर. हे देवेशा, माझे मुखांतून या कामीं तत्त्वाची व हिताची गोष्ट ऐक. 'पारिजात द्वारकेस नेऊं द्यावा हें मला रुचतें.'

नारदांनीं असें ह्मणतांच उघड उघड बलाचे देहाचा भेद करणारा सहस्राक्ष देवेंद्र रोषाविष्ट होऊन ह्मणाला, हे तपोधन, मी वडील बंधु व त्यांतून निरपराध असतांही केशव जर मजपाशीं अशा प्रकारचें आचरण करूं लागला, तर मग काय करावें? हे अनघा नारदा, आजपर्यंत मला प्रतिकूल अशा कितितरी गोष्टी कृष्णानें केल्या. तथापि, तो माझा भाऊ ही गोष्ट ध्यानांत आणूनच मीं त्या सहन केल्या. पूर्वीं खांडव वनांत माझे मेघ अद्भुत अग्नीचें शमन करीत असतां यानें अर्जुनाचा रथ वाहतां वाहतां माझ्या मेघांचें निवारण केलें. तसेंच यानें गोवर्धन पर्वत उचलून माझें अप्रिय केलें. त्याचप्रमाणें वृत्रवधाचे समयीं मी याला आपले साह्यार्थ म्हणून बोलाविला त्या वेळीं 'मी सर्व भूतांशीं सारखाच आहें' ( म्हणून तुझीच बाजू धरण्याचें मला कारण नाहीं असा बहाणा यानें मला सांगितला व

अखेर) मीच आपल्या बाहुबलाच्या आश्रयानें वृत्रासुर मारिला. शिवाय देव व असुर यांमध्यें जेव्हां जेव्हां संग्राम उपस्थित होतो तेव्हां तेव्हां लहर लागेल तसा हा लढत असतो, हें तर हे मुने, आपणास पुरेंच माहीत आहे. या कामीं फार बोलून काय फल? प्रारब्धानें होणें असेल तें होऊं द्या. बाकी माझे मनांतून बंधुकलह करावा असें नाहीं. याला, हे नारदा, आपणच साक्षी असा; मी म्हणतों, हा केशव माझे छातीवर जर गदा घालण्यास तयार झाला असला तर त्या बोलण्यांत शचीचें नांव घेण्यांत त्याला काय फायदा वाटला बरें? (बायकांचे वाटेस जाणें हा कोणता पुरुषार्थ?) आमचे बुद्धिमान् पिता कश्यपऋषि हे आमची माता अदिति तीसह स्वधामास गेले. पण कृष्णाचें हें करणें त्यांचे दूषणाला कारण होणार आहे. माझ्या या भावाचें मन स्वाधीन नसून रज व तम यांनीं व्याप्त असल्यामुळें तो केवळ कामवश होऊन बायकोचे सांगण्यावरून मला वडील भावाला असें बोलला. (हें उघड आहे.) हे ब्राह्मणा, मजसारख्याला हा जर बायल्या विष्णु असा दोष देत आहे, तर मी म्हणतों कीं, त्या स्त्रियेला, त्या त्याच्या रजाला व तमालाही सर्वथा धिःकार असो; हे महामुने, कृष्णानें इकडे दृष्टि दिली नाहीं कीं, ज्येष्ठ भ्रातृविरोध करण्यानें काश्यपकुल व माझी माता ज्यांत जन्मली तें दक्षकुल या उभयकुलांसही दूषण प्राप्त होईल. हे नारदा, कृष्णानें विषयवासना व स्त्रीप्रेम यांचे अमलांत माझें वडीलपण किंवा देवेंद्रत्व यांपैकीं कशालाच मान दिला नाहीं. हे निष्पापा, पूर्वीं ब्रह्मदेवानें असें म्हटलें आहे कीं, सहस्रावधि पुत्र व स्त्रिया यांहीपेक्षां सद्वृत्त व ज्ञानी बंधूची योग्यता अधिक आहे. माझी माता (अदिति) व पिता कश्यपप्रजापति यांनींही मला सांगितलें आहे कीं, इतर सारे जेवते गण आहेत. सख्या भावासारखा खरा जिवलग दुसरा कोणी नाहीं. माझा पिता कश्यप यानें एका उदरांतून आलेल्या (सख्या) बंधूविषयीं विशेषच सांगितलें आहे. बाकी (माझे सावत्र बंधु) दैत्य हे तरी अति गर्विष्ठ होऊन पापनिश्चयी निघाले, म्हणूनच मी त्यांचे उलट चालतों. (एरवीं ते बंधु समजून मला प्रियच आहेत.) ही गोष्ट खरी कीं, आत्मस्तुतियुक्त भाषण करूं नये. परंतु हे द्विजा, गोष्ट केवळ ओघाला आली म्हणूनच मी बोलतों. ती अशी. हे निष्पापा, महामते, पूर्वीं देवांचेवर सामर्थ्यामुळें धनुर्धारी असुरांनीं या विष्णूचे धनुष्याची दोरी जेव्हां छेदून टाकिली आणि रुद्राचे तेजानें याचें जेव्हां शिर तुटलें, तेव्हां (रणांत) याचें शरीर मी सांवरून धरून तुटलेलें मुंडकें मोठ्या यत्नानें त्या शरीराला पूर्ववत् जडविलें तरी पण, हे नारदा, पुनः हा कृष्ण 'मीच काय तो देवांतला दुढ्ढाचार्य' असें आपणांस म्हणवून मोठ्या गर्वानें धनुष्याला दोरी चढवून उभा राहिला! हे मुनिश्रेष्ठा, अशाचें मीं जें (रणांत) शरीर संभाळून धरिलें त्याचा हेतु काय कीं, मातापित्यांनीं मला नांवें ठेवूं नये. (एरवीं याची ही पात्रता नव्हे.) याशिवाय मी माझा व विष्णूचा असे दोन्हीही यज्ञीय भाग या एकट्यालाच दिले. सारांश, हे नारदा, हा माझा धाकटा भाऊ म्हणून माझी याकडे सदा सप्रेम दृष्टि असते. हे तपोधना, खरें पाहतां संग्रामांत यानें प्रथम प्रहार चालू करावा. कारण, मी राजा आहें. तरीपण (याचेसाठीं) मीच आधीं प्रहारास आरंभ करितों. कोणतीही भानगड उभी राहिली असतां, हे अनघा, धर्मज्ञा, मी भक्तियुक्त कृष्णाचे शरीराचें स्वशरीरा-

प्रमाणें रक्षण करितों. हे मुने, फार काय सांगूं, पण हें माझें भवन मोडून नेऊन या विष्णूनें ( त्या सामग्रीनें ) स्वतःचें माझ्यावर चढ असें भवन सर्व लोकांचे शिरोभागीं उभें केलें. परंतु, हे मुने, तोही अपमान मीं पाठीमागें टाकला. कारण इतकेंच कीं, हा आपला भाऊ; हा लहान आहे. करितां, याचे लाड करणें आपलें कर्तव्यच आहे असें मीं मानिलें. हे नारदा, या मानी गोविंदाला, हा बाल आहे, माझा (आपला) पुत्र[1] आहे, हा इंद्राहून धाकटा आहे असें म्हणून आमचे मातापिता हीं फारशीं कधीं बोललीं नाहींत. त्यांतले त्यांत हा केशव आईचा तर विशेषच लाडका. कारण, तिचें त्याजवर प्रेमच अतिरिक्त आहे. आणि आह्मी आपले नावडते,हें उघडच आहे.केशव हा सर्वज्ञ, बलवान्, शूर, योग्यांना मान देणारा इत्यादि जें कांहीं आम्हीं मनांत समजत होतों तें आज व्यर्थ गेलें. याकरितां, हे नारदा, आपण जाऊन केशवाला माझा निरोप सांगावा कीं, शत्रूंनीं मला युद्धार्थ आमंत्रणच दिलें तर मी कांहीं मागें घेणार नाहीं. याकरितां तुझी इच्छा असेल तर युद्धार्थ ये. तुझे मनांत असेल तें मला सहन केलेंच पाहिजे. आणि हे स्त्रीजिता, तुझी इच्छा असेल, तर तूंच प्रथम मजवर प्रहार कर. हे जनार्दना, गरुडावर स्वार होऊन आणि नीट बळकटी करून रथाचें चाक, शार्ङ्ग धनुष्य, गदा, नंदक खड्ग यांहीं मजवर प्रहार कर. हे केशवा, तूं प्रहार केल्यावर मग मी प्रहार करीन; मात्र या दुष्ट भ्रातृप्रेमानें मला त्या वेळीं विकळ न करावें. हे मुनिसत्तमा, जोंपर्यंत चक्रपाणी रथांत उभा राहून मला जिंकणार नाहीं, तोंपर्यंत मी पारिजात देणार नाहीं. हे तपोधन, तो धाकटा होऊन मला वडिलाला जर युद्धार्थ बोलावितो, तर असल्या त्या बाईलबुद्धचा कृष्णाची मी तरी गय काय म्हणून करावी? हे भगवन्, तपोधना, कृष्णानें रक्षिलेल्या द्वारकेस आजच आपण जावें व तंटचावर आलेल्या त्या अच्युताला स्मरणपूर्वक माझें असें म्हणणें सांगावें कीं, 'तूं त्याला युद्धांत जिंकल्याशिवाय इंद्र तुला पारिजाताचें अर्धुक देखील देणार नाहीं.' हे भगवन्, माझे कल्याणासाठीं याउपर अच्युताला आपण असेंही निशंक सांगावें कीं, हा वृक्ष नेशील तर राजरोस युद्ध करूनच ने. मायावीपणानें, कपटानें असा मात्र नेऊं नको. कारण, असल्या कुटिलपणाला मी तुच्छ मानितों.

## अध्याय एकाहत्तरावा.

—:०:—

### नारद स्वर्गाहून परत कृष्णाकडे येतात.

वैशंपायन सांगतातः—महेंद्राचें हें वचन ऐकून श्रेष्ठवक्ता नारद एकांतांत त्या देवराजाला म्हणालाः—"ही गोष्ट खरी कीं राजे लोकांशीं नेहमीं गोड बोलत असावें. तथापि, हे अच्युता, तसाच समय आल्यास हिताचें असून तें अप्रिय असलें तरीही बोलावें. (अशी नीति आहे. ) शहाण्यांचें असें म्हणणें आहे कीं, कोणीं आपणास योजिल्याशिवाय पुढाकार घेऊं नये आणि असा चालेल तोच व्यवहाराचें रहस्य जाणतो असें नीतिनिपुणांचें मत आहे. तथापि, ज्या अर्थी कोणतीही बरी वाईट गोष्ट उपस्थित झाली असतां तूं माझा अभिप्राय घेत असतोस त्या अर्थीं या कामीं मी होऊन तुला सल्ला देतों, तुला रुचेल तर घे. आपल्या मित्राचा पराभव होऊं नये, अशी इच्छा करणाऱ्या सुहृदानें त्याला जें न्याय्य, समयोचित व मित्रास हितकर म्हणून कळत असेल, तें प्रश्नावांचून सांगावें. कर्णकटु असलें

1 मम पुत्रेतियांत पुत्र इति यांचा पुत्रेति असा संधि आर्ष आहे.

तरी जें परिणामीं सुखकर असेल तेंच भल्यांनीं आपले मित्रास सांगावें. असें करणें हें स्नेहऋणाची फेड करणेंच आहे असें समजून पूर्वींपासून सज्जनांनीं हाच पंथ स्वीकारला आहे. जे कोणी लबाड, धर्मभ्रष्ट, उपदेश न ऐकणारे व द्वेष्य असतील अशांना हितही सांगूं नये. कारण, भल्यांनीं अशांना निंद्यच मानिलें आहे. यास्तव, हे श्रोतृश्रेष्ठा, हे सर्वज्ञा देवा, मला जें ओघानें बोलणें प्राप्त झालें आहे तें तूं प्रथम ऐक आणि माझें सांगणें तुझे हिताचें आहे, म्हणून तें ऐकून तसा चाल.

हे देवा, भावाभावांत किंवा स्नेह्यांत फूट पडली म्हणजे शत्रूंना टाळ्या पिटायला फावतें; यांत मुळींच संदेह नाहीं. हे बुद्धिमंता सुरेश्वरा, कोणतें कार्य हितपरिणामी आहे व कोणतें त्याचे उलट आहे, याचा नेहमीं विचार करावा. प्रस्तुतसारखें कार्य उभारिलें असतां परिणामीं अनुतापाला कारण होईसें असेल तर शहाण्यानें तें आरंभूंच नये, असा बुद्धिवान् लोकांचा निर्णय आहे. तूं योजिलेल्या गोष्टीचा परिणाम चांगला होईलसें मला दिसत नाहीं. आणि हे देवेंद्रा, मी असें कां ह्मणतों, याला कारण आहे; तेंही ऐकून घे. जो हरि कार्यरूपी विश्व व कारणरूपी प्रधान या दोहोंचा स्वतः एकटाच अधिष्ठाता असून जो प्रकृतीचे पलीकडे असणारा क्षेत्रज्ञ ह्मणजे स्थूल, सूक्ष्म व कारणरूपी देहत्रय याला प्रकाशित करणारा असें ज्ञाते समजतात, असा जो कोणी अव्यक्त परमात्मा त्याचा सर्व सृष्टीचे उत्पत्तीला कारणभूत असा जो व्यक्तभाग त्याचा हा श्रेष्ठदेव विष्णु केवळ आत्मा आहे. व तसाच तो सर्वबुद्धिमान् ( चेतन ) प्राण्यांचाही अंतर्यामी आहे. त्याचप्रमाणें प्रकृतीचा जो प्रथम व्यक्त झालेला भाग तोच ही यशस्विनी उमादेवी होय. हाच ( प्रकृतीचा व्यक्त भाग ) स्त्री ह्या उपलक्षणानें यावत् भोग्यवस्तुस्वरूप, दृश्यमात्राकार व चेतनास ( भोगदानानें ) तुष्ट करणारा भाग होय. उमेप्रमाणेंच रुक्मिणी आदि ज्या स्त्रिया आहेत त्या या प्रकृतीच्या व्यक्त रूपांतील प्रथम गुण होत. म्हणजे उमादेवी हीच अव्यय प्रकृति ( व तिचा भोक्ता ) तो गुणयुक्त महेश्वर देव. ( देवी हा प्रकृतीचा गुण व तिचा भोक्ता महादेव हा गुणी असें समजावें. ) हे अमरश्रेष्ठा, सारांश, महेश्वर आणि विष्णु यांत भेद मुळींच नाहीं. ( महेश्वर तोच विष्णु ) किंबहुना विष्णु हा प्रथम गुण असल्यानें त्या गुणी महेश्वराचाही शाश्वत शास्ता आहे. सर्व लोकांचा कर्ता, महातेजस्वी व सर्वकारण नारायण हा तुर्यस्वरूपी आहे. म्हणजे देव महेश्वर हा भोक्ता आहे व अधोक्षज विष्णु हा कर्ता आहे आणि ब्रह्मदेव व प्रजापतिगण व इतर देवगण हे तर त्या महात्म्या महादेवानें मागून उत्पन्न केले. एतावता, वेदामध्यें विष्णु हा सर्वांत पुराण असा पुरुष, अचिंत्य, अप्रमेय व त्रिगुणांचे पलीकडला असा वर्णिला आहे. पूर्वीं अदितीनें तप करून या विष्णूची आराधना केली. त्या वेळीं तिचे तपानें तुष्ट होऊन विष्णूनें तिचे आवडीचा वर तिला देण्याचें कबूल केलें. त्या वेळीं, हे देवेंद्रा, अदितीनें हा अधोक्षज नारायण आहे हें जाणून त्याला वंदन करून मागितलें कीं, हे विष्णो, तुजसारखा मला पुत्र असावा. तो तिला म्हणाला, मजसारखा दुसरा पुरुषच ब्रह्मांडांत नाहीं. यास्तव मीच आतां माझे अंशानें तुझे उदरीं येईन. दुसरी तोड ताहीं. हे सुरेश्वरा, सांप्रत तुझा भाऊ म्हणून जो जन्मास आला आहे, तो हा सर्वकर्ता व महातेजस्वी नारायणच स्वतः आहे. ( बाह्यदृष्टीनें ) लोक त्याला

[1] यास्तव रुद्रही तुझें विष्णुविरुद्ध रक्षण करणार नाहीं, हा भाव.

उपेंद्र म्हणजे तुजहून धाकटा किंवा कमी मानाचा म्हणतात, एवढेंच. सारांश, हे देवा, या देव हरीनें कश्यपाचें पुत्रत्व आपखुषीनें पतकरिलें आहे इतकेंच. कारण, भूत व भावी सृष्टीचा उत्पत्तिलयकर्ता हा अव्यय विष्णु असलीं निरानिराळीं रूपें घेत असतो. हा सर्वकर्ता, हर्ता, जगन्नायक केशव सांप्रत कृष्णरूपानें मथुरेंत जो प्रकट झाला आहे, तो केवळ जगत्कल्याणाचे हेतूनें. हे मानदा, मांसपिण्ड जसा चरबीनें सर्वत्र आंत बाहेर भरलेला असतो त्याप्रमाणें हें सर्व जगत् या प्रभावशाली विष्णूनें आंत बाहेर व्यापिलेलें आहे. तो ब्राह्मणांचा हितकर्ता, सर्वांतर्यामी, गुणातीत व सर्वकर्ता वैकुंठ या जगतांत निरनिराळ्या रूपांनीं विकार पावत असतो. यामुळें हा सृष्ट्युत्पत्तिकर्ता, सर्वव्यापी, भगवान् पद्मनाभ कृष्ण सर्वही देवांना पूज्य आहे. ( अर्थात् तुलाही पूज्यच आहे ) हाच अनंत शेषरूपानें या पृथ्वीचें धारण करून मोठें यश मिळवितो. वेदसांप्रदायी ज्ञाते यालाच 'यज्ञ'[1] असें म्हणतात. हा सर्वव्यापी देव कृतयुगीं श्वेतवर्ण, त्रेतायुगीं रक्तवर्ण, द्वापरांत पीत व कलींत कृष्णवर्ण असतो. त्या दिव्यरूपधारी हरीनें हिरण्याक्षाला मारिलें. आणि नृसिंहाचें रूप घेऊन हिरण्यकशिपूला मारिलें व याच देवानें पृथ्वी पाण्यांत बुडत असतां जगत्कल्याणार्थ वराहाचें रूप घेऊन ती वर उचलून धरिली. वामन रूप घेऊन याच विष्णूनें पृथ्वी जिंकली. आणि याच श्रीमान् देवानें सर्व बंधनांनीं बलीस बांधून टाकिलें. याच अमितपराक्रमी उदार अनंत विष्णुनें पूर्वीं देवदानवांचे यत्नानें प्राप्त झालेली सर्व संपत्ति तुजकडे घातली. ( वास्तविक तिजवर सर्वांचेंच स्वामित्व असावें. ) या जनार्दनाचें असें व्रत आहे कीं, ज्याचे पदरीं तप शिल्लक आहे असला मनुष्य खोटें कर्म करीत असला तरीही हा त्याला ( तप निःशेष होई तों ) मारीत नाहीं. सज्जनांची गति व नित्यधर्मस्वरूप अशा या गोविंदानें देवांचे शत्रु जे दानव त्यांतील मुख्य मुख्य नाहींसे केले ते तरी, हे देवेंद्रा, तुझे बऱ्याकरितां. याच आत्मज्ञानें रामरूप घेऊन रावणास मारिलें आणि सिंह ज्याप्रमाणें हत्तीला मारितो त्याप्रमाणें यानें वाटेल तसलीं रूपें घेऊन अनेक मत्त दैत्य मारिले आहेत. सर्व भूतश्रेष्ठांचाही अग्रणी असा हा उपेंद्र अद्यापि जगद्धितासाठींच मनुष्यलोकांत रहात आहे. या हरीला मी पूर्वीं जटा, दंड व कृष्णाजिन धारण केलेला पाहिला आहे. तृणांत जसा उग्र अग्नि, त्याप्रमाणें हा दैत्यसमूहांतून संहार करीत फिरत असे. याच गोविंदानें केवळ दैत्यमय होऊन गेलेलें हें जगत् लोकांचे हितार्थ दैत्यरहित करून सोडिलेलें मी पाहिलें आहे. ( असा याचा अद्भुत पराक्रम आहे. म्हणून मी म्हणतों कीं ) हे देवेंद्रा, हा जनार्दन तुझा पारिजात खचित् द्वारकेला घेऊन जाईल. मी हें खोटें सांगत नाहीं. हे वासवा, ( तूं म्हणतो आहेस पण ) बंधुप्रेमानें परवश होऊन तुझ्यानें कृष्णावर प्रहार होणार नाहीं; व तोही तूं ज्येष्ठ बंधु हें पाहून अतिप्रसंग करूं शकणार नाहीं. हे देवा, मीं हें सांगितलेलें जर कोणत्याच प्रकारें ऐकायचें नसेल तर तुझे जे हितकर्ते धर्मन्याय जाणते मंत्री असतील त्यांना अभिप्राय विचार.

वैशंपायन सांगतातः—हे जनमेजया, जगद्गुरु नारदांचे या म्हणण्यावर त्या समर्थ देवेंद्रानें उत्तर केलें कीं,'हे मुने, हे ब्रह्मन्, कृष्ण असा पराक्रमी आहे, तसा पराक्रमी आहे हें जें आपण वर्णन केलें, तें मीं अनेक वेळां ऐकिलें आहे. आणि ज्याअर्थीं कृष्ण असला पराक्रमा आहे त्याअर्थीं भल्यांचें व्रत ध्यानांत आणितां

१ यज्ञो वै विष्णुः । श्रुति.

मी देणें जरी योग्य असलें तरीही मी मुद्दामच त्याला पारिजात देणार नाहीं. हे मुने, आपलें कल्याण असो; मीं जो हा निश्चय केला आहे यांतील हेतु असा आहे कीं, तो जर तुम्ही म्हणतां तसा खरोखरच सर्वगुणसंपन्न व महापराक्रमी असेल तर तो असल्या क्षुल्लक झाडासाठीं मजवर रुसणार नाहीं. कारण, जे खरे महाप्रभाव असतात ते मोठे सहनशील असतात. आणि ज्ञानचक्षु असे जे स्वतःहून वृद्ध असतील अशांचें सांगणें ते ऐकतात. धर्मनिष्ठांत श्रेष्ठ व महात्मा अशा या कृष्णानें आपणास धर्मज्ञ म्हणवीत असूनही यत्किंचित् वस्तूसाठीं आपले वडील भावाशीं विरोध करणें उचित नाहीं. ज्याप्रमाणें त्या अधोक्षजानें माझे मातेला वर देऊन ( तिचें पुत्रत्व स्वीकारिलें ) त्याचप्रमाणें त्यानें तिच्याच पुत्राचें वडीलपण त्यानें सोशिलें पाहिजे. ज्या अर्थीं या जनार्दनानें आपखुषीनें उपेंद्रत्व स्वीकारून माझें धाकटेपण पतकरिलें त्या अर्थीं आपला वडील भाऊ इंद्र याचा योग्य मानही त्यानें ठेविलाच पाहिजे. या देव मधुसूदनानें मागील एका अवतारीं ( वामनावतारीं ) माझें वडीलपण पटकाविलें होतेंच कीं नाहीं. तसेंच त्याला म्हणावें, आतांही तुला पाहिजे तर ज्येष्ठत्व घे.

बलरिपु इंद्राचा निश्चय ( पारिजात न देण्याविषयीं ) दृढ आहे असें पाहून धैर्य व बुद्धि यांचे निधि, तपोधन, धर्मज्ञ नारदमुनि त्या त्रिदशेश्वरानें रजा देतांच यदुश्रेष्ठानें रक्षिलेल्या कुशस्थलीस गेले.

## अध्याय बाहत्तरावा.

—:०:—

### कश्यपकृत रुद्रस्तोत्र.

वैशंपायन सांगतातः—नंतर, मुनिश्रेष्ठ नारदानें रम्य द्वारकानगरीस येऊन शत्रुहंत्या पुरुषोत्तमाला पाहिलें, त्या वेळीं तो आपले घरीं सत्यभामेसह सुखांत बसला असून सर्व तेजांहून तेजस्वी अशा शरीरानें शोभत होता. नारदांना असें दिसून आलें कीं, तो दृढव्रत महात्मा कृष्ण त्याच गोष्टीची वाटघाट करीत असून आपले स्त्रीची केवळ शब्दांनीं कशीतरी समजूत घालीत होता.

नारदांस पहातांच कृष्णानें त्यांस उत्थापन देऊन शास्त्रोक्त विधीनें त्यांचें पूजन केलें. (मग सुखासनावर बसून नारदांनीं कांहीं वेळ विश्रांति घेतल्यावर कृष्णानें हंसून पारिजात वृक्षासंबंधी वृत्तांत विचारला. तेव्हां त्या तपोधनानें देवेंद्र जे कांहीं शब्द बोलला होता ते सर्व सविस्तर जसेचे तसेच उपेंद्राला सांगितले. ते सर्व ऐकून कृष्ण नारदाला म्हणाला, हे धर्मपालकांत वरिष्ठा, ‘ मी उद्यीक अमरावतीला जाणार’. असें म्हणून तो नारदांसहवर्तमान समुद्रतीरीं आला आणि एकांत पाहून नारदाला त्यानें संदेश दिला कीं, ‘हे तपोधना, आज आपण महेंद्रभवनीं जाऊन त्या देवश्रेष्ठाला माझें वंदन सांगून नंतर निरोप सांगावा कीं,; हे समर्था, तूं मजसमोर युद्धांत उभा रहाण्याचे भरीस पडूं नको. कारण, पारिजात घेऊन जाण्याविषयीं माझा पूर्ण निश्चय ठरला आहे, हें समजून रहा.’ कृष्णानें असा निरोप देतांच नारद स्वर्गास जाऊन त्यांनीं त्या तेजस्वी देवेंद्राला कृष्णाचें तें म्हणणें सांगितलें. त्या वेळीं त्या बलशत्रु इंद्रानें तें वृत्त गुरु बृहस्पतीला सांगितलें. तेव्हां, हे कुरुनंदना, तें ऐकून बृहस्पति ह्मणाला, हरहर, हे इंद्रा, मी ब्रह्मभवनाला जातांच माझे पश्चात् तुम्हीं हा अनीतीचा प्रकार आरंभून केवढा दारुण कलह उभा केला. हे भुवनपते देवा, मला न कळवितां आपण जें हें कृत्य आरंभिलें, त्यांत आपला हेतु तरी काय? अथवा हे वृत्रघ्ना, ( तुला काय बोलावें ) हें

सर्व विचित्र जगत्, कर्मापासून होणाऱ्या भवितव्यतेचे बळानें प्रेरित होत असतें आणि त्यापासून त्याचें निवारण करणें शक्य होत नाहीं. बाकी विचार न करितां अकस्मात् कोणतेंही कार्य आरंभणें चांगलें नव्हे. आणि यामुळें तुझें हें अविचाराचें कृत्य तुला लघुत्व आणील.

यावर तो महेंद्र महात्म्या बृहस्पतीला म्हणाला, 'अशी गोष्ट माझ्या हातून झाली तर खरी. पण, आतां पुढें काय करावें तें सांगा.' त्यावर भूतभविष्य जाणणारा उदार मति बृहस्पति खालीं मान घालून मनाशीं विचार करून त्याला म्हणाला, ठीक आहे.' लढणेंच तर आतां आपले पुत्राचें साह्य घेऊन तुझा शिकस्त यत्न तूं करून जनार्दनाशीं लढ. आणि 'हे शक्रा, तुझी कृति जेणेंकरून न्याय्य ठरेल असें स्वरूप तिला देण्याचा मी यत्न करितों.' असें बोलून बृहस्पति क्षीरसागरीं जाऊन त्यांनीं महात्मा कश्यप मुनींना तें सर्व वृत्त सांगितलें. तें ऐकतांच कश्यप कोपून बृहस्पतीला म्हणाला, 'महाराज, कांहीं केलें तरी हें अवश्य घडणारच; यांत संदेह नाहीं. या इंद्रानें देवशर्मा नामक ऋषीच्या स्त्रीसारखी स्त्री आपणास मिळावी म्हणून भलतीच इच्छा केली होती. त्या वेळीं ऋषीनें त्याला तुजवर मनुष्याकडूनच संकट येईल असा शाप दिला होता आणि यामुळें हें संकट इंद्रावर ओढवणार. हे मुने, हें संकट हे मुने, हें ( पुत्रावरील ) संकट दूर व्हावें म्हणूनच मीं हा जलवास पतकरिला. पण इतकें करूनही तो भयंकर प्रसंग येऊन ठेपलाच. आतां या प्रसंगीं इंद्राची माता जी अदिति तिला घेऊन मी तेथें येतों आणि हे तपोधना, त्या दोघांचेंही निवारण करितों. मात्र दैव मला अनुकूल असलें पाहिजे.' हें ऐकून धर्मात्मा बृहस्पति कश्यपांना म्हणाला, 'हे तपोनिधे, आपण योग्य समयीं तेथें यावें.' ती गोष्ट मान्य करून बृहस्पतीला वाटेस लावून कश्यप भूतपति देव जो रुद्र त्याची अर्चा करावयास गेला. तेथें वराची इच्छा करणाऱ्या त्या समर्थ व बुद्धिमान् कश्यपानें अदितीसह त्या सौम्य महात्म्या वृषभध्वजाची पूजा करून कांहीं वेदोक्त व कांहीं स्वकृत अशा स्तोत्रांनीं त्या स्तुतिपात्र जगद्गुरु शंकराचा स्तव केला तो असा:—

कश्यप उवाच ॥ उरुक्रमं विश्वकर्माणमीशं जगत्स्रष्टारं धर्मदृश्यं वरेशम् ॥ ससर्वे त्वां धृतिमद्धाम दिव्यं विश्वेश्वरं भगवन्तं नमस्ये ॥ १ ॥ यो देवानामधिपः पापहर्ता तं तं विश्वं येन जगन्मयत्वात् ॥ आपोगर्भे यस्य शुभा धरित्र्यो विश्वेश्वरं तं शरणं प्रपद्ये ॥ २ ॥ शालाट्टकान्यो यतिरूपो निजघ्ने दत्तानिन्द्रेण प्रणुदो हितानाम् ॥ विरूपाक्षं सुदर्शनं पुण्ययोनिं विश्वेश्वरं शरणं यामि मूर्ध्ना ॥ ३ ॥ भुङ्क्ते य एको विभुर्जगतो विश्वमग्र्यं धाम्नां धाम सुकृतित्वान्न धृष्यः ॥ पुष्यात्स मां महसा शाश्वतेन सोमपानां मरीचिपानां वरिष्ठः ॥ ४ ॥ अथर्वाणां सुशिरसं भूतयोनिं कृतिनं वीरं दानवानां च बाधम् ॥ यज्ञे हुतिं यज्ञियं संस्कृतं वै विश्वेश्वरं शरणं यामि देवम् ॥ ५ ॥ जगज्जालं विततं यत्र विश्वं विश्वात्मानं प्रीतिदेवं गतानाम् ॥ य ऊर्ध्वगं रथमास्थाय याति विश्वेश्वरः सुमना मेऽस्तु नित्यम् ॥ ६ ॥ अन्तश्चरं रोचनं चारुशाखं महाबलं धर्मनेतारमीड्यम् ॥ सहस्रनेत्रं शतवर्त्मानमुग्रं महादेवं विश्वसृजं नमस्ये ॥ ७ ॥ शुचिं योगं

१ गौतमपत्नि अहिल्या असें नीलकंठ म्हणतात.

शंसनं शान्तपापं शर्वं शंभुं शंकरं भूतनाथम् ॥ धुरंधरं गोपतिं चन्द्राचिह्नं हृषीकाणामयनं यामि मूर्ध्ना ॥ ८ ॥ आशुःशिशानं वृषभं रोरुवाणं कृतं धर्मं वितथं चाशुशेषम् ॥ वसुंधरं समृजिकं समं त्वां धृतव्रतं शूलधरं प्रपद्ये ॥ ९ ॥ अनन्तवीर्यं धृतकर्माणमाद्यं यज्ञाशेषं जयतां चाभियाज्यम् ॥ हविर्भुजं भुवनानां सदैवं ज्येष्ठं द्विजं धर्मभृतां प्रपद्ये ॥ १० ॥ परं गुणेभ्यः पृश्निगर्भस्वरूपं यशः शृङ्गं व्यूहनंकांतरूपम् ॥ शुद्धात्मानं पुरुषं सत्यधामं संमोहनं दुष्कृतिनां नमस्ये ॥ ११ ॥ युक्तोंकारं स्वशिरसं चारुकर्म दृढव्रतं दृढधन्वानमाजम् ॥ शूरं वेत्तारं धनुषोस्त्रातिरेकं पतिं पशूनां शमनं नमस्ये ॥ १२ ॥ एको रातिश्चैव भूतं भविष्यं सर्वातिथिर्यो हि जुषत्यरिघ्नः ॥ अरिंतुदोनुत्तमः संविभागी विभाजको मां भगवान्पातु देवः ॥ १३ ॥ य एको याति जगतां विश्वमीशो य एकोदान्मरुतां प्राणमग्र्यम् ॥ येनानृशंस्याच्छाश्वतं साम जुष्टं स मां जुष्यात्सुकृतिश्रेयसेद्य ॥ १४ ॥ ब्रह्मासृजद्यो भुवनोत्तमोत्तमं तृप्तो विद्वान्ब्राह्मणः षड्गुणस्य ॥ सृष्ट्वा रसं व्याहृतिस्थं समग्रं समायादिह बहुरूपोरिहाङ्गैः ॥ १५ ॥ व्यञ्जनोजनोथ विद्वान्समग्रः स्पृशिः शंभुः प्राणदः कृत्तिवासाः ॥ रसो ध्रुवः पवमानस्य भर्ता सपत्नीशः शंकरः सारधाता ॥ १६ ॥ त्र्यम्बकं पुष्टिदं वो ब्रुवाणं धर्मं विप्राणां वरदं यज्वनांच ॥ वराद्वरं रणजेतारमीशं देवं देवानां शरणं यामि रुद्रम् ॥ १७ ॥ आस्यं देवानामनन्तकं दुष्कृतीनां त्रिवृत्स्तोमं वृक्षहं कर्मसाक्ष्यम् ॥ भूतायनं भूतपतिं गुणज्ञं गुणाकारं शरणं यामि रुद्रम् ॥ १८ ॥ अनुद्धृतं यज्ञकर्तारमन्तं मध्यं चाद्यं यज्ञकृतां साम्यरूपम् ॥ वेदव्रतेषु बहुधा गीतमीशमभित्रिविष्टपं शरणं यामि रुद्रम् ॥ १९ ॥ महाजिनं व्रातिनं मेखलालं सुतोषणं क्रोधघ्नं विपापम् ॥ भूतं क्षेत्रज्ञं गुणिनं वा कपर्दिनं नतोस्मीशं वन्दनं वन्दनानाम् ॥ २० ॥ देवं देवानां पावनं पावनानां कृतिं कृतीनां महतो महान्तम् ॥ शतात्मानं संस्तुतं गोपतीनां पतिं देवं शरणं यामि रुद्रम् ॥ २१ ॥ अन्तश्चरं पुरुषं गुह्यसंज्ञं प्रभास्वन्तं प्रणवं विप्रदीपम् ॥ हेतुं परं परमस्याक्षरस्य शुभं देवं गुणिनं सन्नतोस्मि ॥ २२ ॥ प्रसूतिरुभयोर्न प्रसूतश्च सूक्ष्मः पृथग्भूतेभ्यो न पृथक् चैकभूतः ॥ स्वयं भूतः पातु मां सर्वसादः प्रदः स्वादः संमदः पातु रत्नम् ॥ २३ ॥ आसन्नः सन्नतरः साधनानां श्रद्धावतां श्राद्धव्रात्तिप्रणेता ॥ पातिर्गणानां महतां सत्कृतीनां पायान्मेषः पूरणः षड्गुणनाम् ॥ २४ ॥ अन्तर्बहिर्वृजिनानां निहन्ता स्वयं कर्ता भूतभावी विकुर्वन् ॥ धृतायुधः सुकृतिनामुत्तमोजा प्रणुद्यान्मे वृजिनं देवदेवः ॥ २५ ॥ योनोध्दृतास्त्रैः पुरा मायिनो वै दग्धा घोरेण वितथान्ताः शरेण ॥ महत्कुर्वन्तो वृजिनं देवतानां ज्यायानीशः पातु विश्वोद्धाता ॥ २६ ॥ भागीयसां भागमतोन्तमिच्छन्मखो दाक्षो येन कृत्तोन्वधावत् ॥ विद्वान्यज्ञस्यादिरथान्तः स देवः पायादीशो मां दक्षयज्ञान्तहेतुः ॥ २७ ॥ अन्यो धन्यः संस्कृतश्चोत्तमश्च जगत्सृष्ट्वा योत्ति सर्वातिगुह्यः ॥ स मां सुखप्रमुखे पातु नित्यं विचिन्वानः प्रथमः षड्गुणानाम् ॥ २८ ॥ गुणत्रैकाल्यं यस्य देवस्य नित्यं सत्त्वोद्रेको यस्य भावात्प्रसूतः ॥ गोप्ता गोप्तॄणां सन्नदो दुष्कृतिनामाद्यो विश्वस्य बाधमानस्य क्रुद्धः ॥ २९ ॥ धाम्नो यस्य हरिरग्रोऽथ

विश्वो ब्रह्मा पुत्रैः सहितश्च द्विजाश्च ॥ पराभूता भवने यस्य सोमो जुषत्वेष श्रेयसे साधुगोप्ता ॥ ३० ॥ यस्माद्भूतानां भूतिरन्तोथ मध्यं धृतिर्भूतिर्यश्च गुहाश्रुतिश्च गृहाभिभूतस्य पुरुषेश्वरस्य महात्मनः संमृडवेद्यस्य तस्य ॥ ३१ ॥ यल्लिङ्गाङ्कं त्र्यम्बकः सर्वमीशो भगलिङ्गाङ्कं यद्धुमा सर्वधात्री ॥ नान्यत्तृतीयं जगतीहास्ति किंचिन्महादेवात्सर्वसर्वेश्वरोसौ ॥ ३२ ॥

कश्यप म्हणालाः—हे भगवन् विश्वेश्वर, आपणांस वंदन असो; आपण जगताचे कर्ते व विश्व हें आपलें कर्म, आपण ईश, सत्कर्मानेंच प्रतीत होणारे, भक्तावर अनुग्रह करणारे, सर्वात्मक, पादक्षेपानें त्रैलोक्य व्यापणारे व सात्विक[1] धैर्यानें युक्त जे योगी त्यांचें वसतिस्थान आहां. जो सर्व देवांचा अधिपति, जो पापहरणकर्ता, जो जगद्रूपत्वानें स्वतःच सर्व विश्वव्यापक व मंगलकारक जलादि पंचभूतांपासून घडलेलीं यावत् भूतांचीं शरीरें ज्याचे चैतन्य स्वगर्भांत धारण करितात त्या विश्वेश्वराला मी शरण आहें. " जे वेदान्तविचारहीन यति असतील, त्यांना शमदमादि हितकर गोष्टींचा नाश करणारे इंद्रियरूपी कुत्रे खावोत[2]." असा इंद्रानें दिलेला शाप ज्याला जितेंद्रियत्वामुळें मुळींच बाधत नाहीं, जो विरूपाक्ष[3] असूनही दिसण्यांत सुंदर आहे, जो पुण्याचें उत्पत्तिस्थान व विश्वाचा नियंता, अशाला मी डोईवाटें शरण आहें. जो अखिल जगताचा एकटाच स्वामी असून सूक्ष्मसृष्टीचेंही पालन करितो, जो नेत्रसूर्यादि[1] तेजस्वी पदार्थांनाही तेज देणारा, जो ब्रह्मरूप असल्यानें निर्भय आहे, जो सोमपान करणारे व चंद्रकिरण प्राशन करून रहाणारे तपस्व्यांमध्यें वरिष्ठ आहे तो आपल्या शाश्वत तेजानें माझें पोषण करो. जो अथर्व वेदानें प्रतिपाद्य, पंचशीर्ष, जगत्कारण, कुशल, वीर, दानवांचा संहारकर्ता, यज्ञांत पाचारिला जाणारा, यज्ञपुरूष, व जो संस्कारयुक्त, अशा त्या विश्वेश्वराचा मी आश्रय करितों. ज्याचे अधिष्ठानावर हें निखिल जगद्रूपी जाल पसरलें आहे, जो शरणागतांना सुख देतो व जो आकाशगामी रथांत बसून सर्वत्र संचार करितो, तो विश्वात्मा व विश्वेश्वर मला सर्वदा सुखकर होवो. अंतर्यामी संचार करणारा, चिन्मय, वेदरूपी सुंदर शाखांनीं युक्त, महाबलाढ्य, धर्मनायक, स्तुतिपात्र, सहस्त्रनेत्र, शतपथोक्त कर्मांचीं फलें देणारा, उग्र, विश्वाचा कर्ता असा जो महादेव त्याला माझा नमस्कार असो; जो संगृहीत, योगगम्य, वेदस्तुत, शांतपाप, संहारकर्ता, सुखहेतु, सुखदाता, भूतपति, जगताचा भार वहाणारा, नंदी वृषभाचा धनी, चंद्रमौली, व कालादिकांचाही आश्रय, त्याला मी मस्तक लववून शरण आहें. वेगवान्, रागादि दोष नाहींसे करणारा, शमादि गुणांचा वर्षाव करणारा, प्रातःसवनादि क्रमानें गर्जना करणारा, फलाकांक्षेनें केलेलें यज्ञादि कर्म फलभोगानें तत्काल नष्ट होत असल्यामुळें चित्तशुद्धि करितांच केलेल्या कर्मांचे फलांचें रक्षण करणारा, सर्वत्र समदृष्टि, व्रतधारी, व हातीं शूल वागविणारा जो तूं त्या तुला मी शरण आहें. अनंतवीर्य, कर्मफलोला[2]

१ धृत्या यया धारयते मनः प्राणेंद्रियक्रियाः । योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्विकी ॥ भगवद्गीता—अ० १८ श्लोक ३४

२ 'अरुन्मुखान्यतीन् शाला वृकेभ्यः प्रयच्छामि' ॥ श्रुतिः ॥

३ शंकराला दोन भुवयांच्या मध्यें तिसरा एक डोळा असल्यानें तो वास्तविक विरूप दिसावा.

१ यदादित्यगतं तजो० तत्तेजो विद्धिमामकं गीता—अ० १५

२ महिम्नांत पुष्पदंत ह्मणतात. ' अतस्त्वां संप्रेक्ष्य क्रतुपुफलदानप्रतिभुवं ।

जामीन, सर्वां आधींचा, स्वतः पुरुषार्थभूत, यजन करणारांचा आरंभविषय, हविर्भोक्ता, सर्वभुवनांचा ज्येष्ठ, व धार्मिकांत ब्राह्मणरूप, त्याला मी शरण आहें. इंद्रियातीत, विष्णुस्वरूप, जगताला व्यापून शिंगाप्रमाणें बाहेर उरणारा, रमणीय असून क्षोभ करणारा, शुद्धात्मा, हृदयरूपी पुरींत रहाणारा, अबाधित चैतन्यरूप, लबाडांना ठकविणारा, अशाला माझा नमस्कार असो; जो योग्यांना ॐ काररूप किंवा ॐ कारांतील अर्धमात्रारूप, अहिंसाधर्मस्वरूप, दृढव्रत, दृढधन्वा, क्षेपनक्रियारूप, शूर, धनुर्वेत्ता, सर्वास्त्रांहून अधिक, जीवांचें पालन व संहार करणारा, त्याला मी नमस्कार करितों. जो अद्वितीय, सर्वमित्र, भूत व भविष्यरूप, अग्निरूपानें सर्वांचा हविर्भाग घेणारा, षड्रिपुहंता, शत्रुपीडक, श्रेष्ठ, स्वतः विभागाचा अधिकारी असून भाग पाडून देणारा, असा तो देव माझें रक्षण करो. जो जगताचा एकटाच स्वामी असून जलचंद्रन्यायानें सर्वत्र प्रतिबिंबित झाला आहे; ज्या एकानेंच प्राणवायूंनाही प्रथम प्राणत्व दिलें, ज्यानें दयाळूपणास्तव सर्वदाच समबुद्धीचा आदर केला आहे, व जो सर्वांत अग्र्य, तो धन्य देव आज माझें कल्याण करो. ज्यानें वेदज्ञ ब्रह्मदेवाच्या रूपानें सर्व भुवनांत उत्तम जो सत्यलोक तो निर्माण केला व जो षड्गुणैश्वर्यसंपन्न असल्यानें जो व्याहृतीचा रसरूप जो प्रणव याला निर्माण करून त्याचा परिणामरूप जो प्रपंच त्यांत प्रविष्ट झाला. व जो अरिहंता सर्वज्ञतादि षडंगांनीं युक्त असल्यानें बहुरूपी झाला आहे, जो इंद्रियातीत विषयांचा व्यापक, जन्मरहित, विद्वान्, दृग्रूप व दृश्यरूप, विषयग्राहक, स्पर्शसुखज्ञ, प्राणदाता, गजचर्मपरिधान करणारा, आनंदरूप, शाश्वत, प्राणपति, पत्नी व यजमान यांसह यज्ञ करणारा, फलदाता व बोधकर्ता, त्रिनेत्र, पुष्टिदाता, ब्राह्मणांस धर्म सांगणारा, यजनकर्त्यांस व ब्राह्मणांस वर देणारा, श्रेष्ठांत श्रेष्ठ, रणजेता, स्वामी व देवाधिदेव असा जो रुद्र त्याला मी शरण आहें. जो देवांचें मुख, दुर्जनांचा संहारकर्ता, ज्यांत त्रिवृद्रूपी स्तोत्रें गाइलीं जातात अशा सोमयज्ञाच्या रूपाचा, संसारवृक्षाचा नाश करणारा, कर्मसाक्षी, भूताश्रय, भूतपति, गुणज्ञ असून गुणस्वरूपी, त्या रुद्राला मी शरण आलों. जो सौम्य, यज्ञकर्ता, जो आदिअंतमध्यरूप, यज्ञकर्त्यांना प्रकृतिरूप, वेदव्रतांमध्यें नानादैवतरूपानें स्तविला जाणारा व स्वर्गासह सर्व भुवनांचा नियंता त्या रुद्राला मी शरण आहें. जो गजचर्म पांघरणारा, व्रती, मेखलेनें अलंकृत, अल्पयत्नानें प्रसन्न होणारा क्रोधाचा[1] स्वामी, पापरहित, नित्यसिद्ध, क्षेत्रज्ञ, सत्वादि गुणयुक्त, जटाजूट धारण करणारा व वंद्यांनाही वंद्य अशा ईशाला मी शरण आहें. जो देवांचा देव, पवित्र वस्तूंनाही पावनकर्ता, यज्ञांचाही यज्ञ, मोठ्यांत मोठा, सहस्रमूर्ति, इंद्रियाभिमानिनी देवतांचाही स्वामी, अशा त्या प्रकाशमान् रुद्राला मी शरण आहें. अंतःकरणांत रहाणारा गुह्य नांवाचा पुरुष, स्वप्रकाश, ॐकाररूप, ज्याला अग्निसूर्यादि अन्य ज्योतींची अपेक्षा नाहीं असा म्हणजे स्वयंज्योति व जीवरूप प्रतिबिंबाचें मूळ बिंब, अशा गुणी आणि कल्याणकारक देवापुढें मी शरण आहें. जीव व जगत् या उभयतांचें उत्पत्तिस्थान, स्वतः उत्पत्तिरहित, कारणरूपानें अत्यंत सूक्ष्म, भिन्नरूपांतही एकत्वानें रहाणारा, आपणच जगद्रूपानें परिणत झालेला, सर्वांचें लयस्थान, महोदार, आम्रादिफलांत माधुर्यरूपानें रहाणारा,

१ हा 'क्रोधधवं' या पाठाचा अर्थः 'क्रोधधनं' असाही एक पाठ आहे. त्याचा अर्थ 'क्रोध हेंच ज्याचें धन आहे.'

तो हर्षरूप व रमणीय असा देव माझें रक्षण करो. अंतर्यामित्वानें सर्वांचे सन्निध असणारा, आणि साधनसंपन्न भक्तांस तर उघडच दिसणारा, श्रद्धाळूंना ' अहंब्रह्मास्मि ' इत्याकारक ज्ञान देणारा, सदाचारयुक्त जे प्रमुख गण त्यांचा पति, भक्तांचे इष्टार्थ व सर्वज्ञत्वादि षड्गुण यांचें पूरणकर्ता, तो माझें रक्षण करो. अंतर्गत व बाह्य पापांचा नाशकर्ता, निमित्तकारणत्वानें स्वयंकर्ता, व उपादानकारणत्वानें भूताकृति, क्रोधादि विकार प्रकट करणारा, आयुध धारण करणारा, पुण्यवानांत अति तेजस्वी असा जो देवांचा देव तो माझें पाप दूर करो. ज्यानें देवांना अतिशय क्लेश देणाऱ्या त्रिपुरानुयायी सर्व मायावी असुरांना घोर शरांनीं जाळून काढून नाहींतसे केले. व त्यांना धारातीर्थी मरण न येतां केवळ जळून मरण आल्यानें स्वर्गही प्राप्त झाला नाहीं. जो सर्वांत श्रेष्ठ स्वामी व सर्वव्यापी उदकांना धारणकर्ता तो माझें पालन करो. यज्ञांत हविर्भागास पात्र असलेल्या देवांचा भाग हिसकावून घेऊं पहाणारा, ज्यानें यज्ञकर्त्या दक्षाचें शिर तोडलें असतां ज्याचे मागें दक्ष धांवत आला, जो विद्वान्, व जो यज्ञाचा आदि व अंत असा तो दक्षयज्ञध्वंसकर्ता समर्थ देव माझें रक्षण करो; जो जगताची उत्पत्ति करून त्याचा नाशही स्वतःच करितो, जो सर्वांत अति गूढ आहे, जो ब्रह्मस्वरूपाहून अन्य असें विष्णुस्वरूप धारण करून जगताचें पालन करितो, जो शमादिसंस्कारयुक्त असल्यानें सर्वोत्तम आहे, जो यज्ञसमयीं आपणाला ईश्वराशीं अभिन्न समजणारा व जो षड्गुणांचा मुख्य आश्रय, तो माझ्या संततीला ( इंद्राला ) राखो; ज्या देवाचा उत्पत्ति, स्थिति व लय या तीन गुणांशीं नित्यसंबंध आहे व सत्वप्रधान विष्णुही ज्याच्या स्वरूपापासून प्रकट झाला, जो पालकांचाही पालक, दुष्टांचा नाशकर्ता, विश्वाचा आदि आणि जगताला पीडा देणारांचा संहारकर्ता, ज्याच्या तेजाचा विष्णु हा प्रथमांश आहे व सनकादि पुत्र व मरीच्यादि ब्राह्मण यांना घेऊन ब्रह्मदेवाला ज्याच्या द्वारांतून प्रवेश न मिळाल्यामुळें परतावें लागलें, तो सज्जनांचें पालन करणारा विराट्स्वरूपी परमात्मा मला कल्याणकारक होवो. ज्यापासून भूतमात्राची उत्पत्ति, लय व स्थिति हीं होतात; जो अनन्यशरणाला धैर्य, समृद्धि व गुह्यज्ञान देतो, त्या बुद्धिरूप गुहेंत राहणाऱ्या महात्म्या पुरुषश्रेष्ठाला मी शरण आहें. सर्व जगद्धात्री उमा व सर्व जगताचा ईश त्र्यंबक या उभयतांचीं चिन्हें जीं भग आणि लिंग त्यांचे संयोगानेंच हें सर्व कार्यरूपी जगत् निर्माण झालें आहे. व ज्याचें कारणही तद्रूपच आहे, यामुळें ज्या उमामहेश्वरावांचून या जगतांत तिसरें असें कांहींच नाहीं आणि यामुळें जो सर्व प्रपंचाचा ईश्वर आहे. ( त्याला मी शरण आहें. )

याप्रमाणें कश्यपानें स्तुति केली असतां धर्मात्मा भगवान् वृषभध्वज धर्मिष्ठांत श्रेष्ठ अशा कश्यपाला दर्शन देऊन प्रसन्नमनानें म्हणाला, 'हे प्रजापते, तूं कोणत्या कार्यास्तव माझी स्तुति आरंभिली आहेस, हें मी जाणतों. तुझे महात्मे पुत्र इंद्र व उपेंद्र हे पुनरपि आपले वृत्तीवर येतील. मात्र धर्मात्मा जनार्दन पारिजात घेऊन जाईल. हे कश्यपा, इंद्रानें पूर्वी उज्वल तपस्वी गौतमाच्या स्त्रीचा अभिलाष केल्यामुळें त्यानें इंद्राला शाप दिला आहे. तर हे धर्मज्ञा, तुझी स्त्री दक्षकन्या अदिति तिला घेऊन तूं इंद्राचे भवनास जा म्हणजे तुझे जाण्यानें तुझे उभय पुत्रांचें कल्याण होईल.

या प्रकारचें शंकराचें वचन कानीं पडतांच तो विद्वान् व अप्रमेय ब्रह्मपुत्र कश्यप देवगुरु

जो रुद्र त्याला प्रणाम करून आनंदयुक्त अंतःकरणानें देवलोकास गेला.

## अध्याय त्र्याहत्तरावा.

—:०:—

### इंद्र व कृष्ण यांचें युद्ध.

वैशंपायन सांगतातः—हे कुरुकुलधुर्या, नंतर दुसरे दिवशीं सूर्योदय होऊन सुमारें दोन घटका दिवस येण्याचे सुमारास शिनिश्रेष्ठ सात्यकीला एका रथांत घालून आणि ‘ तूं प्रद्युम्ना मागून अस,’ अशी त्यास आज्ञा करून महातेजस्वी कृष्ण मृगयेचें मिष करून रैवतक गिरीकडे निघाला. रैवतकगिरीला पोंचतांच देव आपले सारथ्याला म्हणाला, गड्या दारुका, तूं हा माझा रथ घेऊन घोड्यांना चारीत अर्धे-दिवसपर्यंत माझी वाट पहात येथेंच रहा. कारण, मी आलों तसाच रथांत बसूनच परत द्वारकेंत शिरणार आहें. याप्रमाणें दारुकाला आज्ञा करून जयासाठीं उत्सुक झालेला तो बुद्धिमान् अतर्क्य पराक्रमी भगवान् सात्यकी-सह गरुडावर चढला. आणि हे जनमेजया, आकाशांत गमन करणाऱ्या एका वेगळ्या रथांत बसून प्रद्युम्न त्याचे मागें निघाला. मग एका निमिषार्धाचे अवकाशानें तो बुद्धिमान् हरि पारिजात वृक्ष हरण करण्याचे हेतूनें नंदन नामक देवोद्यानांत प्रविष्ट झाला. तेथें त्या भग-वान् अधोक्षजानें नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेले व अधर्ष असे नंदनवनांत रक्षणार्थ असलेले देववीर पाहिले. आणि ते रखवालदार त्या पारिजातवृक्षाकडे पहात असतां असतां त्या सज्जनांच्या आश्रयरूपी महाबलाढ्य कृ-ष्णानें तो पारिजात उपटून गरुडावर ठेविला. आणि हे भारता, तो पारिजातही देहधारी होऊन आपसुखा त्या गरुडाजवळ केशवापाशीं आला. मग महात्मा केशवानें त्या पारिजाताचें सांत्वन करून त्याला सांगितलें कीं, ‘ तूं मुळींच भिऊं नको.’ व तो पारिजाततरु आपणाबरोबर निघाला असें पहातांच त्या अधोक्षजानें त्या श्रेष्ठ अमरपुरीला प्रदक्षिणा घातली.

हे राजा, इकडे नंदनवनाचे रखवालदारांनीं जाऊन महेंद्राला सांगितलें कीं, पारिजात महा-वृक्ष हिरून नेला. तें ऐकतांच इंद्र ऐरावतावर बसून निघाला व त्याचा पुत्र जयंत रथांत बसून त्याचे मागें चालला. वाटेंत पूर्वेकडील वेशीशीं शत्रुहंत्या केशवास पाहून इंद्र म्हणाला, ‘ बा मधुसूदना, हें तूं काय चालविलें आहेस ?’ तेव्हां केशव गरुडावर बसूनच इंद्राला नमस्कार करून म्हणाला, ‘ आपले भावजईचें पुण्यक-व्रत साधण्याकरितां हा उत्तम वृक्ष मी नेत आहें;’ तें ऐकून इंद्रानें उत्तर केलें. ‘ हे कम-लाक्षा, असें करूं नको. हे अच्युत, मजबरो-बर दोन हात केल्याशिवाय तुला हा वृक्ष नेतां येणार नाहीं. हे महाबाहो केशवा, ( तूं लहान आहेस याकरितां ) प्रथम तूंच मजवर प्रहार कर. आणि तूं आपली कौमोदकी गदा मजवर सोडून आपली प्रतिज्ञाही पुरी करून घे.’

तें ऐकतांच कृष्णानें वज्रतुल्य तीक्ष्ण अशा शरांनीं हंसतच इंद्राचे महागजाचा वध केला. तेव्हां वज्रधर इंद्रानें दिव्य शरांनीं कृ-ष्णाचे गरुडास वेध करून त्या वेगवान् केश-वाचे बाण आपले बाणांनीं छेदिले. जे जे बाण इंद्रानें सोडिले ते ते माधवानें तोडिले व जे जे माधवानें सोडिले ते ते इंद्रानें तोडिले. हे कुरु-नंदना, त्या वेळीं महेंद्राचे धनुष्याचा शब्द व कृष्णाचे शार्ङ्ग धनुष्याचा शब्द हे ऐकून स्व-र्गवासी मोह पावले. याप्रमाणें, त्या दोघांची झुंप-लीसें पाहून बलाढ्य जयंतानें गरुडावर लाद-लेला पारिजात ( डोळा चुकवून ) पळवून न्यावा असा घाट आणिला. तो लक्षांत येतांच कृष्णानें प्रद्युम्नाला सांगितलें कीं, जयंताला सं-

भाळ. तें ऐकतांच त्या प्रतापी रुक्मिणीपुत्रानें जयंताचें निवारण चालविलें. त्या वेळीं जयशाली वीरांत श्रेष्ठ अशा जयंतानें रथांत बसूनच हंसत हंसत प्रद्युम्नाचे सर्व गात्रांवर बाणांनीं प्रहार केला. उलटपक्षीं, त्या कमलनेत्र मदनानें सर्पतुल्य बाणांनीं इंद्रपुत्राला जर्जर केलें. हे जनमेजया वीर जयंत व प्रद्युम्न यांची ती टक्कर मोठीच झाली. लोकांतील अस्त्रधारांत श्रेष्ठ असे ते महाबलाढ्य इंद्रपुत्र व उपेंद्रपुत्र परस्परांवर जशास तसें या न्यायानें उलट सुलट प्रहार करीत राहिले. तो महाघोर संग्राम देव, मुनि व चारणांसह सिद्ध हे आश्चर्ययुक्त होऊन पाहूं लागले.

अशांत प्रवर नांवाचा एक बलाढ्य देवदूत पारिजात पुनरपि हरण करण्याचे बेतांत आला. हे कौरवा, हा प्रवर दूत इंद्राचा स्नेही असून मोठा अस्त्रनिपुण व शत्रुमर्दक होता. आणि ब्रह्मदेवाचे वरदानानें अवध्य झाला होता. तो मूळचा जंबुद्वीपांत रहाणारा ब्राह्मण असून तपोबलानें स्वर्गास गेल्यावर आपले शक्तीचे गुणानें इंद्राचा स्नेही झाला होता. तो चाल करून येतोसें पाहतांच कृष्णानें सात्यकीला सांगितलें कीं, तूं या प्रवराला जागचे जागींच राहून बाणांनीं खुंटव. मात्र हे सात्यके, यावर तूं निर्दय बाण सोडूं नको. हा ब्राह्मण काय चपळता करील ती सर्व आपण निमूट सोसून घेणें आपला धर्म आहे. यावर, त्या प्रवर ब्राह्मणानें रथांतूनच साठ बाण गरुडावर बसलेल्या सात्यकीवर टाकिले. त्या वेळीं सात्यकीनें त्या बाण टाकणाऱ्या ब्राह्मणाचें धनुष्यच तोडून टाकून म्हटलें, 'हे ब्राह्मणा, तूं ब्राह्मण असल्यानें मला अवध्य आहेस. याकरितां तूं आपले मार्गांतच ( ब्राह्मणकर्मांत ) अस. ब्राह्मणांनीं कसलाही अपराध केला तरी त्यांचा वध करूं नये, असें आम्हां यादवांचें व्रत आहे.' हे जनमेजया, यावर तो प्रवर ब्राह्मण हंसून सात्यकीला म्हणाला, हे शूरपुरुषा, एवढ्या तुझ्या क्षमाशीलतेची कांहीं अपेक्षा नाहीं. तूं या युद्धप्रसंगीं मनापासून मजपाशीं लढ म्हणजे झालें. हे यादवा, मीही ( ब्राह्मण असलों तरी ) परशुरामाचा शिष्य असून नांवाचा प्रवर म्हणजे ( वरचढ ) आहें आणि बुद्धिमान् शक्राचा स्नेही आहें. देव हे कृष्णाला मानीत असल्यामुळें त्याचे विरुद्ध, इंद्राचे बाजूनें लढावयास आज तयार नाहींत. यामुळें, हे सात्यकि, मी आज इंद्राकरितां लढून त्याचें स्नेहऋण फेडणार आहें.' असें म्हटल्यावर, हे नरव्याघ्रा, तो ब्राह्मण व सात्यकी यांची दिव्यास्त्रांची मोठीच भयंकर झटपट झाली. त्या बड्या योद्ध्यांचें युद्ध चालू असतां आकाश हदरलें व आकाशचारी अनेक जणांची खळबळ उडाली. प्रद्युम्न व जयंत यांची अगोदरच जुंपली होती. तींत प्रद्युम्नाची ताण श्रेष्ठ शस्त्रधर जयंत यावर चालेना. किंवा मायानिपुण आणि शूर अशा प्रद्युम्नावर जयंताचीही चालेना.(दोघेही समान होते,)परंतु हे राजेंद्रा, ते दोघेही जयेच्छु योद्धे 'हं, घे, मार' याप्रकारें परस्परांस म्हणत होते. अशांत त्या प्रतापी जयंतानें 'हं सावध रहा' असें प्रद्युम्नाला बजावून मोठ्या चपलतेनें त्यावर दिव्यास्त्राचा प्रहार केला. प्रद्युम्नानेंही तें तीक्ष्णशरयुक्त जळजळीत अस्त्र आपल्यावर येणार तों बाणजालानें तें वाटेंतच रोखून धरिलें. तेव्हां तो एक विलक्षणच प्रकार झाला. नंतर प्रद्युम्नासारख्यालाही भयंकर वाटणारें तें दैत्यमर्दन करणारें घोर जळजळीत अस्त्र त्या रणांगणीं पडलें. त्या योगानें महात्म्या प्रद्युम्नाचा रथ जळला. मात्र तें त्या घोर प्रद्युम्नाला जाळूं शकलें नाहीं. याचें कारण उघडच आहे. कारण, हे राजा, कसाही उग्र अग्नि झाला तरी अग्नीलाच जाळूं

शकत नाहीं. मग जळलेल्या रथांतून तो महाबाहु प्रद्युम्न पलीकडे सरला. नंतर विरथ झालेला तो रथिश्रेष्ठ कृष्णपुत्र धनुष्यासह आकाशांत उभा राहून जयंताला म्हणाला, ' हे महेंद्रपुत्रा, तूं आपले कडून हें जें दिव्य म्हणून अस्त्र सोडिलें आहेस, असल्या सहस्र अस्त्रांनीं देखील माझा घात होणें शक्य नाहीं. तथापि, तूं बिनकसर यत्न कर आणि युद्धकलेंत चातुर्य काय संपादिलें आहेस, तें मला आज दाखीव. हे इंद्रपुत्रा, समरांत मजवर ताण करील असा कोणी नाहीं. तूं हातीं आयुध घेऊन रथांत बसलेला पाहून मला प्रथम तुझा बाऊ वाटला होता, परंतु आतांपर्यंत झालेल्या झटपटीवरून तुझा पोंच मीं ओळखिला. आतां मला तुझें कांहीं वाटत नाहीं. तुला वाटेल तर तूं आपला मनानें या पारिजात वृक्षाला खुशाल स्पर्श कर. परंतु, तूं आतां याला हातानें स्पर्श करशील हें शक्य नाहीं. माझा मायामय रथ तूं आपले अस्त्रतेजानें जाळून टाकलास, परंतु, मायाबलानें मी असले सहस्त्रावधि नवे रथ निर्माण करीन. याप्रमाणें ज्याला प्रद्युम्न बोलला त्या महाबल जयंतानें स्वतःचे अति तेजस्वी तपानें स्वतःच निर्माण केलेलें एक अस्त्र सोडलें. तें महावेगयुक्त अस्त्र प्रद्युम्नानें शरजालानें निवारिलें. तेव्हां त्या जयंतानें दुसरीं चार दिव्य अस्त्रें सोडलीं. त्या चार अस्त्रांनीं त्या प्रद्युम्नाला चारी दिशांनीं रोधून धरिलें व त्यांशिवाय त्यानें एक पांचवें अस्त्र सोडिलें. त्या अस्त्रानें त्याची अंतरिक्षाची बाजू अडविली. हे भारता, त्या देवश्रेष्ठ जयंतानें मोठ्या उल्केसारखे जे बाण व जीं घोर अस्त्रें चौफेर प्रद्युम्नावर सोडिलीं, त्या सर्वांचेंही त्या कृष्णपुत्रानें आपले बाणौघानें निवारण केलें. तेव्हां जयंतानें दुसऱ्या तीक्ष्ण बाणांनीं त्याचा वेध केला. त्या वेळीं पुण्यचारी द्युचरांनीं महात्मा प्रद्युम्नाचें स्थैर्य व चपलता पाहून आनंदानें जयघोष मांडला. हे भारता, इकडे सात्यकीनें एका तीक्ष्ण बाणानें त्या प्रवर ब्राह्मणाचें धनुष्य व हस्तावाप ( हाताचें रक्षण करण्यासाठीं घातलेला कातडी मोजा, हातपोस ) याचा छेद केला. तेव्हां त्या प्रवरानें त्याला महेंद्रानें दिलेलें दुसरें—महाशनितुल्य शब्द करणारें असें उत्कृष्ट धनुष्य घेतलें. त्या मोठ्या धनुष्याचे साह्यानें त्या ब्राह्मणवीरानें सूर्यकिरणांप्रमाणें प्रखर असे अनेक प्रकारचे बाण सोडिले व त्या अमित तेजस्वी सात्यकीचें धनुष्य कापून काढून त्याचे सर्वांगास बाणांनीं वेध केला. त्या वेळीं, हे कौरवा, त्या बुद्धिमानानें दुसरें एक खंबीर व भार सोसणार असें धनुष्य घेऊन प्रवराला वेध केला. त्या परस्परांनीं तीक्ष्ण बाणांनीं एकमेकांचीं कवचें फोडलीं व मर्मभेदक अशा शेलक्या बाणांनीं परस्परांच्या अंगांचीं मांसें तोडिलीं. नंतर प्रवरवीरानें दुसऱ्या बाणानें सात्यकीचे धनुष्याचे दोन तुकडे केले. आणि तीन बाणांनीं सात्यकीस ताडन केलें. सात्यकी दुसरें धनुष्य घेण्याच्या विचारांत होता, तों त्या ब्राह्मणानें चलाखीनें एका फेंकण्याचे गदेनें त्याला ताडन केलें. याप्रमाणें गदेनें जेव्हां विशेष ताडन झालें, त्या वेळीं त्या बुद्धिमान सात्यकीनें पुनरपि धनुष्य न घेतां हंसतच ढालतरवार घेतली. तेव्हां यदुनंदन सात्यकी याचा हात लंगडा झालासें मानून, प्रवरानें शेंकडों बाण त्यावर सोडिले. इतक्यांत प्रद्युम्नानें स्वच्छ आकाशासारखा तेजस्वी नीलवर्ण खड्ग सात्यकीचे हातांत दिला. परंतु, प्रवरानें तो खड्ग एका भक्कम बाणानें हंसतच मुठीचे ठिकाणीं तोडिला. सरळ जाणाऱ्या बाणांनीं त्याचें कवचही उडवून दिलें. शक्तीनें त्याचे हृदयावर प्रहार करून त्या ब्राह्मणानें गर्जना केली. व सात्यकी विकल

झालसें समजून तेवढ्या संधींत पारिजात हिसकून न्यावा म्हणून रथांत बसूनच गरुडाशेजारीं गेला. परंतु, गरुडानें त्याला आपले पंखांच्या तडाक्यानें रथासह दोन कोस अंतरावर उडवून दिलें. त्यामुळें तो खालीं पडून मूर्च्छा पावला. इतक्यांत जयंतानें पाठोपाठ येऊन त्या पडलेल्या ब्राह्मणाला उचलून व धीर देऊन चटकन् आपले रथांत घातलें. इकडे सात्यकीही वारंवार मोह पावत होता व पडत होता. त्याला प्रद्युम्नानें आश्वासन देऊन त्या आपल्या चुलत्याला आलिंगनही दिलें. आणि मधुसूदनानें त्याला आपले सव्य हस्तानें स्पर्श केला. त्या स्पर्शाबरोबर सात्यकीच्या जखमा वगैरे सर्व नाहींतशा होऊन तो व्यथारहित झाला. मग त्या पारिजातक वृक्षाचे उजवे बाजूस प्रद्युम्न व डावीस सात्यकी याप्रमाणें ते दोघे युद्धनिपुण वीर उभे राहिले. जयंत व प्रवर हे दोघे एक रथांत बसून गरुडावर चालून जात असतांना महात्मा महेंद्रानें त्यांस हंसून म्हटलें कीं, 'कांहीं झालें तरी तुम्ही गरुडाचे आसपास जाऊं नका. कारण, हा विनतापुत्र गरुड सर्व पक्ष्यांचा राजा असून मोठाच बलाढ्य आहे. तुम्ही आपले दोघेही हातीं आयुधें घेऊन एकजण डावीला व एकजण उजवीला असे माझेच बाजूला उभे राहून मी युद्ध करीत असतांना मजवर लक्ष ठेवा.' इंद्रानें असें सांगतांच ते उभय वीर त्याचे बाजूस होऊन इंद्र व कृष्ण यांचें युद्ध पहात राहिले.

मग कृष्णानें महास्त्रापासून उद्भवलेल्या आणि अशनीप्रमाणें शब्द करणाऱ्या बाणांनीं गरुडाला सर्वांगीं वेध केला. परंतु, त्या बाणांना मुळींच न जुमानतां तो प्रतापी गरुड वीर समोरच इंद्राचे ऐरावतावर चालून गेला. हे राजा, तो गरुड आणि ऐरावत हे दोघेही मोठे बलाढ्य, वीर्यशाली, महाप्राण व अजिंक्य असे होते. ते जेव्हां लढूं लागले तेव्हां ऐरावतीनें गर्जना करीतच त्या सर्पशत्रूला आपले दंतांनीं, सोंडेनें व मस्तकानें ताडन केलें. मग त्या मस्त गरुडानें आपले तीक्ष्ण नखांनीं व पंखांचे तीक्ष्ण झडपेनें त्या ऐरावताला मारिलें. एक घटकाभर तो गज आणि पक्षी यांचा मोठाच झगडा चालला. त्याचे योगानें सर्वांना मोठें कौतुक वाटून राहिलें. पण जवळचे प्रेक्षकांना भीति उत्पन्न झाली. इतक्यांत हे राजा, अंकुशाप्रमाणें तीव्र अशा आपले पायांच्या नखांनीं त्या गरुडानें ऐरावताचे मस्तकावर आघात केला.

त्या वेळीं, हे जनमेजया, त्याचे त्या आघातानें मूर्छित होऊन तो ऐरावत आकाशांतून भूलोकीं या जंबुद्वीपांतील पारियात्र नामक पर्वतावर पडला. परंतु, दयेस्तव, प्रेमास्तव व पूर्वींचे वचनास्तव महाबल इंद्रानें त्याला सोडलें नाहीं. ( तोही त्याचेबरोबर खालीं आला. ) तेव्हां सनातन जगद्योनी जो बलवान् वीर कृष्ण तोही पारिजात वृक्षासहित गरुडाला घेऊन खालीं आला. तो इंद्र त्या पारियात्र पर्वतावरच त्या ऐरावताला थोपटीत थोपटीत बसला होता. मग कांहीं वेळानें तो हत्ती ठिकाणीं येतांच पुनरपि युद्ध चाललें. हे कौरवा, मग चांगले धार लावलेले, सर्पाप्रमाणें घातक व रत्नजडित अशा बाणांनीं इंद्र व केशव यांचा परस्पर मारा सुरू झाला. त्यांतच हे राजा, गरुडानें आपले ऐरावताला लोळविलें होतें हें ध्यानांत ठेवून तो इंद्र मधून मधून त्या गरुडावर पालटून पालटून वज्र व अशनि यांचा प्रहार करीत होता. परंतु जात्याच बलाढ्य असून तपोबलानें अवध्य झालेला तो गरुड तें वज्र व अशनी यांचे तडाके तसेच

सहन करीत होता. मग आपला भ्राता[1] जो इंद्र त्याचा मान राखावा म्हणून त्या कश्यपपुत्र गरुडानें त्याचे वज्रावर एक व अशनीवर एक असे आपले पंख सोडले. इतक्यांत गरुडाचे झपाट्यानें तो पारियात्र गिरि दडपून जाऊन हे राजा, चौफेर फुटून धरणींत चालला; आणि मोठ्या मोठ्यानें श्रीकृष्णाला आदरपूर्वक हांका मारूं लागला. तो धरणीपृष्ठावर थोडासा शिलक राहिला आहे तों श्रीकृष्णांनीं त्याकडे पाहिलें. तेव्हां त्याला मुक्त करून तो देव गरुडासह पुनः आकाशांत गेला. आणि त्या सर्वसृष्टिकर्त्या व लोककल्याणकर्त्या देवानें प्रद्युम्नाला सांगितलें कीं, असाच द्वारकेला जा आणि माझे तेजोबलाचे विश्वासावर माझा रथ दारुकासह घेऊन ये. अगदीं वेळ लावूं नको. दादा बलराम आणि कुकुराधिपति यांना सांग कीं, मी उदईक इंद्राला जिंकून द्वारकेस येतों.

बापाची ही आज्ञा ऐकतांच त्याला 'बरें आहे' असें बोलून तो धर्मशील व समर्थ प्रद्युम्न द्वारकेला गेला आणि बलराम व यादवेंद्र या दोघांना तो निरोप सांगून एका घटकेचे आंत दारुकासह कृष्ण—रथावर बसून पुनः पूर्वस्थलीं आला.

## अध्याय चौऱ्याहत्तरावा.

—:०:—

### कृष्णकृत शिवस्तुति.

वैशंपायन म्हणतात—नंतर श्रीकृष्ण त्या रथावर बसून सुरपति इंद्र ऐरावतारूढ होऊन जेथें राहिला होता, त्या पारियात्र पर्वतावर गेला. जनार्दन येतो आहे असें पाहून त्या महात्म्या वासुदेवाचा प्रभाव जाणणारा तो पारियात्र गिरी जनार्दनाचें इष्ट व्हावें म्हणून तत्काल सहाणेच्या खुराइतकें क्षुद्र रूप घेऊन भूमींत शिरला. त्या कृत्यामुळें, हे राजा, कृष्ण त्यावर प्रसन्न झाले. हे कुरुनंदना, नंतर तो अच्युत युद्धार्थ जात असतां पारिजातासह गरुड त्याचे पाठोपाठ चालला. आणि महाबल शत्रुहंते प्रद्युम्न व सात्यकी हेही त्या पारिजाताचे रक्षणार्थ गरुडावर बसून बरोबरच आले. इतक्यांत, हे राजा, सूर्य अस्तास जाऊन रात्र पडली, तेव्हां इंद्रकेशवांचें पुनरपि युद्ध जुंपलें. परंतु इंद्राचा ऐरावत गज हा (गरुडाचे) प्रहारानें विशेष घायाळ झाला होता, हें पाहून तो महा तेजस्वी विष्णु इंद्राला वीराला कांहींसें कमीपणा आणणारें भाषण बोलला. तें असें कीं, "हे महाबाहो, हा तुझा ऐरावत पूर्वींचे गरुडाचे तडाक्यामुळें अजून फारसा समर्थ झाला नाहीं; शिवाय आतां रात्रही पडत आहे, याकरितां मर्जी असल्यास उदयिक मनाप्रमाणें आपण युद्ध करूं." कृष्णाचे या म्हणण्यास 'ठीक आहे' असें उत्तर इंद्रानें दिलें.

हे राजश्रेष्ठा, मग तो धर्मात्मा इंद्र भोंवतीं पर्वताचें आवरण उभें करून त्या पुष्करतीर्थावरच राहिला. इतक्यांत, हे कौरवा, ब्रह्मदेव, महर्षि कश्यप, अदिति, सर्व देव व सर्व मुनि, साध्य, विश्वेदेव, अश्विनीकुमार, आदित्य, रुद्र, वसु हे सर्व तेथें आले. कृष्णही आपला पुत्र प्रद्युम्न व मित्र सात्यकी यांसह मोठ्या आनंदानें त्या रम्य पारियात्र गिरीवरच राहिला. व हे नृपाला, तो पारियात्र पर्वत आपले भक्तीसाठीं शाणपादतुल्य (सहाणेचे खुराइतका लहान) झाला, हें पाहून त्या महाद्युति कृष्णानें त्याला वर दिला कीं, हे महागिरे, तुझें अधांग पवित्रतेनें पवित्र जो हिमगिरि त्याचे तुल्य होईल.

[1] गरुड हा विनतेचा पुत्र, व इंद्र हा अदितीचा पुत्र; आणि विनता व अदिती या दोघीही कश्यप ऋषीच्याच स्त्रिया.

हे पर्वतश्रेष्ठा, तूं अनेक वर्णी, मृगांनीं युक्त व मेरुपर्वताचा प्रतिस्पर्धी होऊन या भूतलावर असाच रहा. अनेक विचित्र टेंकड्यांनीं युक्त अशा तुजकडे पाहिल्यानें मला मोठी करमणूक होत आहे.

याप्रमाणें त्या पर्वताला वर देऊन श्रीकृष्णानें देव 'वृषभध्वज' शंकर याला नमस्कार करून नद्यांत श्रेष्ठ जी गंगा तिचें ध्यान केलें. हे भारता, कृष्णानें ध्यान करितांच ती विष्णुपदी गंगा तेथें प्राप्त झाली. मग कृष्णानें प्रथम तिची पूजा करून नंतर तींत स्नान केलें व तिचें उदक आणि बिल्वदळ यांचा संग्रह करून त्या ईश अव्यय हरीनें देवाधिदेव शंकराचें आवाहन केलें. त्या बरोबर उमेसह श्रेष्ठ व समर्थ महादेव तेथें येऊन तें कृष्णानें अर्पिलेलें गंगाजल व बिल्वपत्र यांजवर बसला. तेव्हां केशवानें पारिजात पुष्पांनीं त्याचें अर्चन करून त्या सर्वकर्त्या देवेश्वराचें वाणीनें स्तोत्रही गाइलें. तें असें:—

॥ श्रीकृष्णउवाच ॥ रुद्रो देवस्त्वं रुदनाद्रावणाच्च रोरूयमाणं द्रावणाच्चातिदेवः॥ भक्तं भक्तानाम् वत्सलं वत्सलानां कीर्त्या युङ्क्ष्वेत्वाद्य प्रभवाम्यन्तरेण ॥ १ ॥ ग्राम्यारण्यानां त्वं पतिस्त्वं पशूनां ख्यातो देवः पशुपतिः सर्वकर्मा ॥ नान्यस्त्वत्तः परमो देवदेव जगत्पतिः सुरवीरारिहन्ता ॥ २ ॥ यस्मादीशो महतामीश्वराणां भवानाद्यः प्रीतिदः प्राणदश्च ॥ तस्माद्धि त्वामीश्वरं प्राहुरीशं सन्तो विद्वांसः सर्वशास्त्रार्थतज्ज्ञाः ॥ ३ ॥ भूतं यस्माज्जगदत्यंत धीर त्वत्तोव्यक्तादक्षरादक्षरेश ॥ तस्मात्त्वामाहुरभव इत्येव भूतं सर्वेश्वराणां महतामप्युदारम् ॥ ४ ॥ यस्माज्जितैरभिषिक्तोसि सर्वैर्देवासुरैः सर्वभूतैश्च देव ॥ महेश्वरं विश्वकर्माणमाहुस्त्वां वै सर्वे तेन देवातिदेव ॥ ५ ॥ पूज्यो देवैः पूज्यसे नित्यदा वै शश्वच्छ्रेयः कांक्षिभिर्वरदामेयवीर्य ॥ तस्माद्विख्यातो भगवान्देवदेवः सतामिष्टः सर्वभूतात्मभावी ॥ ६ ॥ भूमित्रयाणां देव यस्मात्प्रतिष्ठा पुनर्लोकानां भावनामेयकीर्तिः॥ त्र्यंबकेति प्रथमं तेन नाम तवाप्रमेय विदशेशनाथ ॥ ७ ॥ शर्वशः शत्रूणां शासनादप्रमेयस्तथा भूयः शासनाच्चेश्वरेण ॥ सर्वव्यापित्वाच्छंकरत्वाच्च सद्भिः शब्दस्येशानः श्रीकरार्काग्र्यतेजाः ॥ ८ ॥ संसक्तानां नित्यदा यत्करोषि शमं भ्रातृव्यान्यद्व्यनैषीः समस्तान् ॥ तस्माद्देवः शंकरोस्य प्रमेयः सद्भिर्द्धर्मज्ञैः कथ्यसे सर्वनाथः ॥ ९ ॥ दत्तः प्रहारः कुलिशेन पूर्वं तवेशान सुरराज्ञातिवीर्य ॥ कण्ठेनैत्यं तेन ते यत्प्रवृत्तं तस्मात्ख्यातस्त्वं नीलकंण्ठेति कल्पः ॥ १० ॥ यल्लिङ्गाङ्कं यच्च लोके भगाङ्कं सर्वं सोमत्वं स्थावरं जङ्गमं च ॥ प्राहुर्विप्रास्त्वां गुणिनं तत्वविज्ञास्तथा धेयामाम्बिकां लोकधात्रीम् ॥ ११ ॥ वेदैर्गीता सा हि तत्वं प्रसूता यज्ञो दीक्षाणां योगिनां चातिरूपः॥ नात्यद्भुतं त्वत्समं देव भूतं भूतं भव्यं भवदेवाथ नास्ति ॥ १२ ॥ अहं ब्रह्मा कपिलो योप्यनन्तः पुत्राः सर्वे ब्रह्मणश्चाति वीराः ॥ त्वत्तः सर्वे देवदेव प्रसूता एवं सर्वेशः कारणात्मा त्वमीड्यः ॥ १३ ॥ इति संस्तूयमानस्तु भगवान्गोवृषध्वजः ॥ प्रसार्य दाक्षिणं हस्तं नारायणमथाब्रवीत् ॥ १४ ॥ मनीषितानामर्थानां प्राप्तिस्ते सुरसत्तम ॥ पारिजातं च हर्तासि मा भूत्ते मनसो व्यथा॥ १५॥ यथा मैनाकमाश्रित्य तपस्त्वमकरोः प्रभो ॥ त-

था मम वरं कृष्ण संस्मृत्य स्थैर्यमाप्नुहि ॥ १६ ॥ अवध्यस्त्वमजेयश्च मत्तः शूरतरस्तथा ॥ भावितासीत्यवोचं यत्तत्तथा नतदन्यथा ॥ १७ ॥ यश्च स्तवेन मां भक्त्या स्तोष्यतेऽमरसत्तम ॥ त्वया कृतेन धर्मज्ञ धर्मभाक्स भविष्यति ॥ समरे च जयं विष्णो प्राप्य पूजां तथोत्तमाम् ॥ १८ ॥ बिल्वोदकेश्वरो नाम भविताहमिहानघ ॥ देवेश्वर त्वयास्थापि देवसिध्दोपयाचनः ॥ १९ ॥ इहस्थो पोषितो विद्वान् भक्तिमान् मम केशव ॥ त्रिरात्रमीप्सिताँल्लोकान्गमिष्यति जनार्दन ॥ २० ॥ अविन्ध्या नाम देशेस्मिन् गङ्गा चैव भविष्यति ॥ गङ्गास्नानसमं स्नानं मन्त्रतो भविता तथा ॥ २१ ॥ षट्पुरं नाम नगरं दानवानां जनार्दन ॥ अत्रान्तर्द्धरणीदेशे पराक्रम्य महाबलाः ॥ २२ ॥ एते दैत्या दुरात्मानो जगतो देवकण्टकाः छन्ना वसन्ति गोविन्द सानावस्य महागिरेः ॥ २३ ॥ अवध्या देवदेवानां वरेण ब्रह्मणोनघ ॥ मानुषान्तीरतस्तस्मात्त्वमेतान् जहि केशव ॥ २४ ॥ एवमुक्त्वा महादेवस्तत्रैवान्तरधीयत ॥ परिष्वज्य महात्मानं वासुदेवं जनाधिप ॥ २५ ॥

श्रीकृष्ण म्हणालाः—हे क्रीडासक्ता, जीवांचें रूदन म्हणजे त्यांस मायापाशांत घालून रडविणें व त्यांचें द्रावण म्हणजे मायेची हिंसा करून त्यांची सुटका हेंही तूंच करितोस, म्हणून किंवा रोरूयमाण म्हणजे उच्च शब्दांनीं स्तुत झाला असतां भक्तांचे प्रपंचाचें द्रावण म्हणजे निरसन करितोस. ( म्हणजे जीवांस प्रपंचांत घालणें व त्यांतून त्यांस मुक्त करणें हे दोन्ही खेळ तूंच करितोस. ) म्हणून तुला रुद्र असें म्हणतात. तूं सर्व प्रकाशमान् वस्तूंहून प्रकाशवंत आहेस. भक्तांचा भक्त व वत्सलांचा वत्सल असा जो तूं त्या तुझ्यामुळें मी कार्यसमर्थ झालों आहें. तर आज मला यशस्वी कर. तूं ग्राम्य तसेंच वन्य पशु यांचाही स्वामी असल्यामुळें तुझी पशुपति या नांवानें प्रसिद्धी आहे. तूं सर्वकर्ता आहेस. तुजवांचून देवदेव असा दुसरा कोणीही नाहीं. तूं जगताचा पति असून देववीरांचे शत्रूंचें कंदन करणारा आहेस. ज्याअर्थीं तूं मोठमोठ्या सत्ताधीशांचाही स्वामी आहेस आणि शिवाय सर्वांस आदिभूत, प्रीतिदायक व प्राणदाता आहेस, त्या अर्थीं सर्वशास्त्रार्थ ज्ञाते सज्जन विद्वान् तुला 'ईश्वर' असें म्हणतात. हे अत्यंत धीरा, व हे अक्षररूप जे जीव त्यांच्या ईशा, ज्या अर्थीं हें जगत् अव्यक्त व अक्षररूप जो तूं त्या तुजपासून झालें, त्या-अर्थीं तुला 'भव' असें म्हणतात. तथापि तूं भूत म्हणजे नित्यसिद्ध असून सर्व ईश्वरांहूनही उदार आहेस. हे देवाधिदेवा, ज्याअर्थीं युद्धांत पराजित झालेल्या सर्व देवांनीं, असुरांनीं व सर्व भूतांनींही तुजवर ( माझे रूपानें ) अभिषेक केला आहे, त्या अर्थीं तुला महेश्वर व विश्वकर्मा असें म्हणतात. हे अमेयवीर्या, हे वरदा, ज्यांना आपलें शाश्वत कल्याण व्हावें अशी इच्छा असते असे देव सर्वदा तुझें पूज्याचें पूजन करितात. आणि याचमुळें देवांचा देव, सज्जनांचा प्रिय व सर्वभूतात्म्यांचा कर्ता अशी तुझी ख्याति आहे. हे अप्रमेय, हे अमेयकीर्ति, हे जगत्कारणा, ज्यापक्षीं तूं भूर्, भुवर् व स्वर् या तीन लोकांना आधारभूत आहेस, त्याअर्थीं तुझें 'त्र्यंबक' म्हणजे तिहींचा प्रकाशक अशा अर्थाचें हें नांव, हे सर्व

१ या ठिकाणीं आनंदाश्रम लेखी, आमची लेखी, छापील मुंबई व छापील एशियाटिक सोसायटी या चारही प्रतींचा पाठ 'प्रभवाम्यंतरेण' असा आहे. वाईकरांना "त्वां प्रवद्ये शरण्यम्" हा पाठ कोठून सांपडला ?

देवेशा, सुप्रसिद्ध आहे. तूं शत्रूंना शासन करितोस, म्हणून तुला 'शर्व' असें म्हणतात. तूं शत्रूंना अक्षेप्य आहेस,म्हणून तुला अप्रमेय म्हणतात. तूं अंतर्यामी रूपानें जीवांचें शासन करीत असून बाह्यतः नृपरूपानेंही तूंच त्यांचा शास्ता आहेस. कारण, आंतून व बाहेरूनही तूंच व्यापक आहेस. व तूंच सज्जनांचें कल्याण करणाराही असल्यानें तुला 'शंकर' म्हणतात. (किंवा) तूं प्रमेयरूपानें सर्व शब्दांचा नियंता व श्री म्हणजे ऋक्, यजुःसामादि संपत्ति तिचा कर्ता व तेजानें सूर्याहूनही अधिक तेजस्वी आहेस. तूं तुझे ठिकाणीं आसक्त असणारांचें सर्वदा कल्याण करितोस, व जे तुझे दायाद आहेत त्यांना त्यांचे कल्याणार्थ शिक्षा लावितोस, यामुळेंही तुला 'शंकर' असें म्हणतात. तूं प्रमाणातीत असून धर्मवेत्ते जे भले लोक आहेत, ते तर तुला 'सर्वनाथ' असें म्हणतात. हे अतिवीर्ययुक्ता, हे ईशाना, पूर्वीं देवेंद्रानें आपल्या वज्रानें तुला प्रहार केल्यानें तुझे कंठाचे ठिकाणीं नीलिमा उत्पन्न झाला व तूं इंद्राचा प्रतिकार करण्यास समर्थ असूनही तसें न करितां आपणास उलट 'नीलकंठ' ह्मणून म्हणवून घेतोस, त्यावरून तुझें दयालुत्व व्यक्त होतें. हे उमेसहित असणाऱ्या देवा, या जगतांत लिंग ( पुरुषचिन्ह ) व भग ( स्त्रीचिन्ह ) यांनीं युक्त जेवढीं स्थावर व जंगम भूतें आहेत, तीं सर्व सगुणरूप धरलेला तूं व तुलाही ध्येय अशी जी लोकधात्री उमा हीं दोघेंच आहांत, असें तत्त्ववेत्ते ब्राह्मण म्हणणात. वेदानें 'अजामेकां' इत्यादि प्रकारें जिचें वर्णन केलें ती मायारूपिणी उमा प्रथम ' महत् ' हें तत्त्व प्रसवली. तें महत् क्रियाशक्ति व ज्ञानशक्ति, या उभय शक्तींनीं युक्त असल्यामुळें पहिल्या ( कर्म ) रूपानें दीक्षा घेणारांचा यज्ञ तूंच आहेस. व दुसऱ्या ( ज्ञान ) रूपानें योग्यांचें लयरूप तूंच आहेस. तूं रूपातीतही आहेस. हे देवा, तुजसारखें अद्भुत दुसरें कोणीच नाहीं. भूत, भविष्य, वर्तमानही तुजवांचून सर्व नाहींतशीं आहेत. हे देवदेवा, स्वतः मी, ब्रह्मा, कपिल, अनंत ( शेष ) तसेंच कामक्रोधादि शत्रूंना जिंकणारे असे ब्रह्मदेवाचे सनकादि सर्वही पुत्र, हे सर्व तुजपासून जन्मले. यासाठीं तूंच सर्वेश, कारणात्मा व सर्वांस स्तुत्य असा आहेस.

याप्रकारें नारायणानें स्तुति केली असतां तो वृषभध्वज उजवा हात पुढें करून त्याला म्हणाला, हे सुरश्रेष्ठा, तूं इच्छिलेला अर्थ तुला प्राप्त झाला समज. आणि हा पारिजातही तूं घेऊन जाशील. याकरितां तुझे मनाला दुःख होऊं देऊं नको. हे प्रभो कृष्णा, ज्या अर्थीं या मैनाक पर्वताचा आश्रय करून तूं तप केलेंस, त्या अर्थीं हे कृष्णा, माझे वराचे स्मरणानें तुझे चित्ताला या मैनाक पर्वताप्रमाणें स्थिरत्व येऊं दे. तूं अवध्य व अजिंक्य असून मजपेक्षांही शूर होशील असें जें मी तुला बोललों आहें, तें तसेंच होईल; अन्यथा होणार नाहीं. हे धर्मज्ञा, ज्या स्तोत्रानें तूं माझें आतां स्तवन केलेंस त्याच स्तोत्रानें जो कोणी माझें स्तवन करील तो धर्मनिष्ठ होईल. व हे विष्णो, शिवाय त्याला समरांत जय व उत्तम पूजाही प्राप्त होईल. हे निष्पापा, आजपासून मी या स्थळीं बिल्वोदकेश्वर या नांवानें प्रसिद्ध होईन. आणि हे देवेश्वरा, ज्या अर्थीं तूं माझी येथें स्थापना केली आहेस त्या अर्थीं येथें माझी जो कोणी प्रार्थना करील त्याला, हे देवा, ती तत्काल सिद्ध होईल. हे केशवा, जो विद्वान् येथें राहून भक्तिपूर्वक तीन रात्री उपोषण करील, तो त्या तपानें इष्ट लोकाला जाईल. येथील ही अविंध्या नामक नदी गंगा

होईल. आणि "गंगा गंगेति" या मंत्रानें जो कोणी स्नान करील, त्याला प्रत्यक्ष भागिरथीस्नानाचें पुण्य लागेल. हे जनार्दना, या प्रदेशीं भूमीचे पोटांत षट्पूर नामक एक दानवनगर आहे. आणि हे गोविंदा, हे महाबल दुरात्मे जगताचे व देवांचे शत्रु बाहेर पराक्रम करून येऊन या महागिरीचे शिखराचे पोटांतही कधीं कधीं दडून रहात असतात. हे निष्पापा, ब्रह्मदेवाचे वरदानानें हे दानव देवदेवांसही अवध्य झाले आहेत. यासाठीं हे केशवा, मनुष्यवेषानें आच्छादित अशा या तुझे कृष्णरूपानें तूंच यांना ठार कर.

हे नृपाळा, याप्रमाणें बोलून व वासुदेवाला आलिंगन देऊन शंकर तेथेंच अंतर्धान पावले. मग महादेव अदृश्य होऊन ती रात्र उजाडली असतां गोविंद त्या पर्वताची स्तुति करून म्हणाला, 'हे पर्वतश्रेष्ठा, ब्रह्मदेवानें पूर्वीं दिलेल्या वरामुळें देवदेवांनाही अवध्य झालेले असे महा दानव तुझे तळीं रहात आहेत. पण मी त्यांचा निरोध केला असतां ते महा बलाढ्यही असुर बाहेर पडूं शकणार नाहींत. आणि मी द्वारनिरोध केला म्हणजे माझे आज्ञेनें जागचे जागींच मरून नाहींतसे होतील. हे महागिरे, मी सर्वकाळ तुझेपाशीं असेन आणि या महा भयंकर असुरांचें नियमन करून येथेंच राहीन. हे पर्वतश्रेष्ठा, तुझ्या शिखरावर चढून येऊन जो कोणी माझे रूपाचें दर्शन घेईल, त्यास सहस्र गोदानांचें शाश्वतचें फळ मिळेल. त्याचप्रमाणें तुजवरील दगड नेऊन त्यांपासून माझी प्रतिमा घडवून त्या प्रतिमेची जे कोणी नित्य शुश्रूषा करितील, ते शेवटीं माझे गतीला पावतील.

याप्रकारें वरद कृष्णानें त्या पर्वतावर कृपा केली व त्या वेळेपासून तो देवेश अच्युत तेथेंच राहिला. हे कौरवा, ज्यांना विष्णुलोक मिळण्याची इच्छा आहे असे लोक त्या पर्वतावरील पाषाणाची कृष्णमूर्ति करून तिची शुश्रूषा करितात.

---

## अध्याय पंचाहत्तरावा.

—:०:—

### स्वर्गाहून पारिजात आणिला.

वैशंपायन ह्मणतातः—हे राजा, नंतर महाशय कृष्ण त्या बिल्वोदकेश्वराला नमस्कार करून श्रेष्ठ अशा रथांत बसून निघाला. मग सर्व देवगणांसह पुष्करतीर्थासन्निध ज्याचा गौरव केला होता, अशा महेंद्राला त्या मधुसूदनानें रथांत बसल्याबसल्याच ( युद्धार्थ ) हांक मारिली. तेव्हां सज्जनांचे सर्व काम पुरविणारा तो देवेंद्र आपल्या जयंत पुत्रासह उत्तम अश्व जोडिलेल्या अशा आपल्या रथांत बसला. हे कुरुनंदना, नंतर दैवयोगानें त्या पारिजात वृक्षाकारणें त्या उभयही देवांचें ( कृष्ण व इंद्र) रथांत बसूनच युद्ध झालें. त्या वेळीं शत्रुसैन्याला पीडा देणारा विष्णु जलद सरळ जाणाऱ्या बाणांच्या जालानें देवराजाचे सैन्यांना प्रहार करूं लागला. हे प्रभो, दोघेही जरी समर्थ होते, तरी विष्णूनें महेंद्राला किंवा महेंद्रानें विष्णूला शस्त्रप्रहार केला नाहीं. हे जनेश्वरा, त्या जनार्दनानें इंद्राचे रथाच्या अश्वांपैकीं एकेक अश्व, अस्त्रापासून सोडलेल्या अशा तीक्ष्ण दहा दहा बाणांनीं मारिला. त्याचप्रमाणें हे राजेंद्रा, त्या सुरसत्तमानेंही कृष्ण-रथाचे शैब्यप्रभृति अश्वांस अस्त्राभिमंत्रित अशा घोर बाणांनीं अच्छादून टाकिलें. शिवाय, कृष्णानें ऐरावत गजास सहस्रावधि बाणांनीं भरून काढिलें. उलट पक्षीं, त्या बलशत्रु इंद्रानें कृष्णाचें वाहन जो गरुड त्याला तसेंच केलें. त्या दिवशीं ते महात्मे कृष्ण व इंद्र दोघेही शत्रूला भय उत्पन्न करणारे वीर परस्परांशीं भूमीवर

स्थित असलेल्या रथामधून लढले. त्यांच्या धक्क्यानें पाण्यांत पडलेल्या नावेप्रमाणें सर्व पृथ्वी कांपूं लागली. व हे भारता, सर्व दिशाप्रांत सर्वभर पेटल्यासारखे झाले. गिरिवर हालूं लागले, वृक्ष तर शेंकडोंशें पडलेच आणि धार्मिक व गुणी असेही कित्येक मनुष्य धरणीपृष्ठावर पडले. हे राजा, तेथें शतशः दुसरे अपघात झाले आणि सर्व नद्या उलट दिशेनें वाहूं लागल्या. समंतात् वारे वाहूं लागले व निस्तेज उल्कांचे पात झाले. वरचेवर प्राण्यांचे समुदाय त्या रथांचे घडघडाटानें मूर्च्छित होऊं लागले. हे लोकेशा, जलांत अग्नि पेटूं लागला. आणि आकाशांत सर्वत्र ग्रहाग्रहांच्या युति किंवा टकरा होऊं लागल्या. स्वर्गांतून भूतलावर कितीतरी तेजोगोल ( तारे ) पडले. दिक्पालनकर्ते गज चवताळले व तसेच धरणिवरील हत्ती बिथरले. सर्व आकाश मोठमोठ्यानें गर्जना करून उल्का व रक्त यांचा वर्षाव करणाऱ्या धूसर व रक्तवर्ण मेघखंडांनीं आच्छादून गेलें त्या वेळीं ते दोघेही राजपुंगव सुरश्रेष्ठ वीर युद्ध करतांना पाहून भूमि, स्वर्ग किंवा आकाश यांपैकीं एकही स्वस्थानीं ठरले नाहीं. अशा प्रसंगीं जगताचें हित व्हावें म्हणून मुनिगण मंत्र जपूं लागले व इतर महात्मे ब्राह्मण मोठ्या त्वरेनें त्या कामीं मुनींना साहाय्य करण्यास उभे राहिले.

या वेळीं महा तेजस्वी ब्रह्मदेव कश्यपाला असें म्हणाला कीं, हे सुव्रता, तूं आपली स्त्री अदिति हीसह जा, आणि तुझे पुत्र युद्धापासून निवृत्त कर. तेव्हां कश्यपमुनि ब्रह्मदेवाला 'बरें' म्हणून रथांत बसला व त्या वीरश्रेष्ठांपाशीं येऊन उभा राहिला. अदितीसह कश्यप हे आपले दोघांचे मध्यंतरीं येऊन उभे आहेतसें पाहतांच ते दोघेही महाबल वीर आपले रथावरून उतरून धरणिवर आले. आणि शस्त्रें खालीं ठेवून ते अरिंदम वीर मातापितरांचे पायां पडले. त्यांचे मातापितर धर्मांचीं तत्त्वें जाणणारे व सर्व भूतांचे हिताविषयीं तत्पर असे होते. मग अदितिमातेनें दोघांनाही हातीं धरून म्हटलें कीं, बाबांनो, जसे कांहीं तुम्ही एका पोटांतून आलांच नाहीं, अशांसारखे एकमेकांना मारावयास उठलां, याला काय म्हणावें? एवढ्या तेवढ्या क्षुद्र गोष्टीसाठीं इतक्या थरावर गोष्ट आली हें काय? निदान माझे पुत्र म्हणविणारांना हें सर्वथा अनुचित आहे, असें मी समजतें. तुम्हांला जर आईचें व पिता कश्यप प्रजापति यांचें वचन ऐकणें असेल, तर शस्त्रें खालीं ठेवून येथें उभे रहा; आणि माझे सांगण्याप्रमाणें वागा. तें आज्ञोत्तर ऐकतांच ते दोघेही वीर, स्नान करावें या हेतूनें गंगेवर गेले. जातांना इंद्र म्हणाला, हे कृष्णा, तूं प्रभु व सर्वलोककर्ता असून तूंच मला या स्वर्गाचे राज्यावर बसविलेंस, आणि तूंच स्थापना करून तूंच माझा पाणउतारा करितोस, हें कसें? या प्रकारें माझें भाऊपण अंगिकारून व माझे वडिलपणाला आजपर्यंत मान देऊन, हे कमलाक्षा, आज सगळ्याचेंच निर्वाण तूं करूं लागलास, हें तुला साजतें काय? असें बोलल्यावर दोघेही गंगाजलांत स्नान करून त्यांचे दृढव्रत उभय पितर ( अदिति व कश्यप ) जेथें उभे होते, तेथें आले. ही त्या कमलनेत्र पुत्रपितरांची गांठ जेथें पडली, त्या ठिकाणाला मुनि लोकांनीं "प्रियसंगमन" असें नांव दिलें. मग श्रीकृष्णानें इंद्राला अभयवचन दिलें. त्या वेळीं तेथें धर्माचारी असे सर्व देवगण जमले होते ते तें अभयवचन ऐकतांच आपापले विमानांत बसून सर्वही स्वर्गास गेले. जातांना त्यांना अनुरूप अशी समृद्धि प्राप्त झाली. नंतर कश्यप, अदिति, इंद्र व कृष्ण हीं चौघें एकाच विमानांत बसून स्वर्गास गेलीं. ती

धर्मिष्ठ मंडळी इंद्राच्या सर्वगुणसंपन्न व रमणीय अशा सदनास गेल्यावर मोठ्या आनंदानें एक रात्र एकत्र राहिली. त्या वेळीं धर्मवेत्त्या इंद्रपत्नीनें भूतहितकर्त्या महात्म्या कश्यप मुनीची व त्याच्या पत्नीची उपचर्या केली. मग ती रात्र उजाडल्यावर सर्वभूतहितकर्त्या श्रीहरीला धर्मरहस्य जाणणारी अदिति म्हणाली, " हे उपेंद्रा, तूं आतां द्वारकेला जा. व हा पारिजातही तुजबरोबर घेऊन जा. आणि तुझे बायकोची एवढी मनाची हौस आहे, तर या वृक्षानें तिचें तेवढें पुण्यकव्रत संपाद. सत्यभामेचें तें पुण्यकव्रत पदरांत पडलें म्हणजे, माझ्या बाबा, तूं हा पारिजात पुनरपि या नंदनवनांत योग्य स्थानीं आणून ठेवावा. "

याप्रमाणें ती यशस्विनी देवमाता जिला महात्मा नारदांनीं धर्मगुणाची जोड दिली होती, ती बोलली असतां कृष्णानें तिला "बरें" म्हणून सांगितलें. मग श्रीकृष्ण मातेस, पित्यास व शचीसह देवेंद्रासही वंदन करून द्वारकेस जाण्यास निघाला. हे कौरवा, कृष्ण द्वारकेस जात असतां धर्मचारिणी मनस्वी पौलोमी ( इंद्राची स्त्री ) हिनें कृष्णाचे सर्व स्त्रियांकरितां भेटी दिल्या. त्यांत सर्व प्रकारचीं दिव्य रत्नें व अनेक रंगांनीं रंगविलेलीं व सुवासिक चूर्णांनीं सुगंधित केलेलीं अशीं वस्त्रेंही होतीं. ह्या देणग्या माधवाच्या सोळा सहस्र स्त्रियांस पुरेशा होत्या. त्या सर्व घेऊन तो महातेजस्वी कृष्ण वाटेंत आकाशचारी पुण्यशील पुरुषांची पूजा घेत घेत सात्यकी व प्रद्युम्न ह्यांसह रैवतकगिरीला येऊन प्राप्त झाला. आणि त्या वृक्षश्रेष्ठ पारिजाताला त्या रैवतकावर ठेवून त्यानें द्वारांचे योगानें शोभणारी जी आपली द्वारकानगरी तेथें सात्यकीला पाठवून दिलें. तो जातांना श्रीकृष्ण त्यास म्हणाला, "हे महाबाहो, यदुवर्धना, मी महेंद्रभवनाहून पारिजात येथें घेऊन आलों आहें, ही बातमी सर्वही यादवांना दे. आणि हा पारिजात मी आजच द्वारकानगरींत घेऊन येणार आहें. याकरितां सर्व नगरींत मंगलशोभा करीव. " कृष्णानें असें सांगतांच सात्यकी गेला व दिलेला निरोप जशाचे तसाच सांगून, हे राजा, सांबप्रभृति कुमार व पौरजन यांसह परत आला. नंतर पुढें गरुडावर तो पारिजातवृक्ष लादून रथिश्रेष्ठ प्रद्युम्न रम्य द्वारकेंत शिरला. त्याचे मागून शैब्य आदिकरून अश्व जोडलेल्या रथांत बसून श्रीहरि चालला. त्याच्या श्रेष्ठ रथांतच सात्यकी व सांबही बसले. आणि, हे राजा, बाकीचे जे ( महात्मे यादव ) तेथें आले होते, ते निरनिराळ्या यानांत बसून मोठ्या हर्षानें श्रीकृष्णाच्या कर्तबगारीची स्तुति करीत मागून चालले. पुढें सात्यकीचे तोंडून त्या यादवांनीं जेव्हां स्वर्गांतील कथा वृत्तांत ऐकला, त्या वेळीं त्या अप्रमेय कृष्णाचे अद्भुत कर्मांचा ते सर्व पौर व यादव विस्मय करीत राहिले.

हे राजा, त्या दिव्यपुष्पयुक्त व भाग्यवर्धक अशा वृक्षाला पाहून हृष्ट झालेल्या त्या द्वारकावासी जनांची तृप्ति होईना. त्या अपूर्व, अतर्क्य व कलरव करणाऱ्या मत्त पक्ष्यांनीं युक्त अशा वृक्षाकडे ज्या वृद्धांनीं पाहिलें, त्यांची जराच गेली. ज्या अंधळ्यांनीं पाहिलें ते दिव्यचक्षु झाले. आणि त्या वृक्षाचा सुवास घेतल्यानें रोगी लोक रोगरहित झाले. त्यावर आलाप करणारे शुभ्र कोकीळ पाहून तर तेथील रहिवाशांस फारच मौज वाटून त्यांनीं कृष्णाचे पायांवर डोकें ठेविलें. त्या वृक्षापासून जे लोक फारशा अंतरावर नव्हते, त्यांना नानाप्रकारच्या तुताऱ्या व मधुर गानें ऐकूं येऊं लागलीं. ज्या मनुष्यानें ज्या प्रकारचा मनोहर

गंध आपणास व्हावा, अशा इच्छेनें तें पारिजात पुष्प हुंगलें, त्याला त्या पुष्पापासून तोच सुगंध आला. मग तो अनाद्यनंत भगवान् कृष्ण, कुकुराधिपति, भ्राता बलराम व यादवांपैकीं जे कोणी देवतुल्य पूज्य वृद्ध जन होते, त्या सर्वांची यथायोग्य संभावना करून त्यांस वाटेस लावून आपले मंदिरास गेला. नंतर तो गदाग्रज मधुसूदन तरुश्रेष्ठ पारिजातक समागमें घेऊन सत्यभामेच्या सदनांत शिरला. राणी सत्यभामेला मोठाच आनंद होऊन तिनें प्रथम त्या उपेंद्राचें पूजन केलें, आणि नंतर त्या महाद्रुम पारिजाताचा स्वीकार केला. हे भारता, तो वृक्ष म्हणजे एक आश्चर्यच होतें. कारण, तो मनांत आणावें तसा लहान किंवा मोठा होत असे. कधीं तो सगळ्या द्वारकानगरीला आच्छादून टाकी. कधीं अंगुष्टाएवढा लहान होऊन मुठींत लपवितां येई. हे कौरवा, आपले मनाची गोष्ट प्राप्त झाल्यानें देवी सत्यभामेला फारच हर्ष झाला. आणि तिनें पुण्यकव्रताची सामग्री गोळा करण्याचा क्रम चालविला. हे जनमेजया, त्या कामीं ज्या कांहीं वस्तु या जंबुद्वीपांत मिळण्यासारख्या होत्या, त्या महात्म्या कृष्णानें तेव्हांच गोळा केल्या. नंतर त्या इंद्रानुजवशी-कृष्णानें त्या व्रतांतील दानांचा स्वीकार करण्यासाठीं सत्यभामेचे विनंतीवरून सर्वगुणसंपन्न अशा नारद मुनींचें स्मरण केलें.

## अध्याय शाहत्तरावा.

—:०:—

### पारिजातक परत स्वर्गास पोंचविला.

वैशंपायन म्हणतातः—हे कौरवा, श्रीकृष्णानें ध्यान करितांच मुनिश्रेष्ठ, तपोधन, वाक्पटु नारद तेथें आले. हे राजा, त्यांची वासुदेवानें यथाविधि पूजा करून सत्यभामेचे व्रतदानाचा स्वीकार करावा, म्हणून भक्तिपूर्वक प्रार्थना केली. मग व्रतकाल प्राप्त होतांच नारदमुनींनीं स्नान केलें व कृष्णांनीं त्यांची गंधपुष्पांनीं पूजा करून त्यांस जेवूं घातलें. त्या वेळीं त्या सर्वभूतकर्त्या अव्यय वासुदेवानें आपले प्रिय सत्यभामेसह मोठ्या आनंदित चित्तानें त्या मुनीला जो जो आवडता पदार्थ तो तो वाढला. मग त्या कल्याणीनें कृष्णाचे कंठांत पुष्पमाला घालून त्याला पारिजात वृक्षाशीं बांधलें, आणि कृष्णाचा रुकार घेऊन कृष्णासह तो वृक्ष उदक सोडून नारदास दिला. त्या बरोबरच त्या देवीनें सहस्र धेनु व स्वर्णरूप्यमाणिरत्न, तिल व अन्य धान्यें यांनीं मिश्र असा एक स्वर्णराशीही दिला. तें सर्व दान पदरांत घेऊन व यथेष्ट भोजन खाऊन प्रसन्न झालेला तो मुनिश्रेष्ठ नारद केशवाला म्हणाला, 'हे केशवा, आतां तूं माझी मिळकत झालास. कारण सत्येनें राजरोस तुजवर उदक सोडून तुझें मला दान केलें आहे. याकरितां तूं माझेमागें चल आणि मी सांगेन तें तें करीत चल.' त्यावर मधुसूदनानें "फार नामी गोष्ट" असें उत्तर देऊन नारदमुनि चालूं लागले असतां त्यांचें अनुसरण केलें. नारदमुनि मोठे थट्टेखोर होते. त्यांनीं त्या वेळीं अनेक प्रकारें थट्टा करून अखेर सांगितलें कीं, तूं ( सत्यभामेसाठीं ) येथेंच रहा, मी आतां जातों. नंतर त्याचें गळ्यांतील पुष्पमालाबंधन दूर करून नारद म्हणाले, मी तुजवरची मालकी सोडून तुला सत्यभामेचे हवालीं करितों. परंतु तुझे बदला मालास माल म्हणून मला सवत्स कपिला गाय दे. शिवाय तिळानें भरलेलें भांडें व सुवर्णही दे. कारण या कामीं शंकरांनीं हाच मोबदला सांगितला आहे. हे राजा, कृष्णानें "बरें आहे" असें म्हणून मुनीचे सांगण्याप्रमाणें केलें, आणि हसून नारदाला म्हटलें, 'हे

धर्मज्ञा नारदा, ( आपण मला मुक्त केलें यास्तव ) मी आपणांवर प्रसन्न झालों आहें. याकरितां मजपाशीं कांहीं इष्ट वर मागणें असेल, तर मागावा. माझें आपलेवर पराकाष्ठेचें प्रेम आहे. ”

नारद म्हणालेः—हे सनातना विष्णो, आपण मजवर असेंच सदा प्रसन्न असावें आणि हे महामते, आपल्या कृपेनें मला आपली सलोकता प्राप्त व्हावी. हे संतांना गति देणाऱ्या देवा नारायणा, तुझ्या कृपेनें मी अयोनिसंभव व जन्मजन्मांतरींही ब्राह्मणच होईन, असा वर दे. तेव्हां हे भारता, “ तथास्तु ” असें विष्णु म्हणाले. त्यामुळें बुद्धिमान् मुनिश्रेष्ठ नारदही संतुष्ट झाले. हे कौरवा, हरिपत्नी सत्यभामेनें त्या दिवशीं अतुल तेजस्वी विष्णूच्या सोळाही सहस्र स्त्रियांस आमंत्रणें करून तिनें, इंद्राणीनें पूर्वीं कृष्णाबरोबर जे भेटीचे पदार्थ ( वस्त्रें, रत्नें ) पाठविले होते, ते एकेकीला पाठवून दिले. पारिजात मात्र तिचेच घरीं राहिला. मग कृष्णाज्ञेनें त्या वृक्षाचे गुण नारदांनीं प्रसिद्ध केले. हे कुरुनंदना, वासुदेवानेंही आपले सर्व आप्त, मित्र बोलावून आणिले आणि त्या सर्वांनीं त्या महावृक्षाचें वैभव पाहिलें. महातेजस्वी हरीनें त्या वेळीं कुंती, द्रौपदी व सुभद्रा यांसह आपले मित्र पांडवही तेथें बोलाविले. पुत्रांसह आपली आत ह्मणजे शिशुपालाची माता जी श्रुतश्रवा ती पुत्रांसह भीष्मक राजा, व इतरही मित्र, बंधु व गोतवळ्यांतले लोक तेथें बोलाविले. हे राजा, मोठ्या ऐश्वर्यांत असलेला तो महातेजस्वी जनार्दन त्या वेळीं आपला प्रियमित्र पृथापुत्र अर्जुन यासह आपले अंतःपुरांत रममाण झाला.

याप्रमाणें एक संवत्सर लोटतांच सर्वकर्त्या देवश्रेष्ठ कृष्णानें तो पारिजात पुनरपि स्वर्गास आणिला. तेथें त्या धीमान् व अमेय पराक्रमी प्रभूनें आपली माता अदिति व पिता कश्यप, यांचें दर्शन इंद्रासह घेतलें. तो मधुसूदन पायां पडत असतां अदिति त्याला म्हणाली, ‘हे अमरश्रेष्ठा, तुम्हां दोघां भावांचें सदैव असेंच सख्खेपण नांदो. आणि हे जनार्दना, तूं माझी इच्छा पूर्ण कर.’ त्यावेळीं त्या आत्मज्ञानी कृष्णानें आईचें आज्ञावचन स्वीकारुन आपल्या मातापितांचा निरोप घेतला, आणि मग तो तेजस्वी वासुदेव समयास प्राप्त असें वचन इंद्रास बोलला. तें असें कीं, हे देवेशा, महात्म्या, महादेवानें मला भूमीचे पोटांत कांहीं असुर लपून आहेत, त्यांचा वध करण्याची आज्ञा केली आहे. यास्तव हे मान्या, आजपासून दहा रात्रींचे अवधींत मीं तेथील असुरास मारणार आहें. याकरितां हे महात्मन्, आपणही आपला मित्र प्रवर ब्राह्मण व पुत्र जयंत यांसह असुरवधाचे इच्छेनें मन्निकट असावें. कारण, ब्रह्मदेवाचे वरामुळें ते देवांनीं अवध्य ठरल्यामुळें फार चढून गेले आहेत. आणि यास्तव मनुष्यत्व धारण केलेल्या अस्मादिकांना त्यांचा समाचार घेणें प्राप्त आहे. आणि प्रवर व जयंत यांपैकीं एक, ह्मणजे, प्रवर मूळचा मनुष्य असून देव झालेला आहे, व जयंत हा देवपुत्र आहे. यांनाही ब्रह्मदेवाचा वर आड येत नाहीं.

हे जनमेजया, कृष्णाचें तें वचन ऐकून इंद्र प्रेमभरित होऊन कृष्णाला ह्मणाला, “ ठीक आहे.” आणि नंतर त्या इंद्रोपेंद्रांनीं परस्परांस प्रेमालिंगन दिलें[1].

---

[1] कलकत्ता प्रतींत एक श्लोक अधिक आहे, त्याचा अर्थ, “ हे कुरुशार्दूला, त्या वेळीं इंद्रानें प्रसन्न होऊन कृष्णाला अमृतापासून निर्माण झालेला किरीट व कुंडलांची जोडी हीं दिलीं.

# अध्याय सत्त्याहत्तरावा.

—:०:—

## पुण्यकविधि.

जनमेजय ह्मणालाः—हे तपोधना, व्यासमुनींचे प्रसादानें आपणांस सर्व कांहीं विदित आहे, त्या अर्थीं मला हें पुण्यकव्रत कसें उत्पन्न झालें, तें सांग.

वैशंपायन ह्मणाले:—हे धर्मपालका राजा, हें पुण्यकव्रत पुरातन कालीं उमेनें निर्माण केलें. तें कोणत्या रीतीनें तें ऐक. कोणतेंही काम बिनचूक करणाऱ्या कृष्णानें पारिजात वृक्ष स्वर्गाहून द्वारावतीस नेलासें पाहून चतुर नारद मुनि द्वारकेस गेले. हे निष्पापा, ही गोष्ट महादेवाचे आज्ञेनें षट्पुराचा वध करण्याचे निमित्तानें जेव्हां देव व असुर यांमध्यें भयंकर संग्राम उपस्थित झाला, तेव्हांची आहे. अशा वेळीं एक दिवस धर्मज्ञ नारद विप्र, श्रीकृष्णासह बसले असतां भीमकाची कन्या रुक्मिणी हिनें नारदांस प्रश्न केला. तेव्हां तेथें देवी जांबवती, रागीट सत्यभामा, गांधारराजकन्या योगयुक्ता व यांशिवाय कृष्णाच्या कुलशील व गुणांनीं युक्त अशा धर्मशील व पतिनिष्ठ दुसऱ्या अनेक स्त्रियाही होत्या.

रुक्मिणी ह्मणाली:—हे सुव्रत, हे धर्मनिष्ठ मुने, आपण अप्रतिम वक्ते व सर्वज्ञ आहां. याकरितां आह्मांला या पुण्यकव्रताची उत्पत्ति कशी झाली ती सांगा. हे मुनिश्रेष्ठा, आह्मांला हें समजण्याची फार उत्कंठा आहे, करितां या व्रताचा विधि, फलयोग व दानकाल हीं आह्मांस सांगा.

नारद म्हणाले:—हे पवित्रे, धर्मज्ञे, वैदर्भि, मी पूर्वीं या पुण्यकाचा विधि जसा सांगितला होता, तसाच आतां सांगतों. तर तो तूं आपल्या सवतींसह ऐक. हे राज्ञि, हें पुण्यकव्रत प्रथम शुचिव्रत अशा उमा देवीनें केलें. आणि व्रताचे समाप्तीसमयीं तिनें आपले मैत्रिणींना आमंत्रण दिलें. त्यांत पवित्र दक्षाच्या अदितिप्रभृति सर्व कन्या होत्या. लोकांत पतिव्रता म्हणून गाजलेली देवी इंद्राणी होती. तशीच महाभागा सोमस्त्री सती रोहिणीही होती. हे राजा, त्याचप्रमाणें पूर्वाफाल्गुनी, रेवती, शततारका, मघा ह्याही सोमस्त्रिया होत्या. कारण यांनीं पूर्वीं सती महादेवीची आराधना केली होती. हे भारता, तेथें रुपधारी गंगा, सरस्वती, वेण्या, गोदावरी, वैतरणी, गंडकी व इतर सुंदर नद्या आणि लोपामुद्रा सती व इतर अनेक साध्वीहि आल्या होत्या. हे देवि, ह्या शुभलक्षणी साध्वी जगताला आधारभूत आहेत. तशाच कल्याणकारक पर्वतकन्या, व्रतशील अग्निकन्या, अग्निप्रिया, स्वाहादेवी, यशस्विनी सावित्री, श्री, ऱ्ही, धृति, कीर्ति, आशा, मेधा, प्रीति, मति, ख्याति, सन्नति इत्यादि तपोनिष्ठ व पतिनिष्ठ आणि परोपकारी अनेक स्त्रिया तेथें बोलाविल्या होत्या. व्रतसमाप्तिकालीं अंबिकेनें या सर्वही स्त्रियांचें पूजन केलें व तीळ, रत्नें व सर्व प्रकारचीं धान्यें यांचा केलेला राशि व अनेक रंगी बेरंगी उंची वस्त्रें हीं त्या तपोनिष्ठ साध्वींना उमेनें दिलीं. तेव्हां त्या पूजेचा व वस्त्रादिकांचा स्वीकार करून त्या सर्वही पतिव्रता, हे सुमध्यमे रुक्मिणी, तेथें नानाप्रकारच्या गोष्टी बोलत बसल्या. हे पतिव्रते, त्यांचें तें सर्व बोलणें पुण्यकव्रताविषयीं चाललें होतें. तेव्हां त्या सर्व साध्वींचे अनुमतानें सोमपुत्रीनें उमेला पुण्यकविधीसंबंधें प्रश्न केला. त्या वेळीं परोपकारी उमेनें त्यांचे संतोषार्थ पुण्यकविधि माझे समक्षच त्यांस सांगितला. आणि हे कल्याणी, त्या प्रसंगीं तो रत्नपर्वत मलाच दान दिला. मी तो स्वीकारून पुढें दुसऱ्या ब्राह्मणांस देऊन टाकिला. मग, हे कल्याणि, ती उमादेवी

अरुंधतीची आज्ञा घेऊन जें कांहीं बोलली, तें सर्व मी तुला सांगतों, तूं या सर्व स्त्रियांसह ऐक. हे देवि, मीं पूर्वीं या पुण्यकांचा विधि जसा पाहिला आहे, तसाच तो क्रमवार व संपूर्ण तुह्मांस आतां सांगतों.

## अध्याय अठ्याहत्तरावा.

—:०:—

### पुण्यकव्रतवर्णन.

उमा म्हणाली:—हे शुचिस्मिते, (अरुंधति) पूर्वीं मी जेव्हां माझ्या पतीच्या अनुग्रहानें सर्वज्ञ झालें, त्या वेळीं हा पुण्यकविधि पतीनें मला समजावून दिला व मला समजला किंवा माझे पाहण्यांतही आला. हे अरुंधति, बाकी हा पुण्यकविधि नवीन नसून सनातनच आहे, हें तूं मनांत समज. मला मात्र तो महादेवाचे कृपेमुळें नवीन समजला इतकेंच. हे निष्पापे, माझा बुद्धिमान् पति जो भगवान् शंकर त्याचे अनुज्ञेनें मीं हीं सर्व पुण्यकव्रतें अंगीं आचरलीं आहेत. पुराणऋषींनीं हा पुण्यकविधि ज्या स्त्रीचें पातिव्रत्य व धर्माचरण अखंडित व सर्वकालिक असेल, अशीलाच विहित सांगितला आहे. हे कल्याणि, हे अरुंधति, याचें कारण असें आहे कीं, ज्या असती आहेत, अशांनीं कितीही दानें, उपवास व इतर पुण्यकारक गोष्टी किंवा प्रकृतचीं पुण्यकव्रतें केलीं, तरी तीं निष्फल आहेत. ज्या स्त्रिया पतीशीं प्रतारणा करितात व ज्यांची योनि दूषित ( परपुरुषसंसर्गानें ) होते, अशा स्त्रियांना त्या योनीदोषामुळें पुण्याचें फळ न मिळतां त्या नरकास जातात. उलटपक्षीं, ज्या सतीचे मार्गाचा आश्रय करून राहणाऱ्या सुशील व पतीलाच देव समजणाऱ्या, सदैव धर्मपरायण व एकनिष्ठ, अशा साध्वी आहेत, त्या या जगताला आधार आहेत. ज्यांच्या वाणीचे ठिकाणीं ( पारुष्यादि ) दोष नाहींत, ज्या कायावाचामनानें पवित्र व धैर्ययुक्त व शुभाचरणी असून सदैव शुभच बोलत असतात, अशा स्त्रिया खरोखर या जगताचें धारण करितात. पति व्याधिष्ट असो किंवा कसाही दीन असो, तरी स्त्रीनें त्याचा त्याग करूं नये, हा अनादिसिद्ध स्त्रियांचा धर्म आहे. हे शुभानने, साध्वी स्त्री आपल्या प्रभावानें स्वतःला तारून स्वतःचा पति अकार्यकारी ( भलतेंच काम करणारा ) भ्रष्ट किंवा गुणहीन असला, तरी अशालाही तारिते. वेदामध्यें वाणीनें दुष्ट असलेल्या स्त्रीला ऋषींनीं प्रायश्चित्त सांगितलें आहे. परंतु योनिदुष्ट ( व्यभिचारिणी ) स्त्रीला प्रायश्चित्तच नाहीं. ती कायमची फुकट गेली. हे सत्यव्रते, जिला आपणास सद्गति मिळावी अशी इच्छा असेल, त्या स्त्रीनें केव्हांही कोणतेंही व्रत करणें तरी भर्त्याचे इच्छेनें चालावें; व उपवास करणें तरी त्याचे अनुमतीनें करावा. जिनें आपली योनि भ्रष्ट केली, त्या स्त्रीला सहस्र कल्पांतींही सद्गति मिळत नाहीं, आणि ती हजारों नीच योनींत पचत पडते. कदाचित् अशा जारिणीला मनुष्यजन्म मिळालाच तर तो चांडाळणीचा मिळून तेथेंही तिची फार दुष्टबुद्धि असते व ती कुत्रीं खाते. हे तपोधने, सर्वदा स्त्रियांना पति हाच देव असें सज्जनांनीं सांगितलें आहे. जीवर तिचा पति संतुष्ट आहे, तीच स्त्री खरी सती व खरी धर्माचरणी होय. ज्यांना निरनिराळ्या चवा पाहण्याची उत्कंठा असते, असल्या चारगट स्त्रियांना पुण्यलोक मिळत नाहीं. पण ज्यांचें मन सर्वदा पतीचेच ठिकाणीं निर्मळपणें स्थिर असतें व ज्या कायावाचामनानें पतीचें उल्लंघन करीत नाहींत, अशांना, हे सौम्ये, या पुण्यकव्रताचें फळ सांगितलें आहे. हे स्वर्लोकाला अलंकृत करणारे अरुंधति, तपोबलानें मला ज

पुण्यकविधि अवगत झाला आहे, तो सर्व तूं या सर्व स्त्रियांसह ऐक.

हे सुव्रते, स्त्रीनें प्रातःकालीं उठून स्नान करून प्रथम " मला उपवास करणें आहे, किंवा व्रत करणें आहे," म्हणून पतीची प्रार्थना करावी. नंतर सासूसासऱ्याचे चरणांवर मस्तक ठेवून त्यांचीही आज्ञा घ्यावी. आणि दर्भ व अक्षता यांनीं युक्त असें ताम्रपात्र घेऊन गाईचें उजवें शिंग धुवून त्याचें तीर्थ घ्यावें. व साध्वीनें तें जल स्नान करून शुद्ध झालेल्या आपल्या पतीला द्यावें. आणि स्वतःच्याही मस्तकावर त्यांचें सिंचन करावें. या सिंचनाचें फळ त्रैलोक्यांतील निखिल तीर्थांत स्नान केल्याप्रमाणें आहे. हें सिंचन उपवासदिनीं व व्रतकालीं करीत जावें. हे कल्याणिनि, या प्रकारचें हें स्नान स्त्रीपुरुषांना सारखेंच विहित सांगितलें आहे. हे अरुंधति, मला त्याचें ज्ञान शंकराचे तेजानें व तपोबलानें झालें. असो. ज्यांत कांहीं टोंचत नाहीं, अशा प्रकारचें मऊ शयन व आसन करावें. स्वतःचें पादप्रक्षालन करावें. व्रत किंवा उपवास असेल, त्या दिवशीं तोंड वाजविणें, अश्रु ढाळणें, रुसणें, कलह करणें, इतक्या गोष्टी करूं नयेत. कारण त्या केल्या असतां स्त्रिया व्रतोपवासफलापासून तत्काल भ्रष्ट होतात. हे चंद्रकन्ये, उपवास किंवा व्रतदिन या वेळीं स्त्रियांनीं नेसूंचें व अंगावर घेण्याचें हीं उभय वस्त्रें शुभ्रवर्णच वापरणें प्रशस्त आहे. व्रत असतां स्त्रियांनीं पादत्राणार्थ गवताच्या वाहाणा कराव्या. ( चामड्याच्या वापरूं नयेत. ) उपवासदिवशींही हाच नियम पाळावा. त्याचप्रमाणें सर्वदा व्रतोपवासदिवशीं काजळ, हळद, उटी व पुष्पें यांचा स्वतः उपभोग घेऊं नये. तसेंच काष्ठानें दंतघर्षण करणें, डोकीवरून स्नान करणें, ( न्हाणें ) किंवा आंगास उटणें लावणें, हे सर्व प्रकार वर्ज्य करून या सर्व कामीं शुध्यर्थ मृत्तिकेचा उपयोग करावा, असें सांगितलें आहे. बेलफळ, आवळा, यांनीं मिश्र करून नित्य शुद्धिस्नान करावें व माती मिसळलेल्या जलानें मस्तकाचें प्रक्षालन करावें. हे सौम्ये, कारण, अशा दिवशीं मस्तकाला तैलादि लावणें अप्रशस्त धरिलें आहे. त्याचप्रमाणें अशा दिवशीं अंगास किंवा पायासही तेल मर्दूं नये, अशी शास्त्रमर्यादा आहे. तसेंच व्रतोपवासदिनीं बैल, उंट, गाढव, यांवर बसणें व नागव्यानें अंग धुणें, हेंही वर्ज्य मानिलें आहे. हे चंद्रकन्ये, अशा दिवशीं नदी किंवा झरा यांचें पाणी स्नानाला प्रशस्त आहे. किंवा कमलांनीं युक्त अशा विस्तीर्ण व शुभ तलावांत किंवा पुष्करणींत जाऊन अशा वेळीं स्नान करणें हें सदा प्रशस्त धरिलें आहे. पण अंतःपुरांत कोंडून राहणें प्राप्त असल्यानें एकादे स्त्रियेस असल्या स्थळीं जाऊन उघड स्नान करणें शक्य नसल्यास तिनें त्या ठिकाणचें जल मृण्मय घटांतून आणवून स्नान करावें. मात्र ते घट कोरे असावे. व स्नान करणें तें शिरःस्नान करावें. म्हणजे तिला तपाचें फल प्राप्त होतें.

## अध्याय एकोणऐंशीवा.

—:०:—

### पुण्यकव्रत—चालू.

उमा म्हणाली:—याप्रमाणें सांगितलेल्या एकंदर विधीनें पतीला देव समज-

१ वाईकरांनीं येथें " अमृन्मिश्रैर्जलैः " असा पाठ दिला आहे. ( किंवा घातला आहे. ) यमुना नदींतील चिखलानें केश न्हातांना गरीबगुरिबांच्या स्त्रिया आजकालही प्रयागाकडे आम्ही पाहिल्या आहेत. मातीनें न्हाण म्हणजे अखेर निर्मळ पाणी डोक्यावर न घेणें असा अर्थ नव्हे. तेल, उटणें यांऐवजीं माती वापरणें इतकाच; आहे.

णाऱ्या स्त्रीनें जितेंद्रिय राहून एक संवत्सर, षण्मास, किंवा निदान महिनाभर तरी व्रत करावें. त्या साध्वीनें शांत मनानें अकरा सुवासिनी बोलवाव्या, व मुख्य व्रत करणारी जी ती साध्वी तिनें त्या सर्वही आमंत्रित स्त्रिया त्यांचे भर्त्यांपासून विकत घेऊन आचार्यास उदकपूर्वक द्याव्या. ( हें मीं कांहीं तरी सांगत नाहीं. कारण, मी हा विधि समक्ष पाहिला आहे. ) दानानंतर त्या व्रतकर्त्रीनें त्या सुवासिनींचे मोबदला देशकालानुरूप कांहीं तरी द्रव्य आचार्याला देऊन त्या स्त्रिया त्याजपासून परत घ्याव्या. नंतर मासान्न व्रत करून शुक्लपक्षाच्या नवमीला पूजनपूर्वक व्रताची परिसमाप्ति करावी. व्रतसिद्ध्यर्थ त्या स्त्रीनें व्रतारंभाचे व व्रतसमाप्तीचे दिवशीं अहोरात्र निर्धारानें उपोषण करावें. समाप्तीनंतर आपले पतीचें वपन करवावें. व आपलेंही[1] करवावें. या दिवशीं अंगाला उटणें लावणें व अभ्यंग स्नान करणें हेंही विहित धरिलें आहे. यापुण्यकव्रतसमाप्तीचे दिवशीं विवाहकालचेप्रमाणें जोडप्यानें स्नान करावें. नंतर वस्त्रालंकार व पुष्पें धारण करावीं. आणि कुंभोदकानें आपल्याला लोक स्नान घालीत असतां व्रतकर्त्या साध्वीनें पतीचे चरण वंदन करून मग मनांतल्या मनांत किंवा उघडपणीं " आपोदेव्या " हा मंत्र म्हणावा. त्या मंत्राचा अर्थ असा आहे कीं, या आप ( उदकें ) ऋषींच्या[2] जननी आहेत. याच विश्वाचें धारण ( पोषण ) करितात. त्या दिव्य आहेत. म्हणजे द्युलोकांतून येतात. यज्ञांत त्यांना " मदंती " ( हर्षकारक ) अशी संज्ञा देतात. त्या सुखकारक असून धर्माचें पोषण करणाऱ्या आहेत. त्या सुवर्णाप्रमाणें निर्मळ असून सर्व वस्तूंस पावन किंवा शुद्ध करणाऱ्या आहेत. त्या आपल्या अत्यंत कल्याणकारक अशा रसरूपगुणानें माझें कल्याण करून मला संतुष्ट करोत. जलाला उद्देशून म्हणण्याचा हाच मंत्र सांगितला आहे. परंतु, हे सर्वांगसुंदरि, स्त्रियांना ( वेदोक्त मंत्र वर्ज्य असल्यानें ) पुराणविहित मंत्र सांगितले आहेत त्यांचा अर्थ ऐक. " मी भर्त्याची कल्याणकर्त्री व्हावें, त्याचा द्रव्यव्यय[1] ( खर्च ) करणें तो बेताबातानें करावा. मी सद्गुणी व भर्त्यासह धर्मशील रहावें व भर्त्याची आवडती होऊन त्याचे इच्छित काम पुरविणारी व्हावें. मी आपली कृति, विचार किंवा वाणी यांपैकीं कशानेंही भर्त्याला दुःखी करूं नये आणि सर्वदा त्याचे अंकित वागावें. सवतींत मी भर्त्याची अधिक लाडकी असावें. मला सुंदर पुत्र व्हावे व मीही स्वतः सभाग्य व सुंदर असावें. अन्नादि दानांत माझा हात उदार असावा व सर्वदा बऱ्या गोष्टी बोलत असावें आणि दारिद्रमुक्त असावें. पतीनें सदा प्रसन्नमुख असून माझी प्रतीक्षा करीत असावें सर्वदा माझे ठिकाणीं आसक्त राहून माझे तंत्रानें चालावें व मजवांचून त्याला दुसरी गति नसावी. आमची प्रीति चक्रवाकाच्या जोडप्याप्रमाणें असावी आणि आमचीं मनें परस्परांविषयीं कधींही विरक्त न होतां उत्तरोत्तर अधिकाधिक अनुरक्तच होत जावीं. ज्यांचे

१ केवळ नखें काढणें हेंच स्त्रियांचें वपन होय. किंवा फारच झालें, तर सर्व केशांचीं अखेरचीं दोन बोटें अग्रें छाटून टाकणें हेंच वपन-प्रयागास वेणीदान करितांना महाराष्ट्र स्त्रिया असेंच करितात. आंध्र स्त्रिया मात्र शिरोमुंडण करवितात.

२ " या सुजातःकश्यपो " अशी पावमानी ऋचा आहे.

१ पुरुषाचें काम पैसा मिळविण्याचें परंतु तो खर्च करणें ( व तोही काटकसरीनें ) ही कामगिरी पुराणकाळापासून घरधनिनीचीच आहे आणि योजनाही बहुत गोड आहे. भगवान् मनूनेंही 'गृहेचाऽमुक्तहस्तया' असेंच म्हटलें आहे.

कडून सर्व विश्वाचें धारण होतें, अशा साध्वी स्त्रियांचे लोकास मीं जावें. ज्या साध्वी पित्याचें व पतीचें अशीं उभयकुळें पावन करितात व ज्या पतिभक्तीमुळें उत्कर्ष पावल्या आहेत, त्यांचे लोकास मी जावें. भूमि, वायु, जल, आकाश, अग्नि हीं तत्वें, याचप्रमाणें अंतर्यामी क्षेत्रज्ञ, प्रकृति, महत्तत्त्व, अहंकार हीं सर्व माझे आचरणाविषयीं साक्ष देवोत. व मुनि माझे दृढनिश्चयाचें व व्रताचें स्मरण करोत. जरायुजादि चतुर्विध प्राण्यांचे हे पंचभूतात्मक देह, यांना कारणीभूत अशा ज्या सत्वाद्यभिमानिनी देवतांनीं त्या प्राण्यांच्या कर्मानुसार निर्माण केलें; त्या सर्वत्र असणाऱ्या देवता या माझ्या व्रताचे कामीं व दृढनिश्चयाचे कामीं साक्षी असोत. या माझ्या व्रताचे दृढनिश्चयाचे कामीं चंद्रसूर्य, पापपुण्याचा साक्षी यमधर्म, दाही दिशा, व हा माझा अंतरात्मा हे सर्वत्र असणारे सर्वही जण साक्षी असोत. ”

या प्रकारचे पुराणमंत्रांनीं सर्व द्रव्यांचें अभिमंत्रण व्रतारंभापासून प्रति दिवशीं करीत जावें, असें पुराणांत सांगितलें आहे. हे शुभे, या मंत्रांनीं मंत्रिलेल्या जलानें स्नान केल्यावर साध्वीनें स्वतः कातरून दोन वस्त्रें भर्त्यास द्यावीं. कारण, हे कल्याणि, आपण स्वतःकापिलेलें वस्त्र व्रतकर्त्यानें विघ्न आलें, तरीही नेसूं नये. मुख्य वस्त्र तें कोरें व धुवट असें दुसऱ्यानेंच द्यावें. व व्रतकर्त्यानें त्या वस्त्रांत स्वहस्तें कांतलेलें सूत मिळवावें, म्हणजे झालें. नंतर हे सुमध्यमे, त्या स्त्रीनें आपल्या भर्त्यासह शुचि, जितेंद्रिय, ज्ञानविज्ञाननिपुण, अशा ब्राह्मणाला यथाशक्ति भोजन द्यावें. हे तपस्विनि, नंतर ब्राह्मणालाही वस्त्रांची जोडी द्यावी. व शिवाय शय्या, आसन, गृह, धान्य, दास, दासी, अलंकार व सर्व धान्यांनीं व विशेषतः तिळांनीं मिश्रित असा रत्नपर्वत द्यावा. हा रत्नपर्वत रंगीबेरंगी वस्त्रांनीं आच्छादिलेला असावा. अनुकूल असल्यास हत्ती, घोडे यांचे समूह द्यावे. नसल्यास गाय तरी दिलीच पाहिजे. लवण ( मीठ, ) लोणी, गुळ, मधं[1] व सुवर्ण यांच्या सुंदर उमामहेश्वराच्या प्रतिमा करून दानें द्यावीं. त्याचप्रमाणें सर्व सुगंध, रस, पुष्पें, यांच्या प्रतिमा ( भावनेनें कल्पिलेल्या ) तशाच रौप्यमय, ताम्रमय ( प्रतिमा, ) व हे नंदिनि, सर्व प्रकारचीं फळें, सर्व प्रकारचीं वस्त्रें यांचे ठिकाणींही गौरीशंकराचे प्रतिमेची भावना करून तीं द्यावीं. शिवाय त्याची चित्रमय मूर्ति, लांकडी मूर्ति, दगडी मूर्ति व दहीं, दूध, तूप, दूर्वा यांची काल्पनिक प्रतिमाही द्यावी. याचप्रमाणें आपणास इष्ट असेल, अशा अन्यही कोणत्या पदार्थाची प्रतिमा करून तिला पंचामृतादिकांनीं स्नान घालून व तिची पूजा करून तीं ब्राह्मणास द्यावी. ह्या सर्व गोष्टी देशकाल वर्तमान पाहून आपल्यास अनुकूलता असेल, त्या प्रमाणानें कराव्या. व त्या देतांना थोड्या फार प्रमाणानें कशा द्यावयाच्या त्या कामीं पतीचे छंदानें चालावें. ( आपलाच हेका धरूं नये. ) हे शोभने, तिलपात्रही[2] द्यावें. देऊं नये असें नाहीं. मात्र कपिला गाय व कांस्यपात्र हीं दिलींच पाहिजेत. तीळ व वस्त्र यांसह पांघरण्यासाठीं कृष्णाजिन द्यावें. त्याचप्रमाणें, हे निर्मले, आरसा, मयूरादिकांच्या पिच्छांचा कुंचा व आसनार्थ हरिणचर्म हीं द्यावीं. हे सुंदरि, हें दान दिल्यानें सर्व इच्छा

---

१ मधाची प्रतिमा अर्थात् पात्रांत आकृति काढून.

२ या ठिकाणी “ तिलमात्रं प्रदातव्यं न देयं ननु शोभने” असाही लेखी पोथीचा पाठ असून त्यांतील “न देयं” या पदावर “भर्तुः छंदेन विना” अशी नीलकंठी आहे. तेव्हां तो पाठ प्रमाण धरणें भाग आहे. त्याचा अर्थ तिलपात्रही दान देणें, तर भर्त्याचे संमतीवांचून देऊं नये, असा होतो.

पुरतात. व ती स्त्री सर्वांत श्रेष्ठ, पुत्रवती, भाग्यवती व रुपवती होते. तिचे हात मऊ व तकतकीत होतात. व ती धनपूर्ण व निर्मल नेत्रांची होते. तिचे मनांत आल्यास रूपगुणान्वित अशा कन्याही तिला होतात. आणि त्या कन्याही भाग्यवती, संपन्न, अग्रेसर, पुत्रवती, धनाढ्य व सर्वदा सुशील अशा निपजतात. हे जितेंद्रिये अरुंधति, हें संततिप्रद व्रत सर्वांआधीं मींच केलें असल्यामुळें ह्या व्रताला मजवरून "उमाव्रत" असेंच नांव पडलें आहे. हें व्रत स्त्रियांस फार उत्तम आहे. यास्तव हें त्यांनीं आचरावें. हे निर्मले, या व्रतांत वर सांगितलेलीं दानें दिल्यानें स्त्रियांना सर्व इष्ट काम प्राप्त होतात. ह्या व्रतानें प्रसन्न करून घेण्याचा जो सर्वकर्ता देवाधिदेव शंकर, तोच हे सौम्ये, मला पूर्वीं माझें प्रिय करण्याकरितां ( मला पट्टराणीपद देण्याकरितां ) या विधीनें अभिषेक करिता झाला. या व्रताचे अखेरीस सुवासिनींना भोजन द्यावें. व देशकाल पाहून त्यांचे इतर हेतूही पूर्ण करावे. हे सुंदरि, व्रतांतील दानांपैकीं एकेक वस्तु एकेक ब्राह्मणाला वांटून द्यावी. आणि भोजन मात्र ब्राह्मणांचे इच्छेनुरूप देऊन वर भोजनदक्षिणाही द्यावी. विशेषतः या व्रतांतील भोजनांत तांदुळांची खीर वाढावी. इतर अन्न या प्रसंगीं फारसें इष्ट नाहीं. या भोजनप्रसंगीं प्राणिवध करूं नये, असा पुराणांत वेदानुसार नियम केला आहे.

हे सोमकन्ये, मला महादेवाचे कृपेनें आणखी एक दुसरें व्रत समजलें आहे, तें मी आतां तुला सांगतें. स्त्री म्हटली कीं, तिचें साफल्य पुत्रप्राप्तीवांचून नाहीं, असें थोरांचें म्हणणें आहे. म्हणून पुत्रप्राप्तीची ज्या स्त्रियांना इच्छा असेल, अशांनीं सुवासिनींना चिलींपिलीं ( लहान मडकीं किंवा कोंडुल्या ) द्यावीं आणि पूर्वीं सांगितलेला विधि ज्येष्ठ व आषाढ असे दोन महिने आचरावा. अथवा ज्येष्ठाचाच एक महिना किंवा आषाढाचाच महिना आचरावा. आणि नंतर दोन महिने किंवा महिना ( जसें असेल तसें ) पूर्ण होतांच, हे रूपवती, गुळाची राब किंवा काकवी भरलेली चिलींपिलीं द्यावीं. त्याचप्रमाणें, हे चंद्रप्रभे, तूप, दूध, दहीं, मध व जल या वस्तूंनींही भरलेलीं लहान लहान मडकीं द्यावीं. या मडक्यांची संख्या आपले मनास इष्ट वाटेल तितकी असावी. मात्र तीं सर्वही चिलींपिलीं ज्ञानवृद्ध, नियमशील व जितेंद्रिय अशा एकाच ब्राह्मणाला द्यावीं. एकादे स्त्रीला जर कन्या व्हावी, अशी इच्छा असेल तर तिनें स्त्रियांना उपयुक्त असेल, अशी एकादी वस्तु कन्याप्राप्तीचा हेतु मनांत धरून द्यावी, म्हणजे तिला कन्याप्राप्ति होईल. हे शुचिस्मिते, याशिवाय दक्षिणेबद्दल गाय किंवा सुवर्ण देऊन त्या ब्राह्मणाला वस्त्रही अवश्य द्यावें. त्याचप्रमाणें शुद्धव्रत करणाऱ्या स्त्रीनें व्रतसमयीं ब्राह्मणास यज्ञोपवीतेंही द्यावीं, असा विधि सुज्ञ महादेवानें या घटिदानासंबंधें सांगितला आहे. अपत्यप्राप्त्यर्थ सांगितलेलें हें दान व्रतशील स्त्रियेनें पुत्रेच्छा असल्यास पुष्यादि पुंनक्षत्रावर ब्राह्मणास द्यावें. व कन्येच्छा असल्यास रोहिण्यादि स्त्रीनक्षात्रावर द्यावें. एक संवत्सर पूर्ण होईतों तिनें अशा प्रकारचें व्रत पालन करावें. आणि, हे कल्याणि अरुंधति, हे सत्यवादिनि, संवत्सर समाप्तीसही वरप्रमाणें पतीच्या संमतीनें कोंडुल्या द्याव्या. कार्तिकी पूर्णिमेस व्रतसमाप्ती करून ब्राह्मणास स्वर्णयज्ञोपवीत द्यावें. यज्ञोपवीत, कोंडुल्या व यथाशक्ति दक्षिणा देणारी स्त्री इतर स्त्रियांहून शिष्ट मानली जाऊन तिचे सर्व हेतु पूर्ण होतात. हें व्रत जोपर्यंत करीत आहे तोपर्यंत त्या स्त्रीनें नवें धान्य ( द्विदल ) किंवा नवें ( द्विदल ) फलही खाऊं नये. व

पुष्पांचा उपभोग घेऊं नये. हे धर्मज्ञे, हें पुण्यकव्रत तिनें एक वेळ जेवून करावें. तसेंच ब्राह्मणाला अन्न द्यावें व नंतर भर्त्याला वाढावें. याप्रमाणें, एक संवत्सरपर्यंत जी शुभगात्री करील ती रूपवती, धनाढ्य व सौभाग्यसंपन्न होईल. जी स्त्री या व्रतांत संवत्सरपर्यंत वांगीं खाणार नाहीं, तिला पुत्रशोक कधींही होणार नाहीं, हें ध्यानांत ठेव. याचप्रमाणें व्रतकालांत सशाचें व हरिणाचें मांस सदा वर्ज्य ठेवावें. असें करणारी स्त्री दीर्घायु व पतिव्रता होते. त्याचप्रमाणें स्त्रीनें तुंबीफल म्हणजे भोपळा व पोई हीं वर्ज्य करावीं. व भर्त्याला सुख व्हावें अशी इच्छा असेल, तर सोन्याचा भोपळा करून ब्राह्मणास द्यावा. संवत्सर पूर्ण होतांच एकेक वर्ज्य केलेली भाजी दक्षिणेसह ब्राह्मणास द्यावी. तेणेंकरून ती पुत्रवती व स्त्रियांत अग्रगण्य होईल. याच प्रकारें व्रतारंभापासून स्वतःचें स्वतःच पादप्रक्षालन करणारी स्त्री नित्य प्रतिष्ठेस पात्र होते. व तिला दुःख कधींही प्राप्त होत नाहीं. जी पतिनिष्ठ स्त्री एक वर्षपर्यंत सूर्यप्रकाशानें पवित्र झालेलें अन्न दिवसास खाऊन राहते, आणि रात्रीं मुळींच कांहीं खात नाहीं. ती स्त्री, हे दिव्य स्त्रिये, जीवत्पुत्रा व सौभाग्यवती होते. व सर्व सपत्नींत वरचढ होते, यांत संशय नाहीं. संवत्सर पूर्ण होतांच सुवर्णाची सूर्यप्रतिमा करून दान द्यावें. व तें दान सत्पात्र, दरिद्री, गरजू व कीर्तिमान् अशा ब्राह्मणास द्यावें. ज्या स्त्रीनें सूर्यास्तापूर्वी भोजन करण्याचें व्रत नेमानें केलें असेल, अशा व्रतवतीनें ब्राह्मणाला फलें, पुष्पें व भक्ष्य पदार्थही द्यावे. व हे सुंदरि, जी स्त्री सूर्यास्तानंतर चंद्र व नक्षत्रें यांचे दर्शनानें शीतल झालेलें अन्न नेमानें भक्षण करीत असेल, तिनें योग्य अशा ब्राह्मणाला सुवर्णमय चंद्र, नक्षत्रें व ग्रह यांच्या प्रतिमा देऊन शिवाय वस्त्र व लवणही द्यावें. त्या योगेंकरून, हे अरुंधति, ती कल्याणी स्त्री चंद्राप्रमाणें शीतल गात्रांची, सौभाग्यवती, पुत्रवती व दर्शनीय अशी होते. प्रत्येक पौर्णिमा आली असतां चंद्रोदय होतांच व्रतकर्त्या स्त्रीनें कुश व अक्षता यांसह पुष्पांचें चंद्रास अर्घ्य द्यावे. व गूळ, तूप, रवा यांचा सांजा करून दह्यासह बलि अर्पण करावा. असें करणाऱ्या स्त्रीच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. जी स्त्री आकाश निरभ्र असो वा मेघाच्छादित असो, कोणत्याही दिवशीं सूर्यबिंब पहिल्यावांचून भोजन करीत नाहीं, तिचे इष्ट मनोरथ पूर्ण होतील. अशा सुज्ञ स्त्रीनें शक्त्यनुसार ब्राह्मणाला सुवर्ण हें द्यावेंच; म्हणजे त्या योगानें ती सुंदर व दर्शनीय होईल.

## अध्याय ऐशींवा.

—:o:—

### शरीरसौंदर्यार्थ व्रतोपाय.

भगवती (उमा) म्हणालीः—हे अरुंधति, ज्या पुण्यक व्रतांच्या योगानें हें शरीर दुसऱ्याला सुखकरसें करितां येईल, तीं व्रतें आतां मी सांगतें. श्रेष्ठे, या सर्व स्त्रियांसह तीं तूं ऐक. जी पतिदेवता आपलें एक वेळचें अन्न ब्राह्मणास देऊन कृष्णाष्टमीस उपोषण करिते अथवा मूलफलाहार करिते, व शुभ वस्त्र धारण करणारी, शुभाचारसंपन्न व गुरुदैवत यांची पूजा करणारी होऊन, जी असें व्रत एक वर्षभर करून त्यानंतर ब्राह्मणास गाईच्या शेंपटीच्या केसांच्या दोऱ्या वळून त्यांचे सुंदर चामर व ध्वज, अथवा दक्षिणापूर्ण मिष्टान्न यथाशक्ति देते, त्या पतीच्या ठायीं पूर्ण भक्ति ठेवणाऱ्या सुंदरीचे केंस वक्र, कुरळ्या अगांचे व कंबरे-

वर लोंबणारे होतात. आपलें मस्तक दुसऱ्यांस सुखकर व्हावें, अशी इच्छा करणाऱ्या सतीनें आंवळे, बेलफळ व श्रीफळ यांचा कल्क मिळविलेलें शेण मस्तकास लावून नंतर मस्तक धुवावें. गोमूत्र सदा प्राशन करावें. डोकीवरून स्नान करावें. कृष्णचतुर्दशीस हें करावें,म्हणजे व्रत करणारी स्त्री अविधवा, ऐश्वर्यवती व दुःखरहित होते. तिला तापदायक माथेशूळ उठत नाहीं. हे शुचिस्मिते, जी स्त्री आपलें भाळ सुंदर दिसावें असें इच्छित असेल, तिनें नेहमीं प्रतिपदेस एकभुक्त रहावें. एक वर्षभर दूधभात खावा. नंतर स्त्रियांच्या शिरोभागीं बांधावयाचा रौप्यमयपट ब्राह्मणास द्यावा. म्हणजे त्या सुंदरीचें ललाट सुंदर होतें. आपल्या भ्रुकुटी[१] चांगल्या व्हाव्या, अशी इच्छा असेल तिनें सतत द्वितीयेस शाकभात खाऊन लागलाच दुसरे दिवशीं उपवास करावा. याप्रमाणें एक वर्ष करून तें पूर्ण होतांच ब्राह्मणाकडून स्वस्तिवाचन करावें. आणि सुंदर पक्व फळें, दक्षिणेसह सोन्याचे उडीद, लवण व घृतपात्र त्यास द्यावें. ज्या कृशोदरीला आपले कर्ण सुंदर व्हावे अशी इच्छा असेल, तिनें श्रवण नक्षत्र असेल त्या दिवशीं गूळ व तूप घालून केलेला गव्हांचा सांजा खावा. याप्रमाणें एक वर्ष पुरें झालें असतां घृतामध्यें घालून दुधासह सोन्याचे कान ब्राह्मणास द्यावे. जिला आपलें नाक लालाटीस लागलेलें, अव्यंग व निरोगी असावें असें वाटत असेल, तिनें तिळाच्या झाडाचें चांगल्या रीतीनें रक्षण करून तो फुलेपर्यंत सदा जलानें शिंपावें. फुलें येऊन तीं फुललीं म्हणजे आदल्या दिवशीं उपोषण करून दुसरे दिवशीं त्यावर जल शिंपडावें. नंतर त्यावरील फुलें काढून घेऊन तीं तुपांत घालावीं व ब्राह्मणांस द्यावीं. नेत्र सुंदर व्हावेत असें जिला वाटत असेल, तिनें एक दिवस दूध किंवा तूप पिऊन उपवास करावा व दुसऱ्या दिवशीं भोजन करावें. याप्रमाणें, एक वर्षभर अनुष्ठान झालें म्हणजे त्या पंडितेनें पद्मपत्रें व कमलपत्रें दुधांत टाकावींत व त्यांत तीं तरंगत[१] असतां त्या साध्वीनें ब्राह्मणांस द्यावीं. हें दान दिल्यानें ती हरिणाक्षी होते. जी धर्मगुणयुक्त स्त्री सुंदर ओंठांची इच्छा करीत असेल, तिनें एक वर्षभर मृण्मयपात्रानें जल प्यावें. व त्या धर्मभाविनीनें नवमीस अयाचित अन्नाचें भोजन करावें. या त्याप्रमाणें होतात. ती सुभगा होते व सुंदर शरीर, पुत्र व धन यांनीं संपन्न होते. तिच्या येथें पुष्कळ गुरें होतात. जिला सुंदर दांत असावे अशी इच्छा असेल, तिनें शुक्ल अष्टमीच्या दिवशीं भातांची दोन शितेंही खाऊं नयेत. ( उपवास करावा. ) त्यानंतर या प्रकारें एक वर्ष पुरें झालें असतां त्या साध्वीनें रुप्याचे दांत दुधांत घालून द्यावे. असें केल्यानें त्या पतिव्रतेला जाईच्या कळ्यांसारखे दांत प्राप्त होतात. हे अनघे, तिला सुपुत्रत्व व सौभाग्यही प्राप्त होतें. हे सुंदरमुखि, जिला आपलें सर्वच मुख सुंदर व्हावें असें वाटत असेल, तिनें पूर्णिमेच्या दिवशीं शुभ चंद्रोदय झाला असतां स्नान करून दुधांत शिजविलेले जव ब्राह्मणास द्यावे. याप्रमाणें एक वर्षभर नियम चालवून त्यानंतर रुप्याचा शुभ्र चंद्र करावा. तो फुललेल्या कमळांत ठेवून ब्राह्मणाकडून स्वस्तिवाचन करवावें व त्यास त्याचें दान द्यावें. म्हणजे त्या दानाच्या योगानें ती शुभ स्त्री पूर्ण-चंद्रमुखी

१ भ्रूमध्यापासूनच उतरत सारखें आलेलें; मध्येंच फसलेलें किंवा बसलेलें नव्हे.

१ नेत्राचे ठिकाणीं तरलता येण्यासाठीं ही युक्ति दिसते.

होते. आपले स्तन ताडगोळ्याप्रमाणें व्हावेत असें जिला वाटत असेल तिनें नेहमीं दशमीस वाणीचें नियमन करून अयाचित[1] भोजन करावें. याप्रमाणें एक संवत्सर नियम चालला असतां सोन्याचीं दोन शुभ बिल्वदळें करुन तीं दक्षिणेसह ब्राह्मणांस द्यावीं. म्हणजे त्या व्रतकर्त्रीला परम सौभाग्य व बहु पुत्र प्राप्त होतात. व हे देवश्रेष्ठे, ती स्त्री सदा उत्तुंग स्तन धारण करिते. आपलें उदर कृश व्हावें अशी जिची इच्छा असेल, तिनें एकान्न[2] भोजन करावें. त्यांतूनही पंचमीच्या दिवशीं निव्वळ पाण्याबरोबर अन्न खावें. ह्यानंतर हे शुभे, वर्ष पुरें झालें असतां जाईची फुललेली वेल दक्षिणेसह जितेंद्रिय ब्राह्मणास द्यावी. म्हणजे त्या स्त्रीला कृशोदर प्राप्त होतें. जी स्त्री आपले दोन्ही हात रूपयुक्त व्हावे असें इच्छित असेल, तिनें सर्व निर्दोष[3] शाकांच्या योगानें द्वादशी घालवावी. ( एकादी चांगली भाजी खाऊनच रहावें. ) व वर्ष पुरें झालें असतां तिनें सोन्याचीं दोन कमळें व दोन खरीं कमळें विद्वान् ब्राह्मणास द्यावीं. आपला श्रोणीप्रदेश विशाल व्हावा असें जिला वाटत असेल, तिनें हे सुव्रते, त्रयोदशीस अयाचित एकभुक्त भोजन करावें. त्यानंतर एक वर्ष पूर्ण झालें असतां लवणाच्या राशीला चारी दिशांस तोंडें करून ती रास सत्पात्र ब्राह्मणास द्यावी. ब्रह्मदेवासारखें चतुर्मुखाकार केलेलें सोनें द्यावें. धर्मज्ञ स्त्रीनें त्या (सुवर्ण) मूर्तीस अंजन लावावें. पूर्ण रत्नें व रंगविलेलें वस्त्र द्यावें. म्हणजे, हे सौम्ये, त्या स्त्रीला इष्ट श्रोणी प्राप्त होते. जिला मधुर वाणीची इच्छा असेल, तिनें एक वर्षभर अगर महिनाभर मीठ सोडावें व नियम पुरा झाला असतां दक्षिणेसह ब्राह्मणास लवण द्यावें. म्हणजे त्या साध्वीचा ध्वनि पोपटापेक्षां शतपट चांगला होतो. व त्यांत अतिशय माधुर्य येतें. हे सोमनंदिनि, आपले घोटे व पाय मांसल असावेत असें जिला वाटत असेल, तिनें दर षष्ठीस जलासह ओदन भक्षण करावें. अग्नि व ब्राह्मण ह्यांस कधींही पायानें स्पर्श करूं नये. पण जर कदाचित् पाय लागला, तर त्यांस लागलेंच वंदन करावें. पाद्यानें ब्राह्मणाचे दोन्ही पाय धुवावे. आणि या नित्य व्रतांनीं युक्त असलेल्या धर्मज्ञ पतिव्रतेनें, हे पतिव्रते, रुप्याचें कूर्म करून तें घृतांत घालून श्रेष्ठ ब्राह्मणास अर्पण करावें. हे नंदिनि, दानाच्या वेळीं त्या कूर्मावर कमळें उपडीं घालावीं व कांहीं तरी लाल द्रव्य त्यांत मिळवून शिवाय त्या कूर्मास स्वर्णभूषित केलें असावें. आपलें सर्वच शरीर अति मनोहर असावें, अशी जिची इच्छा असेल, तिनें वसंतसमयीं तीन अहोरात्र अथवा कार्तिकी, माघी किंवा आश्विनी षष्ठीस उपोषण करावें. तिनें सदा माता, पिता व अतिथि यांस देव मानावें. ब्राह्मणांस नित्य घृत व लवण[1] द्यावें. त्या पतिव्रतेनें घरांत सडासंमार्जन करावें. हे धर्मज्ञे, सारवून वर रांगोळी घालावी. त्या स्वार्थकुशल स्त्रीनें द्वाड वाणी बोलूं नये. त्या यशस्विनीनें कांहीं खाऊं नये. फार काय पण भाजीपाल्यालाही शिवूं नये. व हे सुंदरि, बलिदान करून तिनें असत्याचा त्याग करावा.

---

१ आमंत्रण नसतां एकदम दुसऱ्याच्या घरीं भोजनाचे वेळीं जाऊन भोजन करणें यास अयाचित भोजन म्हणतात.

२ कलकत्ता व आमची लेखी पोथी यांचा हा पाठ आहे. मुंबई प्रतीचा "एकांतभोजना" असा पाठ आहे.

३ ज्या शाका व्रताला उक्त धरिल्या आहेत त्या.

१ शरीराचे ठिकाणीं पुष्टि, कांति व लावण्य उत्पन्न करणाऱ्या या जिनसा असल्यामुळें ही योजना दिसते आहे.

## अध्याय एक्यायशींवा.

—:०:—

### उमाव्रतकथन.

उमा म्हणालीः—आपले बांधव गुणवान् असावे असें जिला वाटत असेल, त्या पतिव्रतेनें सदा प्रत्येक सप्तमीस एकवार भोजन करावें. याप्रमाणें एक वर्षभर नियम चालवून त्यानंतर ब्राह्मणास दक्षिणेसह सोन्याचा वृक्ष द्यावा. म्हणजे ती शुभबंधुमती होईल. हे श्रेष्ठे, जी स्त्री सदा करंजेलाचा दीप लाविते व एक संवत्सरभर तसाच क्रम चालवून सोन्याचा दीप देते, ती स्त्री आपल्या कांतीनें पतीला इष्ट व पुत्रवती होते. त्याचप्रमाणें, हे शुभे, ती आपल्या सवतींवर दीपाप्रमाणें प्रकाश पाडीत राहते. जी नेहमीं यज्ञाचें अवशिष्ट अन्न खाणारी, मर्मभेदक भाषण न करणारी, अन्न वर्ज्य न करणारी, पतीला नित्य देव समजणारी, सतत शौचसंपन्न, कधींही कठोर भाषण न करणारी आणि सासू व सासरा यांच्या शुश्रूषेंत सदा तत्पर असणारी साध्वी असते, त्या सत्य, धर्म व गुण यांनीं युक्त असलेल्या पतिव्रतेला उपवास व व्रतें यांचें काय प्रयोजन?

हे सति, आतां मी, जी पतिव्रता स्त्री दैववशात् विधवा झाली असेल, तिचा पुराणोक्त धर्म सांगतें. सज्जनांच्या धर्माचें स्मरण करीत त्या साध्वीनें चित्रमय व मातीची स्वपतीची मूर्ति करून त्याची सदा पूजा करावी. त्या सुव्रत स्त्रीनें व्रत, उपवास व विशेषतः भोजन याविषयीं त्या मृण्मय मूर्तीपासून अनुज्ञा घ्यावी तिनें पतीचें जर अतिक्रमण केलें नाहीं, तर ती पतिलोकास जाते. पतिदेवता विधवा सदा सूर्यासारखी चमकते. आजपासून सर्व देवांच्या स्त्रिया हा पुराणोक्त सनातन पुण्यविधि पाहतील. धर्मात्मा मुनि नारद यांना उपवास व व्रतें यांचा सर्व विधि कळेल. हे श्रेष्ठे, सोमकन्ये, अदिति, तूं व इंद्राणी अशा तिघी पुण्यकव्रताच्या आरंभीं तपाच्या योगानें सर्वदा साध्वींना कीर्तनीय व गुणसंपन्न व्हाल. सर्व उपवासविधि यथार्थपणें जाणाल. तुम्ही व महात्म्या विष्णूची भार्या अशा सर्वजणी रामकृष्णादिकांचे जन्मदिवशीं हा सनातन पुण्यकविधि सतत स्मराल. स्त्रीधर्मांमध्यें पतिभक्ति, अदुष्टत्व व अवाग्दुष्टत्व हे तीन धर्म विशेषेंकरून प्रशस्त आहेत.

नारद म्हणालेः—महादेवीनें याप्रमाणें सांगितलें असतां त्या तपोधन महासाध्वींना आनंद झाला. व त्या हरप्रियेला प्रणाम करून त्या तेथून गेल्या. रुक्मिणि, आतां धर्मचारिणी अदितीनें व्रत कसें केलें तें ऐक. उमेनें सांगितलेला सर्व व्रतविधि तिनें केला. कश्यपाला पारिजातवृक्षाशीं बांधून मला त्याचें दान दिलें. तेंच अदितिव्रत करून सत्यभामेनेंही मला पतिदान दिलें. तेंच व्रत नित्य धर्म करणाऱ्या सावित्रीनें केलें. त्याच उचित साधनांनीं युक्त असलेलें तें व्रत तिनें अधिक चांगल्या रीतीनें केलें. त्या व्रतांत संध्याकाळीं ठिकठिकाणीं पूजन, नमस्कार व जप दुप्पट करावा, असें सांगितलें आहे. हें सावित्रीव्रत अथवा पूर्वोक्त अदितीचें व्रत केल्यानें साध्वी स्त्री भर्तृकुलाला, पितृकुलाला व स्वतःला तारिते. तेंच उमेचें व्रत इंद्राणीनें यथाविधि केलें. त्यांत रंगित वस्त्र व मांसयुक्त भोजन हें अधिक होतें. चवथ्या दिवशीं पुण्यकाकरितां पुनः उपवास करावा व शंभर कुंभ द्यावे. हे यशस्विनी, तेंच उमेचें व्रत गंगेनें केलें. तिच्या व्रतांत प्रातःकालीं आपल्या जलांत स्नान करणें एवढाच काय तो विशेष होता. अथवा हे हरिप्रिये, दुसऱ्या नदीच्या जलांत माघशुक्लपक्षीं स्नान करावें. याचें 'गंगाव्रत' असें नांव असून तें सर्व कामना पूर्ण करणारें म्हणून सांगितलें आहे.

रुक्मिणि, हें गंगाव्रत करणारी धर्मज्ञ स्त्री एकवीस कुळांना तारते. गंगेच्या शुभव्रतामध्यें सहस्र कुंभ द्यावे. सर्व दुःखांतून तारणारें व सर्व मनोरथ परिपूर्ण करणारें तें व्रत " सार्वकामिक " या संज्ञेस पात्र झालें आहे. यमभार्येनें शुभ ' यामव्रत ' केलें. तें हे रुक्मिणि, हेमंतऋतूंत उघडच्या स्थानीं करावें. स्नान करून पवित्र आचारसंपन्न स्त्रीनें पतीस नमस्कार करावा. व उघडच्या जागीं स्थित होऊन तिनें हीं वाक्यें म्हणावीं:—"मी यामरथव्रत करितें आहें व त्यासाठीं पाठीवर हिम धारण करितें. या योगानें मी पतिव्रता, जीवत्पुत्रा व अग्रगण्य होईन. मी आपल्या सवतींवर अधिकार चालवीन. यमाचें तोंडही पाहणार नाहीं. भर्ता व पुत्र यांसह मी चिरकाल अति सुखानें राहीन. पतिलोकास जाईन. श्रीमती होईन. मी सुवेषयुक्त, तुळतुळीत हातांची, स्वजनांस इष्ट व गुणयुक्त होईन." असा संकल्प करून ब्राह्मणाकडून स्वस्तिवाचन करवावें. मध, काळे तीळ व भाताची खीर यांचें भोजन करावें. हे सुंदरि, हरिप्रिये, पूर्वीं महादेवी रुद्रपत्नीनें सांगितलेलीं अशीं अनेक व्रतें देवींनीं केलीं आहेत. मी माझ्या तपःप्रभावानें सांगतों, तें तुम्ही सर्वजणी मिळून गुणयुक्त व्रतांचें फळ प्रत्यक्ष पहा. उमादेवीनें पूर्वीं जीं पुराणोक्त, कल्याणयुक्त, पावन व शुभ व्रतें सांगितलीं होतीं, तींच मी तुम्हांला सांगत आहें.

वैशंपायन म्हणाले:—राजन्, हा व्रतविस्तार प्रत्यक्ष पाहून रुक्मिणीनें व्रत केलें. उमेच्या वरदानामुळें तिला तो दिव्यदृष्टीनें दिसला. सर्व उमाव्रतांमध्यें बैलाचें दान अधिक आहे. तसेंच रत्नमालेचें दान करून सर्वांना इच्छेप्रमाणें अन्न द्यावें. त्याचप्रमाणें पूर्वीं जांबवतीनें हें उमाव्रत केलें. त्यांत तिनें मनोहर रत्नवृक्ष दिला. एवढें पूर्वोक्त विधीहून तिनें अधिक कार्य केलें. तसेंच सत्यभामेनें मागें जें उमाव्रत केलें, तिनें त्या व्रतांत पिवळें वस्त्र दिलें, हें त्यांत अधिक होतें. रोहिणी, फाल्गुनी, मघा व शतभिषक् यांनींही हें पुण्यलक्षणव्रत पूर्वी केलें आणि त्यामुळें, हे कुरुनंदना, त्या सर्वजणी नक्षत्रांमध्यें मुख्य झाल्या.

## अध्याय ब्यायशींवा.

—:०:—

### षट्पुरवध.

जनमेजयराजा म्हणाला:—हे व्यासशिष्य, तपोधन, धर्मज्ञ वैशंपायना, पारिजाताच्या हरणाचा इतिहास सांगत असतांना आपण षट्पुराचा निर्देश केला व तें दारुण दानवांचें निवासस्थान होतें असेंही सांगितलें; यास्तव हे मुनिश्रेष्ठा, त्या दानवांचा व अंधकाचा वध सविस्तर सांग.

वैशंपायन म्हणाले:—चोख काम करणाऱ्या वीर रुद्रानें त्रिपुराला मारिलें, तरी त्याच्या कुळांत झालेले पुष्कळ ठळक ठळक दैत्य होते, त्यांना शराग्नीनें जाळलें नव्हतें. ते सर्व मिळून बरोबर साठ लक्ष होते. त्याहून न्यून अथवा अधिक नव्हते. आपल्या ज्ञातीच्या लोकांच्या वधामुळें ते वीर संतापून गेले व त्यामुळें त्यांनीं महर्षिसंघांनीं सेवित व संतांस इष्ट अशा जंबूमार्गांत पूर्व काळीं तप केलें. ते वीर वायुभक्षण करून ब्रह्मदेवाची स्तुति करीत सूर्याकडे तोंड करून एक लक्ष वर्षें राहिले. त्यांच्यापैकीं एक टोळी उदुंबर वृक्षाचा आश्रय करून राहिली व ते सर्व वीर तेथें मोठें तप करीत बसले. त्यांतील कित्येक पूर्वीं कवठीच्या वृक्षाचा आश्रय धरून राहिले होते. कित्येकांनीं शृंगालवृक्षांच्या[१]

[१] ' शृगाल " हें कांहीं प्रत्यक्ष वृक्षाचें नांव नाहीं. पण तो कोल्ह्यांना प्रिय असल्यामुळें त्याला येथें तसें म्हटलें आहे.

पंक्तीचा आश्रय करून उग्रतप चालविलें. कौरवनंदना, त्याचप्रमाणें त्यांतील कांहींनीं वटवृक्षाच्या मूलाशीं बसून तप केलें. कित्येक असुरपुत्र वटावर बसून परब्रह्माचें ( वेदांचें ) अध्ययन करूं लागले. तेव्हां हे नरपाला, सुरश्रेष्ठ व धर्मश्रेष्ठ पितामह संतुष्ट होऊन वर देण्याकरितां तेथें आला व 'वर मागा' असें त्यांस बोलला. पण, प्रभु त्र्यंबकाच्या त्या द्वेष्ट्यांनीं त्याचा वर स्वीकारला नाहीं. रुद्राशीं द्वेष करून सूड घेण्याची इच्छा करणारे ते, वर न मागतां स्वस्थ बसले. तें पाहून सर्वज्ञ ब्रह्मा त्यांस म्हणाला "सर्व जगाचा कर्ता व संहर्ता अशा त्या महात्म्याशीं वैर करून सूड उगविण्यास कोण समर्थ आहे ? तुम्ही त्याकरितां व्यर्थ श्रम करूं नका. कारण, उमेसह तो महेश्वर देव आदि-मध्य, अंतरहित आहे." रुद्राशीं द्वेष करून स्वर्गामध्यें सुखानें राहण्याची इच्छा करणारे जे असुर होते, त्या दुरात्म्यांना ब्रह्मदेवाचें हें म्हणणें पटलें नाहीं. परंतु त्यांत कित्येक दीर्घदर्शी असुर होते त्यांना हे राजा, तें म्हणणें रुचलें. ज्या अत्यंत दुरात्म्यांना तें आवडलें नाहीं त्यांस पितामह म्हणाला, "हे वीर असुरांनो, रुद्रद्वेषावांचून इतर हवा तो वर मागून घ्या." तेव्हां ते ह्मणाले, 'हे विभो, आम्हीं सर्व देवांस अवध्य व्हावें; व हे देवा, आमचीं पृथ्वीमध्यें सहा पुरें व्हावींत. आह्मांस इष्ट अशा सर्व वस्तूंनीं परिपूर्ण अशीं सहा पुरें आह्मांस प्राप्त होवोत. आणि आह्मीं त्या षट्पुरांत जाऊन सुखानें रहावें. ज्यानें आमच्या ज्ञातीच्या लोकांना मारिलें, त्या शंकराचें उग्र भय आह्मांला नसावें. कारण हे तपोनिधे, त्रिपुराला मारलेलें पाहून आम्ही भयभीत झालों आहों.'

पितामह म्हणाले:—हे असुरांनो, सन्मार्गस्थ व साधुप्रिय ब्राह्मणांस जर पीडा न द्याल, तर तुम्ही देवांना व शंकरालाही अवध्य व्हाल. पण मोहानें जर तुम्हीं ब्राह्मणांस ताप देऊं लागाल, तर नाश पावाल. कारण ब्राह्मणच जगाची परम गति आहे. ब्राह्मणांचें अहित कराल, तर तुम्हांला नारायणापासून भय उत्पन्न होईल. कारण, भगवान् जनार्दन सर्व भूतांचें हित करित असतो.' असो. असें सांगून ब्रह्मदेवानें विसर्जन केलें असतां ते असुर तेथून गेले. व जे भक्तिमान् व धर्माचरणी होते, ते महादेवास शरण गेले. तेव्हां स्वतः त्रिपुरनाशन शंकरानें त्यांना दर्शन दिलें. तो प्रभु उमेसह वृषभावर बसून गणांसह त्यांच्यापुढें आला आणि संतांची गति तो भगवान् असुरांस म्हणाला कीं, "हे उत्तम असुरांनो, वैर, दंभ व हिंसा हीं सोडून तुम्ही माझा आश्रय केलात, त्याअर्थीं तुम्हाला मी उत्तम वर देतों. ज्या सदाचरणी ब्राह्मणांनीं व मुनींनीं तुम्हांला दीक्षा दिली, त्यांच्यासह तुम्ही स्वर्गास जा. तुमच्या सत्कर्मामुळें मी प्रसन्न झालों आहें. येथें कवठाच्या झाडाखालींही जे तापस ब्रह्मवेत्ते ब्राह्मण यापुढें राहतील त्यांना माझ्या लोकासारखा लोक प्राप्त होईल. जो तपोधन मानव येथें दर्श व पूर्णिमा करितो व वानप्रस्थाश्रमांत विधीनें माझें पूजन करितो, त्याला सहस्र वर्षें केलेल्या तपाचें फळ मिळतें. तेंच पूजन यथाविधि तीन रात्री केल्यास मानवाला इष्ट गति प्राप्त होते. या अर्कद्वीपांत राहणाऱ्या पूजकाला दुप्पट फळ मिळतें. येथून दूर देशांत राहणाऱ्या पुरुषाला मिळत नाहीं. तुमचें कल्याण असो, हा वर मी तुम्हांस देतों. जो माझी श्वेतवाहन या नांवानें पूजा करील, त्याचें चित्त सर्वतः भयभीत झालेलें असलें, तरी त्याला माझी गति प्राप्त होते. औदुंबर, वड, कवठ व शृगाल या वृक्षांच्या मुळांशीं बसून दृढ व्रतें करणाऱ्या जितेंद्रिय

ब्राह्मणांस व वेदवेत्त्या मुनींस जे पुरुष विशेष प्रकारें सतत पूजितील, ते इष्ट गतीस जातील."

असें बोलून भगवान् श्वेतवाहन महादेव त्या सर्वांसह रुद्रलोकास गेला. मी जंबुमार्गास जाईन व तेथें राहीन असा संकल्प करणाराही रुद्रलोकीं पूज्य होतो.

## अध्याय त्र्यायशींवा.

—:०:—

### असुर यज्ञास विघ्न करितात.

वैशंपायन म्हणाले:—राजन्, त्याच वेळीं चार वेद व सहा अंगें[1] जाणणारा व शुक्लयजुर्वेदाची वाजसनेय शाखा पढलेला याज्ञवल्क्यमुनीचा ब्रह्मदत्तनामक एक धार्मिक व गुणी शिष्य होता. त्यानेंच बुद्धिमान् वसुदेवाचा अश्वमेधयज्ञ केला. त्याचें घर षट्पुरांत होतें. तो एकदा एक संवत्सर सत्राची दीक्षा घेऊन आवर्तानामक सुनदीच्या मुनिसेवित तीरावर राहिला. तो द्विजोत्तम वसुदेवाचा सखा व सहाध्यायी होता. हे कौरव्या, त्या महात्म्याचा 'क्षीरहोता हा उपाध्याय ( अध्वर्यु ) झाला. हे प्रभो, ज्याप्रमाणें बृहस्पतीकडे इंद्र जातो, त्याप्रमाणें तो वसुदेव देवकीसह त्या षट्पुरस्थ यज्ञकर्त्या ब्रह्मदत्ताकडे गेला. ब्रह्मदत्तानें त्या सत्रांत विपुल दक्षिणा दिली व बहुत अन्नदान केलें. महात्मे दृढव्रत मुनिश्रेष्ठ त्याची सेवा करीत होते. व्यास, मी, याज्ञवल्क्य, सुमंतु, जैमिनि, धृतिमान्, जाबाली व देवलादि हे सर्व तेथें आलों होतों. धर्मचारिणी देवकीनें धीमान् वसुदेवाच्या वैभवास शोभतील अशीं इष्ट दानें ब्राह्मणांस दिलीं. जगत्कर्त्या वासुदेवाच्या प्रभावानें भूतलीं तें सत्र चालू असतांना षट्पुरवासी निकुंभादिक दैत्य वरामुळें मत्त होऊन तेथें येऊन त्यास म्हणाले " आमचा यज्ञभाग काढा. आम्ही सोमपान करणार. ब्रह्मदत्तयजमानानें आम्हांला कन्या द्याव्या. या महात्म्याला पुष्कळ रूपवती कन्या आहेत, असें आम्हीं ऐकिलें आहे. यास्तव त्यांना येथें आणवून त्या सर्व आम्हांस अर्पण कराव्या. त्याचप्रमाणें ह्या ब्रह्मदत्तानें आम्हांला विशिष्ट रत्नें द्यावीं. आम्ही तुम्हांला ही आज्ञा करीत आहों. त्याप्रमाणें वागावयाचें नसेल, तर यज्ञ करूं नका. " हें त्यांचें म्हणणें ऐकून ब्रह्मदत्त त्या महासुरांस म्हणाला, " उत्तम असुरांनो, पुराणांत यज्ञभाग तुम्हांस द्यावा, असें विधान नाहीं. तेव्हां या सत्रांत मला तुम्हांला सोमपान कसें देतां येईल ? तुम्ही पाहिजे असल्यास वेद व भाष्य यांचा अर्थ जाणणाऱ्या या मुनिश्रेष्ठांस विचारा. आतां मला ज्या कन्या द्यावयाच्या आहेत, त्यांच्याविषयीं ह्मणाल तर त्या अंतर्वेदींत योग्य पतींस देण्याचा मीं पूर्वींच संकल्प केला आहे, हें निश्चित्त आहे. कांहीं रत्नें मीं तुम्हांला देईन, पण त्यांकरितां तुम्हांला माझ्याशीं बरे बोलानें वागलें पाहिजे. कृष्णाचें मला पाठबळ आहे. मी बलात्कारानें तीं देणार नाहीं. "

तें ऐकून निकुंभादिक षट्पुरवासी पापी दैत्य रागावले. त्यांनीं ती यज्ञशाला लुटली व कन्यांना बलात्कारानें हरण करून नेलें. तो सर्व अन्याय प्रत्यक्ष पाहून वसुदेवानें महात्मा वासुदेव, बलभद्र व गद यांचें स्मरण केलें. तेव्हां तो सर्व वृत्तांत कानीं येतांच श्रीकृष्ण प्रद्युम्नाला म्हणाला, " पुत्रा, तूं सत्वर जा व मायेच्या योगानें त्या कन्यांचें रक्षण कर. तों मागोमाग मी यादवांच्या सैन्यासह षट्पुरास येतों. " तेव्हां पित्याच्या आज्ञेंत वागणारा तो महाबल मदन एका निमिषांत षट्पुरास गेला. व त्यानें मायेनें त्या कन्यांचें हरण केलें. त्या रुक्मिणीपुत्रानें दुसऱ्या मायामयी कन्या करून राक्षसांपाशीं

[1] शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष.

ठेविल्या व ' भिऊं नका ' असें तो धर्मात्मा देवकीस म्हणाला. त्यानंतर त्या मायामय कन्यांचेंच हरण करून अतिशय संतुष्ट झालेले ते दुर्धर्ष दैत्य षट्पुरांत गेले. राजन्, त्यानंतर ब्राह्मणांनीं शास्त्रोक्त विधीनें तें अवशिष्ट व बहुगुणयुक्त कर्म कसें तरी चालविलें.

इतक्यांत, हे भारता, धीमान् ब्रह्मदत्तानें सत्राकरितां पूर्वीं निमंत्रण पाठवून बोलाविलेले राजे तेथें आले. जरासंध, दंतवक्त्र, शिशुपाल, पांडव, धृतराष्ट्राचे पुत्र, गणांसह सर्व मालव, रुक्मी, आहवृति, नील, धर्म, अवंतीचे विंद व अनुविंद शल्य, शकुनि व तसेच दुसरेही दृढायुध व महात्मे वीर राजे तेथें येऊन षट्पुराच्या जवळच राहिले. ते आलेले पाहून पूज्य, श्रीमान् नारदमुनि " क्षत्रिय व यादव यांचा येथें समागम होईल. येथील युद्धांत मीच निमित्त होणार आहें, यास्तव मी आतां त्याकरितां प्रयत्न करितों." असा मनांत विचार करून निकुंभाच्या घरीं गेला. तेव्हां निकुंभ व दुसरे दानव यांनींही त्याचें पूजन केलें. नंतर योग्य आसनावर बसल्यावर तो धर्मात्मा म्हणाला, " यादवांशीं विरोध करून तुम्ही येथें असे स्वस्थ कसे बसलां आहां ! जो ब्रह्मदत्त तो स्वतः हरीच आहे, असें समजा. कारण, हरि हा त्याचा स्वामी व सखाही आहे. धीमान् ब्रह्मदत्ताच्या पांचशें भार्या असून वसुदेवाच्या पुत्राचें प्रिय करण्याच्या इच्छेनें त्यानें त्या सर्वांचें पाणिग्रहण केलें होतें. त्यांतील दोनशें ब्राह्मणी, शंभर क्षत्रियकन्या, शंभर वैश्यपुत्री व शंभर शूद्रांच्या[1] मुली होत्या. त्यांनीं धीमान् व अतिशय धर्मज्ञ दुर्वासमुनीची अतिशय शुश्रूषा केली. त्यामुळें संतुष्ट झालल्या व पुण्यकर्म करणाऱ्या मुनीनें त्यांस असा वर दिला कीं, " तुम्हांला एकेक कन्या व एकेक पुत्र होईल. माझ्या वरदानानें सर्व कन्या रूपानें अनुपम असतील. " हे असुरा, या वरामुळें त्याच्या कन्या भर्त्यासह शयनावर प्रत्येक संगमाचे वेळीं पुनः पुनः कुमारी असल्यासारख्या होतील. त्या स्त्रिया आपल्या शरीरांतून सर्व पुष्पमय सुवासाचा स्राव करितील. त्या सदा यौवनांत असतील. सर्व पतिव्रता राहतील. त्या सर्वजणी अप्सरांच्या गुणांनीं युक्त असल्यामुळें नृत्य, गीत इत्यादिकांत निपुण असतील. सारांश, हे निकुंभा, बुद्धिमान् दुर्वासाच्या या वरामुळें त्या सर्व अशा सर्वोत्तम निपजल्या आहेत. ब्रह्मदत्ताचे सर्व पुत्रही रूपसंपन्न, शास्त्रार्थकुशल व आपल्या वर्णधर्मामध्यें शास्त्रक्रमानें राहणारे आहेत. त्या धीमानानें त्यांतील बहुतेक कन्या भैमप्रभृतींना देण्याचा निश्चय केला आहे. पण त्यांतील अवशिष्ट राहिलेल्या शंभर कन्या तूं आणिल्या आहेस. त्याकरितां कांहीं झालें तरी, हे वीरा, तुला यादवांशीं युद्ध करावें लागेल. यास्तव आपल्या साहाय्याकरितां मुद्दाम तूं राजांना आपलेसे करून ठेव. ब्रह्मदत्ताच्या कन्यांकरितां व साहाय्याकरितां या महात्म्या राजांना तूं नाना प्रकारचीं रत्नें दे. व जे राजे तुझ्या पक्षाला येऊन मिळतील, त्यांचें चांगलें आतिथ्य कर.

नारदानें असें सांगितलें असतां, असुरांनीं मोठ्या आनंदानें तसें केलें. तेव्हां नरेंद्रांनीं त्या पांचशें कन्या व नानाप्रकारचीं रत्नें प्राप्त करून घेऊन त्या भक्तवत्सल कन्यांची यथायोग्य वांटणी केली. या वांटणींत पांडुपुत्र मात्र नव्हते. कारण, एका निमिषांत तेथें जाऊन महात्म्या नारदानें त्यांचें निवारण केलें होतें. असो. असुरांच्या या मोठ्या देणगीमुळें संतुष्ट झालेले उत्तम राजे त्या असुरांस म्हणाले, " सर्वकामसंपन्न व आकाशगामी अशा स्वतः तुम्हीं

[1] पूर्वयुगांत ब्राह्मणास चारी वर्णांच्या स्त्रिया करण्याची परवानगी होती.

आम्हांस यथान्याय पूजिलें आहे, तेव्हां आतां आमच्या या क्षत्रियसंघानें तुम्हांस काय द्यावें ? तुमच्यासारख्या दिव्य वीरांनीं आजपर्यंत क्षत्रियांची अशी पूजा केली नव्हती. " तें ऐकून आनंदित झालेला देवशत्रु निकुंभ क्षत्रियांच्या खऱ्या माहात्म्याचें उत्तम वर्णन करून त्यांस उलट बोलला, ' हे उत्तम राजांनो, आम्ही शत्रूशीं यापुढें जेव्हां युद्ध करूं, तेव्हां तुम्हीं आम्हांला सर्व प्रकारें सहाय्य करावें, असें आम्ही इच्छितों. ' यावर नारदापासून ज्यांनीं सर्व वर्तमान ऐकिलें आहे, अशा पांडुपुत्रांवांचून दुसऱ्या सर्व निष्पाप क्षत्रियांनीं ' ठीक आहे ' असें म्हटलें. व कुरुनंदना, ते क्षत्रिय युद्धाकारितां सज्ज होऊन राहिले. ब्रह्मदत्ताच्या पत्न्याही यज्ञवाटामध्यें आल्या, तों राजन्, महादेवाचें वचन मनांत धरून व द्वारकेंत आहुक राजास ठेवून विभु कृष्णही सैन्यासह षट्पुरास आला. आणि पुरवासी जनांचें हित करण्याच्या इच्छेनें वसुदेवानें ज्यास आज्ञापिलें होतें, असा तो देव अत्यंत शुभस्थानी यज्ञशाळेच्या जवळच त्या सर्व सैन्याचा तळ देऊन राहिला. भव्य छावणींत जागजागीं चौक्या व पहारे ठेवून व त्यांस अनिष्ट मार्ग न मिळेल अशा प्रकारें यथाशास्त्र शिबिराची रचना करून त्यानें प्रद्युम्नास त्याच्या रक्षणार्थ सर्वतः फिरत रहावयास सांगितलें.

## अध्याय चौऱ्यायशींवा.

—:०:—

### प्रद्युम्न असुरांस गुहेंत कोंडतो.

वैशंपायन म्हणालेः—दुसऱ्या दिवशीं सर्व लोकांचा निर्मल चक्षुच असा सूर्य दोन घटिका वर आल्यावर रुद्रानें जिला वर दिला आहे, व रुद्रवाक्यानें जी पवित्र झाली आहे, अशा आवर्तासंज्ञक गंगेच्या जलांत स्नान करून, व देवाधिदेव बिल्वोदकेश्वरास नमस्कार करून, हे कुरुश्रेष्ठा, युद्धोत्सुक बलराम, सात्यकी व कृष्ण गोधांगुलित्राण हातांस बांधून व कवचादि घालून सज्ज झाले आणि गरुडावर बसले. मान देणाऱ्या भगवान् श्रीकृष्णानें सैन्याच्या अग्रभागीं वर आकाशांत प्रद्युम्नाला ठेविलें. पांडवांची यज्ञशाळेचें रक्षण करण्याकडे योजना केली आणि बाकीची सेना गुहेच्या द्वारावर ठेविली. त्या संतांना गति देणाऱ्यानें प्रवर व इंद्रपुत्र जयंत ह्यांचें स्मरण केलें. त्याबरोबर ते दोघे तेथें आले व समक्ष त्याला भेटले. तेव्हां, हे भारता, प्रद्युम्नाप्रमाणें त्यांनाही त्यानें आकाशांत ठेविलें.

त्यानंतर कृष्णाच्या आज्ञेनें रणदुंदुभि वाजूं लागल्या. शंख, ढोल व दुसरीं वाद्येंही घोर नाद करूं लागलीं. सांब व गद यांनीं आपल्या सैन्याचा माकरव्यूह[1] रचिला. हे भारता, त्यांत सारण, उद्धव, भोज, वैतरण, धर्मात्मा अनाधृष्टि, पृथु, विपृथु, कृतवर्मा, दंष्ट्र, शत्रूंचें मर्दन करणारा निचक्षु, धर्मात्मा सनत्कुमार—यादव, चारुदेष्ण व अनिरुद्ध या वीरांच्या सहाय्यानें त्या दोघां वीरांनीं पिछाडीच्या सैन्याचें रक्षण केलें. रथ, अश्व, नर व गज यांनीं गजबजलेली बाकीची यादवसेना व्यूहाच्या मध्यभागीं स्थित होती. इतक्यांत षट्पुरांतून युद्धदुर्मद दानव मेघाप्रमाणें ज्यांचा नाद आहे, अशा गर्दभांवर, हत्तींवर, मकरांवर, वेगयुक्त शिशुमार संज्ञक माशांवर बसून बाहेर पडले. रेडे, गेंडे, उंट व कांसव यांचे रथांनीं युक्त, हातांत नानाप्रकारचीं आयुधें घेतलेले व किरीट, मस्तकावरील केश, मुकुट व बाहुभूषणें यांनीं अलंकृत झालेले दैत्य नानाप्रकारें ध्वनि करणारीं व रथचक्रांच्या खडखडाटानें कोंडलेलीं

[1] मकराकृति सैन्यरचना.

वाद्यें वाजवीत बाहेर पडले. ते महासागराप्रमाणें गर्जना करणारे शंख फुंकीत होते. असो. हे राजन्, त्यापुढें येणाऱ्या सुरसैन्याच्या अग्रभागीं देवांच्या पुढें जाणाऱ्या इंद्राप्रमाणें निकुंभ चालला होता. त्या मस्त दानवांनीं नानाप्रकारचे नाद व वीरांचे सिंहनाद वारंवार करून सर्व भूमि व आकाश भरून टाकिल्यानें तीं जणूं वाढविलीं. शिशुपाल जिचा पुढारी आहे, अशी क्षत्रियसेनाही सज्ज झाली. जनमेजया, असुरांचें सहाय्य करण्याचा तिचा पूर्वीच निश्चय होता. दुर्योधनाचे शंभर भ्राते, चेदिराजाच्या अनुजांच्या अग्रभागीं चालले होते. हे नरश्रेष्ठा, ते सर्व वीर गंधर्वनगरासारख्या विशाल रथांत सज्ज होऊन बसले होते. कठोर शब्द करणारे वीर, द्रुपदाचे रथ व रुक्मी आणि आहृवृति हे रणामध्यें ठाम होऊन राहिले. त्यांतील शेवटचे दोन वीर तालवृक्षासारखीं उंच व शुभ धनुष्यें हालवीत तेथें उभे होते. शल्य, शकुनि, राजा भगदत्त, जरासंध, त्रिगर्त, उत्तरासह विराट, हे व निकुंभादिक जयेच्छु दैत्यवीर युद्धास सिद्ध झाले. देवांशीं जसे महासुर, तसे ते वीर यादवांशीं युद्ध करण्याची इच्छा करीत होते. इतक्यांत निकुंभानें सर्पासारख्या बाणांनीं रणांगणांत यादवांच्या भयंकर सेनेचें मर्दन केलें.

पण यादवसेनापति अनाधृष्टीस तें सहन झालें नाहीं. साणेवर घांसलेल्या चित्रपिच्छ घोर बाणसमूहानें त्यानें राक्षसांवर गर्दी केली. त्या गर्दीपुढें त्या मुख्य असुराचा रथ, घोडे, ध्वज व स्वतः तो ( निकुंभ ) हि दिसेनासा झाला. कारण, ते सर्वच बाणांनीं आच्छादित झाले. पण इतक्यांत मायाव्यांतील श्रेष्ठ वीर निकुंभ रणामध्यें सर्वभर फिरला व त्यानें आपल्या मायेनें भैमश्रेष्ठ अनाधृष्टीस बांधून सोडिलें. व त्या वीराला तसेंच जखडून घेऊन षट्पुर-संज्ञक गुहेंत नेऊन कोंडून ठेवून तो वीर परत आला. त्यानंतर पुनः निकुंभानें संग्रामांत कृतवर्म्यास बांधून नेलें. व क्रमानें चारुदेष्ण, भोज, वैरतण, सनत्कुमार, जांबवतीचा पुत्र ऋक्ष, बलरामाचे निशट व उल्मुक या नांवाचे पुत्र व असेच आणखीही दुसरे यादव मायाबलानें बांधून त्या गुहेंत नेऊन ठेविले. घोर यादवांस बांधून गुहेंत टाकणाऱ्या त्या निकुंभाचा मायेनें आच्छादित झालेला देह, हे राजा, कोणालाही दिसला नाहीं. यादवांचें तें घोर कंदन पाहून यादवांची वृद्धि करणाऱ्या भगवान् कृष्ण, बलराम व सात्यकि यांस मोठा क्रोध आला. त्याचप्रमाणें प्रद्युम्न, शत्रुवीरांस मारणारा सांब, दुर्जेय अनिरुद्ध व तसेच दुसरेही यादव विशेष प्रकारें रागावले.

नरेश्वरा, त्यानंतर शार्ङ्गधर कृष्णानें आपलें धनुष्य सज्य केलें; व तृणामध्यें जसा अग्नि संचरतो, तसा तो दानवांमध्यें आपले बाण चालवूं लागला. त्या तेजस्वी ईश्वरास पाहून, कालपाशानें आर्त झालेले शलभ जसे प्रदीप्त अग्नीकडे धांवत येतात, त्याप्रमाणें दानव, सहस्रावधि शतघ्नी परिघ, अग्नितुल्य शूल, प्रदीप्त परशु, पर्वत शिखरें, घोर वृक्ष व विपुल शिला फेंकीत, मत्तगज, रथ व घोडे यास सोडून पायानेंच त्या देवावर धांवत निघाले. पण त्या सर्वांस तो जगद्धितेच्छु महातेजस्वी नारायणरूप अग्नि, हंसतच बाणरूपी ज्वालांनीं जाळता झाला. दमदार बैल शरदृतूंतील पर्जन्य जसा सहन करितो, त्याप्रमाणें त्या शत्रूंचें दमन करणाऱ्या यदुश्रेष्ठानें

१ या ठिकाणीं 'भयवर्धनः' असा पाठ कोणीं घेतला आहे, परंतु आम्हीं कलकत्ताप्रतींतील 'भैमवर्धनः' हा पाठ घेतला आहे.

२ या ठिकाणीं 'दानवेषु प्रवृत्तेषुः' असा आमचा पाठ आहे. वाईकरांचा पाठ इतका चांगला नाहीं.

राक्षसादि रिपूंची शरवृष्टि सहन केली. उलटपक्षीं पर्जन्यवृष्टीपुढें वाळूचे बांध जसे टिकत नाहींत, त्याप्रमाणें नारायणाच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांपुढें असुर टिकत ना. जबडा वासलेल्या सिंहापुढें बैल जसे उभे राहूं शकत नाहींत, त्याप्रमाणें, हे भारता, ते असुरश्रेष्ठही कृष्णाच्या समोर उभे राहण्यास समर्थ झाले नाहींत. नारायणाच्या माऱ्यापुढें भयाकुल झालेल्या दैत्यांनीं जीविताची अशा धरून आकाश आटोपलें. पण हे प्रभो, आकाशांत जातात, तों त्यांना इंद्रपुत्र जयंत प्रखर दीप्तज्वालेसारख्या तेजस्वी व घोर बाणांनीं मारूं लागला. व वृक्षाग्रावरून सुटलेल्या ताडफळाप्रमाणें असुरांचीं मस्तकें भूतलावर पडूं लागलीं. कालानें ज्यांना मारिलें आहे, अशा पंचमुख[1] सर्पाप्रमाणें दैत्यांचे तुटलेले हात भूतळीं पडले. नंतर रुक्मिणीपुत्रानें जींतून बाहेर पडण्याची वाट अदृश्य होती अशी[2] घोर मायामय गुहा निर्माण केली. व तींत क्षत्रियांना फेंकण्यास उद्युक्त झालेला तो वीर गद, पुत्र सारण, सांब व निकुंभानें पूर्वी ज्यांना गुहेंत टाकिलें नव्हतें असे दुसरेही कित्येक यादव, यांचे साह्यानें तो धर्मात्मा क्षत्रियांचा निग्रह करूं लागला. रणांगणांत वेगानें येणाऱ्या व इतस्ततः स्फुरण पावणाऱ्या कर्णाला[3] त्या बलाढ्य कृष्णपुत्रानें जर्जर करून धरिलें. आणि मोठा सिंहनाद करून त्या वीरानें ती घोर मायामय गुहा दणाणून सोडिली. राजा दुर्योधन, विराट, द्रुपद, शकुनि, शल्य, नील, भीष्म, विंद, अनुविंद, जरासंध, त्रिगर्त, मालव, महाबल वासन्त्य, धृष्टद्युम्नादिक अखज्ञ पांचाल व आहृति यांसही त्यानें ती गुहा दाखविली. नंतर तो आपला मामा रुक्मी, शिशुपाल व राजा भगदत्त यांस ह्मणाला, "हे नराधिपांनो, मी तुमचा रक्तसंबंध व श्रेष्ठत्व यांस मान देतों, तथापि या घोररूपी गुहेंत मी तुम्हांला फेंकणार[1] आहें. कारण, 'या गुहेंतच त्या नरेंद्रास फेंक' अशी धीमान् बिल्वोदकेश्वर शूलपाणीनें मला आज्ञा केली आहे! शांबरी मायेचा आश्रय करून महात्म्या निकुंभानें मायामयी गुहेंत टाकिलेल्या यादवांस मीं खचित सोडवीन."

प्रद्युम्न असें बोलला असतां सेनापति राजा शिशुपाल त्या सर्व यादवांस व विशेषतः प्रद्युम्नास बाणांनीं पीडा देऊं लागला. तेव्हां बिल्वोदकेश्वरास नमस्कार करून रुक्मिणीपुत्र महाबल शिशुपाल राजास बांधूं लागला. इतक्यांत सहस्रावधि पाश घेऊन आलेला रुद्रपार्षदांतील उत्तम नंदी बलाढ्य प्रद्युम्नास ह्मणाला, "हे यदुनंदना, बिल्वोदकेश्वर देवानें तुला सांगितलें आहे कीं, मीं जसें तुला रात्रीं सांगितलें आहे तसें कर. कन्या व रत्नें यांना लुब्ध झालेल्या या राजांस या पाशांच्या योगानें बांधून ठेव व तुला वाटेल तेव्हां तूंच सोड. यदुनंदना, त्याविषयीं तूंच प्रमाण आहेस. हे महाभागा वीरा, तूं असुरांना मात्र निःशेष मारून टाक. आणि जनार्दनालाही याप्रमाणेंच सांग." त्यानंतर शंकराच्या आज्ञेप्रमाणें त्यानेंच दिलेल्या पाशांनीं त्या उत्तम वीर्यवानानें भगदत्त, शिशुपाल, आहृवृत्ति, रुक्मि व इतर राजे यांस बांधिलें व हे कुरुनंदना, मायामयी गुहेंत

१ पांच बोटांच्या पंजाच्या सादृश्यार्थ पंचमुख असें ह्मटलें आहे.

२ येथें 'अदृश्यभिष्क्रमद्वीरः' हा टीकाकारांचा पाठ अनिर्वाह्य आहे. आमचा पाठ 'अदृश्यनिष्क्रमां' असा आहे. । व्यंकटेशाचा पाठ "अदृश्य निष्क्रामं" असा आहे. निर्वाह्य आहे; पण उचित्त नाहीं.

३ येथें बंगाली पाठ 'बिकुंभं' असा आहे, पण पुढील धोरणावरून 'कर्णं' हाच पाठ समीचीन वाटतो.

१ कलकत्तापाठ 'फेंकणार नाहीं' अशा अर्थाचा दिसतो. पण आमच्या तिन्ही पोथ्या उलट आहेत; व पुढील कृतिही आमच्या पाठासच अनुकूल आहे.

आणून सोडिलें. सर्पाप्रमाणें फुसकारणाऱ्या त्यांना बांधून रुक्मिणीपुत्रानें आपल्या अनिरुद्ध पुत्रास त्यांच्यावर राखण करावयास ठेविलें. हे भारता, त्यांतील चटसारे सेनापति, क्षत्रिय व कोशाध्यक्ष यांना यदुनंदनानें बांधिलें. त्याचप्रमाणें त्याचे हत्ती, घोडे व रथ यांच्या समूहांसही त्यानें आपल्या स्वाधीन करून घेतलें. नंतर हे प्रभो, तो स्वस्थ चित्तानें असुरांस मारावयास तयार झाला. पण इतक्यांत तो रणवेषानें यज्ञशाळेंत येऊन द्विजोत्तम ब्रह्मदत्तास ह्मणाला, 'आतां तूं खुशाल कर्म सुरू कर. भिऊं नकोस, धनंजय येथें आहे; तो पहा. हे उत्तम द्विजा, ज्याचे रक्षक पांडव आहेत, त्याला देव, असुर व नाग यांच्यापासूनही मुळींच भय बाळगावयास नको. असुरांनीं तुझ्या कन्यांना मनानेंही स्पर्श केला नाहीं. या यज्ञशाळेंतच मीं त्यांना मायेनें आणून ठेविलें आहे. पहा.'

## अध्याय पंचायशींवा.

—:०:—

### निकुंभाचा वध.

वैशंपायन म्हणाले:—हे राजा, अनुयायांसह राजेलोकांचा निरोध झालेला पाहून असुरांस मोह पडला. कृष्ण, बलराम इत्यादि रणमस्त यादव समंततः मात करीत सुटले असतां ते वीर दश दिशांस पळत सुटले. तेव्हां दानवोत्तम निकुंभ त्यांस संतापून म्हणाला, 'आपली प्रतिज्ञा मोडून व भयभीत आणि विव्हळ होऊन मोहानें पळतां कां? आपले जातभाईंना झालेल्या पीडेबद्दल शत्रूचें पारिपत्य करण्याचा तुम्हीं प्रथम निश्चय केलात आणि आतां आपली प्रतिज्ञा मोडून रणांतून पळ काढितां, अशा तुम्हांला कोणता लोक प्राप्त व्हावा? शूरानें रणांतील कर्कश रिपूंस पराजित करूनच वैभव भोगावें, अथवा रणांत मरून स्वर्गांत[1] सुखानें राहावें. पण यांतील कांहींच न करितां घरीं जाऊन तुम्ही कोणतें सुख भोगणार? आपल्या बायकांना काय सांगाल? धिक्कार! धिक्कार असो!! तुम्हांला लाज कशी वाटत नाहीं!"

हे राजा, याप्रकारें निकुंभानें निर्भर्त्सना केल्यामुळें लज्जा वाटून ते सर्व असुर परतले व रणशूरांना केवळ उत्सवाप्रमाणें प्रिय वाटणाऱ्या त्या रणांगणांत पहिल्यापेक्षां दुप्पट आवेशानें यादवांशीं लढूं लागले. त्यांतील जे दैत्य यज्ञभूमींत जात, त्यांस धनंजय, नकुलसहदेव, भीम व राजा धर्मपुत्र युधिष्ठिर हे मारीत होते. जे आकाशांत जात, त्यांना जयंत व द्विजोत्तम प्रवर हे मारीत. वर्षाकाळीं जशी जलनदी वाहते, तशी तेथें रक्ताची नदी वाहूं लागली. तींत असुरांच्या रक्ताचे लोट चालले होते. त्यांचे केश हेंच त्यांतील हिरवें शेवाळ; चक्रें हींच कांसवें व रथ हेच भोंवरे असून ती नदी गजरूपी खडकांच्या योगानें शोभत होती. ध्वज व भाले याच वृक्षांनीं ती आच्छादित होती. वीरांचे नानाप्रकारचे आक्रोश ह्याच मेघगर्जना असून ती गोविंदरूपी पर्वतापासून उगम पावली होती. ती भीरू पुरुषांच्या चित्तास व्याकूळ करीत होती. ती रक्तमय फेंस व बुडबुडे यांनीं युक्त असून तरवारी हेच तींतील मत्स्य व तरंग होते. असो.

याप्रमाणें शत्रूंची उत्तरोत्तर सरशीच होत आहे व आपले सहायकर्ते सर्व वीर मरून पडत आहेत, असें पाहून निकुंभ स्वपराक्रमानेंच वर उडाला. पण त्या रणकर्कश राक्षसास वरून जयंत व प्रवर यांनीं वज्रासारख्या बाणांनीं निवारिलें. तेव्हां दांत ओंठ खाऊन व

[1] 'हतोवा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्' भगवद्गीता.

उलटून त्या दुरासद राक्षसानें परिघानें प्रवरास मारिलें. तेव्हां प्रवर भूतलावर पडला. पण तो भूमीवर पडला असतां त्यास जयंतानें आपल्या दोन्ही बाहूंनीं आलिंगन दिलें; व तो जिवंत आहे, असें पाहून त्याला सोडून स्वतः त्या राक्षसावर धांवला. त्यानें वेगानें जाऊन निकुंभास खड्गाचा प्रहार केला, तेव्हां त्या दैत्यानेंही परिघानें जयंतास मारिलें. इंद्रपुत्रानें युद्धांत निकुंभाचें अंग सोलून काढिलें. तेव्हां याप्रमाणें रट्टे खाणारा तो असुर मनांत म्हणाला, " मला माझ्या ज्ञातीचा घात करणाऱ्या वैरी कृष्णाशीं युद्ध करावयाचें आहे. मग या इंद्रपुत्राशीं लढून मी उगीच आपल्याला थकवून कशाला घेऊं ? " असा निश्चय करून तो तेथेंच गुप्त झाला. व जेथें महाबल कृष्ण होता, तेथें युद्धाकरितां गेला. तें पाहतांच बलशत्रु इंद्र देवतांसह आनंदित झाला व ऐरावताच्या पाठीवर बसून युद्ध पहावयास आला. अतिशय संतुष्ट होऊन त्यानें " शाबास " असें म्हणून पुत्र जयंताला आलिंगन दिलें. त्या धर्मात्म्यानें सावध झालेल्या आपल्या प्रवर मित्रालाही आलिंगन दिलें. रणदुर्जय जयंताचा रणांत जय झाला आहे, असें पाहून इंद्राच्या आज्ञेनें देवदुंदुभि वाजूं लागल्या.

इकडे निकुंभानें यज्ञवाटासमीप अर्जुनासहवर्तमान असलेल्या रणदुर्जय केशवास पाहिलें व फारच मोठा सिंहनाद करून अति घोर परिघानें गरुडास ताडण केलें. हे भारता, तो चपळ दैत्य मायेनें बलराम, सात्यकि, नारायण, अर्जुन, भीम, युधिष्ठिर, नकुल, सहदेव, वासुदेवपुत्र सांब व वीर्यवान् प्रद्युम्न यांच्याशीं लढूं लागला. पण सर्व शास्त्रांमध्यें प्रवीण असलेल्या त्या वीरांपैकीं कोणाच्याही तो दृष्टीस पडला नाहीं. तथापि तो दिसत नाहीं, असें पाहून कृष्णानें इंद्रियांचा ईश व प्रमथ गणांचा स्वामि अशा बिल्वोदक देवाचें ध्यान केलें. तेव्हां त्या अति तेजस्वी बिल्वोदकेश्वर देवाच्या प्रभावानें त्या सर्वांनीं त्या मायाव्यांतील श्रेष्ठ निकुंभास पाहिलें. तो कैलास शिखराकार दैत्य जणूं काय सर्वांस खातच उभा होता. तो ज्ञातिनाशक वैरी कृष्णास युद्धाकरितां आव्हान करीत होता. गांडीव-धनुष्य सज्ज करून पार्थानें बाणांच्या योगानें त्याचा रथ, परिघ व शरीर यांवर वारंवार तीक्ष्ण वेध केला. पण हे राजा, ते शिळेवर पाजळलेले त्याचे सर्व बाण राक्षसाच्या शरीरावर व परिघावर नुस्ते हापटून मोडून व वांकडे होऊन खालीं पडले. तेव्हां आपले अस्त्रयुक्त बाणही विफल झाले आहेत, असें पाहून वीर धनंजय केशवास म्हणूं लागला, ' हें काय ? हे देवकीपुत्रा, माझे वज्रासारखे बाण पर्वतांनाही तोडीत असतात; पण ते याच्यावर निष्फळ होतात, हें कसें ? या गोष्टीचें मला मोठें आश्चर्य वाटत आहे. " तेव्हां, हे राजा, कृष्ण त्यास हंसत म्हणाला, " हे कौंतेया, हा निकुंभ म्हणजे एक लोकोत्तर पराक्रमी आहे. याचा इतिहास सविस्तर ऐक. या दुरासद देवशत्रूनें पूर्वीं उत्तर कुरूस जाऊन एक लक्ष वर्षें तप केलें. तेव्हां भगवान् शंकरानें त्याला इष्ट वर मागावयास सांगितलें असतां त्यानें सुर व असुर यांस अवध्य असणारीं तीन रूपें मागितलीं. तेव्हां भगवान् महादेव वृषभध्वज त्यास म्हणाला, ' महा असुरा, ' तथास्तु ' पण माझें, विष्णूचें अथवा ब्राह्मणांचें अप्रिय केल्यास मात्र तूं हरीला वध्य होशील, दुसऱ्या कोणाला नाहीं. मी व विष्णु ब्राह्मणकुलाचें हित करणारे आहों. आम्ही ब्राह्मणांचा श्रेष्ठ आधार आहों. त्यामुळें, हे पांडुनंदना, हा सर्व शस्त्रांनीं अवध्य, तीन देहांनीं युक्त, पीडादायक व वरमत्त झाला

आहे. भानुमतीचें जेव्हां यानें अपहरण केलें, तेव्हां मीं याचा एक देह नाहींसा केला. या दुरात्म्याचा हा षट्पुरदेह अवध्य आहे. याचा एक तपोयुक्त देह दितीची शुश्रूषा करीत असतो. व ज्याच्या योगानें हा षट्पुरांत राहतो, तो याचा हा देह अति घोर आहे. हें सर्व निकुंभचरित्र मीं तुला सांगितलें आहे. वीरा, आतां अगोदर याच्या वधाकरितां त्वरा कर. गोष्टी मग सांगतां येतील."

ते दोघे कृष्ण[1] असें बोलत आहेत, तों तो रणदुर्जय असुर आपल्या षट्पुरसंज्ञक गुहेंत शिरला. ती चंद्र व सूर्य यांच्या प्रभेनें हीन होती व केवळ स्वतःचे तेजानेंच चमकत होती. असुरांच्या इच्छेप्रमाणें स्वतःस ( असुरांस ) व शत्रूंस क्रमानें शीत व उष्ण आणि सुख व दुःख देणारी होती. तींत प्रवेश करितांच निकुंभानें बांधून ठेविलेले आपले यादव वीर त्यानें पाहिले. हे नराधिपा, तो भगवान् घोर निकुंभाशीं लढूं लागला. कृष्णाच्या मागोमाग बलभद्रादि यादवही गुहेंत शिरले. त्याचप्रमाणें ते सर्व महात्मे पांडवही तेथें आले. कृष्णाच्या अनुमतानें ते सर्व मिळून प्रविष्ट झाले. निकुंभ कृष्णाशीं युद्ध करूं लागला. इतक्यांत कृष्णाच्या प्रेरणेवरून प्रद्युम्नानें, तेथें पूर्वी ज्यांना निकुंभानें बांधून ठेविलें होतें, त्या सर्वांस सोडवून, जेथें कृष्ण होता तेथें आणिलें. तेव्हां निकुंभाच्या वधाची इच्छा करणारे ते सर्व प्रहृष्टचित्त झाले. राजेही, 'वीरा, आम्हांला सोड' असें प्रद्युम्नास म्हणूं लागले. तेव्हां प्रतापवान् वीर रुक्मिणीपुत्रानें त्यांना सोडिलें. तेव्हां ते सर्व शिशुपालादि नराधिप वीर खालीं तोंडें करून, मौन धारण करून व लाजेनें निस्तेज होऊन उभे राहिले. भगवान् गोविंद हरीही जयाकरीतां प्रयत्न करणाऱ्या निकुंभनामक आपल्या घोर शत्रूशीं युद्ध करीत होताच. हे विभो, निकुंभानें परिघानें कृष्णाला अतिशय ताडण केलें व कृष्णानें गदेनें त्याला उलट अतिशय चेंचलें. तेव्हां तीक्ष्ण प्रहारामुळें ते दोघेही मूर्च्छित झाले. तेव्हां पांडव व यादव अतिशय व्यथित झाले आहेत, असें पाहून कृष्णाचें हित व्हावें, ह्या इच्छेनें मुनिगण जप करूं लागले. त्याचप्रमाणें वेदोक्तस्तवांनीं त्या महात्म्यास स्तवूं लागले. नंतर भगवान् केशव सावध झाला. त्याच्या मागोमाग दानवही उठला. ते दोघे वीर पुनः दोन वृषभांप्रमाणें किंवा गजांप्रमाणें गर्जना करीत युद्धास उभे राहिले. रणमत्त झालेले ते हिंस्र पशूंप्रमाणें चिडून प्रहार करूं लागले. इतक्यांत आकाशवाणी कृष्णाला म्हणाली, "बिल्वोदकेश्वर भगवान् देव तुला सांगत आहे कीं, हे महाबला, या देवब्राह्मणांच्या क्षुद्र शत्रूला चक्रानें मार व विपुल धर्म आणि यश प्राप्त करून घे." तेव्हां, 'ठीक आहे' असें म्हणून व नमस्कार करून लोकनाथ व संतांची गति अशा कृष्णानें दैत्यकुलांतक सुदर्शनचक्र सोडलें. तेव्हां त्या नारायणाच्या हातून सुटलेल्या व सूर्यमंडलासारख्या तेजस्वी चक्रानें निकुंभाचें सुंदर कुंडलयुक्त शिर तोडलें. व मेघास पाहून मत्त झालेला मयूर जसा पर्वतशिखरावरून खालीं पडतो, त्याप्रमाणें तें त्याचें दीप्त कुंडलयुक्त शिर भूमीवर पडलें.

निकुंभ मेला असतां, हे नरव्याघ्रा, जगाचें रक्षण करणारा विभु बिल्वोदकेश्वर देव संतुष्ट झाला. इंद्रानें नभस्तलांतून पुष्पवृष्टि केली. व शत्रुवधार्थ देवदुंदुभी वाजूं लागल्या. सर्व जग आनंदित झालें. विशेषतः मुनि तर फार संतुष्ट झाले. भगवानानें शेंकडों दैत्यकन्या यादवांस

---

[1] श्रीकृष्ण हा एक व दुसरा अर्जुनः 'कृष्ण' हें अर्जुनाचेंहि नांव होतें. "बीभत्सुर्विजयः कृष्णः सव्यसाची धनंजयः" हा श्लोक सुप्रसिद्ध आहे.

दिल्या. त्यानें पुनः पुनः सांत्वन करून क्षत्रियांच्या कन्याही त्यांना देवविल्या. विचित्र रत्नें व उत्तम वस्त्रें सर्वांस दिलीं. केशवानें अश्वयुक्त सहा सहस्र रथ पांडवांस दिले. कारण, तो गदाग्रज त्यांवर फार संतुष्ट झाला होता. त्या गरुडध्वजानें तेंच उत्तम षट्पुर ब्रह्मदत्त ब्राह्मणाला अर्पण केलें. नंतर तें सत्र समाप्त झालें असतां त्या महाबल शंखचक्रगदाधरानें क्षत्रियांचें व पांडवांचें आपल्या स्थानीं जाण्याकरितां विसर्जन केलें. त्या प्रभूनें बिल्वोदकेश्वराचा मोठा उत्सव केला. त्यांत मांसप्रचुर पुष्कळ अन्न भाज्यादिकांसह वांटलें. त्या वेळीं त्या मल्लप्रिय स्वतंत्र देवानें कुस्ती करण्यांत कुशल असलेल्या मल्लांस लढवून त्यांस पुष्कळ द्रव्य व वस्त्रें दिलीं. आणि त्यानंतर आईबाप व यादव यांसह ब्रह्मदत्तास प्रणाम करून तो महाबलवान् द्वारवतीपुरीस गेला. तेथें पोंचल्यावर मार्गांत लोकांचे प्रणाम घेत तो वीर हृष्टपुष्ट जनांनीं भरलेली, मार्गांवरून विचित्र पुष्पें पसरलेली, अशा रम्य पुरींत शिरला.

जो पुरुष चक्रपाणीनें केलेला हा षट्पुरवध व मिळविलेला जय ऐकतो किंवा वाचतो, त्याला युद्धांत जय मिळतो. निपुत्रिकाला पुत्र होतो. धनहीनाला धन मिळतें. रोगी व्याधींतून मुक्त होतो व बद्ध बंधनांतून सुटतो. हें पुंसवन[१] व गर्भाधान आहे. म्हणजे याच्या पाठादिकांच्या योगानें हे संस्कार केल्याचें पुण्य मिळतें. श्राद्धाचे वेळीं याचें चांगल्या रीतीनें पठण केलें असतां तें अक्षय्य फळास कारण होतें, असें सांगितलें आहे. या विख्यातबल महात्म्या अमरश्रेष्ठाचें भारतांत वर्णिलेलें हें विजयाख्यान जो सतत वाचील किंवा ह्मणेल, तो मरणोत्तर दुःखरहित होऊन सद्गतीस जाईल. रत्नें व सुवर्ण यांच्या योगानें ज्याचे हात व पाय शोभिवंत झाले आहेत, जो निरतिशय शुद्धगुणसंपन्न आहे, जो शत्रूंचा नाश करणारा, आदिनाथ, चतुःसागरांत शयन करणारा, चतुःस्वरूप व जगत्पुरुष आहे आणि ज्याला अनंत नांवें आहेत, अशा त्या देवाचा जयजयकार असो.

## अध्याय शायशींवा.

—:०:—

### नारद व अंधकासुर यांची भेट.

जनमेजय म्हणालाः—हे मुनिवरोत्तमा, मीं हा रमणीय षट्पुरवध ऐकला. आतां हे वैशंपायना, पूर्वोक्त अंधकवध सांगा. भानुमतीचें अपहरण व त्या वेळीं केलेला निकुंभाचा वध, हेंही हे उत्तम वक्त्या मला सांग. कारण, त्यांविषयीं मला मोठें कौतुक वाटत आहे.

वैशंपायन म्हणालेः—पूर्वकालीं, प्रभावशाली विष्णूनें दितीच्या पुत्रांना मारिलें असतां दिति मरीचीपुत्र कश्यपाची आराधना करूं लागली. तिचें दीर्घकाल तप, मुनीची शुश्रूषा, अनुकूल वर्तन व माधुर्य यांच्या योगानें हे भारता, तो तपोधन कश्यप अतिशय संतुष्ट झाला. व तिला म्हणाला, "हे कल्याणि, तूं व्रत फार उत्तम प्रकारें पाळलेंस, यामुळें मी तुजवर फार प्रसन्न झालों आहें. याकरितां वर माग." तेव्हां दिति म्हणाली, "हे धार्मिकश्रेष्ठ भगवन्, देवांनीं माझ्या पुत्रांना मारिलें आहे, यास्तव अमित पराक्रमी व देवांस अवध्य असा पुत्र मला असावा, अशी मी इच्छा करितें. त्यावर कश्यप म्हणाले, "हे देवि कमलनयने, दाक्षायणि, देवाधिदेव रुद्राशिवायकरून इतर देवांस अवध्य असा तुला पुत्र खचित होईल. मात्र रुद्राचें नियमन करण्यास मी समर्थ

१ स्त्री गर्भार राहिली असतां तो पुत्रगर्भच निपजावा, या हेतूनें जो संस्कार करितात, त्यास पुंसवन म्हणतात.

नाहीं. यास्तव, तुझ्या पुत्रानें सर्वदा त्याच्यापासून आपला बचाव करावा." असें बोलून त्या सत्यवक्त्या कश्यपानें अंगुलीनें त्या देवीस उदरप्रदेशीं स्पर्श केला, तेणेंकरून तिला पुत्र झाला. हे कौरव्या, त्याला सहस्र बाहु, सहस्र मस्तकें, दोन सहस्र नेत्र व सहस्र पाय होते. तो अंध नसतांनाही अंधासारखा चालत असे. त्यामुळें तेथें राहणारे लोक त्याला अंधक या नांवानें हांक मारूं लागले. हे भारता, आपण अवध्य आहों असें समजून तो सर्व लोकांस पीडा देऊं लागला. आपल्या अंगबलावर तो सर्व रत्नें हरण करीत असे. आपल्या वीर्यानें अप्सरागणांना अडवून धरून तो अतिशय बलवान् व सर्वलोकभयंकर दैत्य त्यांना आपल्या घरीं राहावयास लावीत असे.तो पापबुद्धि अंधक मोहानें सर्वदा परस्त्रीहरण व पररत्नापहार करीत असे. हे जनमेजया, सर्वांचा पराभव करणाऱ्या अनेक असुरांचें साहाय्य घेऊन तो त्रैलोक्य जिंकण्यास उद्युक्त झाला. तेव्हां तो त्याचा संकेत ऐकून भगवान् इंद्र कश्यप पित्यास म्हणाला, "हे मुनिश्रेष्ठ, या अंधकानें हें असलें दुष्कर्म आरंभिलें आहे. यास्तव आतां आम्हीं काय करावें, हें आपणच सांगा. मुने, धाकट्या भावाचें असलें वर्तन मीं कसें सहन करावें? बरें, हे प्रभो, दितीच्या या लाडक्या पुत्रावर मी प्रहार तरी कसा करावा? कारण तिचा पुत्र मेल्यास पूज्य दिति मजवर रागावेल."

हें इंद्रवचन ऐकून कश्यपमुनि म्हणाला, "देवेंद्रा, मी त्याचें निवारण करतों. तुझें सर्वदा कल्याण असो." असें बोलून कश्यपानें दितीसह वीर अंधकास त्रैलोक्यविजयाचे संकल्पापासून मोठ्या कष्टानें निवृत्त केलें. पण पिता व माता यांनीं निषेध केला असतांही तो दुष्टात्मा देवांस पीडा देतच होता. निरनिराळ्या उपायांनीं तो दुर्जन त्यांचीं हाडें घुसळीत असे. तो दुष्टबुद्धि त्यांचीं उद्यानें व अरण्यांतील वृक्ष उपटून व मोडून टाकीत असे. स्वर्गातून उच्चैःश्रव्याच्या अवलादीला जबरीनें नेत असे व बलोन्मत्त झालेला तो असुर दिग्गजांपासून प्रसवलेल्या दिव्यगजांसही देवांसमक्ष नेत असे. तो दुरात्मा देवरिपु जे कोणी यज्ञ व तप करून देवांना संतुष्ट करतील त्यांस विघ्न आणीत असे. राजन्, यज्ञास अनेक विघ्नें आणणाऱ्या त्या अंधकाच्या भीतीनें तीन वर्णांच्या लोकांनीं यज्ञ व तपाचरण केलें नाहीं. वायु त्याच्या आज्ञेप्रमाणें वाहूं लागला. सूर्य त्याच्या इच्छेनें प्रकाश पाडूं लागला. त्याच्या इच्छेप्रमाणें नक्षत्रांसह चंद्रमा कधीं दिसे, कधीं दिसत नसे. राजन्, अति घोर बलगर्वित व दुर्बुद्धि अशा त्या अंधकाच्या भीतीनें आकाशमार्गांतून विमानें जात नाहींशीं झालीं. हे कुरुकुलोद्भवा, अतिघोर अंधकाच्या धास्तीनें जग ॐकाररहित व वषट्कारशून्य झालें. हे भारता, त्या पाप्यानें उत्तरकुरुदेशांतील लोकांस व त्याचप्रमाणें भद्राश्व, केतुमाल व जंबुद्वीप यांतील लोकांस पळवून लाविलें. दुर्जय देव, दानव तशींच दुसरीं समर्थ भूतेंही त्यास सर्व प्रकारें मान देत.

असा प्रकार चालला असतां, त्यानें त्रास दिलेले वेदवेत्ते ऋषि एकत्र जमले व हे श्रेष्ठ धार्मिका, त्या दुष्टाच्या वधाविषयीं विचार करूं लागले. तेव्हां त्यांच्यातील बुद्धिमान् बृहस्पति बोलला कीं, रुद्रावांचून याला मृत्यु कोणत्याच उपायानें येणार नाहीं.' कारण, कश्यपानेंही वर देतांनाच ' मी धीमान् रुद्रापासून तुझें रक्षण करण्यास समर्थ नाहीं; असें सांगितलें आहे. यास्तव ज्याच्या योगानें भगवान् सनातन शंकराला, हा सर्व भूतांना पीडा देत आहे ही गोष्ट कळेल, असा उपाय आम्हीं

योजिला पाहिजे. संतांची गति अशा त्या प्रभु देवाला हा वृत्तांत कळला असतां, तो अवश्य जगाचे अश्रु दूर करील. कारण, त्या देवाधिदेव जगद्गुरु शंकराचें, संतांचें व विशेषतः ब्राह्मणांचें दुर्जनांपासून रक्षण करणें हें व्रत आहे. आपण आतां सर्व नारदब्राह्मणाला शरण जाऊं या. त्याला याविषयीं कांहीं उपाय माहीत असेल. कारण, तो शंकराचा मित्र आहे." हें बृहस्पतीचें वचन सर्व तपोधन जों ऐकत आहेत, तोंच तो देवर्षिश्रेष्ठ त्यांनीं पाहिला. तेव्हां त्याचें यथान्याय पूजन करून व यथाविधि सत्कार करून देव नारदांस म्हणाले, "हे भगवन् साधो, देवर्षे, सत्वर कैलासास जाऊन अंधकासुराचा वध करून जगाचें रक्षण करण्याविषयीं शंकरांस विनंति करा. हें काम आपणांवांचून होणें नाहीं." ही त्यांची विनंती नारदांनीं मान्य केली. आणि ऋषि निघून गेल्यावर त्या विद्वान् देवर्षीनें त्या कार्याविषयीं मनाशीं चांगला विचार करून निश्चय ठरविला. मग तो पूज्य मुनि देवाधिदेव शंकरास भेटावयास गेला. तो वृषभध्वज नेहमीं मंदारवनामध्यें राहात असे. यामुळें शूलपाणी शंकरास प्रिय असलेला तो मुनिश्रेष्ठ त्या मंदारांच्या रम्य वनांतच एक रात्र राहिला. व वृषभध्वजाची अनुज्ञा घेऊन आणि मंदारपुष्पांनीं गुंफलेली सुंदर माळ घालून पुनः स्वर्गास परत आला. विशेष प्रकारें गुंफलेली व सर्वोत्कृष्ट सुगंधांनीं उत्तमोत्तम झालेली अशी माळ व त्याच पुष्पांनीं केलेला संतानपुष्पांचा अति सुवासिक हार गळ्यांत घालून जेथें तो दुरात्मा बलगर्वित अंधक होता तेथें गेला. तेव्हां अंधक नारदांना पाहून व तो उत्तम वास घेऊन आणि त्या महामुनींच्या गळ्यांतील अति सुवासिक संतानकपुष्पमाळा पाहून असें विचारूं लागला, "हे तपोधना, ही अति रमणीय पुष्पजाति कोठें आहे? अहाहा! या पुष्पांचा शुभ्रवर्ण वारंवार चमकत आहे व यांचा सुगंध वारंवार वाढत आहे. ही पुष्पांची जाति स्वर्गांतील संतानपुष्पांहूनही सर्व प्रकारें वरिष्ठ आहे. या पुष्पवृक्षाचा स्वामी कोण आहे? आणि हे मुने, तो वृक्ष येथें आणतां येईल काय? हे देवतारूप अतिथे, आम्ही कृपेस पात्र आहों, असें आपणास वाटत असेल तर हें सर्व सांगा,

हे भारता, ही विनंती ऐकून तो महातपोनिधि मुनिश्रेष्ठ त्याला उजव्या हातांत धरून हंसतसा म्हणाला, 'हे वीरा, पर्वतश्रेष्ठ मंदरावर कामगमनामक वन आहे, तेथें अशा प्रकारचें पुष्प निर्माण होतें. हें शूलपाणीनें निर्माण केलें आहे. त्या महात्म्याच्या मर्जीवांचून त्या वनांत कोणी जाऊं शकत नाहीं. कारण,निवडक रक्षक त्याचें सर्वदा रक्षण करीत असतात. ते रक्षक नानाप्रहरणांनीं युक्त असून घोर, नानाप्रकारचे वेष धारण करणारे व सर्व भूतांस अवध्य आहेत. आणि महादेव त्यांचें सर्व प्रकारें रक्षण करीत आहे. उमा व प्रवरगण यांसह मंदारवृक्षांच्या ताटव्यांत तो सर्वात्मा व सर्वकारण हर नित्य क्रीडा करीत असतो. हे कश्यप—वंशजा, हीं मंदारपुष्पें प्राप्त करून घेण्याला विशेष तपानें त्रिभुवनेश्वर हराची आराधना करावी लागते. मग ते शंकराचे आवडते कल्पवृक्ष त्या भक्तास उत्तम स्त्रिया, उत्तम रत्नें व असेच दुसरेही याचकांस इष्ट पदार्थ देतात. त्या मंदरवनांत अतुल विक्रमी सूर्य अथवा चंद्र प्रकाश पाडीत नाहीं. कारण, तें तरुवन स्वयंप्रकाश आहे. तें दुःखवर्जित आहे. त्या वनांतील कित्येक महावृक्ष सुगंधाचा वर्षाव करितात. कित्येक रस देतात. हे महाबला, दुसरे कांहीं वृक्ष नानाप्रकारचीं सुगंधी वस्त्रें देतात. मनानें इच्छिलेले नाना प्रकारचे भक्ष्य,



असें म्हणून तो कृष्ण हातनें घोडे सोडून व सूर्यतुल्य तेजस्वी आपलें चक्र उगारून रथाखालीं उतरला व भीष्मावर धाऊन गेला. (भीष्मपर्व अ० ५९ पृष्ठ १६७).

भोज्य, पेय, चोष्य व लेह्य पदार्थ, त्या वृक्षांपासून प्राप्त होतात. हे निष्पापा वीरा, तहान, भूक, ग्लानि अथवा चिंता त्या मंदार वनांत कधीं होत नाहीं, असें खचित समज. सारांश, स्वर्गाहूनही अनेक पटीनें उत्तम असे जे गुण या वृक्षांपासून पसरतात, ते शंभर वर्षांनींही वर्णून पुरणार नाहींत. हे दैत्योत्तमा, जो तेथें एक दिवसही वसति करील, तो महेंद्रासह सर्व लोकांस जिंकील, यांत संदेह नाहीं. तें स्थान स्वर्गाचाही स्वर्ग व सुखाचेंही सुख,एकंदरींत जगताचें सर्वस्व आहे, असें माझ्या मनाला वाटतें.

## अध्याय सत्त्यायशींवा.

—:०:—

### अंधकासुराचा वध.

वैशंपायन ह्मणतातः—जनमेजया, नारदाचें तें भाषण लक्षपूर्वक ऐकून त्या महासुर अंधकानें मंदरपर्वतास जाण्याचें मनांत आणिलें. मग तो महाबलाढ्य दैत्य आपल्या सर्व असुरांस एकत्र जमवून, मोठ्या तेखानें तो महातेजस्वी, महादेवाचें वसतिस्थान जो मंदरपर्वत त्यावर गेला. तो पर्वत मेघपटलानें आच्छादित, महौषधींनीं भरलेला, नाना सिद्धजनांनीं गजबजलेला व महर्षिगणांनीं सेवित असून त्यावर अगरु, चंदन, देवदारू इत्यादि अनेक वृक्ष होते. तो किन्नरांच्या उंच सुरांतील गाण्यानें रमणीय झाला होता व अनेक नागकुलांनीं भरून गेला होता. वाऱ्यानें हालणाऱ्या पुष्पित वनांच्या योगानें तो जणूं काय नाचतच होता. आर्द्र होऊन वाहणाऱ्या चित्रविचित्र खनिज धातूंच्या योगानें ठिकठिकाणीं तो अंगास लेप लाविल्यासारखा भासत होता. क्वचित् पक्ष्यांच्या अत्यंत मधुर शब्दांमुळें तो बोलतोसा वाटत होता. निर्मळ स्थानीं बसणाऱ्या व इतस्ततः उडणाऱ्या हंसांच्या योगानें व्याप्त होता. दैत्यांचा नाश करणाऱ्या व इकडे तिकडे भटकणाऱ्या महाबलाढ्य रेड्यांनीं व चंद्रकिरणांप्रमाणें शुभ्रवर्ण सिंहांनीं तो स्वर्णराशी पर्वत भूषित झाला होता. शिवाय सामान्य सिंहांचे कळपही त्यावर होते. हरणांचे थव्याचे थवे त्यावर रहात असत. अशा त्या मूर्तिमान् मंदरास तो बलगर्वित राक्षस ह्मणाला, 'मी काश्यपाच्या वरदानामुळें अवध्य झालों आहें, हें तुला ठाऊक असेलच. सर्व चराचरांसह त्रैलोक्य माझें अंकित आहे. हे पर्वता, माझ्या भयानें माझ्याशीं युद्ध करण्याला कोणी धजत नाहीं. हे महागिरे, तुझ्या शिखरावर सर्व काम देणाऱ्या पुष्पांच्या पारिजाताचें वन आहे. तें एक भूषित झालेलें रत्नच आहे. यास्तव मला परवानगी दे, ह्मणजे मी तुझ्या शिखरावरील त्या वनाचा उपभोग घेईन. माझें मन उपभोगाविषयीं अतिशय उताविळ झालें आहे. ( तूं नको ह्मणालास तरी तें वन मी भोगणार. ) तूं रागावलास तरी माझें काय करणार? कारण, मी तुला चुरडूं लागलों तर तुला कोणी राखील असें मला दिसत नाहीं. हे त्याचे शब्द ऐकतांच मंदर तेथेंच गुप्त[1] झाला. तें पाहून वरदानानें दर्पित झालेला तो अंधक अतिशय रागावला. त्यानें मोठा सिंहनाद केला व तो ह्मणाला, मी याचना करीत असतांही ज्या अर्थी तूं मला फारसा मान देत नाहींस, त्या अर्थी मी तुझें चूर्ण करितों. हे पर्वता, माझें बल तर पाहा. असें बोलून त्या पर्वताचें एक फार विस्तीर्ण शिखर उपटून त्या वीर्यवानानें तें त्याच्या दुसऱ्या शिखरावर आपटलें

१ येथें 'बभूव जगतः पूर्वं, असा आमचे लेखी पोथीचा व बंगाली पाठ आहे. परंतु तो आह्मास थोडा कमजोर वाटतो, यास्तव 'जगतः सर्वं' हा छापील पोथीचा पाठ घेतला आहे.

१ याचा अर्थ मनुष्यरूपानें उभा राहिला होता तो गुप्त झाला. जडमृण्मय रूपानें तो कायमच होता.

व वरदानाचे बळावर तो आपल्या अनुयायी असुरासह त्या पर्वताचा आश्रय करून विध्वंस करूं लागला. तेव्हां ज्याच्या पोटांत अनेक नद्यांचे समूह गुप्त आहेत, अशा त्या महागिरीचा विध्वंस केला जात आहे, ही अवस्था पाहून भगवान् रुद्रानें त्याचेवर कृपा केली. ज्याच्यावर हजारों मत्त गज व इतर पशु आहेत, व जो विचित्र अरण्यें व आकाशांतून च्युत झालेले अनेक नदीसमूह, यांनीं व्याप्त आहे, अशा त्या पर्वतावर त्यानें विशेष अनुग्रह केला. व त्यामुळें तो ( अंधकाच्या क्षोभा ) पूर्वी जसा होता, तसाच शोभूं लागला. नंतर असुरांनीं फेंकलेलीं घोर शिखरें त्या देवाच्या प्रभावानें, उलट, हे राजा, जे राक्षस पर्वतशिखरें फेंकून पळून जात होते, त्यांनाच मारूं लागलीं. पण जे असुर त्या गिरिशिखरावर स्वस्थ उभे होते, त्यांना त्या महागिरि मंदराच्या शिखरांनीं मारलें नाहीं. तेव्हां आपल्या सेनेचा अशा चमत्कारिक प्रकारानें चुराडा होत आहे, असें पाहून अंधक अतिशय रागावला व मोठी गर्जना करून म्हणाला, ‘ ज्याचें हें वन आहे, त्यालाच मी आह्वान करतों. त्यानें मजशीं युद्ध करावयास येऊन उभें रहावें. हे मंदरा, तुझ्याशीं युद्ध करण्यांत कांहीं मौज नाहीं. कारण तूं कपटानें आम्हांस युद्धांत मारीत आहेस. ’

अंधक असें बोलतांच देव महेश्वर अंधकाच्या वधेच्छेनें नंदीवर बसून हातीं शूल उचलून तेथें प्राप्त झाला. त्या त्रिनेत्र धीमान् भूतगणेश्वराबरोबर प्रमथगण व भूतगण यांचा घोळका होता.

या वेळीं शंकर रागावल्यानें सर्व त्रैलोक्य कांपूं लागलें. नद्यांचें जल पेटून त्यांचे ओघ उलट वाहूं लागले. सर्व दिशा तेजानें जळूं लागल्या. हे राजन्, सर्व ग्रहांच्या युति होऊन ते विपरीत फळ सुचवूं लागले. हे कौरवा, त्या वेळीं पर्वत डळमळूं लागले. पर्जन्य धूमासह अग्नीचा वर्षाव करूं लागला. चंद्रमा उष्णकिरण झाला व सूर्य थंडा पडला. त्या वेळीं वेदवेत्त्या मुनींस वेद स्मरेनासा झाला. घोड्या बैल विऊं लागल्या व गायींना घोडे झाले. कोणी न तोडतां वृक्ष भूमीवर पडूं लागले व जळून खाक झाले. वृषभ गाईंस पीडा देऊं लागले. व गाई बैलांवर चढाव करून उडूं लागल्या. राक्षस, यातुधान व सर्व पिशाच सर्वत्र विपरीत प्रकार आहे असें पाहून व महादेव तशा वेषानें आला आहे, असें जाणून भिऊन गेले. इतक्यांत शंकरानें प्रदीप्त अग्नीप्रमाणें ज्याची प्रभा आहे, असा शूल सोडला. तो दुर्धर शूल अंधकाच्या उरावर जाऊन आदळला व त्यानें साधूंना कांट्याप्रमाणें सलणाऱ्या अंधकास जाळून टाकिलें.

याप्रकारें त्या जगच्छत्रूचा नाश झाला असतां सर्व देवगण व तपोधन मुनि शंकराची स्तुति करूं लागले. देव दुंदुभी वाजवूं लागले. पुष्पवृष्टि झाली. व नरेंद्रा, त्रैलोक्य शांत व सुखित झालें. देवांचे गंधर्व गाऊं लागले. अप्सरांचे गण नाचूं लागले. ब्राह्मण वेद म्हणूं लागले व यज्ञ करूं लागले. ग्रह आपल्या मूळच्या स्थितीस पावले. नद्या पूर्वीप्रमाणें वाहूं लागल्या. पाण्यांत आग उठेनाशी झाली. सर्व दिशा खुलल्या. पर्वतश्रेष्ठ मंदर सर्व प्रकारच्या तेजाचा उत्कर्ष झाल्यामुळें पूर्ववत् अत्यंत शोभूं लागला. असो.

याप्रमाणें, भगवान् शंकर इंद्रादिकांच्या यथेच्छ संचारास त्रिभुवन निष्कंटक करून देऊन उमेसह पारिजातवनांत रममाण झाला.

## अध्याय अठ्यायशींवा.

—:०:—

### यादवांची जलक्रीडा.

जनमेजय म्हणतोः—हे मुने, आतां मीं ऐकलेला अंधकवधाचा इतिहास श्रवणीयच खरा. अंधकवधाचे योगानें त्या बुद्धिमान् देवानें त्रैलोक्याला शांतिलाभ दिला, हें ठीकच झालें. पण आतां चक्रपाणीनें निकुंभाचा दुसरा देह कशाकरितां व कसा नाहींसा केला तें सांग.

वैशंपायन म्हणतातः—हे निष्पाप राजा, अमित तेजस्वी लोकनाथ हरीचें चरित्र तुज श्रद्धावानालाच सांगितलें पाहिजे. राजा, अतुल तेजस्वी विष्णु द्वारकेंत रहात असतांना पिंडारकतीर्थावरील समुद्रयात्रा आली. त्या वेळीं हे भारता, राजा उग्रसेन व वासुदेव यांना नगराध्यक्ष करून ठेवून बाकीचे सर्व यादव यात्रेस निघाले. बलराम, लोकनाथ श्रीकृष्ण व इतर प्रमुख यादवकुमार हे आपापले निरनिराळे मेळे करून निघाले. उत्तमप्रकारें अलंकृत झालेल्या व रुपवान् अशा वृष्णिकुलोत्पन्न कुमारांसह हजारों वेश्याही यात्रेस निघाल्या. ह्या वेश्या म्हणजे दृढपराक्रमी यादवांनीं, दैत्यांचें वसतिस्थान जो सागर त्याला जिंकून त्यांच्या हजारों वेश्या द्वारावतींत आणून ठेविल्या होत्या त्या. ह्या वेश्या त्या महात्म्या कुमारांच्या सामयिक क्रीडास्त्रिया होत्या. नंतर त्या कुमारांपैकीं इच्छेस येईल त्यानें उपभोग घेण्यास त्या योग्य असून त्या गुणांनींच केवळ क्षत्रियांस योग्य अशा वेश्या होत्या. धीमान् कृष्णानें स्त्रियांकरितां यदूंचे कलह होऊं नयेत, म्हणून यादवांना ही मर्यादाच ठरवून दिली होती. असो. यादवश्रेष्ठ प्रतापी बलराम हा आपल्या मनोनुकूल अशा एकट्या रेवतीनामक स्त्रीसमागमेंच चक्रवाकपक्ष्याप्रमाणें प्रेमी होऊन रममाण झाला. अंगावर वनमाला घालून व कादंबरी नामक मद्याचे पानानें मत्त होऊन तो समुद्रजलांत त्या रेवतीसह क्रीडा करूं लागला. सर्वज्ञ कमलनयन गोविंद जलामध्यें सोळा सहस्र स्त्रियांशीं अनेक रुपांनीं क्रीडा करूं लागला. मीच केशवाची आवडती आहें व मजबरोबरच केशव जलांत रहात आहे, असें त्या सर्वही नारायणस्त्रिया रात्रीचे वेळीं समजूं लागल्या. त्या सर्वजणींच्या अंगावर सुरतचिन्हें होतीं. सर्वही सुरतानें तृप्त झाल्या होत्या. गोविंदानें आपला या प्रकारें अंगीकार करून बहुमान केला, त्याचा गर्व त्या सर्वजणी वाहूं लागल्या. कृष्णाच्या शुभलक्षणी स्त्रियांतील जी ती आपल्या प्रीतींतल्या परिजनांशीं 'मीच कृष्णाची आवडती, मीच कृष्णाची लाडकी आहें,' अशा प्रकारें आपल्या फुशारक्या सांगूं लागली. त्या कमलनेत्रा आपले कुच व अधर यांवर उमटलेले दांत व नखें यांचे व्रण आरशांत वारंवार पाहून आनंदित होत. आपल्या नेत्रांनीं कृष्णाचें मुखकमल जणूं काय पीतच असल्याप्रमाणें[1] त्या कृष्णस्त्रिया त्याच्या गोत्रास उद्देशून ( नांव घेऊन ) गाऊं लागल्या. राजन्, कृष्णाचे ठायीं ज्यांनीं आपलें मन व दृष्टि अर्पण केली आहे, अशा त्या अतिसुंदर कृष्णस्त्रिया आपल्या एकनिष्ठेमुळें अतिशय मनोहर दिसूं लागल्या. एकाचेच ठायीं त्यांनीं आपलें मन व दृष्टि लाविली असतांही त्या सवतींनीं परस्पर मत्सर केला नाहीं. त्या सर्वांचेच मनोरथ नारायणदेवानें पूर्ण केले असल्यानें त्या सर्वजणी सारख्याच आपलीं मस्तकें गर्वानें वर करूं लागल्या. केशवाचे वल्लभतेनें त्या फारच दर्शनीय झाल्या. आत्मसंयमी हरि समुद्राच्या निर्मल जलांत अनेक

१ पपौ निमेषालसपक्ष्मपंक्तिरूपोषिताभ्यामिव लोचनाभ्याम्—रघुवंश.

रूपें घेऊन त्या सर्वजणींशीं क्रीडा करीत होता. त्या समयीं वासुदेवाचे आज्ञेनें महासागर सर्व सुगंधांनीं संपन्न, स्वच्छ, गोड ( क्षाररहित ) व शुद्ध जल वाहूं लागला. क्रीडेसाठीं घोटयापर्यंत, गुडघाभर, मांडीइतकें, अथवा छातीइतकें, जल त्या स्त्रियांस आवडत असे. (व त्यांच्या इच्छेप्रमाणें तें होत असे.) मेघधारा जशा महोदधीवर, त्याप्रमाणें गोविंदावर त्या स्त्रिया जलाचा सेक करूं लागल्या. व मेघ जसा प्रफुल्ल वेलींना तसा कृष्ण त्यांना भिजवूं लागला. कांहीं हरिणनेत्रा कृष्णाच्या गळ्यांत हात घालून 'मी पडतें, मला घट्ट धर' असें प्रत्येकी म्हणूं लागल्या. कांहीं सर्वांगसुंदर स्त्रिया काष्ठमय नौकांत बसून जलविहार करूं लागल्या. त्यांपैकीं कोणाच्या नौका क्रौंचपक्षी, मोर, हत्ती ( अथवा सर्प ) त्यांच्या आकाराच्या होत्या, त्यांतून कांहीं तरूं लागल्या. कांहीं मकराकार, मीनाकार व दुसऱ्या बहुरूपाकारांच्या नौकांतून फिरूं लागल्या. दुसऱ्या कित्येक समुद्राच्या रम्य जलांत जनार्दनास आनंद देण्यासाठीं खऱ्या कुंभाप्रमाणेंच स्तनकुंभांचे सहाय्यानें पोहूं लागल्या. ज्या कार्याचे उद्देशानें तो श्रेष्ठ देव क्रीडत होता, तें साधण्यासाठीं तो मोठ्या आनंदानें त्या जलांत रुक्मिणीसह रममाण होऊं लागला. ती नायिका जी जी चेष्टा करील, ती ती चेष्टा तलम वस्त्र नेसलेल्या दुसऱ्याही नाजुक नारायणस्त्रिया लीलेनें करूं लागल्या. याप्रमाणें त्या कमललोचना वासुदेवाशीं खेळल्या. जिचा जो भाव असेल, त्याच भावानें तिच्या मनांत प्रवेश करून तो भावज्ञ व जितेंद्रिय केशव त्यांना आत्मवश करीत असे. तो भगवान् सनातन हृषीकेश जितेंद्रिय असतांही देशकालानुरूप स्त्रीलंपट झाला. कुलानुरूप वर्तन करणाऱ्या जनार्दनाला त्या अंगना हा आपल्या कुलाला व शीलाला योग्य आहे, असें मानित्या झाल्या. त्या वेळीं कृष्णाचें तें अनुकूल वर्तन व सहास भाषण यांचे योगानें त्या स्त्रिया त्याला मोहित झाल्या व भक्तीमुळें त्याला फारच मान देऊं लागल्या. हे राजा, त्या स्त्रिया गीत व नृत्यकर्मांत फारच प्रवीण असल्यामुळें त्यांची छाप त्या कुमारांवर बसलीच होती. त्यांतूनही दाक्षिण्यामुळें तर ते त्यांचे केवळ अंकितच होऊन राहिले. त्या उत्तम स्त्रियांचें सुंदर अभिनयांसह रम्य गायन व वाद्यें ऐकण्यांत ते यदुश्रेष्ठ दंग झाले.

आपले सर्वव्यापित्वामुळें कृष्णानें पंचचूडा अप्सरेस, कुबेराच्या श्रेष्ठ अप्सरांस व महेंद्राच्या अप्सरांसही तेथें आणविलें. त्या अति नम्र होऊन व हात जोडून उभ्या राहिल्या असतां त्यांस उठवून व त्यांचें सांत्वन करून जगत्प्रभु अमेयात्मा त्यांना म्हणाला, 'हे रमणीय क्रीडास्त्रियांनो, यादवांच्या समीप तुम्हीं निःशंकपणें या व माझें प्रिय करण्याकरितां त्यांस रममाण करा. हावभाव करणें, नाचणें, गाणें, व नानाप्रकारचीं वाद्यें वाजविणें, या कामीं तुमचे अंगीं जें कांहीं कौशल्य आहे, तें या कुमारांस एकांतांत दाखवा. असें केलें असतां मी तुमचें कल्याण अथवा इष्ट मनोरथ पूर्ण करीन. हे सर्व माझ्या शरीरासारखे आहेत. यांत व माझ्यांत कांहीं भेद समजूं नका. हरीची ही आज्ञा शिरसा वंद्य करून त्या सर्व क्रीडास्त्रिया व श्रेष्ठ अप्सरा यादवांजवळ आल्या. हे राजा, त्या सागरांत प्रवेश करतांच त्यांनीं विजांच्या योगानें प्रकाशित होणाऱ्या आकाशांतील मेघसमूहाप्रमाणें सागरांतील जल प्रकाशित झालें. त्या जलामध्यें

स्थलप्रमाणें राहून गाऊं लागल्या, वाद्यें वाजवूं लागल्या व स्वर्गभवनांत असल्याप्रमाणेंच त्या अंगना चांगल्या रीतीनें अभिनय करूं लागल्या. त्या दीर्घनयनी अप्सरांनीं[1] दिव्य गंध, माल्यें, वस्त्रें, लीला व हास्यकारक भाव यांच्या योगानें यादवांचीं मनें हरण केलीं. कटाक्ष, इंगित, हास्य, लटकेंच रुसणें व पुनः प्रसन्न होऊन त्यांच्या मनाप्रमाणें चालणें, इत्यादि गोष्टींनीं यादवांचीं मनें त्यांनीं आकर्षण करून घेतलीं. मदिरेचे अमलांत त्यांचे केवळ अंकित झालेल्या त्या यादवांस त्या श्रेष्ठ अप्सरा आकाशांतील आवहादि[2] अनेक वातस्कंधांत उंच नेऊन उत्तरोत्तर रमणीय प्रदेशांत त्यांच्याशीं विहार करूं लागल्या. व त्यामुळें तेही त्यांस फार मान देऊं लागले. त्यांच्या संतोषाकरितां प्रभु कृष्णही सर्व सोळा सहस्र स्त्रियांसह आनंदयुक्त होऊन आकाशांत विहार करूं लागला. पण अमिततेजस्वी कृष्णाचें सामर्थ्य माहीत असल्यामुळें ते यादववीर मुळींच विस्मित झाले नाहींत, तर अतिशय गांभीर्यानें राहिले. हे शत्रुनाशक जनमेजया, त्यांतील कित्येक रैवतकास जाऊन परत येत असत. कित्येक इष्ट गृहांस व वनास जाऊन येत. अतुल तेजस्वी व लोकनाथ विष्णूच्या आज्ञेनें सागराचें खारें, अपेय जल त्या वेळीं मधुर व पेय झालें. कमलनयना स्त्रिया स्थलप्रमाणें जलावरून धांवूं लागल्या. त्याचप्रमाणें त्या एकमेकींस धरून स्वच्छंदांनीं पाण्यांत बुड्या मारून पुनः वर निघत. मनांत आणतांच अनेक प्रकारचें भक्ष्य, भोज्य, पेय, चोष्य व लेह्य त्यांना प्राप्त होत असे. कधीं न कोमेजणाऱ्या पुष्पांच्या माळा धारण करणाऱ्या त्या स्त्रिया त्या कीर्तिमान यादवांस स्वर्गांतील देवांच्या सुरताच्या धरतीवर एकांतांत रममाण करूं लागल्या. सायंकाळीं स्नानें करून उटया लावून, ते अपराजित यादव आनंदानें गृहासारख्या प्रशस्त नौकांत बसून खेळूं लागले. दीर्घ, चौकोनी, वर्तुळ, सोंगटयासारखे व स्वस्तिकाकार प्रासाद विश्वकर्म्यानें नौकांमध्यें केले होते. कैलास, मंदर, मेरु, नाना प्रकारचे पक्षी, नानाप्रकारचे पशु व मृग यांतील ज्याच्या आकाराचा प्रासाद असावा, अशी त्यांना इच्छा होई, त्या आकाराचा प्रासाद तो करून देई. विचित्र रत्नजडित काम केल्यावर वैडूर्यमण्यांच्या बहिर्द्वारांनीं मरकत, चंद्रकांत व सूर्यकांत, यांतील सर्व किंवा कांहीं मण्यांच्या योगानें चित्रविचित्र रंगांनीं रंगीत झालेल्या, शेंकडों नानाप्रकारचे अस्तरणांनीं ते प्रासाद चित्रविचित्र झाले होते. तसेंच दुसरे कित्येक प्रासाद क्रौंचपक्ष्यासारखे, शुकासारखे व गजासारखे होते. नावाड्यांचे हातीं ज्याचें सुकाणूं आहे, अशा त्या चमकणाऱ्या सुवर्णमय नौकांनीं त्या सागराचें महाउर्मियुक्त जल शोभिवंत दिसत होतें. तो सागर उंच व शुभ्र होड्या, नौका, यानपात्रें व सर्व स्वर्गीयपदार्थयुक्त झिल्लिका यांच्या योगानें फार शोभूं लागला. आकाशांतील इतस्ततः फिरणाऱ्या गंधर्वनगरांप्रमाणें[1] सागराच्या जलांत यादवांचीं जलयानें सर्वतः फिरूं लागलीं. नंदनांतील प्रासादांप्रमाणें असलेल्या यानपात्रांमध्यें विश्वकर्म्यानें

---

१ अप्सरस् या शब्दाचा मूलार्थ अभ्द्यः किंवा अप्सु सरंति म्हणजे पाण्यांतून उद्भवणाऱ्या किंवा पाण्यांत फिरणाऱ्या असाच असल्यानें त्या स्थलप्रमाणेंच जलांत क्रीडा करूं लागल्या यांत नवल नाहीं.

२ आपले शास्त्रांत आवह, प्रवह, इत्यादि अनेक प्रकारचे वातावरण मानिले आहेत, यांतील आवह हा भूर्लोक व स्वर्लोक यांचे मध्यंतरीं आहे, अशी कल्पना आहे.

१ आकाशांत ढगांचे तऱ्हेतऱ्हेचे आकारांस हें नांव दिलें आहे.

सर्वच नंदनवन केलें. उद्यानें, सभा, वृक्ष, पुष्करणी, रथ व इतर सर्व शिल्पेंही नंदनाप्रमाणेंच सर्व प्रकारें तेथें निर्माण केलीं. तात्पर्य, हे वीरा, विश्वकर्म्यानें नारायणाचे आज्ञेनें त्या सर्व नौका व त्यांतील इतर रचना स्वर्गासारखी केली. पक्षी वनांमध्यें मधुर व हृद्य ध्वनि करीत होते. ते अतितेजस्वी यादवांना अतिशय मनोहर वाटले. त्या वेळीं देवलोकांतील पांढरा कोकिळ यादवांच्या इच्छेप्रमाणें मधुर व विचित्र विलाप करीत होता. चंद्रकिरणांप्रमाणें शुभ्र व आनंकारक अशा मोठ्या विस्तीर्ण मंदिरांच्या पृष्ठभागीं मयूरसमूहानें वेष्टित असे मोर मधुर शब्द करीत नाचत होते. नौकांवरील सर्व पताकांवरून अनेक पक्षी बसले होते. पुष्पमाळांत गुंतून पडलेल्या भ्रमरांनीं त्यांत सुंदर गायन चालविलें होतें. नारायणाच्या आज्ञेनें वृक्ष पुष्पांचा वारंवार वर्षाव करीत होते. ऋतु सुंदर रूपें धरून त्या वेळीं आकाशांत गेले. रतिश्रम नाहींसा करणारा, सर्व पुष्पांच्या परागांनीं युक्त व चंदनस्पर्शानें शीतळ असलेला, सुखकर वायु वाहूं लागला. हे पृथ्वीपते, त्या वेळीं क्रीडा करणाऱ्या यादवांना त्यांच्या इच्छेप्रमाणें शीत किंवा उष्ण वासुदेवाच्या कृपेनें प्राप्त झालें. चक्रपाणीच्या प्रभावानें त्या वेळीं यादवांस क्षुधा, तृषा, ग्लानि, चिंता किंवा शोक यांतील कांहींच प्राप्त झालें नाहीं. ज्यांत महावाद्यें सारखीं वाजत राहिलीं आहेत व ज्यांत गीत व नृत्य अखंड चालल्यानें ज्या मनोहर झाल्या आहेत, अशा प्रकारच्या यादवांच्या सागरक्रीडा होऊं लागल्या. कृष्णाचे पाठबळामुळें इंद्रतुल्य यादव बहु योजनें विस्तीर्ण असलेल्या जलनिधि समुद्रास आडवून धरून खेळूं लागले. त्या महात्म्या नारायणदेवाच्या सोळा हजार स्त्रीरूप परिवारास पुरेसें विस्तीर्ण गलबत विश्वकर्म्यानें केलें. हे राजन्, त्रैलोक्यामध्यें जेवढीं म्हणून विशिष्ट रत्नें होतीं, तीं सर्व अति तेजस्वी कृष्णाच्या नौकेंत होतीं. हे भारता, या नौकेंत कृष्णाच्या स्त्रियांचे पृथक् पृथक् निवास होते व त्या सर्वजणी वैडूर्यादि रत्नांच्या योगानें चित्रित आणि सुवर्णानें विभूषित झाल्या होत्या. इतर यादवांच्याही नौका सर्व ऋतूंतील पुष्पांनीं भरलेल्या, सर्व सुगंधांनीं सुगंधित आणि सुलक्षण यदुसिंहांनीं व स्वर्गांतील पक्ष्यांनीं सेवित होत्या.

## अध्याय एकुणनव्वदावा.

—:०:—

### छालिक्यक्रीडावर्णन.

वैशंपायन ह्मणतातः—( आतां बलरामाची क्रीडा ऐक. ) आजानुबाहु बलराम हा सर्वांगास चंदनाचा लेप देऊन, कादंबरी[1] नामक मद्याचे सेवनानें खुलून जाऊन, डोळे लाल झाले आहेत व झोंक जाऊं लागल्यामुळें चालतांना रेवतीचा हात धरीत आहे, अशा स्थितींत रेवतीशीं रममाण झाला होता. त्याचें नेसूं व आंगावर मेघाप्रमाणें निळ्या रंगाचें वस्त्र असून त्याचा अंगवर्ण गौर होता. त्याचे नेत्र मदिरेच्या धुंदीनें गढुळले होते, यामुळें तो मेघमंडळाचे मध्यभागीं असणाऱ्या पूर्णबिंब भगवान् चंद्राप्रमाणें शोभत होता. ज्याच्या एका डाव्या कानांतच निर्मळ कुंडल लटकलें आहे व सुंदर कमलांचें ज्यानें कर्णभूषण केलें आहे असा तो राम प्रियेचें रम्य वक्रकटाक्षयुक्त व प्रसन्न मुख पाहात आनंदित झाला.

नंतर कंस व निकुंभ यांस मारणाऱ्या श्रीकृष्णाच्या आज्ञेनें तो उत्कृष्ट रूपवती अप्सरांचा ताफा आनंदानें रेवतीस भेटावयास साग-

[1] या जातीचें मद्य कदंब जातीच्या वृक्षाच्या पुष्पांपासून काढीत असत.

रावर आला, त्या वेळीं त्या अप्सरांचें वैभव ( थाटमाट ) स्वर्गींतल्या प्रमाणेंच होतें. ज्यांची अंगयष्टि उत्तम आहे अशा त्या सर्व अप्सरा रेवतीस व बलरामासही नमस्कार करून वाद्यांचे तालावर नाचूं लागल्या व त्यांच्याबरोबर दुसऱ्या कांहीं सुंदरी उत्तम प्रकारें गायन करूं लागल्या. यादवांस सार्थ व प्रिय वाटेल अशा प्रकारें त्यांनीं गुरूपासून संपादिलेले सर्व हावभाव बलराम व रेवती यांच्या आज्ञेवरून तेथील यादवांच्या आवडीप्रमाणें, गाण्यांतील भावाचे अर्थाला न सोडतां हृदयंगम व अनुकूल अशा प्रकारें करून दाखविले. मंगल वस्तूंनीं ज्यांचीं अंगें पूर्ण भरलीं आहेत अशा श्रेष्ठ स्त्रिया त्या देशाची भाषा, आकृति व वेष हीं स्वीकारून हातांनीं टाळ्या वाजवीत व हंसत सुंदर व लीलायुक्त गायन करूं लागल्या. बलराम व कृष्ण यांस आनंद देणारीं मंगलें, कंसप्रलंबादिकांचा वध व रंगसभेंतील चाणूराचा मौजेनें केलेला वध यांचें गानपूर्वक हावभावांनीं नृत्यांत अनुकरण करून दाखवूं लागल्या. यशोदेनें चौघांपुढें आणलेल्या कृष्णाच्या कीर्तनीय गोष्टी तसेंच त्याचें दाव्यानें उदरास बांधून घेणें, अरिष्ट व धेनुक यांचा तत्कृत वध, गोकुलांतील वास, पूतना किंवा बकी हिचा वध, जुळ्या अर्जुनवृक्षांचा भंग, त्यानें केलेली समयोचित लांडग्याची उत्पत्ति, यमुनेचे डोहांत रहाणाऱ्या कालियाचें वर्णन व त्या दुरात्म्याचें श्रीकृष्णानें केलेलें दमन, त्याच शंखादि—निधियुक्त यमुनाडोहांतून मधुसूदनानें पद्मकमलांचें बाहेर काढणें, गाईंचे रक्षणासाठीं जनार्दन कृष्णानें गोवर्धन पर्वत उचलून धरणें, (उटीसाठीं) गंध घांसणाऱ्या वांकड्या कुब्जा दासीला कृष्णानें सरळ करणें, जन्महीन व अनिंद्य अशा परमात्म्यानें आपल्या सर्वव्यापित्वास एकीकडे ठेवून घेतलेलें ऱ्हस्व किंवा वामनस्वरूप, अंतरिक्षांतील शाल्वाचे विमानाचा नाश, बलरामाचें हलधरत्व, मुरराक्षसाचा वध, गंधारराजकन्यांचें हरण करतेवेळीं रथांत बलाढ्य राजांची योजना, सुभद्राहरणसमर्थींचा जयजयकार, बलाहक आणि जंबुमाळी यांशीं केलेलें युद्ध व युद्धांत अजिंक्य अशांनाही जिंकून इंद्रासमक्ष रत्नांत उत्तम अशा पारिजातवृक्षाचें हरण, इत्यादि बलराम व कृष्ण यांना प्रेम उत्पन्न करणारीं त्यांच्या विचित्र व अनेक गोष्टींनीं भरलेलीं चरित्रें, त्या सुंदर रूपवती स्त्रिया गाऊं लागल्या. कादंबरी मद्याच्या पानानें उन्मत्त झालेला तो महातेजस्वी बलराम आपल्या रेवती भार्येसह हातांनीं ताल धरून मधुर गायन करूं लागला. तो गात आहे असें पाहून महात्म्या मधुसूदनालाही आनंदाचें भरतें येऊन तोही बुद्धिमान् महात्मा बलरामास हर्ष व्हावा म्हणून सत्यभामेसह गाऊं लागला. त्याबरोबर समुद्रयात्रेकरितां आलेला नरलोकांतील शूरवीर अर्जुन प्रथम कृष्णासह आनंदानें गाऊं लागला. नंतर जिची अंगयष्टि उत्तम आहे अशा सुभद्रेसहही गाऊं लागला. हे राजा, बुद्धिमान् गद, सारण, प्रद्युम्न, सांब, सात्यकी, सत्राजितकन्येचा उदारवीर्य पुत्र, अतिसुस्वरुप चारूदेष्ण, रामाचे महावीर्यवान् निशठ व उल्मुक असे दोन वीरकुमार, गाऊं लागले. अक्रूर, सेनापती शंकु तसेंच दुसरेही यादवश्रेष्ठ गात सुटले.

हे राजपुत्रा, कृष्णाचे सामर्थ्यानें त्या समयीं तें यानपात्र ( ती नौका ) आपोआप मोठें झालें व त्यांत निवडक गाणारे श्रेष्ठ यादवांची गर्दी जमली. अतिशय गायन करणाऱ्या व देवांप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या यादववीरांच्या योगानें जगत् इतकें हर्षयुक्त झालें कीं, त्यांतील पापें शांत होऊन गेलीं. त्या वेळीं

तेथें देवांचा अतिथि नारद ब्राह्मण, मुर व केशि यांचा शत्रु जो कृष्ण त्याचें प्रिय करण्याकरितां त्या प्रमुख यादवांचे मंडळींत घुसून गाऊं लागला. त्या गाण्याचे भरांत नारदाचे जटाजूटांतील एक बट विस्कळीत होऊन लोंबूं लागली.

हे राजपुत्रा जनमेजया, त्या समयीं तो अगाध सामर्थ्यानें युक्त असा नारद मुनीच त्या रासक्रीडेंतील[1] मुख्य नायक झाला. व त्या मंडळींत भर मध्यावर उभा राहून तो नानाप्रकारचे हावभाव व लीला करून गाऊं लागला; आणि सत्यभामा व केशव, अर्जुन व सुभद्रा, बलराम व रेवती, यांकडे वारंवार पाहून हंसत सुटला. खुषमस्करी करण्याचा नारदाचा स्वभावच असल्यानें, त्यानें तेथील मंडळीचे चेष्टांची, हंसण्याची, लीलांची, हुबेहुब नक्कल करून व इतर हरयुक्ति करून तेथील सर्व स्त्रियांत त्या अगदीं हंसावयाचें नाहीं म्हणून घट्ट बसल्या असतांही हंशा पिकविला. कोणालातरी उद्देशून कांहीं तरी बोलावें, कधीं मध्यम स्वरांत व कधीं अत्युच्च स्वरांत ओरडावें, व तऱ्हेतऱ्हेनें हंसावें, व कधीं स्वतः फारसें हंसें येत नसलें तरी कृष्णाचे रंजनार्थ म्हणून लटकेंच पुष्कळसें हंसावें, असा प्रकार नारदानें चालविला. तेव्हां हे राजपुत्रा, ह्या कामगिरीबद्दल कृष्णाच्या आज्ञेनें तरुणींनीं त्यास आपआपल्या योग्यतेप्रमाणें सुंदर व जगांत सर्वोत्तम अशीं पुष्कळ रत्नें व वस्त्रें दिलीं. कृष्णाचा हेतु व ह्या समयाचा रंग ओळखून त्यांनीं स्वर्गांतील पुष्पें, संतानकल्प वृक्षाच्या फुलांच्या माळा, अति-मुक्त लतेचीं फुलें, व दुसरींही सर्व ऋतूंत होणारीं पुष्पें त्या वेळीं नारदास आणून दिलीं.

असो; याप्रमाणें नारदाचें गायन आटपलें असतां त्याला आपल्या हातीं धरून अप्रमेय कृष्ण सत्यभामा व अर्जुन यांसह समुद्रांत पडला. मग गालांत हंसून, तो महा पराक्रमी श्रीमान् कृष्ण सात्यकीस ह्मणाला, आतां, त्वरा करून आपल्या मंडळीच्या ( मीं सांगतों त्याप्रमाणें ) दोन तुकड्या करा आणि या समुद्रांत पडूं द्या ( शिरा ) आणि या स्त्रियांसह आमची जलांत क्रीडा होऊंदे. अर्धे यादव व माझे पुत्र यांचा नेता रेवतीसह बलराम होवो. आणि उरलेले अर्धे यादव व बलरामाचे पुत्र हे समुद्रजलांत माझ्या बाजूला येऊंदेत. इतक्यांत तेथें हात जोडून उभा असलेल्या समुद्रास प्रसन्नतेनें कृष्ण म्हणाला " आतां तुझें जल सुगंधी होऊंदे व मधुर होऊंदे. तुझे पाण्यांतील मगरसुसरी दूर जाऊंदे. तुझे तीरावरील भूमि रथांस व पायांस सुखकर व रत्नभूषित आणि उघडी होऊंदे. आमच्या या लोकांच्या मनास जें जें आवडेल, तें तें तूं त्यांना दे. माझ्या प्रभावानें तें सर्व तुला आपोआप कळेल. तुझें जल पिण्यास योग्य, व सर्व जनांस इष्ट असें पेय होवो. सर्वांच्या मनांस सुखकर हो. तुझ्यांतील मासे सौम्यरूप व वैडूर्य, मोत्यें, रत्नें व सुवर्ण यांच्या योगानें विचित्र होवोत. तूं सुगंध, सुस्पर्श व सुरस यानीं युक्त, भ्रमरांनीं सेवित, मनोहर, व रक्तवर्णानें युक्त अशीं सुंदर कमलें धारण कर. गुळांचें[1] मद्य, मधुपुष्पसंबंधी मद्य, ताडी माडी इत्यादिकांनीं भरलेले कुंभ आपल्या पाण्यावर तयार ठेव. त्याचप्रमाणें सोन्याचीं पानपात्रेंही तयार असूं देत. म्हणजे यादव त्यांतून पेयें पितील. हे जलनिधे, तुझें जल पुष्पसमूहानें सुवासिक व शीतल होऊंदे; व

१ येथें, 'रासप्रणेता व रामप्रणेता' असे दोन पाठ आहेत. आम्हीं पहिला घेतला.

१ पूर्वीं गौडी, माध्वी व पैष्टि म्हणजे गुळापासून केलेली, मोहाचे फुलापासून केलेली व पीठापासून केलेली, अशी तीन प्रकारची दारू असे.

सावधान चित्तानें रहा. स्त्रीजनांसह यादवांचा मनोभंग होणार नाहीं असें वागण्याचा प्रयत्न कर.

समुद्राला याप्रमाणें सांगून भगवान् अर्जुनाबरोबर खेळूं लागला. कृष्णाच्या तोंडावरून त्याचें इंगित ओळखणाऱ्या सत्यभामेनें नारदास पाण्यानें भिजविलें. इतक्यांत मद्याची निशा चढल्यानें ज्याचा चेहेरा खुलला आहे, असा बलराम कामगान करीत मनोहर रेवतीचा हात आपल्या हातानें धरून लीलेनेंच जलांत पडला. रामाच्या मागून कृष्णाचे पुत्र व मुख्य यादव समुद्रांत भराभर उड्या मारूं लागले. त्यांचीं वस्त्रें व आभरणें सुंदर असून खेळाच्या रंगांत ते फार दंग होऊन गेले होते. मदिरेच्या योगानें त्यांचेही नेत्र गढूळ झाले होते. इतर यादव व क्रीडेमुळें रम्य दिसणारे निशठ-उल्मुकादि बलराम पुत्र, कृष्णाचे बाजुस आले. त्यांचीं वस्त्रें व आभरणें विचित्र होतीं. ते सर्व धुंदींत होते व त्यांचे कंठप्रदेश संतानपुष्पांच्या माळांनीं झांकले होते. ते सर्व वीर्यसंपन्न होते. त्यांनीं आपल्या शरीरांवर सुंदर चिन्हें धारण केलीं होतीं. त्यांच्या अंगांस उटी फांसली होती व त्यांचे हातांत जलपात्रें होतीं. ते त्या देशांत मनोहर मानलेलीं गाणीं गात होते. वाद्य-घोष-प्रिय यादवांनीं सुरावर नानास्वरांचीं जलवाद्यें केलीं. स्वर्गवासी अप्सरांसह शेंकडों वेश्यावधु कृष्णाच्या आज्ञेनें गाऊं लागल्या. आकाशगंगेच्या जलांत वाद्यें वाजविण्याचा ज्यांना अभ्यास आहे अशा केवळ कामासक्त देवतरुणी जलदर्दुर[१] या नावांचीं वाद्यें वाजवूं लागल्या; व दुसऱ्या तरुण स्त्रिया त्या ठेक्यावर आनंदाचे भरांत गाऊं लागल्या. कमलांच्या कळ्यांप्रमाणें ज्यांचे नेत्र दीर्घ आहेत व ज्यांनीं डोकींत गजरे घातले आहेत, अशा देववेश्यांनीं सूर्यप्रकाशानें प्रफुल्लित झालेल्या कमलांच्या शोभेस मागें सारलें. पूर्णचंद्रासारख्या शेंकडों स्त्रीमुखचंद्राच्या योगानें तो समुद्र यदृच्छेनें अथवा देवांच्या प्रयत्नानें सहस्रावधि चंद्रांनीं व्याप्त झालेल्या आकाशाप्रमाणें शोभूं लागला. हे राजन्, तो समुद्ररूपी मेघ स्त्रीरूपी विद्युल्लतांच्या योगानें सुंदर दिसूं लागला. आकाशांतील मेघांप्रमाणें तो जलपतिही विद्युन्मिश्रित असल्यासारखा चमकूं लागला. आपल्या पक्षांतील मंडळीस ज्यानें सुंदर चिन्ह केलें आहे अशा कृष्णानें नारदास घेऊन बळरामाच्या पक्षांतील शिक्का मारलेल्या लोकांस व बळरामास पाण्यानें भिजविलें; व उलट बळरामानेंही मधुसूदनाच्या सुंदर[१]चिन्हयुक्त मंडळीवर पाणी शिंपडलें. खेळाचे वेडानें बेहोष व मद्यपानानें मत्त झालेल्या कृष्ण व बलराम यांच्या स्त्रिया अतिशय हृष्ट होऊन हातांनीं पिचकाऱ्या उडवून परस्परांवर जलसें करूं लागल्या. ज्यांचे नेत्र आरक्त झाले आहेत व जलसेक करण्यामध्यें जे दंग झाले आहेत असे यादव स्त्रियांसमक्ष पुरुषार्थ करूं लागले. मान, मदन व मद याचे भरांत ते फार वेळ क्रीडा करीत राहिले तरी ती त्यांना पुरेशी वाटेना. ते अतीच बेफाम झाले आहेत असें पाहून चक्रधर कृष्ण, नारद व पार्थ यांसह स्वतः क्रीडेपासून निवृत्त झाला; व जलवाद्य वाजवून इतर यादवांचेंही त्यानें निवारण केलें. ते यादव अतिशय मानी होते.

१ 'पाणबेडुक' हा शब्दार्थ झाला, यावरून हें बेडकाचे आकाराचें किंवा बेडकासारखा शब्द करणारें वाद्य असावें. किंवा केवळ पाण्यांत शब्द करणारें म्हणून त्यास बेडकाचें सादृश्य दिलें असावें.

१ त्या त्या पक्षाची मंडळी वेगळी ओळखावी, म्हणून बलराम व कृष्ण यांनीं आपापल्या पुढ्याच्या मंडळीचे अंगावर कसला तरी विशिष्ट खुणेचा छाप मारिला असावा.

तथापि कृष्णाचा हेतु पाहूनच जलयुद्धाच्या आसक्ती-पासून निवृत्त झाले. व ते प्रियांना नित्य आनंद देणारे यादव आणि त्यांच्या विश्वस्त प्रिया हीं मग नाचूं लागलीं. तें नृत्य समाप्त होतांच श्रीमान् कृष्णानें पाण्याचा आश्रय सोडला व जलांतून वर येऊन त्यानें त्या स्थितींत शरीरास सुखकर अशी उटी त्या मुनिश्रेष्ठास देऊन स्वतःही लाविली. कृष्ण पाण्यांतून वर आला आहे, असें पाहून यादवांनींही जल सोडलें व अंग पुसून ते अप्रमेय वीर कृष्णाच्या आज्ञेनें पानभूमींत ( पान स्थानीं ) गेले. तेथें ते वीर वय[1], क्रम व आज्ञा यास अनुसरून बसले व आनंदानें भोजन करूं लागले. व हितकर-असलेलीं पेयेंही त्यांनीं प्राशन केलीं. पक्वमांसें, आंबट फळें, खट्टे अनार, व शूलांस टोंचून भाजलेले पशूंचे मांसाचे तुकडे, शुद्ध स्वयंपाक्यांनीं आणून दिलेले शूलांस टोंचून टोंचून शिजविलेले तात्ये, चांगले भाजले आहेत असें पाहून त्यावर ऊन तूप ओतलें, आणि आमसुलें व इतर सुंदर आंबट फळें व संचळ खार, त्यांच्याशीं मिळविलीं. नंतर तें मांस आचाऱ्यांना सांगितलेल्या क्रमानें त्यांना वाढलें. स्वयंपाक्याच्या सांगण्यावरून यथा-विधी सिद्ध केलेलीं पशूंचीं पुष्ट मांसें, व गोडें मीठ वगैरे घालून तयार केलेलीं नाना प्रकारचीं पक्वान्नें, त्यांना वाढिलीं. पुष्कळ तूप घालून तळलेले पशूंच्या कुशीचे तुकडे, मीठ व मिऱ्यांची पूड यांत चांगले घोळून त्यांना दिले. मुळ्यांसह डाळींबें, महाळुंगें, आ:जबला, हिंग, आलें, अळू यांचा त्यांनीं स्वाद घेतला. अप्रमेय व आनंदित अशा यादवांनीं सुंदर पानपात्रें आपल्या सुंदर मुखांस लाऊन पेय प्राशन केलें. प्रियांकडून परिवेष्टित झालेल्या यादवांनीं तेल, तूप, आंबट रस व गोडें मीठ यांनीं युक्त, व कडू रसांनीं भरलेले, काष्ठशूल ज्यांच्या आंगांत टोंचले आहेत, अशा पक्ष्यांच्या योगानें आपली क्षुधा शांत करून घेतली. त्यांनीं उसाची दारू, मोहाची दारू, मद्य व आसवें यांचें पान केलें. जिरें[1], केशर, मीठ घातलेले, सुगंधी, व अत्यंत भक्षणीय असे, आर्द्र नांवाचे खाद्य पदार्थ त्यावर म्हशीचें दूध घालून व पुष्कळ तुपांत भिजवून त्यांनीं खाल्ले. त्याचप्रमाणें पेढेबर्फी वगैरे नानाप्रकारची मीठाईही त्यांनीं भक्षण केली. त्यांच्यामध्यें मद्यपान व मांसभक्षण यांचा त्याग केलेले जे उद्धव, भोज प्रभृति साधु होते, ते नाना प्रकारच्या भाज्या, आमटी, वरण, तक्रादि पेयें, दहीं, दूध व असेच दुसरेहि स्निग्ध पदार्थ[2] खाऊन अतिशय आनंदित झाले. त्याचप्रमाणें त्यांनीं नानाप्रकारची सुगंधी कांजी व साखर घालून आटविलेलें दूध पानाच्या द्रोणांनीं प्राशन केलें.

याप्रमाणें यथेच्छ भोजन करून तृप्त झालेले ते वीर व मुख्य यादव स्त्रियांसहवर्तमान पुन्हां क्रीडा करावयास सज्ज झाले. आनंदानें त्यांनीं मनोहर गाणीं म्हटलीं व त्यांच्या सुंदर स्त्रियांनीं रम्य अभिनय केले.

---

१ त्यांच्या बसण्यांत तीन मुद्दे होते वयाचें लहान मोठेपण; मानाचें लहान मोठेपण व विशिष्ट आज्ञा.

१ मूळांत ‘ श्वेतेन युक्तानपि शोणितेन’ याचा अर्थ वाईकरांनीं ‘ शुभ्र शोणितानें युक्त असा केला आहे.’ शोणित ह्मणजे रक्त हें शुभ्र कसें असतें हें आह्मांस कळत नाहीं. व रक्त कसल्या खाद्य पदार्थांत ओतितात तेंही माहीत नाहीं, ह्मणून आह्मी श्वेत ह्मणजे जिरें व शोणित ह्मणजे केशर असा अर्थ धरिला आहे व त्याला कोशाचा आधार आहे.

२ येथें ही गोष्ट ध्यानांत घेण्याजोगी आहे कीं, मद्य मांसाची जेथें पूर्ण मोकळीक होती तेथें देखील या वस्तु त्याज्य मानणारे योग्य पुरुष होते, भगवान् मनूचें ह्मणणें देखील असें आहे. (मनुस्मृति अध्याय ५ श्लो० ५६ पहा)

त्यानंतर अत्यंत हृष्ट झालेल्या भगवान् उपेंद्रानें त्या रात्रीं गांधर्व म्हणून म्हणतात असें जें बहुतजणानीं गाण्याचें छालिक्य नांवाचें गान तें गाण्याविषयीं आज्ञा केली. त्याबरोबर नारदानें सहा ग्रामांनीं ( स्थानांनीं ) युक्त असलेल्या रागामुळें जिच्या ठिकाणीं चित्ताचें ऐकाग्र्य होतें, अशी आपली विणा उचलिली. स्वतः कृष्णानें अनेक स्त्रियांसहें नृत्य करण्याचें कबूल केलें व त्यानें आपली मुरली हातांत घेतली. हे राजन्, अर्जुनानें मृदंग घेतला. तें पाहून संतुष्ट झालेल्या श्रेष्ठ अप्सरांनीं दुसरीं अनेक वाद्यें उचललीं. नंतर असारिताचे अंतीं नर्तकीच्या प्रवेशाचा काल झाला असतां संतुष्ट झालेली रंभा उठली; कारण, ती अभिनय करण्यांत फार चतुर होती. तिची अंगयष्टि सुंदर असल्यानें तिचा अभिनय पाहून राम व जनार्दन संतुष्ट झाले. रंभेचा अभिनय झाल्यावर जिचे नेत्र सुंदर व विशाल आहेत अशी उर्वशी, हेमा, मिश्रकेशी, तिलोत्तमा, मेनका व दुसऱ्याही उत्तम अप्सरा हरीला खूष करण्याकरितां उठल्या व त्यांनीं प्रेक्षकांच्या मनाला पटतील अशा भावनांनीं प्रेरित होऊन सुंदर गायन व अभिनय केले. वासुदेवेंही त्यांचे ठिकाणीं आसक्त झाला असल्यानें त्यानें उलटपक्षीं स्वतः उदार नृत्य, गीत व अभिनय दाखवून, आणि पारितोषिक देऊन त्यांस संतुष्ट केलें. हे राजा, तेथें त्या कालीं आलेल्या पंचचूडा प्रभृति श्रेष्ठ अप्सरांनीं आपला स्वर्गाहून बरोबर आणिलेला मानीपणा, शाबासकीचा तांबूल मिळवून सिद्ध केला व कृष्णप्रेमास्तवच त्यांनीं स्वर्गातून उत्तम सुगंधयुक्त फळें, उत्तम मद्यें व भूलोकींच्या मनुष्यांवर अनुग्रह करण्याकरितां छालिक्य नामक गायनाचा प्रकारही आपले बरोबर आणिला होता. तें सर्व तेथें प्रकट केलें. तें अत्यंत रमणीय छालिक्य नामक गायन व त्या गायनाचे वेळची ती ऐटदार बैठक यांची हुबेहुब नक्कल श्रीकृष्णाचेंच तेज प्रद्युम्नाचे अंगांत खेळत असल्यानें त्या बुद्धिमंतानें करून दाखविली व त्यानेंच त्या अप्सरांना तांबूल दिला. आणि मनुष्यांना सदैव प्रिय वाटणारें तें छालिक्यगान कृष्ण, राम, प्रद्युम्न, अनिरुद्ध व सांब या पांचही इंद्रतुल्य प्रभाव-शाली वीरांनीं गाऊन दाखविलें. उदार कीर्तिमान् नारायणाला अत्यंत इष्ट असलेलें उत्तम गायन, कल्याणकारक, वृद्धिकर प्रशस्त, मंगल-कारक, यशस्कर, पावन, पुष्टि व उत्कर्ष करणारें, दुःखादिकांचा भार नाहींसा करणारें, धर्माची वृद्धि करणारें, कीर्तनानें दुःस्वप्नाचा नाश करणारें आहे. तें पापाचा विध्वंस करितें. हे राजन्, हें छालिक्य गायन देवसदनांत रेवत राजा ऐकत बसला असतांना त्याला चार सहस्र युगें एका क्षणासारखीं वाटलीं. या छालिक्यापासूनच कुमारजाति, गांधर्वजाति इत्यादि गांधर्वभेद प्रवृत्त झाले. राजन्, ज्याप्रमाणें एका दीपापासून दुसरे अनेक दीप प्रवृत्त होतात, त्याप्रमाणें

१ यांचीं नावें. मध्य, शुद्ध, मित्र, गौड, मिश्र, गीती.

२ मुख्यरागही सहा आहेत. ते. भैरव, मालव, सारंग, हिंदोल, वसंत, दीपक व मेघ.

३ एक पुरुष व बरोबर अनेक स्त्रिया असल्या नृत्याला ' हल्लीसक ' अशी संज्ञा आहे.

४ भरतमुनीनें नृत्यविधींत आसारिताचे चार प्रकार सांगितले आहेत, १ नर्तकीचा प्रवेश २ अर्थानुकूल अभिनय ३ तालानुरूप अंगविक्षेप करणें ४ देवताचिन्ह रूपानें नृत्य करणें,

५ या ठिकाणीं एक पाठ; ' ता वासुदेवेऽप्यनुरक्त चित्ताः ' असा आहे, परंतु कलकत्ता व आमचे जवळील लेखीपोथी, यांवरील पाठ 'ता वासुदेवोऽ प्यनुरक्त चित्तः' असा आहे; व तोच आम्हांस अधिक बरा वाटून आम्ही घेतला आहे.

छालिक्य गांधर्वापासून गायनाच्या दुसऱ्या अनेक जाति निर्माण झाल्या. कृष्ण नारद व प्रद्युम्नप्रभृति मुख्य मुख्य इतर यादव यांस त्या जाति खऱ्या समजल्या. या लोकामध्यें इतर जनांस छालिक्य गायनाचे उत्कृष्ट गुणांचें अनुभविक ज्ञान केवल तावन्मात्र असतें त्यांना त्याचें खरेंखरें ज्ञान नसतें. कारण, नद्यांचें जल जसें समुद्रांत, तसें इतर सर्व गायन छालिक्यांत अंतर्भूत होतें. ( एवंच, हें छालिक्य ह्मणजे अखिल गायनप्रकारांचा निधि आहे. याचा ठाव प्राकृतांस कसा लागणार. ) त्याचे फलाची व उत्तम गुणाची योग्यता जाणण्यास हिमालय पर्वत समर्थ आहे. या छालिक्य गायनांत त्यांतील मूर्च्छना, व षड्ग्राम, व राग यांची यथास्थान योजना व त्यांची बजावणी हीं साध्य व्हावयास उदंड तपःसिद्धीवांचून मार्ग नाहीं ( तें साधण्यास तपश्चर्याच पाहिजे ) कारण, या छालिक्याचा कोठें एक अवयव किंवा अंश ज्याला लेश किंवा 'सुकुमार जाति' असें ह्मणतात तीच मनुष्यांस अखेरपर्यंत पुरापुर साध्य होण्यास त्यांचे टांके ढिले होतात. ( मग असल्या अनेक जातींचा निधि जें छालिक्य तें संपूर्ण साध्य होण्याचें मनुष्यांचे स्वप्नींहि शक्य नाहीं हें उघड आहे. ) हे नरदेवा, या छालिक्य गांधर्वाचे पूर्ण गुण वठवून दाखविणें हें कर्म केवळ देव, गंधर्व व महर्षि-संघ यांसच शक्य आहे. ही गोष्ट मधुसूदनानें स्वबुद्धीनें जाणून हें छालिक्य त्यानें लोकांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें उत्तम यादवांना साध्य करून दिलें. त्यामुळें तें देवांनीं गावयास योग्य असलेलें गायन इहलोकीं प्रतिष्ठेस प्राप्त झालें. कारण, तेव्हांपासून बाल, तरुण व वृद्ध यादव मोठमोठ्या उत्सवांमध्यें क्रीडा करित असतांना छालिक्याचा उपयोग करीत. प्रथम बाल मंडळी गात व मागून वृद्ध त्याला मान देत. आणि आपापल्या स्थानामध्यें तर ते नित्यच त्याचा सन्मान करीत असत. पुरातन धर्मविधीस जाणणारे अतिवीर यादव आपल्या वंशाच्या धर्माला स्मरून, मानाला प्रीति प्रमाण आहे, वय प्रमाण नाहीं हें तत्व या मृत्युलोकांतील मनुष्यांपुढें मांडण्यासाठीं आपल्या मुलांना गाण्यांत अग्रमान देऊं लागले. त्या दाशार्हांनीं असें पाहिलें कीं, जेथें प्रीति तेथें खरी दोस्ती ! व हें ध्यानांत वागवून, ते वृष्णि व अंधक लोक, त्यांना त्या प्रसंगीं केशिमर्दन कृष्णानें रवाना केल्यापासून आपापल्या पुत्रांशीं वयाचें अंतर विसरून बरोबरीच्या मित्राच्या नात्यानें वागूं लागले. अत्यंत आनंदित झालेले अप्सरांचे समूह आनंदरूप जो मधु-कंस-शत्रु केशव त्याला प्रणाम करून स्वर्गास गेले. तेथें त्यांना पाहून देवमंडळीही आनंदित झाली.

१ या अलौकिक छालिक्यासंबधें आह्मी पुष्कळ संगीतज्ञांस विचारिलें परंतु समाधान मिळालें नाहीं. कालिदासाचे वेळीं हें माहीत असावें, कारण मालविकाग्निमित्रांत याचा उल्लेख आहे. पण तेथेंही त्याचें लक्षण उपलब्ध नसून शिवाय तें दुष्प्रयाज्यमुदाहरंति (मा. अं. २) म्हणजे तें करून दाखविण्यास कठीण आहे, असेंच म्हटलें आहे.

२ ग्रामाचे सप्तमांशाला मूर्च्छना ह्मणतात.

## अध्याय नव्वदावा.

—:०:—

### निकुंभवध.

वैशंपायन म्हणाले:—हे राजा, पुण्यकर्में करणारे ते यादव क्रीडासक्त झाले ही फट पाहून दुर्जिक्य, दुष्टबुद्धि व आत्मवधाची इच्छा करणारा देवशत्रु निकुंभ दानव यानें भानुमती नामक भानुकन्येचें हरण केलें. पूर्ववैर स्मरणाऱ्या त्या मायाव्यानें मायेनें दडून राहून व यादवांच्या स्त्रीवर्गास भुरळ घालून तिचें

हरण केलें. हे वीरा, ( वैराचें कारण ) त्याच्या वज्रनाभ नामक भ्रात्याची प्रभावती कन्या प्रद्युम्नानें पूर्वीं हरण केली होती व त्यानें वज्रनाभालाही मारलें होतें म्हणून तो छिद्रज्ञ दानवाधम भानु यादव हा द्वारकेजवळच वनांत रहात असून त्याचें बंदोबस्ताचें कन्यान्तःपुर त्या वेळीं रक्षकशून्य झालें, असें पाहून तेथें आला व भानुमतीला हरण करून नेऊं लागला तेव्हां ती आक्रोश करूं लागली. त्यामुळें कन्यान्तःपुरांत मोठा कोलाहल झाला. पण हे रणशूरा, तो ऐकतांच वासुदेव व उग्रसेन सज्ज होऊन कन्यांतःपुरांत आले. परंतु, अपकार करणारा तो निकुंभ त्यांना तेथें दृष्टिगोचर झाला नाहीं. म्हणून ते सज्ज झालेले दोघे वीर तसेच महाबल कृष्ण जेथें होता तेथें आले. झालेला वृत्तांत त्यांपासून ऐकतांच तो महाबल शत्रुनाशक जनार्दन पार्थासह आपल्या सर्पशत्रु गरुडरूपी वहानावर बसला. व " तूं रथारूढ होऊन मागोमाग ये" असें प्रद्युम्नाला सांगून त्या वीरानें कश्यपपुत्र गरुडास 'त्वरा-कर' अशी आज्ञा केली. आणि अल्पकालांतच आपल्या वज्रनगरास परतत असलेल्या त्या रणदुर्जय निकुंभाला शत्रुहंत्या महात्म्या पार्थकृष्णांनीं गांठलें.

राजन्, इतक्यांत मायाव्यांतील श्रेष्ठ व महातेजस्वी प्रद्युम्नही तेथें येऊन पोंचला. प्रतिपक्षी तीन आहेत असें पाहून निकुंभानेंही आपलीं तीन शरीरें केलीं. व देवांसारखा त्या सर्वांशीं अनेक कंटकांच्या योगानें जड झालेल्या गदांनीं[1] हंसतच युद्ध करूं लागला. हे राजा, डाव्या हातानें कुमारी भानुमतीला धरून व उजव्या हातांत गदा घेऊन तो त्यांच्यावर प्रहार करूं लागला. त्या कन्येखातर दोघे कृष्ण ( पार्थ व जनार्दन ) व प्रद्युम्न यांना त्या निकुंभ महा-असुरावर प्रहार करवतना. ते दुर्जिक्य महात्मे त्या शत्रूस मारण्यास समर्थ होते. परंतु, हे नरपते, दयाभारानें दडपून जाऊन ते निःश्वास सोडूं लागले. धनुर्धरांतील श्रेष्ठ पार्थ सर्व प्रकारचे युद्धांत कुशल होता. उंटाला सर्पानें वेढलें असतां उंटाला कांहीं इजा न होतां अजगर मात्र मरावा म्हणून कुशल शस्त्रज्ञ आपलें शस्त्र जसें चालवितो त्याप्रमाणें त्या पार्थानें कौशल्यानें त्या महादैत्यावर शर सोडले. हे राजन्, त्या बाणांनीं ( कन्येचे वाटेस न जातां ) दानवालाच युद्धांत वेध केला. अर्जुनाची उत्तम कुशलता, युक्ति व शिक्षण यांच्या योगानें त्यांनीं कन्येला स्पर्शही केला नाहीं. पण अर्जुनाच्या बाणांनीं शरीर छिन्नभिन्न होऊं लागलें, तेव्हां तो राक्षस आसुरी मायेचा आश्रय करून कन्येसह गुप्त झाला. त्या मायेस प्रायः कोणी मानव जाणत नाहींत. अशा प्रसंगीं कृष्ण, पार्थ व प्रद्युम्न त्याच्या मागून गेले. तो महासुर हारितपक्षी होऊन राहिला होता. तेव्हां अर्जुनानें कन्येला बचावून मर्मभेद करणाऱ्या वैतस्तिक[1] बाणांनीं पुनः त्याला ताडन करण्याचा आरंभ केला. तो शत्रुमर्दक वीर महासुर ते तिघेही शूर एकसारखे मागें लागले असतां सर्व सप्तद्वीप पृथ्वीभर पळत सुटला. पण तो गोकर्णपर्वतावरून जेव्हां जाऊं लागला. तेव्हां कन्येसह गंगेच्या तीरीं पुलिनांत पडला. राजन्, महादेवाच्या तेजानें रक्षित असलेल्या गोकर्णाचें उल्लंघन देव, असुर किंवा तपोधन ऋषि करीत नाहींत.

असो; तो पडला आहे हा अवसर साधून त्या पराक्रमी चलाख प्रद्युम्नानें भानुमती कन्येला हातीं धरलें. इतक्यांत दोघां कृष्णांनीं त्या असुराला तीक्ष्ण बाणांनीं जर्जर केलें.

---

१ गदा ह्मणजे करेल्यासारखी नुसती नसून तींत लोखंडी कांटे सर्वभर टोंचलेले असतात.

१ बहुधा हे बाण वीतभर लांबीचे असावे.

तेव्हां निकुंभ उत्तरगोकर्ण सोडून दक्षिणदिशेस चालला. गरुडारूढ असलेले दोघेही कृष्ण त्याच्या मागोमाग गेले. तो असुर आपल्या ज्ञातीच्या लोकांचें घरच अशा षट्पुरांत शिरला. तेव्हां दोघे वीर कृष्णही षट्पुरांत जाण्याच्या गुहेच्या दाराशीं रात्रभर बसले. व कृष्णाच्या आज्ञेवरून प्रद्युम्नानें आनंदित चित्तानें भानुमतीस द्वारकेस नेऊन पोंचविलें. व त्याच पावलीं तो दानवांनीं व्याप्त झालेल्या षट्पुरास परत आला. तों गुहेच्या तोंडाशींच असलेल्या दोघां भयंकर पराक्रमी कृष्णांस त्यानें पाहिलें. तेव्हां निकुंभवधाची इच्छा करणाऱ्या त्या दोघां कृष्णांनीं प्रद्युम्नालाही स्वसाह्यार्थ षट्पुराचें केवळ बहिर्द्वारच अशी जी गुहा तिच्याशीं बसवून घेतलें.

कांहीं वेळानें बलवान् व भयंकर पराक्रम करणारा निकुंभ त्यांच्याशीं लढण्याकरितां बिळांतून बाहेर आला. पण, त्याचा बाहेर पडण्याचा मार्ग पार्थानें गांडीवापासून बाण सोडून सर्व बाजूंनीं अडवून सोडला. तेव्हां त्या शूर निकुंभानें जिला पुष्कळ कांटे आहेत अशी घोर गदा उचलून व गुप्त रीतीनें अर्जुनापाशीं जाऊन त्याच्या मस्तकावर तिचा तीक्ष्ण प्रहार केला. त्यामुळें अर्थातच वीर पार्थ मूर्च्छित झाला व त्या प्रहारानें रक्त ओकूं लागला. तें पाहून त्या मत्त असुरानें हंसून प्रद्युम्नासही प्रहार केला. प्रद्युम्न हा जरी स्वतः त्या असुराप्रमाणेंच त्या गारुडविद्येंत निपुण होता तरी तो पूर्वाभिमुख उभा राहिला असतां निकुंभानें गुप्तपणें मागून जाऊन त्याचे मस्तकावर मागून गदेचा प्रहार केल्यामुळें, तो त्या तडाक्यानें मूर्च्छित होऊन पडला. गदेचे असह्य प्रहारानें दोघेही मोहित होऊन निश्चेष्ट पडले असें पहातांच क्रोधानें गोविंदाचें देहभान सुटून तो निकुंभावर धांवून गेला. गदाग्रजानें आपली कौमोदकी गदा उचलून त्याच्यावर चाल केली. ते दोघे गर्जना करीत एकमेकांवर धांवून गेले. त्या दोघां देवासुरांचें महा घोर युद्ध ऐरावतावर बसलेला इंद्र सर्व देवगणांसह पाहूं लागला. अंतरिक्षांतील देवांकडे पाहून तो शत्रूंचें दमनकर्ता हृषिकेश देवांचें हित करण्याच्या इच्छेनें तऱ्हतऱ्हेचे युद्धानें दानवास मारण्याची इच्छा करूं लागला. त्या युद्धनिपुण महाबाहु केशवानें आपला कौमोदकी गदा सहज मौजेनें फिरवितांना तिचीं किती तरी विचित्र मंडलें करून दाखविलीं. (निरनिराळे चक्राकार हात करून दाखविले) तें पाहून तो असुरश्रेष्ठही आपली बहुकंटकयुक्त गदा मोठ्या करामतीनें फिरवीत मंडलाकार गिरक्या घेऊं लागला. ते दोघे बैलांप्रमाणें गर्जना करीत होते व गजांप्रमाणें चीत्कार करीत होते. आपल्या जातीची ऋतुमती मादी पुढें आली असतां तिच्याकरितां झगडणाऱ्या दोघां हिंस्र पशूंप्रमाणें ते निर्दयपणें एकमेकांवर तुटून पडले. निकुंभानें वीर कृष्णाला अति दारुण नाद करून जिला घणघणाऱ्या आठ घंटा लाविल्या आहेत अशा गदेनें ताडन केलें. त्याबरोबर कृष्णानेंही आपली महागदा गरगर फिरवून निकुंभाच्या डोक्यांत घातली. व शत्रूचा उत्कर्ष दाखविण्याकरितां एक क्षणभर गदेचा आधार धरून जगद्गुरु धीमान् हरि मोहित होऊन भूमीवर पडला. त्या वेळीं लागलेंच सर्व जग हाहाःकार करूं लागलें. हे राजा, महात्मा वासुदेव अशा प्रकारें मूर्छित पडला असतां स्वतः देवेश्वरानें आकाशगंगेच्या शीतळ, सुगंधी व अमृतमिश्रित जलानें त्याच्यावर वृष्टि केली. खरें पहातां सुरोत्तम कृष्णानें मुद्दामच तसें केलें होतें. कारण, त्या महात्म्या हरीला यु-

द्धामध्यें मोहित करण्यास कोण समर्थ आहे ?

लौकरच तो शत्रुनाशक कृष्ण ठिकाणीं येऊन चक्र उचलून "घे" असें त्या दुरात्म्याला म्हणाला. त्याबरोबर अति मायावी दुरासद निकुंभही तें शरीर सोडून उडून गेला. पण तो शरीर सोडून गेला आहे, हें केशवाचे लक्षांत आलें नाहीं. त्याला वाटलें हा मरावयास टेंकला कीं मेला आहे व म्हणून वीर जनार्दनानें धर्मास आठवून त्याचें रक्षण केलें. इतक्यांत प्रद्युम्न व कुंतीपुत्र हेही सावध झाले व निकुंभाच्या वधाविषयीं निश्चय करून नारायणापाशीं येऊन राहिले. पण मायावी प्रद्युम्नाला तें कळल्यामुळें तो कृष्णास म्हणाला,"बाबा, निकुंभ येथें नाहीं. तो दुर्मति दुसरे कोठें तरी गेला आहे." प्रद्युम्नाच्या तोंडांतून इतकीं अक्षरें बाहेर पडतांच त्याचें तें शरीर नाहींसें झालें. तो चमत्कार पाहून अर्जुनासह भगवान प्रभु हंसूं लागला. त्यानंतर हे राजा, सहस्रावधि निकुंभ राक्षस पृथ्वीवर व अंतरिक्षांत सर्वत्र या तिघां वीरांनां दिसले. त्यांतील हजारों निकुंभ पार्थावर, हजारों प्रद्युम्नावर व हजारों कृष्णावर धांवून आले. खरोखर तो मोठा चमत्कारच झाला. त्यांतील कित्येकांनीं अर्जुनाचें धनुष्य, कित्येकांनीं त्याचे महाशर, कित्येकांनीं त्याचे हात व दुसऱ्या कित्येक महासुरांनीं त्याचे दोन्ही पाय धरले; व याप्रमाणें त्या वीरास धरून राक्षस आकाशांत गेले. धरलेल्या पार्थांचीही कोट्यवधि संख्या झाली. रिपुनाशक कृष्ण व कृष्णपुत्र यांना तिचा अंत लागला नाहीं. पार्थरहित झालेले ते दोघे वीर बाणांनीं निकुंभास तोडूं लागले. पण हे भारता, दोन तुकडे केलेल्या एकेका निकुंभाचे दोन दोन राक्षस झाले. तेव्हां दिव्य ज्ञानवान् कृष्णानें दिव्य दृष्टीनें पाहिलें. भगवान् मधुसूदनानें, खरा निकुंभ कोणता तें ओळखिलें. व सर्व मायांचा स्रष्टा आणि अर्जुनास हरण करणारा अशा त्याचें शिर भूत, भविष्य व वर्तमान यांच्या स्वामी असुरनाशकानें सर्व भूतांसमक्ष चक्रानें कापलें. तेव्हां, हे राजन्, मस्तक तुटल्यामुळें तो असुरश्रेष्ठ अर्जुनास सोडून मूळ तुटलेल्या वृक्षाप्रमाणें खालीं पडला. हे मानद, आकाशांतून पडणाऱ्या त्या अर्जुनाला कृष्णाचे आज्ञेवरून प्रद्युम्नानें वरच्यावर धरलें.

याप्रमाणें निकुंभ भूमीवर पडला असतां धनंजयाचें आश्वासन करून देव पार्थ व प्रद्युम्न यांसह द्वारकेस गेला. आनंदानें द्वारकेंत गेल्यावर त्या सर्वव्यापी यदुनंदनानें महात्म्या नारदांस वंदन केलें. त्यानंतर महातेजस्वी नारद भानु यादवास म्हणाले: "भानो, तूं शोक करूं नकोस. हे भैमनंदना, ऐक. रैवताच्या उद्यानांत क्रीडा करीत असतां तुझ्या मुलीनें दुर्वासाला कोप आणला, म्हणून त्या मुनीनें रोषानें 'या असल्या भिकार लाडांमुळें ही कन्या शत्रूच्या हातीं पडेल.' असा तुझ्या कन्येला शाप दिला. त्या वेळीं तुझ्या कन्येसाठीं मी व इतर मुनींनीं त्याला असें बोलून सुप्रसन्न केलें कीं, हे मुने, धर्मज्ञ, धार्मिकश्रेष्ठा, निरपराध व व्रतस्थ अशा या अल्पवयी कुमारीला तूं शाप कसा दिलास ? तिच्यासाठीं आम्हीं तुझी विनवणी करीत आहोंत. म्हणून त्वां तिजवर कृपा करावी. हे भैमनंदना, आम्हीं असें सांगितलें असतां दयार्द्र झालेला दुर्वासमुनि क्षणभर खालीं मान करून बोलला. " मी जें वाक्य बोललों आहें तें अक्षरशः खरें होईल. ती अवश्य रिपूच्या हातांत जाईल यांत शंका नाहीं. पण ही दूषित न होतां हिला धर्माप्रमाणें पतिलाभ होईल. ती बहुपुत्रा, बहुधना व सुभगा होईल. हिच्या शरीराला सुगंध येईल. व ही सदा पुनः पुनः कुमारी होईल. ह्या कृशांगीला या शापाचें दुःख सोसावें ला-

गणार नाहीं. ( ह्मणजे तिला या शत्रुहरणाची आठवण रहाणार नाहीं. ) असो; ( नारद सांगतात, ) यास्तव हे वीरा, ही आपली भानुमती सहदेवाला दे. तो पांडुपुत्र श्रद्धालु, शूर व धर्मशील आहे.

त्यानंतर नारदाचें वचन आठवणाऱ्या धर्मात्म्या भानूनें भानुमती माद्रिपुत्र सहदेवास दिली. कृष्णानें धाडलेल्या लोकांनीं सहदेवाला द्वारकेंत आणलें व भानुमतीशीं विवाह होऊन भार्येसह तो आपल्या नगरीस गेला.

जो पुरुष हा कृष्णविजय वाचील किंवा ऐकेल त्या श्रद्धालु पुरुषाला सर्व कृत्यांत विजय प्राप्त होईल.

## अध्याय एक्याण्णवावा.

—:०:—

### वज्रनाभ व भानुमति.

जनमेजय म्हणतातः—हे धर्मिष्ठमुने, भानुमतीचें हरण, केशवाचा विजय व अति तेजस्वी यादवांची सागरांतील क्रीडा मीं ऐकली. खरोखरच तें मोठें आश्चर्य होय. पण, निकुंभाच्या वधाचा वृत्तांत सांगत असतांना तूं वज्रनाभाच्या मृत्यूचा निर्देश केला होतास; यास्तव, मुने, तुझ्या अनुग्रहामुळें तें ऐकण्याची मला मोठी उत्कंठा झाली आहे. ती तूं कृपा केल्यास पूर्ण होईल.

वैशंपायन सांगतातः—बरें आहे. राजा, मी तुला वज्रनाभाचा वध व कामाचा आणि सांबाचा विजय सांगतों. हे नरपते, वज्रनाभ या नांवानें विख्यात, दृढनिश्चयी, व रणविजयी एक महा असुर होता. त्यानें मेरूच्या पर्वतावर तप केलें. त्यामुळें लोकपितामह महा तेजस्वी ब्रह्मा त्याच्यावर संतुष्ट झाला व तपानें अतिशय संतुष्ट होऊन त्यानें राक्षसाला वर मागण्यास सांगितलें. तेव्हां त्या दानवश्रेष्ठानें सर्व देवांपासून अवध्यत्व व सर्व रत्नमय आणि शुभ असें वज्रपूर नांवाचें पूर मागितलें. हे भारता, त्या पुरांत वायूचाही स्वेच्छेनें प्रवेश होऊं नये. चिंतन न करितां कामांची प्राप्ति व्हावी. आणि त्या अप्रमेय नगराच्या चारी बाजूंस शेंकडों प्राकारसहित उद्यानयुक्त शाखानगरें असावींत, अशी त्या असुरानें प्रार्थना केली. हे जनमेजया, ब्रह्मदेवाच्या वरदानानें त्याला तसलें नगर प्राप्त झालें व त्या वेळेपासून तो महा असुर वज्रनाभ वज्रनरांत राहूं लागला. प्राप्तवर अशा त्या असुराभोवतीं कोट्यवधि असुर जमले व ते सर्व वज्रपुरांत अथवा त्याच्या सभोंवारच्या प्रासादांत राहूं लागले. हे राजा, कांहीं देवशत्रु हृष्ट, पुष्ट व अतिशय आनंदित होऊन त्या रम्य शाखानगरांतील मुख्य गृहांत रहात होते. वरदानानें उन्मत्त झालेला दुष्टात्मा वज्रनाभ या आपल्या राजधानींत राहून सर्व जगाला पीडा देऊं लागला. हे राजा, तो देवलोकास जाऊन इंद्राला म्हणाला, "हे पाकशासना, मी त्रैलोक्याचें राज्य करण्याची इच्छा करतों. यास्तव, एकतर तूं राज्य सोड. किंवा, हे देवेंद्रा, माझ्याशीं युद्ध कर. कारण, सर्व जग कश्यपाच्या समर्थ पुत्रांचें सामान्य[1] मालकीचें आहे. ( त्यावर तुझीच मालकी कां असावी? ) हे कौरवा, हें ऐकून इंद्रानें बृहस्पतींची सल्ला घेऊन वज्रनाभास उत्तर केलें. 'हे सौम्या, आमचा पिता मुनि कश्यप सत्रामध्यें दीक्षा घेऊन बसला आहे. यास्तव, त्याचें चालू सत्र संपलें म्हणजे तो जें न्याय्य असेल तें करील.' त्यानंतर दानव आपल्या कश्यप पित्याकडे जाऊन देवराजानें जसें सांगितलें

[1] देव व असुर हे उभयही कश्यपाचेच पुत्र असल्यामुळें आपलाहि हक्क आहे असा त्या असुराचे बोलण्याचा आशय.

होतें तसें त्यास सांगूं लागला, तेव्हां कश्यप त्यास म्हणाला, 'माझें हें सत्र संपलें म्हणजे मी तुमचा विभाग करीन. जें न्याय्य असेल तें होईल. तोंपर्यंत, हे पुत्रा, तूं वज्रपुरांत जाऊन त्याचाच आश्रय करून रहा.' कश्यपाचें तें सांगणें ऐकून वज्रनाम आपल्या नगरास गेला. देव महेंद्रही द्वारांच्या योगानें शोभणाऱ्या द्वारकेस गेला. तेथें जाऊन दडून राहिलेला तो इंद्र वासुदेवाला वज्रनाभाचा वृत्तांत सांगूं लागला. तेव्हां जनार्दन त्यास म्हणाला, 'हे देवेंद्रा, वसुदेवाचा अश्वमेध महायज्ञ थोडक्याच दिवसांत होणार आहे. तो झाला म्हणजे मी वज्रनाभाला मारीन. पण त्याच्या नगरांत प्रवेश करण्याचा उपाय आपण दोघे एव्हांपासून शोधूं या. कारण, ब्रह्मदेवानें केलेल्या मर्यादेमुळें त्या राक्षसाच्या इच्छेवांचून वायूचाही त्यांत प्रवेश होत नाहीं.

नंतर वासुदेवानें त्याचा सत्कार केला.आणि तो स्वीकारून इंद्र तेथून गेला. पुढें, हे भारता, धीमान् वसुदेवाचा अश्वमेध सुरू झाला. तेव्हां वज्रपुरांत प्रवेश करण्याविषयीं दोघे वीर इंद्र व अच्युत विचार करूं लागले. इकडे यज्ञ चालला असतां भद्र या नांवाच्या एका नटानें आपल्या नाट्याच्या योगानें महर्षींस संतुष्ट केलें. तेव्हां महर्षींनीं त्यास हवा तो वर मागावयास सांगितलें असतां, देवेंद्र व कृष्ण यांच्या प्रेरणेनें सरस्वतीनें त्याच्या शरीरांत प्रवेश केल्यामुळें, अश्वमेधयज्ञांत आलेल्या मुनिश्रेष्ठांस प्रणाम करून, तो देवेश्वरासारखा भद्रनट वर मागूं लागला कीं, ( नट म्हणतो ) 'हे मुनिश्रेष्ठहो, मी सर्व द्विजांचा भोज्य व्हावें, मी या सप्तद्वीप पृथ्वींत संचार करावा; आकाशांत मला गमन करितां यावें; मी विशेष प्रकारें शक्तिमान् व्हावें; स्थावरजंगम या दोन्ही प्रकारच्या सर्व भूतांस मी अवध्य व्हावें; मृत अथवा जिवंत किंवा भविष्यकालीं मी उत्पन्न केलेल्या कोणाही पुरुषांच्या वेषानें मला पाहिजे तेथें प्रवेश करितां यावा; मी जरा व रोग यांनीं रहित व वेगवान् व्हावें आणि मुनि व दुसरे सर्व मजवर सदा प्रसन्न व्हावे.'

राजा, नटानें असा वर मागितला असतां ब्राह्मणांनीं "तथास्तु" असें ह्मटलें. त्यानंतर तो देवोपम नट सप्तद्वीप पृथ्वींत सर्वत्र फिरूं लागला. दानवेंद्रांचीं नगरें, उत्तर कुरुदेश, भद्राश्व, केतुमाल, कालाम्रद्वीप व सर्व पर्व समयीं यादवांनीं मंडित झालेली द्वारका इत्यादिकांमध्यें तो वर मिळालेला वीर महानट येऊं लागला. त्यानंतर देवलोकीं रहाणारे हंस व धार्तराष्ट्र[१] पक्षी यांचें सांत्वन करून सुरेश्वर भगवान् इंद्र त्यांस म्हणाला "तुह्मी कश्यपपुत्र देवपक्षी आमचे भाऊ आहां. देव व पुण्यवान् पुरुष यांचीं विमानें तुम्ही वहात असतां. देवांचें शत्रुवधरूपी कार्य तुम्हांला करावयाचें आहे तें करा व आमची ही मसलत कांहीं झालें तरी बाहेर फोडूं नका. पण, ही देवांची आज्ञा न पाळाल तर तुम्हास कडक शासन होईल. हे उत्तम हंसांनो, तुम्हाला सर्वत्र जाण्याची मोकळीक आहे. यास्तव तुम्ही येथून निघून दुसऱ्या कोणालाही प्रवेश करितां न येण्यासारख्या उत्तम वज्रपुरांत जा. व तेथल्या अंतःपुरांतील वापींत विहार करा.कारण,तेथील विहार तुम्हांलाच उचित आहे. त्या पुरांत वज्रनाभ

१ द्वारकेस 'द्वारावती' ह्मणत तें या तिच्या द्वारांमुळेंच.

१ धार्तराष्ट्र हिही एक हंसपक्ष्याचीच जात आहे. या पक्ष्यांची चोंच व पाय काळे असतात "निपतंति धार्तराष्ट्राःकालवशान्मेदिनी पृष्ठे"

( वेणीसंहार )

राक्षसाची त्रैलोक्यांतील स्त्रियांहून सुंदर, सुलक्षणी व जणू काय कन्यारत्नच अशी प्रभावती या नांवाची चंद्रप्रभेसारखी प्रभायुक्त कन्या आहे. महादेवी पार्वतीपासून वर मागून घेऊन तिच्या मातेनें तिला पैदा केलें आहे, असें आम्हीं ऐकलें आहे. त्या साध्वी व सुंदर कन्येनें स्वयंवर करावा असें तिच्या बांधवांनीं ठरविलें आहे. हे हंसांनो, यामुळें ती आपल्या इच्छेनें पति वरील. यास्तव, तुम्ही तेथें जाऊन तिजपाशीं रूप, कुल, शील व वय यांना शोभतील असे महात्म्या प्रद्युम्नाचे उत्तम गुण गा. ते ऐकून ती साध्वी वज्रनाभसुता त्याच्यावर आसक्त झाली म्हणजे तिचा संदेश गुप्तपणें त्याच्याकडे न्या. व प्रद्युम्नाचाही तिला उलट निरोप आणून पोंचवा. ही कामगिरी लक्षपूर्वक करा. मीं तुम्हांला ही कार्याची दिशा सांगितली आहे. तिच्या अनुरोधानें आपल्या बुद्धीनें ज्या वेळीं जें उचित वाटेल तें करा. सारांश, माझें हित होईल असें करा. तेथें असतांना तुमचे नेत्र व मुद्रा सर्वदा प्रसन्न ठेवीत जा. जिकडून प्रभावतीचें मन प्रद्युम्नावर बसेल त्या त्या प्रकारेंच त्याचे गुण तुम्ही तिला सांगा आणि कांहीं झालें तरी तुम्ही प्रत्यहीं घडलेला वृत्तांत मला व द्वारकेंतील माझ्या कनिष्ठ भ्रात्याला म्हणजे कृष्णाला कळवीत जा. आत्मज्ञ प्रद्युम्न प्रभु सर्वोत्तम वज्रनाभकन्येला वरीपर्यंत तुम्ही हा यत्न चालू ठेवावा. ब्रह्मदेवाच्या वरानें मत्त झालेल्या व देवांस अवध्य असलेल्या तेथील राक्षसांना युद्धांत प्रद्युम्नादि देवपुत्रांच्या हातूनच मारविलें पाहिजे. वर मिळालेला भद्र नांवाचा एक नट आहे. त्याचा वेष घेऊन वज्रनाभाचा नाश करणारे प्रद्युम्नादि यादव तेथें जातील. सारांश, आमचें प्रिय करण्याच्या इच्छेनें समयीं उचित दिसेल तें सर्व व दुसरेंही तुम्हीं करावें. कारण, हंसांनो, देवांचा प्रवेश तेथें कसा तो होणें शक्य नाहीं. वज्रनाभाची इच्छा असेल तरच तेथें सर्वांचा प्रवेश होत असतो.

## अध्याय ब्याण्णवावा.

—:०:—

### हंस वज्रपुरास जातात.

वैशंपायन सांगतातः—हे लोकपाला, इंद्राचें वचन ऐकून ते हंस तत्काल वज्रपुरास गेले. कारण, त्यांनीं तेथें अगोदर जाणेंच इष्ट होतें. ते वीरपक्षी स्पर्शयोग्य ( मृदु ) अशा सुवर्णपद्मकमलांनीं भरलेल्या तेथील रम्य गृहवापींमध्यें जाऊन उतरले. हे वीरा, ते पक्षी वज्रनाभाचे अंतःपुरांतील स्त्रियांनीं क्रीडा करण्याकरितां बांधलेल्या ज्या बावड्या होत्या त्यांत शिरून आपल्या मधुर शब्दानें लोकांनीं पूर्वीं कधींच न ऐकलेल्या अशा व्यक्त (मनुष्य) वाणीनें भाषण करीत होते. त्यामुळें ते जरी त्या स्थळीं प्रथमच गेले होते, तरी त्यांना पाहून लोकांना फार विस्मय वाटला. हे जनेश्वरा, ते धार्तराष्ट्रपक्षी अतिशय मधुर आलाप करीत होते. तें ऐकून वज्रनाभ त्यांस ह्मणाला, "मधुर भाषण करणारे तुह्मीं स्वर्गांत नित्य रमतांच. पण जेव्हां तुह्मीं येथें येतां तेव्हां आह्मांला परमोत्सव वाटतो, हें तुह्मांस ठाऊक आहे. यास्तव हे हंसांनो, असेच येत जा. हें घर तुमचेंच आहे. तुह्मीं स्वर्गनिवासी आहां, तरी येथें निर्भय प्रवेश करा."

हे भारता, वज्रनाभानें असें सांगितलें असतां ते पक्षी "बरें आहे" असें ह्मणून त्या दानवेंद्राच्या घरांत शिरले. देवकार्यार्थ त्यांनीं तेथील लोकांशीं ओळख पाडली व मनुष्यवाणीनें बोलून त्यांनीं लोकांना नानाप्रकारच्या कथा सांगितल्या. त्या हंसांनीं सांगितलेल्या गोष्टी सर्व समृद्धीनें युक्त अशा कश्यपवंशीय दैत्यांचेच संबंधाच्या

असल्यामुळें त्या एकत्र गुंफलेल्या गोष्टी ऐकण्यांत दैत्यस्त्रिया तर फारच गर्क झाल्या. नंतर इतस्ततः फिरत असतां वज्रनाभाची सुंदर हास्य करणारी व अति सुंदर कन्या प्रभावती त्यांचे दृष्टीस पडली. मग त्या हंसांनीं त्या रमणीशीं परिचय केला. राजकन्येनें त्यांतील एक शुचिमुखी हंसी आपली सखी केली. मग त्या हंसीनें शेंकडों अत्यंत रमणीय अशा गोष्टी त्या वज्रनाभसुतेला सांगून तिचा प्रथम आपले ठायीं पूर्ण विश्वास बसवून घेतला आणि नंतर एक दिवस समय पाहून तिला ह्मणाली, ' हे प्रभावति, रूप, शील व गुण यांच्या योगानें मी तुला त्रैलोक्यसुंदरी समजतें आणि यास्तव हे देवि, मी तुला कांहीं सांगण्याचें धारिष्ट करीत आहें. हे चारुहासिनि, भीरु, तुझें तारुण्य व्यर्थ जात आहे. वाहून गेलेल्या जलप्रवाहाप्रमाणें गेलेलें वयही फिरून येत नसतें. हे देवि, स्त्रियांना या जगांत कामोपभोगासारखी गोडी दुसऱ्या कशांतही नसते हें मी तुला सत्य सांगत आहें. हे सर्वांगशोभने, पित्यानें तुला स्वतः पति निवडण्याची आज्ञा दिली आहे असें असून देव किंवा असुर यांच्या कुलांत उत्पन्न झालेल्या कोणालाही तूं वरीत नाहींस हें काय? हे सुश्रोणि, रूप, ऐश्वर्य व गुण यांनीं मंडित असून सर्वथा तुझ्या कुलालाही अनुरूप असे अनेक पुरुष आजपर्यंत तुजकडे आले आणि तूं त्यांना फेंटाळल्यामुळें बिचारे लाजेनें खालीं मान घालून परतले. हे देवि, हे कल्याणि, याप्रमाणें तुझे कुलरूपाला सदृश अशा तुजकडे चालून आलेल्या पुरुषांनाही जर तूं पसंत करीत नाहींस, तर अशा तुजकडे रुक्मिणीपुत्र प्रद्युम्न तरी कशाला येईल ? पण हे शुभे, सुंदरि, या त्रैलोक्यांत रूपानें, कुलानें, गुणानें व शौर्यानेंही त्याची बरोबरी करणारा दुसरा कोणी नाहीं. हे सुश्रोणि, तो महाबल धर्मात्मा मनुष्यांमध्यें मनुष्य, दानवांमध्यें दानव व देवांमध्यें देव आहे. हे देवि, त्याला पहातांच स्त्रियांचे मध्यप्रदेश गायींच्या ओंट्यांप्रमाणें किंवा नद्यांच्या प्रवाहाप्रमाणें आर्द्र होतात. मी त्याच्या मुखाला पूर्ण चंद्राची, नेत्रांना कमलांची व गतीला सिंहाच्या गतीची उपमा देण्याचें धाडस करीत नाहीं ( तीही न्यूनच होईल). हे शुभे, प्रभावशाली विष्णूनें सर्व जगाचें सार काढून व अनंगास साङ्ग करून आपला पुत्र केलें तोच हा प्रद्युम्न. शंबरासुरानें त्याला अगदीं बाळपणीं हिरावून नेलें असतां त्यानें त्या असुराला मारलें आणि सर्व मायावी विद्या संपादन करूनही आपलें शील बिघडविलें नाहीं. हे पुष्टश्रोणि, त्रिभुवनांतील ज्या ज्या इष्ट गुणांची तूं कल्पना करशील ते ते सर्व प्रद्युम्नामध्यें आढळतील. तो कांतीनें अग्नीसारखा, क्षमेनें पृथ्वीसारखा, तेजानें ( प्रभावानें ) सूर्यासारखा व गांभीर्यानें डोहासारखा आहे.

तें ऐकून भामिनी प्रभावती त्या शुचिमुखीस म्हणाली, " नारदमुनि माझे पित्याशीं बोलत असतां त्यांचे तोंडून विष्णु हा कृष्णरूपानें सांप्रत भूतलीं आला असल्याचें मीं अनेक वेळां ऐकलें आहे. परंतु हे निर्मले, तो आम्हां दैत्यांचा सुप्रसिद्ध वैरी असल्यामुळें मला सदैव त्याला वर्ज्यच केलें पाहिजे. कारण हे मानिनि, त्यानें आपल्या जळजळित सुदर्शनानें, शार्ङ्ग धनुष्यानें व गदेनें दैत्यांचीं कुळेंचींकुळें जाळून खाक केलीं आहेत. सखे, बाह्य नगरप्रदेशीं रहाणारे जे असुर आहेत त्यांस वज्रनाभही असेंच सांगत असतो. पण, हे शुचिस्मिते, सर्वच स्त्रियांचा असा मनोरथ असतो कीं, आपलें पतिकुल पितृकुलाहून श्रेष्ठ असावें. यास्तव, तो येथें येईल असा

जर कांहीं उपाय असेल व तो तूं मला सांगशील तर मजवर मोठा अनुग्रह होईल व माझें कुल पावन केल्यासारखें होईल. हे मधुर-भाषिणि हंसि, मीं प्रश्न केला आहे म्हणून तूं माझे कार्यास बळकटी आण आणि तो वृष्णिकुलोत्पन्न प्रद्युम्न माझा भर्ता होईल असें कर. पण हरि हा दैत्यांचा अत्यंत वैरी असून त्यांस चीड आणणारा आहे. असुरांच्या वृद्ध स्त्रियांचे तोंडून मीं पूर्वींच प्रद्युम्नाचा जन्म ऐकला आहे. त्यानें कालशंबराला कसें मारलें तेंही मला ठाऊक आहे. हे सत्तमे, प्रद्युम्न नेहमीं माझ्या हृदयांत बसूनच आहे. पण त्याच्याशीं माझा समागम होण्याला कांहीं निमित्तच दिसत नाहीं. मी तुझी दासी आहें आणि मी सखीला योग्य अशा दूतकर्मामध्यें तुला नियुक्त करतें. हे सखे, तूं चतुर आहेस यास्तव त्याच्या संगमाविषयीं मला उपाय सांग.

तें ऐकून ती शुचिमुखी हंसी तिचें सांत्वन करीत व हंसत म्हणाली, हे चारुहासिनि, मी तुझी दूती होऊन तेथें जाईन. ही तुझी उत्कृष्ट भक्ति त्याला सांगेन व तो येथें तुजसन्निध येईल असें करीन. आणि हे सुश्रोणि, प्रद्युम्नरूपी प्रत्यक्ष मदनाकडूनच तुझी कामना तृप्त होईल. हें माझें सांगणें तूं सदैव ध्यानांत धर आणि माझें हें गोष्टीचातुर्य तुझे पित्यालाही सांग. म्हणजे हे दीर्घलोचने, हें माझें तुजविषयींचें ममत्व तुझ्या पित्याचे द्वारानें तुझ्या हिताला साधक होईल.

प्रभावतीनें हंसीचे सांगण्याप्रमाणें बापास कळविलें. त्यावरून तो दानवेंद्र त्या हंसीस अंतःपुरांत असें विचारूं लागला कीं, 'हे शुचिमुखि, प्रभावतीनें तुझी कथाकुशलता मला सांगितली आहे. यास्तव, मला एक चांगलीशी कथा सांग. उत्तम पक्षिणि, तूं या जगांत कोणतें आश्चर्य पाहिलें आहेस? हे अनिंदिते, दुसऱ्यांनीं पूर्वीं न पाहिलेलें असें जें कांहीं योग्यायोग्य तूं पाहिलें असशील तें मला सांग.' हे राजन्, यावर हंसी त्या महातेजस्वी दानवेंद्र वज्रनाभास "ठीक आहे सांगतें, ऐक." असें म्हणून ती अशी कथा सांगूं लागली.

हंसी ह्मणालीः—हे उत्तम दानवा, मी शांडिली नांवाची साध्वी पाहिली. ती मनस्विनी मेरूच्या पृष्ठभागीं आश्चर्यकारक कर्म करीत होती. त्याचप्रमाणें त्या शांडिलिपासून बऱ्याच अंतरावर[1] पार्वतीची शुभलक्षणी सखी कौशल्या नांवाची मोठ्या निर्मळ मनाची व भूतमात्राचें हित करण्यांत तत्पर असलेली मीं पाहिली. मुनींनीं वर दिलेला एक शुभ नट मी पाहिला. तो कामरूपी ( सर्वांस ) भोज्य व त्रैलोक्यांत नित्य संमत झाला आहे. तो उत्तर कुरूंस, कालाम्रद्वीपांस, भद्राश्वांस, केतुमाल देशांस व अशाच दुसऱ्याही द्वीपांस जातो. देवगंधर्वांचीं गायनें व विविध नृत्यें तो जाणतो. तो आपल्या नृत्यानें देवांस सर्वप्रकारें चकित करून सोडितो.

वज्रनाभ ह्मणालाः—हे हंसि, मीं हें सविस्तर वर्तमान महात्म्या सिद्धांच्या व चारणांच्या तोंडून नुकतेंच ऐकलें आहे. हे पक्षिनंदिनि, त्या वर प्राप्त झालेल्या नटाविषयीं मलाही मोठें कौतुक वाटत आहे. पण त्याचा माझा परिचय नाहीं.

---

१ या ठिकाणीं--" कथंचिद्वर शांडिल्याः शैलपुत्र्याः शुभासखी " याचा अर्थ कोणी--" मी त्या पर्वतकन्या श्रेष्ठ शांडिलीची कशी तशी मैत्रीण झालें " असा करितात. परंतु, शांडिली ही पर्वतकन्या कशी हें समजत नाहीं. केवळ ती मेरूपर्वतावर तप करीत होती, ह्मणून इंग्रजींत जसें जंगली लोकांना The sons of the forest असें म्हणण्यांत येतें. तसें ' पर्वतकन्या ' म्हणून म्हटलें असल्यास नकळे. या ठिकाणीं लेखी पोथीचा पाठ " तथा विदूरे शांडिल्याः " असा आहे. त्याचा अर्थ त्याचप्रमाणें शांडिलीपासून दूर अंतरावर " पार्वतीची मैत्रीण रहात असते " असा होतो.

हंसी ह्मणतेः—' हे दैत्यश्रेष्ठा, तो गुणवान् पुरुषाचें नांव ऐकतांच तत्काल त्याच्याकडे जात असतो. तो सप्तद्वीपांत फिरतो. तो सर्वथा गुणांचा दास आहे. तुझे गुण जर त्यानें ऐकले तर तो नट, हे महासुरा, तुझ्या या नगरांत आलाच आहे असें समज.'

वज्रनाभ म्हणालाः—पक्षिनंदिनि, शुभे, हंसि, तुझें कल्याण होवो. तो या माझ्या देशीं येईल असा कांहीं उपाय कर.

त्यानंतर ( हंसीशीं संकेत करून त्या ) कार्याकरितां वज्रनाभानें ते हंस बाहेर पाठविले असतां, ते देवेंद्र व कृष्ण यांना सर्व वृत्त सांगते झाले. तेव्हां कृष्णानें प्रभावतीशीं शरीरसंबंध करण्याकरितां व वज्रनाभाला मारण्याकरितां त्या कामीं प्रद्युम्नाला नियुक्त केलें. दैवी मायेचा आश्रय करून हरीनें त्याला नटाचा वेष दिला. आणि हे भारता, त्यानें दुसऱ्या यादवांनाही नटवेषानें त्याच्या बरोबर पाठविलें. प्रद्युम्नाला नायक करून सांबाला विदूषक करून वीर गदाला पारिपार्श्व[1] करून त्याचप्रमाणें दुसऱ्या यादवांस त्यांच्या नृत्यगीतवादित्राप्रमाणें वेश्या व नटी करून भद्र नामक यादव व इतर सर्व भद्रनटाचे सहायकर्ते करून कृष्णानें त्यांची पाठवणी केली. प्रद्युम्नानें केलेल्या रम्य विमानांत ते सर्व महारथ बसले व देवांच्या कार्याकरितां ते महातेजस्वी आकाशयानांतून गेले. ते पुरुष एक एका पुरुषाप्रमाणेंच जरी रूपानें पृथक पृथक होते तरी, हे राजा, आवाजाच्या कामांत ते सर्वहि स्त्रियांशीं[2] तुल्य होते. ( सर्वांचीं रूपें भिन्न होतीं, पण आवाज एकजात जनानी होते. ) असो; ते सर्व वज्रनगराच्या सुपुरनामक उत्तम शाखा नगरास जाऊन पोंचले. तें दानवांनीं व्याप्त होतें.

१ हा नाटकांतील सूत्रधाराचा साह्यकर्ता असतो.

२ या ठिकाणीं कोणाचा पाठ "स्त्रीणांच सदृशाः सर्वे ते स्वरूपैर्नराधिपाः" असा आहे. पण त्यानें समंजस अर्थ होत नाहीं. शिवाय कलकत्ताप्रत व आमची लेखी पोथी यांत "स्त्रीणांच सदृशाः सर्वेस्वररूपैर्नराधिप" असा पाठ आहे. तो अधिक ग्राह्य वाटल्यानें घेतला आहे.

## अध्याय त्र्याण्णवावा.

—:०:—

### नटप्रभाव—प्रद्युम्नप्रवेश.

वैशंपायन म्हणतातः—हे राजा, त्यानंतर वज्रनाभानें सुपुरवासी[1] असुरांस या नटांना ( उतरण्यास ) उत्तम गृह द्या, अशी आज्ञा केली व यांचें आतिथ्य करा, पुष्कळ रत्नांचें यांस उपायन ( भेट ) द्या; आणि विचित्र वस्त्रें अर्पण करा; कारण, यांच्या द्वारां सर्वांस उत्तम सुख देणारें जनरंजन होणार आहे, असें सांगितलें. आपल्या स्वामीची ही आज्ञा ऐकून असुरांनीं सर्व प्रकारें तसेंच केलें. पूर्वीं ज्याचें नांव कानीं आलें होतें तोच नट आला आहे, असें समजतांच सर्वांना मोठें कौतुक वाटलें. दैत्यांनीं मोठ्या आनंदानें त्या नटाचा मोठा सत्कार केला. वेष पालटण्याकरितां त्याला पुष्कळ रत्नेंहीं दिलीं.

त्यानंतर वर प्राप्त झालेला नट तेथें असा नाच करूं लागला कीं, त्याच्या योगानें त्या शहरांतील पौरजनांना परम हर्ष झाला. रामायण महाकाव्यास उद्देशून त्यानें नाटक केलें. त्यांत रावणाच्या वधाच्या हेतूनें अप्रमेय विष्णूचा जन्म झाला असें दाखविलें होतें. त्या नाटकांत लोमपादाच्या दशरथ मित्रानें महामुनि ऋष्यशृंग व शांता यांना गणिकांसह आणविलें असा भाग होता. राम, लक्ष्मण, शत्रुघ्न व भरत, ऋष्यशृंग व शांता इत्यादिकांच्या भूमिका त्या नटांनीं इतक्या हुबेहुब घेतल्या

१ येथें 'स्वपुरवासीनां' असेंही पाठांतर आहे.

होत्या कीं, त्या वेळचे जिवंत असलेले वृद्ध दानव त्या पाहून विस्मित झाले व ते, यांचें रूप अगदीं थेट त्यांच्यासारखें आहे. असें, हे राजन्, तेथल्या लोकांना सांगूं लागले. त्यांचें वेषधारण, अभिनय, क्रियाकौशल्य व पात्रांचा प्रवेश इत्यादि सर्व कौशल्य पाहून दानव विस्मित झाले. नाटक पहाण्यांत गुंग झालेले असुर नाट्यविषयामध्यें पुनः पुनः उठून मोठ्या आनंदानें ( टाळ्या वगैरे वाजवून ) आपला विस्मय शब्दांनीं व्यक्त करूं लागले. संतुष्ट होऊन त्यांनीं वस्त्रें, कंठभूषणें, कडीं, सुवर्ण व वैडूर्यमणी यांचे जडलेले मनोहर हार इत्यादि त्या खेळवाल्यांस दिले. याप्रमाणें जेव्हां जेव्हां प्रेक्षकांपैकीं कोणी कांहीं वस्तु बक्षीस देई तेव्हां तेव्हां ते नट त्या दात्याचे कुल–गोत्राचा चौघांत उच्चार करून श्लोकरूपानें त्याची स्तुति करीत. त्या योगानें तेथील प्रेक्षक असुर व मुनीही संतुष्ट झाले.

नरेंद्रा, मग त्या शाखानगरवासी[१] लोकांनीं त्या दिव्यरूपी नटाचें आगमन व कौशल्य वज्रनाभाला कळविलें. दैत्येंद्रानें ही गोष्ट पूर्वींच ऐकली होती. म्हणून त्यानें "त्या नटाला वज्रपुरांत घेऊन या " अशा मोठ्या हर्षानें आपल्या अनुचरांस आज्ञा केली. तें दानवेंद्राचें वचन ऐकून शाखानगरवासी असुरांनीं यादवांस नटवेषानेंच रम्य वज्रपुरास नेलें. विश्वकर्म्यानें उत्तम प्रकारें केलेला वाडा राजानें त्यांना उतरावयास दिला व त्यांना जी जी वस्तु हवी होती ती ती सर्व शतपटीनें अधिक दिली. वज्रनाभ महासुरानें त्या वेळीं आनंदाचे भरांत त्या नाटककार मंडळीकडून महाकालरुद्राचा उत्सव करविला व त्यासाठीं एक अत्यंत रमणीय असें प्रेक्षास्थान[१] आपले छावणींत तयार करविलें. आणि नट मंडळीनें पुरापूर विश्रांति घेऊन झाल्यावर त्यांस बहुत रत्नें वगैरे देऊन "आतां नाटक दाखवा " अशी त्या महाबली वज्रनाभानें आज्ञा केली व नंतर तो शहाणा राजा आपल्या अंतःपुरांतील स्त्रीवर्गास पडदपोशीच्या परंतु, दृष्टीच्या टप्यांत असणाऱ्या जागीं बसवून तो नाटक पहाण्याकरितां आपले ज्ञातींसह स्वतः बसला. तिकडे यादवांनींही नटवेष घेऊन उचित भूमिका धारण केल्या व आपलें कार्य साधण्याकरितां त्या धाडशी वीरांनीं नाचास आरंभ केला. टाळादि घनवाद्यें[२], मुरली, सनई इत्यादि सुषिरें[३] वाद्यें, मुरज, आनक (मृदंगादि) आनद्धें[४] वाद्यें व वीणाप्रभृति तंतुवाद्यें[५] ते सर्व वाजवूं लागले. नंतर मनांस व कानांस तृप्त करणारें देवांचें छालिक्य[६] गान

१ शाखानगर म्हणजे मुख्य नगराचे भोंवतींचे लहान पुरे ( *Suburbs* )

१ या ठिकाणीं " कारयामास रम्यंच चमूवाटं प्रत्यष्टवान् " असें मूळ आहे व त्यावर चतुर्धरानें ' चमूवाट' म्हणजे प्रेक्षणार्थ म्हणजे खेळ पहाण्याकरितां आपले सैनिकांना पाचारण केलें. असा केला आहे. परंतु, एक तर "वाट " याचा अर्थ 'बोलावणें' हा अत्यंत अपरिचित आहे. व शिवाय 'रम्य' हें विशेषण तदर्थी फारसें रुचकर नाहीं. याकरितां चमूवाट म्हणजे सेनेचा मंडप किंवा छावणींत घातलेला 'आवार' असा अर्थ आम्हीं केला आहे. 'छावणींत' घालण्याचें प्रयोजन बहुधा शहरापेक्षां छावणींत प्रशस्त खुली जागा अधिक असते व सुरक्षितपणाही अधिकच असतो.

२ टाळ, झांज इत्यादि परस्पर ताडन करण्याच्या वाद्यांना ' घनवाद्यें ' म्हणतात. कारण घन हा शब्द हन् ताडन करणें या धातूपासून झाला आहे.

३ मुरली, सनई, यांस ' सुषिर ' वाद्यें म्हणतात, कारण त्यांस " छिद्रें " असतात.

४ मृदंग, मुरज, यांस ' आनद्ध ' वाद्यें म्हणतात. कारण तीं वादीनें जखडलेलीं असतात.

५ वीणादिकांस ' तंतुवाद्यें ' म्हणतात. कारण,त्यांस तांत किंवा तार असते.

६ या ' छालिक्याची ' माहिती पुष्कळ यत्न करूनही सांपडली नाहीं.

यादवांनीं आणलेल्या वेश्या गाऊं लागल्या. तें गायन एक कर्णामृतच होतें. गांधारग्राम[1] व वसंतादि रागापर्यंत गंगावतरण व त्यानें मिश्रित आसारित या गायनाच्या जाती सुंदर स्वरसंपत्तीनें त्यांनीं गाइल्या. लय व ताल यांनीं युक्त असलेलें तें शुभ गंगावतरण ऐकून हे भारता, उठून उठून त्यांनीं असुरांस संतुष्ट केलें. आपलें इष्टकार्य साधण्याकरितां नट झालेल्या वीर्यवान् प्रद्युम्न, सांब व गद यांनीं नंदि[3] नांवाचें वाद्य वाजविलें. नंतर नांदि या नांवाचें मंगल पद्य ह्मणून झाल्यावर रुक्मिणीपुत्रानें विनयपूर्वक चांगल्या रीतीनें गंगावतरणासंबंधें श्लोक म्हटला. ' व रंभेचें कुबेरपुत्र नलकुबराकडे जाणें ' या संबंधीं नाटक करून दाखविलें. शूर नामक यादवानें रावणाचा वेष घेतला. मनोवती नांवाच्या एका सुंदर वारांगनेनें रंभेचा वेष घेतला. प्रद्युम्न नलकुबर झाला. सांब त्याचा विदूषक झाला. इतर यादवांनीं मायेनें कैलासाचा देखावा दाखविला. क्रुद्ध नलकुबरानें दुरात्म्या रावणास शाप कसा दिला व रंभेचें सांत्वन कसें केलें, तें प्रकरण वीर यदुनंदनांनीं करून दाखविलें. सर्वज्ञ महात्म्या नारद मुनीची कीर्ति गाइली. पाय उचलणें, नाचणें व अभिनय करणें यांच्या योगानें दानववीर अति तेजस्वी भैमांवर फार प्रसन्न झाले. त्यांनीं उत्तम वस्त्रें, रत्नें, आभरणें, वैडूर्यमणींनीं भूषित व वर्तुळमणींनीं युक्त असलेले हार, विचित्र विमानें, आकाशगामी रथ, दिव्य नागकुलांत झालेले व आकाशगामी गज, दिव्य, शीत व रसयुक्त चंदनें, अगुरुप्रभृति सुवासिक धूप व चिंतन करतांच सर्व कामना पूर्ण करणारे उत्कृष्ट चिंतामणी, ते दानव, त्या नाटकांतील अनेक देखाव्यांच्या वेळीं वारंवार त्यांस देऊं लागले. हे पुरुषश्रेष्ठा, यादवांनीं त्यांना या प्रकारें धन-रत्नरहित करून सोडलें. हे जनेश्वरा, मुख्य दानवांच्या स्त्रियाही तशाच त्यांस अनेक वस्तु देऊं लागल्या.

त्यानंतर प्रभावतीची सखी हंसी प्रभावतीला म्हणाली, " गडे, मी यादवांनीं उत्तम प्रकारें रक्षण केलेल्या रम्य द्वारकेस गेलें होतें. हे कमलनयने, मी एकांतांत प्रद्युम्नाला भेटलें. हे शुचिस्मिते, तुझी भक्ति त्याला कळविली. तेव्हां हे सखे, संतुष्ट झालेल्या त्यानें तुझ्याशीं समागम करण्याचा काल आज प्रदोषसमयीं ठरविला आहे. यास्तव हे सुंदरि, आज तुझा प्रियसमागम होईल. हे सुज्ञे, भैमकुलांत उत्पन्न झालेले लोक ( यादव ) कधीं असत्य भाषण करीत नसतात. त्यावर संतुष्ट झालेली प्रभावती त्या हंसीला म्हणाली, ' हे सुंदरि, मी तुला येथें ठेवून घेतलें आहे. यास्तव, तूं आज माझ्याच निवासस्थानीं नीज. मी तुझ्यासह आपल्या अंतःपुरांत केशवपुत्रास पहाण्याची इच्छा करीत आहें. कारण हे पक्षिणि, तूं माझ्याजवळ असलीस ह्मणजे मी निर्भय होईन. हंसीनें ती गोष्ट पतकरली आणि ती कमलनयना प्रभावती सखीसह माडीवर चढली. विश्वकर्म्यानें केलेल्या त्या उत्तम राजमंदिराच्या पृष्ठभागीं प्रभावतीनें प्रद्युम्नाच्या आगमनास योग्य अशी सर्व तयारी सत्वर केली. सर्व तयारी झाल्यावर प्रभावतीची आज्ञा घेऊन ती वायुगती हंसी प्रद्युम्नास आणावयास गेली.

ती शुभस्मित करणारी हंसी नटवेष धारण करणाऱ्या प्रद्युम्नाकडे जाऊन म्हणाली, "भगवन्, आपल्या संकेताचा काल आज रात्रीं

---

१ ग्राम ह्मणजे स्वरसंघ. हे ग्राम तीन आहेत.

२ ज्यांत गांधारादि पूर्णपणें असतात असें रागांतरामिश्र व गीत विरोषानें युक्त असें आलापपूर्ण गायन गंगावतरणासंबंधें पद्य गावून केलें.

३ ' नंदि ' हें चोंडक्याचे आकाराचें चामड्यानें मढविलेलें एक वाद्य असतें. याचा आवाज ' बारा पडघमाइतका ' मोठा असतो.

आहे." तें ऐकून, काम (प्रद्युम्न) 'बरें आहे' असें म्हणाला व लागलींच हंसी तेथून निघाली व परत येऊन प्रभावतीस म्हणाली, 'हे विशालाक्षि, प्रद्युम्न येत आहे; धीर धर.'

इकडे शत्रुहंत्या वीर आत्मज्ञ प्रद्युम्नानें भ्रमरांनीं भरलेली अतिसुवासिक पुष्पमाला प्रभावतीकडे कोणी सेवक नेत आहे असें पाहिलें व ती तिच्या अंतःपुरांत जात आहे असें निश्चयानें जाणून तो प्रतापी भ्रमराचें रूप घेऊन माळेंतील पुष्पांत जाऊन बसला. स्त्रियांनीं ती भ्रमरयुक्त पुष्पांची माळ अंतःपुरांत नेली व हे राजन्, प्रभावतीच्या निवासस्थानीं तिच्या अगदीं जवळ नेऊन ठेविली. नंतर संध्याकाळ झाला असतां इतर सर्व भ्रमर त्या मालेवरून उठून गेले. मग तो यादवश्रेष्ठ वीर एकटाच उरला. तेव्हां हळूच प्रभावतीच्या कर्णांतील कमलांत जाऊन लीन झाला.

त्यानंतर वाक्पटु प्रभावती मनोहर पूर्णचंद्रास उगवतांना पाहून हंसीस म्हणाली, "सखे माझे अंगाची आग चालली आहे, तोंड कोरडें पडलें आहे व हृदयामध्यें अतिशय उत्कंठा उत्पन्न झाली आहे. ज्याच्यावर औषधच नाहीं असा हा कोणता व्याधी म्हणावा? गडे, हा नुकताच उगवलेला शीतळ किरणांचा पूर्णचंद्र माझ्या मनांत दुप्पट औत्सुक्य वाढवून प्रिय असतांही मला नकोसा होत आहे. माझ्या प्रियाला मीं पूर्वीं कधीं प्रत्यक्ष पाहिलें नाहीं. केवळ त्याचे रूपादि गुण ऐकूनच मीं त्याची इच्छा केली आहे. तथापि, तो माझ्या अंगाला घुमवीत आहे. खरोखर स्त्रीस्वभावाला धिक्कार असो; मी मनाशीं म्हणत आहें कीं, माझा प्रिय जर न आला तर हाय, हाय, कुमुद्वतीच्या मार्गाचें मी दीन होऊन अनुकरण करीन. ( म्हणजे वल्लभ विद्यमान् असूनही केवळ त्याचें दर्शन होत नाहीं म्हणून कुमुदिनी जशी भर तारुण्यांत मरून जाते तशी मी मरून जाईन ) हाय, हाय, मी मोठी मानी असूनही मदनसर्पानें मला दंश केला आहे. स्वभावतःच जगाला आनंद देणारे व सुखरूप शीतवीर्य चंद्रकिरण माझ्या गात्रांना असे कां बरें जाळीत आहेत. अनेक पुष्पपरागांस वाहून नेणारा स्वभावतःच शीतळ वायु दावाग्नीसारखा माझ्या सुंदर शरीरास वारंवार जाळीत आहे. मनाला स्थिर करावें म्हणून मी पुष्कळ निश्चय करितें पण, संकल्पाचे दांडगाईमुळें हें निर्बळ मन एके ठिकाणीं रहात नाहीं. मी यावेळीं विचारशून्य झालें आहें, मी मोहित होत आहें. माझ्या हृदयांत मोठा कंप सुटला आहे. मला घेरी येत आहे. हाय, हाय, खचित मी मरतें.

## अध्याय चौऱ्याण्णवावा.

—:०:—

### प्रभावतीपरिणय.

वैशंपायन सांगतातः—प्रद्युम्नानें जेव्हां जाणिलें कीं, ही पोरगी आपण सर्वथा वेडी करून सोडिली आहे, तेव्हां त्याचे मनाला फार हर्ष होऊन तो हंसीला म्हणाला, 'तूं त्या दैत्यराजकन्येला कळव कीं, मी भुंग्याचें रूप घेऊन इतर भुंग्यांबरोबरच फुलांत लपून तिचे महालांत आलों आहें. आणि मी तिचा किंकर आहें. तिचे मनास मानेल तसें प्रभावतीनें आतां मजशीं वर्तावें.' असें म्हणून त्या राजबिंड्यानें आपलें सुंदर रूप प्रकट केलें. त्या वेळीं त्याचे प्रभेनें ती राजवाड्याची गच्ची लखलखूं लागली. आणि, हे राजा, तेथें पडलेली सुंदर चंद्रप्रभा त्या प्रद्युम्नाचे अंगकांतीपुढें फिकी पडली. मग अशा त्या मनोहर प्रद्युम्नाला पाहून प्रभावतीच्या कामसमुद्राला पौर्णिमेचे दिवशीं चंद्रोदयीं जशी उद्धीला

भरती चढते तशी भरती चढली. तेव्हां ती कमलनयना प्रभावती लज्जेनें कांहींसें खालीं तोंड करून व चोरून तिरक्या दृष्टीनें ( त्या सुंदराकडे ) पहात निश्चल उभी राहिली. त्या वेळीं सुंदर भूषणांनीं अलंकृत झालेल्या त्या वरारोहेला नितंबदेशीं हस्तानें स्पर्श करून तो प्रद्युम्न रोमांचित शरीर होऊन म्हणाला. 'गडे, शेकडों संकल्प केले, तेव्हां कुठें मला हें पूर्णचंद्रासमान आल्हादकारक मुख पहावयास मिळालें. मग आतां तें मुख अधोमुख करून मजपाशीं शब्दही न बोलतां उभें राहणें याला काय म्हणावें ? हे वराननें, लज्जेचें आवरण घेऊन या मुखेंदूची प्रभा तूं हीन करूं नको. अग भित्र्ये, आतां सर्व भय सोड. मजपाशीं तें भय कशाला ? मी मुळीं तुझा दास आहें. तूंच मजवर कृपादृष्टि कर, असें मी म्हणतों. अग लाजर्‍ये, हें भीरुपण आतां टाकून दे असें मी तुला हात जोडून मागणें मागतों. कारण, आतां अंग चोरून पलीकडे उभें रहाण्याची वेळ नव्हे. याकरितां सर्व भीति सोडून या समयाला उचित असें काय तें मला सांग. तूं रूपानें निरूपमच आहेस. तेव्हां माझें मागणें एवढेंच कीं, सांप्रतचा देशकाल मनांत आणून त्याला सोईकर पडेल अशा गांधर्वविधीनें मजशीं विवाह करून मजवर कृपा कर.' असें म्हणून त्या वीर्यशाली भीमकीपुत्रानें आचमन करून त्या रत्नांचे ठिकाणीं तेजोरूपानें असलेल्या अग्नीचें आवाहन करून मंत्रोच्चारपूर्वक तो समय पाहून, पुष्पांनींच हवन केलें आणि नंतर उंची अलंकारांनीं भूषित असा तिचा हात धरून त्या रत्नस्थ अग्नीभोंवतींच तिजसह प्रदक्षिणा केली. तेव्हां लोकांच्या शुभाशुभ कर्मांचा साक्षी तो तेजस्वी भगवान् अग्नि, प्रद्युम्न हा प्रत्यक्ष परमात्म्याचा पुत्र आहे हें मनांत आणून प्रदीप्त झाला. नंतर ब्राह्मणांना दक्षणा देण्याचा संकल्प करून, तो वीर प्रद्युम्न त्या द्वारस्थ हंसीला म्हणाला, हे पक्षिणि, तूं दारावर अशीच रखवालीला राहून आम्हां दोघांना राख.

ती त्याची आज्ञा शिरसा मान्य करून ती हंसी दाराकडे जातांच त्या मदनानें तिला उजव्या हातीं धरून सुंदर शयनावर नेलें आणि तेथें तिला आपले अंकावरच बसवून घेऊन तिला वारंवार गोंजारून प्रथम संथावली ( तिची भीति उडविली ) आणि मग हळु हळु आपले सुगंधी मुखवायूंनीं तिला सुवासित करीत युक्तीनें तिचे गालाचे मुके घेतले. नंतर भुंगा ज्याप्रमाणें कमलांत आसक्त होऊन मधुपान करितो, त्याप्रमाणें त्यानें तिचे मुखकमलाचें पान केलें आणि तो रतिकर्मांत चांगलाच कुशल असल्यानें मुखपानानंतर त्या सुश्रोणीला त्यानें आलिंगन दिलें. आलिंगिल्यानंतर तिला एकातांत संभोगदानानें तो रमविता झाला. पण ती गोष्ट देखील, तो रतिकर्मांतला पुरा दर्दी असल्यानें, ती नवोढा आहे व तिला हा पहिलाच प्रसंग आहे हें ध्यानांत वागवून, त्यानें तिचें मन त्रास न पावेल इतक्या सोईनें आटपती घेतली. असो; याप्रमाणें तो समर्थ कृष्णपुत्र तिजशीं रत होऊन रात्रभर तेथेंच राहिला आणि बाहेर तांबडें फुटण्याच्या सुमारास पुनः नटालयास गेला. जातांना जिचा काम अजून पुरा तृप्त झाला नव्हता अशा प्रभावतीनें त्याला मोठ्या कष्टानेंच परवानगी दिली व तोही तेथून गेला. तरी त्याचे मनांत तीच रमणीय रूपवती कांता सारखी घोळत होती.

असो; याप्रकारें ते प्रद्युम्नाचे वंशज कार्यावर दृष्टि देऊन इंद्र व केशव यांची आज्ञा होण्याची वाट पहात नटवेषानें तेथें नटशाळें-

तच राहिले. रहस्यगोपन करण्यांत गढलेले असे ते सर्व यादव वज्रनाभ असुर त्रैलोक्य-विजयाचा उद्योग काय करितो त्याची प्रतीक्षा करीत तेथें होते. त्यांचा मतलब असा होता कीं, कश्यप मुनींचें सत्र जोंपर्यंत चालू आहे, त्याचे आंत देव व असुर यांचें युद्ध उद्भवूं नये ( ह्मणजे हेतु साधला ) याप्रमाणें ते युक्तिवान् यादव त्रैलोक्यविजय सिद्ध होण्याचे हेतूनें धर्माचरणपूर्वक जप करीत व इष्टकालाची प्रतीक्षा करीत तेथें राहिले असतां, प्राणिमात्राचें मन हरण करणारा असा रमणीय वर्षाकाल प्राप्त झाला. मनोवेगानें जाणारे हंसपक्षी इकडे ही तरुण मंडळी काय काय करितात त्याची बातमी दिवस रात्र इंद्र व केशव यांना जाऊन कळवीत असत. त्या काळांत तो महातेजस्वी प्रद्युम्न स्वतःच्या रूपाला अनुरूप अशा त्या सुंदरी प्रभावतीशीं प्रतिरात्रीं विलासांत मग्न होत असे. त्याचें रक्षण करण्याचें काम हंसांनीं पतकरिलें होतें. हे राजा, इंद्राचे आज्ञेवरून त्या वज्रपुरांत वास करणाऱ्या त्या हंसांनीं तें पुर व्यापिलें होतें. पण, कालाच्या सामर्थ्यानें त्या असुरांना अशी कांहीं भूल पडली कीं, त्यांना किंवा त्या नटांना कोणींही ( हे खरे कोण आहेत तें ) ओळखिलें नाहीं. त्या हंसांचे मंडळीचा पहारा असल्यामुळें, पुढें पुढें तो प्रद्युम्न मग छन्नवेषानें भर दिवसासही प्रभावतीचे मदिरांतच राहूं लागला. इकडे नटशाळेंतही आपली छाया तो आपल्या मायाशक्तीनें उभी करीत असे. आणि हे कौरवा, देहार्धानें तो प्रभावतीला भोगीत असे.

त्या नाटकी मंडळींतील पुरुषांचा तो असुरांविषयींचा पूज्यभाव, शिवाय त्यांचा नम्रपणा, शील, लीला, दक्षता, सरळपणा, तशीच त्यांची विद्वत्ता, हीं त्या असुरांना फारच स्पृहणीय वाटलीं. त्याचप्रमाणें त्यांतील स्त्रीपात्र करणाऱ्या ज्या यादवस्त्रिया होत्या त्यांचें रूप, त्यांचे विलास, त्यांचे अंगाचा तो सुगंध, त्यांचें तें मंजुळ भाषण व सभ्यवर्तन इत्यादि गुण त्या असुरस्त्रियांनाही आपणांत असावे असें वाटलें. हे राजा, ( असा रंग बनून राहिला असतां ) त्या वज्रनाभाचा सुनाभ म्हणून जो प्रख्यात भाऊ होता, त्याच्या देखण्या व सद्गुणी दोन मुली होत्या. त्यांपैकीं एकीचें नांव चंद्रवती व दुसरीचें नांव गुणवती. त्या नित्य प्रभावतीचे मंदिरांत जात असत. तेव्हां त्यांना आढळून आलें कीं, ही प्रभावती आतांशें रतिकर्मांत चूर आहे. तेव्हां त्यांनीं ती एकांतांत आणल्याशीं निर्मळ मनानें बोलते असें पाहून विश्वासानें तिला विचारलें ( कीं हें कसें ? तुला येथें पुरुष कुठचा ? ) तेव्हां ती म्हणाली ' मला एक विद्या येत आहे. तिचें अध्ययन केलें म्हणजे आपणास जो कोणी पति रतिकर्माविषयीं आवडत असेल तो तत्काल प्राप्त होतो व सौभाग्यप्राप्तिही होते. मग तो इच्छित पुरुष देव असो वा दानव असो; तो विवश होऊन तत्काल आपले शयनापाशीं येऊन उभाच रहातो. अशी सोय मजजवळ असल्यानें मी एका बुद्धिमान् सुंदर देवपुत्राशीं रमत असतें. आतांच माझ्या विद्येच्या प्रभावानें मी निवडलेला माझा प्राणप्यारा ( प्रद्युम्न ) तुम्हाला येथें दाखवितें. बरें, पहा तर खरा किती फक्कड आहे तो. ( असें म्हणून तिनें प्रद्युम्नास दाखविला. ) तेव्हां त्याचें तें सर्वोत्तम रूप व त्याची ती ज्वानी पाहून त्या पोरी थक्कच झाल्या. मग ती मनोहर हास्य करणारी वरारोहा प्रभावती समयाला अनुचित असें वाक्य आपल्या त्या उभय भगिनींस उद्देशून बोलली कीं, भगिनींनो, देव हे सर्वदा धर्मरत असतात. ( आणि आपले ) असुर हे दाम्भिक असतात.

देव हे सदा तपश्चर्येंत मग्न असतात आणि हे असुर सुखोपभोगांत गढलेले असतात. देव सर्वदा सत्यपरायण असतात; असुर हे अनृतप्रिय असतात आणि जेथें जेथें मिळून धर्म, तप व सत्य हीं असतील, तेथेंच जय असतो हें निश्चित. याकारितां माझें असें सांगणें आहे कीं, तुम्हींही मजप्रमाणें आपल्याला देवपुत्र पति करा. मी तुम्हांला विद्या देतें. म्हणजे माझ्या त्या विद्येच्या सामर्थ्यानें तुम्हांला योग्य असे पति आतांच प्राप्त होतील. हें ऐकतांच त्या दोघींही बहिणींना आनंद होऊन त्या त्या चारुनेत्रेला म्हणाल्या, फार नामी. मग त्या पतिव्रता प्रभावतीनें कसें करावें म्हणून आपले प्रियाची संमति विचारिली. त्यानें सुचविलें कीं, माझाच चुलता गद नांवाचा मोठा वीर आहे व दुसरा एक सांब नांवाचा आहे ते दोघेही मोठे देखणे, सुशील आणि युद्धकर्मांत शूर असे आहेत. यावर प्रभावती आपल्या बहिणींना म्हणाली, पूर्वीं दुर्वासऋषींनीं प्रसन्न मनानें मला ही विद्या दिली. त्याचप्रमाणें त्यांनीं स्वसंतोषानें मला अखंड सौभाग्य व कौमार्य हींही दिलीं आहेत. ( विद्या देतांना ते मला म्हणाले ) देव, दानव, यक्ष, यांपैकीं ज्या कोणाचें तूं पति या इच्छेनें ध्यान करशील तोच तुझा पति होऊन तुला मिळेल. या त्यांच्या आश्वासनावरून हा वीर पुरुष मी इच्छिला. ( व तो मला मिळाला ) तर तुम्हींही ही विद्या मजपासून घ्या—म्हणजे आतांचे आतांच तुमचा प्रियपुरुषाशीं संगम होईल.

मग त्या दोघींनीं आनंदित होऊन आपल्या बहिणीचे तोंडून ती विद्या उचलली व तिचा पाठ करून त्या दोघींही सुलक्षणी कन्यांनीं गद व सांब या यादवांचें पतिरूपानें ध्यान केलें. त्याबरोबर ते दोघे प्रद्युम्नासमवेत तेथें प्रविष्ट झाले. हे राजा, त्या मायावी प्रद्युम्नानें आपले मायेच्या बलानें ते दोघेही वीर झांकून तेथें आणिले. मग त्याही शत्रुमर्दक सन्मान्य वीरांनीं ( प्रद्युम्नाप्रमाणें ) गांधर्वविधिनेंच समंत्रक आपआपल्या प्रियेचें करग्रहण केलें आणि मग ते यदुश्रेष्ठ वीर इंद्र व कृष्ण यांची अनुज्ञा येईपर्यंतचे काळांत त्या असुरकन्यांशीं रममाण होऊन राहिले. त्यांपैकीं कृष्णपुत्र गद हा चंद्रवतीशीं व सांब हा गुणवतीशीं रमला.

## अध्याय पंचाण्णवावा.

—:०:—

### प्रद्युम्नाचा प्रभावतीशीं विनोद.

वैशंपायन सांगतात:—असा क्रम चालला असतां भाद्रपदाचे महिन्यांत एके दिवशीं आकाश ढगांनीं भरून गेलेलें पाहून पूर्णेंदूप्रमाणें ज्याचे मुखाची प्रभा आहे असा तो प्रद्युम्नरूपी मदन सुंदर आणि विशाल नेत्रांच्या प्रभावतीला म्हणाला:—'हे वरगात्रि, हे सुंदरि, तुझ्या मुखाची शोभा धारण करणारा हा जो चंद्र याचें बिंब आज रमणीय दिसत नाहीं. कारण, हे रमणीये, हे संहतोरू, ( जिची मांडीशीं मांडी घांसते आहे इतकी पुष्ट ) हा चंद्र तुझे केशपाशाचें सादृश्य वागविणाऱ्या या मेघजालानें गुरफाटला गेला आहे. हे सुभ्रु, ही मेघोदरस्थ विद्युत् सुवर्णाचे सुंदर अलंकार घातलेल्या तुझ्यासारखी दिसत आहे. हे वराङ्गि, हे गर्जना करणारे मेघ तुझ्या कंठांतील हाराचे सरांप्रमाणें शोभिवंत अशा जलधारा सोडीत आहेत. ह्या ( शुभ्र ) बगळ्यांच्या पंक्तिमेघमंडळांत फिरत असतां तुझ्या निर्मळ दंतपंक्तीप्रमाणें चकाकत आहेत. आणि, हे सुभ्रु, पाण्याच्या लोंढ्यांच्या जोरापुढें ज्यांमधील कमलें आंत दडपून गेलीं

आहेत, अशीं हीं नद्यांतील जलें ( कमलें अंतर्हित झाल्यामुळें ) आतां शोभत नाहींत. ज्यामधील बलाकमाला या तुझ्या निर्मळ व सुंदर दंतांप्रमाणें शोभत आहेत; असे हे मेघ वायूचे तडाक्यांत सांपडल्यामुळें शुभ्रदंतांचे हत्तींप्रमाणें एकमेकांशीं टक्कर देण्यास धांवत आहेत. हे कांते, हे सुंदरांगि, तुझ्या मुखस्थानींचे नेत्रापांगाप्रमाणें[1] हें तीन रंगांचें बनलेलें इंद्रधनुष्य पहा. तें गगनाला व मेघमंडलाला शोभा आणीत असून ( मजसारख्या ) कामी जनांस तर उल्हासच आणितें आहे. हे सुश्रोणि, गर्जना करणाऱ्या मेघांस पाहून हर्षित होऊन प्रतिगर्जना करणारे व आपले पिसारे उंच उभारून मोठ्या आदरानें नृत्य करूं लागले असतां त्यांच्या प्रिया ज्या लांडोरी त्यांना अधिकच प्रिय वाटणारे, असे बाहेरील मयूर पाहून, हे चारुश्रोणि, चंद्रप्रकाशानें धवलित झालेल्या श्रीमंतांचे वाड्यांतील इतर मोरांचे थवेही खुलले आणि क्षणभर त्या वाड्यांना अत्युत्कृष्ट शोभा आणून बेटे पुनरपि लौकरच पहिल्याप्रमाणें वाड्याचे वळचणींना दडले. कांहीं वृक्षाग्रांवर चढलेले सुंदरांगाचे मोर क्षणभर त्या वृक्षांना चूडामणी ( शिखेंत घातलेलें रत्न ) ची शोभा देऊन पावसानें पंख ओले होतांच झाडांवरून उतरून मेघ आहेत कीं नाहींत, अशा शंकेंत पडून नूतन तृणाच्छादित अशा भूमीवर उतरतात. पर्जन्याचे धारांचे फटींतून निसटणारा व चंदनपंकानें शीतळ झालेला आणि कदंब, सर्ज, अर्जुन या वृक्षांचे पुष्पांत उत्पन्न झालेला मदनोत्तेजक असा सुगंध बरोबर घेऊन हा सुखकारक वायु वहात आहे. हे चारुगात्रि, रतिश्रमानें प्राप्त होणाऱ्या घर्मबिंदूंना दूर करणारा व नवीन नवीन सजलमेघ घेऊन येणारा असा हा वायु जर या कामांत नसेल तर मला तरी हा पर्जन्यकाल त्यावांचून प्रिय वाटणार नाहीं. अग, तुझ्या माझ्या प्रेमळ जोडप्यांच्या संगमांत रतिकर्म संपत आहे तोंच रतिश्रमाचा खेद दूर करणारा सुगंधी वायु येणें, याहून अधिक सुखावह असें या लोकांत दुसरें काय तरी आहे? हे सुगात्रि, मानस सरोवरांत वस्ती करण्याचा ओढा असल्यानें नद्यांचीं पुलिनें जलानें बुडून गेलेलीं पाहून हंस अति हर्षित झाले व सारस, क्रौंच पक्ष्यांचे समुदायांत मिसळून या प्रदेशीं राहिले आहेत. ( त्यामुळें फार शोभा आली आहे. ) हा प्रावृट्काल संपून हंस, सारस व चक्रवाक हे जलाशय सोडून चालते झाले म्हणजे मग नद्याही शोभत नाहींत; व सरोवरेंही सुंदर दिसत नाहींत. कारण, हे चारुविशाललोचने, तीं निस्तेज दिसतात. सर्वोत्कृष्ट आणि रमणीय अशा रूपाच्या लक्ष्मीला प्रणाम करून निद्राही ( ह्या वर्षाकालांत ) कालाला व श्रीहरीला ओळखून, शेषसर्पाचे अंगावर एका बाजूला निजलेल्या जगन्नाथ, उपेंद्र अच्युताकडे[1] गेली. हे कमलदीर्घलोचने, याप्रमाणें भगवान् हरी निद्रावश झाल्यावर मेघयुक्त आकाशानें आक्रांत झालेला हा कमलतुल्य निर्मलकांति चंद्र, कृष्णमुखाचें अनुकरण करितो आहे. श्रीकृष्णाचे प्रसादाची आशा करणारे हे सर्वेही ऋतु कदंब, नीप, अर्जुन, केतक इत्यादि वृक्षांच्या पुष्पमाला व शिवाय निरनिराळ्या जातींचीं पुष्पेंही कृष्णाला भेट

---

[1] सुंदर व विलक्षण स्त्रियांचे नेत्राचें अंतरंग शुभ्र, कृष्ण, व ताम्र अशा तीन वर्णांनीं युक्त असतें. नेत्रांत ताम्रवर्णी रेषा असणें हें उंची भाग्याचें लक्षण सामुद्रिकांत धरलें आहे.

[1] देव चतुर्मासांत निद्रिस्त असतो व तुळशीचे लग्नाचे दिवशीं उठतो. हें सुप्रसिद्धच आहे.

म्हणून घेऊन येत आहेत. भ्रमरांनीं वारंवार ज्यांचे पुष्पांतील मधुपान केलें आहे, असल्या कित्येक अति सुकुमार वृक्षांना हे इकडून तिकडे फिरणारे विषारी साप नुसत्या मुखस्पर्शानें ग्लान करून सोडितात, हें पाहून लोकांना मोठें नवल वाटून राहिलें आहे. हे प्रिये, जलाचे अति भारानें ओथंबलेल्या मेघवृंदामुळें भूमीवर कोसळून पडतेंच काय, अशा स्थितींत हें आकाश पाहून कामातिरेकानें तुझें मुख, स्तन व मांड्या या घामाघुम झाल्यामुळें, एखाद्या गंभीर जलाशयांतून शिरून आल्याप्रमाणें आर्द्रतेनें मनोहर दिसत आहेत. हे निर्मलगात्रयष्टि, जगद्धितार्थ भूमीवरील तृणादिकांवर जलवृष्टि करणारे हे मेघवृंद बलाकपंक्तिरूपी दाट पुष्पांचे मालेनें अलंकृत केल्यासारखे सुशोभित पाहून फारच मजा वाटते. जलानें ओथंबलेल्या अशा मेघवृंदाला ओढून आणणारा हा वायु, कोणा राजा आपले आज्ञेनें स्वतःचे पदरचे मस्तींत आलेले हत्ती रानटी हत्तींशीं लढवितो, त्याप्रमाणें मेघामेघांची टक्कर लावितो. या वर्षाकालांत हे मेघ वायूनें सुगंधि झालेलें, स्वच्छ व इतर वस्तूंना निर्मल करणारें, असें अपार्थिव किंवा दिव्य जल वर्षतात. हें जल मेघांचे लाडके जे वरिष्ठ प्रतीचे चातक, मयूरादिपक्षी, त्यांस हर्षावह असतें. एरवीं आठमाही निमूट पडून रहाणारा बेडूक, वर्षाकाल येतांच आपल्या स्त्रियांसह ट्रॉंव ट्रॉंव शब्दांनीं ओरडत सुटून, गौळवाड्यांतल्यासारखा दणदणाट उठवितो व त्या बेडकाची ही स्थिति पाहून सनातनधर्माला प्रिय मानणारा एखादा ब्राह्मण आपले प्रियशिष्य भोंवतालीं बसवून त्यांजबरोबर चर्चा टाकीत असल्याचा भास होतो. या पर्जन्यकालाचे अंगीं एक मोठाच उपकारक गुण आहे; तो असा कीं, या कालीं प्रौढ मेघांचे गर्जनेनें घाबरून गेलेल्या भीरुतरुणी भयनिवारणार्थ आपले प्रियकरांना घट्ट आलिंगन देऊन शय्येवर निजण्याचा समय नसतांही त्यांचा काम चेतवितात. या वर्षाकालाचे अंगीं माझे दृष्टीनें तसाच एक मोठा दोषही आहे. तो हा कीं, हे उदार-कुल-वय-वर्णयुक्ते, हा चंद्र मेघरूपी गिऱ्हानें ग्रस्तशरीर झाल्यामुळें तुझे मुखाप्रमाणें आल्हादक दिसेनासा होतो. हे भीरु, जगताचा दीपक असा चंद्र प्रथमच मेघाचे आड दडला असतां मग जेव्हां स्पष्ट दिसूं लागतो, त्या वेळीं प्रवासांतून परतलेल्या बंधूप्रमाणें लोक त्याकडे मोठ्या आनंदित वृत्तीनें पाहूं लागतात. हे भितरे, विरहीजनांचे विलापांचा साक्षिदार हा चंद्र जेव्हां स्वच्छ प्रकाशलेला दिसतो, त्या वेळीं इतरांस नेत्रोत्सवकारक भासत असला तरी, ज्या स्त्रियांचे काम पुरविणारे पति घराबाहेर प्रवासांत असतील अशांचे सुखाचा तो अंतच करितो. तोच चंद्र सुंदर स्त्रियांना त्याच रूपानें प्रिय व अप्रिय असा उभयविध भासतो. ज्या सुंदरी आपल्या प्रियकरांच्या समागमें असतील त्यांना तो नयनानंदकर वाटतो व ज्या प्रियकराशीं वियुक्त असतील त्यांना तोच दावाग्नितुल्य दाहकारक भासतो. हे ज्योत्स्नाधवले, तुझ्या पित्याच्या या वज्रपुरांत चंद्रावांचून सर्वत्र ( तुझे मुखचंद्राचा ) प्रकाश फांकत असल्यानें तुला चंद्राचे गुणावगुणांची मुळींच माहिती नाहीं. म्हणून मीं त्याचे गुणांचें एवढें आख्यान लांबविलें. ह्या

१ या ठिकाणीं मुंबई व कलकत्ता या दोन्हीं पुस्तकांचा पाठ ' विनापि चंद्रेण पुरे पितुस्ते यतः प्रभा चंद्रगभस्ति गौरी ' असा आहे. परंतु, आमचे जवळील लेखी पोथीचा पाठ ' चंद्रगभस्ति गौरि ' साअ न्हस्वान्त आहे. तोच आम्हीं स्वीकारिला आहे. एवढ्याशा फरकानें अर्थांत जी बहार येते ती पाहून आख्यायिकेप्रमाणें कालिदासानें सुधारलेल्या भवभूतीच्या ' रात्रिरेवव्यरंसीत् ' या ओळीची आठवण होते.

चंद्रानें इतरांना दुर्लभ असें द्विजराजत्व अत्युत्कृष्ट तपानें मिळविलें आणि यज्ञाचे समयीं ब्राह्मण एकत्र मिळून या उदार चंद्राचें पवमान संज्ञेनें स्तोत्र करितात. ज्याचें वीर्य व कर्म उत्तम आहे असा जो पुरूरवा राजा तो ज्याचा पुत्र आहे अशा बुधाचा जो हा ( चंद्र ) पिता असून शंकराचा केवळ प्राणच आहे व याचा नातु पुरूरवा यानें गंधर्वलोकांतून आणलेला प्राणाग्नि मार्गांत ठेविला असतां नष्ट झाला,[1] तो त्या स्तुत्य चंद्रानें पुनरुज्जीवित केला. पुढें याच महात्म्या चंद्रानें अप्सरांत श्रेष्ठ अशी जी उर्वशी तिजविषयीं काम धरिला. हे सुंदरि, पूर्वीं अचाट कर्म करणाऱ्या श्रेष्ठ मुनींनीं हा सर्व अमृतमय आहे असें पाहून पिऊनच टाकिला होता. त्याच चंद्राचे वंशांत उत्पन्न झालेला बुद्धिमान् आयुर्नामक राजा अनेक यत्न करून स्वर्गास जाऊन अग्निसायुज्य पावला व अद्यापि पूजिला जात आहे. त्याचप्रमाणें इंद्रपद मिळविणारा प्रसिद्ध वीरराजा नहुषही यांच्याच वंशांत झाला. हे सुभ्रु, त्या चंद्राला दक्षाच्या कन्यांनीं[2] वरिला असून जगन्नायक देवाधिदेव जो वीरश्रेष्ठ हरि तो देवकार्यार्थी या चंद्राचे वंशांत उत्पन्न झाला. ज्या वीरानें स्वपराक्रमानें चक्रवर्तित्व संपादिलें, असला इंद्रतुल्य पराक्रमी वसुराजाही याचेच वंशांत उत्पन्न होऊन चंद्रवंशांतील प्रदीप अशी कीर्ति मिळवून गेला. ज्यानें पृथ्वीवर सार्वभौमत्व मिळविलें तो श्रेष्ठ यदुराजाही याचेच वंशांतला. आणि याचेच वंशांत पुढें इंद्रतुल्य असे भोजवीर निर्माण झाले. हे कमलाक्षि, या चंद्राचे वंशांत कोणीही राजा खोटें कर्म करणारा, नास्तिक, आळशी, अश्रद्धालु, कृपण किंवा शौर्यहीन असा झालाच नाहीं. हे कमल विशालनेत्रे, सर्व गुणाढ्य व श्लाघ्य अशी तूंही त्याचेच वंशांत सून होऊन आली आहेस. याकरितां हे सुदति, सज्जनांना प्रिय व समर्थ असा जो तुझा वडील त्याला प्रणाम कर आणि त्याचप्रमाणें हे देवि, तुझा दुसरा सासरा ( माझा पिता ) जो ब्रह्मदेव, अखिल लोक व स्वर्गवासी यांचा आश्रय गरुडध्वज पुरुषोत्तम नारायण ( श्रीकृष्ण ) त्यालाही येथें नमस्कार कर.

१ तो मार्गांत नष्ट झालेला प्राणाग्नि शमिगर्भ अश्वत्थारणीपासून मंथून निर्माण केला. असा इतिहास आहे. परंतु ओषधिवनस्पतींना तेज देणारा चंद्र असल्यानें चंद्राचे तेजानेंच अरणींतून निघाला असें मानून प्रद्युम्न या स्थळीं चंद्राला त्या अग्नीचा उत्पादक असें म्हणतो.

२ सत्तावीस नक्षत्रें किंवा तारका या दक्षकन्या असून चंद्र त्यांचा पति आहे.

## अध्याय ब्याण्णवावा.

—:०:—

### प्रद्युम्नाचें असुरांशीं युद्ध.

वैशंपायन सांगतातः—अतितेजस्वी कश्यपमुनींचें सत्र संपतांच अमितपराक्रमी देव व असुर आपआपले स्थानीं परतले व सत्र संपलेलें पाहून त्रैलोक्य–राज्याची आकांक्षा करणारा वज्रनाभ कश्यपाकडे आला. तेव्हां कश्यप त्याला ह्मणाला, ‘ हे वज्रनाभा, माझें जर तुला ऐकावयाचें असेल तर मी म्हणतों हें समजून घे. हे पुत्रा, आपली मंडळी घेऊन तूं तुझ्या वज्रपुरींतच रहा. इंद्र हा एकतर स्वभावातःच शक्तिमान् असून तपोबलानेंही अधिकच आहे. शिवाय तो ब्राह्मणांचा अभिमानी, कृतज्ञ, देवांत ज्येष्ठ व गुणांनींही श्रेष्ठ आहे. तो सर्व जगताचा सत्पात्र राजा, सज्जनांचा आश्रय व लोकहित करण्यांत गढलेला असून लोकराज्याला पावला आहे. यास्तव हे वज्रनाभा, त्याला जिंकणें तुझे हातून होणें नाहीं. अरे, या सर्पाला तुडवूं जातां तूंच तत्काळ मरशील.

हे भारता, कश्यपाचें हें बोलणें वज्रनाभाला रुचलें नाहीं. कालपाशांत सांपडलेल्या मुमूर्षु रोग्यास जसें औषध रुचत नाहीं तसेंच हें म्हणावयाचें. मग तो दुर्बुद्धि व दुर्जय असुर कश्यपप्रजापतीला वंदन करून ( आपले मार्गाला गेला ) व त्रैलोक्यजयाचा उद्योग करण्याविषयीं त्यानें निश्चय केला. हे राजा, मग आपले जातींतील योद्धे व पुष्कळसे मित्र गोळा करून तो जयाचे इच्छेनें प्रथम स्वर्गाकडेच निघाला. त्या समयीं महाबल देव कृष्ण व इंद्र यांनीं वज्रनाभाचे वधार्थ ( यादवमंडळीकडे ) हंस पाठविले. तेव्हां ते एकत्र मिळालेले बलाढ्य यादवश्रेष्ठ परस्परांत विचार करूं लागले कीं, "हें मोठें संकट येऊन पडलें. कारण, आतां आपल्यैकीं प्रद्युम्नानेंच वज्रनाभाला मारणें निःसंशय प्राप्त आहे आणि वज्रनाभ व त्याचा भाऊ सुनाभ या दोघांच्याही मुली या प्रद्युम्न, सांब व गद यांच्या स्त्रिया झाल्या असून त्या बिचाऱ्यांची आम्हां यादवांवर सर्वात्मना भक्ति आहे. बरें, या तिघीही गरोदर आहेत; आणि त्यांचा प्रसूतिकालही अगदीं जवळच येऊन ठेपला आहे. तेव्हां अशा स्थितींत आतां पुढें कसें करावें ?" मग त्या महाबल प्रद्युम्नानें आपसांत विचार करून त्या दूतहंसांना सांगितलें कीं, तुम्ही जाऊन ही सर्व वस्तुस्थिति कृष्ण व इंद्र यांना कळवा. मग त्या हंसांनीं जाऊन कची हकीकत इंद्र केशवांना सांगितली. तेव्हां, हे राजा, त्या दोघांनीं हंसांबरोबर उलट निरोप दिला कीं, 'भिऊं नका, हे यादवहो, तुह्मांला स्त्रियांचे पोटीं वाटेल तें रूप घेणारे व गुणांनीं श्लाघ्य असे निर्मल पुत्र होतील; व ते गर्भांत असतांच त्यांना सर्व विद्या प्राप्त होतील. त्याचप्रमाणें त्यांना भविष्यकालीं लागणाऱ्या सर्व गोष्टी, अनेक प्रकारचे मंत्र इत्यादि सर्व कांहीं आतांच अवगत होईल आणि ते जन्मतांच मोठे पण्डित होऊन तत्काल तरुणही होतील.'

हे राजा, याप्रमाणें इंद्रकेशवांचें वाक्य ऐकून ते हंस परत वज्रपुराला गेले आणि त्यांनीं इंद्रकृष्णांचें बोलणें त्या यादवांना सांगितलें. इतक्यांत प्रभावतीला थेट प्रद्युम्नासारखा पुत्र झाला. तो तत्कालच तारुण्यांत येऊन सर्वज्ञत्व पावला. प्रभावतीनंतर महिन्याचे अंतरानें, हे राजा, देवी चंद्रवती चंद्रप्रभ नांवाचा पुत्र प्रसवली. हाही आपले बापासारखाच होता. यालाही तत्काल तारुण्य व सर्वज्ञत्व हीं प्राप्त झालीं. त्याचप्रमाणें गुणवतीही गुणवंत नांवाच्या निर्मल पुत्रास जन्म देती झाली. हे दोघेही इंद्रकेशवप्रसादानें तेव्हांच यौवनसंपन्न व सर्वशास्त्रार्थवेत्ते झाले. हे वीरा, यदुकुलाची वृद्धि करणारे हे सर्वही यदुनंदन त्या प्रभावतीचे महालांत वरचे मजल्यावर वाढत असतांना, आकाशांत रखवाली करणाऱ्या वज्रनाभाचे परिचरांस दिसले. मात्र, हे जनमेजया, ते असुरांचे दृष्टीस पडावे अशी इंद्रकेशवांचीच इच्छा होती, ह्मणून असें झालें; एरव्ही होतें-ना, हें खास. मग ते दैत्य घाबरून जाऊन त्यांनीं तें वृत्त त्रैलोक्यजयाची इच्छा करणाऱ्या वज्रनाभास सांगितलें. तें कानीं येतांच तो दैत्यपति महान् असुर म्हणाला, 'अरे पहातां काय माझे घरफोड्ये हे सर्वजण पकडून ठेवा.' असें म्हणून, हे कौरवा, त्यानें आपले सेनेला आज्ञा करून त्या प्रभावतीचे वाड्याभोंवती सर्व बाजूंनीं गराडा दिला.

मग शत्रूला शिक्षा लावणारे ते असुरवीर असुरेंद्राचे आज्ञेवरून "हं, धरा या चोरांना आणि तत्काळ मुसक्या बांधा" अशा प्रकारें गर्जना करूं लागले. तें ऐकून त्या तिघांही मुलांच्या ममताळू आया दुःखी होऊन रडूं लाग-

ल्या. त्या रडतांना पाहून त्यांना प्रद्युम्न एकाएकीं म्हणाला, " सुंदरीहो, भिऊं नका. आमचेसारखे भक्कम गडी येथें जीवमान असतां दैत्य काय करणार ? तुम्ही खुशाल असा. " इतक्यांत खिन्न बसलेल्या प्रभावतीला प्रद्युम्न म्हणाला, ' हे प्रिये, तुझा बाप व चुलते हे हातीं गदा घेऊन युद्धार्थ सज्ज आहेत. त्याचप्रमाणें, हे देवि, तुझे भाऊ व जातभाईही तसेच युद्धार्थ उभे आहेत. हे सर्वही तुझ्या संबंधामुळें मला पूज्य व मान्य आहेत. याकरितां कसें करावें त्याबद्दल तुझे बहिणींचा विचार घे. कारण, वेळ फार भयंकर येऊन ठेपली आहे. मरणाला तयार होऊन जर आम्ही लढणार, तर आमचा जय निश्चयानें होईलच. बरें, हे वज्रनाभ-प्रभृति वीर आम्हांला ठार करावें अशा निकरानेंच आह्मांशीं आतां लढणार. तेव्हां आह्मीं आतां काय करावें ? ( तुमच्याकडे पाहून आह्मीं यांशीं न लढावें तर ) आह्मीं यांच्या गराड्यांत सांपडलों आहों, तेव्हां कसें करावें ? तुह्मीच सांगा. '

यावर प्रभावती रडत रडतच भुईवर गुडघे टेंकून व मस्तकाशीं ओंजळ करून ( हात जोडून ) प्रद्युम्नाला म्हणाली, "हे शत्रुकंदना, तूं आतां शस्त्र घे आणि आपलें रक्षण कर. कारण, हे यदुनंदना, तूं जगशील तर आपली बायको, मुलें, मातुश्री व अनिरुद्ध यांस पहाशील. एरव्हीं कुठून ? याकरितां या सर्वांकडे लक्ष पोंचवून, हे मानदा, हे अरिमर्दना, स्वतःला तूं या संकटांतून सोडीव. मला बुद्धिमान् दुर्वासमुनीनें वर दिला आहे कीं, तूं आजन्म वैधव्यरहित, पतिप्रिय आणि जीवत्पुत्रा अशी होशील आणि माझे मनाला पक्का विश्वास आहे कीं, हे कृष्णपुत्रा, त्या सूर्याग्नितुल्य तेजस्वी दुर्वासाचें हें म्हणणें खोटें व्हावयाचें नाहीं." असें बोलून एक तलवार घेऊन ती चांगली चकचकीत पुसून त्या मनस्विनी प्रभावतीनें 'ही घ्या आणि विजयी व्हा' असें म्हणून प्रद्युम्नाचे हातीं दिली. आपले भक्तिमान् प्रियेनें दिलेली ती तरवार त्या धर्मात्म्या प्रद्युम्नानें मुदित अंतःकरणानें शिरःप्रणामपूर्वक घेतली. मग चंद्रवतीनेंही आनंदानें गदाचे हातीं एक खड्ग दिलें. गुणवतीनेंही महात्म्या सांबाला तसेंच दिलें.

नंतर नम्र अशा हंसकेतूला प्रभु प्रद्युम्न म्हणाला, ' तूं सांब व इतर यादव यांसहवर्तमान येथेंच युद्ध करीत रहा आणि हे अरिंदमा, आकाश व सर्व दिशा यांचे ठिकाणीं मी शत्रूंशीं तोंडें देतों. ' असें म्हणून त्या मायानिपुणानें आपले मायाशक्तीनें एक रथ निर्माण केला व हे कौरवा, त्या समर्थ प्रद्युम्नानें सर्व जगांत श्रेष्ठ असा सहस्र मस्तकांचा व दीर्घ देहाचा नाग आपला सारथी केला. मग तो असल्या अद्भुत रथावर बसला. तें पाहून त्याची प्रिया प्रभावती हिला मोठा हर्ष झाला. नंतर, तृणांत जसा अग्नि संचार करितो, त्याप्रमाणें तो असुरसैन्यांत संचार करूं लागला आणि अर्धचंद्राकार व सर्पतुल्य अशा कांहीं शरीरभेदक सूक्ष्माग्र शरांनीं व कांहीं स्थूलाग्र अशा दृढप्रहारी बाणांनीं, तो दितिपुत्रांना पीडा करूं लागला. उलटपक्षीं असुरही जिवावर उदार होऊन व युद्धमदानें उन्मत्त होऊन कमलपत्राक्ष प्रद्युम्नाला शस्त्रानें इतस्ततः प्रहार करीत होते. प्रद्युम्नानें बाहुभूषणें व कंकणें यांनीं झळकणारे असे कांहीं असुरवीरांचे बाहु छेदून टाकिले व कांहींचीं कानांत कुंडलें घातलेलीं मस्तकें उडविलीं. एतावता, त्या अतितेजस्वी प्रद्युम्नानें बाणांचे पात्यांनीं तोडलेलीं शिरें, शरीरें व शरीराचीं शकलें यांनीं ती रणभूमि पेरून टाकली. युद्धजेता देवेंद्र देवगणांसह हें असुर-यादव यांचें युद्ध

आनंदानें पहात होता. गद आणि सांब यांवर जे दैत्य धांवून गेले ते सर्वही समुद्राच्या थापेनें गुदमरणाऱ्या जलजंतूंप्रमाणें तत्काल मृत्यु पावले.

हें युद्ध विषम आहे असें पाहून देवपति इंद्रानें गदाला आपला स्वतःचा रथ पाठवून दिला व त्या रथावर आपल्या मातली नामक सारथ्याचा तेजस्वी पुत्र सारथी करून पाठविला. त्याचप्रमाणें आपला ऐरावत हत्ती सांबाच्या उपयोगासाठीं पाठविला आणि प्रद्युम्नाचे साह्यार्थ स्वपुत्र जयंत हा देऊन त्या समर्थ इंद्रानें आपला स्नेही 'प्रवर' ब्राह्मण याची ऐरावतावर महाताचे ठिकाणीं योजना केली. देवपुत्र जयंत व प्रवर ब्राह्मण हे दोघेही अतुल पराक्रमी वीर होते. महत्वाचे कामीं कोणते पद्धतीनें चालावें हें ज्याला पूर्ण माहीत होतें अशा त्या देवेंद्रानें मातलिपुत्र व ऐरावतगज हे मदतीस पाठवून शिवाय लोककर्त्या देवश्रेष्ठ ब्रह्मदेवालाही साह्य करण्याची आज्ञा देऊन ठेविली. इंद्र म्हणाला, 'याचें (वज्रनाभाचें) तप क्षीण झालें आहे आतां या दुर्बुद्धीला यादवांनीं मारावें हेंच योग्य आहे.'

त्या गर्दींत ज्याला जेथें वाटेल तेथें तो घुसत होता. बलाढ्य प्रद्युम्न आणि जयंत हे प्रभावतीचे वाड्यावर उतरले आणि बाणजालांनीं असुरांना ठार करून आपला पराक्रम प्रकट करूं लागले. रणांत दुर्जय असा तो प्रद्युम्न या कालीं गदाला म्हणाला, "हे कृष्णानुजा, इंद्रानें तुजसाठीं हा रथ पाठविला आहे व त्या रथाचे घोडे जोडून ते ताब्यांत ठेवण्यासाठीं हा महाबलि मातलीपुत्र सारथी पाठविला आहे. त्याचप्रमाणें प्रवर ब्राह्मणाला वर बसवून हा ऐरावत गज सांबाकरितां पाठविला आहे. हे बलिष्ठा, आज द्वारकेस शंकरांची महापूजा आहे ती उरकून उद्ईक कृष्ण हा आपल्या साह्याला येईल. तो येथें येऊन त्यानें आज्ञा दिली म्हणजे त्रैलोक्यविजयाची उठावणी करणाऱ्या या पापी वज्रनाभ दैत्याला त्याच्या बंधूंसह आपण ठार मारूं. मी असें साफ तुह्मांस सांगतों कीं, जयंतपुत्रासह इंद्र आपणास साह्य असतां वज्रनाभाच्यानें आह्मांस कधींही जिंकवणार नाहीं. मात्र आपण गैरसावध रहातां कामा नये, असें माझें मत आहे. शहाण्या पुरुषांनीं वाटेल तो उपाय करून स्त्रीचें रक्षण केलेंच पाहिजे. कारण, आपले स्त्रीची अमर्यादा आपण जिवंत असतां पहाणें हें या लोकीं मरणाहूनही अधिक आहे."

याप्रमाणें गद आणि सांब यांना सांगून त्या महाबली प्रद्युम्नानें आपले दिव्य माया शक्तीनें स्वतःसारखे कोट्यवधी प्रद्युम्न निर्माण केले व दैत्यांनीं निर्माण केलेलें अभेद्य तमही नाहींसें केलें. त्या रिपुमर्दक प्रद्युम्नाला पाहून इंद्राला आनंद झाला. सर्व प्राणिमात्राला सर्वही शत्रूंशीं प्रद्युम्नच आहे असें दिसूं लागलें व त्या वेळीं प्रत्येक अंतर्यामांत रहाणाऱ्या व्यापक जीवात्म्याप्रमाणेंच तो त्यांना भासला. याप्रमाणें असुरांशीं झगडण्यांतच प्रद्युम्नाची ती रात्र गेली. तितक्या अवधींत त्या अतितेजस्वी प्रद्युम्नानें असुरांचे तीन वांटे नाहींसे केले. त्यांत जोंपर्यंत प्रद्युम्न हा रणांगणीं दैत्यांना लढाई देत होता तोंपर्यंत जयंतानें गंगाजलामध्यें आपली संध्योपासना[1] उरकून घेतली. नंतर, जयंत हा दैत्यांना युद्ध देत असतां प्रद्युम्नानें आकाशगंगेंत आपलें संध्यावंदन उरकलें.

---

१ प्रातःसंध्या. युद्धाचे धुमाळींतही संध्यावंदन चुकूं न देणें, ही धर्माची शिस्त पाहून त्या काळचे लोकांबद्दल पूज्यता कोणास वाटणार नाहीं?

# अध्याय सत्याण्णवावा.

—:०:—

## वज्रनाभाचा वध.

वैशंपायन सांगतातः—नंतर, एक मुहूर्तानें जगच्चक्षु सूर्य उदय पावला असतां सर्पशत्रु गरुड यासह देव हरि तेथें प्राप्त झाला. हे कुरुनंदना, वेगानें हंस, वायु किंवा मन यांहूनही चपल असा तो पक्षी आकाशांत इंद्रासन्निध येऊन उभा राहिला. नंतर, कृष्णानें इंद्राला भेटून व आपल्या धाकट्या नात्याप्रमाणें इंद्रासन्निध उभें राहून दैत्यांची भीति वाढविणारा असा आपला पांचजन्य शंख वाजविला. त्याचा ध्वनि ऐकून शत्रुहंता प्रद्युम्न तेथें आला. तेव्हां कृष्णानें 'त्वरा कर; या गरुडावर बसून जा आणि या वज्रनाभाला मार' अशी त्याला आज्ञा केली. मग त्या वीरानें सुरश्रेष्ठ जे इंद्र आणि कृष्ण त्या दोघांस वंदन करून कृष्णाचे आज्ञेप्रमाणें केलें. हे राजा, तो वीर प्रद्युम्न मनोवेगानें उडणाऱ्या त्या गरुडावर बसून दुरंत अशा त्या वज्रनाभाच्या निकट येऊन पोंचला. नंतर, स्थिर होऊन त्या सर्वास्त्रवेत्त्या श्लाघ्य वीरानें गरुडावर बसूनच त्या रणांगणीं वज्रनाभाला धमकी घातली. आणि त्या महात्म्या कृष्णपुत्रानें गरुडावर बसल्या बसल्या गदेनें वज्रनाभाच्या छातीवर तडाका दिला. त्या आघातानें तो दैत्यवीर मूर्च्छित होऊन रक्त ओकूं लागला; व भोंवळ येऊन प्रेतवत् पडला. तेव्हां त्या दुर्जय प्रद्युम्नानें 'दम घे, सावध हो' म्हणून त्यास सांगितलें. नंतर तो शुद्धीवर येतांच प्रद्युम्नास म्हणाला कीं, 'शाबास, हे यादवा, तुझ्या पराक्रमानें तूं मला योग्य प्रतिस्पर्धी आहेस. हे महाबलाढ्या, आतां मी तुजवर उलट प्रहार करण्याची पाळी आहे; याकरितां खडा रहा' असें म्हणून शंभर मेघांच्या गडगडाटाप्रमाणें गर्जना करून पुष्कळशा क्षुद्र घंटांनीं व कंटकांनीं युक्त अशी आपली गदा वज्रनाभानें वेगानें प्रद्युम्नावर भिरकावली. हे राजा, त्या गदेचा तडाका कपाळावर बसतांच प्रद्युम्न रक्ताच्या गुळण्या ओकून मुर्च्छित झाला. त्याला पहातांच रिपुनाशन कृष्णानें आपले पुत्राला धीर यावा म्हणून समुद्रांतून निघालेला आपला पांचजन्य शंख वाजविला. त्या पांचजन्य शंखाच्या शब्दश्रवणाबरोबर तो महाबल प्रद्युम्न ठिकाणीं आला. तें पाहून सर्व लोकांस आनंद झाला. त्यांतही इंद्र व कृष्ण यांस विशेषच झाला.

इतक्यांत हे भारता, कृष्णाचे इच्छेनें दैत्यसमुदाय व दैत्यकुल यांचा अंत करणारें सहस्र अऱ्यांचें व तीव्र धांवेचें असें चक्र त्या प्रद्युम्नाचे हातीं आलें. मग महात्मा इंद्र व कृष्ण यांस नमस्कार करून वज्रनाभाच्या नाशासाठीं त्या कृष्णपुत्रानें तें चक्र वज्रनाभावर सोडिलें. त्या चक्रानें, दैत्यांच्या देखतच वज्रनाभाचें शिर शरीरापासून कापून वेगळें केलें. इकडे वाड्याच्या गच्चीवर गदाला मारूं पहाणाऱ्या रणमस्त व भयंकर सुनाभाला, तो झटपट करीत असतां, गदानें रणांत मारिलें. अरिमर्दन सांबानेंही रणांगणांतील इतर असुर वीरांना आपले तीक्ष्ण बाणांनीं यमाच्या तावडीस पाठविलें. महासुर वज्रनाभ हा मारला गेलासें पाहून वीर निकुंभ कृष्णाचे भयानें व्याकुल होऊन षट्पुरास पळाला.

याप्रमाणें देवांचा कट्टा शत्रु वज्रनाभ पालथा घातल्यावर महात्मे इंद्र व कृष्ण वज्रनाभाच्या नगरीवर उतरले. मग त्या देवश्रेष्ठांनीं प्रथम वज्रनाभाच्या पराजयानें भेदरून गेलेल्या त्या नगरींतील आबालवृद्ध रहिवासी जनांचें सांत्वन करून दुःख दूर केलें. नंतर, वर्तमानीं व भविष्यकाळीं देवगुरु बृहस्पतींच्या

नीतीचें अनुसरण करणाऱ्या त्या महाबल महात्म्या इंद्रोपेंद्रांनीं वज्रनाभाच्या त्या राज्याचे चार वांटे केले. आणि हे राजा, त्यांतील चार आण्यांचा एक वांटा इंद्राचा नातु जो विजय त्यास दिला. दुसरा चतकोर प्रद्युम्नाला म्हणजे प्रद्युम्नाच्या पुत्राला दिला. तिसरा सांबपुत्रास व चवथा गदपुत्र जो चंद्रप्रभ त्यास दिला. हे राजा, त्या वज्रनाभाच्या राज्यांत चार कोटींहून कांहींशीं अधिकच गांवें होतीं व उपपुरें सहस्र होतीं. अशा त्या अमरावतीतुल्य समृद्ध राजाचे त्या इंद्रकृष्णांनीं आनंदानें चार वांटे केले. त्याचप्रमाणें लुटींत शालजोडया, कृष्णाजिनें, महावस्त्रें, तशींच नानाप्रकारचीं जीं जीं रत्नें सांपडलीं, त्यांचेही त्या वीरांनीं चार वांटे घातले. नंतर इंद्राच्या आज्ञेनें देवदुंदुभींचा गजर करून गंगाजलानें त्या चौघांही वीरांना आपआपल्या राज्याच्या वांट्यावर अभिषिक्त केलें. याप्रमाणें इंद्र व कृष्ण या दोघांना आनंद देणाऱ्या त्या चौघांही महात्म्या कुमारांना हा अभिषेक चतुर इंद्र व कृष्ण यांनीं ऋषिमंडळींचे सन्निध स्वांगें केला. इंद्रपौत्र विजय याची आकाशांत गति[1] होती, हें प्रसिद्धच आहे. उरले तीन वांटेकरी यादव. त्या तिघांही कुमारांच्या माता वज्रनाभ, असुर व त्याचा बंधु यांच्या कन्या असल्यामुळें, आयांचे गुणानें त्या तिघांसही ती आकाशगमन विद्या साध्य झाली.

असो; अभिषेक संपल्यावर भगवान् इंद्र जयंताला म्हणाला, हे वीरा, या चौघांही शूर राजपुत्रांचें तूं संरक्षण करावें. यांपैकीं एक माझी वंशवृद्धि करणारा आहे. आणि हे निष्पापा, दुसरे तिघे कृष्णाचे वंशवर्धक आहेत. हे माझे आज्ञेनें सर्व भूतांना अवध्य होतील. व यांना आकाशांतील स्वर्ग व भूमीवरील यादवांनीं रक्षिलेली द्वारकानगरी, या उभयस्थलीं जाणें येणें सारखेंच शक्य राहील. हे जयंता, यांना दिग्गजांचे बच्चे, तसेच आपल्या उच्चैःश्रव्याच्या वंशांतील उत्तम घोडे व त्वष्टयानें निर्माण केलेले रथ, हे यांची इच्छा झाली असतां तूं देत जा. शिवाय ऐरावताचे बच्चे, शत्रुंजय आणि रिपुंजय, जे मोठे वीर असून आकाशसंचारी आहेत, ते तूं सांब व गद यांना मिळवून दे. हे यदुपुत्र येथें आले आहेत त्यापक्षीं येथील सर्व मौज त्यांना वाटेल तशी दाखवून नंतर आकाशमार्गानेंच यदुरक्षित द्वारकानगरीस पोंचते कर.

याप्रमाणें जयंताला सांगून देवराज पुरंदर स्वर्गास गेला व भगवान् केशवही द्वारकेस गेला. नंतर गद, प्रद्युम्न व सांब हे तिघे बलाढ्य सहा महिने तेथेंच राहून व आपल्या पुत्रांचीं राज्यें चालीस लागलेलीं पाहून द्वारकेस जाते झाले. हे देवतुल्य राजा, अद्यापिही हीं तीन राज्यें मेरूच्या उत्तर बाजूला विद्यमान आहेत व हें जगत् आहे तोंपर्यंत तीं अशींच रहाणार.

हे राजा, याप्रमाणें मौशल युद्ध संपून वृष्णि स्वर्गास गेले असतां गद, प्रद्युम्न आणि सांब वज्रपुरास गेले. हे राजा, तेथें वास करून ते पुनरपि कृष्णप्रसादानें व स्वतःचे शुभकर्मानें स्वर्गास जातील.

हें नरदेवा, मीं तुला जें हें प्रद्युम्नाचे उत्कर्षाचें आख्यान सांगितलें तें धन, आयुष्य व यश देणारें असून शत्रुनाशकही आहे. यापासून पुत्रपौत्रवृद्धि होऊन आरोग्य व धनसं-

[1] या ठिकाणीं 'गति' या शब्दाचा अर्थ 'राज्यविभागावर हक्क' असा नीलकंठांनीं धरून हा श्लोक लाविला आहे, पण आह्मांस इतकें खोलांत शिरण्याचें कारण दिसत नाहीं.

पत्ति हीं वाढतात आणि व्यासांच्या म्हणण्याप्रमाणें यशाही विपुल प्राप्त होतें.

## अध्याय अठ्याण्णवावा.

—:०:—

### द्वारकेची विशिष्ट सुधारणा.

वैशंपायन सांगतातः—द्वारकेला आल्यावर कृष्णांनीं गरुडावर बसून सभोंवार नादानें गजबजलेली ती देवलोकतुल्य द्वारकानगरी पाहिली. तशींच तेथील रत्नमय पर्वतावरील जलयंत्रें, क्रीडागृहें, वनोपवनें, गृहशिखरें व चौकही पाहिले. नंतर, देवराज कृष्ण विश्वकर्म्याला बोलावून म्हणाला, हे शिल्पिश्रेष्ठा, माझी हौस पुरी करावी अशी तुझी इच्छा असेल तर माझ्या आवडीसाठीं अत्यंत मनोहर शेकडों बागबगीचांनीं व्यापून गेलेली केवळ स्वर्गतुल्य अशी ही द्वारका बनवून दे. हे देवश्रेष्ठा, हिला नमुना म्हणजे माझी स्वर्गांतील वैकुंठपुरीच. शिवाय तुला त्रैलोक्यांत जें जें उत्तम (वस्तु) सांपडेल तें तें माझ्या या द्वारकापुरीस आणून त्वां तत्काळ ठेवावें.

कृष्णाची ही आज्ञा ऐकल्यावर, महाबल कृष्ण हा देवांची केव्हांही कामगिरी निघाली असतां सदा साह्यार्थ उभा असून कसल्याही घोर संग्रामांत आपल्यासाठीं धडकून शिरतो, हें ध्यानीं आणून इंद्रानें विश्वकर्म्याला द्वारकापुरी श्रृंगारण्याविषयीं अनुज्ञा केली. मग विश्वकर्म्यानें जाऊन इंद्राच्या अमरावतीप्रमाणें कृष्णाची द्वारकापुरी सर्व बाजूंनीं सुशोभित केली. नंतर, विश्वकर्म्यानें स्वर्गांतील नमुन्याप्रमाणें सुशोभित केलेली ती द्वारकानगरी गरुडवाहन दाशार्हपति कृष्णानें पाहिली. ती पाहून सर्व गोष्टी मनासारख्या झाल्या असें त्या समर्थ नारायण प्रभूला वाटून मोठा आनंद झाला आणि त्या नगरींत तो पहात पहात प्रवेश करूं लागला. प्रथम विश्वकर्म्यानें द्वारकेच्या आसपास चित्रविचित्र आकार दिलेल्या व दृष्टि आणि मन हरण करणाऱ्या अशा रमणीय राया ( वृक्षांच्या ) पाहिल्या, पुढें नगरीच्या भोंवतीं सर्वभर खणलेले खंदक पाहिले. त्या परिखांतील उदक पाहून गंगानदीचा भास होई आणि त्या उदकाचें हंसपक्षी सेवन करीत असून तें कमलखंडांनीं अगदीं भरून गेलें होतें. खंदकापलीकडे सूर्याप्रमाणें चकचकणारा सुवर्णमय अत्युच्च तट होता. तो तट नगरींतील अत्यंत उंच अशाही राजमंदिरांच्या वर चढलेला असल्यामुळें त्या नगरीला मेघमालेनें परिवृत झालेल्या द्योची ( आकाशाची ) शोभा आली होती. शिवाय, त्या द्वारकेभोंवतीं कुबेराचें चैत्ररथवन किंवा इंद्राचें नंदनवन यांप्रमाणें रमणीय बागबगीचांचा वेढा असल्यानें, मेघावृत द्योप्रमाणें ती शोभत होती. त्या नगरीच्या पूर्व दिशेला रमणीय शिखरें, गुहा व पटांगणें यांनीं व रत्नसुवर्णमय बहिर्द्वारांनीं शोभायमान असा रैवतक गिरी होता. दक्षिण दिशेला वेलींनीं भरून गेलेला पंचवर्ण गिरी होता. तसाच पश्चिमेला इंद्रकेतूप्रमाणें शोभणारा क्षय नामक पर्वत होता. उत्तर दिशेला वेणुमान् नामक पर्वतानेंही फारच शोभा आणिली होती. हे राजा, हा वेणुमान् पर्वत पांढरा शुभ्रवर्णी व मंदराचलासारखा शोभिवंत होता. रैवतक गिरीचे बाजूला चित्रक, पंचवर्ण, पांचजन्य व विस्तीर्ण असें सर्वर्तुक वन होतें. यांशिवाय लतांनीं चौफेर वेढलेलें असें मेरुप्रभवन, तसेंच भानुवन व पुष्पकवन असून अक्षक ( तिवंस ) बीजक ( महाळुंग ) व मंदार या वृक्षांनीं शोभित असें शतावर्त नांवाचें वन होतें. त्याचप्रमाणें करवीराकर, चैत्ररथ, नंदन, रमण, भावन व वेणुमत् या वनांचा त्या नगरीभोंवतीं

गराडा होता. हे भारता, त्या नगरीचे पूर्व-दिशेला जींत कमलें फुललीं आहेत व पाण-वैदूर्याचीं ( वैदूर नामक वेलीचीं ) पानें शोभत आहेत अशी रमणीय मंदाकिनी नदी वहात होती. या नदीचे बाजूचीं गिरिशिखरें विश्व-कर्म्याच्या सांगण्यावरून कृष्णाचें प्रिय इच्छि-णाऱ्या अनेक देव गंधर्वांनीं भूषित केलीं होतीं. आपले पवित्र जलानें सर्वभर आनंद पसरणारी अशी ती वर सांगितलेली मंदाकिनी नदी पन्नास मुखांनीं द्वारका नगरींत प्रवेश करीत होती. ठिकाठिकाणीं मोठाल्या लोखंडी चक्रांनीं, सुवर्णजालांनीं व शतघ्निनामक तीक्ष्ण यंत्रांनीं अलंकृत केलेली, सर्वत्र पांढऱ्या शुभ्र चुन्याचा गिलावा केलेली, उंच तटानें वेढलेली व अति खोल अशा परीखेनें ( खंदकानें ) युक्त आणि अति उंच व विस्तारानें अप्रातिम अशी द्वारका-नगरी पाहिली.

त्या द्वारकापुरीला चार उभे व त्यांवरून चार आडवे असे एकंदर आठ हमरस्ते असून यांमुळें झालेले सोळा प्रशस्त चौक होते. शिवाय, त्या सर्व नगरीला वेढा देऊन एकच एक अशी नगरीच्या बाहेरून सडक जात होती. या नगरीची मांडणी पाहून तिची योजना शिल्पनिपुण अशा प्रत्यक्ष शुक्राचार्या-नेंच केली होती असें वाटे. या शिवाय, त्या विज-यशाली, यादवांच्या राजधानीला प्रत्यक्ष विश्व-कर्म्यानें नानाप्रकारचे महापथ व सैन्यांतील शिपायांची व्यूहाकार रचना करण्याच्या सोईचे विशिष्ट आकारानें युक्त असे मार्ग आंखून ठेविले होते. या सोयींमुळें त्या द्वारावती नग-रींतील स्त्रियांनीं देखील वेळ पडल्यास युद्ध केलें असतें. मग त्या महारथि वृष्णींची तर गोष्ट सांगावयासच नको. नंतर, मनुष्यांस आनंद देणाऱ्या अशा रत्नखचित सोनेरी पाय-ऱ्यांचीं तेथील गृहें पाहून देवकीनंदन कृष्णाला फार आनंद झाला. त्याचप्रमाणें तेथील भयं-कर गलबल्यानें गजबजून गेलेलीं व्यापारांचीं स्थानें व कांहीं श्रीमंतांच्या वाड्यांचे प्रशस्त चौक हे पाहूनही त्याला फार आनंद झाला. त्याचप्रमाणें जेथें उंच उभारलेल्या पताका फडकत आहेत असे तरते बगीचे व सोन्याचे कळस बसविलेलीं चमकणारीं प्रासादशिखरें व मेरूच्या शिखरांप्रमाणें रमणीय अशीं कित्येक गृहें व सर्वांगीं धवधवित पांढरीं असून मधून मधून सोनेरी शाईच्या रेघा ओढ-ल्यामुळें रमणीय शिखरें, गुहा व सुळके यांनीं युक्त अशा पर्वताप्रमाणें चित्रविचित्र दिस-णारीं, कित्येक पंचरंगी, कित्येक सुरंगी व कित्येक पुष्पवृष्टीप्रमाणें शोभायमान् दिस-णारीं, कित्येक पर्जन्याप्रमाणें दणाणणारीं, कित्येक बहुरूपी पर्वताप्रमाणें शोभणारीं, कित्येक वणव्याप्रमाणें जळजळीत प्रभेचीं, कित्येक चंद्र व सूर्य यांहीपेक्षां प्रकाशमान असून आकाशाला ओरखाडणारीं ( इतकीं

१ नीलकंठानीं यावर बरीच लांब टीप दिली आहे. तिचें कारण आह्मांस वाटलें नाहीं.

१ मूळांत " भीमघोषैर्महाघोषैः " असा आहे, यांतील ' महाघोष ' शब्दाचा अर्थ, मार्केट किंवा बाजार असा आहे, हें वाईकर, मन्मथनाथ, किंवा ज्वाला-प्रसादमिश्र या कोणींच लक्षांत आणिलेंसें दिसत नाहीं; व त्यांना अर्थहि अडला नाहीं !

२ मुळांत ' पारिप्लववनानि ' असें आहे व त्याचे पूर्वी 'समुच्छ्रितपताकानि' असें पद आहे. यांतील 'पारिप्लव' शब्दाचा अर्थ ' तरंगणारीं' असा आहे. तेव्हां येथें दोन कल्पना शक्य दिसतात. एक तर, आकाशांत वायूनें उंच-वर फडफडणाऱ्या रंगीबेरंगी ध्वजपताका यांच्या समु-दायाला पाहून हा एक हवेंत तरंगणारा बगीच्याच काय असा भास होई. किंवा हीं पदें पृथक् समजल्यास तेथें तरते बगीचे किंवा ज्यांना 'Hanging gardens' ह्मणतात त्या होत्या. असाही अर्थ संभाव्य आहे.

३ आमचा पाठ " आलिखद्भिः " असा आहे. कित्येकांचा पाठ " आश्लिषद्भिः " असा आहे, त्याचा अर्थ " आकाशाला आलिंगन देणारीं, " असा होतो. तोही समंजस व कविसंप्रदायानुकूल आहे.

उंच ) व प्रत्यक्ष विश्वकर्म्यानेंच निर्मिलेलीं अशा मंदिरांच्या योगानें ती पुरी सुशोभित झाली होती. त्या नगरींतील महाभाग्यवान् यादव व तिच्या उपवनांतील वृक्ष यांच्या योगानें रमणीय व चित्रविचित्र अंगांच्या मेघपटलानें व्यापलेल्या आकाशाप्रमाणें ती नगरी दिसत होती. कारण, त्या नगरींतील हजारों नेत्रतुल्य गवाक्षें व तिच्या उपवनांतलि वृक्षांपासून कोसळणारी पुष्पवृष्टी यांवरून तिच्यांत पर्जन्याधिपति सहस्रनेत्र इंद्राची वसती होती व श्रीकृष्ण आणि त्याचे अनुयायी दाशार्ह यांच्या योगानें आपल्या गणांसह श्रीविष्णूचीही तेथें वसती असल्यासारखी होती. त्याचप्रमाणें तींतील चित्रविचित्रवर्णी व गगनचुंबी असंख्य मंदिरें हींच मेघपटलें असा भास होई व या सर्व गोष्टीमुळें तिला वर दिलेली मेघावृत आकाशाची (द्योची) उपमा यथार्थ होती. अशा द्वारकेस खास भगवान् वासुदेवासाठीं प्रत्यक्ष विश्वकर्म्यानें चार योजन लांबीचें व तितक्याच रुंदीचें महा धनाढ्य असें अतुल गृह निर्माण केलें होतें तें कृष्णानें पाहिलें. या गृहाभोंवतीं क्रीडार्थ उंची प्रासाद व कृत्रिम क्रीडापर्वत केले होते. ही कामगिरी विश्वकर्म्यानें इंद्राच्या आज्ञेवरून केली होती. रुक्मिणीच्या निवासासाठीं त्याच विश्वकर्म्यानें मेरुपर्वताच्या शिखराप्रमाणें उच्च व कांचनमय असा प्राणिमात्राचें चित्ताकर्षण करणारा एक प्रासाद बांधला होता. सत्यभामेकरितां रत्नजडीत विचित्र सोपानांनीं युक्त असें जें शुभ्रवर्णी मंदिर निर्माण केलें होतें व ज्यांत सत्यभामेची वसती असे त्याला भोगमंदीर किंवा विलासमंदीर असेंच नांव असे. जांबवती नामक कृष्णस्त्रीला रहावयाकरितां जो प्रसाद निर्मिला होता तो निर्मल सूर्याच्या वर्णाच्या पताकांनीं अलंकृत असून त्याच्या चारी दिशांना मोठाले ध्वज फडकत होते व तो प्रतिक्षणीं नवीन नवीन लहरा मारीत असे आणि सूर्याप्रमाणें स्वतेजानें भोंवतालच्या सर्व राजवाड्यास तो फिकें पाडीत असे. उगवणाऱ्या सूर्याच्या तेजाचा तो वाडा रुक्मिणी व सत्यभामा या दोघीजणींच्या वाड्यांच्या मधोमध होता. हा कैलासशिखरतुल्य दिव्य प्रासाद विश्वकर्म्याच्याच हातचा होता. दुसरा मेरू या नांवानें विख्यात, तेजानें जांबूनद सुवर्णासारखा किंवा पेटलेल्या अग्नीसारखा व विस्तारानें सागरासारखा जो प्रासाद होता त्यांत, हे भरतश्रेष्ठा, गांधारराजाची जी सत्कुलोत्पन्न गांधारी नांवाची कन्या होती तिला केशवानें ठेविलें होतें. कमलवर्णाचा, मनोहर कांतीचा व अति तेजस्वी असा पद्मकूल नांवाचा उंच शिखरांनीं युक्त जो प्रसाद होता तो सुभीमेला दिला होता. हे नृपश्रेष्ठा, दुसरा सर्व इष्ट गुणांनीं युक्त व सूर्यतुल्य कांतीचा वाडा होता त्यांत लक्ष्मणा नांवाच्या नाइकेनें रहावें अशी श्रीकृष्णाची आज्ञा होती. ज्याला सर्व लोक पर (सर्वोत्तम) असें समजत, तो वैदूर्य मणीच्या वर्णाचा हिरव्या कांतीचा वाडा त्यांत मित्रविंदेचा निवास होता. हा वासुदेवाच्या राणीचा वाडा देवगण व ऋषिगण यांना पूज्य असून एकंदर वाड्यांचें नाक होता. दुसरा एक अगदीं फारच फारच रमणीय व पर्वताप्रमाणें विशाल असा विश्वकर्म्यानें निर्मिलेला जो केतुमान् या नांवानें प्रसिद्ध वाडा होता तो सुवार्ता नांवाची जी कृष्णमहिषी तिच्या रहाण्याकडे योजिला होता. या वाड्याची सर्व दैवतें प्रशंसा करीत. तेथेंच आणखी विश्वकर्म्यानें अंगीं रचलेला आणि केवळ रत्नांचाच घडलेला असा विरजा नांवाचा असा कांतिमान् व शोभिवंत सुलक्षण वाडा होता, त्याचा गर्भ एक योजन लांब

होता. हा वाडा महात्म्या वासुदेवानें देवद्विजांचें स्वागत्य व आतिथ्य करण्याचे कामीं योजला होता. वासुदेवाच्या या वाड्यावर पांतस्थाला त्या वाड्याचा मार्ग दुरूनच कळावा म्हणून पताका लावलेले सोनेरी दांड्याचे ध्वज रोंविले होते. त्या वाड्याला दिव्य रत्नांच्या जाळ्याही लाविल्या होत्या. तेथें यदुसिंह कृष्णानें वैजयंत नांवाचा मोठा पर्वत आणून ठेविला होता व इंद्रद्युम्न सरोवराच्या बाजूला साठ ताल उंच व अर्ध योजन दीर्घ असें जें हंसकूट पर्वताचें लोकविख्यात शिखर तें त्यावरील किन्नर व महानाग यांसहित अमित तेजस्वी विश्वकर्म्यानें सर्व भूतांसमक्ष श्रीकृष्णासाठीं तेथें आणलें होतें. त्याचप्रमाणें त्रैलोक्यांत प्रसिद्ध व जांबूनद सुवर्णमय असें सूर्याच्या मार्गावरील मेरूचें सर्वांतील उच्च व सर्व औषधींनीं युक्त जें फिरतें शिखर तें इंद्राच्या आज्ञेवरून त्वष्ट्यानें कांहीं विशेष कारणाकरितां कृष्णाचे उद्देशानें तेथें आणलें होतें. निर्मल व स्वर्णमय अशा अनेक पुंडरीकांनीं युक्त असलेला पारिजातक वृक्षही केशवानें स्वतःच तेथें आणून ठेविला होता. हा उत्तम वृक्ष घेऊन येतांना त्याचे रक्षणार्थ जे कित्येक देव तेथें होते त्यांबरोबर त्या अद्भुत कर्म करणाऱ्या कृष्णाला युद्धच करावें लागलें. वासुदेवाकरितां तेथें रत्नांचीं पुष्पें व फळें देणारे वृक्ष लावले होते. रत्नमय व सोनेरी नौकांची ज्यांत गर्दी आहे व ज्यांतील पाण्यांत कमलांचीं बेटें व रत्नमय सुगंधी उत्पलें लागून गेलीं आहेत अशा पुष्करणी व सरोवरेंही वासुदेवासाठीं तेथें निर्माण केलीं होतीं. त्यांच्या उंच तटाकांना साल, ताल, कदंब व शेंकडों शाखांचे रोहिणी नामक वृक्षांनीं शोभा आणली होती. त्याचप्रमाणें हिमवान पर्वत व मेरू पर्वत यांवर वाढणारे जे कांहीं विशिष्ट वृक्ष तेही विश्वकर्म्यानें कृष्णाकरितां तेथें लावले होते. तेथील बगीच्यांच्या हद्दींवरून ज्यांना सर्वही ऋतूंत फळें येत असे भडकलाल, पिंवळे, तांबूस, काळे व श्वेत पुष्पांचे वृक्ष लावले होते. त्या राजधानींतील नद्यांचे वाळवंट पिंवळ्या वाळूनें व खड्यांनीं आच्छादित असून त्यांतील जल व त्यांचे तटाक कोठेंही उच्चनीच नव्हते. तेथील डोहांचें पाणी प्रसन्न दिसत असे. याशिवाय दुसऱ्या कांहीं तेथें नद्या होत्या. त्या अनेक प्रकारच्या वृक्षवेलींनीं वेढल्या असून त्यांतील पाणी फुलांनीं भरलें होतें व त्यांतील खडे व वाळू सोनेरी होती. त्या पुरांतील वृक्ष सर्वदा मस्तींत असलेले कोकिळ व मत्तमयूर यांच्या टोळ्यांनीं भरलेले असत. त्या पुरांत गाई व म्हशी विपुल असून हत्तींचेही कळप होते. डुकरें, हरणें व पांखरें यांनींही तेथें वसती केली होती. त्या रमणीय नगरीला विश्वकर्म्यानें शंभर हात उंच असा भला मोठा सोनेरी कोट उभारला होता व याच्या आसपासच वनें, उपवनें, सरोवरें, नद्या व मोठमोठाले कृत्रिम शैल निर्मिले असल्यानें त्या कोटाला ( अरण्यांनीं ) वेढलेल्या पर्वताप्रमाणें शोभा आली होती.

## अध्याय नव्याण्णवावा.

—:०:—

### द्वारकेंतील कृष्णगृहव्यवस्था.

वैशंपायन सांगतातः—याप्रकारें, बैलाप्रमाणें विशाल नेत्र आहेत ज्याचे असा कृष्ण द्वारका पहात पहात आला, तों शेंकडों प्रासादांनीं शोभित अशा आपल्या गृहाशीं येऊन पोंचला. तें गृह ठिकठिकाणीं तऱ्हेतऱ्हेचें काम केलेल्या सोनेरी चबुऱ्यांवर उभारलेली आगीसारखीं लखलखीत हिरे व विद्रुम यांनीं जडलेलीं अशीं कमानदार प्रकाशमय बहिर्द्वारें, व

घरांत उभारलेले शेकडों हजारों रत्नस्तंभ यांचे प्रभेनें आंतील सर्व अंधकार नष्ट होऊन, ( आंत येणारास ) प्रशस्त व खुलास दिसत होतें. या गृहांत एके भागीं खुद्द कृष्णाचे बसण्याउठण्याचा असा एक विस्तीर्ण खासगी वाडा होता. तो सर्वच सुवर्णमय असून स्फटिकाचे स्तंभांवर उभारलेला होता. त्याचे सन्निध, मनासारख्या आकाराच्या, विकसित कमलांनीं भरलेल्या, सर्वदा मद्युक्त असलेल्या कोकिलांनीं व मत्त मयूरांनीं आश्रित, रत्नांच्या पायऱ्यांनीं आलंकृत, चित्रविचित्र मणी व सुवर्ण यांच्या कांतीच्या सुवासिक रक्तकमलांनीं युक्त, शुभ्रकमलांचीही ज्यांचे पाण्यांत गर्दी आहे अशा अनेक पुष्करिणी होत्या. त्या वाड्याला जो विश्वकर्म्यानें तट घातला होता तो केवळ दगडी होता. तो बरोबर शंभर हात उंच होता व त्याचे सभोंवर खंदक होता.

अशा प्रकारचा हा वाडा विश्वकर्म्यानें त्या वृष्णिसिंहाकरितां तयार केला होता. तो वाडा पाहून कृष्णाला फार आनंद झाला व त्यानें खूष होऊन गरुडावर बसल्याबसल्याच शत्रूंचे अंगावर रोमांच उभे करणारा असा आपला शुभ्र शंख वाजविला. त्या शंखाचे शब्दानें जवळचा समुद्र अगदीं खवळून गेला व सर्व आकाशही प्रतिध्वनीनें भरून गेलें. त्यावेळीं तो एक चमत्कारच झाला. तो पांचजन्य शंखाचा शब्द ऐकून व गरुडाला पाहून कुकुर व अंधक हे शोकरहित झाले व हातीं शंख, चक्र व गदा घेतलेल्या त्या सूर्यमय तेजस्वी कृष्णाला गरुडावर बसून आलेला पाहून पुरवासी जनांना फार आनंद झाला. मग सर्व नगरवासी जनांनीं तूर्यें वाजविलीं, नगारे पिटलेव सिंहनादही केले. तेव्हां ते सर्वही दाशार्ह, तसेच कुकुर व अंधक हे मधुसूदन आलेला पाहून प्रसन्न मनानें एकवट झाले. पुढें शंख व तुताऱ्या वाजत आहेत, अशा थाटांत उग्रसेन हा वासुदेवाला बरोबर घेऊन कृष्णाच्या त्या गृहाला आला. मग देवकी माता अति हर्षित त्या आपल्या सत्तेच्या घरांत सर्वभर मोकळी फिरूं लागली. त्याचप्रमाणें यशोदा, रोहिणी व आहुकाच्या स्त्रियांनींही केलें. नंतर इंद्रादिक देवही ज्याचें अनुचरत्व करितात असा तो भगवान श्रीकृष्ण गरुडासह आपले खासगी महालांत जाऊन मनमोकळा सर्वत्र फिरला. मग लौकरच खालीं उतरून गृहद्वाराशीं येऊन त्या यदुनंदनानें तेथें जमलेल्या यादवांचें ज्याचे त्याचे योग्यतेप्रमाणें पूजन केलें. उलटपक्षीं बलराम, आहुक, गद, अक्रूर व प्रद्युम्नप्रभृतींनीं त्याचें अर्चन केलें. मग तो मणिपर्वत घेऊन कृष्ण स्वगृहांत गेला. आणि रुक्मिणीपुत्र प्रद्युम्न यानें तो इंद्राचा लाडका पारिजात वृक्षही घरांत नेवविला. नंतर स्वर्गांतील वस्तीनें दिव्य बनलेले आपले शरीराचे बांधे ते प्रद्युम्नादि वीर परस्पर पाहूं लागले. आणि त्या पारिजात वृक्षाचा प्रभाव पाहून तर सर्वांनाच आनंद झाला. मग त्या आनंदित झालेल्या प्रमुख यादवांनीं धन्यवाद चालविले असतां, तो श्रीमान् कृष्ण विश्वकर्म्यानें त्याजसाठीं निर्मिलेल्या त्या गृहांत गेला.

गृहांत गेल्यावर त्या अमेयात्मा अच्युतानें वृष्णींचे साह्यानें तो मणिपर्वत त्याचेवरील शिखरांसह अंतःपुरांत नेवविला. त्याचप्रमाणें शत्रुजेत्या कृष्णानें तो परमपूज्य व दिव्य वृक्षश्रेष्ठ पारिजात, त्याची पूजा करून स्वस्थपणें इष्ट अशा स्थानीं नेवून रोंविला. नंतर शत्रुवीरहंत्या त्या केशवानें नरकासुरानें भ्रष्ट न करितां एकत्र कोंडून ठेविलेल्या ज्या स्त्रिया बंधमुक्त करून आणल्या होत्या, त्यांचाही गौरव, आपले जातभाईंचा

प्रथम त्या कामीं रुकार घेऊन केला. त्यांस त्यानें दिव्यवस्त्रें, आभरणें, दासी, द्रव्यनिधि, चंद्रकिरणांसारखे तेजस्वी हार, व मोठी प्रभायुक्त रत्नें देऊन संतुष्ट केलें. या सर्व स्त्रियांचे वसुदेव, देवकी व रोहिणी आणि आहुक व रेवती यांनीं कृष्णाचे पूर्वींच पूजन केलें होतें. मग या एकंदर स्त्रियांत सत्यभामा ही सर्वांत श्रेष्ठ भाग्याची असें ठरलें. आणि भीष्मकाची कन्या जी रुक्मिणी ती घरधनीन असें ठरलें. नंतर, त्या सर्वही स्त्रियांस कृष्णानें जिचे तिचे योग्यतेप्रमाणें रहावयाचे वाडे, हवा खावयाचे उंच मनोरे, साधीं घरें व पुष्कळसें सामानसुमान देण्याची आज्ञा केली.

## अध्याय शंभरावा.

—:०:—

### कृष्णाचा सभाप्रवेश.

वैशंपायन सांगतातः—नंतर वासुदेवानें गरुडाचें पूजन करून आणि त्याला राजी करून आणि केवळ आपल्या स्नेहाप्रमाणें त्याचें अगत्य करून त्याला स्वगृहीं जाण्यास परवानगी दिली. कृष्णाची परवानगी मिळतांच तो गगनचारी पक्षी कृष्णाचा सत्कार करून व त्याला प्रणाम करून ऊर्ध्वपथानें चालता झाला. आणि आपल्या पंखांचे झडपेनें मकरालय जो समुद्र तो खळबळून सोडून मोठ्या झपाट्यानें पूर्वसमुद्राला गेला.

‘ आपल्याला काम पडेल तेव्हां मी जवळ उभा राहीन ’ असें सांगून गरुड गेल्यावर कृष्णानें आपला पिता वृद्ध वसुदेव, त्याचप्रमाणें राजा उग्रसेन, बलराम, सात्यकी, काश्य, सांदीपनि, तसाच ब्रह्मगार्ग्य व इतर जे कोणी वृष्णि, अंधक व भोज या कुलांत वयोवृद्ध होते, त्या सर्वांच्या भेटी घेऊन व आपण आपल्या पराक्रमानें मिळवून आणिलेलीं निवडक रत्नें त्यांस देऊन संतुष्ट केलें. मग त्या द्वारकानगरीचे हमरस्त्यांवरील चौकांत स्वर्णकुंडलें घातलेला सरकारी दवंडी पिटणारा मनुष्य डांगोरा पिटूं लागला कीं, ‘सर्वही ब्रह्मद्वेष्टे मारून हे अंधक आणि वृष्णि आतां जयशाली झाले आहेत. आणि हा श्रीकृष्ण कांहीं दुखापत न होतां युद्धभूमीवरून परत आला आहे ! ही शुभवार्ता सांगणाऱ्या त्या दवंडी पिटणाऱ्याची नागरीक लोकांनीं पूजा केली.

नंतर श्रीकृष्णानें प्रथम सांदीपनीकडे जाऊन पश्चात् मोठ्या नम्रतेनें वृष्णिराज जो आहुक त्याला वंदन केलें. त्याचप्रमाणें वृत्ति आनंदमय झाल्यामुळें ज्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले आहेत अशा आपल्या पित्या वसुदेवाला बलरामासह कृष्णानें अभिवादन केलें. त्यानंतर उरलेले जे कोणी वडील व मान्य होते त्यांच्या भेटी घेऊन व त्यांचे त्यांचे योग्यतेप्रमाणें त्यांचा संमान करून त्या अधोक्षजानें सर्वही दाशार्हांस नांव घेऊन घेऊन सभेला बोलाविलें. तेथें कृष्णासह ते सर्वही सर्वांगीं रत्नमय अशा अत्युत्कृष्ट आसनांवर बसले. मग लढाईंत कृष्णकिंकरांनीं जें अपार द्रव्य मिळविलें होतें तें कृष्णाचे आज्ञेवरून राजसेवकांनीं त्या सभास्थानीं आणिलें. तेव्हां दुंदुभिवादनपूर्वक त्या दाशार्हांचें पूजन करून जनार्दनानें त्यांचा धनदानानें संमान केला. मग हिरे व पोंवळीं जडलेल्या जिच्या कमानी आहेत व जींत सर्वत्र उच्चासनें मांडलीं आहेत अशा त्या रमणीय सभेंत

कृष्णाचे विनंतीवरून ते सर्वही दाशार्ह शिरले. हे जनमेजया, ते यादवांतील पुरुषसिंह याप्रमाणें त्या सर्वार्थगुणसंपन्न अशा सभेंत भरून राहिले असतां ती सभा सिंहांनीं व्यापिलेल्या गिरिगुहेप्रमाणें फार अधिक शोभूं लागली. उग्रसेनाला पुढें करून भोज व वृष्णि यांनीं पुरस्कृत केलेला असा तो कृष्ण बलरामासह एका विस्तीर्ण सुवर्णासनावर बसला. आणि मग तेथें बसलेल्या सर्व यादववीरांना त्यांवरील प्रेम व त्यांचें वय यांचे मानानें कुशल प्रश्न करून तो पुरुषोत्तम म्हणाला.

## अध्याय एकशें पहिला.

—:०:—

### नारदकृत कृष्णप्रतापवर्णन.

श्रीकृष्ण म्हणाला:—"आपण सर्वही पवित्र कीर्तीचे पडलां, तेव्हां आपल्या सर्वांचें तप, बल, समाधी व शत्रूंचें अनिष्टचिंतन यांच्या योगानें तो पापात्मा भूमिपुत्र नरकासुर माझे हातून मरण पावला. मग त्यानें सर्वोत्कृष्ट अशा ज्या सोळा सहस्र कन्या अंतःपुरांत कोंडून, पहाऱ्यांत ठेविल्या होत्या, त्या सर्वही मीं सोडविल्या. व त्याचा तो मणिपर्वत उपटून टाकून खुणेसाठीं त्या पर्वताचें हें शिखर बरोबर आणिलें आहे. शिवाय आपल्यापुढें ठेविलेला हा अपार संपत्तीचा ढीग माझे नौकर चाकरांनीं लुटून आणला आहे. आणि आपणच आतां या संपत्तीचे मालक आहां;" असें म्हणून कृष्ण थांबला.

वासुदेवाचें तें वचन ऐकून ते भोज, अंधक व वृष्णि हर्षानें रोमांचित होऊन हंसतच कृष्णाचें पूजन करूं लागले. आणि हात जोडून त्याला म्हणाले, 'हे महाबाहो देवकीनंदना, देवांनाही दुष्कर असें कर्म करून स्वतः संपादिलेल्या रत्नांनीं व भोग्य वस्तूंनीं तूं आह्मांसारख्या आप्तस्वकीयांचें लालन करावेंस हें तुजसारख्याला अद्भुत नाहीं.'

नंतर सर्व दाशार्ह मंडळींच्या व आहुक राजाच्या ज्या स्त्रिया होत्या त्या प्रसन्न होऊन वासुदेवाला पाहण्याच्या इच्छेनें तेथें आल्या. सुंदर मुखाची रोहिणी व शिवाय देवकीप्रभृति सात[1]जणी वासुदेवस्त्रिया यांनीं कृष्ण व महाभुज बलराम या दोघांस तेथें बसलेलें पाहिलें. बलरामकृष्ण यांनीं आपल्या त्या माता दृष्टीस पडतांच आसन सोडून पुढें येऊन प्रथम रोहिणीला नमस्कार करून मग देवी देवकीला वंदन केलें. त्या वेळीं ज्यांचे विशाल नेत्रांत बैलाप्रमाणें रग दिसते आहे, असे ते दोघेही पुत्र सान्निध बसले असतां, ती देवकी माता मित्र व वरुण या उभयतांस अंकावर घेऊन बसणाऱ्या अदितीप्रमाणें शोभूं लागली. नंतर जिचेप्रीत्यर्थ कृष्णानें कंसास त्याचे अनुयायांसह मारिलें, जिचे उक्तविध संकेताप्रमाणें व उक्तकालीं देवेंद्र उत्पन्न केला व ज्या कामरूपिणीला सामान्य लोक 'एकानंशा' असें म्हणत, ती यशोदेची योगमाया नामक कन्या त्या नरश्रेष्ठ कृष्णबलरामांसमीप आली. ही योगकन्या मोठी दुर्धर्ष असून श्रीकृष्णाचे रक्षणार्थच भूलोकीं उत्पन्न झाली होती. तीं आजपर्यंत श्रीकृष्णाचेच आज्ञेवरून वृष्णीचे घरांत मोठ्या सन्मानानें पुत्राप्रमाणें पाळिली होती. आणि हिनें दिव्य पुरुष जो श्री-

---

१ वर एकदां ते सर्व उत्कृष्ट आसनांवर बसले असें लिहिलेंच आहे. व पुन्हा आतां आसनयुक्त सभेंत शिरले असें लिहिलें आहे. यावरून वरील आसनें सभास्थानचीं नसून केवळ बाहेरून मनुष्य येतांच चटकन त्याला बसावयास आपण पाट देतों अशा प्रकारचीं असावीं असें ह्मटलें पाहिजे.

[1] धृतदेवा, शांतिदेवा, उपदेवा, श्रीदेवा, देवरक्षिता, सहदेवा आणि देवकी अशा या सातीजणी देवक राजाच्याच कन्या असून एका वसुदेवालाच दिल्या होत्या.

कृष्ण याचें रक्षण केलें, ही गोष्ट ध्यानीं वागवून सर्वही भले यादव तिची देवासारखी पूजा करीत असत. ती या समयीं तेथें आली असतां कृष्णानें आपल्यां लाडक्या मैत्रिणीप्रमाणें त्या आपल्या बहिणीला भेटून उजव्या हातानें तिला जवळ घेतली. त्याचप्रमाणें बलाढ्य बलरामानेंही त्या कल्याणीला आलिंगन देऊन आणि मस्तक हुंगून सव्य हस्तानें आपलेपाशीं बसविली. मग राम व कृष्ण या दोघां भावांमध्यें बसलेली ती त्यांची बहीण तेथें जमलेल्या स्त्रियांना स्वर्णकमलानें जिचा हात व्यापृत आहे अशा कमलवासिनी लक्ष्मीसारखी दिसूं लागली. मग त्या भावंडांवर पुष्कळशा अक्षता नानाप्रकारचीं पुष्पें व लाह्या यांची वृष्टि करून त्या स्त्रिया आपापल्या घरीं परतल्या.

त्यानंतर ते सर्व यादवही जनार्दनाची पूजा करून त्यानें केलेल्या अद्भुत कर्मांची प्रशंसा करीत त्याचे आसपास बसले. तें यादवमंडळ भोंवतीं बसलें असतां नगरवासी जनांचें प्रेमवर्धन करणारा परमपूज्य व महाकीर्तिमान् तो महाबाहु कृष्ण देवमंडळांत बसल्यासारखा शोभूं लागला.

याप्रमाणें सर्वही यादव जनार्दनाचे भोंवतीं स्वस्थपणें बसले असतां, देवेंद्राचे सांगिवरून नारदमुनि त्या सभेंत आले. त्या सर्वही यादवश्रेष्ठांनीं त्या परम पूज्य नारदांचा सत्कार केल्यावर हरीचे हातास हात लावून ते श्रेष्ठासनावर बसले. मग तेथें बसलेल्या यादवांस ते म्हणाले, हे नरश्रेष्ठहो, मी इंद्राचे सांगण्यावरून येथें आलों आहें असें तुम्ही समजा. हे राजव्याघ्रहो, या कृष्णाचा पराक्रम ऐका व लहानपणापासून यानें कोणकोणतीं कृत्यें केलीं तींही ऐका. उग्रसेनाचा दुर्बुद्धि पुत्र कंस यानें सर्वही यादवांचा पाडाव करून आणि आपला पिता उग्रसेन याला बंदींत घालून राज्य बळकाविलें. आणि आपला सासरा जरासंध याचा आश्रय करून त्या दुर्मती कुलांगारानें सर्वही भोज, वृष्णि व अंधक यांचा अवमान केला. आपल्या ज्ञातीचें कल्याण करावें असें मनांत आल्यावरून प्रतापी वसुदेवानें उग्रसेनाचे रक्षणार्थ आपले पुत्राचा मोठ्या चातुर्यानें बचाव केला. मग तो धर्ममूर्ति कृष्ण मथुरेंत रहात असतां आपल्या गोपालमित्रांसह त्यानें शूरसेन मंडळीचे समक्ष अत्यद्भुत कर्मे केलीं. त्याची एकेक गोष्ट ऐकावी तीं अपूर्वच. शकट नामक राक्षसाला मारावें म्हणून कृष्ण यत्नांत होता. दरम्यान मायावी मोहकरूप घेतलेली, परंतु मूळची मोठी धिप्पाड व बलाढ्य अशी बकी राक्षसी, जिला पूतनाही म्हणतात, ती आपला विषानें भरलेला स्तन कृष्णाला पाजीत असतां, त्यानें तिच्या मांडीवर उताणा पडल्या पडल्याच तिला ठार केली. त्या वनचरांनीं ती राक्षसी मारलेली जेव्हां पाहिली, तेव्हां ते म्हणाले कीं, आज हा कृष्ण पुनः जन्मास आला व त्याला यासाठीं 'अधोक्षज' असें म्हणूं लागले. त्याचप्रमाणें या पुरुषोत्तमानें अशीच एक अत्यद्भुत गोष्ट केली ती अशी कीं, एवढासा पोर असतांना खेळतां खेळतां पायाच्या नुसत्या आंगठ्यानें शकटाचें रूप घेतलेला शकटनाम राक्षस लोळविला. हा पोरांच्या खोड्या करितो म्हणून आईनें दाव्यानें उखळाला बांधला असतां जवळ आंगणांत असलेले अर्जुन नांवाचे दोन वृक्ष त्यानें मोडून पाडले, त्यामुळें त्याची 'दामोदर' या नांवानें प्रसिद्धी झाली. कालीया नांवाचा महानाग मोठा बलाढ्य व दुर्धर्ष होता. परंतु या कृष्णानें यमुनाडोहांत खेळतां खेळतां चीत केला. मग तो शरण आल्यावर समर्थ कृष्णानें अक्रूरासमक्ष त्या नागाचे भुवनांत जाऊन सर्व नागांनींही ज्याची पूजा केली असें दिव्य रूप

धारण केलें. या बुद्धिमान् महात्म्या वासुदेवानें गाईचें रक्षण करावें अशी इच्छा असल्यामुळें थंडीवाऱ्यानें गाई व्याकूळ झालेल्या पाहून सात रात्रींपर्यंत गोवर्धनपर्वत उचलून त्यावर धरिला. त्याचप्रमाणें या वासुदेवानें अरिष्ट नांवाचा एक मोठा धिप्पाड शरीराचा, फार बलाढ्य, अत्यंत दुष्ट, मनुष्यांचा प्राण घेणारा असुर मारिला. व तशाच प्रकारचा धेनुक नामक एक असुर पालथा घातला. आणि अशा त्या दुर्बुद्धीला मारून आपल्या गाईचें रक्षण केलें. सुनामा नांवाचा कंसाचा एक भाऊ मोठें सैन्य बरोबर घेऊन कृष्णाला पकडून न्यावें ह्मणून आला होता. परंतु शत्रुहंत्या कृष्णानें गोपवेषानें रानांत फिरत असतांच बलरामाशीं संगनमत करून त्या असुराला कोल्ह्यांकडूनच पळवून लावून, कंसाचे छातींत धडकी भरविली. पुढें हा पुरुषोत्तम वनांत गेला असतां तेथें विक्राळ दाढा हींच ज्याचीं आयुधें आहेत असला भोजराजाचे कृपेंतला केशी नांवाचा एक असुर घोड्याचे रूपानें अंगावर चालून आला असतां यानें ठार केला. त्याचप्रमाणें, हे महाबाहो, कंसाचा अमात्य प्रलंब नांवाचा होता. तो तर बलरामानें एका बुक्कीसरसा पालथा घातला. हे ब्रह्मज्ञानी गर्गमुनींनीं उपनयनादि संस्कार केलेले वसुदेवाचे बलाढ्य उभय पुत्र देवसुतांप्रमाणें आजपर्यंत वाढत होते. परम ऋषि गार्ग्य यानें या उभयतांस जन्मापासूनच प्रत्येक गोष्ट पुरापूर समजावून देऊन त्यांचे संस्कार पुरे केले आहेत.

पुढें हे नरश्रेष्ठ जेव्हां ज्वानीचे तोंडीं आले तेव्हां हिमालयावरील रानांत वाढलेले सिंहाचे मत्त बच्चांप्रमाणें उसळले. तेव्हां त्या बलाढ्य व देवपुत्रांप्रमाणें तेजस्वी अशा वीरांना पाहून गोपस्त्रियांचें मनहरण झालें. आणि ते दोघे त्या नादांत व्रजांतच राहिले. तेथें असतांना रुंद छातीचे, दीर्घ बाहूंचे व शालवृक्षांचे फांदीप्रमाणें सरळ सोट वाढलेले नंद गौळ्याचे पोरगे धांवण्यांत, युद्ध करण्यांत, किंवा अनेकविध खेळ खेळण्यांत अग्रेसर असत. ही गोष्ट पुष्कळ गौळ्यांना पाहवेना. यांची कीर्ति ऐकून कंस व त्याचे मंत्रि यांना तर रोगच लागला. आणि या कृष्णबलरामाला पकडण्याचें कंसाला जेव्हां साधेना तेव्हां एकाद्या चोराला भक्कम जखडावा त्याप्रमाणें त्यानें उग्रसेन व बांधवांसह वसुदेव यांस बद्ध केलें. मग बहुत कालपर्यंत त्यांचा पिता वसुदेव हा संकटांतच राहिला. कंस आपल्या पित्याला कारागृहीं टाकून जरासंध, तसेच आव्हृति व भीष्मक यांचे आश्रयानें शूरसेन देशावर राज्य करूं लागला.

याप्रमाणें कांहीं काळ लोटल्यावर एकदां कंसानें शंकराच्या उद्देशानें मथुरेंत एक मोठा उत्सव केला. हे राजा, त्या उत्सवसमयीं अनेक देशांतील जेठी तेथें आले. त्यांचेप्रमाणें नृत्य, गायन, व अभिनय करण्यांत कुशल असे लोकही तेथें आले होते. मग त्या तेजस्वी कंसानें चांगल्या कुशल व मेहनती कारागिरांकडून मोठा भव्य असा रंगमंडप तयार करविला. त्या मंडपांतील शेंकडों हजारों मंचांवरून शहरांतील व खेड्यांतील प्रेक्षक मंडळी भरून गेल्यामुळें नक्षत्रांनीं दाटलेल्या आकाशाप्रमाणें तो मंडप शोभत होता. प्रथम भोजराजा त्या समृद्ध व लक्ष्मीयुक्त अशा रंगमंडपांत येऊन विराजमान झाला. त्यामागून कंस हा एकादा पुण्यवान् पुरुष जसा विमानांत बसतो, तसा त्या रंगांत आरूढ झाला. त्या वीर कंसानें बरोबर अनेक शूर वीर व पुष्कळशीं आयुधें देऊन एक भला मस्त हत्ती त्या मंडपाचे दरवाज्यावरच उभा केला. कारण हे राजा, तो कंस जरी मोठा तेजस्वी होता, तरी त्यानें त्या-

[1] ह्या कथा भागवत दशमस्कंधांत पहाव्या.

वेळीं ऐकलें कीं, प्रत्यक्ष चंद्रसूर्यच असे तेजस्वी पुरुषव्याघ्र राम व कृष्ण आपले नगरींत आले आहेत; तेव्हां त्या वेळेपासूनच तो बंदोबस्ताला लागला. रामकृष्णांविषयीं सारखे विचार त्याचे मनांत घोळूं लागल्यामुळें त्याला रात्रीची झोंप देखील येईना. असो.

राम व कृष्ण यांचे कानीं जेव्हां आलें कीं, कंसाकडे आज अप्रतिम समाज जमला आहे, तेव्हां ते दोघेही वीर, व्याघ्रानें गाईचे गोठ्यांत शिरावें, त्याप्रमाणें निःशंक त्या रंगांत शिरले. परंतु, दरवाजाचे तोंडींच त्या पुरुषश्रेष्ठांना रखवालदारांनीं हत्ती घालून अडविलें. त्या वेळीं त्या शत्रुहंत्या दुर्धर्ष बंधूंनीं वरील महातासह त्या हत्तीचा चुराडा करून रंगात प्रवेश केला. नंतर बलराम व कृष्ण या दोघांनीं चाणू व आंध्र यांची कणीक तिंबून तो अत्यंत दुष्ट उग्रसेनपुत्र कंस याला बंधूसह पालथा घातला. हे यादवहो, देवांनांही अवघड असें हें जें यदुसिंहानें कर्म केलें तें करण्याची केशवावांचून दुसऱ्या कोणा पुरुषाची छाती आहे? पूर्वींचे महाशूर जे प्रऱ्हाद, बलि व शंबर, असल्यांचेहि हातीं जी लागली नाहीं ती ही अपार संपत्ति या कृष्णानें तुम्हांसाठीं हस्तगत करून आणिली. यानें मुरुनामक दैत्य तसाच पंचजन यांना पादाक्रांत करून, निसुंद नांवाचा दैत्य पर्वतांचे दरडींत लपून बसला होता त्यास तेथून त्याचे अनुयायांसह उसकून नाहींसा केला. त्याचप्रमाणें भूमिपुत्र नरकासुर वधून शुभकुंडलें आणलीं. आणि केशवानें आपले स्वर्गांतील स्वारींतही मोठा लौकिक मिळविला. याकरितां, हे यादवहो, श्रीकृष्णाचे बाहुबलाचे आश्रयावर शोक व भय यांचे बाधेपासून मुक्त होऊन तुम्हीं आतां नानाप्रकारचे यज्ञ करा; मात्र परस्पर मत्सर करूं नका. या बुद्धिमान् कृष्णानें देवांचीही मोठीच कामगिरी केली आहे. तुमचें कल्याण असो. मी आतां तो इष्ट वृत्तांत सांगतों.

हे यदुश्रेष्ठहो, तुमचें जें कांहीं इष्ट असेल तें मी निरलसपणें करीन. मी सर्वथा आपला आहें. आणि तुम्हीं माझे आहां. इतकेंच नव्हे, पण मी तुमचे आधारावर उभा आहें. याप्रमाणें कृष्णाला संबोधून इंद्र बोलला. आज आपण जसे कृष्णाचे कृतीनें संतुष्ट आहों, त्याचप्रमाणें तो इंद्रही संतुष्ट होऊन त्यानें मला आज येथें पाठविलें आहे. जेथें मर्यादा आहे तेथें लक्ष्मीची वसती असते व लक्ष्मीची वस्ती आहे तेथें विनय राहतो. आणि या महात्म्या कृष्णाचे ठिकाणीं ही ( मर्यादा ) श्री ( लक्ष्मी ) व संनति ( नम्रता ) हीं सर्वच राहतात.

## अध्याय एकशें दुसरा.

—:०:—

### कृष्णप्रताप वर्णन.

नारद पुढें सांगतातः—' यानें मुरुदैत्यानें घातलेले पाश तोडले आणि निसुंद व नरकासुर मारून प्राग्ज्योतिषपुराचा मार्ग पुनरपि निर्भय केला. या शौरीनें आपल्या धनुष्याच्या टणत्कारानें व पांचजन्य शंखाच्या नादानें याची रणांत स्पर्धा करणाऱ्या राजांना घाबरून सोडलें. या वृष्णिपुंगवानें मेघतुल्य दाक्षिणात्य रथसमूहानें परिरक्षित अशा महाबल पराक्रमी रुक्मीला युद्धांत जिंकून झट्दिशीं त्याची बहीण रुक्मिणी हरून आणली. नंतर ह्या शंखचक्रगदाखड्गधारी कृष्णानें सूर्याप्रमाणे तेजस्वी व मेघाप्रमाणें घडघड करणाऱ्या अशा आपल्या रथांत भोजमाहिषी घालून आणिली. जारुथ्यैंत आव्हृति, क्राथ व शिशुपाल यांस जिंकिलें. वक्रदंताचा भाचा वक्र त्याचप्रमाणें ससैन्य शतधन्वा यांसही

जिंकलें. तसेंच कोपानें इंद्रप्रद्युम्न व कशेरूमान यवन मारिला. त्याचप्रमाणें पुंडरीकाक्ष पुरुषोत्तमानें आपल्या चक्राचे योगानें सहस्त्र पर्वतांची धूळ उडवून देऊन त्यांचे आश्रयानें राहिलेल्या द्रुमसेनाला ठार केलें. महेंद्रशिखरावर निमेषाचे अवकाशांत संचार करणारे असे रावणाचे अनुचर होते ते पराक्रमी कृष्णानें मारिले. त्याचप्रमाणें हरावती नगरींत गोपति व तालकेंडी नांवाचे महाभोज युद्धांत सूर्य किंवा अग्नि यांप्रमाणें तेजस्वी असे होते. त्यांस या शार्ङ्गधन्वा कृष्णानें मारिलें. अक्ष प्रपातन नामक स्थळीं हंस[1] व डिंभक नांवाचे दोन दानव होते. त्या दोघांचाही कृष्णानें त्यांच्या अनुचरांसह निःपात केला. या महात्म्या केशवानें वाराणशी नगरी जाळून तिचा राजा[2] त्याचें राष्ट्र व अनुयायी यांसह लयास लाविला. नतपर्व अशा बाणांनीं मयास जिंकून या अद्भुत कर्म करणाऱ्या कृष्णानें ऐंद्रसेनीला पकडून आणलें. सागरामध्यें सर्व जलचर प्राण्यांसह राहणारा महाबलाढ्य जो वरुण तोही या कृष्णानें लोहित नामक पर्वताचे शिखरावर जिंकला. याचप्रमाणें देवेंद्राचे भवनास जाऊन मोठमोठ्या देवांनीं ज्याचें रक्षण केलें होतें असला पारिजात वृक्ष देवेंद्राला न जुमानतां यानें आणला. या जनार्दनानें पांड्य, पौंड्र, कलिंग, मात्स्य त्याचप्रमाणें वङ्गराज हे सर्व एकत्र जमले असतां पार केले. या वीरांनीं पराक्रमी राजांचीं एक शंभरी रणांत मारून दिसण्यांत सुंदर अशी राणी गांधारी घेऊन आला. त्याचप्रमाणें कुंती ज्याला विशेष मान देत असे अशा ह्या मधुसूदनानें भरतश्रेष्ठ जो गांडीवधन्वा अर्जुन त्याला खेळतां खेळतां जय मिळवून दिला. त्याचप्रमाणें संग्रामांत एकत्र जुळलेले द्रोण, द्रौणी, कृत, कर्ण, भीष्म व दुर्योधन यांस या पुरुषोत्तमानेंच जिंकलें. अर्जुन निमित्तमात्र होता. अर्जुनाचें कल्याण इच्छिणाऱ्या ह्या शंख, चक्र, गदा, खड्ग धारण करणाऱ्या प्रभूनें सौवीरपतीची कन्या बलात्कारानें हरण केली. वेणुदारीचे निमित्तानें अश्व, रथ, कुंजर, यांसह सर्वही पृथ्वी उलथी पालथी झाली असतां या पुरुषोत्तमानें मोठ्या यत्नानें ती हस्तगत केली. या माधवानें वामनावतारीं बल, ओज व तपस्तेज हीं एकत्र करून बलि दानवापासून त्रिभुवन हरण केलें. प्राग्ज्योतिषपुरांत दानव याला वज्र, अशनि, गदा, खड्ग वगैरे आयुधांनीं त्रासवीत होते तरी याचे हातचा मृत्यु त्यांना मिळाला नाहीं. बलीचा महावीर्यशाली व धनाढ्य पुत्र बाण हा त्याचे अनुयायांसह कृष्णानें पराभूत केला. या महाबाहु जनार्दनानें कंसाचा अमात्य पीठ व पैठिक असिलोमा यांस मारिलें. मनुष्यरूप धारण करणारा विरूप व जृंभ ऐरावत याला या महायशस्वी पुरुषव्याघ्रानें मारिलें. त्याचप्रमाणें या कमलाक्षानें महातेजस्वी नागाधिपती जो कालीय त्याला यमुनाजलांत जिंकून समुद्रांत पाठविलें. या पराक्रमी हरीनें सूर्यपुत्र यमाला जिंकून आपला गुरु सांदीपनी याचा मृतपुत्र आणून दिला. हे राजा, यावरून दिसून येईल कीं, जे कोणी दुरात्मे देव व ब्राह्मणांचा द्वेष करीत असतात त्यांना हा महाबाहु कृष्ण शासन करितो. इंद्राचे प्रीत्यर्थ यानें भूमिपुत्र नरकासुर यास मारून त्याजवळचीं मणिमय कुंडलें आणून देवमाता अदिति हिला अर्पण केलीं. एतावता देव, दैत्य, सुर व ब्राह्मण यांस भय किंवा अभय देणारा हा सर्वलोकेश्वर विभु कृष्णच आहे. हा

[1] हे दोघेही भाऊ जरासंधाचे प्रधान होते.

[2] हा पौंड्रक वासुदेव याचा मित्र असून त्याचे साह्यार्थ कृष्णाशीं लढावयास आला होता. ( भागवत दशम स्कंध अध्याय ६६ वा पहा. )

मनुष्यांत धर्माची स्थापना करून विपुल दक्षिणांनीं युक्त असे यज्ञ करून व देवमंडळींचें पुष्कळसें हित करून पुनरपि स्वस्थानाला जाईल. हा महाकीर्ति कृष्ण हृषीकेशापर्यंत पसरलेला व नागनगरी जी भोगावती तिजप्रमाणें रमणीय अशी जी द्वारकानगरी आपलीशी करून व ती अनेक रत्नांनीं भरून शेंकडों मंदिरें व यज्ञस्तंभ यांनीं चिन्हित करून अखेर तिजवरील काननांसह वरुणाचें वसतिगृह जो समुद्र त्यांत घालविला. आणि कृष्णाचा अभिप्राय ओळखणारा समुद्र ती सूर्यभवनाप्रमाणें प्रकाशमान् अशी नगरी वासुदेवानें सोडतांच बुडवून टाकली. कारण, या मधुसूदनावांचून असल्या द्वारकावती नगरींत वसती करूं शकेल असा सुर, असुर व मनुष्य यांत आजपर्यंत कोणी झाला नाहीं व होणार नाहीं. याप्रमाणें हा दाशार्हांचें कार्य उत्तम प्रकारें करून हाच स्वतः नारायण, विष्णु, सोम व सूर्यरूपानें असणार आहे. हा अप्रमेय, अचिंत्य, कामचारी व जितेंद्रिय असून बालक ज्याप्रमाणें क्रीडनकांनीं खेळत असतो त्याप्रमाणें भूतांशीं सर्वदा खेळत असतो. ह्या महाबाहु मधुसूदनाचें सम्यक् ज्ञान होणें अशक्य आहे. या विश्वरूपी नारायणाहून पर आणि अपर कांहींच नाहीं. आजपर्यंत याचे कर्मांचा वृत्तांत शेंकडोंदां हजारोंदां ऐकला आहे. तथापि याचे कर्मांची गणती संपली असें मात्र केव्हांही कोणीही पाहिलें नाहीं. असो.

याप्रकारें बलरामाचे सहाय्यानें या पुंडरीकाक्षानें पोरपणीं पोरांत बसून असलीं कर्मे केलीं. असें पूर्वकल्पींच्या व्यासानें सांगितलें आहे. कारण, त्या महाबुद्धि योगी व्यासानें आपल्या तपोबलयुक्त ज्ञानचक्षूनें हें सर्व प्रत्यक्ष पाहिलें. वैशंपायन सांगतात, याप्रकारें इंद्राचे सांगण्यावरून त्या यादव मंडळींत श्रीकृष्णाचें स्तोत्र करून यादवांनीं पूजा केल्यावर नारदमुनी पुनरपि स्वर्गास गेले. नंतर पुंडरीकाक्ष मधुसूदन गोविंदानें तें सभास्थानीं आणून ठेविलेलें द्रव्य अंधक व वृष्णि यांस यथान्याय वांटून दिलें. मग त्या महात्म्या यादवांनीं तें धन हातीं येतांच विपुल दक्षिणायुक्त यथाविधि यज्ञ करून त्या द्वारकानगरींतच वसती केली.

## अध्याय एकशें तिसरा.

—:०:—

### कृष्णाची संतति.

जनमेजय म्हणालाः—कृष्णाच्या अनेक सहस्रस्त्रियांपैकीं आठ भार्यांचें विशेष वर्णन आहे. त्या अर्थीं त्या आठजणींचीं अपत्यें आपण मला सांगा.

वैशंपायन सांगतातः—त्याच्या या आठहि राण्या पुत्रवती होत्या. म्हणून मुख्यत्वेंकरून त्यांचेंच वर्णन केलें आहे. त्या सगळ्या वीरसू होत्या. त्यांचीं अपत्यें मी सांगतों, तीं ऐक. रुक्मिणी[1], सत्यभामा, देवी नाग्नजिती, शैब्या सुदत्ता, सुंदर हास्य करणारी लक्ष्मणा, मित्रविंदा कालिंदी, पौखी जांबवती, व माद्री सुभीमा, अशा आठ भार्या होत्या. त्यांतील रुक्मिणीचे पुत्र ऐक. शंबराचा नाशकर्ता प्रद्युम्न प्रथम झाला. वृष्णिसिंह महारथ चारुदेष्ण, चारुभद्र, चारुगर्भ, सुदेष्ण, द्रुम, सुषेण, व ( वीर्यवान् ) चारुविंद, शेवटचा धाकटा चारुबाहु, व कन्या चारुमती. सत्यभामेच्या ठायीं भानु, भीमरथ, रोहित, दीप्तिमान्, ताम्रजाक्ष व जालांतक असे

१ येथें दिलेलीं कृष्णाचे अष्टनायिकांचीं व त्यांचे अपत्यांचीं नांवें हीं भागवताशीं सर्वांशीं जुळत नाहींत (भाग० स्कं. १० अ० ६१।८३ पहा ) एकावाक्यतेचा यत्न सर्वथा सफल होत नाहीं म्हणून सोडून दिला आहे. मन्मथनाथ दत्तांनीं तर बारा नांवें केलीं आहेत !

पुत्र व भानुकन्या, भीमनिका, ताम्रपर्णी, जलंधमा, अशा त्यांच्या चार बहिणी गरुडध्वजापासून झाल्या. जांबवतीचा पुत्र संग्रामांत शोभणारा सांब होय. मित्रवन्, मित्रविंद, मित्रवती कन्या ( याशिवाय ) मित्रबाहु व सुनीथ असे तिचे आणखी पुत्र होते. आतां नाग्नजितीची प्रजा ऐक. भद्रकार, भद्रविंद, व कन्या भद्रवती सुदत्ता-शैब्येच्या ठायीं संग्रामजित् झाला. सत्यजित्, सेनाजित्, व शूर सपत्नजित्, हेही सुदत्तेचेच पुत्र होते. माद्री सुभीमेचे पुत्र वृकाश्व, वृकनिर्वृति, कुमार, व वृकदीप्ति असे होते. लक्ष्मणेची प्रजा ऐक. गात्रवान्, गात्रगुप्त व वीर्यवान् गात्रविंद, असे तीन पुत्र मात्रवती नांवाच्या कनिष्ठ भगिनीसह तिला झाले. कालिंदीला श्रुतसंमत अश्रुत पुत्र झाला होता. पण, मधुसूदनानें तो श्रुतसेनेला दिला. त्याला देऊन आनंदित झालेला हृषीकेश त्या भार्येला म्हणाला, " हा तुह्मां उभयतांचा पुत्र दीर्घकाल राहो." शैब्य बृहतीचे ठायीं गदापासून अंगद पुत्र झाला. तसाच, कुमुद, श्वेत व श्वेता कन्या झाली. अगावह, सुमित्र, शुचि, चित्ररथ, चित्रसेन, सुदेवेची चित्रा, चित्रवती, वनस्तंब, व स्तंबवन, निवासन, वनस्तंबा, स्तंबवती कन्या, उपसन्न, शंकु, वज्राशु, क्षिप्र, इत्यादि पुत्र कौशिकी व श्रुतसोमा यांच्या ठायीं झाले. यौधिष्ठिरीच्या ठायीं युधिष्ठिर, कपाली व गरुड हे चित्रयुद्ध करणारे झाले. अशा प्रकारचे हजारों पुत्र तूं मजपासून ऐक. वासुदेवाचे दहा अयुत ह्मणजे जे एक लक्ष पुत्र सांगितले आहेत, त्यांतील आठ अयुतपुत्र शूर व रणपटु होते.

मीं ही जनार्दनाची संतति सांगितली. प्रद्युम्नाला वैदर्भीच्या ठायीं अनिरुद्ध पुत्र झाला. हे राजा, तो संग्रामांत कोठेंही रुद्ध न होणारा होता. रेवतीच्या ठायीं बळरामाला निशठ व उल्मुक हे पुत्र झाले. ते दोघे भ्राते देवासारखे व उत्तम पुरुष होते. वसुदेवास सुतनु व सुतारा अशा ज्या दोन स्त्रिया होत्या त्यांपासून पौंड्र व कपिल असे दोन पुत्र वसुदेवास झाले. तारेच्या ठायीं कपिल[1] झाला व सुतनूपासून पौंड्र झाला. त्या दोघांतील पौंड्र राजा झाला व कपिल वनाला गेला. शूद्रा स्त्रीच्या ठायीं वसुदेवापासून जरा नामक शूर पुत्र झाला. तो सर्व धनुर्धर निषादांचा मुख्य होता. काश्येच्या ठायीं सांबापासून वेगवान् सुपार्श्व पुत्र झाला. अनिरुद्धाला सानु झाला. सानूपासून वज्र झाला. वज्रापासून अप्रतिरथ झाला, त्याचा पुत्र सुचारु. कनिष्ठ वृष्णिनंदन अनमित्रापासून शिनि झाला. शिनीपासून सत्यवाक् व महारथ सत्यक झाला. सत्यकाचा पुत्र शूर युयुधान होय. युयुधानाचा असंग, असंगाचा पुत्र मणि व मणीचा पुत्र युगंधर होय. याप्रमाणें हा वंश समाप्त होतो.

## अध्याय एकशें चौथा.

—:o:—

### प्रद्युम्नहरण.

जनमेजय म्हणालाः—तुम्हीं पूर्वीं ज्याचा 'शंबराचा नाशकर्ता' असा उल्लेख केला आहे, त्या प्रद्युम्नानें शंबराला कसें मारलें तें मला सांगा.

वैशंपायन सांगतातः—व्रत धरून राहिलेला जो काम तो कृष्णापासून त्याची लक्ष्मीरूपिणी स्त्री जी रुक्मिणी तिचे ठायीं केवळ मदनमूर्तिच असा प्रद्युम्नःनांवानें उत्पन्न झाला. यालाच पुराणांतून "सनत्कुमार" या संज्ञेनें वर्णिलें आहे. त्या कृष्णपुत्रास जन्मून

[1] भागवतांत ( स्कं० १० अ० ८४ ) पौंड्र व कपिल हे दोघेहि सुतनूचेच पुत्र म्हटले आहेत.

सात दिवस पूर्ण झाले तोंच कालशंबरानें मध्यरात्रीं सूतिकागृहांतून शिशुपणींच हरण केलें. देवमायेचें अनुसरण करणाऱ्या कृष्णाला तें सर्व कळलें होतें. पण त्यानें त्या रणमत्त दानवाचा प्रतीकार केला नाहीं. त्या महासुराचें आयुष्य मृत्यूनें ग्राशिलें असल्यामुळें त्यानें मायेनें त्या शिशूस हरण करून दोन्ही हातांनीं उचलून आपले नगरास नेलें. त्या असुराची रूपगुणान्वित व प्रत्यक्ष मायेसारखी मोहक 'मायावती' नांवाची भार्या संतानरहित होती. तिला त्यानें तो कृष्णपुत्र जणूं काय आपल्याच पुत्राप्रमाणें दिला. आपल्या मायिनी स्त्रीस हा पुत्र देण्याची बुद्धि त्या असुराला केवळ कालप्रेरणेनेंच झाली. शिशु पाहून मायावतीला हर्ष झाला. तिच्या अंगावर रोमांच उठले व तिनें हर्षानें पुनः पुनः त्याच्याकडे पाहिलें. त्याला निरखून पहात असतां तिला पूर्वीचें स्मरण झालें कीं, हा आपला प्रियकर होता. हें स्मरण होतांच, ती मनांत चिंतन करूं लागली कीं, ज्याच्याकरितां मी अहोरात्र चिंतेच्या व शोकाच्या समुद्रांत बुडलें आहें, ज्यावांचून कोठेंही सुख प्राप्त होत नाहीं, तो हा माझा भर्ता नाथ आहे. यापासून देवाधिदेव शूलधारी त्रिनेत्रास पूर्वी क्लेश झाल्यामुळें त्यानें त्याला अनंग (देहरहित) केलें होतें. तोच आज दुसरा जन्म घेऊन येथें आलेला मी पहात आहें. आतां मी याला ओळखीत असतांना याला आईच्या भावनेनें स्तन कसा देऊं? व हा माझा भर्ता आणि मी त्याची भार्या असें असतां मी याला 'पुत्र' म्हणून कसें बोलूं? असा मनाशीं विचार करून तिनें त्याला दायीच्या स्वाधीन केलें. आणि रसायनप्रयोगानें त्याला शीघ्र बाढविलें. तो अज्ञान रुक्मिणीपुत्र दायीचे बोलीवरून मायावतीला आपली आईच असें समजूं लागला. तिनें त्या कमलनयन कृष्णपुत्राला लहानाचें मोठें केलें. व काममोहित होऊन त्याला सर्व दानवांच्या कपटविद्या शिकविल्या. तो मदनपुतळा प्रद्युम्न जेव्हां ज्वानींत येऊन स्त्रियांचें इष्ट पुरविण्यास समर्थ व सर्वास्त्रप्रवीण झाला, तेव्हां ती मायावती कामयुक्त होऊन हा आपला कांत असावा अशी इच्छा करूं लागली. तिनें दृष्टींत गूढ अभिप्राय दाखवून त्याकडे पाहून हंसावें व ( अशा प्रकारें ) त्याचा लोभ ओढून घ्यावा ( असें चालविलें. ) तेव्हां सुंदर हास्य करणाऱ्या व आपले ठायीं आसक्त झालेल्या त्या राणीस तो बोलला.

प्रद्युम्न म्हणालाः—"आईचें नातें सोडून तूं अशी भलतीच काय वागतेस ? याला काय म्हणावें ? तूं दुष्ट स्वभावाची आहेस. तूं स्त्रीजातच पडलीस त्यामुळें तुझें मन चंचल होत आहे. आणि म्हणूनच मजविषयीं पुत्राची भावना टाकून देऊन मजवर आषक झाली आहेस. पण हे सौम्ये, मी तुझा पुत्र आहें. ( हें लक्षांत आण ) सांप्रत तूं हा केवढा तरी शीलभ्रंश करूं पहात आहेस. हे देवी, काय असेल तें तूं खरें सांगावेंस अशी माझी इच्छा आहे. कोण हा विलक्षग प्रकार. खरोखर स्त्रियांचा स्वभाव विजेच्या चमकण्याप्रमाणें चंचल आहे. मेघ जसे गिरिशिखरावर आसक्त होतात, तद्वत् स्त्रिया पुरुषावर आसक्त होतात. हे सौम्ये, मी तुझा पुत्र आहें, किंवा हे शुभे, मी तुझा औरस नाहीं, हें तूं मला खरें सांगावेंस असें मी इच्छितों. हें तूं मनांत काय आणिलें आहेस ? " कामानें असें पुसतांच ती भीरु इंद्रियें विव्हल होऊन एकांतांत केशवपुत्राला प्रिय वचन बोलली. 'हे कांता, तूं माझा पुत्र नव्हेस व शंबर तुझा पिताही नव्हे. तूं रूपवान् व पराक्रमी आहेस. तूं जातीनें यादव आहेस. तूं रुक्मि-

णीचा आनंद वाढविणारा असा वासुदेवाचा पुत्र आहेस. तूं अगदीं लहान ह्मणजे केवळ सात दिवसांचा असून सूतिकागृहांतून फड-क्यावर उताणा पडलेला असतांना तुला आणलें आहे. बल व वीर्य यांनीं प्रेरित झालेल्या माझ्या भर्त्यानें तुझ्या पित्याचें ( वासुदेवाचें ) घर फोडून तुला हरण करून आणलें आहे. तूं इंद्रतुल्य वासुदेवाचा पुत्र असतां शंबरानें तुझें हरण केलें. वीरा, ती तुझी माता दीन होऊन तुज बालकाकरितां शोक करीत वत्सरहित गायीप्रमाणें अत्यंत संतप्त होत असते. तुझा तो पिता कृष्ण इंद्रा-हूनही श्रेष्ठ आहे. तुला अगदीं लहानपणींच पळवून आणिलें आहे, हें त्याला माहीत नाहीं. हे कांता, एतावता, तूं वृष्णिकुमार आहेस. शंबरात्मज नव्हेस. हे वीरा, असले सुंदर पुत्र दानवांना होत नसतात. आणि म्हणूनच माझें तुजवर मन गेलें आहे. तुला मी जन्म दिला नाहीं. तुझें रूप पाहून मी हृदयांत अति दुःखी होतें. व माझें कांहीं चालत नाहीं. यासाठीं, हे सुंदरा, मीं जो कांहीं निर्धार केला आहे, व माझे हृदयांत जो विषय घोळत आहे त्याबद्दल तूं कांहीं तरी सोय काढली पाहिजेस. हा जो माझे मनांत खरा खरा भाव होता तो मीं तुला उघड सांगितला आहे व तूं माझा पुत्र नव्हेस, शंबराचाही नव्हेस, हें कसें तेंही तुला सांगितलें आहे.

मायावतीचें हें सर्व भाषण ऐकून क्रुद्ध झालेल्या चक्रपाणीच्या पुत्रानें शंबरास आव्हान केलें. व सर्व मायांमध्यें निष्णात असलेल्या प्रद्युम्नानें आपलें नांव शंबरास ऐकवून म्हटलें 'हंः! दुष्टात्मा दानव श्रीकृष्णाच्या बालपुत्रास निर्भय हरण करतो काय? बरें आहे म्हणावें, मी आज त्याला भय उत्पन्न करितों. पण याला क्रोध कसा यावा? मी याला कोणत्या उपायानें मारूं? प्रथम मीं काय करावें म्हणजे हा मंदबुद्धि रागावेल? सिंहकेतूनें विभूषित असा याचा विचित्र ध्वज आहे. तो बहिर्द्वा-रावर उंच मेरुश्रृंगाप्रमाणें उभारला आहे. त्याला या पाजळलेल्या बाणानें मी मोडून पाडतों. म्हणजे ध्वज तुटल्याचें ऐकून शंबर बाहेर पडेल. त्यानंतर त्याला युद्धानें संग्रा-मांत मारून द्वारकेस जाईन. असा निश्चय करून त्यानें स्वसामर्थ्यानें सशर धनुष्य सज्ज केलें. व महाभुज शंबराचा तो सुंदर ध्वज मोडला. महात्म्या प्रद्युम्नानें ध्वज तोडला आहे, असें ऐकून रागावलेल्या काल-शंबरानें आपल्या पुत्रांस आज्ञा केली कीं, 'हे महावीरहो, त्वरा करून या रुक्मिणीपुत्रास मारून टाका. माझें अप्रिय करणाऱ्या याला मी पाहूं इच्छित नाहीं.' शंबराचें हें वाक्य ऐकून शंबराचे पुत्र सज्ज व हृष्ट होऊन प्रद्युम्नवध करण्याच्या इच्छेनें निघाले. चित्रसेन, अतिसेन, विष्वक्सेन, गद, श्रुतसेन, सुषेण, सोमसेन, मन, सेनानी, सैन्यहंता, सेनाहा, सैनिक, सेनस्कंध, अतिसेन, सेनक, जनक, सुत, सकाल, विकल, शान्त, विभुशांतांतकर, कुंभकेतु, सुदंष्ट्र, केशि इत्यादि शंभरपुत्र, चक्र, तोमर, शूल, पट्टे व परशु घेऊन क्रोधानें नखशिखांत भरून जाऊन मोठ्या उत्साहानें बाहेर पडले. व युद्धार्थ आह्वान करणाऱ्या शत्रूच्या समोर रणांगणांत उभे राहिले. महाबाहु प्रद्युम्नही सत्वर रथारूढ होऊन व धनुष्य घेऊन संग्रामास निघाला. नंतर शंबराच्या पुत्रांचें केशवाच्या पुत्राशीं तुमुल व रोमांच आणणारें युद्ध सुरू झालें. नंतर देवेंद्रास पुढें करून गंधर्व, महोरग, व चारण यांसह विमानांत येऊन बसले. नारद, तुंबुरु, हाहा, हुहु गंधर्व इत्यादि सर्व अप्सरां-

सह तेथें आले. त्या वज्रधर देवेंद्राचा द्वारपालनकर्ता गंधर्व त्याला तेथील अद्भुत युद्धप्रकार सांगूं लागला. तो म्हणाला, शंबराचे पुत्र शंभर व कृष्णाचा पुत्र एक. तेव्हां अनेकांशीं युद्ध करणाऱ्या याला विजय कसा प्राप्त होईल? तें त्याचें भाषण ऐकून इंद्र हंसून ह्मणाला, याचा पराक्रम किती आहे तो ऐक. हा पूर्वजन्मीं शंकराच्या क्रोधाग्नीनें जळून गेलेला कामच आहे. याची पत्नी हिनें त्रिलोचन देवास प्रसन्न केलें. तेव्हां अतिशय संतुष्ट होऊन शंकरानें तिला वर दिला की, ‘ विष्णु द्वारकेंत मानुषदेहवान् होईल; तेव्हां हा कामच त्याचे पोटीं पुत्ररूपानें निःसंशय येईल. अनंग या नांवानें त्रैलोक्यांत प्रसिद्ध असलेला तो महायशस्वी व महातेजस्वी तेथें उत्पन्न होऊन शंबरास मारील. तो जन्मास येऊन सात दिवस होत आहेत, तोंच रुक्मिणीच्या कुशींत निजलेल्या प्रद्युम्नास मायेचा आश्रय करून शंबरासुर नेईल. यास्तव, तूं शंबरगृहास जा व त्याची मायावती भार्या हो. मायारूपानें गुप्त राहून शंबरास तूं मोहित करशील. तेथें तूं आपल्या बालरूपी कांताला वाढीव ह्मणजे तो तारुण्यांत येतांच शंबराला मारील. नंतर तो अनंग तुझ्यासह द्वारकेस जाईल. व पार्वतीशीं जसा मी रममाण होत आहें तसा तो तुझ्याशीं रममाण होईल. असें सांगून तो देवेश पुरुषोत्तम मेरूसारख्या सिद्धचारणसेवित कैलासाला गेला. नंतर रति ही देवदेव उमापतीस प्रणाम करून योग्य कालाची प्रतीक्षा करीत शंबरगृहीं जाऊन राहिली. या पूर्वइतिहासावरून पाहतां हा एकटाच महाबाहु प्रद्युम्न दुरात्म्या शंबरास सपुत्र मारील.

# अध्याय एकशें पांचवा.

—:०:—

## प्रद्युम्नाचा पराक्रम.

वैशंपायन सांगतातः—शंबराचे पुत्र व रुक्मिणीनंदन यांचें तुंबळ व भयंकर युद्ध सुरू झालें. महादैत्यांनीं मोठ्या क्रोधानें व वेगानें प्रद्युम्नावर एकाच वेळीं शर, शक्ति, परशु, चक्र तोमर, भाले, भुशुंडी, मुसळें, इत्यादि आयुधें फेंकलीं. तेव्हां प्रद्युम्नानेंही क्रोधास चढून सर्व प्रकारचीं अस्त्रें फेंकण्यास समर्थ अशा आपल्या धनुष्यापासून पांच पांच बाण सोडून शत्रूकडील एकएक आयुध तोडून टाकिलें. तेव्हां पुनरपि क्रोधास चढून ते असुर प्रद्युम्नाला मारावयाचाच, अशा निश्चयानें त्याजवर बाणवर्षाव करूं लागले. तेव्हां चवताळलेल्या प्रद्युम्नानें धनुष्य घेऊन मोठ्या त्वरेनें शंबराच्या दहा महाबल पुत्रांस सत्वर मारिलें. कुपित केशवपुत्रानें दुसऱ्या एका बाणानें तत्काल चित्रसेनाचें मस्तक तोडलें. तेव्हां बाकी राहिलेले सर्व शंबरपुत्र जमून युद्ध करूं लागले. आणि बाणांचा पाऊस पाडीत ते त्यास मारण्याकरितां धांवले. ते रणोत्सुक होऊन धनुष्याला बाण जोडून पटापट सोडीत असतां त्या महातेजस्वी प्रद्युम्नानें खेळत खेळतच त्यांचीं मस्तकें तोडून पाडलीं. याप्रमाणें त्या शंभर उत्तम धनुर्धरांस समरांत मारून आणखी कोणी युद्धास येतो काय म्हणून वाट पहात प्रद्युम्न समरांगणांत उभा राहिला. तिकडे शंभर पुत्र मेले असें ऐकून शंबर अतिशय कोपाविष्ट झाला. व ‘ माझा रथ जोड ’ अशी त्यानें आपल्या सारथ्यास आज्ञा केली. राजाचें तें वाक्य ऐकून भूमीस मस्तक लावून त्यास प्रणाम करून सारथ्यानें शांतपणें सैन्यासह रथ काढिला. त्याला एक सहस्र ऋष्य नां-

वाचे पशू जोडले होते. व त्याच्यावर वासुकीचा ध्वज होता. तो व्याघ्राच्या चामड्यानें मढविलेला होता. क्षुद्रघंटांच्या माळा त्याच्यावर लाविल्या होत्या. त्यावर लांडग्यांच्या चित्रांच्या दहा रांगा होत्या. त्याचें सर्व अंग ताराचित्रांनीं आच्छादित झालें होतें. त्याचें जूं सोन्याचें असल्यानें तो सुंदर दिसत होता. शोभिवंत पताकांच्या योगानें तो मोठा उंच दिसत होता. सिंहाचा उग्र ध्वज त्यावर फडकत होता. त्याचा वरूथ ( रथावरील खोळ ) अगदीं खुला होता. त्याची ईषा ( दांडा ) लोखंडाची व कुबर ( जूं ) वज्रासारखा दृढ होता. मंदरपर्वताप्रमाणें त्याचें शिखर उंच होतें. तो सुंदर चामरांनीं भूषित झाला होता. सर्वत्र नक्षत्रमालांनीं आच्छादित असून सुवर्णदंडाच्या योगानें तो रम्य दिसत होता.

अशा त्या भव्य व शोभिवंत रथावर शंबर आरूढ झाला. सोन्याची वेलबुट्टी काढलेलें धनुष्य व तसेच बाण घेऊन मृत्यूनें ज्याला प्रेरणा केली आहे असा तो दानव, युद्धेच्छेनें निघाला. तो दुर्धर, केतुमाली, शत्रुहंता व प्रमर्दन या चार सचिवांसह मोठ्या सैन्यानें परिवेष्टित होऊन युद्धेच्छेनें रणांत जावयास निघाला, त्या वेळीं दशसहस्र हत्ती, दोनशें रथ, आठ सहस्र घोडे व दशलक्ष पायदळ, इतकें सैन्य त्याचेबरोबर होतें.

पण तो निघाला असतां पुष्कळ उत्पात झाले. आकाशांत गिधाडांची गर्दी जमली. व काळेकुट्ट ढग भयंकर गडगडाट करूं लागले. हे राजा, त्या वेळीं विजा पडल्या. भालू जणूं काय सेनेचा क्षय सुचवीतच अमंगल ध्वनी करूं लागल्या. दानवांचें रक्त पिण्याचे इच्छेनें गृध्र ध्वजाच्या मस्तकावर झांपा टाकूं लागला. रथाच्या अग्रभागीं पडलेलें शंबराचें कबंध (धड) भूमीवर दिसूं लागलें. पक्षी शंबराच्या रथावर "चीवीकूची" अशा प्रकारचे विकृत स्वर काढूं लागले. सूर्य राहुग्रस्त होऊन त्याभोंवतीं खळें पडलें. भय सुचविणारा त्याचा सव्य नेत्र स्फुरण पावूं लागला. डावा बाहु कांपूं लागला. रथाचे घोडे अडखळूं लागले. त्या देवशत्रु शंबराच्या डोक्यावर कावळा बसला. बारीक अग्निकणांनीं मिश्रित झालेल्या रक्ताचा वर्षाव इंद्र करूं लागला. रणांगणांत सहस्रावधि उल्का पडल्या. घोड्यांस हांकणाऱ्या सारथ्याच्या हातांतून चाबूक खालीं पडला.

पण या झालेल्या उत्पातांस न मोजतां प्रद्युम्नाच्या वधाच्या इच्छेनें रागावलेला शंबर युद्धार्थ बाहेर गेला. भेरी, मृदंग, शंख, पणव, आनक, दुंदुभि इत्यादि वाद्यें एकदम वाजविल्यानें त्या ध्वनीनें पृथ्वी कंपायमान झाली व त्या मोठ्या शब्दाच्या योगानें भयभीत झालेले मृगपक्षी त्या प्रदेशांतून सर्वतः उडून जाऊं लागले. त्यांचें चित्त भयानें विव्हल झालें होतें. इकडे कृष्णपुत्र शत्रूच्या मरणाचा विचार करीत रणामध्यें स्थित होता. तों इतक्यांत असंख्य सैन्यांनीं वेढलेल्या व युद्धार्थ निश्चित झालेल्या क्रुद्ध शंबरानें सहस्र बाणांनीं प्रद्युम्नास ताडन केलें. पण कुशल प्रद्युम्नानें आपल्यावर फेंकलेले ते बाण तोडून टाकिले. उलट त्यानेंही धनुष्य घेऊन शरवृष्टि केली. त्यामुळें त्या सैन्यांत बाणानें विद्ध न झालेला कोणी उरला नाहीं. प्रद्युम्नाच्या शरपातानें तें सैन्य विमुख केलें. तेव्हां भ्याल्याप्रमाणें होऊन तें सैन्य रण सोडून शंबराच्या समीप उभें राहिलें. आपलें सैन्य पळून आलें असें पाहून क्रोधानें विचारशून्य झालेल्या दानवेश्वर शंबरानें आपल्या सचिवांस आज्ञा केली कीं, "माझ्या आज्ञेनें तुम्ही जा व शत्रूच्या पुत्रावर प्रहर करा. या शत्रूची उपेक्षा करूं नये; तर त्याला सत्वर मारावें. कारण तसें न केल्यास उपेक्षा केलेल्या व्याधीं-

प्रमाणें खचित हा माझ्या शरीराचा नाश करील. यास्तव, माझें प्रिय करण्याच्या इच्छेनें या माझे शत्रूस मारा" राजाची ती आज्ञा शिरसा मान्य करून ते सचिव रागानें शरवर्षाव करीत आपल्या रथांस प्रेरणा करते झाले. तेव्हां त्यांस रणांत सामोरे येतांना पाहून प्रद्युम्न रागावला व धनुष्य उचलून धैर्यानें तो बळी त्यांच्या सन्मुख उभा राहिला. त्या महातेजस्वी व अति क्रोधी रुक्मिणीच्या पुत्रानें नतपर्व अशा पंचवीस बाणांनीं दुर्धरास, त्रेसष्ट बाणांनीं केतुमालीस, सत्तर बाणांनीं शत्रुहंत्यास व ऐशीं बाणांनीं प्रमर्दनास वेध केला. तेव्हां ते क्रुद्ध झालेले सचिव प्रद्युम्नावर बाणवृष्टि करूं लागले. प्रत्येकानें साठ साठ बाणांनीं त्याला वेध केला. पण मकरध्वजानें ते बाण जवळ येण्यापूर्वीं तोडून टाकले. त्यानंतर अर्धचंद्रबाण घेऊन त्यानें दुर्धराच्या सारथ्यास सर्व राजांच्या व सैनिकांच्या समक्ष मारलें. नंतर, कंकपत्रांनीं भूषित केलेल्या चांगल्या पर्वयुक्त चार बाणांनीं दुर्धराच्या रथास जोडलेल्या चार अश्वांस मारलें. एका बाणानें जूं, एका बाणानें सुंदर ध्वज, साठ बाणांनीं रथाचे कणे व चाकांचे अरे मकरध्वजानें तोडले. नंतर, कंकपत्रांनीं भूषित केलेल्या व पाजळलेल्या दुसऱ्या एका बाणास हातांत घेऊन त्यानें तो त्या परान्नभक्षक अशा दुर्धराच्या हृदयावर सोडला. तेव्हां तो गतप्राण, गतश्री, गतसत्व, व गतप्रथ होऊन ज्याचें पुण्य क्षीण झालें आहे अशा [१]ग्रहाप्रमाणें रथांतून खालीं पडला.

याप्रमाणें दानवेश्वर शूर दानव दुर्धर मेला असतां केतुमाली शरवर्षाव सोडीत कृष्णपुत्रावर धांवला. प्रद्युम्नावर चालून येत असतांना रागांत भोंवया मोडल्यानें त्याचें मुख भयंकर दिसत होतें. तो त्यास एकाएकीं "थांब थांब," असें म्हणाला. मेघ जसा वर्षाऋतूंत जलधारांनीं पर्वतावर वृष्टि करतो त्याप्रमाणें अति क्रुद्ध झालेल्या कृष्णपुत्रानें त्याच्यावर बाणवृष्टि केली. तेव्हां धनुर्धर प्रद्युम्नानें आपणास वेध केला, असें पाहून तो शंबराचा अमात्य प्रद्युम्नाच्या वधाच्या इच्छेनें चक्र घेऊन फेंकता झाला. कृष्णाच्या चक्राप्रमाणें ज्याची कांति आहे असें आलेलें तें चक्र पाहून प्रद्युम्नानें खालीं पडून व मध्येंच उडी मारून तें पकडून त्याच्या योगानेंच केतुमालीचें मस्तक कापलें. रुक्मिणीपुत्राचें तें अद्भुत कर्म पाहून देवेंद्र सर्व देवगणांसह अतिशय विस्मित झाला. गंधर्व व अप्सरा यांनीं त्याच्यावर पुष्पवर्षाव केला. केतुमाली मेला असें पाहून शत्रुहंता व प्रमर्दन हे मोठ्या सैन्यासह प्रद्युम्नावर धांवले. ते सर्व राक्षस कृष्णपुत्राच्या वधाकरितां त्याच्यावर एकाच वेळीं गदा, मुसळ, चक्र, प्रास, तोमर, बाण, गोफणी, चकचकीत कुऱ्हाडी, कूटमुद्गर, इत्यादि फेंकूं लागले. तेव्हां हस्तलाघव दाखवीत त्या वीरानेंही शस्त्रसमूहानें त्यांचीं असंख्य अस्त्रें अनेकदां तोडलीं. रागाच्या तडाक्यांत त्यानें सहस्रावधि गजांस व गजांवर बसणाऱ्या महातांस मारलें. सारथ्यांसह रथ व घोडे यांचें मर्दन केलें. शरवृष्टीनें तो त्यांस लोळवूं लागला. त्या वेळीं वेध न झालेला असा तेथें कोणी आढळला नाहीं.

यामप्रमाणें मकरध्वजानें सर्व सैन्याचा धुव्वा उडविला. त्यानें घोर रक्तनदी वाहविली. तींत मोत्यांचे हाररूपी पुष्कळ लाटा होत्या. वसा, मेद व अस्थि यांचाच चिखल झाला होता.

---

१ उत्कृष्ट पुण्यानें ग्रहनक्षत्रांचा जन्म येतो. व तारे तुटून खालीं पडतात, त्याचें कारण त्यांचें पुण्य क्षीण होऊन ते मृत्युलोकीं जन्मास येतात, असा आपले लोकांचा समज आहे. चिंचवडचे प्रसिद्ध मोरया गोसावी शांत होतांच त्यांचे नांवाची एक चांदिणी आकाशांत उगवूं लागली असेंही कित्येक समजतात.

छत्रें हींच तींतील बेटें, शर हेच भोंवरे व रथ हींच वाळवंटें होतीं. केयूर व कुंडलें हींच तींतील कांसवें होतीं. ध्वजरूपी मत्स्यांनीं ती नदी शोभत होती. हस्तिरूपी गृहांनीं युक्त असलेली ती भयंकर नदी मत्स्य व कूर्म यांनीं शोभायमान दिसत होती. केशरूपी शेवाळानें ती आच्छादित होती. कंबरपट्टे हेच तिच्यांतील कमळांचे देंठ होते. नरांचीं मुखें हींच सुंदर कमळें होतीं. व तीं चामररूपी हंसांनीं युक्त होतीं. मस्तकें हेच तिमिनामक मत्स्य, त्यांच्या योगानें ती नदी व्याप्त होती. तींतून रक्ताचे ओघ लोटत होते. ती प्रद्युम्नानें वाहविलेली नदी भयंकर, दुस्तर, दुष्प्रेक्ष्य, दुर्गम व विक्राळ असून निस्तेज पुरुषांस फारच दुस्तर होती. ती शस्त्ररूपी मकरांनीं युक्त घोर नदी यमाच्या राष्ट्राची वृद्धि करणारी होती. त्या नदींत रुक्मिणीपुत्र धनुर्धरांस लोळवीत असे. शत्रुहंत्यावर नेम धरून त्यानें पुष्कळ बाण सोडले. तेव्हां शत्रुहंत्यानें रागावून एक उत्तम बाण सोडिला. तो प्रद्युम्नाच्या हृदयावर येऊन आदळला. पण त्या बाणानें विद्ध झालेला प्रद्युम्न कंपायमान झाला नाहीं. उलट त्या बलवान् रुक्मिणीपुत्रानें मरावयास टेंकलेल्या शत्रुहंत्याकरितां शक्ति उचलली व जळफळत असतां रणांगणांत त्याचे अंगावर फेंकली. तेव्हां इंद्राच्या अशनीप्रमाणें जिचा ध्वनी आहे अशी ती त्याचें हृदय फोडून खालीं पडली. तेव्हां हृदय फुटून, अंगें गळून जाऊन, मर्मस्थानें व सांधे मोडून तो महाबल शत्रुहंता रक्त ओकीत भूमीवर पडला.

शत्रुहंता पडला असें पाहून प्रमर्दन उठला. त्यानें मुसळ घेतलें व म्हटलें कीं, "हे रणप्रिया, थांब; या प्राकृताशीं तूं काय लढतोस, माझ्याशीं लढ. हे दुर्बुद्धे, तूं नाहींसा होशील. तूं वृष्णिवंशांतील एका कुलांत जन्मलास. तुझा पिता आमचा शत्रु आहे. यास्तव, मी त्याच्या पुत्रास मारतों. म्हणजे तोच मेल्यासारखा होईल. तो मेला म्हणजे, दुर्बुद्धे, सर्व देवांचा क्षय होईल. नंतर ज्यांचे सर्व शत्रु मेले आहेत असे सर्व दैतेय व दानव आनंदित होतील. माझ्या अस्त्रानें तूं मेलास म्हणजे तुझ्या शरीरांतून निघणाऱ्या रक्तानें मी शंबराच्या पुत्रांना तिळांजुळी देईन. ऐन तारुण्यांत आयुष्य संपून तूं मेला आहेस असें ऐकून आज ती भीष्मककन्या ( रुक्मिणी ) करुणा उत्पन्न होण्यासारखा विलाप करील. तो तुझा पिता चक्रधर ( कृष्ण ) निराश होईल. तूं मारला गेला आहेस असें ऐकून तो मंदबुद्धि प्राण सोडील."

असें बोलून त्यानें परिघानें रुक्मिणीपुत्रास तत्काल हाणिलें. पण तशांत महा तेजस्वी व प्रतापवान् रुक्मिणीपुत्रानें दोन्ही हातांनीं त्याचा रथ उचलून भूमीवर आपटला. तेव्हां रथांतून उडी टाकून तो प्रमर्दन पायांनींच उभा राहिला. व गदा घेऊन रुक्मिणीपुत्रावर एकाएकीं धांवला. पण कामानें त्याच गदेनें प्रमर्दनास मारलें. प्रमर्दन दैत्य मेला असें पाहून प्रद्युम्नापुढें उभें रहाण्यास असमर्थ असलेले सर्व दानव सिंहाच्या भीतीनें पळणाऱ्या गजाप्रमाणें पळून गेले. कुत्र्यास पाहून बकऱ्यांचा कळप जसा पळत सुटतो, त्याप्रमाणें प्रद्युम्नाच्या भयानें व्याकूळ झालेली ती सेना पळत सुटली. जिच्यामधील वीरांचीं वस्त्रें रक्तानें भरलीं आहेत, केश मोकळे सुटले आहेत, व त्यामुळेंच जी निस्तेज दिसत आहे, अशी ती सेना रजस्वला स्त्रीप्रमाणें गात्रसंकोच करूं लागली. सैनिक निरुपाय झाल्यामुळें जी मदनाच्या ( प्रद्युम्नाच्या ) बाणांनीं विद्ध व भयानें पीडित झाली, अशी ती युवतीप्रमाणें वेष धारण करणारी सेनारूपी स्त्री, युद्धरूपी

रतिसंगर पहाण्यास असमर्थ झाल्यानें उच्छ्वास सोडीत घराची वाट धरण्याची इच्छा करूं लागली. त्या स्थळीं कांहीं ठरेना.

## अध्याय एकशें सहावा.

—:०:—

### प्रद्युम्न व शंबर यांची झटापट.

वैशंपायन सांगतातः—राजा, त्यानंतर क्रुद्ध झालेला शंबर आपल्या सारथ्यास म्हणाला, "वीरा, माझा रथ सत्वर शत्रूच्या पुढें ने. म्हणजे माझें अप्रिय करणाऱ्या याला मी आधीं बाणांनीं मारतों." ती स्वामीची आज्ञा ऐकून त्याचें प्रिय करणाऱ्या सारथ्यानें स्वर्णभूषित रथ हांकला. तेव्हां तो रथ येतांना पाहून प्रद्युम्न प्रफुल्ल नेत्र होत्साता धनुष्य घेऊन त्यास सुवर्णभूषित बाण जोडता झाला. व अति क्रुद्ध होऊन त्यानें रणांत शंबरास क्रोध आणण्याकरितां त्याचा प्रहार केला. त्या बाणाचा प्रहार हृदयावर होतांच शंबर अतिशय विकळ झाला. व मूर्च्छित झाला असतां रथ-शक्तीचा आश्रय करून राहिला. कांहीं वेळानें पुनः सावध होऊन व धनुष्य घेऊन त्यानें रागानें सात तीक्ष्ण बाणांनीं कृष्णपुत्रास वेध केला. पण ते बाण जवळ ठेपण्याचे पूर्वींच प्रद्युम्नानें सात बाणांनीं त्यांचे सात तुकडे करून सोडले व सत्तर तीक्ष्ण शरांनीं शंबरास मारलें. नंतर, पर्जन्यधारांनीं जसें पर्वतास ताडन करावें त्याप्रमाणें पुनः कंक व मोर यांच्या पिसांनीं भूषित केलेल्या सहस्रावधि बाणांनीं त्यानें शंबरास ताडन केलें. दिशा व उपदिशा त्यानें शरधारांनीं झांकून टाकल्या. आकाश अंधकारानें भरून सोडलें. तेव्हां सूर्य दिसेनासा झाला. त्या वेळीं शंबरानें वैद्युतास्त्रानें अंधकार हटवून प्रद्युम्नाच्या रथाच्या मागच्या बाजूवर शरवृष्टि केली. पण, हे राजन्, हस्तलाघव दाखवीत प्रद्युम्नानें साळींव बाणांनीं तें अस्त्रजाल अनेक प्रकारें तोडून टाकलें. तो शरांचा महावर्षाव कृष्णपुत्रानें नाहींसा करून सोडला असतां कालशंबरानें मायेनें वृक्षवृष्टि सोडली. तेव्हां वरून वृक्षांची वृष्टि चालू झाली आहे असें पाहून प्रद्युम्न क्रोधमूर्च्छित झाला. त्यानें आग्नेयास्त्र सोडून त्या सर्व वृक्षांचा नाश केला. याप्रकारें वृक्षवृष्टीचें भस्म झालें, तेव्हां दानवानें शिलासंघात सोडला. पण प्रद्युम्नानें त्याला संग्रामांत वायव्यास्त्रांनीं उडवून दिलें. त्यानंतर प्रतापवान् देवशत्रूनें सर्वोत्तम माया केली. त्यानें धनुष्य ओढून लांब केलें. व प्रद्युम्नाच्या रथावर सिंह, व्याघ्र, वराह, तरस, अस्वल, वानर, मेघांसारखे काळे हत्ती, घोडे व उंट सोडले. पण, यादववीरानें गंधर्वास्त्रानें त्या सर्वांचे तुकडे तुकडे उडविले. प्रद्युम्नानें त्या मायेला नांहींसें केलें आहे, असें पाहून क्रोधमूर्च्छित झालेल्या शंबरानें दुसरी माया योजली. त्यानें मायेच्या योगानें उत्तम सजविलेले, रणकर्मांत कुशल असलेले व वर उत्कृष्ट महात चढलेले असे साठ साठ वर्षांचे[१] ऐन तरुण व गंडस्थळ फुटून त्यांतून मद वहात असलेले असे गजेंद्रांचे कळप उत्पन्न केले. ती गजांची माया येत आहे असें पाहून कमलनयन कृष्णपुत्रानें मायेचे सिंह निर्माण करण्याचें मनांत योजिलें. बुद्धिमान् रुक्मिणीपुत्रानें ती माया उत्पन्न केली असतां सूर्याच्या योगानें रात्र जशी नष्ट होते त्याप्रमाणें ती गजमाया नष्ट झाली. आपली ती हस्तिमाया व्यर्थ गेली असें पहातांच त्या महा असुरानें दुसरी संमोहिनी[२] माया, उत्पन्न केली. मयानें निर्मिलेली ती मोहिनी

१ साठींत हत्ती ज्वानींत येणें केवळ अशक्य नाहीं. हत्तीचें आयुष्य १२० वर्षांचें असूं शकतें.

२ 'संमोहिनी' म्हणजे भूल पाडणारी.

नांवाची माया पाहून वीर्यवान् प्रद्युम्नानें संज्ञा-स्त्रानें[1] तिचा नाश केला. तेव्हां तीही माया नष्ट झाली आहे असें पाहून क्रुद्ध झालेल्या महातेजस्वी दानवेश्वर शंबरानें सिंहाची माया निर्माण केली. पण, सिंह येत आहेत असें पाहून प्रतापवान् रुक्मिणीपुत्रानें गांधर्व अस्त्र घेऊन शरभांस उत्पन्न केलें. तेव्हां ज्यांस आठ पाय आहेत, जे बलानें अतिश्रेष्ठ आहेत व ज्यांचीं नखें व दंष्ट्रा हींच आयुधें आहेत, असे ते शरभ रणांत, वायु जसा मेघांस पळवितो, त्याप्रमाणें सिंहांस पळविते झाले. शरभांच्या मायेनें सिंहांस पळविलें असें पाहून शंबर आतां प्रद्युम्नाला कसें मारावें, असा विचार करूं लागला. तो म्हणाला, अरेरे! मी केवढा मूर्खबुद्धीचा, कीं, याला लहान असतांनाच मारून टाकलें नाहीं! आतां हा दुर्बुद्धि तारुण्यांत आला असून याला अस्त्रें मिळालीं आहेत, तेव्हां आतां समरभूमीवर या शत्रूला मी कसें मारूं? आतां असुरांचा घात करणाऱ्या देवाधिदेव हरानें दिलेली अतितीव्र व भयंकर पन्नगी नांवाची माया तेवढी राहिली आहे. विषारी सर्पांनीं युक्त असलेली ती महामाया मी आतां सोडतों. तिच्या योगानें हा मायामय दुष्टात्मा जळेल. असा विचार करून विषाच्या ज्वालांनीं व्याप्त असलेली सर्पमाया त्यानें काढिली. त्या सर्पमयी मायेनें रथ, घोडे व सारथी यांसह प्रद्युम्नास शरबंधांनीं बांधलें. तेव्हां वृष्णिवंशजानें आपल्याला ही माया बांधीत आहे असें पाहून सर्पांचा नाश करणाऱ्या गरुडमायेचें चिंतन केलें. महात्म्या प्रद्युम्नानें चिंतन करतांच गरुडी महामाया प्रकट झाली. त्याबरोबर गरुड सर्वतः फिरूं लागले. व महा विषारी सर्प नष्ट झाले. सर्पमाया भग्न झाली असतां देव व असुरही 'हे महाबाहो, रुक्मिणीपुत्रा, वीरा, फार नामी; तूं ही माया नष्ट केलेली पाहून आम्ही अतिशय संतुष्ट झालों आहों.' असें म्हणून त्याची प्रशंसा करूं लागले. सर्पमाया हाणून पडली असतां शंबर पुनः विचार करूं लागला. कालदंडासारखा सुवर्णभूषित मुद्गर मजपाशीं आहे. परम संतुष्ट होऊन पार्वतीनें पूर्वीं मला दिलेला तो युद्धामध्यें देव, दानव व मानव यांच्याकडून दडपला न जाण्यासारखा आहे. पार्वती तो देतांना म्हणाली, 'शंबरा, तूं या हेमभूषित मुद्गराला घे. मी आपले अंगें परम दुश्चर तप करून त्याला उत्पन्न केलें आहे. 'मायांतकरण' असें याचें नांव असून तो सर्व असुरांचा विनाश करणारा आहे. या मुद्गरानेंच मी शुंभ व निशुंभ या नांवाच्या कालरूपी बलाढ्य व भयंकर दानवांस गणांसह मारलें. प्राणसंकट आलें असतां तूं याला शत्रूवर सोड.' असें बोलून पार्वतीदेवी तेथेंच आड झाली. यास्तव, मी आतां तो श्रेष्ठ मुद्गर या शत्रूवर सोडतों. त्याचा तो अभिप्राय ओळखून देवराज म्हणाला, "नारदा, तूं सत्वर प्रद्युम्नाच्या रथाकडे जा. त्या महाबाहूला त्याच्या पूर्वजन्माचें स्मरण दे. त्याला हें वैष्णवास्त्र दे व शंबराच्या वधाकरितां तें त्याच्याहातून सोडीव. त्या असुरनाशकाला हें अभेद्यकवचही दे." इंद्रानें असें सांगितलें असतां नारद त्वरेनें गेला, व आकाशांत उभा राहून मकरध्वजास म्हणाला; "कुमारा, मी देवगंधर्व नारद आलों आहें, पहा. देवराजानें तुला बोध करण्याकरितां मला पाठिवलें आहे. हे मान देणाऱ्या, तूं आपल्या पूर्वजन्माचें स्मरण कर. तूं कामदेव आहेस. तूं शंकराच्या कोपाग्नीनें दग्ध झाला आहेस. त्यामुळें तुला

[1] 'संज्ञास्त्र' म्हणजे शुद्धीवर आणणारें अस्त्र. तेव्हां ही प्रतियोजना समर्पक आहे.

अनंग म्हणतात. तूं या जन्मीं वृष्णिवंशांत रुक्मिणीच्या गर्भांत उत्पन्न झाला आहेस. तुला केशवानें निर्माण केलें असून तुझें प्रद्युम्न असें नांव आहे. शंबरानें सात रात्री पुऱ्या होण्यापूर्वींच बाळंतिणीच्या खोलींतून तुला येथें हरण करून आणलें. पण तो तुला आपल्या वधाकरितांच हरण करीत असल्यामुळें व त्यायोगानें देवकार्याची सिद्धि होईल हें जाणून केशवानें त्याची उपेक्षा केली. ही जी मायावती नांवाची शंबराची भार्या आहे ती तुझी मागची रती नांवाची कल्याणी भार्या आहे, असें समज. तुझ्या संरक्षणाकरितां ती शंबराच्या गृहांत राहिली होती. ती त्या दुरात्म्यास मोह पाडण्याकरितां व प्रीति संपादन करण्याकरितां आपल्या शरीरापासून उत्पन्न केलेली माया ( छाया ) नित्य त्याच्याकडे पाठवीत असते. ( म्हणजे ती स्वतः पतिव्रता व अतिशुद्ध आहे. ) यास्तव, हे वीरा, प्रद्युम्ना, आपलीच भार्या तेथें स्थित आहे असें तूं समज व वैष्णवास्त्रानें शंबराला समरांत मारल्यावर मायावती भार्येला घेऊन द्वारकेस जा. हे शत्रुनाशका, इंद्रानें तुझ्यासाठीं आजवर जपून ठेवून आतां पाठविलेलें हें वैष्णव अस्त्र व महातेजस्वी कवच घे. माझें हें दुसरेंही वाक्य ऐक. व तें निःशंकपणें कर. बाबा, या देवशत्रूचा मुद्गर नित्य अति बलाढ्य आहे. पार्वतीनें संतुष्ट होऊन याला हा शत्रुनाशक मुद्गर दिला आहे. हा मुद्गर समरांत देव, दानव व मानव यांस अमोघ आहे. यास्तव त्या अस्त्राच्या प्रतिघातार्थ तूं देवीचें स्मरण कर. रणोत्सवी पुरुषांस ती देवी स्तव्य व नमस्य आहे. एवढ्यासाठीं तूं संग्रामांत शत्रूबरोबर लढत असतांना देवीची स्तुति व नमस्कार करण्याविषयीं प्रयत्न कर. असें वाक्य बोलून नारद जेथें इंद्र होता तेथें गेला.

## अध्याय एकशें सातवा.

—:०:—

### शंबरासुरवध.

वैशंपायन सांगतातः—त्यानंतर क्रुद्ध शंबरानें मुद्गर उचलला व त्यानें तो हातीं घेतांच बारा सूर्य उदय पावले. सर्व पर्वत व भूतल चळचळ कांपूं लागलें. सागर मर्यादा सोडून जाऊं लागले. देवताही क्षुब्ध झाल्या. आकाशांत गिधाडांची दाटी झाली. उल्कापात झाला. देव रक्तवृष्टि करूं लागले. वायु कठोर वाहूं लागला. हे महोत्पात पाहून वीर प्रद्युम्न मोठ्या त्वरेनें रथांतून खालीं उतरला. व हात जोडून बसला. त्यानें मनानें शंकरप्रिया देवी पार्वतीचें स्मरण केलें व मस्तकानें तीस प्रणाम करून तिची स्तुति आरंभिली. प्रद्युम्न म्हणाला "ॐनमः कात्यायन्यै ( कात्यायनीला प्रणवपूर्वक नमस्कार असो; गिरिजेस नमस्कार असो; त्रैलोक्यमातेस नमस्कार असो; शत्रुविनाशिनीस नमस्कार असो; शिवप्रिय गौरीस नमस्कार असो; शुंभनिशुंभ यांचें मथन करणारीस नमस्कार असो; हे कालरात्रि, तुला नमस्कार असो; कौमारीस नमस्कार असो; कांतारवासिनी देवीस मी हात जोडून नमस्कार करतों; विंध्यवासिनीस, संकटनाश करणाऱ्या देवीस, रणदुर्गेस, रणप्रियेस, महादेवीस, जयेस व विजयेस मी नमस्कार करतों. पराजित न होणाऱ्या, अजित व शत्रुनाशिनीस मी नमस्कार करितों. जिच्या हातांत घंटा आहे व जिच्या गळ्यांत घंटांची माळा आहे तिला मी नमस्कार करतों. त्रिशूलिनीस व महिषासुरघातिनीस मी नमस्कार करतों. जिचा ध्वज श्रेष्ठ सिंहाचा आहे अशा

सिंहमुखीस मी वंदन करितों. मी एकानंशेस[1] प्रणाम करितों. यज्ञामध्यें सत्कार केल्या जाणाऱ्या गायत्रीस नमस्कार करितों; व ब्राह्मणांच्या सावित्रीसही मी हात जोडून नमस्कार करतों. हे देवि, माझें सतत रक्षण कर, संग्रामांत माझा विजय होऊंदे." कामाचें हें वचन ऐकून तुष्ट झालेली दुर्गादेवी अति संतुष्टमनानें म्हणाली, "हे महाबाहो, रुक्मिणीनंदना, पहा पहा, मजकडे पहा. वत्सा, तूं वर माग. कारण माझें दर्शन केव्हांही निष्फल होत नसतें." देवीचें हें भाषण ऐकून अतिशय आनंदित झालेला काम मस्तकानें देवीस प्रणाम करून प्रार्थनापूर्वक म्हणाला, 'देवि, तूं जर संतुष्ट झाली असशील तर माझें इष्ट मला दे. आणि हे वरदे, सर्व शत्रूंशीं लढतांना माझा विजय व्हावा हा वर मला दे. स्वदेहापासून उत्पन्न झालेला जो मुद्गर तूं शंबरास दिला आहेस, तो माझ्या शरीराला लागतांच आज कमलाची माला होऊं दे." ह्यावर "बरें आहे" असें बोलून ती तेथेंच गुप्त झाली. तेव्हां संतुष्ट झालेला महातेजस्वी प्रद्युम्नही रथावर चढला. इतक्यांत क्रोधानें मूर्च्छित झालेल्या वीर्यवान् शंबरानें तो मुद्गर घेऊन व जोरानें गरगर फिरवून प्रद्युम्नाच्या उरावर फेंकला. पण तो मुद्गर मदनापाशीं जातांच कमळाची माळ होऊन प्रद्युम्नाच्या गळ्यांत पडल्यानें नक्षत्रांच्या मालेनें परिवेष्टित झालेल्या चंद्राप्रमाणें तो तिच्या योगानें शोभूं लागला. तेव्हां गंधर्वांसह देव, सिद्ध व परमर्षि 'ठीक ठीक फार उत्तम,' असें म्हणून केशवपुत्राचें अभिनंदन करूं लागले. मुद्गर पुष्परूप झाला आहे असें पाहून व नारदानें आणून दिलेलें परम वैष्णवास्त्र घेऊन महा उदार प्रद्युम्नानें चाप सज्ज केलें व तें त्यास जोडलें; आणि असें वचन उच्चारलें कीं, मीं जर रुक्मिणीचा पुत्र व केशवाचा आत्मज असेन तर त्या सत्यानें या बाणाच्या योगानें शंबर रणांत मरेल. असें बोलून व चाप ओढून त्या महाशयानें तें अस्त्र जोडलें व शंबराचा नेम धरून सोडलें. त्याबरोबर त्या वृष्णिश्रेष्ठानें सोडलेला तो राक्षसांस मोह पाडणारा बाण त्रिभुवनास जाळीत असल्याप्रमाणें जाऊन व शंबराचें हृदय फोडून भूमीवर पडला. त्याचें मांस, स्नायु, अस्थि, त्वचा व रक्त यांतील कांहीं राहिलें नाहीं. वैष्णवास्त्राच्या तेजानें तें सर्व भस्मरूप झालें.

याप्रमाणें तो महाशरीरी व अधम शंबर दानव मेला असतां देव व गंधर्व आनंदित झाले. उर्वशी, मेनका, रंभा, विप्रचित्ति, तिलोत्तमा इत्यादि अप्सरांचे गण नाचूं लागले. सर्व स्थावर-जंगम जग हृष्टचित्त होऊन नाचूं लागलें. सर्व देवगणांसह अति प्रसन्न झालेला देवेंद्र प्रद्युम्नाची पुष्पवर्षावानें उत्तम पूजा करिता झाला. याप्रमाणें मधुसूदनाच्या पुत्रानें वैष्णवास्त्रानें समरांत त्या दैत्यराजास मारलें असतां, आपलें शत्रुभय नाहींसें झालें असें पाहून देव मदनाची स्तुति गात आपआपल्या स्थानीं गेले. इकडे युद्ध करून दमलेला प्रद्युम्नही नगराकडे वळून त्यांत शिरला व प्रियतम जसा आपल्या कांतेचें दर्शन घेतो त्याप्रमाणें अतिशय हृष्ट होऊन त्यानें त्वरेनें जाऊन रतीचें दर्शन घेतलें.

---

[1] ज्या अमावास्येस चंद्राची एकही कला गोचर नसते तिला "एकानंशा" असें म्हणतात. शिवाय कंसाला फसविण्याकरितां ही देवकीचा आठवा गर्भ होऊन जन्मली होती व कंसानें शिळेवर आपटतांच आकाशांत निघून गेली.

# अध्याय एकशें आठवा.

—:०:—

## प्रद्युम्न व मायावती रुक्मिणीस भेटतात.

वैशंपायन सांगतात:—ज्याला सर्व माया प्राप्त झाल्या आहेत व समरांत पुष्कळ पराक्रम गाजवून अक्षत रहाणारा असा तो मायाकुशल मायावी कालशंबर अष्टमीस मेला. त्या उत्तम असुरास ऋक्षवंत नगरांत मारून व देवी मायावतीला घेऊन पित्याच्यानगरास येत असतांना तो मायावी व शीघ्रपराक्रमी प्रद्युम्न अंतरिक्षमार्गानें पित्याच्या प्रभावानें रक्षिलेल्या रम्यपुरीस आला. साक्षात् मन्मथाप्रमाणें असलेला तो शिशु त्या मायावतीसह अंतरिक्षमार्गानें केशवाच्या अंतःपुरांत शिरला. तो त्या ठिकाणीं उतरला असतां तेथें ज्या केशवाच्या राण्या होत्या, त्या सर्वजणी विस्मित, हृष्ट व भयभीत झाल्या. नंतर कांतेशीं संगत झालेल्या त्या मदनतुल्य पुरुषास पाहून त्या हृष्टवदन झाल्या व नेत्रोत्सवाचा अनुभव घेऊं लागल्या. पण त्याचें मुख लज्जायुक्त झालें आहे व तो पदोपदीं अधिक लज्जित होत आहे, असें पाहून त्या सर्व कृष्णस्त्रियांस अधिकच प्रेम दाटलें.पुत्राची इच्छा करणारी शोकार्ता रुक्मिणी त्याला पाहून आपल्या शेंकडों सवतींसह नेत्रांत बाष्प आणून बोलली. ‘ मध्यरात्र उलटून जाऊन रात्र सरत आली असतां मीं काल असें स्वप्न पाहिलें कीं, कृष्णानें मला आम्रपल्लव[1] आणून दिला. तो चंद्रकिरणांसारखा होता व मोत्यांच्या माळेनें विभूषित झाला होता. केशवानें मला आपल्या मांडीवर बसवून तो माझ्या गळ्यांत बांधला. तशीच श्यामवर्ण, सुंदर केसांची, शुभ्र वस्त्रानें भूषित झालेली व हातीं कमल घेतलें आहे अशी एक स्त्री मजकडे पहात माझ्या घरांत शिरली. तिनें मला हातांत धरून चांगल्या पाण्यानें स्नान घातलें. व माझ्या गळ्यांत कमळांची माळ घातली. माझ्या मस्तकाचें अवघ्राण करून तिनें ती माळ मला दिली.’ असें स्वप्न सांगत असतांनाच रुक्मिणीच्या मनाला मोठा आनंद झाला. सखीजनांनीं परिवेष्टित असलेली देवी वारंवार कुमाराकडे पाहून कोणा धन्य स्त्रीचा हा प्रियदर्शन दीर्घायु पुत्र असावा? हा असला मदनमूर्ति कुमार तारुण्याच्या पहिल्या भरांत आहे. हे पुत्रा, चिरंजीव हो. हे वत्सा, तुझ्या योगानें कोणती स्त्री सौभाग्यसंपन्न झाली आहे? मेघाप्रमाणें श्यामवर्ण असलेला तूं आपल्या भार्येसह येथें कशाकरितां आला आहेस? बलाढ्य कृतांतानें जर नेला नसता तर खचीत माझा पुत्र प्रद्युम्न या वेळीं तुझ्याएवढाच झाला असता. खचीत तूं कृष्णपुत्र आहेस. माझा तर्क अगदीं खोटा होणार नाहीं. मी तुझ्या चिन्हांवरून एक चक्र खेरीजकरून बाकी तूं जनार्दनच आहेस असें मी समजलें. तुझा तोंडवळा तर थेट नारायणासारखा आहे. तुझे केश नारायणाच्या केसांसारखेच आहेत. केसांचे अग्रभागही त्याच्यासारखेच आहेत. तुझ्या दोन्ही मांड्या, वक्षस्थळ, भुजा, बलराम व माझा श्वशुर वसुदेव यांच्यासारख्या आहेत. यास्तव तूं कोण आहेस? आपल्या शरीरानें सर्व वृष्णिकुल प्रकाशित करीत तूं राहिला आहेस. काय चमत्कार सांगावा? नारायणाच्या तनूप्रमाणें तुझी तनु दिव्य व श्रेष्ठ दिसत आहे.

इतक्यांत शंबराच्या वधाविषयींचें नारदाचें वचन ऐकून कृष्ण एकाएकीं तेथें आला. व त्यानें हृष्टचित्तानें मदनचिन्हांनीं सिद्ध असलेल्या त्या श्रेष्ठ पुत्रास व मायावती सुनेस

[1] येथें ‘ साहारपल्लवम् ’ असें मूळ आहे. त्याचा अर्थ वांईकरांनीं ‘ हारासह पल्लव असा केला आहे. तो चूक आहे. ’ ‘ साहार ’ याचा अर्थ ‘ हारासह ’ कसा झाला. सहार हें आम्रवृक्षाला नांव आहे. व ‘ सहारस्य अयं साहारः ’ अशी व्युत्पत्ति आम्हीं केली आहे.

पाहिलें. कृष्ण एकाएकीं देवतेसारख्या देवी रुक्मिणीस ह्मणाला, ‘ देवि, हा तुझा तो धनुर्धर पुत्र आला आहे. यानें मायायुद्धांत प्रवीण असलेल्या शंबरास मारलें व ज्यांच्या योगानें तो देवांस पीडा देत असे त्या सर्व मायाकन्यांस हरण केलें. ही शुभ साध्वी सती तुझ्या पुत्राची भार्या आहे. मायावती या नांवानें प्रख्यात होऊन ही शंबराच्या गृहामध्यें राहिली होती. ही शंबराची पत्नी आहे, असें मानून तूं व्यथित होऊं नको. कारण, पूर्वी मन्मथाचा नाश झाला असतां व तो अनंगतेस प्राप्त झाला असतां ( ही तेथें जाऊन राहिली ) पण ही कामाची प्रियपत्नी रतीच आहे. ही शंबराची स्त्री नव्हे. ही शुभ स्त्री मायारूपानें त्या दैत्यास वारंवार मोहित करीत असे. ही शोभना अल्लडपणांतही त्याच्या दुष्ट इच्छेस अनुकूल झाली नव्हती. ती आपलें मायामय रूप करून शंबराचे मंदिरांत प्रवेश करीत असे. ही माझ्या पुत्राची पत्नी व तुझी सुंदर स्नुषा आहे. ही आपल्या लोकोत्तर कांतीचें मनोमय साह्य करील. यास्तव, या माझ्या पूज्य व ज्येष्ठ स्नुषेला आपल्या घरांत ने व फार दिवसांपासून नाहींसा होऊन पुनः परत आलेल्या पुत्राचें सेवन कर.

वैशंपायन सांगतातः—कृष्णाचें हें वचन ऐकून देवी रुक्मिणी अतिशय आनंदित झाली व म्हणाली, “ खरोखर वीरपुत्राचा समागम झाल्यामुळें मी अति धन्य झालें आहें. आज माझी कामना सफळ झाली. आज माझा मनोरथ पूर्ण झाला. फार दिवसांपासून नाहींसा झालेल्या पुत्राचें प्रियेसह दर्शन झालें. ये, पुत्रा, माझ्या घरांत ये.” असें म्हणून ती त्याला भार्येसह आंत घेऊन जाऊं लागली; पण, इतक्यांत प्रद्युम्नानें गोविंद व ती माता यांच्या चरणांस अभिवादन करून महाबलवान् हलधराचें पूजन केलें. तेव्हां शत्रूंच्या वीरांस मारणाऱ्या वीर्यवान् केशवानें बलवानांतील श्रेष्ठ प्रद्युम्नास उठवून व आलिंगन देऊन मस्तकीं अवघ्राण केलें. सोन्याच्या भूषणांनीं भूषित झालेल्या रुक्मिणीनें त्या देवी स्नुषेस उठवून आलिंगन देऊन व तिला हातांत धरून तिच्याशीं स्नेहानें गद्गद भाषण केलें. आणि शचिपत्नीसह आलेल्या इंद्राला जशी अदिति आपल्या घरांत घेऊन जाते, त्याप्रमाणें रुक्मिणी घरास आलेल्या पुत्रास त्या वेळीं आपल्या अंतःपुरांत घेऊन गेली.

## अध्याय एकशें नववा.

—:०:—

### बलरामानें म्हटलेलें आह्निक स्तोत्र.

वैशंपायन सांगतातः—हे यज्ञ करणारांतील श्रेष्ठा, कालशंबरास मारून प्रद्युम्न द्वारकेस परत आला त्या वेळीं बलदेवानें त्याचे रक्षणाकरितां आश्चर्यात्मक स्तोत्र म्हटलें; त्याला आह्निक असें म्हणतात. हे राजश्रेष्ठा, सायंकाळीं त्याचा जप केला असतां जपकर्ता पवित्रात्मा होतो. बलरामानें गाइलें असून विष्णूनेंही तें म्हटलें आहे. धर्माची इच्छा करणाऱ्या मुनींनीं व ऋषींनींही त्याचा पाठ केला आहे. एकदां रुक्मिणीपुत्र प्रद्युम्न बलरामासह आपल्या गृहांत बसला असतां प्रणाम करून व हात जोडून म्हणाला, कृष्णाच्या ज्येष्ठ भ्रात्या, महाभागा, रोहिणीपुत्रा, प्रभो, ज्याचा जप केला असतां मी निर्भय होईन असें एखादें स्तोत्र मला सांग.

श्रीबलदेव म्हणालाः—देव व असुर यांचा गुरु ब्रह्मा जगत्पति माझें रक्षण करो. ओंकार, वषट्कार, सावित्री, तीन विधी, ऋचा, यजुर्मंत्र सामें, छंद, आथर्वण, उपनिषद्भाग व ब्राह्मणभाग यांसह चार वेद, पुराणें, इतिहास,

खिलें[1] व उपाखिलें, अंगें व उपांगें आणि व्याख्यानें माझें रक्षण करोत. पृथ्वी, वायु, आकाश व पांचवें जल, इंद्रियें मन, बुद्धि, सत्त्व, रज, तम, व्यान, उदान, समान, प्राण व पांचवा अपान, त्याचप्रमाणें हें सर्व जग ज्यांच्या आधीन आहे असे दुसरे सात वायु, मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, ऋतु, भृगु व भगवान् वसिष्ठ हे महर्षि माझें रक्षण करोत. कश्यपादि चवदा मुनि, दहा दिशा, आणि गणांसह नरनारायण देव मला सदा रक्षोत. अकरा रुद्र, बारा आदित्य, आठ वसु व दोन अश्विनीकुमार सांगितले आहेत. ही श्री, लक्ष्मी, स्वधा, मेधा, तुष्टि, पुष्टि, स्मृति, धृति, अदिति व दिति, दनु आणि सिंहिका, या दैत्यमाता, हिमवान, हेमकूट, निषध, श्वेतपर्वत, ऋषभ, पारियात्र, विंध्य, वैडूर्यपर्वत, सह्य, उदय, मलय, मेरु, मंदर, दर्दुर, क्रौंच, कैलास व मैनाक हे पर्वत माझें रक्षण करोत. शेष, वासुकि, विशालनेत्र तक्षक, एलापत्र, शुक्लवर्ण कंबल व अश्वतर असे दोघे, हस्तिभद्र, पिटरक, कर्कोटक, धनंजय, पुरणक, नाग करवीरक, सुमनास्य, दधिमुख, श्रृंगारपिंडक, त्रिभुवनांत विख्यात असलेला भगवान् मणिनाग, नागराज अधिकर्ण, तसाच दुसरा हारिद्रक, हे व ज्यांचा नामनिर्देश केलेला नाहीं असे दुसरे पुष्कळ सत्यधर्मवान्, भूमीस धारण करणारे भुजगेश्वर माझें रक्षण करोत. चार समुद्र रक्षण करोत. नद्यांतील श्रेष्ठ गंगा, सरस्वती, चंद्रभागा, शतद्रु, देविका, शिवा, इरावती, विपाशा, शरयु, यमुना, कलमाषी, रथोदा[2], बाहुदा, हिरण्यदा, प्लक्षा, इक्षुमती, स्रवंती, बृहद्रथा, प्रख्यात चर्मण्वती, पुण्यकारक वसूधरा, या व ज्यांचा येथें निर्देश केलेला नाहीं अशा दुसऱ्याही उत्तर आर्यावर्तांत जाणाऱ्या नद्या आपल्या जलांनीं मला स्नान घालोत. वेणी, गोदावरी, सीता, कावेरी, कौंकणावती, कृष्णा-वेणा, मुक्तिमती, तमसा, पुष्पवाहिनी, ताम्रवर्णी, ज्योतिरथा, उत्पला, उदुंबरावती, वैतरणी नदी, पुण्या विदर्भा, शुभा, नर्मदा, वितस्ता, भीमरथ्या, महानदी ऐला, कालिंदी, पुण्यकारक गोमती, प्रख्यात नद शोण या व अशाच दुसऱ्याही येथें न सांगितलेल्या दक्षिणमार्गानें जाणाऱ्या नद्या आपआपल्या जलांनीं मला स्नान घालोत. क्षिप्रा, चर्मण्वती, पुण्यामही, शुभ्रवती, सिंधु, वेत्रवती, भोजांता, वनमालिका, पूर्वभद्रा, पराभद्रा, उर्मिला, परद्रुमा, चापदासी या नांवानें प्रख्यात, वेत्रवती, प्रस्थावती, कुंडनदी, पुण्यानदी सरस्वती, चित्राग्नि, इंदुमाला, तशीच मधुमतीनदी, उमा गुरुनदी, शुद्ध जलयुक्त तापी, विमला, विमलोदा, मत्तगंगा, पयस्विनी, या व येथें न सांगितलेल्या अशाच दुसऱ्याही पश्चिमवाहिनी नद्या मला अभिषेक करोत. पूर्व दिशेचा आश्रय करणारी पुण्यजला भागीरथी माझें पाप जाळून टाको. हिला शंभूनें आपल्या मस्तकावर धारण केलें आहे अशी कीर्ति आहे.

प्रभास, पुष्कर, प्रयाग, नैमिष, गंगातीर्थ कुरुक्षेत्र, श्रीकंठ, गौतमाश्रम, रामहृद, विनशन, रामतीर्थ, गंगाद्वार, जेथून सोम निघाला तें कनखल, कपालमोचन तीर्थ, प्रख्यात जंबूमार्ग, प्रख्यात सुवर्णबिंदु, त्याचप्रमाणें कनकपिंगल, पुण्याश्रमांनीं सुशोभित झालेलें—दशाश्वमेधिक, प्रख्यात बदरी, नरनारायणाश्रम, विख्यात फल्गुतीर्थ, चंद्रवटतीर्थ, अतिशय पुण्यकारक कोकामुख, गंगासागर, मगधांतील तपोद, प्रख्यात गंगोद्भेद, हीं महर्षींनीं सेवि-

---

[1] एका शाखेंतील प्रकरण प्रयोजनवशात् अन्यत्र पढलें असतें त्याला " खिल " असें म्हणतात.

[2] " रथोष्णा " असाही पाठ आढळतो.

लेलीं पुण्यकारक तीर्थें आहेत. त्याचप्रमाणें सुकर योगमार्ग, श्वेतद्वीप, ब्रह्मतीर्थ, शताश्वमेधांची ज्याला उपमा आहे असें रामतीर्थ. धो धो पडणारी पापनाशी गंगा, गंगावैकुंठ, केदार, श्रेष्ठ सूकरोद्भेदन व शापमोचन तीर्थ, हीं सर्व तीर्थें मला पापापासून पावन करोत.

धर्मार्थकामविषय, यशःप्राप्ति, शम, दम, वरुणेश, कुबेर, यम, नियम, काल, नय, संनति, क्रोध, मोह, क्षमा, धृति, विद्युत्, मेघ, औषधी, प्रमाद, उन्माद, विग्रह, यक्ष, पिशाच, गंधर्व, किन्नर, सिद्ध, चारण, निशाचर, खेचर, दंष्ट्रावान, ज्यांना विग्रह प्रिय आहे, ज्यांचें उदर लांब आहे, बलाढ्य, पिंगाक्ष, सर्व-रूपी, पर्जन्यासह वायु, मेघ, कला, त्रुटि, लव, क्षण ( इत्यादि कालविभाग ) नक्षत्रें, ग्रह, शिशिरादिक ऋतु, मास, अहोरात्र, सूर्य, चंद्र, आमोद, प्रमोद, प्रहर्ष, शोक, रज, तम, तप, सत्य, शुद्धि, बुद्धि, धृति, श्रुति, रुद्राणी, भद्रकाली, भद्रा, ज्येष्ठा, वारुणी, भासी, कालिका, अति प्रख्यात शांडिली, आर्या कुहू, सिनीवाली, भीमा, चित्ररथी, रति, एकानंशा, कूष्मांडी, देवी कात्यायनी, लोहित्या, जनमाता, पुराणादिकांत सांगितलेल्या देवकन्या व देवपत्नी गोनंदा, बांधवांसह माझें रक्षण करोत.

नानाप्रकारचे अलंकार व वेष यांनीं युक्त असलेल्या, ज्यांचीं मुखें नानारूपांनीं चिन्हित आहेत, नाना देशांत संचार करणाऱ्या, नाना शस्त्रांनीं शोभित झालेल्या, मेद व मज्जा ज्यांना प्रिय आहे, मद्य, मांस व वसा ज्यांना आवडते, मार्जार व व्याघ्र यांच्याप्रमाणें ज्यांचीं मुखें आहेत, गज व सिंह यांच्याप्रमाणें ज्यांचीं मुखें आहेत, कंकपक्षी कावळे, गृध्र व क्रौंचपक्षी यांच्याप्रमाणें ज्यांचीं मुखें आहेत, ज्यांनीं सर्पांचीं यज्ञोपवीतें घातलीं आहेत, व चर्मांची प्रावरणें केलीं आहेत, ज्यांचीं मुखें रक्तानें शिंपडलेलीं असतात, कर्कश दुंदुभीप्रमाणें ज्यांचा स्वर आहे, ज्या मत्सर व क्रोध यांनीं युक्त असतात, ज्यांचे प्रासाद रुचिरगृहांनीं युक्त आहेत, ज्या मत्त, उन्मत्त व प्रमत्त आहेत, ज्या बसल्या ठिकाणाहूनच प्रहार करितात, ज्यांचे नेत्र व केंस पिंगे आहेत अशा, त्याचप्रमाणें ज्या दुसऱ्या कित्येकींचे केंस कापलेले आहेत, ज्यांचे केंस ऊर्ध्व आहेत, काळे आहेत व त्याचप्रमाणें दुसऱ्या कित्येकींचे शुभ्र आहेत, ज्यांना दशसहस्र हत्तींचें बळ आहे, तशाच दुसऱ्या कित्येकजणींचा वेग वायूसारखा आहे, कांहीं एक हाताच्या, एक पायाच्या, एक नेत्राच्या, व दुसऱ्या कांकीं पिंवळ्या डोळ्यांच्या, कित्येक बहुपुत्रा, अल्पपुत्रा, द्विपुत्रा व पुत्रमंडिका, मुखमुंडी, बिडाली, पूतना, गंधपूतना, शीतवातोष्ण, वेताली, रेवती, ग्रहसंज्ञिता, प्रियहास्या, प्रियक्रोधा, प्रियवासा, प्रियंवदा, सुखप्रदा, असुखदा, सदा द्विजजनांस प्रिय, निशाचरी, सुखोदर्के, व सदा पर्वसमयीं भयंकर, अशा मातृदेवता, माता जशी पुत्राचें रक्षण करिते त्याप्रमाणें माझें सतत रक्षण करोत.

ब्रह्मदेवाच्या मुखापासून उद्भवलेले, रुद्राच्या अगांपासून उत्पन्न झालेले असे रौद्र ज्वर, कुमाराच्या स्वेदापासून उद्भवलेले व वैष्णवप्रभृतिज्वर, महाभीम, महावीर्य, दर्पोद्धत, महाबल, क्रोधन, अक्रोधन, क्रूर, देवयुद्ध करणारे, रात्रिंचर, केंसाळ, दंष्ट्रायुक्त, युद्धप्रिय, ज्यांचीं उदरें व जघनभाग लांबट आहेत, ज्यांचे नेत्र पिंगट आहेत, विश्वरूपी, ज्यांच्या हातांत शक्ति, ऋष्टि, शूल, परिघ, प्रास, ढाल व खड आहे, पिनाक, वज्र, मुसळ, ब्रह्मदंड इत्यादि आयुधें

ज्यांस प्रिय आहेत, दंडयुक्त, कुंडयुक्त, शूर, जटा-मुकुट-धारी, वेदवेदांगकुशल, नित्य यज्ञोपवीत घालणारे, सर्पांच्या मस्तक-माळा धारण करणारे, कुंडलधारी व बाहुभूषणांनीं युक्त असलेले वीर, नाना प्रकारच्या वस्त्रांनीं वेष्टित झालेले, चित्रविचित्र माळा व उट्या यांस धारण करणारे, गज, व्याघ्र, उंट, रीस, मांजर, सिंह व अश्व यांच्याप्रमाणें ज्यांचीं मुखें आहेत, डुकर, घुबड, कोल्हा, हरीण, उंदीर व रेडा, यांच्याप्रमाणें ज्यांचीं तोंडें आहेत, वामन, ( ठेंगू ) बिकट, कुबडे, भयंकर, ज्यांचे केंस कापले आहेत, दुसरे अनेक प्रकारें केंस व जटा धारण करणारे, दुसरे कित्येक कैलासासारखे शुभ्र, कित्येक सूर्यासारखे प्रभावान्, कित्येक मेघांसारखे काळे, कित्येक अगदीं काजळाच्या पर्वतासारखे कुट्ट, एक पायाचे, दोन पायांचे, तसेच दुसरे आणखी दोन मस्तकांचे, मांसरहित, स्थूल जंघायुक्त, ज्यांचीं मुखें पसरलीं आहेत, भयंकर, वापी, कूप, तडाग, समुद्र, नद्या, स्मशानांतील वृक्ष, पर्वत आणि शून्यगृहें यांमध्यें राहणारे सर्व ग्रह माझें सर्वतः रक्षण करोत.

महागणपति, नंदी, महाकाल, महाबल, माहेश्वर, व वैष्णव असे दोन भयंकर ज्वर, ग्रामणी, गोपाल, भृंगरीटि, गणेश्वर, देव, वामदेव, घंटाकर्ण, करंधम, श्वेतमोद, कपाली, जंभक, शत्रुतापन, मज्जन व उन्मज्जन, संतपा व विलापन, निजघास, घस, स्थूणाकर्ण, प्रशोषण, उल्कामाली, धमधम, ज्वालामाली, प्रदर्शन, संघट्टण, संकुटन, काष्टभूत, शिवंकर, कूश्मांड, कुंभमूर्धा, रोचन, वैकृतग्रह अनिकेत, सुरारिघ्न, शिव, व अशिव, क्षेमक, पिशिताशी, सुरारी, हरिलोचन, भीमक, ग्रामक, आग्रमयग्रह, उपग्रह, अर्यक, तसाच दुसरा स्कंदग्रह, चपल, समवेताल, तामस, सुमहाकपि, हृदयोद्वर्तन, चैड, कुंडाशी, कंकणप्रिय, हरिश्मश्रु, गरुत्मंत, मन व वायु यांच्याप्रमाणें वेगवान्, पार्वतीच्या रोषापासून उत्पन्न झालेले, असंख्य, शक्तिमान्, द्युतिमान्, ब्राह्मणप्रिय, सत्यप्रतिज्ञ, प्रत्येक संग्रामांत शत्रूंच्या सर्व कामांचा नाश करणारे, रात्रीं व दिवसां, सर्व गुणांनीं कीर्तिमान् झालेले, अशा गणांचे पति गणांसह माझें सदां रक्षण करोत.

नारद, पर्वत, गंधर्व व अप्सरा यांचे गण, पितर, कारण, कार्य, आधि, व्याधि, अगस्त्य, गालव, गार्ग्य, शक्ति, धौम्य, पराशर, कृष्ण, भगवान् दत्तात्रेय, असित, देवल, बल, बृहस्पति, उतथ्य, मार्कंडेय, श्रुतश्रवा, द्वैपायन विदर्भा, द्वित, त्रित, कालवृक्षीय ऋषि, मुनि, मेधातिथि, सारस्वत, यवक्रीति, कुशिक, गौतम, संवर्त, ऋष्यशृंग, स्वस्त्यात्रेय, विभांडक, ऋचिक, जमदग्नि, तपोनिधि और्व, भरद्वाज, स्थूलशिरा, कश्यप, पुलह, ऋतु, बृहदग्नि, हरिश्मश्रु, विजय, कण्व, वैतंडी, दीर्घतापा, वेदगाथा, अंशुमान्, शिव व अष्टावक्र, दधीचि, श्वेतकेतु, उद्दालक, क्षारपाणि, शृंगी, गौरमुख, अग्निवेश्म, शमीक, प्रमुचु, मुमुचु, हे व असेच दुसरे तीक्ष्ण व्रतें करणारे पुष्कळ ऋषि, त्याचप्रमाणें ज्यांचीं नांवें येथें दिलीं नाहींत असे थोर मनाचे मुनी व शांत आणि स्तुत्य क्रतु सदा माझी शांति करोत.

तीन अग्नि, तीन वेद, तीन विद्या, कौस्तुभमणी, श्रीमान् उच्चैःश्रवा अश्व, धन्वंतरि, वैद्य, हरि, अमृत, कामधेनु, गरुड, दह्यासारख्या पांढऱ्या मोहऱ्या, शुभ्र पुष्पें, कन्या, श्वेत छत्र, यवाक्षता, दूर्वा, हिरण्य, गंध, केसांची चवरी, त्याचप्रमाणें अप्रतिहत चक्र, मोठा बैल, चंदन, विष, श्वेतवृषभ, मत्त हत्ती, सिंह, व्याघ्र, घोडा, पर्वत, पृथिवी, उधळलेल्या

लाह्या, ब्राह्मण, मधुयुक्त पायस, स्वस्तिक, वर्धमान, नंद्यावर्त, प्रियंगु, श्रीफल, गोमय, मत्स्य, दुंदुभि, पटहस्वन, ऋषिपत्न्या, ऋषिकन्या, श्रीमद्भद्रासन, धनु, रोचना, रुचक, नद व संगम यांचें जल, पक्षी, शतपत्र चकोर, चातक, नंदीमुख, मयूर, वज्रमुक्ता, मणिध्वज इत्यादि आयुष्य वाढविणारीं व कार्यसिद्धि करणारीं हीं सर्व माझें सर्वदा रक्षण करोत. असो.

आयुष्य, श्री व जय, यांची इच्छा करणाऱ्या रामानें पूर्वीं म्हटलेलें हें पुण्यकारक, क्लेश नाहींसे करणारें, श्रीमान् व मंगलयुक्त-स्तोत्र जो विद्वान् नर ऐकेल व ऐकवील तो पावन होतो. स्नान करून प्रत्येक पर्वदिवशीं या मंगल स्तोत्राचा अष्टोत्तरशत जप करणारा वध, बंध, परिक्लेश, व्याधि, शोक, पराभव व विकल्प यांस प्राप्त होत नाहीं. त्याला हें स्तोत्र इहपरलोकीं सुख देतें. धन्य, यशस्य, आयुष्य, पवित्र, वेदसंमित, श्रीमत्, स्वर्ग देणारें, सदा पुण्यकारक, संततिदायक, मंगलरूप, शुभ, क्षेमकर, मानवांस उत्तम बुद्धि देणारें, सर्व रोगांची शांति करणारें, आपली कीर्ति व कुल यांस वाढविणारें, अशा प्रकारचें हें स्तोत्र जो श्रद्धाळु, दयाळु, व आत्मज्ञ पुरुष पढतो, त्याचें चित्त सर्व पापांपासून अत्यंत शुद्ध होऊन त्याला शुभगति मिळते.

## अध्याय एकशें दहावा.

—:o:—

### धन्योपाख्यान.

वैशंपायन सांगतात:—ज्या महिन्यांत शंबरानें प्रद्युम्नाला हिरावून नेलें, त्याच महिन्यांत जांबवतीला सांब झाला. लहानपणापासून रामानें त्याची शस्त्रविद्येंत योजना केली. त्याला सर्व यादव रामाच्या खालोखाल मान देऊं लागले. नातू होतांच, ज्यानें शत्रुमंडळास मारिलें आहे असा कृष्ण, नंदनवनांत जसा देवेंद्र राहतो त्याप्रमाणें त्या शुभ नगरींत राहूं लागला. यादवांचें वैभव पाहून त्यापुढें इंद्र आपलें वैभव तुच्छ मानीत असे. जनार्दनाच्या[1] भयानें राजांस स्वस्थता मिळाली नाहीं. एकदा हस्तिनापुरांत दुर्योधनाच्या यज्ञामध्यें सर्व राजे एकत्र मिळाले. तेथें दूतांच्या तोंडून माधवाची अपूर्व लक्ष्मी, कुटुंबवत्सल जनार्दन, व सागरामध्यें वसलेली द्वारकानगरी, यांविषयीं ऐकून त्या सर्व राजांनीं संकेत केला. व पृथ्वींतील ती अपूर्व लक्ष्मी व केशव यांस पाहण्याकरितां ते कृष्णमंदिरास आले. धृतराष्ट्राच्या वशीं राहून त्याच्या इच्छेप्रमाणें वागणारे दुर्योधनप्रभृति सर्व पांडवप्रमुख धृष्टद्युम्नादि राजे, पांड्य, चोल, कलिंगेश, बाल्हिक, द्रविड, खश राजे, अठरा अक्षौहिणी सैन्यास आपल्या बरोबर घेऊन गोविंदाच्या भुजांनीं रक्षिलेल्या त्या यादवपुरीस आले. व ते सर्व राजे रैवतक पर्वतास वळसा घालून योजनसंज्ञक आपापल्या भूमींत प्रविष्ट झाले. त्यानंतर यादवश्रेष्ठांसह श्रीमान् कमलनयन हृषीकेश त्या राजांकडे भेटीसाठीं आला. तेव्हां त्या राजेलोकांत बसलेला तो यदुश्रेष्ठ मधुसूदन शरत्कालच्या सूर्याप्रमाणें शोभूं लागला. वय व स्थान यांस अनुसरून प्रत्येकाचा उचित सत्कार केल्यावर कृष्ण सुवर्णाच्या सिंहासनावर बसला. राजेही नानाप्रकारच्या योग्यस्थानीं बसले. ते नराधिप विचित्र सिंहासनें व आसनें यांवर बसले. तेव्हां यादव व नरेंद्र यांचा तो समाज ब्रह्मदेवाच्या गृहांतील देव व असुर यांच्या समाजाप्रमाणें शोभूं लागला. त्या समयीं त्या भेटीमध्यें केशव ऐकत असतां, यादव व राजे

१ जनं अर्दयति ( पीडयति ) असौ जनार्दनः असा जनार्दन पदाचा अर्थ.

यांच्या विचित्र गोष्टी सुरू झाल्या. इतक्यांत मेघगर्जनेप्रमाणें वायु सोसाट्यानें वाहूं लागला. विजांचा चकचकाट व मेघांचा गडगडाट होऊन गच्च काळोखी भरली. हा प्रकार होत आहे तोंच त्या मेघावरणाला भेदून नारद दिसूं लागले. त्यांचा जटाभार चांगला बांधलेला होता व एक बाहु वीणा धरण्यांत गुंतलेला होता. सागरतुल्य ( गंभीर ) अग्निशिखेप्रमाणें ( तेजस्वी ) श्रीमान् व इंद्रमित्र असे ते नारदमुनी त्या राजमंडळींत उतरले. ते मुनिश्रेष्ठ नारद भूमीवर उतरतांच तें अद्भुत व महामेघयुक्त दुर्दिन आपोआप दूर झालें. तो समुद्रासारखा गंभीर मुनिश्रेष्ठ राजेलोकांत प्रवेश करून आसनावर बसलेल्या अव्यय श्रीकृष्णास म्हणाला, " पुरुषोत्तमा, महाबाहो ! सर्व देवांत तूंच एक आश्चर्य व धन्य आहेस. या लोकांत तुझ्यासारखा दुसरा कोणी नाहीं. " नारद त्यास असें म्हणाला असतां प्रभु थोडें हंसून मुनीस उलट म्हणाला ' मी आश्चर्यमय व धन्य दक्षिणांसह आहें. '

याप्रकारें कृष्णानें सांगितलें असतां नारद राजांदेखत म्हणाले, ' हे कृष्णा मला हवें होतें तेंच उत्तर मिळालें आहे; आतां मी आपल्या मार्गानें जातों. ' असें बोलून ते जावयास निघाले असतां नारदांनीं सांगितलेलें वचन व तो गुह्यसंकेत यांचा कांहींच अर्थ न कळल्यानें ते राजे ईश्वरास म्हणाले, " हे माधवा, नारदांनीं तूं आश्चर्य व धन्य आहेस असें तुला म्हटलें व तूं " दक्षिणांसह " एवढेंच त्यांस प्रत्युत्तर दिलेंस. पण ह्या दिव्य व मोठ्या गूढ पदांचा अर्थ आह्मांला कांहींच कळला नाहीं. यास्तव, हे कृष्णा, तो अर्थ जर आह्मांस ऐकण्यासारखा असेल तर आह्मीं तत्त्वतः ऐकण्याची इच्छा करितों. तेव्हां कृष्ण त्या सर्व पार्थिवश्रेष्ठांस म्हणाला " ऐका. हे नारदद्विज तो तुह्मांस सांगतील. नारदा, तुह्मी जें वाक्य मला सांगितलेंत व मी जें उत्तर तुह्मांस दिलें, त्याचा अर्थ ऐकण्याची हे सर्व राजे इच्छा करीत आहेत. यास्तव त्यांना त्यांचा तत्त्वार्थ सांगा. " ही विनंति ऐकून तो उत्तम प्रकारें अलंकृत झालेला मुनि सोन्याच्या चकचकीत आसनावर स्वस्थपणें बसून त्या वंद्य कृष्णाचा प्रभाव सांगूं लागला. नारद तेथें मिळालेल्या सर्व राजांस संबोधून म्हणाले, ' राजांनो, मला या महात्म्या कृष्णाचा पार कसा लागला तें ऐका. मी गंगेच्या तीरीं त्रिषवणातिथि ( त्रिकाल स्नान करणारा अतिथि ) होऊन राहिलों असतां व एकदां रात्र संपून सूर्य दिसूं लागला असतां, मी एकटाच संचार करूं लागलों. तों ज्याचा देह गिरिशिखरासारखा प्रचंड असून दोन अर्धुकांचा झाला आहे, ज्याचा मंडलविस्तार एक कोस व लांबी दोन कोस आहे, ज्याचें अंगाशीं चार पाय चिकटून आहेत, जो चिखलांत भरलेला व ओला आहे, ज्याची आकृती माझ्या वीणेसारखी आहे व जो गजचर्माचे ढिगाप्रमाणें दिसत होता, अशा एका कांसवाला मीं पाहिलें. नंतर मी त्यास हातानें स्पर्श करून म्हटलें, " हे कूर्मा, तुझें शरीर आश्चर्यकारक आहे व त्यामुळेंच तूं धन्य आहेस, असें मला वाटतें. कारण तूं या अशा अभेद्य कवचांनीं आवृत झाला आहेस, कीं दुसऱ्या कोणाची पर्वा न करितां तूं निःशंकपणें जलांत संचार करतोस. " तेव्हां तो चर कूर्म मला मनुष्याप्रमाणें स्वतः म्हणाला. ' हे मुने, माझ्यामध्यें कोणतें आश्चर्य आहे व हे विभो मी धन्य कसा आहें ? खरोखर यी नदी गंगा धन्य आहे. हे ब्राह्मणा, तिच्यामध्यें माझ्यासारखे सहस्त्रावधि प्राणी फिरत अस-

तात. यापेक्षां आणखी आश्चर्य तें कोणतें ?'

तें ऐकून व कौतुकाविष्ट होऊन मी गंगा नदींत प्रवेश केला व म्हटलें. 'जी तूं अशा मोठमोठ्या देहांनीं युक्त असलेल्या श्वापदांनीं सुशोभित झाली आहेत, ती तूं, हे सरिच्छ्रेष्ठे, नित्य धन्य व आश्चर्य-भूषित आहेस. तूं मोठमोठ्या ऱ्हदांनीं युक्त आहेस. तपस्वी लोकांच्या आश्रमांस सुरक्षित ठेवून तूं सागराकडे वाहत जातेस.' याप्रमाणें मी गंगेस बोललों असतां ती नदी साक्षात् पुढें येऊन देवांचा गवई व इंद्राचा मित्र असलेला ब्राह्मण जो मी नारद त्या मला म्हणाली. हे देवगायका, संग्राम व कलहप्रिय नारदा, नको, असें म्हणूं नको. हे ब्राह्मणश्रेष्ठा, मी धन्य नाहीं व आश्चर्यानें मंडितः झालेलीही नाहीं. तुजसारख्या कधींच असत्य न बोलणाराचें हें वाक्य मला फार पीडा देतें. ब्राह्मणा, या लोकीं सर्व आश्चर्य व धन्य असा एक समुद्रच आहे. कारण त्यांत माझ्यासारख्या विस्तीर्ण शेंकडों नद्या प्रवेश करितात.

हें तिचें वाक्य ऐकून मी सागराकडे गेलों. व त्याला म्हटलें 'हे महासागरा, तूं सर्व लोकांस आश्चर्यभूत व धन्य आहेस. कारण, तूं जलेश्वर असून सर्व प्रकारच्या जलांचें उत्पत्तिस्थानही आहेस. सर्व-लोकवंद्य व लोकांस पवित्र करणाऱ्या तुझ्या पत्न्या या जलवाहिनी नद्या तुला येऊन मिळतात, हें अगदीं उचित आहे. मी असें बोललों असतां, वायूच्या प्रेरणेमुळें आपले जलौघाचा तळ फोडून वर निघालेला समुद्र मला म्हणाला. 'हे देवांच्या गायका, असें म्हणूं नकोस. मी आश्चर्यरूप नाहीं. तर हे ब्राह्मणश्रेष्ठा, ही पृथ्वी धन्य आहे. कारण मीही तिच्या आधारावर आहें. तेव्हां पृथ्वीवांचून या लोकीं अधिक आश्चर्य दुसरें कोणतें असणार ?'

नंतर मी सागराच्या सांगण्यावरून पृथ्वीकडे गेलों व भूतळीं उभा राहिलों व कौतुकयुक्त होऊन जगाची गति अशा त्या पृथ्वीला म्हटलें, 'सर्व देहवानांची योनि अशा प्रकारचे हे धरित्रि, शोभने, खरोखर तूं धन्य आहेस. अतिक्षमेनें युक्त असलेले देवि, भूतांमध्यें तूं आश्चर्यही आहेस. तूं भूतांची धरणी (धारण करणारी) व मानवांची अरणि आहेस. तुझ्यापासून क्षमा उत्पन्न झाली. आकाशमार्गी प्राण्यांचें कर्मही तुजपासूनच झालें." माझ्या ह्या स्तुतिवाक्यानें क्षुब्ध झालेली भूमि आपले अंगचें स्वाभाविक धैर्य सोडून मजपुढें प्रकट झाली व मला म्हणाली, 'हे देवगंधर्वा, ज्याला संग्राम व कलह प्रिय आहे अशा नारदा, नको असें म्हणूं नको. मी धन्य नाहीं व आश्चर्यही नाहीं. कारण, ही माझी धृति परकीयापासून प्राप्त झालेली आहे. बा ब्राह्मणवर्या, हे धन्य पर्वत[१] मला धारण करीत असतात. तेच आश्चर्यरूप आहेत. तेच लोकांचे हेतु (कारण) आहेत."

पृथ्वीचें हें वाक्य ऐकून मी पर्वतांकडे गेलों व म्हणालों 'तुम्ही धन्य दिसतां. हे भूधरांनो, तुम्ही बहुत आश्चर्यकारक आहां. सुवर्ण, उंची रत्नें व विशेषतः धातु यांचें तुम्हीं धारण करितां यास्तव तुम्हींच सर्व या भूलोकीं शाश्वत खाणी आहां' माझें हें भाषण ऐकून स्थावरांतील श्रेष्ठ व वनांच्या योगानें सुशोभित झालेले पर्वत मला असें सांत्वनयुक्त वचन बोलले, "हे ब्रह्मर्षे, आम्ही धन्य नव्हे. व आमचे ठिकाणीं आश्चर्यकारक कांहीं नाहीं. ब्रह्मा, प्रजापति धन्य आहे. तो सर्व देवांमध्येंही आश्चर्यरूप आहे." तें ऐकून मी सर्वांस उत्पन्न करणाऱ्या प्रजापतीकडे जाऊन त्या वाक्याचा

१ त्याबद्दलच संस्कृतांत पर्वताला भूधर (पृथ्वीला धारण करणारा) असें म्हटलें आहे.

पूर्ण अर्थच जणूं काय पाहूं लागलों. लोकांची योनि अशा त्या चतुर्मुख ब्रह्मदेवाजवळ अशा परंपरेनें मी गेलों. आणि प्रणाम करून व खालीं तोंड करून ( नम्रतेनें ) म्हटलें "देवा मीं माझ्या व पर्वताच्या संभाषणाचे अखेरीस जी मुख्य गोष्ट ऐकिली आहे, ती तुज कमलयोनीला सांगतों. ती हीच कीं, तूंच एक देव जगाचा गुरु, धन्य व आश्चर्य आहेस. तुझ्या तुलनेला दुसरें कोणीही भूत ( प्राणी ) मला दिसत नाहीं. हें सर्व स्थावरजंगमात्मक जगत् तुझ्यापासूनच झालें आहे. या लोकांतील देव व दानव यांसह मानव, भूतें, इंद्रियें व दुसरेंही सर्व दृश्य व अदृश्यरूप जगत् हे देवेशा, तुजपासून होतें. व त्यामुळेंच तूं देवांचा सनातन देवदेव आहेस. तूं त्या लोकांचा उत्पन्नकर्ता व आदिकारण आहेस." माझें हें भाषण ऐकून भगवान् लोकपितामह ब्रह्मा ह्मणाला. "नारदा, धन्य व आश्चर्य या शब्दांनीं युक्त अशी तूं माझी स्तुति कां करितोस? नारदा, परम आश्चर्य वेद आहेत, व ते धन्य होत. कारण, त्यांना सत्य काय तें कळलेलें असून तेच लोकांस धारण करीत असतात. ऋक्, यजु व साम यांतील सत्य व अथर्व वेदामध्यें असलेलें जें मत, तन्मय मी आहें, असें समज. हे ब्राह्मणा, वेदांनीं मला धरिलें आहे व मी त्यांना धरिलें आहे.

स्वयंभू परमेष्ठीच्या या वचनानें प्रेरित झालेला मी आपल्या बुद्धीच्या विस्ताराप्रमाणें वेदांचें उपस्थान करूं लागलों. स्वयंभूच्या सांगण्यावरून वेदांचें उपस्थान करावयास सिद्ध झालेला मी, मंत्रप्रवचनयुक्त ( म्हणजे ब्राह्मणांसह ) त्या चार वेदांस म्हटलें, तुम्ही धन्य, पुण्य, नित्य आश्चर्यभूषित व ब्राह्मणांला आधारभूत आहां, असें प्रजापतीनें मला सांगितलें आहे. स्वयंभूकडूनही तुमच्याकडे हा मोठा प्रश्न उलगडण्याकरितां आला आहे. श्रुति किंवा तप यांच्या योगानें प्राप्त होणारें तुमच्यापेक्षां पलीकडे दुसरें कांहीं नाहीं." तेव्हां माझ्या भोंवतीं उभे राहिलेले वेद मला म्हणाले—'आत्मपरायण असलेले यज्ञ आश्चर्यमय व धन्य आहेत. कारण, धात्यानें आह्मांला यज्ञाकरितां उत्पन्न केलें आहे. यास्तव, यज्ञ आमच्यापेक्षां श्रेष्ठ आहेत. स्वयंभूहून वेद श्रेष्ठ आहेत व वेदांहून क्रतु श्रेष्ठ आहेत." हें ऐकून गार्हपत्याग्नीनें पुरस्कृत असलेल्या यज्ञांस मीं म्हटलें 'अहो यज्ञांनो, तुमच्या ठिकाणीं परमतेज दिसतें. असें ब्रह्मदेवानें सांगितलें आहे व वेदांनींही उल्लेख केला आहे. यावरून तुमच्यापेक्षां अधिक आश्चर्य या जगांत दिसत नाहीं. खरोखर तुम्हीं धन्य आहां. कारण तुम्ही द्विजांचे स्ववंशज आहां. अग्नींची तृप्ति देखील तुमचे घरीं होते. तुमच्यामध्यें अर्पण केलेल्या हविर्भागांच्या योगानेंच सर्व देव व मंत्रांच्या योगानें सर्व महर्षी तृप्त होतात. या माझ्या वाक्यानंतर अग्निष्टोमादिक यज्ञ माझ्यापुढें प्रकट झाले व यूप ( यज्ञस्तंभ ) हेच ज्यांचे ध्वज आहेत, असे ते सर्व मला उलट बोलले. "हे मुने, आश्चर्यशब्द अथवा धन्यशब्द आह्मांला शोभत नाहीं. कारण, परम आश्चर्य भगवान् विष्णु आहे. तो आमची परागति आहे. अग्नीमध्यें होमद्वारा सोडलेलें जें पवित्र आज्य आम्हीं खातों तें सर्व लोकमूर्ति पुंडरीकाक्ष देतो."

हें त्यांचें वचन ऐकून विष्णूची गति जाणण्याचे इच्छेनें मी येथें भूलोकीं उतरलों. आणि तुम्हांमध्यें बसलेल्या कृष्णाला मीं पाहिलें. हे राजांनो, तुमच्यामध्यें बसलेल्या याला "हे जनार्दना, तूं आश्चर्य व धन्य आहेस" असें मीं म्हटलें. व त्याचें त्यानें मला 'दक्षिणांसह'

असें उत्तर दिलें. तेवढेंच माझ्या समाधानास पुरेसें झालें. कारण, सर्व यज्ञांची गति दक्षिणेसह विष्णु आहे. त्यामुळें 'दक्षिणांसह' या एवढ्याच उत्तरानें माझी शंका संपली. परंपरेनें या लोकीं आलेलें व पूर्वी कूर्मानें सांगितलेलें हेंच वाक्य, 'धन्य व आश्चर्य' दक्षिणेसह या पुरुषामध्यें प्रतिपादित आहे. म्हणून, 'दक्षिणांसह' हें वाक्य माझ्या समाधानास पुरेसें आहे. सर्व यज्ञांची गति 'दक्षिणांसह, विष्णु आहे.' या वाक्याचा निर्णय जो आपण मला विचारला त्याचें हें सर्व उत्तर मी तुम्हांस सांगितलें. आतां मी आपल्या मार्गानें जातों.

इतकें बोलून नारद स्वर्गास गेले असतां, ते सर्व राजे विस्मित होऊन सैन्य व वाहनें यांसह आपल्या राष्ट्रास गेले. इकडे, वीर यदुनन्दन, जनार्दनही अग्नितुल्य यादवांसह आपल्या गृहांत गेला.

## अध्याय एकशें अकरावा.

—:०:—

### वासुदेव–माहात्म्य

जनमेजय ह्मणतातः—हे द्विजश्रेष्ठा, जगत्पति महाबाहु कृष्णाचें श्रेष्ठ माहात्म्य मी पुनरपि ऐकण्याची इच्छा करितों. कारण त्या धीमान् व पुराणमाहात्म्याच्या कर्मांची परंपरा ऐकत असतां माझी तृप्ति होत नाहीं.

वैशंपायन सांगतातः—हे महाराज, शेंकडों वर्षांनींही गोविंदाच्या प्रभावाचा अंत बोलून लावतां येण्यासारखा नाहीं. यास्तव, आतां हा अद्भुत वृत्तांत ऐक. हे कौरवा, शरशय्येवर निजलेल्या भीष्मानें प्रेरणा केली असतां गांडीवधारी अर्जुनानें राजांमध्यें बसलेल्या जितशत्रु युधिष्ठिरनामक आपल्या श्रेष्ठ भ्रात्याला जें सांगितलें तेंच आतां ऐक.

अर्जुन ह्मणतोः—पूर्वी मी आप्तमित्रांस भेटण्याकरितां द्वारकेस गेलों होतों. तेथें भोज, वृष्णि-अंधकश्रेष्ठांकडून माझा सत्कार झाला व मी तेथें राहिलों. नंतर एकदां, धर्मात्मा महाबाहु मधुसूदन यानें 'एकाह' संज्ञक सोमयागाची शास्त्रोक्त विधीनें दीक्षा घेतली. इतक्यांत एक उत्तम द्विज दीक्षा घेतलेल्या कृष्णाकडे येऊन "त्राहि, त्राहि" असें म्हणून विनंती करूं लागला. ब्राह्मण म्हणाला, 'हे विभो, रक्षण करणें हाच तुझा अधिकार आहे. करितां, माझें संरक्षण कर. रक्षकाला धर्माचें चतुर्थांश फळ मिळत असतें." तेव्हां वासुदेव म्हणाला, हे ब्राह्मणश्रेष्ठा, भीऊं नकोस, तुझें कल्याण असो. तुला कोणापासून भय आहे, तें खरें सांग. मग कठीण असलें तरी मी तुझें रक्षण करितों.

ब्राह्मण म्हणालाः—हे महाबाहो, निष्पापा, मला जो जो पुत्र होतो तो तो हरण केला जातो याप्रमाणें आजवर माझ्या तीन पुत्रांना कोणी हरण करून नेलें. आतां या चवथ्याचें तरी तूं रक्षण कर. माझ्या स्त्रीचा आज प्रसूति-काल आहे, तर त्या वेळीं रक्षण कर. हे जनार्दना, माझें अपत्य जिवंत राहील असें कर. अर्जुन म्हणालाः त्यानंतर गोविंद मला म्हणाला, 'मी यज्ञदीक्षा घेतली आहे. पण, कोणत्याही स्थितींत असलों तरी आम्हांला ब्राह्मणांची रक्षा कर्तव्य आहे! हे राजा, कृष्णाचें हें वचन ऐकून मी (अर्जुनानें) त्याला म्हटलें 'गोविंदा, माझी योजना कर म्हणजे मी भीतीपासून ब्राह्मणाचें रक्षण करितों. मी असें म्हटलें असतां जनार्दन हंसून मला म्हणाला "तूं ना? रक्षण करशील" तों मला असें बोलला असतां मी लज्जित झालों. पण हे नराधिपा, मी लज्जित झालों आहें, असें जाणून जनार्दन पुनरपि म्हणाला,

[1]विष्णु हा यज्ञस्वरूप आहे ( यज्ञो वै विष्णुः ) आणि 'दक्षिणेवांचून' कोणताही यज्ञ सांग होत नाहीं याला अनुलक्षून कृष्णानें "दक्षिणेसह" हें उत्तर समजावें.

' कौरवश्रेष्ठा, रक्षण करितां येणें शक्य असेल तर जा. महाबाहु राम व महाबल प्रद्युम्न यांवांचून तूं ज्यांचा नायक आहेस असे वृष्ण्यंधक महारथ यांसह पाहिजे तरी रक्षणार्थ घेऊन जा. त्यानंतर मी मोठ्या यादवसैन्यानें परिवेष्टित होऊन व त्या ब्राह्मणाला पुढें घालून सैन्यासह निघालों.

## अध्याय एकशें बारावा.

—:०:—

### अर्जुनाची फजीती.

अर्जुन सांगतो:—हे भरतश्रेष्ठा, थोडक्याच वेळांत आम्ही त्या ब्राह्मणाच्या गांवास जाऊन पोहोंचलों व अश्वांना विश्रांति देऊन सर्व त्या ब्राह्मणाच्या घराकडे निघालों. त्यानंतर मोठ्या यादवसैन्यासह मी गांवाच्या मध्यभागीं तळ दिला. पण इतक्यांत दिशा पेटल्यासारख्या होऊन पक्षी व दीप्त पशु क्रूर ध्वनि करूं लागले व आपल्या आक्रोशांनीं ते मला भय सुचवूं लागले. सर्वत्र संध्याकाळासारखा लाल वर्ण झाला. सूर्य निस्तेज झाला. मोठा उल्कापात झाला. पृथ्वी कांपूं लागली. तेव्हां ते अंगावर शहारे आणणारे मोठे उल्कापात पाहून युद्धोत्सुक लोकांना सज्ज व्हावयाची मीं आज्ञा केली. त्या वेळीं युयुधानप्रभृति सर्व वृष्ण्यंधक महावीर सज्ज होऊन रथावर बसले व स्वतः मीही रथारूढ झालों. मध्यरात्रीच्या सुमारास भयभीत झालेला ब्राह्मण मजपाशीं येऊन भयानें कांपत आह्मांला म्हणाला ' माझ्या स्त्रीचा प्रसूतिकाळ हा आतां ठेपला आहे; आतां माझी फसगत न होईल अशा रीतीनें तुम्ही दक्ष रहा. ' थोडक्याच वेळानें ब्राह्मणाच्या घरांत " पुत्र नेत आहेत, हा त्याला नेला हो, " असा आर्त रुदित ध्वनि मीं ऐकला. त्याच्या मागोमाग आकाशांत बालकाचें असें वचन ऐकूं आलें कीं, ' मला कोणी नेत आहे. पण नेणारा राक्षस मला दिसत नाहीं. '

त्यानंतर आम्ही सर्वांनीं शरवृष्टींनीं चोहोंकडून सर्व दिशा भरून सोडल्या. तथापि, त्या बालकाला हरण केलेंच. त्या कुमाराला हरण करून नेलें असतां ब्राह्मणानें आर्त स्वर उच्चारून मला कठोर व तीव्र शब्द ऐकविले. त्यामुळें यादव खट्टु झाले. त्याचप्रमाणें मलाही सुचेनासें झालें. तो ब्राह्मण विशेषतः मला म्हणाला, ' मी रक्षण करीन ' असें म्हणून तूं माझ्या पुत्राचें रक्षण केलें नाहींस, यास्तव आतां ओळीस आलें तें ऐक. अमितबुद्धि कृष्णाशीं तूं सतत व्यर्थ स्पर्धा करीत असतोस. हाच जर येथें गोविंद असता तर असा घात झाला नसता. ज्याप्रमाणें रक्षणकर्त्याला चतुर्थांश धर्मफळ मिळतें, त्याचप्रमाणें, हे मूढा, रक्षण न करणारा पापाच्या चतुर्थ भागास पात्र होतो. ' मी रक्षण करीन ' असें तूं बोललास मात्र. पण रक्षण करण्यास समर्थ नाहींस. तुझें हें गांडीव व्यर्थ आहे. तुझें वीर्य व यशही व्यर्थ आहे. त्यावर ब्राह्मणास कांहीं एक उत्तर न करितां मी जेथें महातेजस्वी कृष्ण होता तेथें यादवांसह यावयास निघालों. नंतर द्वारवतीस जाऊन मधुसूदनास भेटलों. तेव्हां गोविंदानें लज्जित व शोकसंतप्त झालेल्या मजकडे पाहिलें. इतक्यांत तो ब्राह्मणही मला लाजलेला पाहून कृष्णासंनिध माझी निंदा करीत म्हणाला " केवढी माझी मूर्खता! पाहा कीं, मी या नपुंसकाच्या वचनावर विश्वास ठेविला. जेथें प्रद्युम्न, अनिरुद्ध, राम व केशवही रक्षण करण्यास समर्थ नाहींत, तेथें दुसरा कोण समर्थ असणार ? व्यर्थ वल्गना करणाऱ्या मूर्खाच्या गर्जनेस धिःक्कार असो. आत्मश्लाघा करणाऱ्या वीराच्या धनु-

ष्यास धिक्कार असो. हा दुर्बुद्धि मूर्खपणानें असल्या गोष्टींत पडला, हें त्याचें दैवच फिरलें."

राजन्, तो महर्षि असा शाप देऊं लागला असतां, वैष्णवी विद्येचा आश्रय करून भगवान् यम ज्या दिशेंत आहे, त्या दिशेस ( म्ह० दक्षिणेस ) मी गेलों. पण तेथें ब्राह्मणाचें अपत्य न मिळाल्यामुळें तेथून पूर्वेस गेलों. नंतर क्रमानें आग्नेयी, नैर्ऋती, सौम्या, उदीची व पश्चिम या दिशांस जाऊन मी शोध केला. शस्त्र उचलून मी रसातळ, स्वर्गपृष्ठ व दुसरीं स्थानें यांत हिंडलों. पण द्विजपुत्र सांपडला नाहीं. यामुळें आपली प्रतिज्ञा सत्य करितां येत नाहीं असें पाहून मी अग्नींत प्रवेश करण्याचा निश्चय केला. पण कृष्ण व प्रद्युम्न यांनीं माझा निषेध केला व म्हटलें, 'वीरा, अशी आपलीच अवज्ञा आपण करूं नकोस. तुला आम्ही द्विजपुत्र दाखवूं. व हे मानवा, तुझी विपुल कीर्ति या लोकीं प्रस्थापित करूं.' असें मला प्रेमानें बोलून व माझें समाधान करून माधवानें ब्राह्मणाचेंही सांत्वन केलें. व सुग्रीव, शैब्य, मेघपुष्प व बलाहक या घोड्यांस रथाला जोड म्हणून तत्काळ सांगून ब्राह्मणास रथावर बसवून व दारुकाला खालीं उतरावयास सांगून तो शौरी 'सारथ्य कर,' असें मला म्हणाला. नंतर हे कुरुश्रेष्ठा मी, ब्राह्मण व कृष्ण असे तिघे रथावर बसून उत्तर दिशेस निघालों.

## अध्याय एकशें तेरावा.

—:०:—

### ब्राह्मणाचा पुत्र कृष्ण परत देतो.

अर्जुन म्हणालाः—' त्यानंतर अनेक पर्वत, नद्या व वनें उलंघून वरुणालय जो सागर त्यास मीं पाहिलें. तेव्हां मूर्तिमान् सागर हात जोडून उठला व अर्घ्य घेऊन कृष्णापाशीं आला, आणि 'मी काय करूं?' असें म्हणाला. तेव्हां त्याच्या पूजेचा स्वीकार करून कृष्ण त्यास उलट बोलला, 'हे नदीपते, तूं आपल्या मधून माझे रथाला मार्ग द्यावा, अशी मी इच्छा करितों. तेव्हां तो समुद्र हात जोडून गरुडध्वजास म्हणाला, 'भगवन्, कृपा करून अशी इच्छा करूं नको. कारण, मी आपल्यामधून तुला मार्ग दिला तर दुसरा असाच जाऊं पाहील. पण, जनार्दना, तूंच माझी पूर्वीं स्थापना केली आहेस. मी अगाध आहें. तूं माझ्यामधून वाट पाडलीस म्हणजे मी गमनीय होईन. मग दर्पानें मोहित झालेले दुसरे राजेही तुजप्रमाणेंच पार जातील. यास्तव, हे गोविंदा, या सर्व गोष्टींचा विचार करूच जें योग्य दिसेल तें कर." वासुदेव म्हणाला, "सागरा, मजकरितां व या ब्राह्मणाकरितां माझें वचन मान्य कर. मजवांचून दुसरा कोणीही मानव तुझें धर्षण करणार नाहीं." तेव्हां समुद्र पुनः जनार्दनास म्हणाला, 'मला तुमचे शापाची मोठी भीतिः वाटते म्हणून मी तुमचे म्हणण्याप्रमाणें करितों. मी जल शोषून मार्ग करितों; म्हणजे, हे केशवा, त्यांतून तूं रथ, सारथि व ध्वज यांसह जाशील.'

वासुदेव म्हणालाः—' मीं तुला पूर्वीं असा वर दिला आहे कीं, तूं सुकणार नाहींस व मानवांस तुझ्यांतील नानाप्रकारच्या रत्नसंचयाचें ज्ञान होणार नाहीं. याकरितां, हे साधो, तूं जल-स्तंभन कर. म्हणजे मी त्यावरून रथारूढ होऊन जाईन. तुझ्या रत्नांचें प्रमाण कोणताही पुरुष जाणणार नाहीं. सागरानें 'बरें आहे' असें म्हटल्यावर भूमीवरून जात असल्याप्रमाणेंच रत्नासारख्या दीप्त स्तंभित जलमार्गानें आम्ही जाऊं लागलों. त्यानंतर समुद्राचें उल्लंघन करून व उत्तरकुरूंच्याही

पलीकडे जाऊन एका क्षणांत गंधमादन पर्वताचें अतिक्रमण केलें. तेव्हां जयंत, वैजयंत, नील, रजत पर्वत, महामेरु, कैलास व इंद्रकूट या नांवांचे सप्त पर्वत निरनिराळीं रूपें धारण करून केशवापाशीं आले. व जवळ उभे राहून 'आम्ही काय करूं?' असें बोलले. तेव्हां मधुसूदनानें त्यांचें यथाविधि स्वागत केलें. नंतर प्रणाम करून नम्र झालेल्या सप्त पर्वतांना मधुसूदन म्हणाला, 'तुमचे शिखरांवरून आज रथमार्ग द्या.' तेव्हां कृष्णाचें वचन ऐकून तें मान्य करून पर्वतांनीं त्याच्या इच्छेप्रमाणें त्याला जाण्यास मार्ग दिला व ते सर्व तेथेंच गुप्त झाले. खरोखर त्याचें मला मोठें आश्चर्य वाटलें. मेघसमूहावरून जाणाऱ्या सूर्याप्रमाणें आमचा रथ कोठेंही न अडतां जाऊं लागला. सप्त द्वीपें, सप्त सागर, सप्त पर्वत व लोकालोक पर्वत यांचें उल्लंघन करून तो फार मोठ्या अंधकारांत शिरला. नंतर जातां जातां एके ठिकाणीं घोडे मोठ्या कष्टानें रथ ओढूं लागले. अंधकार चिखलासारखा गाढ होता. त्याचें स्पर्शज्ञानही होत असे इतका दाट होता. पुढें पुढें तर तो पर्वतासारखा घन झाला. तेव्हां घोड्यांचा कांहीं प्रयत्न चालेना. ते कुंठित होऊन उभे राहिले. ते वेळीं गोविंदानें आपल्या चक्रानें अंधकाराचें निवारण केलें. व घोड्यांना आकाशासारखा मोकळा उत्तर रथमार्ग दाखविला. जेव्हां एकदा तमांतून निघून आकाश दिसलें तेव्हां, आतां मीं जिवंत राहीन असें मला वाटलें व माझें भय गेलें. त्यानंतर आकाशांत प्रज्वलित तेज दिसलें. तें सर्व लोकांमध्यें प्रवेश करून पुरुषाकार होऊन राहिलें. त्या दीप्त समुद्रांत हृषीकेश तत्काळ शिरला. मी व तो उत्तम ब्राह्मण रथावर बसून राहिलों. दोन घटकांनीं तो प्रभु कृष्ण त्या तेजांतून ब्राह्मणाच्या चारी पुत्रांस घेऊन बाहेर पडला. व त्या जनार्दनानें ते सर्व पुत्र ब्राह्मणास अर्पण केले. सर्व म्हणजे पूर्वीं झालेले तीन, व नुकताच झालेला चवथा, असे चार बालक त्याला मिळाले. हे प्रभो, त्या पुत्रांस पाहून ब्राह्मण फार आनंदित झाला. मीही अतिशय संतुष्ट व विस्मित झालों. नंतर आम्हीं सर्व व ते ब्राह्मणपुत्र गेल्या मार्गानें परत आलों. आम्ही एका क्षणांत द्वारकेस येऊन पोहोंचलों. मध्यान्ह होण्यापूर्वीं आम्हीं पुनः परत ठिकाणीं आलों असें पाहून मला वारंवार मोठा विस्मय वाटला. नंतर महायशस्वी कृष्णानें पुत्रांसह त्या ब्राह्मणाला भोजन घातलें व पुष्कळ धन देऊन घरीं रवाना केलें.

१ या ठिकाणीं "लिंपतीव तमोऽङ्गानि । सुष्टिग्राह्यं तमः कुरुते." या मच्छकटिकांतील ओळींचें स्मरण होतें.

## अध्याय एकशें चौदावा.

—:o:—

### गूढोद्घाटन.

अर्जुन म्हणालाः—त्यानंतर कृष्ण ऋषितुल्य अनेक ब्राह्मणांस भोजन घालून कृतकृत्य झाला. हे भारता, वृष्णी, भोज व मी, यांसह भोजन करून कृष्ण दिव्य व विचित्र गोष्टी सांगत बसला. त्या गोष्टी संपल्यावर मी जनार्दनापाशीं गेलों व जसें पाहिलें होतें तसेंच तें वृत्त त्याला विचारलें. मीं पुसलें, 'कमलनयना, तूं समुद्राचें जल स्तब्ध कसें करितोस व पर्वताला तें मोठें विवर कसें पाडलेंस? अच्युता, तें घोर घनतम तूं चक्रानें कसें विदीर्ण केलेंस? तूं त्या परम तेजांत कसा प्रवेश केलास? प्रभो, त्या ठिकाणीं कोणीं मोठ्या यक्षानें त्या बालकांना कां हरण केलें? एवढा लांब मार्ग तूं संक्षिप्त कसा केलास? आणि आम्ही अगदीं

थोड्या कालांत कसे जाऊं येऊं शकलों? हें सर्व हे केशवा, मला असेल तसें खरें सांग.

वासुदेव म्हणाला:—'ब्राह्मणाकरितां कृष्ण येईल, एरव्हीं कधींही येणार नाहीं. असें जाणून त्या महात्म्यानें माझ्या दर्शनाकरितां त्या बालकांना नेलें. अर्जुना, तूं जें तेजोमय, दिव्य व फार मोठें ब्रह्म पाहिलेंस तो मीच असून तें माझेंच सनातन तेज आहे. माझी ती व्यक्ताव्यक्ता सनातन प्रकृति आहे. तिच्यामध्यें प्रवेश करून उत्तम योगवेत्ते या संसारांतून मुक्त होतात. हे पार्था, ती ज्ञान्यांची व तपस्वी योग्यांची गति आहे. तेंच परमपद ब्रह्म आहे. तें सर्व जगाचा विभाग करितें. हे भारता, मीच तें घन तेज आहें. हें तूं समजून घे. स्थिर जलयुक्त समुद्र तरी मीच, जलाचें स्तंभन करणाराही मीच. तूं पाहिलेले विविध सप्तपर्वत चिखलासारखा दाट तिमिरही मीच. मींच त्याचें विदारण केलें. मीच भूतांचा काळ व सनातन धर्म आहें. चंद्र व आदित्य, मोठमोठे पर्वत, नद्या, सरोवरें व चार दिशा, हें माझेंच चतुर्विध रूप आहे. चातुर्वर्ण्य माझ्यापासूनच झालें. चार आश्रमही मीच प्रवृत्त केले. हे भारता, मी चातुर्विद्यांचा कर्ता आहें असें जाण.

अर्जुन ह्मणाला:—हे सर्वभूतेश, भगवन् तुझें खरें स्वरूप जाणण्याची मला फार इच्छा आहे. एवढ्यासाठीं मी तुला शरण येऊन प्रश्न करीत आहें. हे पुरुषोत्तमा, तुला वंदन करितों. वासुदेव म्हणाला, हे पांडवा, अति उग्र व फार मोठें ब्रह्म, ब्राह्मण, तप व सत्य हें सर्व मजपासूनच झालें आहे असें जाण, हे महाबाहो धनंजया, मी तुला प्रिय आहें व तूं मला प्रिय आहेस. यास्तव मी तुला सांगतों. मी उगीच कांहीं तरी सांगूं इच्छित नाहीं. मी यजुर्मंत्र, सामें, ऋचा व अथर्वणमंत्र आहें. हे भरतश्रेष्ठा, ऋषि, देव व यज्ञ हें माझेंच तेज आहे. पृथ्वी, जल, तेज, वायु व पांचवें आकाश, चंद्र, सूर्य, अहोरात्र, पक्ष व मास, ऋतु मुहूर्त, कला, क्षण, संवत्सर, विविध मंत्र, सर्व शास्त्रें, विद्या व सर्व वेद्य, हे पार्था, मजपासून प्रकट झाले. हे कुंतीपुत्रा, उत्पत्ति व प्रलय मत्स्वरूपच आहेत. सत् व असत् हें माझेंच स्वरूप आहे. कार्य व कारण यांहून निराळें असणारें परब्रह्म मी आहें.

अर्जुन ह्मणाला:—धर्मराज, कृष्णानें प्रसन्न होऊन मला असें सांगितलें. तेणेंकरून माझें मन सतत जनार्दनामध्यें स्थिर झालें. हे राजेंद्रा, मला विचारतोस तें हें केशवाचें माहात्म्य मीं ऐकिलें व पाहिलें आहे. तस्मात् जनार्दन सर्वांहून श्रेष्ठ आहे.

वैशंपायन सांगतात:—हें ऐकून धर्मात्मा कुरुश्रेष्ठ युधिष्ठिर पुरुषोत्तम गोविंदाची मनानें पूजा करता झाला. तो राजा सर्व बाधवांसह व तेथें येऊन बसलेल्या राजांसह विस्मित झाला.

## अध्याय एकशें पंधरावा.

—:०:—

### वासुदेवमाहात्म्य.

जनमेजय विचारितो:—हे द्विजश्रेष्ठा, त्या बुद्धिमान् यदुसिंहाचीं अनंत कर्में तत्त्वतः ऐकण्याची मला इच्छा आहे. त्या महा-द्युति-मंतानें नानाप्रकारचीं अद्भुतकर्में, अगणित दिव्यकर्में व सर्वतः प्राकृतकर्मेंहीं केलेलीं मीं ऐकिलीं. व तीं विविध कृत्यें ऐकून, हे महामुने, मला मोठें प्रेम उत्पन्न झालें. यास्तव, हे भगवन्, ध्यान देऊन ऐकणाऱ्या मला तीं साकल्यानें सांगा.

वैशंपायन सांगतात:—हे महाबाहो, महात्म्या केशवाचीं आश्चर्यकारक कर्में बहुतच सांगितलेलीं आहेत. त्यांचा अंत लागणें शक्य

नाहीं. त्यांचा सविस्तर उल्लेख करणें शक्य नसल्याकारणानें, हे भरतश्रेष्ठा, मला संक्षेपतःच सांगणें भाग आहे. अमित वीर्यवान् व प्रख्यात उदार कर्में करणाऱ्या विष्णूचीं कृत्यें मी क्रमानें सांगतों. तीं, हे राजा, एकचित्तानें ऐक.

द्वारवतींत रहात असतां धीमान् यदुसिंहानें महात्म्या मुख्य राजांच्या राष्ट्रांस खळबळून सोडिलें. पुनः प्राग्जोतिषपुरास जाऊन त्या महात्म्यानें यादवांचें छिद्र पाहात बसलेल्या विचक्र दानवाला मारिलें. त्यानें समुद्रांत दुष्ट नरक दानवास मारलें. रणांत इंद्राला जिंकून पारिजात बलानें हरण केला. लोहित डोहांत भगवान् वरुणाला जिंकलें. दक्षिणापथीं कारुष दंतवक्त्रास मारिलें. शंभर अपराध भरले तेव्हां शिशुपालाला मारलें. शोणित-पुराला जाऊन, शंकरानें ज्याचें रक्षण केलें आहे अशा सहस्र बाहु धारण करणाऱ्या महावीर्यवान् बलि-पुत्र बाणाला घोर संग्रामांत जिंकून, हे राजा, कृष्णानें जिवंत सोडून दिलें. मेरुपर्वतामध्यें त्या माहात्म्यानें अग्नीला जिंकलें. रणांत शाल्वाला जिंकलें, सौभाला मारलें. सागरास क्षुब्ध करून पांचजन्याला वश करून घेतलें. हयग्रीवाला मारलें. दुसऱ्या महाबलाढ्य राजांचा नाश केला. जरासंधास मारवून सर्व राजांना मुक्त केलें. एक रथानें सर्व राजांस जिंकून गांधारकन्येचें हरण केलें. राज्यभ्रष्ट झालेल्या दुःखी पांडवांचें सर्वपरी रक्षण केलें. इंद्राचें खांडववन जाळविलें. अग्नीनें दिलेलें गांडीव धनुष्य अर्जुनास दिलें. हे जनमेजया, घोर युद्धप्रसंगीं पांडवांचें दूतकर्म केलें. या यदुमुख्यानें यदुवंश वाढविला. भारतयुद्ध संपल्यावर मी तुझ्या पुत्रांस परत तुजपाशीं आणून देईन अशी कुंतीच्या समक्ष पांडवांच्या रक्षणाविषयीं प्रतिज्ञा केली. अति भयंकर शापा-पासून महातेजस्वी नृगाला सोडविलें. काल या नांवानें प्रख्यात असलेल्या यवनाला मारिलें. मैंद व द्विविद[1] या नांवाच्या दोघां महा वीर्यवान् वानरांस व जांबवानास युद्धांत पराभूत केलें. त्या कृष्णाच्याच तेजानें यमाच्या स्वाधीन झालेला सांदीपनी गुरूचा पुत्र व तुझा पिता जिवंत झाला. श्रेष्ठ नरांचा क्षय करणारे अनेक घोर संग्राम उपस्थित झाले. जनमेजया, युद्धांत अद्भुत जय मिळवून कृष्णानें सर्व राजांना कसें मारिलें, तें मीं तुला सांगितलेंच आहे.

## अध्याय एकशें सोळावा.

—:०:—

### बाणासुराचें आख्यान.

जनमेजय विचारतोः—हे ब्राह्मणश्रेष्ठा, हे विद्वद्वर्य, मी तुमच्यापासून बुद्धिमान् यदुश्रेष्ठ वासुदेवाचीं अपरिमित कर्में ऐकिलीं आहेत. पण, बाण या नांवाच्या असुराविषयीं जें तुम्हीं पूर्वीं सांगितलें, तें मी विस्तारानें ऐकूं इच्छितों. हे तपोधना, तो असुर देवाधिदेव शंकराचा पुत्र कसा झाला ? हे ब्राह्मणा, स्वतः महात्म्या शंकरानें व सहवासानें परिचित झालेल्या सगण कार्तिकानें त्याचें रक्षण केलें. बाण हा बलवान् बळीचा पुत्र व शंभर भावांतील वडील पुत्र होता. तो शेंकडों दिव्य अस्त्रें धारण केलेल्या सहस्रबाहूंनीं वेष्टित असे. त्यासभोंवतीं अतिधिप्पाड शरीरांचे बलाढ्य वीरही होते. मग अशा त्या बाणाला वासुदेवानें युद्धांत कसें जिंकिलें. व अतिशय क्षुब्ध होऊन युद्धाची इच्छा करणाऱ्या त्याला भगवानानें जिवंत कां सोडलें ?

वैशंपायन सांगतातः—राजन्, अपरिमित

[1] या द्विविद वानराचें स्मरण केल्यानें हिमज्वर जातो असें लोलिंबराजानीं आपले वैद्यजीवन नामक ग्रंथांत लिहिलें आहे.

तेजस्वी कृष्णाचा बाणासुराशीं मनुष्यलोकीं मोठा संग्राम कसा झाला व त्या संग्रामांत रुद्र व स्कंद यांचें ज्याला साहाय्य आहे, अशा रणश्लाघी बलिपुत्राला जिंकूनही वासुदेवानें जिवंत कसा सोडला, महात्म्या शंकरानें त्याला वर कसा दिला, तसेंच त्याला नित्य सांनिध्य व रुद्रगणांचें अक्षय्य आधिपत्य कसें दिलें, त्याचप्रमाणें जिवंत सुटण्यास कारण झालेलें तें बाणाचें युद्ध कसें झालें, तो असुर महादेवपुत्र कसा झाला व तें मोठें युद्ध कशाकरितां झालें, तें सर्व ध्यान देऊन ऐक.

एकदां खेळ खेळत असलेल्या महात्म्या कुमारस्वामींचें शरीर पाहून महावीर्यवान् बलिपुत्र अतिशय विस्मित झाला व अति दुश्चर तप करण्याची त्याला बुद्धि झाली. कारण तपाच्या योगानें रुद्राची आराधना केल्यास स्कंदाप्रमाणेंच मीही त्याचा पुत्र होईन असें त्याला वाटलें. नंतर त्यानें आपलें शरीर तपानें सुकवून सोडिलें व मीच मोठा तपस्वी आहें, अशी त्याला घमेंड झाली. त्याचे तपानें उमेसह देव शंकर परम संतुष्ट झाला व परम प्रीत होऊन तो नीलकंठ त्या असुराला म्हणाला "तुझ्या मनांत असेल, तो वर माग." तेव्हां बाण देवाधिदेव महेश्वरास म्हणाला ' हे त्रिलोचना, तुझ्या सांगण्यावरून माता पार्वतीनें मला आपला पुत्र म्हणून स्वीकारावें, अशी मी इच्छा करितों.' त्यानंतर शंकर 'ठीक आहे,' असें म्हणून रुद्राणीस म्हणाला 'कार्तिकेयाचा हा कनिष्ठ भ्राता या नात्यानें याचें ग्रहण कर. अग्नीपासून उत्पन्न झालेला आपला सेनापति कार्तिकेय जेथें उद्भवला त्याच प्रदेशांतील उत्कृष्ट नगर जें शोणितपुर हें स्थळ याचें वसतिस्थान होईल, यांत कांहीं संशय नाहीं. हें उत्तम नगर शोणितपुर याच नांवानें प्रख्यात होईल. त्या श्रीमान् बाणाला मी सर्वथा राखीत असल्यानें त्यावर कोणीही चाल करूं शकणार नाहीं.'

या वरानंतर, शोणित नामक पुरामध्यें राहणारा तो बाण सर्व देवांस नित्य क्षुब्ध करीत राज्य करूं लागला. सहस्र बाहूंनीं युक्त असलेला तो मदोन्मत्त बाणासुर देवांना फारसें न जुमानतां सर्वदा युद्धाची इच्छा करीत असे. कुमारस्वामीनें प्रसन्न होऊन त्याला अग्नीसारखा तेजस्वी ध्वज व अति तेजस्वी मयूरवाहन दिलें होतें. रुद्राचे तेजामुळें त्याचे समोर युद्ध करण्यास देव, गंधर्व, यक्ष व पन्नग उभे राहात नसत. त्र्यंबकाचे पाठबळामुळें तो महा असुर दर्पानें उद्धट झाला. व युद्धाची इच्छा करून शंकरासमोर आला. रुद्राकडे जाऊन त्याला प्रणाम व अभिवादन करून बलिपुत्रानें त्या वृषभध्वजास म्हटलें, 'भगवन्, मी साध्य, मरुद्गण व सैन्य यांसह देवांस तुझ्या आश्रयानें व मद्बलोत्कर्षानें अनेकदां जिंकलें. त्यामुळें आतां पराजयास भ्यालेले, व माझ्या पराभवाविषयीं निराश झालेले ते सर्व या प्रदेशीं येऊन या पुरांत सुखानें रहात आहेत. ते स्वर्गपृष्ठावर येऊन सुखानें निवास करीत आहेत. व मी आतां युद्धाविषयीं निराश झाल्यानें ( माझ्याशीं युद्ध करण्यास कोणीच न राहिल्यामुळें ) मी आपल्या जीविताला कंटाळलों आहें. युद्धावांचून हे माझे बाहू मला भारभूत होत आहेत. यास्तव मला सांग कीं, मला एकादें उत्तम युद्ध प्राप्त होईल काय? युद्धावांचून माझ्या मनाला बरें वाटत नाहीं. यास्तव हे देवा, मजवर प्रसन्न हो.'

तेव्हां भगवान् शंकर हांसून म्हणाला, बाणदानवा, तूं मागतोस तसलें युद्ध कसें व केव्हां होईल तें ऐक—'तुझ्या ध्वजाचा जेव्हां ठिकचे ठिकाणींच भंग होईल, तेव्हां युद्धाचा

प्रसंग येईल.' शंकरानें असें सांगितलें असतां बाण आनंदानें पुष्कळ हंसत प्रसन्न मुखानें देवाच्या पायां पडून म्हणाला, "मोठी आनंदाची गोष्ट आहे कीं, माझ्या सहस्र बाहूंचें धारण व्यर्थ होत नाहीं. मोठी समाधानाची गोष्ट आहे कीं, मी संग्रामांत पुनः इंद्राला जिंकीन" असें बोलून आनंदाश्रूंनीं पूर्ण अशा नेत्रांनीं व पांचशें अंजलींनीं देवाची पूजा करीत तो अरिमर्दन लोटांगणीं आला. तेव्हां ईश्वर त्याला म्हणाला, वीरा, ऊठ, ऊठ, तुझ्या बाहूंना व स्वकुलाला योग्य असें एक फार मोठें व अप्रतिम युद्ध तुला प्राप्त होईल.

वैशंपायन सांगतातः—महात्म्या त्र्यंबकानें हर्षानें असें अति उत्कृष्ट वचन उच्चारिलें तेव्हां बाणानें त्याला लागलींच नमस्कार केला. नंतर, शंकरानें त्याला रजा दिली. तेव्हां शत्रूंच्या नगरांस जिंकणारा तो असुर आपल्या घरीं परत गेला व जेथें मोठें ध्वजगृह होतें तेथें जाऊन बसल्यावर हंसत हंसत, कुभांड नामक आपल्या सचिवास म्हणाला, "तुमच्या मनाजोगी प्रिय गोष्ट मी तुम्हांस सांगतों.' तें ऐकून तो सचिव रणांत अप्रतिम असलेल्या त्या बाणाला म्हणाला " राजन्, माझें कोणतें प्रिय आपण सांगणार आहां ? आपले नेत्र विस्मयानें प्रफुल्लित झाले आहेत व आपण आनंदाचे उकळींत भाषण करीत आहां. तेव्हां असें आहे तरी काय ? तें ऐकण्याची मला मोठी इच्छा झाली आहे. शंकराच्या प्रसादानें व स्कंदाच्या संरक्षणानें आपणास कांहीं वर मिळाला आहे कीं काय ? शूलपाणीनें आपणास त्रैलोक्य-राज्य करण्याची आज्ञा केली आहे कीं काय ? आणीबाणीचे युद्धांत शार्ङ्ग-गदा-धर विष्णु असल्यानें त्याचे सुदर्शनास भ्यालेले दैत्य जलाशयांत दडून असतात ( तेव्हां त्यांचें कांहीं हित झालें कीं काय ? ) तुझ्या भयानें इंद्र पाताळांत जाईल काय ? विष्णूच्या त्रासापासून दितीचे पुत्र मुक्त होतील का ? महा असुर पातालवास सोडून तुझ्या बलाश्रयानें देवांचे वसतींत राहूं शकतील काय ? तुझा पिता बली विष्णूनें केलेल्या असह्य आक्रमणामुळें बंदींत पडला आहे, तेव्हां तो जलाशयांतून निघून राज्य पावेल काय ? बाबा, वैरोचनीला म्हणजे तुझ्या पित्याला आम्हीं दिव्य माला व वस्त्रें धारण करून उटी लावलेला ( वैभवांत ) पाहूं काय ? हे प्रभो, विष्णूनें तीन पावलांनीं पूर्वीं हरण केलेल्या या तीन लोकांस सर्व देवांना जिंकून आम्हीं पुनः परत मिळवूं शकूं काय ? स्निग्ध व गंभीर ज्याचा ध्वनि आहे असा शंख फुंकून नंतर संग्रामांत विजय मिळविणाऱ्या नारायणाला आम्हीं जिंकूं काय? बा बाणा, शंकर तुजवर अनुग्रह करण्यास सज्ज झाला आहे काय ? कारण तुझें हृदय कंप पावत असून तुझे नेत्रांतूनही अश्रु चालले आहेत. ईश्वराच्या संतोषानें व कार्तिकेयाच्या अनुमतानें आम्हां सर्वांची राज्यश्री तुला प्राप्त झाली आहे काय ?

याप्रमाणें कुभांडाच्या वचनांनीं प्रेरित झालेला तो असुरश्रेष्ठ वक्ता बाण अस्खलित वाणीनें बोलूं लागला, कीं, " हे कुभांडा, फार दिवसांपासून मला युद्ध करावयास मिळत नाहीं. म्हणून मी आनंदानें प्रतापवान् शितिकंठाला असें विचारलें कीं, हे देवा, मला युद्धाची फार मोठी हौस आहे. यास्तव माझी हौस पुरवीसें एकादें युद्ध मला प्राप्त होईल काय ? तेव्हां शत्रुघातक देवाधिदेव हरानें पुष्कळ वेळपर्यंत हंसून मला असें प्रिय-वचन सांगितलें कीं, बाणा, तुला अप्रतिम व फार मोठें युद्ध प्राप्त होईल. तेव्हां मी अतिशय संतुष्ट होऊन भगवान् वृषध्वजाला मस्तकानें प्रणाम केला व तुजपाशीं आलों. " या-

प्रमाणें बाणाचें बोलणें ऐकून कुभांड बाणास म्हणाला, ' राजन्, तुझें हें सांगणें इष्ट वार्ता नव्हे ' याप्रमाणें ते दोघे आपसांत बोलत आहेत तों इंद्राच्या अशनीचा प्रहार होऊन त्याचा उंच ध्वज वेगानें खालीं पडला. तो उत्तम ध्वज याप्रमाणें पडला आहे असें पाहून बाणाला अतिशय हर्ष झाला व तो युद्ध प्राप्त झालें असें मानूं लागला. इतक्यांत इंद्राच्या अशनीच्या आघातानें पृथ्वी कांपूं लागली. भूविवरांत दडलेलें मांजर मोठमोठ्यानें ओरडूं लागलें. देवाधिदेव इंद्र शोणितपुरांत सर्वतः रक्ताचा वर्षाव करूं लागला. सूर्याचा भेद करून एक मोठी उल्का भूतळीं पडली. सूर्य कृत्तिकेंत प्रविष्ट झाला त्यामुळें बाणाचें राहिणी नामक जें जन्मनक्षत्र तेथपासून सत्ताविसावें भरणी नक्षत्र ( बाणाचें अभिषेक न० ) त्यास वेध झाला. ( तो देह-पीडा व पदापासून भ्रंश हीं अनिष्ट फळें सुचवीत होता. ) चैत्य ( गांवाबाहेरील पूज्य ) वृक्षावर एकाएकीं रक्ताच्या शेंकडों, हजारों धारांचा वर्षाव करीत घोर तारका पडल्या. हे राजन्, पर्वसमय नसतांच राहूनें आदित्याला ग्रासलें. त्या लोकक्षयकारक समयीं मोठा भयंकर गडगडाट झाला. दक्षिण दिशेचा आश्रय करून धूमकेतु स्थित झाला. अति भयंकर वारे अखंड वाहूं लागले. ज्याचा परिघ शुभ्र व रक्तवर्ण झाला आहे, कंठभाग कृष्णवर्ण आहे, कांति विजेसारखी आहे, व ज्याच्या सभोंवार तीन रंगांचें कडें आहे अशा सूर्यानें संध्यारागास आच्छादित करून सोडिलें. भयंकर मंगळानें बाणाच्या रोहिणी जन्मनक्षत्राची सर्वशः जणूंकाय निर्भर्त्सना करून कृत्तिकांमध्यें वक्र[1] नांवाचा दुर्योग केला. सर्व दानव-कन्यांना पूज्य असलेला अनेक शाखावान् चैत्यवृक्ष भूमीवर पडला.

याप्रमाणें नानाप्रकारचीं दुश्चिन्हें ऐकणारा बाण मदोन्मत्त असल्यामुळें, आपला पराभव होईल असें कधींच समजला नाहीं. पण तत्त्वज्ञ आणि प्राज्ञ कुभांड खिन्न झाला. तो बाणाचा सचिव पुष्कळ अनिष्ट गोष्टींचें वर्णन करून म्हणाला, राजन्, या वेळीं हे मोठे उत्पात दिसत आहेत. ते अमंगल सुचवितात. ते आपल्या राज्य-नाशास कारण होतील. यांत कांहीं संशय नाहीं. राजाच्या दुर्नीतीमुळें थोड्याच अवकाशांत आम्ही व दुसरे सचिव, भृत्य व तुझे इतर अनुयायी क्षय पावूं. मोहामुळें गर्जना करणारा व बलाची आकांक्षा करणारा हा ( तूं ) बाणासुर गर्वाचे योगानें त्या इंद्र-ध्वज रोंवलेल्या वृक्षाप्रमाणेंच पतन पावणार आहे. देवदेवाच्या प्रसादानें हा त्रैलोक्य-विजयी झाला आहे. पण आतां गर्वामुळें याचा नाश होणार असें दिसतें. कारण, युद्धाची आकांक्षा करणारा हा गर्जना करूं लागला आहे, हें ठीक नाहीं. "

कुभांड इतकें बोलला, परंतु, श्रेष्ठ पराक्रमी बाणासुर तर संतुष्टचित्त होऊन दैत्यदानवस्त्रियांसह उत्तम पान प्याला. चिंताविष्ट

१ मूळांत "स्वपक्षे चोदितः सूर्यो भरणीं समपीडयत्" असें आहे त्यापैकीं 'स्वपक्षे, यावर ' देव नक्षत्रेषु उदितः अशी टीका आहे. ती योग्यच आहे. कारण तैत्तिरीय ब्राह्मण ( १-५-२-७ ) देवगृहा नक्षत्राणि. कृत्तिकाः प्रथमं । विशाखे उत्तमं । तानिदेव नक्षत्राणि । यानि देव नक्षत्राणि–तानि दक्षिणेन परियंति असा उल्लेख आहे. म्हणजे कृत्तिकांपासून विशाखापर्यंतचीं १४ तीं सर्व देवनक्षत्रें होत. व बाकीचीं ' यमनक्षत्रें. हीं देवनक्षत्रें विषुववृत्ताचे दक्षिणेस फिरतात. आतां कृत्तिकांत सूर्य आल्यानें मागील एक ( भरणी ) व पुढील एक ( रोहिणी ) हीं दोन्हीं नक्षत्रें अर्थातच विद्ध झालीं. कारण १३°—२०° मागें व पुढें इतक्या अंतरापर्यंत त्याचा वेध असतो. म्हणूनच ' भरणीं समपीडयत् ' असें व्यासांनीं म्हटलें आहे.

१ मंगळ ' वक्री येणें ' हें ज्योतिषांत प्रतिकूल मानिलें आहे.

झालेला कुभांड मात्र राजगृहीं गेला व त्या दुश्चिन्हांचा मनाशीं अर्थ करूं लागला. तो मनांत म्हणाला—राजा प्रमादी, दुर्बुद्धि, मत्सरी झाला आहे. तो महा असुर युद्धाचीच इच्छा करितो. मदानें दोषांना मुळींच मोजीत नाहीं. महा उत्पातांवरून सूचित होणारें भय खोटें कधींही होणार नाहीं. काय हें सर्व उत्पातदर्शन खोटें होईल ? आमचे बाजूला त्रिनयन व वीर्यवान् कार्तिकेय आहे. तेव्हां उत्पन्न झालेलाही आमचा दोष नाहींसा होईल का ? मला तर वाटतें कीं, झालेल्या दोषापासून होणारा क्षय फारच मोठा होईल. दोषांचा नाश होणार नाहीं. या राजाच्या दुर्दैवामुळें खचीत हा दोषच होईल. यांत कांहीं शंका नाहीं. कारण, दानव नेहमीं दोषभूत असतात. जो देवदानवसंघाचा कर्ता व भुवनाचा प्रभु, ज्यानें भगवान् कार्तिकेयाला लोहितपुरांत ठेविलें ( त्याच्या अनुग्रहामुळें बाणाचा उत्कर्ष झाला. ) शंकराला गुह सदा प्राणाहून अधिक प्रिय आहे. व बाण हा गुहाचे संगतीस असल्यामुळें त्याला तसाच प्रिय आहे. पण, यानें दर्पानें आपल्याच नाशाकरितां युद्धार्थ वर मागितला व त्यामुळें हा लुब्ध असुर सर्वथा नष्ट होईल, यांत कांहीं संशय नाहीं. विष्णु ज्यांचा म्होरक्या आहे अशा इंद्रादि देवांची युद्धामध्यें गांठ पडल्यास शंकराचा वर पूर्ण झाल्यासारखा होईल. बाणाचें सहाय्य करूं इच्छिणाऱ्या कुमार व शंकर ह्या दोघांशीं भिडून संग्राम देण्यास कोण समर्थ आहे ? पण, देवांचें वचन मिथ्या कधींही होणार नाहीं. म्हणून, सर्व दैत्यांचा विनाश करणारें मोठें युद्ध खास होणार.

याप्रमाणें चिंताविष्ट झालेल्या तत्वज्ञ महादैत्य कुभांडाला सुविचार सुचले. पुण्यकर्में करणाऱ्या देवांशीं युद्धामध्यें जे विरोध करितात, ते, बली जसा बंधन पावला त्याप्रमाणें नाश पावतात.

## अध्याय एकशें सतरावा.

—:०:—

## शिवाची जलक्रीडा व उषेची मदनावस्था.

वैशंपायन सांगतात:—राजन्, एकदां प्रभु शंकर उमेसह रम्य व शोभायमान अशा नदीतीरीं क्रिडा व विहार करावयास गेला. तेथें सभोंवतीं शेंकडों अप्सरा क्रीडा करीत होत्या. व सर्वही ऋतूंची जेथें वसती आहे, अशा तेथील रम्य वनामध्यें प्रमुख गंधर्वही क्रीडा करीत होते. पारिजात व संतानक या कल्पवृक्षांच्या पुष्पांनीं आकाशाप्रमाणेंच तें नदीतीरही सर्वत्र सुगंधानें कोंडून गेलें होतें. त्या वेळीं तेथें शेंकडों वेणु, वीणा, मृदंग व पणव हीं वाद्यें वाजत होतीं. त्यां बरोबरच चाललेलें अप्सरांचें गाणें त्यानें ऐकलें. अप्सरांनीं सूत व मागध यांप्रमाणें त्या मनोहर देवाधिदेवाची स्तुति केली. आणि त्या माला धारण करणाऱ्या व रक्तवस्त्र नेसणाऱ्या मूर्तिमंत श्रीमहेशाचें पूजन केलें. नंतर चित्रलेखा या नांवाची एक श्रेष्ठ अप्सरा[1] पार्वतीचें रूप घेऊन शंकरास प्रसन्न करूं लागली. तेव्हां तो तिचा यत्न पाहून स्वतः देवी व अप्सरांच्या गणास हंसूं येऊं लागलें. तत्काल देवीचे आज्ञेवरून नाना रूपधारी व महा बलाढ्य शंकराचे सर्व दिव्य पार्षद ठिकठिकाणीं क्रीडा करूं लागले. चित्ररेखेला भूल पाडण्यासाठीं ते रहस्यकुशल सर्व पार्षद महादेवाचीं रूपें घेऊन, वृषभध्वजादि चिन्हांनीं युक्त होऊन खेळूं लागले. व चित्र-

१ ह्या तिचे कृतीमुळें शंकराचा तिजवर कोप होऊन ती पुढें बाणासुराचा प्रधान जो कुभांड त्याचे पोटीं चित्रलेखा नांवानें आली.

रेखेचा मानभंग करण्यासाठीं सर्व अप्सरा देवीचीं सुस्वरूपें, लीला व मुद्रा धारण करून त्या शंकररूप पार्षदांशीं खेळूं लागल्या. आणि उमा देवी व इतर अप्सरा मोठ्यानें हंसूं लागल्या.

इतक्यांत चोहोंकडे किलकिल शब्द उद्भवला. त्यामुळें शंकराचें मन प्रसन्न होऊन त्यास हर्ष वाटला.

त्या वेळीं उमेची हौस पुरविण्याकरितां, नाना आकाराचीं शरीरें धारण करून, बारा आदित्यांप्रमाणें देदीप्यमान ज्याचें तेज असा महादेव देवीसह त्या नदींत विलास करितांना पाहून त्या देवीसन्निध असलेली बाणाची उषा नांवाची सुलक्षणी कन्या मनांत म्हणूं लागली, खरोखर, पतीबरोबर जी अशा प्रकारें रममाण होत असेल तीच स्त्री धन्य होय. याप्रमाणें मनांत संकल्प करून उषेनें तो आपल्या सख्यांसही बोलून दाखविला. आणि पार्वती उषेचा तो अभिप्राय ओळखून तिला आनंद देण्याकरितां म्हणाली, "उषे, ज्याप्रमाणें शत्रुनाशन देव शंकर मजबरोबर रममाण होत आहे, त्याप्रमाणें तूंही लौकर भर्त्याबरोबर अशीच रममाण होशील." हें देवीचें वचन ऐकतांच चिंतेनें जिचे नेत्र गढूळ झाले आहेत अशी उषा 'मी भर्त्याशीं कधीं रममाण होईन?' असें तिला विचारूं लागली. तेव्हां ती हिमालयाची कन्या तिला हंसून म्हणाली, "उषे, तुला पतिसंयोग केव्हां होईल तें सांगतें ऐक. वैशाखमासीं द्वादशीस रात्रीं तूं राजवाड्यांत माडीवर निजलेली असतां तुला स्वप्नामध्यें जो पुरुष रमवील तोच तुझा पुढें भर्ता होईल."

पार्वतीनें असें सांगितलें असतां ती दैत्यकन्या आनंदांत चूर होऊन सुखरूपपणें आपल्या मैत्रिणींसह तेथून निघून गेली. वाटेंत सख्यांसह थट्टामस्करी करीत जात असतां, तिचे नेत्र हर्षानें प्रफुल्लित झालेले पाहून सख्यांनीं आनंदानें एकमेकींच्या हातावर हात मारून आपला हर्ष व्यक्त केला. किंनरी, यक्षकन्या, अनेक दैत्यांच्या कन्या व अप्सरासमूहांतील कन्या उषेच्या सख्या झाल्या. त्या सर्वजणींनीं तिला म्हटलें, 'सुंदरि, प्रत्यक्ष देवीनें सांगितलें आहे त्यापक्षीं तुझा पति लवकरच तुला प्राप्त होईल. देवीचें वचन मिथ्या कधीं होणार नाहीं. रूप व कुल यांनीं संपन्न असा पति तिनें तुजविषयीं योजिला आहे!' नंतर उषा सख्यांच्या त्या वचनाचा योग्य सत्कार करून देवीनें मनांत आणलेल्या संकल्पाची भावना करीत राहिली. इकडे बराच वेळ उमेसह त्या क्रीडाविहाराचा अनुभव घेऊन दिवस मावळला असतां, त्या सर्व परम अद्भुत अप्सरादि स्त्रिया आपआपल्या घरीं गेल्या व देवी तेथेंच गुप्त झाली. त्यांतील कित्येकजणी घोडे, शिबिकादि नरवाहनें, गज व रथ यांतून नगरांत गेल्या. कित्येकजणी आकाशांत गेल्या. हे प्रभो, त्या दिवसापासून ती उषा काममोहित झाली. देवीचें वचन आठवून तिला वारंवार पतीचें ध्यान लागून राहिलें. मग ती रात्रीं निजेना व दिवसा भोजन करीना. आणि ती राजकन्या पतीचें स्मरण करीत विलाप करूं लागली. ती आकाशांतील चंद्राची निंदा करी. चंदनाचें सेवन करीना. हे राजन्, ती बाला मोहित झाली. कामानें तिला पीडिलें. वस्तुतः ती ज्वररहित असूनही तिच्या सख्या ती ज्वरित असल्याप्रमाणें तिला उपचार करूं लागल्या. चंदनाचा लेप घातला असतांही तिचें हृदय तप्त झालें. गालांवर पांढुरकी आली, डोळ्यांला धारा लागल्या, वारंवार जांभया येऊं लागल्या. व तिच्या देहांत सुस्ती वाढली. मदनाग्नीनें पीडिलेल्या तिच्या हृदयावर तिच्या

सख्या वारंवार शीतळ कमलकंदचूर्ण लावीत होत्या. वारा घालीत होत्या. व पुनः पुनः असें विचारीत होत्या कीं, हे भामिनि, तुला काय होत आहे ? तुझें शरीर असें कां झालें आहे ? हे देवि, हे सुंदरि, तुला काय आवडतें तें आम्हांला सांग. हे मनोरमे, ही दुःखसाध्य व्यथा तुला कोणत्या कारणानें होत आहे ? तुझ्या मनांतली गोष्ट सारिका बोलत आहेत. हे सुभ्रु, हे हिरवेगार पोपट थेट मनुष्यासारखे आनंद देणारें वाक्य बोलत आहेत. असें असतांना तूं आज कां भाषण करीत नाहींस ? हे उत्तमे, तुझा पिता महावीर असून देवांनाही दुर्जय आहे. भूलोकीं तर त्याच्यापुढें कोणी उभा रहात नाहीं. बलीचा पुत्र महावीर बाण केवळ दुर्धर्ष आहे. अमरावतीस जिंकून त्यानें शोणिताख्य नगर बसविलें आहे. त्यांत शूलहस्तमहेश्वर देव राहतो. उषे, ‘ तो ( बाण ) माझा पुत्रच आहे असें समज. ’ असें प्रत्यक्ष शंकर तुझ्या या पित्यास उद्देशून पार्वतीला म्हणाला आणि बाणालाही त्यानें तसेंच सांगितलें. सारांश, अशा समर्थाची तूं कन्या असतां, हे बाळे, तुला अशी कोणती व्यथा आहे कीं, दंवाचे बिंदु शरत्कालीं कमलावर जसे शोभताल त्याप्रमाणें तुझ्या मुखमंडलावर व नासाग्रावर घर्मबिंदु दिसत आहेत. घनपटलानें चंद्र जसा शोभत नाहीं त्याचप्रमाणें पूर्ण चंद्रासारखें तुझें हें मुख आज शोभत नाहीं. तें कांतिशून्य झालें आहे. पण, याचें कारण काय ? हे बाळे, तूं दीर्घ श्वास सोडितेस. व तुझें मन कशांत रमत नाहीं, हें काय ? तुला आवडेल तसा सुंदर पदार्थ तूं भोजनास घे. तुला पूर्वीं तांबूल फार आवडत असे; पण तोही आतांशीं घेत नाहींस, याचें कारण काय ? हे देवि उषे, अशी पडूं नको. सामान्य लोकांस दुर्लभ असलेल्या मिष्ट मिष्ट वस्तु घे. तुझे शरीरीं कोणती पीडा होत आहे ती सांग.

अशा प्रकारचा उषेच्या मंदिरांत चाललेला गलबला ऐकूं आला असतां ( उषेच्या मातेनें त्याचें कारण विचारलें. ) दासी तिच्या जवळ येऊन आपापल्या तऱ्हेनें पृथक् पृथक् सांगूं लागल्या. “ हे देवि, साध्वी राजपुत्री जलक्रीडाविहार करून परत आल्यापासून मुकी असल्यासारखी दिसते. म्हणून हे शुभे देवि, आम्ही दासीजन ही गोष्ट तुझ्या कानीं घालीत आहों. हा कोणत्या प्रकारचा मोह म्हणावा ? या मौनाचा अर्थ काय ? निद्रा इतकी कोठून लोटली ? व ही म्लानता कशी आली ? याचा वैद्यांच्या संमतीनें विचार करून या क्लेशाची शांति करावयास सांग. राजकन्येचें शरीर शिरीषपुष्पाप्रमाणें अति कोमल आहे. तें, हे सुंदर देवि, असला व्याधिभार कसा सहन करील ? ” दासींनीं सांगितलेला हा वृत्तांत ऐकून हंसाप्रमाणें मंदगमन करणारी राणी जेथें उषा होती तेथें मोठ्या त्वरेनें आली. आणि आपल्या कोमल हातानें तिच्या हाताला स्पर्श करून आणि, तूं अशी कष्टी कां दिसतेस ? असा प्रश्न करून सहजवृत्ती तिच्या हातांचीं बोटें मोडूं लागली. उषे, तुला काय होतें आहे ? तुला कोणती व्यथा आहे ? हे सर्व वैद्य येऊन तुला असेंच विचारीत आहेत, पहा.

वैद्य म्हणाले ‘ ही राजकन्या सख्यांसह जलक्रीडा करावयास गेली होती. तेथें पार्वती क्रीडा करीत होती. ( तेव्हां तिच्याशीं क्रीडा केल्यामुळें ) हिला श्रम झाले असावे. श्रमांमुळें ग्लानी आली आहे. व वारंवार जांभया येत आहेत; त्यामुळें अशी निद्राही येत असते. यास्तव, हे देवि, भिऊं नको. ’ देवी म्हणाली, ‘ अहो वैद्यांनो, थंडगार चंदनाचा लेप हिच्या

उरावर घातला असतां लागलेच त्यांतून बुडबुडे उठूं लागतात, ते कां ? याला काय म्हणावें ? हिच्या अंगाचा अतिशय दाह होतो व हिला फार थकवा आला आहे, तहान लागते पण भूक मुळींच लागत नाहीं. बडबड मात्र पुष्कळ करिते. यास्तव या व्याधीचें शास्त्रतः निदान करून सांगा.' वैद्य: ह्मणाले, "शंकरासमोर क्रीडाविहार करावयास अनेक स्त्रिया जमल्या होत्या, त्यांत ही राजकन्या रूपानें अप्रतिम होती. यास्तव, मानिनी राजपुत्रीवर त्यांतील कोणी दृष्ट घातली असावी. त्यामुळें हला अशी व्यथा होत आहे. यास्तव, रक्षामंत्र म्हणून मीठमोहऱ्या उतरून या कुमारीची दृष्ट काढा. थंड सरबतें प्यायला द्या व स्नान घाला. म्हणजे उत्तम शांति होईल."

असें सांगून सर्व वैद्य राजगृहांतून निघून गेले. पण त्यांनीं पुनः जातां जातां ही मदनसंबंधी व्यथा आहे असेंही सुचविलें. नंतर मातेनें पुष्कळ वेळां प्रश्न केले असतां, ती लाजाळू मुलगी अतिशय रडत आईला म्हणाली. 'आई, मला एकसारखें भाषण करणें व भोजन आवडत नाहीं. त्याचप्रमाणें, आई, माझ्या मनाला उत्साह वाटत नाहीं. माझें हृदय दाहयुक्त असतें.' एवढें बोलून सुंदरी उषा गप्प बसली. तेव्हां सर्व स्त्रिया एकमेकींच्या तोंडाकडे टकमका पाहूं लागल्या. कोणी बोलत ना. कारण तारुण्यांत स्त्रियांचे ठिकाणीं लज्जा फार असते. हें त्यांना माहीत होतें. व ही उषाच धडपणीं बोलत नाहीं त्या अर्थी कोणीं बोलावें कीं हिला आतां नवरा पाहून दिला पाहिजे! आई-बाप मनांत आणतील तेव्हां हिला अनुरूप वर मिळेल. ( आणि हिचें हें दुःख दूर होईल. )

## अध्याय एकशें अठरावा.

—:०:—

### उषास्वप्न व चित्रलेखेचें द्वारकेस गमन.

वैशंपायन सांगतातः—असो; याप्रमाणें तेथील सर्व दासदासी राजकन्येच्या त्या विचित्र दशेमुळें अतिशय चकित झाल्या. त्यानंतर वैशाखमासीं शुक्ल पक्षीं द्वादशीस रात्रीं उषा माडीवर आपल्या सख्यांच्या कोंडाळ्यांत निजली असतां, त्या कल्याणीला पार्वतीनें सांगितल्याप्रमाणें एका पुरुषानें स्वप्नांत रमविलें. त्या समयीं ती चुकवाचुकवा करूं लागली व रडूं लागली. तथापि, देवीच्या वचनानें आज्ञप्त असलेल्या तिला त्यानें रति देऊन तिचें कौमार्य उडविलेंच. तेव्हां शोणितानें भरलेली ती रात्रीं एकाएकीं रडत उठली. ती तशी रडत आहे असें पाहून भयभीत झालेली तिची सखी चित्रलेखा तिला अतिअद्भुत व स्निग्ध वचन बोलली कीं "उषे भिऊं नको. तूं अशी रडतेस कां व संतापतेस कां? तूं बलीच्या पुत्राची प्रख्यात कन्या असतांना अशी भययुक्त कां होतेस? हे सुभ्रु, विशेषतः तुला या लोकीं कोठेंही भय नाहीं. हे वामोरु, तुला सर्वत्र अभय आहे. कारण, तुझा पिता रणांत देवाचांही काळ आहे. हे शुभे, ऊठ, ऊठ, तुझें कल्याण असो. विषाद करूं नकोस. शिवाय असल्या बंदोबस्ताच्या वाड्यांत भय मुळींच नसतें. तुझ्या पित्यानें रणांत देवांसह शचीपति सुरेश्वरास तो त्याचे नगरास पोंचण्यापूर्वींच अनेकदां चिरडलें आहे. हा तुझा पिता देवसमूहाला कांपवीत आहे. तो श्रीमान् बलिपुत्र महाबलवान् व मुख्य असुरांतही श्रेष्ठ आहे." याप्रमाणें सखीचे शब्द ऐकून ती यशस्विनी व निर्दोष बाणपुत्री स्वप्नांत पाहिलेलें स्वरूप जसेंच्या तसेंच तिला वर्णन करून सांगूं लागली. ती म्हणाली 'मी पवित्र

असतांना, अशा प्रकारें त्यानें जर मजवर जबरी केली‌न तर आतां मी जिवंत राहण्याची इच्छा कशी करूं? माझ्या त्या शत्रुहंत्या, देवशत्रु पित्याला काय सांगूं? ह्या महाबलाढ्याच्या वंशाला मी अशी कलंक झालें. आतां मला मरणेंच श्रेयस्कर आहे. न जगण्याचें कारणः—मी जशी कांहीं जागी असून माझे मनचा पुरुष मला मिळावा आणि त्यानें माझ्याशीं येथें यथेच्छ वर्तन करावें तशांतलें करून या स्वप्नांतील पुरुषानें माझी अशी अवस्था करून सोडली. ती रात्रीची वेळ तरीही जागेपणाप्रमाणें (माझ्याशीं वागून) मला या दशेस कोणीं पोंचविलें? मी कुमारी असतांना मला अशा अवस्थेस आणून सोडिलें. मी आतां जिवंत राहण्याची इच्छा कशी करावी? साध्वी स्त्रियांचे अग्रभागीं स्थित असणारी स्त्री, मजप्रमाणें कुलाची निंदा करणारी कुलकलंकिनी व निराश्रित झाल्यावर, उघडच जगण्याची इच्छा करणार नाहीं.

याप्रकारें ती मैत्रिणींत बसून व डोळ्यांतून अश्रू गाळून पुष्कळ विलाप करूं लागली. तेव्हां तेथें जमलेल्या सर्व सख्या, काय करावें हें कळेनासें होऊन अनाथाप्रमाणें रडणाऱ्या व घळघळ अश्रू ढाळणाऱ्या उषेला म्हणाल्या "हे देवि, जें शुभ किंवा अशुभ बुद्धिपुरःसर केलें जातें त्याच्याच योगानें पुण्य किंवा पाप लागतें. (अनिच्छेनें घडलेल्या कृत्यामुळें पापपुण्य लागत नाहीं.) हे शुभे, तुझें मन कांहीं दुष्ट नाहीं. हे भाविनि, केवळ दैवयोगानेंच, बलात्कारानें तुझा कोणींसा भोग घेतला आहे; पण, हे देवि, स्वप्नांतलि संयोगानें व्रतलोप होत नाहीं. देवि, तुझ्या या व्यभिचारानें, कोणताही व्यतिक्रम झालेला नाहीं. हे सुंदरि, या मर्त्यलोकीं स्वप्नकृत दोष नाहीं असें धर्मज्ञ विप्रर्षी सांगतात. मन, वाणी, व विशेषतः शरीर या तिघांच्या योगानें जी दुष्ट झालेली असते तिला सुज्ञलोक पापी म्हणतात. पण हे भीरु, तुझें मन कधींही चंचल झालेलें दिसत नाहीं. तेव्हां नियत ब्रह्मचर्यव्रत धारण करणारी तूं दोषांनीं दूषित कशी होणार? साध्वि, शुद्धभावा व मनस्विनी अशी तूं झोंपेंत असतांना जर या अवस्थेस प्राप्त झाली आहेस तर त्यांत धर्माचा विलोप होत नाहीं. जिचें मन प्रथम संकल्पानें दुष्ट होऊन नंतर कर्मानेंही दूषित होतें, तिला असाध्वी म्हणतात. हे भाविनि, तूं सती आहेस. कुलीन, रूपसंपन्न, नेमस्त व ब्रह्मचारिणी असतांना तूं या अवस्थेस प्राप्त झाली आहेस (हें कालाचें चेष्टित आहे). आणि कालाचें उल्लंघन कोणालाही करितां येणें शक्य नाहीं."

इतकें सख्यांनीं सांगितलें तरी उषा रडतच आहे व तिचे नेत्र बाष्पांनीं भरलेलेच आहेत असें पाहून कुभांडाची कन्या चित्रलेखा उत्तम वाक्य बोलली. 'हे सुमुखि, हे विशालनयने, शोक करूं नकोस, तूं निष्पाप आहेस. मी हें यथार्थपणें ऐकलेलें वाक्य ऐक. उषे, तूं भर्त्याचें ध्यान करीत असतांना देवीनें जें शंकरासमक्ष तुला सांगितलें होतें, त्याचें, हे भाविनि तूं स्मरण कर. "वैशाख महिन्याच्या शुक्लपक्षांतील द्वादशीस रात्रीं उंच माडीवर तूं निजली असतां तुझे रडण्याला न जुमानून जो तुला स्त्रीत्वाला नेईल तोच शत्रुनाशक शूर तुझा भर्ता होईल." याप्रमाणें प्रसन्न झालेली देवी तुझ्या मनांतील गोष्ट बोलली होती. पार्वतीचें तें वचन मिथ्या कधींही होणार नाहीं. तेव्हां, हे इंदुमुखि, तूं अशी आकसाबोकशी कां रडतेस?

याप्रमाणें तिनें स्मरण दिलें असतां देवीचें वचन आठवून ती शुभनयना बाला उषा

शोकरहित झाली. उषा म्हणाली, शंकर क्रीडा करीत असतांना देवीनें जें सांगितलें होतें त्याचें मला आतां स्मरण झालें. तिनें जसें सांगितलें होतें तसेंच मला सर्व प्राप्त झालें आहे. तर त्या पुरुषाला आतां जाणावें कसें? ( तो कोठचा कोण हें कसें कळणार ?) आतां याविषयीं जें कर्तव्य असेल तें कर. उषेनें तिला असें सांगितलें असतां अर्थनिर्णयांत कुशल असलेली कुंभांडकन्या पुनः न्यायानुसार म्हणाली, 'देवि, तूं सांगितलेंस खरें; पण त्याचें कुल, कीर्ति, पौरुष, इत्यादि कोणाला तत्वतः माहीत नाहींत. मग तूं अशी वेडी होण्यांत काय फळ ? हे भीरु, शुभे, तूं स्वप्नांत ज्याला पाहिलेंस तो अट्टल भामटा आम्हीं कधींच पाहिला किंवा एकिलेलाही नाहीं; मग अशाला कसें ओळखावें? हे नलिनेत्रे, हे वरारोहे, ज्यानें स्वसामर्थ्यानें अंतःपुरांत प्रवेश करून तूं रडत असतांही बलात्कारानें तुझा भोग घेतला, तो कोणी साधा पुरुष असेल असें संभवत नाहीं. कारण, तो शत्रुनाशक एकटाच तुझ्या लोकप्रसिद्ध नगरांत दांडगाईनें शिरला. आदित्य, रुद्र, वसू, महाबलाढ्य अश्विनीकुमार इत्यादि भयंकर पराक्रमी देवही या शोणितपुरांत प्रवेश करण्यास धजत नाहींत. यास्तव, येथें आलेला तो शत्रुमर्दक यांच्याहून शतपट पराक्रमी असला पाहिजे. म्हणूनच तो बाणाच्या डोक्यावर पाय देऊन शोणितपुरांत प्रविष्ट झाला. पण, हे कमलनयने, जिचा भर्ता अशा प्रकारचा युद्धविशारद नसेल तिच्या जीविताचा किंवा भोगांचा तरी काय उपयोग? (असावा भोक्ता तर असाच पराक्रमी असावा.) देवीच्या प्रसादानें तुला असला कंदर्पासारखा पराक्रमी पति प्राप्त झाला आहे. त्याअर्थी तूं धन्य व अनुगृहीत आहेस. आतां आपल्याला अवश्य कर्तव्य तें मी सांगतें ऐक. तो कोणाचा पुत्र ? त्याचें नांव काय ? कोणत्या कुलांत झालेला हें अगोदर समजलें पाहिजे. याप्रमाणें ती बोलली असतां मदनानें वेडी झालेली उषा त्या कुभांडकन्येला म्हणाली, 'सखे तें मला कसें समजेल ? तूंच काय तो विचार कर. मला तर कांहीं उत्तर सुचत नाहीं. मनुष्याची चालच ही कीं, ज्यावर प्रसंग पडेल तो वेडा होऊन जातो. याकरितां, हे सखि, मी जिवंत राहीन असें कर.' उषा रडतच हें बोलली, तें ऐकून तिची रमणीय सखी कुभांडकन्या तिला म्हणाली, 'हे विशालाक्षि, संधि व विग्रह यांमध्यें सर्वथा कुशल असलेली तुझी जी चित्ररेखा नांवाची अप्सरा मैत्रिण आहे तिची तूं सत्वर प्रार्थना कर. तिला सर्व जगत् पूर्णपणें ठाऊक आहे.'

हें तिचें म्हणणें ऐकून हर्षयुक्त व विस्मित झालेल्या उषेनें त्या चित्ररेखा नांवाच्या प्रिय सखीला ( अप्सरेला ) आणविलें. व दीन होऊन हात जोडून ती तिला आपल्या दुःखाचें कारण सांगूं लागली. तिचें भाषण ऐकून चित्ररेखेनें त्या यशस्विनी बाणपुत्रीचें समाधान केलें. तेव्हां विस्मित होऊन ती प्रेमानें आपले स्वाधीन झालेल्या त्या चित्ररेखा अप्सरेला एक अवाच्य ( द्वाड ) वचन बोलली. तें असें कीं, 'हे भामिनि, मी तुला आज शेवटचेंच वाक्य सांगतें तें ऐक. मला प्रिय असलेल्या, मत्त हत्तीप्रमाणें गमन करणाऱ्या व कमलनयन कांताला जर तूं आणून दिलें नाहींस, तर मी लौकरच प्राण देईन.' यावर उषेला आनंद होईसें चित्ररेखा हळूच म्हणाली, 'हे भामिनि, हे सुव्रते, ही गोष्ट आह्मांला जाणतां येणें शक्य नाहीं. त्या चोराचें मला न कुल, न वर्ण, न शील, न रूप, न देश—कोणतें कांहींच ठाऊक नाहीं, तेव्हां कसें करावें ? तथापि, हे

सखि, मला बुद्धीबलानें काय करतां येणें शक्य आहे तें सांगतें, ऐक. ओघाला आलें म्हणून सांगतें कीं, याच उपायानें तुझा मनोरथ पूर्ण होईल. देव, दानव, यक्ष, गंधर्व, उरग व राक्षस यांमध्यें जे कुलानें, प्रभावानें, व रूपानें श्रेष्ठ आहेत, त्या सर्वांस त्यांच्या प्रभावाप्रमाणेंच मी चित्ररूपानें काढून दाखवितें. याचप्रमाणें, मनुष्यांमध्यें जे श्रेष्ठ व लोकप्रसिद्ध आहेत, त्यांनाही, हे भीरु, मी तुला सात दिवसांत रेखाटून दाखवितें. म्हणजे तूं त्या पटांतून आपल्या पतीस ओळखून प्राप्त करून घेऊं शकशील.' उषेचें बरें करण्याच्या हेतूनें चित्ररेखेनें असें सांगितलें, तेव्हां 'बरें आहे, तसें कर,' असें ती आपल्या प्रिय सखीस म्हणाली. नंतर ती चित्ररेखा अति कुशलहस्त असल्यामुळें तिनें सात दिवसांत एका मोठ्या फलकावर सर्वभर मुख्य मुख्य पुरुषांचीं सर्व चित्रें लिहून तो चितारलेला पट उषेपाशीं आणविला. व आपण तयार केलेला तो पट नीट पसरून उषेला व विशेषेंकरून तिच्या सख्यांना दाखविला. ती म्हणाली, 'हे देवांतील मुख्य, याचप्रमाणें दानववंशज, किन्नर, उरग, यक्ष, राक्षस, गंधर्व, असुर, दैत्य व दुसरेही असेच विलासी सर्व मानवांतील अतिश्रेष्ठ पुरुष या सर्वांना मीं यांत रेखाटले आहेत. तर तूं आतां यांत पहा. सखे, मी अशा लिहिलेल्यांपैकीं तुझा भर्ता कोणता व त्याचें रूप कसें काय आहे, तें तूं स्वप्नांत ज्याला पाहिलें आहेस त्याची आठवण करून यांतून ओळखून काढ.' असें बोलून ती चतुर व सुंदर चित्ररेखा क्रमानें देव, दानव, गंधर्व, व विद्याधरगण यांस दाखवून नंतर सर्व यादव सोडून यदुनंदन कृष्ण दाखवूं लागली, तों त्याच्या:जवळच्या काढलेल्या अनिरुद्धास पाहतांच उषेचे नेत्र विस्मयानें प्रफुल्लित झाले व ती चित्ररेखेस म्हणाली, 'गडे हाच तो चोर, मी राजमंदिरांत माडीवर निजलेली असतां ज्यानें पूर्वीं मला स्वप्नांत दूषित केलें, तोच हा आहे. मीं याचें स्वरूप ओळखलें. हा रतिचोर कोठचा कोण? हे सुंदरि चित्ररेखे, मला खरें सांग. याचें कुल, शील, अभिजन (पितृपितामहादि परंपरा) व नांव कळलें म्हणजे मग मी या कार्याचा निश्चय करीन.'

चित्ररेखा म्हणाली:—'हे सुंदरि, हा तुझा भर्ता त्रैलोक्यनाथ धीमान् कृष्णाचा नातू व प्रद्युम्नाचा पुत्र असून प्रचंड पराक्रमी आहे. पराक्रमामध्यें याची बरोबरी करणारा त्रिभुवनांत कोणीही नाहीं. हा पर्वत उपटून त्यांनींच शत्रूंना झोडतो. सखे, तूं धन्य आहेस. पार्वतीनें सर्वथा तुला अनुरूप व सज्जन असा यदुश्रेष्ठ पति देऊन तुजवर मोठीच कृपा केली आहे.' उषा म्हणाली—हे सुंदरी, विशालनयने, तूं आमचा उभयतांचा संबंध जोडून देण्यास योग्य आहेस. दुसरी तोड नाहीं. तुजवांचून मी अगतिक आहें. करितां तूं माझी गति हो. तूं अंतरिक्षांत फिरणारी योगिनी व कामरूपिणी असून असल्या उपायांत फार कुशल आहेस. माझ्या प्रियाला सत्वर आण. हे भीरु, माझ्या प्रियाचें येणें सुखानें कसें होईल याविषयीं विचारपूर्वक चांगला उपाय योज; आणि, हे सुंदरी, तूं हटकून काम साधून येशील अशी युक्ति लढव. जो आपत्कालीं कामास येतो तोच मित्र होय असें ज्ञानी म्हणतात. हे रम्य अप्सरे, मी कामार्त झालें आहें. यास्तव माझे आतां प्राण वांचीव. हे शुभे विशालाक्षि, माझ्या त्या देवासारख्या भर्त्याला आजचे आजच जर आणिलें नाहींस तर मी प्राणत्याग करीन.'

उषेचें हें भाषण ऐकून चित्ररेखा बोलली:—'हे शुचिस्मिते, कल्याणि माझें म्हणणें तरी

ऐक. अग, तुझ्या बापाची ही नगरी जशी सर्वशः रक्षण केली जात आहे, त्याप्रमाणेंच द्वारका सुद्धां परिरक्षित असल्यानें, ती देवांनाही दुर्गम आहे. तिला लोखंडी दरवाजे असून त्यांवर पहारे आहेत. शिवाय, द्वारकेंतील वृष्णिकुमारांची उत्तम रखवाली आहे. नगरीभोंवतीं विश्वकर्म्यानें सर्वभर पाणी फिरविलें आहे. पद्मनाभाच्या आज्ञेनें ती घोर पुरुषांकडून रक्षिली जाते. भोंवतीं पर्वत, तट, व खंदक असून आंत शिरण्याचे मार्ग मोठे अडचणीचे आहेत. व धातुमंडित पर्वतांचे सात कोटांनीं ती रक्षित आहे. त्यामुळें ती द्वारकानगरी, गैरमाहीत लोकांस प्रवेश करण्यासारखी नाहीं. यास्तव, तूं मला, स्वतः आपल्याला, व विशेषतः आपल्या पित्याला वांचीव. ( नसता हट्ट धरूं नको.)

उषा ह्मणालीः—' सखि, योगसामर्थ्यानें तुला तेथें जातां येणें शक्य आहे. पुष्कळ बोलण्यांत कांहीं मतलब नाहीं. याचें कारण ऐक. या अनिरुद्धाचें पूर्ण चंद्रासारखें तेजस्वी मुख माझ्या प्रत्यक्ष दृष्टीं न पडलें तर मी यमसदनीं खास जाईन. हे भामिनि, योग्य दूत मिळाला असतां कार्याची सिद्धि होत असते, यास्तव मी जिवंत रहावें अशी जर तुझी इच्छा असेल तर माझें दूतत्व मान्य करून तूं जा. माझें सख्य, मीं प्रेमानें केलेलें भाषण, इत्यादिकांची जर तुला ओळख असेल, तर माझ्या कांताला सत्वर घेऊन ये. मी तुला शरण आलें आहें. कामार्त व मदनानें विव्हल झालेल्या कामिनी प्राणसंकट व कुलक्षय यांजकडे पहात नाहींत. कोणतेही कार्याविषयीं प्रयत्न करणें अगदीं योग्य आहे, असें शास्त्राचें म्हणणें आहे. हे विशालनयने, द्वारकेंत प्रवेश करण्यास तूं समर्थ आहेस. व माझ्याशीं तुझा परिचयही झालेला आहे. याकरितां, हे भीरु, मला प्रियदर्शन करीव.

चित्ररेखा ह्मणालीः—"सखे, तुझ्या अमृततुल्य वाक्यांनीं मी अतिशय तृप्त झालें आहें. तुझ्या या प्रिय व रम्य शब्दांनीं मला उत्तम उद्योग करण्यास उद्युक्त केलें आहे. हे भीरु, ही मी आतां सत्वर द्वारकानगरीस जातें, व त्या प्रसिद्ध पुरींत प्रवेश करून तुझ्या अनिरुद्धनामक आजानुबाहु वृष्णिकुलोद्भव पतीस आणितें."

याप्रमाणें, तथ्य व दानवांस अशुभ व भयप्रद भाषण बोलून, मनासारखा जिचा वेग आहे अशी ती चित्ररेखा गुप्त झाली. इकडे ( शोणितपुरांत ) उषा सख्यांसह विचार करीत बसली. चित्ररेखा सखीचें प्रिय करण्यासाठीं त्या बाणपुरांतून तिसऱ्या मुहूर्तावर गुप्त झाली. व तपोधनांचें पूजन करीत एका क्षणांत कृष्णपालित द्वारकेस प्राप्त झाली. कैलासशिखराकार प्रासादांनीं शोभायमान असलेली रम्य द्वारका तिला अंतरिक्षांतील नक्षत्रांप्रमाणें लखलखतांना दिसली.

## अध्याय एकशें एकोणिसावा.

—:०:—

### उषा—अनिरुद्ध संगम व अनिरुद्धाचें बाणसैन्याशीं युद्ध.

वैशंपायन सांगतातः—नंतर द्वारवतीस पोंचल्यावर बाणाचा गर्व हरूं इच्छिणारी ती चित्रलेखा, अनिरुद्धास (आपण) बाणाच्या नगरींत नेलें ही वार्ता कृष्णाला कशी कळवावी, या गोष्टीचा विचार करीत कृष्णभवनाजवळ उभी राहिली. तेथें ती स्वबुद्धीनेंच कर्तव्यार्थाचा निश्चय करीत असतां जवळच उदकांत ध्यानस्थ बसलेल्या नारदमुनीकडे तिची दृष्टि गेली. त्यांना पाहतांच चित्रलेखेचे नेत्र प्रफुल्लित झाले व ती जवळ जाऊन आणि वंदन करून तेथेंच अधोमुख उभी राहिली. तेव्हां

नारद तिला आशीर्वाद देऊन म्हणाले, ' तूं येथें कशाकरितां आली आहेस तें तत्वतः ऐकण्याची माझी इच्छा आहे.' तेव्हां चित्रलेखा हात जोडून त्या लोकपूजित दिव्य देवर्षि नारदास म्हणाली, 'भगवन्' माझें म्हणणें ऐकावें. मी दूतत्व स्वीकारून अनिरुद्धाला नेण्याकरितां येथें आलें आहें. पण, हे मुने, मी त्याला कशाकरितां नेणार तें ऐका. शोणितपुर नांवाच्या नगरांत बाण या नांवाचा मोठा असुर आहे. उषा या नांवानें प्रख्यात असलेली त्याची एक सुंदर व तरुण कन्या आहे. हे भगवन्, ती या प्रद्युम्नपुत्र-रूपी उत्तम पुरुषावर आसक्त झाली आहे. देवी पार्वतीनें वर देऊन त्याला तिचा पति केलें आहे. त्याला नेण्यासाठीं मी येथें आलें आहें. यास्तव मला या स्वीकृत कार्यांत यश येईल असें करावें. मी अनिरुद्धाला शोणितपुराला नेलें असतां, हे महामुने, ती वार्ता आपण कृष्णास सांगावी, म्हणजे कृष्णाशीं बाणाचा रणांगणांत मोठा झगडा होईल. कारण, तो महासुर दिव्य आहे. अनिरुद्ध तर त्याला जिंकण्यास समर्थ नाहींच; पण सहस्रबाहूंनीं युक्त असलेल्या व अंगावर धांवून येणाऱ्या त्या महा असुराला महाबाहु कृष्ण जिंकील. भगवन्, एवढ्यासाठीं मी येथें तुम्हांपाशीं आलें आहे. कृष्णाला ही वार्ता कशी कळेल व कृष्ण आणि बाण यांचें युद्ध कसें जुंपेल हीच मला विवंचना होती, परंतु आतां आपल्या कृपेनें मला कृष्णापासून भय राहणार नाहीं. तो देव स्वतः तत्त्वदर्शी असल्यामुळें त्याला हें कृत्य कसें समजेल याची मला फारशी चिंता नाहीं. पण मी अनिरुद्धाला येथून कशी नेऊं हाच मोठा विचार पडला आहे. कारण, तो महाबाहु कृष्ण क्रुद्ध झाला असतां त्रैलोक्यालाही जाळील. नातवाच्या शोकानें संतप्त झालेला तो मला शापानें जाळून सोडील. यासाठीं, हे मुने, या प्रिय कांताची उषेला तर प्राप्ति होईल आणि मीही निर्भय राहीन असा कांहीं उपाय सुचवावा.' चित्ररेखेचें हें वाक्य ऐकून नारद तिला असें शुभ वाक्य बोलला:—" हे अप्सरे, भिऊं नको. स्वस्थचित्तानें मी सांगतों तें ऐक. तूं अनिरुद्धाला नेऊन कन्यागृहांत सोडल्यावर तेथें जर युद्ध उभें राहिलें तर, हे शुचिस्मिते, तूं माझें स्मरण कर. कारण, हे मनोरमे, युद्ध पाहाण्याची मला फार हौस आहे. तें पाहिल्यानें मला फार आनंद होत असतो. व तें होत नसलें तरी घडवून आणण्याची माझी नेहमीं खटपट असते. असो. सर्व लोकांस भुरळ पाडणारी ही तामसी विद्या घे. हिच्या साह्यानें तूं अनिरुद्धास घेऊन जाशील. ज्यानें ही विद्या स्वतः सिद्ध करून पाहिली आहे, असला मी मुनि तुला ही विद्या देत आहें." महर्षि नारदांचे या शब्दांवर चित्ररेखेनें ' बरें आहे ' असें उत्तर दिलें.

नंतर महात्म्या ऋषिश्रेष्ठ नारदास वंदन करून अंतरिक्षमार्गानें ती अनिरुद्धाच्या गृहास निघाली. द्वारकेंत उतरल्यावर मध्यभागीं प्रद्युम्नाचें गृह असून त्याच्या शेजारींच अनिरुद्धाचें गृह होतें, त्यांत ती शिरली. त्या गृहांतील स्तंभ व वेदी सोन्याच्या होत्या. वैडूर्यरत्नजडित सोन्याचीं बहिर्द्वारें होतीं. त्या गृहांत पुष्पांच्या माळा लोंबत सोडल्या होत्या. तें गृह पूर्णकुंभांनीं उपशोभित होतें. त्याच्या वरचा भाग स्तंभांवाचून अखंड लांबचलांब अशा तुळवटांनीं किंवा पाषाणांनीं रचलेला असून आकारानें मोराच्या कंठासारखा लांबट व उंचट होता. तें गृह रत्न व प्रवाल यांनीं खचून टाकिलें होतें. देव व गंधर्व यांच्या योगानें तें नादित झालें होतें. एवंच जेथें प्रद्युम्नपुत्र मोठ्या सुखांत रहात असे, असें तें

गृह तिनें पाहिलें. त्यानंतर एकाएकीं त्या मोठ्या गृहांत प्रवेश करून त्या श्रेष्ठ अप्सरेनें चंद्राप्रमाणें शोभयमान अशा अनिरुद्धाला श्रेष्ठ स्त्रियांमध्यें बसलेला पाहिलें. तेथें तो क्रीडाविहारांत गर्क असून स्त्रिया त्याची सर्वत्र सेवा करीत होत्या. तो मद्यादि पेयें पीत होता. व परम शोभेनें युक्त होता. कुबेराप्रमाणें तो श्रेष्ठ असनावर बसला होता. तेथें ताल वाजविला जात असून मधुर गायनही चाललें होतें. पण त्याचें मन तेथील गोष्टींवरून उषेचे संभोगाचेच चिंतनांत होतें. सर्वगुणसंपन्न स्त्रिया ठिकठिकाणीं नाचत होत्या. पण, त्याच्या मनाला संतोष होत आहे असें चित्रलेखेला दिसलें नाहीं. भोगांच्या योगानें त्याच्या चित्ताला आनंद होईना. तो मद्याचेंही सेवन करीना. त्यावरून त्याच्या हृद्यांत तेंच घोळत असावें हें अगदीं उघड आहे, असें तिनें आपल्या बुद्धीनें तेथें निश्चित केलें व भय सोडलें. पण, ती मानी चित्रलेखा सुंदर स्त्रियांच्या वेढ्यांत असलेल्या इंद्रध्वजासारख्या त्याला पाहून चिंतेनें व्याकुळ झाली, कीं अशांत आपलें कार्य कसें साधावें ? तें निर्विघ्नपणें पार कसें पडेल ? असें म्हणून ती यशस्विनी अप्सरा मनांत विचार करूं लागली. नंतर त्या शुभलोचनेनें तामसी विद्येच्या योगानें त्या प्रदेशास आच्छादित केलें. व स्वतः अंतरिक्षमार्गानें तत्काल त्या मंदिरावर उतरून आंत अनिरुद्धापाशीं जाऊन तिनें मधुरवाणीनें सुंदर भाषण केलें. त्याला दिव्य नेत्र देऊन व आपलें दिव्य रूप दाखवून ती एकांतांत असें वचन बोलली:—"हे यदुनंदना, वीरा, तुझें सर्वत्र कुशल आहेना ? तुझा सर्व दिवस व प्रदोषकाल सुखानें जातो का ? हे रतिपुत्रा महाबाहो, माझी विज्ञप्ति ऐक. माझ्या उषा नामक सखीचें म्हणणें मी तुला जसेंच्या तसें सांगतें. स्वप्नामध्यें तूं जिला पाहिलेंस व स्त्रीभावास पोंचविलेंस व जी तुझी मूर्ति हृद्यांत धारण करिते, त्या उषेनें मला पाठविलें आहे. ती वारंवार रडते, जांभया देते व सुसकारे टाकिते. सारांश, हे सदया, तुझ्या दर्शनाविषयीं उत्सुक झालेली ती कामिनी फार क्लेश पावत आहे. हे वीरा, तूं जर येशील तरच ती जीवित धारण करील. तुझें जर दर्शन न झालें तर तिला मरण येईल, यांत संशयच नाहीं. बा यदुनंदना, तुझ्या हृदयांत दुसऱ्या सहस्रावधि स्त्रिया जरी असल्या तरी ज्या अर्थीं ती तुजवर इतकी आषक्त आहे, त्या अर्थीं तिचें पाणिग्रहण तूं करावेंस, हें उचित होय. देवी पार्वतीनें तिला वर देतांना तूंच तिचा इष्ट म्हणून तुझें तिला समर्पण केलें आहे. मी तुझ्या स्वरूपाचें चित्र काढून तिला दिलें आहे. त्याकडे पाहून ती जिवंत असते. यास्तव, हे यदुश्रेष्ठा, तूं दयाळू होऊन तिचा मनोरथ पूर्ण कर. अनिरुद्धा, उषा व मीही तुझ्या पायां पडत आहों. तिची उत्पत्ति व कुलशील कसें आहे तें ऐक. तिचा अंगबांधा, स्वभाव व पिता यांचें वर्णन मी करितें. विरोचनपुत्र जो बली त्याचा बाण म्हणून एक वीर महासुर आहे. तो शोणितपुरांत राजा असून तुझी इच्छा करणारी ही त्याची कन्या आहे. तिचें चित्त तुझ्या स्वरूपीं आसक्त झालें असून तिचें जीवित त्वन्मय झालें आहे. देवीनें तिच्या मनाप्रमाणें तिला भर्ता दिला, यांत कांहीं संशय नाहीं. तुझ्या समागमाच्या आशेनेंच केवळ ती सुंदरी प्राण धारण करून आहे."

चित्रलेखेचें हें वचन ऐकून अनिरुद्ध म्हणाला:—'हे शोभने, मीं तिला स्वप्नांत पाहिलें. तो प्रकार मजपासून ऐक. तिचें तें रूप, कांति, मति, संयोग व रडणें या सर्वांचा

विचार करण्यांत मी अहोरात्र गुंगलों आहें. मी जर कृपापात्र असेन व तूं जर माझे स्नेहाची इच्छा करीत असशील तर, हे चित्रलेखे, मला तिजकडे घेऊन चल. मी त्या प्रियेला पाहण्याविषयीं उत्सुक आहें. मदनतापानें संतप्त झालेला मी प्रियासंगमाच्या इच्छेनें हे पहा तुजपुढें हात जोडले आहेत माझें स्वप्न सत्य कर.' त्यानंतर तें वचन ऐकून ती श्रेष्ठ अप्सरा चित्रलेखा म्हणाली, 'माझे सर्व श्रमांचें आज सार्थक झालें. कारण माझ्या सखीची याचना सफळ होत आहे.'

वैशंपायन सांगतातः—अनिरुद्धाचें तें इष्ट जाणून भामिनी चित्रलेखा मनांत अतिशय संतुष्ट झाली. व 'बरें आहे,' असें त्याला म्हणाली. नंतर राजमंदिराच्या माडीवर स्त्रीमंडळाच्या मध्यभागीं असलेल्या युद्धदुर्मद अनिरुद्धाला घेऊन ती आकाशांत उडाली. आणि सिद्ध व चारण यांनीं सेवन केलेल्या मार्गांत येऊन तेथून मनाप्रमाणें ती चपल अप्सरा एकाएकीं शोणितपुरांत शिरली. इच्छेस येईल तें रूप धारण करणाऱ्या त्या महाभागेनें आपल्या मायेच्या बलानें कोणाचे दृष्टीस न येतां त्या अनिरुद्धास जेथें उषा होती तेथें आणिलें. आणि त्या विचित्र आभरणांनीं भूषित केलेल्या व रंगीबेरंगी वस्त्र धारण करणाऱ्या देवस्वरूपी यादवाला एकांतांत उषेला दाखविलें. पण, तेथें सख्यांसह माडीवर बसलेली उषा त्याला पाहून विस्मित झाली आहे, असें पाहतांच तिनें तेथून तत्काल त्याला आपल्या गृहांत नेलें. प्रियाला पाहून त्या अर्थज्ञ सुंदरीचे नेत्र हर्षानें अतिशय प्रफुल्लित झाले. व माडीवरच तिनें अर्घ्यपूर्वक त्या यादवाचें पूजन केलें. तिनें चित्रलेखेला आलिंगन देऊन प्रियाच्या गोष्टी सांगण्याविषयीं प्रार्थना केली. पण, इतक्यांत ती गडबडलेली व भयातुर झालेली कामिनी चित्रलेखेला म्हणाली, 'कार्यज्ञे सखि, हें काम गुप्तपणें साधेल असें कर. कारण, तें गुप्तपणें केलें तरच सुख होणार आणि तेंच उघड झाल्यास जीवितक्षय होणार.' असें बोलून ती त्वरेनेंच चांगली भूषित होऊन, गुप्त प्रदेशीं कांताशीं संगत होत्साती भयभीत होऊन राहिली. तेव्हां चित्रलेखा तिला म्हणाली, सखे, तूं आतां मी सांगतें तो सिद्धांत ऐक. मैत्रिणी, दैवापुढें पुरुषप्रयत्नाचें कांहीं चालत नाहीं. याकरितां, देवीचा प्रसाद तुला अनुकूल आहे, त्याअर्थीं आज आपण मायेनें केलेली गुप्त गोष्ट पुरुषप्रयत्नानें उघड होणार नाहीं. सखीचे हे शब्द ऐकून तिचें चित्त निर्भय झालें व तीही म्हणाली, तूं म्हणतेस तें अगदीं खरें आहे. मग ती अनिरुद्धास उद्देशून म्हणते, 'धन्य भाग्य माझें कीं, जो माझ्या स्वप्नांतला चोर व ज्या दुर्लभ प्रियाच्या उत्कंठेनें आम्ही खिन्न झालों होतों, तो सुभग आज माझा पति या नात्यानें माझे दृष्टीस पडला. बरें, हे महाबाहो, आतां मी असें विचारितें कीं, सर्व प्रकारें तुझें कुशल आहेना? आमचें स्त्रियांचें मन मेलें फार कोंवळें असतें म्हणून मी हा प्रश्न करितें.'

उषेचें तें मधुर व खोंचदार वचन ऐकून तो यदुश्रेष्ठही तिजपेक्षांही अधिक शुभाक्षरयुक्त वचन बोलला. आनंदाश्रूंनीं पूर्ण असे तिचे डोळे पुसून व हंसून तो मनोहर वचन बोलला कीं, 'हे मितभाषिणि वरारोहे, माझें सर्वत्र कुशल आहे. हे देवि, तुझ्या प्रसादानें मी तुला प्रिय निवेदन करितों. हे शुभदर्शने, मीं हा देश पूर्वीं कधीं पाहिलेला नव्हता. पण, परवां रात्रीं एकदां स्वप्नांत मीं एक मोठें

१ हा श्लोक अक्षरशः पुढें आला आहे. व याचें कारण सद्यःस्थलीं कांहीं दिसत नाहीं. आणि कलकत्याच्या प्रतींत तो या स्थळीं मुळींच नाहीं.

कन्यापुर ( हेंच ) पाहिलें होतें. त्यानंतर, हे भीरु, अशाच रीतीनें मी हा आज येथें तुझ्या कृपेनें आलों आहें. पार्वतीचें तें वाक्य खोटें होणार नाहीं. देवीची तुजवर प्रीति आहे, असें जाणून, हे भामिनि, तुझें प्रिय करण्याकरितांच मी येथें आलों आहें. प्रसन्न हो, तुला शरण आलों आहें.' त्यानें असें सांगतांच तिनें त्वरेनें अलंकार चढविले आणि गुप्त स्थानीं कांताशीं संगत होऊन अतिशय भयभीत झाल्यासारखी होऊन राहिली. नंतर गांधर्वविवाहविधीनें त्यांचा परस्पर संबंध झाला. व दिवसा चक्रवाक[1] पक्षी जसे रममाण होतात, त्याप्रमाणें तीं दोघें परस्पर रममाण झालीं. अनिरुद्धासारख्या सुंदर पतीचे समागमानें ती दिव्य वस्त्रानुलेपनयुक्त वरांगना फार आनंदित झाली. त्या वेळीं ती फार गुपचुप रीतीनें अनिरुद्धाशीं रमत होती, तीं कळण्यांत आली नाहीं. पण पुढें लवकरच ती वेळ आली. व दिव्यमाल्यें व वस्त्रें धारण करणारा व दिव्यमाळा व अनुलेपनानें शोभलेला तो यदुश्रेष्ठ उषेशीं रममाण होत असतो हें बाणासुराच्या हेरांस कळलें. त्याबरोबर त्यांनीं तत्काल तें बाणकन्येचें अमर्याद वर्तन जाऊन बाणासुरास जसें पाहिलें होतें तसें पुरापुर सांगितलें.

तेव्हां त्या भयंकर कर्मे करणाऱ्या व शत्रुहंत्या बलिपुत्र बाण वीरानें किंकरांच्या सैन्यास अशी आज्ञा केली कीं, तुह्मीं सर्व मिळून जा व ज्या दुष्टबुद्धि दुरात्म्यानें आमचे कुलीनपणाला असा डाग लावला त्याला मारा. उषेचें धर्षण केल्यानें आमच्या मोठ्या कुलाचेंच धर्षण केल्याप्रमाणें झालें आहे. कारण ती विवाहविधीनें त्याला दिलेली नसतां त्यानें आपण होऊनच तिजवर जबरी केली आहे. जो मूर्ख आमच्या या नगरांत व गृहांत निःशंकपणें प्रविष्ट झाला त्या दुर्मतीचें सामर्थ्य व धाडस अवर्णनीय आहे खचीत. असें बोलून पुनः त्यानें त्या किंकरांस सक्तीची आज्ञा केली. व तेही त्याची आज्ञा घेऊन व चांगले सज्ज होऊन निघाले. आणि अनिरुद्ध होता तेथें ते महाबलाढ्य लोक गेले. हातांत नाना शस्त्रें घेऊन व नानाप्रकारचीं रूपें धारण करून ते भयंकर दानव अतिशय चवताळून प्रद्युम्नपुत्राच्या वधाच्या इच्छेनें तेथें येऊन ठेपले. तेव्हां तें सैन्य पाहून अनिरुद्धाला हे मारतील या भयानें कांपणारी ती यशस्विनी बाणकन्या नेत्रांत अश्रु आणून रडूं लागली. तेव्हां ती मृगनयना दानवकन्या रडत आहे व "हा! हा! कांत," असें म्हणून लटलट कांपत आहे, असें पाहून अनिरुद्ध तिला म्हणाला, 'हे सुंदरि, तूं भिऊं नकोस. मी असतांना तूं भिऊं नकोस. हा तर तुला मोठा हर्षाचा प्रसंग आला आहे. या वेळीं भीतीचें कांहींच कारण नाहीं. हे यशस्विनि, बाणासुराचा हा सर्व भृत्यवर्ग जरी मजवर चालून येत आहे तरी मला कांहीं चिंता वाटत नाहीं. हे भीरु, आतां माझा पराक्रम पहा."

नंतर येत असलेल्या त्या सैन्याचा गजबजाट ऐकून प्रद्युम्नपुत्र "काय आहे" असें म्हणत एकाएकीं उठून उभा राहिला. तों त्याला नानाप्रकारचीं शस्त्रें उपसून त्या मोठ्या सैन्यानें सर्वतः त्या गृहास वेढा दिलेला दिसला. त्याबरोबर अतिशय रागानें तो दांतओंठ खाऊन आपल्या एकट्याचेच अंगसामर्थ्याचे भरावर जेथें तें वेढा दिलेलें सैन्य होतें तेथें त्वरेनें आला. तेव्हां बाणासुराचे योद्धे संग्राम

[1] आमच्या वाङ्मयांत प्रेमी स्त्रीपुरुषांचे मिलाफाला चक्रवाक-मिथुन हें वेदकालापासून उपमानीभूत दिसतें. गर्भाधानप्रयोगांत देखील "चाक्रवाकं संवननं। यन्नदीभ्य उदाहृतम्।" असा दृष्टांत आहे.

करण्याकरितांच सरसावले असें पाहून चित्रलेखेनें ज्याचें दर्शन देवांसारखें आहे, अशा नारदाचें स्मरण केलें. त्याबरोबर चित्रलेखेनें ज्या स्थळीं स्मरण केलें होतें, तेथेंच शोणितपुरांत एका निमिषांत नारद योगी प्राप्त झाले. आणि अंतरिक्षांतच उभे राहून ते अनिरुद्धास म्हणाले, ' हे वीरा, भिऊं नको. तुझें कल्याण असो. मी आजच हा तुझ्या नगरीं गेलोंच असें समज! ' तेव्हां नारदास पाहून त्या महाबलानें अभिवादन केलें व मोठ्या आनंदानें तो युद्धास सज्ज झाला. नंतर गर्जना करणाऱ्या त्या सर्वांचाच ध्वनि ऐकून अंकुशानें टोंचलेल्या हत्तीप्रमाणें तो शूर एकाएकीं उठला. ( व त्यांच्या अंगावर धाऊन निघाला. ) त्या वेळीं तो महाबाहु दांतओंठ खात माडीवरून खालीं उतरूं लागला आहे, असें पाहून ते सर्व सैनिक भयानें विकळ होऊन पळाले. पण इतक्यांत नानाप्रकारच्या युद्धांत कुशल असलेल्या त्या अनिरुद्धानें अंतःपुराच्या द्वारांतील दांडगा आडसर घेऊन त्यांना ठार मारण्याकरितां फेंकला. तेव्हां ते सर्व मिळून बाणांची वृष्टि, गदा, मुसळें, तरवारी, शक्ति, व शूल यांच्या योगानें त्याला रणांगणांत मारूं लागले. पण युद्धांत रागावलेले व शस्त्रज्ञ दानव नाराचबाण, परिघ, इत्यादिकांच्या योगानें जरी त्याला मारूं लागले, तरी तो सर्वभूतात्मा अनिरुद्ध ( समष्टि-अंहकार रूपानें सर्व भूतांचा आत्मा ) क्षुब्ध झाला नाहीं. ग्रीष्म-ऋतूंतील गर्जना करणाऱ्या मेघाप्रमाणें गर्जना करीत त्या दानवांमध्यें घोर परिघ फिरवीत तो उभा राहिला. त्यामुळें आकाशांत मेघांमधून फिरणाऱ्या सूर्याप्रमाणें तो दिसूं लागला. तेव्हां दंड व कृष्णाजिन धारण करणारा नारद हृष्टचित होऊन अनिरुद्धास ' शाबास, शाबास ' असें म्हणाला. इतक्यांत वायुवेगापुढें धांवणाऱ्या मेघांप्रमाणें त्या अमितपराक्रमी यादवाच्या त्या भयंकर परिघाच्या योगानें मारले जाणारे ते सर्व दानव पळत सुटले. याप्रमाणें त्या सर्वांस पळवून परिघाच्या योगानें मोठा पराक्रम गाजविणारा वीर अनिरुद्ध रणांत हृष्ट होऊन सिंहनाद करूं लागला.

यामुळें, वर्षर्तूच्या आरंभीं आकाशांत गर्जना करणाऱ्या गंभीर मेघाप्रमाणें तो भासला. शत्रूंचा उच्छेद करणारा तो रतिपुत्र ' उभे रहा, असे पळतां कां ? ' असें त्या रणमस्त दानवांस म्हणाला व त्या सर्वांस झोडीत सुटला. यामुळें त्या महात्म्याकडून अशा रीतीनें मारले जाणारे ते सर्व वीर भयभीत व युद्धपराङ्मुख होऊन, जेथें बाण होता तेथें गेले. व रक्तानें माखलेले ते सर्व दानव बाणाजवळ दीर्घ श्वास सोडीत उभे राहिले. त्यांचें चित्त भयानें विह्वळ झालें असल्यामुळें त्यांस सुख झालें नाहीं. म्हणून त्या राजानें त्यांस ' भिऊं नका, भिऊं नका ' असें म्हटलें. तो आणखी बोलला कीं, " हे दानवश्रेष्ठांनो, भय सोडून एकत्र मिळून युद्ध करा. " तरीही त्यांचे नेत्र भीतीनें तरळले आहेत असें पाहून तो पुनः त्यांस म्हणतो, " मूर्खहो, नपूंसकांप्रमाणें तुम्ही युद्धांत मिळणारें लोकप्रसिद्ध यश सोडून दूर पळतां कां? ज्याच्या भयानें तुम्हीं भीत होऊन वाट फुटेल तिकडे पळत सुटलां आहांत, असा तो आहे तरी कोण? तुम्ही सर्व मोठ्या कुलाचें नांव सांगणारे व नाना प्रकारच्या युद्धांत निपुण आहां. आतां तुम्ही आज माझें युद्धसाहाय्य करूं नका. जा, काळें करा. माझ्या पुढून निघून जा कसे. "

अशा रीतीनें उग्र वाणीनें त्या बलाढ्यानें त्यांस पुष्कळ प्रकारें भिवविलें व दुसऱ्या अनेक शूरांना रणांत जावयास सांगितलें. ज्यांत पुष्कळ प्रमथगण आहेत, अशा नाना शस्त्र-

युक्त अति भयंकर सैन्यास त्यानें शत्रूचा निग्रह करण्याची आज्ञा दिली. तेव्हां अंतरिक्षांतील विद्युद्युक्त मेघांप्रमाणें ज्यांचे नेत्र क्रोधानें लाल झाले आहेत, अशा बाणाच्या सैनिकांनीं रणांगण व्यापून सोडलें. त्यांतील कित्येक भूमीवर उभे राहूनच गजांप्रमाणें समंततः आक्रोश करूं लागले, कित्येक वर्षाऋतूंतील मेघांप्रमाणें अंतरिक्षांत शोभूं लागले. त्यानंतर तें अवाढव्य सैन्य पुनः एकत्र जमलें. त्या वेळीं 'थांब, थांब' असे शब्द चोहोंकडून ऐकूं येऊं लागले. तेव्हां वीर अनिरुद्धही रणांत त्यांच्या समोर गेला. एकटाच पुढें आलेला तो, संग्रामांत महा वीर्यवान् दानवांशीं युद्ध करूं लागला. हें मोठेंच आश्चर्य झालें. त्यानें त्यांचेच तोमर व परिघही हिसकून घेतले. आणि त्या महाबलाढ्यानें त्यांच्या आयुधांनींच त्यांस मारिलें. पुनःपुनः परिघ सोडून व घेऊन रणांगणांत तो शत्रूंचें मर्दन करणारा एक वीर भ्रांत, उद्भ्रांत, आविद्ध, आप्लुत, विप्लुत, प्लुत, इत्यादि बत्तीस प्रकारच्या[1] मोडींनीं संचार करूं लागला असतां कोणाचे ध्यानांत आला नाहीं. तो जरी वस्तुतः एक होता तरी रणाग्रभागीं तोंड पसरलेल्या यमाप्रमाणें बहुप्रकारें क्रीडा करणारा तो सहस्रशः दिसला. त्यामुळें जरी ते क्रोधानें संतप्त झाले होते तरी रक्ताची आंघोळ होऊन व पुनः पराभव पावून जेथें बाण होता तेथें ते पळून गेले. हजारों हत्ती, घोडे, रथ यांवर बसून ते सर्व निस्तेज झालेले दैत्य चोहोंकडून घोर दुःखस्वर काढीत दशदिशाला धांवूं लागले. व भयाचे तडाक्यांत ते एकमेकांच्या अंगांवर पडले. याप्रमाणें, रक्ताच्या गुळण्या टाकीत अगदीं खजील होऊन ते रणांतून तोंड फिरवून परत गेले. अनिरुद्धाशीं संग्राम करीत असतांना त्यांना जसें भय वाटलें तसें पूर्वीं देवांशीं युद्ध करीत असतांनाही वाटलें नव्हतें. कित्येक रक्त ओकत भूतळीं पडले. पर्वताच्या सुळक्यासारखे धिप्पाड दानव शूल आणि तलवारी हातांत घेतलेले, भयानें अतिशय व्याकुल होऊन रण सोडून बाणाकडे गेले.

त्या पराभूत झालेल्या राक्षसांच्या योगानें विस्तीर्ण आकाशतलही भरून गेलें. तेव्हां ती सेना पूर्ण पराभूत झाली आहे असें पाहून बाण यज्ञांतील धडकलेल्या अग्नीप्रमाणें क्रोधानें प्रज्वलित झाला. तिकडे अनिरुद्धावर प्रसन्न झालेला व त्याला संग्रामांत साधुवाद देणारा नारद अंतरिक्षांत फिरत नाचूं लागला. इतक्यांत अतिशय क्रोधाविष्ट झालेला वीर्यवान् बाण, कुभांड सचिवानें[1] ज्यांत युद्धसामग्री उत्तमप्रकारें सांठवून ठेविली आहे, अशा रथावर बसून व तरवार उपसून जेथें अनिरुद्ध होता तेथें गेला. पट्टा, तरवार, गदा, शूल, परशू इत्यादि आयुधें सहस्रावधि भुजांनीं उचलून चाललेला तो बाण शेंकडों ध्वजांनीं शोभणाऱ्या इंद्राप्रमाणें शोभूं लागला. ज्यांस गोधांगुलित्राणादि[2] बांधिलीं आहेत अशा बाहूंनीं तो नाना आयुधांनीं युक्त महाभुज दानवोत्तम शोभूं लागला. धनुष्य वारंवार खेंचित आहे व नेत्र क्रोधानें

---

१ ह्या युद्धांत चाल करून जाण्याच्या वीरांच्या निरनिराळ्या गति आहेत. त्यांचे पारिभाषिक विशिष्ट अर्थ देण्यानें विस्तार फार होतो.

१ 'कुभांडसंगृहीतंतु रथमास्थाय वीर्यवान्' असें मूळ आहे. याचा अर्थ कुभांडानें आंवरलेला ह्मणजे कुभांडच ज्यावर सारथी आहे असाही होतो, व त्या अर्थालाही पुढें श्लोक १६६--ज्यांत ' हे बाणा, तूं आपलें व माझेंही रक्षण कर ' असें ह्मटलें आहे, त्यावरून बळकटी येते. पण सारथ्याचें काम सचिवाबर कां यावें हें समजत नाहीं.

२ "गोधा" हा एक धनुष्यापासून बचाव करण्यारितां डावे बाहूला चामड्याचा पट्टा बांधलेला असतो; व "अंगुलिक" हे अंगुलीरक्षणार्थ चामड्याचे पंजे किंवा मोजे असतात.

लाल झाले आहेत असा तो दानव रागावून सिंहनाद करून शत्रूला "थांब, थांब" असें म्हणूं लागला. त्याचें तें वचन ऐकून पराभूत न होणारा प्रद्युम्नपुत्र रणांगणीं बाणासुराच्या तोंडाकडे पाहून हंसूं लागला. महात्मा बाण ज्या रथांत बसला होता त्याची लांबी चारशें हात असून त्याला पूर्वकाळीं झालेल्या देवदैत्यांचे संग्रामांतील हिरण्यकशिपूचे रथाप्रमाणें एकसहस्र घोडे जोडिले होते; त्याला वाजणारे हजारों घुंघुर बांधले होते. त्यावर लाल पताकांनीं फडकणारा ध्वज उभारला होता. व तो रथ सर्वभर ऋष्यनामक मृगाच्या चर्मानें मढविला होता. असो.

यदुश्रेष्ठानें त्या येणाऱ्या दानवाला पाहिलें व युद्ध करण्याविषयीं त्याला अतिशय आनंद वाटला. त्यानें आपल्या तेजानें तें रणांगण भरून सोडलें. ढाल व तरवार हातीं घेऊन तो रणोत्सुक वीर पूर्वीं आदिदैत्यास मारावयास तयार झालेल्या नृसिंहाप्रमाणें त्याच्या पुढें निर्भय उभा राहिला. ढाल व तरवार घेऊन येत असलेल्या त्या पादचारी वीराला पाहून बाणाला मोठा हर्ष झाला. त्याला वाटलें कीं, आपण त्याला तेव्हांच पार करूं. कारण, त्या यादवाचे अंगांत चिलखत नसून हातीं काय-तो खड्ग होता. पण तो अनिरुद्ध रणांत अजिंक आहे असें जाणून महाबल बाण युद्धाकरितां सन्मुख उभा राहिला. अतिशय रागानें तो "धरा, मारा" असें बोलूं लागला. पण बाण असें बडबडत आहेसें पाहून व ऐकून प्रद्युम्नपुत्र संग्रामांत हंसतच बाणाकडे पाहूं लागला, व भयानें व्याकुल होऊन रडणाऱ्या मानिनी उषेचें हंसत हंसतच सांत्वन करून तो युद्धार्थ उभा राहिला. इतक्यांत अनिरुद्धाला मारण्याच्या इच्छेनें समरांत क्रुद्ध झालेल्या बाणासुरानें चोहोंकडून छोटे बाणसमूहांचा वर्षाव केला. पण त्याचा पराजय इच्छिणाऱ्या अनिरुद्धानें ते बाण तोडिले. रणांत अनिरुद्धास मारण्याची इच्छा करणाऱ्या बाणानें त्याच्या मस्तकावर क्षुद्र शरसमूहांचा वर्षाव केला. पण हजारों बाण ढालेच्या योगानें व्यर्थ करून सोडणारा तो वीर उदयकालच्या सूर्याप्रमाणें त्याच्या सन्मुख उभा राहिला. तो बाणाचें कांहीं चालूं तर देईचना. पण, वनांत समोर एकट्या हत्तीला पाहून सिंह जसा ठाम उभा राहतो, त्याप्रमाणें तो अनिरुद्ध रणांगणीं त्या बाणाला पराजित करून राहिला. बाणानें मर्मभेदी व शीघ्रगामी तीक्ष्ण बाणांनीं अपराजित प्रद्युम्नास वेध केला. पण, बाण जेव्हां बाणांचे योगानें आपणास पीडा देत आहे असें त्यानें पाहिलें, तेव्हां ढाल व तरवार घेऊन अनिरुद्ध त्याच्या अंगावर चालला. तो चालून पुढें येत आहे असें पाहून बाणानेंही त्या महाबाहूस तीक्ष्ण व मर्मभेदी शरांनीं वेध केला. बाणांच्या सतत वर्षावानें ज्याचे सर्व अवयव रक्तानें न्हाले आहेत, असा तो पराभूत झाल्यासारखा होऊन व चिडून बाणाच्या रथावर गेला. तरवारी, मुसळें, शूळ, पट्टे, तोमर व शरसमूह यांनीं दानव प्रहार करीत होते, तरी तो यदुवर डरला नाहीं. क्रोधाचे आवेशांत त्यानें एकाएकीं उडी मारून रणांगणीं खड्गानें बाणाच्या रथाचे घोडे मारले व दोऱ्या तोडल्या. युद्धाचे कामांत कुशल असलेल्या बाणानें शरवृष्टि, पट्टे व तोमर यांच्या योगानें पुनः त्यास झांकून सोडलें. आतां हा शत्रु खास मेला असें जाणून राक्षसगण मोठी गर्जना करूं लागले. पण, तो वीर इतक्यांत एकाएकीं उडी मारून रथाच्या पार्श्वभागीं उभा राहिला. तें पाहून क्रुद्ध झालेल्या बाणानें जळजळीत घोर घंटांच्या मालिकांनीं भरलेली व भयानक अशी शक्ति उचलली. ती तेजानें

अग्नि व सूर्य यांसारखी असून दिसण्यांत उग्र होती. असो. पेटलेल्या उल्केसारखी ती शक्ति बाणानें त्याच्यावर फेंकली. त्या वेळीं त्या शक्तीनें अनिरुद्ध मेल्यास आपले कन्येस वैधव्य येईल ह्याची देखील त्यानें पर्वा केली नाहीं. पण ती प्राणांत करणारी शक्ति आपल्यावर येत आहे असें पाहून त्या वीर अनिरुद्धानें उडी मारून तिला धरलें. व त्या गाजीनें त्याच शक्तीनें बाणाला उलट प्रहार केला. तेव्हां ती शक्ति बाणाच्या शरीरास वेध करून भूतलीं शिरलीं. पण, तिच्या जबर घायानें व्याकुळ झालेल्या त्या दानवानें ध्वजस्तंभाचा आश्रय केला. त्यावेळीं मूर्च्छाक्रांत झालेल्या बाणाला कुभांड बोलला, " हे दानवेंद्रा, हा वीर तुजवर उठलेला असून तूं त्याची अशी उपेक्षा करतोस ! अरे, आपणास आज शिकार साधली, असें समजून हा वीर शांत व स्वस्थ दिसत आहे. यास्तव मायेचा आश्रय करून तूं याच्याशीं युद्ध कर. त्यावांचून हा मरणार नाहीं. ऊठ, माझें व आपलें रक्षण कर. प्रमादानें अशी उपेक्षा कां करतोस? आजच याला मार. नाहीं तर, आह्मां सर्वांस हा मारून टाकील व दुसऱ्याही शेकडों वीरांना मारून उषेला घेऊन जाईल !"

कुभांडाच्या या अशा प्रकारच्या भाषणानें चेवलेला श्रेष्ठ वक्ता दानवेंद्र अतिशय रागावून कठोर शब्दांनीं म्हणाला, " हा मी आतां याला रणांत मारून पाडतों. गरुड जसा सर्पास धरितो त्याप्रमाणें मी याला धरतों. " असें बोलून गंधर्वनगरासारखा तो दानव रथ, ध्वज, अश्व व सारथी यांसह तेथेंच गुप्त झाला. गुप्त राहूनच तो मायावी तीक्ष्ण बाण सोडूं लागला. तेव्हां बाणासुर गुप्त झाला आहे असें जाणून तो अजिंक्य अनिरुद्ध वीरश्रीस चढून दहाही दिशांकडे पाहूं लागला. पण तो क्रुद्ध झालेला महाबलवान् बाण तामसी विद्येचा आश्रय करून गुप्त राहूनच तीक्ष्ण बाण सोडूं लागला. ते बाण सर्प-रूप होते, त्यांच्या योगानें प्रद्युम्नपुत्र सर्वतः बांधला गेला; अनेक सर्पांनीं त्याच्या देहाला अनेक प्रकारें वेढून सोडलें. तेव्हां रणांगणीं सर्वांग जखडल्यानें अनिरुद्ध प्रयत्नशून्य होऊन मैनाक पर्वताप्रमाणें स्तब्ध झाला. बाणरूपी ज्वालामुखी सर्पांच्या शरिरांनीं ज्याला बांधलें आहे, असा तो प्रद्युम्नपुत्र रणांत सर्वतः पर्वताकार झाला. सर्पमुखमय बाणांपुढें त्याचा प्रयत्न व गति राहिली; पण सर्वतः परिवेष्टित झालेलाही तो भूतात्मा व्यथित झाला नाहीं.

त्यानंतर क्रुद्ध झालेला बाणासुर ध्वजाला टेंकून बसून उग्र वाणीनें त्याची यथेच्छ निर्भत्सना करून मोठ्या कोपानें म्हणाला, "कुभांडा, या कुलकलंकाला सत्वर मारून टाक. कारण या दुष्टानें माझ्या व्रताला कलंक लावला आहे." या बोलण्यावरून कुभांडानें उलट उत्तर केलें, ' हे राजन् मी एक गोष्ट सांगतों. इच्छा असल्यास ऐका. हा कोणाचा कोण व येथें कसा आला, कां आला, त्याला येथें कोणीं आणलें, तें अगोदर विचारून घ्या. कारण हा इंद्रासारखा पराक्रमी आहे. कारण, हे राजन्, रणांत युद्ध करीत असतांना मी याला अनेक प्रकारें पाहिलें आहे. तो युद्धप्रसंगीं देवपुत्राप्रमाणें सहज मौजेनें लढत आहेसा दिसतो. तो बलवान्, सत्वसंपन्न व सर्व-शास्त्रनिपुण आहे. हे दानवेंद्रा, याचे हत्येचा दोष आपण करणें इष्ट नाहीं. कारण, आपल्या कन्येनें गांधर्वविधीनें याला वरिलें आहे. यामुळें ती आतां दुसरे कोणाला देतांही येत नाहीं व घेतांही येत नाहीं. यास्तव, याचा वध करणें तर पुरा विचार करावा. हा कोण आहे हें जाणून नंतर वाटेल तर त्याचा वध करा, नाहीं तर पूजा करा. पण याचा वध करण्यांत



कुभांडा या कुलकलंकाला सत्वर मारून टाक. कारण, यानें माझ्या व्रताला कलंक लावला आहे. ( विष्णुपर्व अ० ११९ पृष्ठ ९३२ ).

मोठा दोष असून रक्षणांत फार कल्याण आहे. हा पुरुषश्रेष्ठ सर्वथा मानास पात्र आहे. सर्पांनीं याच्या शरीरास सर्वतः वेष्टून सोडलें आहे, तरी हा थोडासाही व्यथित होत नाहीं. श्रेष्ठ कुल, वीर्य व धैर्य यांनीं हा युक्त आहे. राजन्, पहा बरें हा मोठाच दमदार आहे. हा बली मरावयास टेंकला आहे तरी आम्हांला मोजीत नाहीं. हा माया-प्रभावानें जर बांधला गेला नसता तर त्यानें सर्व देवगणांशीं संग्रामांत युद्ध केलें असतें, यांत कांहीं संशय नाहीं. युद्धाचे सर्व मार्ग जाणणारा हा तुलाही अजिंक्य झाला असता. हा सर्वांगीं रक्त-बंबाळ होऊन सर्पांनीं वेढला गेला आहे, तरी देखील तो आपणांवर डोळे मोडीत नाहीं किंवा आपणाविषयीं विचार देखील मनांत आणीत नाहीं. अशा स्थितीस येऊन पोहोंचला आहे तरी तो स्वतः बाहुबलावर अवलंबून आहे. आणि त्यापुढें तुझी देखील पर्वा करीत नाहीं. तस्मात् हा कोणी वीर्यवान् तरुण आहे. कारण, तो द्विभुज तुज सहस्रबाहूशीं समरांत भिडला. व अजूनही वीर्य-मदानें मत्त झालेला हा तुझ्या वीर्यास मुळींच मोजीत नाहीं. यास्तव, हे राजा, तुला जर माझें म्हणणें रुचेल तर हा असा बल-वीर्य-युक्त कोण आहे याची तूं चौकशी कर. याशीं युक्त झालेली ही कन्या आतां दुसऱ्या कोणालाही देतां येणार-नाहीं; याकरितां हा जर कोणा महात्म्याच्या वंशांत झालेला असून तुला इष्ट वाटला तर, हे असुरोत्तमा, हा वीर तुझ्या सन्मानास पात्र होईल; याचें रक्षण कर."

तेव्हां महात्म्या कुभांडाचें बोलणें ऐकून शत्रुसंहार करणारा बाण 'बरें आहे' असें म्हणाला. व धीमान् अनिरुद्धाचें रक्षण करण्याकरितां रक्षक ठेवून तो महायशस्वी बलिपुत्र आपल्या गृहीं गेला. पण इकडे महाबलवान् अनिरुद्ध मायेच्या योगानें जखडलेला पाहून, ऋषींतील श्रेष्ठ नारद द्वारवतीस गेला. तो ऋषिवर्य मोठ्या त्वरेनें आकाशमार्गानेंच द्वारवतीस गेला. तो ऋषिवर्य गेला असतां अनिरुद्ध मनांत विचार करूं लागला कीं, हा क्रूर दानव कोठें दिसेनासा झाला आहे खरा; पण तो पुनः युद्ध करावयास येईल यांत संशय नाहीं. तथापि, नारदमुनि एवढ्यांत द्वारकेस जाऊन हा वृत्तांत तत्त्वतः श्रीकृष्णास कळवितील याविषयीं मला शंका वाटत नाहीं. तो इतका विचार करीत आहे तों उषा तेथें आली; व अनिरुद्धास सर्पांनीं वेष्टिल्यामुळें तो व्याकुळ झाला आहे असें पाहून तिला रडें कोसळलें. तेव्हां तिला तो पुनः म्हणाला, 'हे भीरु, मृगनयने, रडतेस कशाला? भिऊं गको; हे सुंदरी, माझ्याकरितां स्वतः मधुसूदन आतां येईल पहा. त्याचा शंखध्वनी, व बलरामाचा बाहुशब्द ऐकूनच दानव नाहींतसे होतील; व दैत्यस्त्रियांचे गर्भ गळून पडतील.'

वैशंपायन सांगतातः—अनिरुद्धानें असें सांगितलें तेव्हां उषा पतीसंबंधी थोडीशी स्वस्थचित्त झाली; पण ती सुंदरी आपल्या पित्याविषयीं दुःखी झाली.

## अध्याय एकशें विसावा.

—:०:—

### अनिरुद्धकृत देवीस्तव.

वैशंपायन सांगतातः—त्या वीर अनिरुद्धाला जेव्हां बाणपुरांत बलिपुत्र राजा बाणानें उषेसह कोंडलें, तेव्हां तो प्रद्युम्नपुत्र देवी कोटवतीस स्वरक्षणाकरितां शरण गेला. त्या वेळीं अनिरुद्धानें देवीचें जें स्तोत्र म्हटलें तें ऐक.

अनिरुद्ध उवाच ॥ महेन्द्राविष्णुभगिनि नमस्यामि हिताय वै ॥ मनसा भावशुद्धेन शुचिः स्तोष्ये कृताञ्जलिः ॥ १ ॥ गौतमीं कंसभयदां यशोदानन्दवर्धिनीम् ॥ मेध्यां गोकुलसंभूतां नन्दगोपस्य नन्दिनीम् ॥ २ ॥ प्रज्ञां दक्षां शिवां सौम्यां दनुपुत्रविमर्दिनीम् ॥ तां देवीं सर्वदेहस्थां सर्वभूतनमस्कृताम् ॥ ३ ॥ दर्शनीं पूरणीं मायां वह्निसूर्यशशिप्रभाम् ॥ शान्तिं ध्रुवां च जननीं मोहिनीं शोषणीं तथा ॥ ४ ॥ सेव्यां देवैः सर्षिगणैः सर्वदेवनमस्कृताम् ॥ कालीं कात्यायनीं देवीं भयदां भयनाशिनीम् ॥ ५ ॥ कालरात्रिं कामगमां त्रिनेत्रां ब्रह्मचारिणीम् ॥ सौदामिनीं मेघरवां वेतालीं विपुलाननाम् ॥ ६ ॥ यूथस्याद्यां महाभागां शकुनीं रेवतीं तथा ॥ तिथीनां पञ्चमीं षष्ठीं पूर्णमासीं चतुर्दशीम् ॥ ७ ॥ सप्तविंशतिऋक्षाणि नद्यः सर्वा दिशो दश ॥ नगरोपवनोद्यानद्वाराट्टालकवासिनीम् ॥८॥ ह्रीं श्रीं गङ्गां च गन्धर्वां योगिनीं योगदां सताम्॥ कीर्तिमाशां दिशं स्पर्शां नमस्यामि सरस्वतीम् ॥ ९ ॥ वेदानां मातरं चैव सावित्रीं भक्तवत्सलाम् ॥ तपस्विनीं शान्तिकरीमेकानंशां सनातनीम् ॥ १० ॥ कौटीर्यां मादिरां चण्डामिलां मलयवासिनीम् ॥ भूतधात्रीं भयकरीं कूष्माण्डीं कुसुमप्रियाम् ॥ ११ ॥ दारुणीं मदिरावासां विन्ध्यकैलासवासिनीम् ॥ वराङ्गनां सिंहरथीं बहुरूपां वृषध्वजाम् ॥ १२ ॥ दुर्लभां दुर्जयां दुर्गां निशुम्भभयदर्शिनीम् ॥ सुरप्रियां सुरां देवीं वज्रपाण्यनुजांशिवाम्॥१३॥ किरातीं चीरवसनां चौरसेनानमस्कृताम्॥ आज्यपां सोमपां सौम्यां सर्वपर्वतवासिनीम् ॥१४॥ निशुम्भशुम्भमथिनीं गजकुम्भोपमस्तनीम्॥ जननीं सिद्धसेनस्य सिद्धचारणसेविताम् ॥ १५ ॥ चरां कुमारप्रभवां पार्वतीं पर्वतात्मजाम् ॥ पञ्चाशद्देवकन्यानां पत्न्यो देवगणस्य च ॥ १६ ॥ कद्रुपुत्रसहस्रस्य पुत्रपौत्रवरस्त्रियः ॥ माता पिता जगन्मान्या दिवि देवाप्सरोगणैः ॥ १७ ॥ ऋषिपत्नीगणानां च यक्षगन्धर्वयोषिताम् ॥ विद्याधराणां नारीषु साध्वीषु मनुजासु च ॥ १८ ॥ एवमेतासु नारीषु सर्वभूताश्रया ह्यसि ॥ नमस्कृतासि त्रैलोक्ये किन्नरोद्गीतसेविते ॥ १९ ॥ अचिन्त्या ह्यप्रमेयासि यासि सासि नमोस्तु ते ॥ एभिर्नामभिरन्यैश्च कीर्तिता ह्यसि गौतमी ॥ २० ॥ त्वत्प्रसादादविघ्नेन क्षिप्रं मुच्येय बन्धनात् ॥ अवेक्षस्व विशालाक्षि पादौ ते शरणं व्रजे ॥ २१ ॥ सर्वेषामेव बन्धानां मोक्षणं कर्तुमर्हसि ॥ ब्रह्माविष्णुश्च रुद्रश्च चन्द्रसूर्याग्निमारुताः ॥ २२ ॥ अश्विनौ वसवश्चैव धाता भूमिर्दिशो दश ॥ मरुतासह पर्जन्यो धाता भूमिर्दिशो दश ॥ २३ ॥ गावो नक्षत्रवंशाश्च ग्रहा नद्यो ह्रदास्तथा ॥ सरितः सागराश्चैव नानाविद्याधरोरगाः ॥ २४ ॥ तथा नागा सुपर्वाणो गन्धर्वाप्सरसां गणाः ॥ कृत्स्नं जगदिदं प्रोक्तं देव्या नामानुकीर्तनात् ॥ २५ ॥ देव्याः स्तवमिमं पुण्यं यः पठेत्सुसमाहितः ॥ सा तस्मै सप्तमे मासि वरमग्र्यं प्रयच्छति ॥ २६ ॥ अष्टादशभुजा देवी दिव्याभरणभूषिता ॥ हारशोभितसर्वाङ्गी मुकुटोज्ज्वलभूषणा ॥ २७ ॥ कात्यायनी स्तूयसे त्वं वरमग्र्यं प्रयच्छसि ॥ अतः स्तवीमि तां देवीं वरदे वामलोचने ॥ २८ ॥ नमोस्तु ते महादेवी सुप्रीता मे सदा भव ॥प्रयच्छ त्वं वरं ह्यायुः पुष्टिं चैव क्षमा धृतिम् ॥ २९ ॥ बन्धनस्थो विमुच्येयं सत्यमेतद्भवेदिति ॥ वैशम्पायन उवाच ॥ एवं स्तुता महादेवी दुर्गा दुर्गपराक्रमा ॥ ३० ॥ सान्निध्यं कल्पयामास अनिरुद्धस्य बन्धने ॥

अनिरुद्धहितार्थाय देवी शरणवत्सला ॥ ३१ ॥ बद्धं बाणपुरे वीरमनिरुद्धं व्यमोक्षयेत् ॥ सान्त्वयामास तं वीरमनिरुद्धममर्षणम् ॥ ३२ ॥ पूजयामास तां वीरः सोनिरुद्धः प्रतापवान् ॥ प्रसादं दर्शयामास अनिरुद्धस्य बन्धने ॥ ३३ ॥ नागपाशेन बद्धस्य तस्योषा हृतचेतसः ॥ स्फोटयित्वा कराग्रेण पञ्जरं वज्रसन्निभम् ॥ ३४ ॥ रुद्धं बाणपुरे वीरं सानिरुद्धमभाषत ॥ सान्त्वयन्ती वचो देवी प्रसादाभिमुखी तदा ॥ ३५ ॥ श्रीदेव्युवाच ॥ चक्रायुधो मोक्षयित्वाऽनिरुद्ध त्वां बन्धनादाशु सहस्व कालम् ॥ छित्त्वा स बाणस्य सहस्रबाहुं पुरीं निजां नेष्यति दैत्यसूदनः ॥ ३६ ॥ ततोनिरुद्धः पुनरेव देवीं तुष्टाव हृष्टः शशिकान्तवक्त्रः ॥ अनिरुद्ध उवाच ॥ नमोस्तुते देवि वरप्रदे शिवे नमोस्तु ते देवि सुरारिनाशिनि ॥ ३७ ॥ नमोस्तु ते कामचरे सदाशिवे नमोस्तु ते सर्वहितैषिणि प्रिये ॥ नमोस्तु ते भयकरि विद्विषां सदा नमोस्तु ते बन्धमोक्षकारिणि ॥ ३८ ॥ ब्रह्माणीन्द्राणि रुद्राणि भूतभव्यभवे शिवे ॥ त्राहि मां सर्वभीतिभ्यो नारायणि नमोस्तु ते ॥ ३९ ॥ नमोस्तु ते जगन्नाथे प्रिये दान्ते महाव्रते ॥ भक्तिप्रिये जगन्मातः शैलपुत्रि वसुंधरे ॥ ४० ॥ त्राहि मां त्वं विषालाक्षि नारायणि नमोस्तु ते ॥ त्रायस्व सर्वदुःखेभ्यो दानवानां भयंकरि ॥ ४१ ॥ रुद्रप्रिये महाभागे भक्तानामार्तिनाशिनि ॥ नमामि शिरसा देवीं बन्धनस्थो विमोक्षितः ॥ ४२ ॥ वैशम्पायन उवाच ॥ आर्यास्तवमिदं पुण्यं यःपठेत्सुसमाहितः ॥ सर्वपापविनिर्मुक्तो विष्णुलोकं स गच्छति ॥ बन्धनस्थो विमुच्येत सत्यं व्यासवचो यथा ॥ ४३ ॥

अनंत, अक्षय दिव्य, आदिदेव, सनातन, व जगाचा प्रभु अशा श्रेष्ठ नारायणास नमस्कार करून मी चंडी, कात्यायनी, आर्या, लोकनमस्कृत व वरद अशा देवीचें हरीनें उत्तमप्रकारें स्तविलेल्या नांवांनीं कीर्तन करितों. ऋषी व देवता यांनीं वाक्पुष्पांनीं जिची पूजा केली आहे, अशा शुभ, सर्वदेहस्थ, व सर्वदेवनमस्कृत देवीची मी स्तुति करतों. अनिरुद्ध ह्मणाला:—हे महेंद्र व विष्णु यांचे भगिनि, मी आपल्या हिताकरितां तुला नमस्कार करतों व शुद्धभावयुक्त मनानें पवित्र होऊन व हात जोडून तुझें स्तोत्र करीन. गौतमी, कंसास भय देणारी येशोदेचा आनंद वाढविणारी, पवित्र गोकुळांत उत्पन्न झालेली व नंद गोपाची कन्या, प्रज्ञा, दक्षा, शिवा, सौम्या व दानवांचें दमन करणारी जी देवी तिला मी नमस्कार करतों. सर्वदेहस्थ, सर्वभूतनमस्कृत, दर्शनी, पूरणी, माया, वन्हि, सूर्य, चंद्र, प्रभा, शांति, ध्रुवा, जननी, मोहिनी, शोषिणी, ऋषिगणांसह देवांस सेव्य, सर्व देववंदित, काली, कात्यायनी, देवी, भयदा, भयनाशिनी, कालरात्री, स्वच्छंद गमन करणारी, त्रिनेत्रा, ब्रह्मचारिणी, सौदामिनी, मेघरवा, वेताली, विपुलमुखी, गणनायिका, महाभागा, शकुनी, रेवती, तिथींतील पंचमी, षष्ठी, पूर्णमासी, चतुर्दशी, सत्तावीस नक्षत्रें, नद्या, सर्व दिशा, नगर, उपवन, उद्यान, द्वारदेश व माळे या स्थळीं राहणारी, ऱ्ही, श्री, गंगा, गंधर्वा, योगिनी, संतांस योग देणारी, कीर्ति, आशा, उपादिशा, स्पर्शा व सरस्वती अशा देवीस मी नमस्कार करितों. वेदांची माता, भक्तवत्सला, सावित्री, तपस्विनी, शांतिकरी, एकानंशा, कूष्मांडी, कुसुमप्रिया, दारुणी, मदिरावासा, विंध्यकैलासवासिनी, वरांगना, सिंहरथी, बहुरूपा, वृषध्वजा, दुर्लभा, दुर्जया, दुर्गा, निशुंभभयदर्शिनी, सुरप्रिया, सुरा, देवी, इंद्रानुजा, शिवा, किराती, चीर-

वसना, चौरसेनानमस्कृता, आज्यपा, सोमपा, सौम्या, सर्व-पर्वतवासिनी, निशुंभशुंभमथनी, गजकुंभोपमस्तनी, सिद्धसेनाची जननी, सिद्ध-चारणसेविता, चरा, कुमारमाता, पार्वती व पर्वतकन्या, अशा तुज महादेवीला मी प्रणाम करतों. पन्नास देवकन्या, देवगणांच्या पत्न्या, कद्रूचे सहस्त्रावधि पुत्र व त्यांचे पुत्रपौत्र आणि स्त्रिया, देवलोकांत देव व अप्सरागण, यांसह जगन्मान्य मातापिता, ऋषिपत्नींचे गण, यक्ष व गंधर्व यांच्या स्त्रिया, विद्याधरांच्या स्त्रिया, साध्वी मानुषस्त्रिया, इत्यादि ह्या सर्व स्त्रियांचे ठायीं तूं सर्व भूतांना आश्रयभूत आहेस, किन्नरांच्या उच्च गायनानें सुसेवित झालेल्या त्रैलोक्यांत तूं नमस्कृत आहेस. तूं अचिंत्य व अप्रमेय आहेस. देवि, तूं जशी असशील तशी अस. तुला नमस्कार असो. हे गौतमि, या व अशाच दुसऱ्याही नांवांनीं भक्त तुझें कीर्तन करितात. तुझ्या प्रसादानें मी सत्वर व निर्विघ्नपणें बंधनांतून मुक्त होईन. हे विशालनयने, मजकडे पहा. मी तुझ्या चरणीं शरण आहें. सर्व बंधांपासून मला मुक्त करण्यास तूं समर्थ आहेस. ब्रह्मा, विष्णु, रुद्र, चंद्र, सूर्य, अग्नि, वायु व अश्विनीकुमार, वसु, धाता, भूमि, दशदिशा, वायूसहपर्जन्य, गाई, नक्षत्रसमूह, ग्रह, सामान्य नद्या, ऱ्हद, महानद्या, सागर, नाना प्रकारचे विद्याधर, सर्प, नाग, देव, गंधर्व व अप्सरा यांचे क्षुद्र संघ, इत्यादि–किंबहुना हें सर्व जगत् देवीच्या नामानुकीर्तनानें वर्णिलें जातें. देवीचा पुण्य-कारक स्तव जो अति शांत चित्तानें म्हणतो त्याला ती सातव्या महिन्यांत सर्वोत्तम वर देते. त्या देवीला अठरा भुजा आहेत. ती दिव्य आभरणांनीं भूषित आहे. हारांच्या योगानें तिचें सर्व अंग शोभित झालें आहे व मुकुट हेंच तिचें उज्ज्वल भूषण आहे. हे कात्यायिनि, मी तुझी स्तुति करीत आहें. हे सुंदरी वरदे, तूं मला श्रेष्ठ वर देशील एवढ्यासाठीं मी तुझी स्तुति करितों. हे महादेवि, तुला नमस्कार असो. सदा मजवर सुप्रसन्न हो. तूं मला वर, आयुष्य, पुष्टि, क्षमा व धृति दे. मी बंधमुक्त झालें म्हणजे हें सर्व सत्य होईल.

वैशंपायन सांगतातः—जिचा पराक्रम फार कठिण आहे अशा दुर्गा महादेवीची याप्रमाणें अनिरुद्धानें स्तुति केली असतां, त्या शरणवत्सल देवीनें अनिरुद्धाकरितां बंधन-प्रसंगीं त्याचें सान्निध्य केलें. बाणासुराच्या नगरांत बद्ध झालेल्या त्या वीराला तिनें मुक्त केलें व त्या अक्षमी शूराचें सांत्वन केलें. त्या वेळीं त्या प्रतापी कृष्णपौत्रानें तिचें पूजन केलें, तेव्हा तिनें उलट आपला पूर्ण प्रसाद त्याला दाखविला. उषेनें ज्याचें चित्त हरण केलें आहे अशा व नागपाशांनीं बद्ध झालेल्या अनिरुद्धाचा, वज्रासारखा बळकट पिंजरा नखांनीं फोडून त्या शोणितपुरांत रुद्ध झालेल्या वीराला ती प्रसादोन्मुखी देवी सांत्वन करीत म्हणाली, "बा अनिरुद्धा, लवकरच चक्रपाणी तुला या बंधनांतून सोडवील. थोडा वेळ हें दुःख सहन कर. तो दैत्यनाशक या बाणासुराचे सहस्त्र बाहु तोडून तुला आपल्या नगरीस घेऊन जाईल.' त्यानंतर चंद्राप्रमाणें ज्याचें मुख सुंदर आहे, असा अनिरुद्ध आनंदानें पुनरपि देवीचें स्तवन करूं लागला. अनिरुद्ध म्हणाला, 'हे वरप्रदे शिवे, देवि, तुला नमस्कार असो. हे सुरारिनाशिनी देवि, तुला मी प्रणाम करितों. हे स्वच्छंद विहार करणारे सदाशिवे, तुला माझा दंडवत असो. हे सर्वहितैषिणि प्रिये, तुला नमस्कार असो. शत्रूंस भय देणारे व बंधनापासून मुक्त करणारे देवि, तुला मी प्रणाम करतों. हे ब्रह्माणि, रुद्राणि, भूतभव्यभवे, शिवे, माझें सर्व भीती-

पासून रक्षण कर. हे नारायणि, तुला नमस्कार असो. हे जगन्नाथे, प्रिये, दान्ते, महाव्रते, भक्तिप्रिये, हे जगन्माते, शैलपुत्रि, वसुंधरे, व हे विशालाक्षि, माझें रक्षण कर. हे नारायणि, तुला नमस्कार असो. हे दानवांस भय उत्पन्न करणारे, सर्व दुःखापासून माझें रक्षण कर. रुद्रप्रिये, महाभागे, भक्तांचें दुःख नाश करणारे, तुजकडून बंधमुक्त केला गेलेला हा मी तुला शिरसा प्रणाम करितों.

वैशंपायन सांगतातः—जो हें देवीचें स्तवन अति स्वस्थ चित्तानें म्हणतो तो सर्व पापापासून मुक्त होऊन विष्णुलोकास जातो. आणि तो बंधनामध्यें पडलेला असल्यास मुक्त होतो. हें व्यासवचनाप्रमाणें सत्य आहे.

## अध्याय एकशें एकविसावा.

—:०:—

### कृष्णाचें युद्धार्थ गमन.

वैशंपायन सांगतातः—राजन्, इकडे द्वारकेंत अनिरुद्धाचे गृहांत सर्व स्त्रिया आपला प्रिय नाथ दृष्टीं पडेना म्हणून कुररीपक्षिणींप्रमाणें एकत्र जमून रडूं लागल्या. ‘ अहो, धिक्कार असो. हे नाथ, हें काय ? एक प्रभु कृष्ण नीट असतांना आम्ही अनाथांप्रमाणें अतिशय त्रस्त व भयपीडित होऊन रडावें काय ? आदित्य व मरुद्गण यांसह स्वर्गांतील सर्व इंद्रप्रमुख देव ज्याच्या बाहुच्छायेचा आश्रय करून राहतात, त्या भयप्रद देवालाच हें या लोकीं महाभय उत्पन्न झालें आहे. त्याचा पौत्र वीर अनिरुद्ध कोणीं हरण करून नेला आहे. जो दुर्बुद्धि, वासुदेवाला दुःसह क्रोध उत्पन्न करतो, त्याला या लोकीं भय कसें तें ठाऊकच नसतें, असें मला वाटतें. जो तोंड पसरलेल्या मृत्यूच्या दंष्ट्राग्रावर उभा राहतो तोच रिपु मोहानें समरांत वासुदेवाच्या सन्मुख उभा राहतो. यदुश्रेष्ठाचें हें असें अप्रिय करून प्रत्यक्ष इंद्रही जिवंत कसा राहील ? आमच्या नाथास कोणीं हरण केल्यानें या आम्ही नाथविरहित होऊन शोचनीय झालों आहों. नाथाच्या अत्यंत वियोगामुळें आम्ही मृत्यूच्या दारांत बसलों आहों. असें बोलत पुनःपुनः रडत त्या परमश्रेष्ठ स्त्रिया नेत्रांतून अमंगल जलस्राव करूं लागल्या. पाण्याचा लोंढा आला असतां पाण्यांत बुडालेल्या कमलाप्रमाणें त्यांचे अश्रुपूर्ण नेत्र फारच शोभत होते. त्यांच्या सुंदर कुरळ्या पापण्या फारच शोभत होत्या, व त्यांचे नेत्र रक्तानें भरल्याप्रमाणें चमकत होते. सहस्रावधि आक्रंदणाऱ्या टिटव्यांचा ध्वनि जसा आकाशांत पसरतो त्याप्रमाणें राजमंदिराच्या माडीवर त्या विलाप करणाऱ्या स्त्रियांचा ध्वनि भरून राहिला. तेव्हां तो घोर, अपूर्व व भयंकर ध्वनि ऐकून अकस्मात् सर्व पुरुषश्रेष्ठ आपापल्या गृहांतून वेगानें बाहेर पडले. व अनिरुद्धाच्या गृहांत हा कल्लोळ कां बरें होत आहे? कृष्ण रक्षण करीत असतां आम्हांवर हें भय कोठून कोसळलें ? याप्रमाणें ते परस्पर प्रेमभरामुळें अडखळत बोलणाऱ्या वाणीनें बोलूं लागले, व चिडवलेल्या सिंहाप्रमाणें गृहांतून निघाले. तत्काल कृष्णाची सर्वांस सज्ज होण्याची सूचना करणारी जंगी नौबद वाजूं लागली. तिचा भयंकर शब्द कानीं येतांच सर्व वीर एकत्र जमले. व काय आहे, काय झालें ? असें ते वारंवार एकमेकांस विचारूं लागले. व झालेलें सर्व वृत्त त्यांनीं परस्परांस सांगितलें. तेव्हां त्या सर्वांचेही नेत्र बाष्पपूर्ण व क्रोधानें लाल झाले; व ज्यांना युद्धाची मोठी खुमखुम असे सर्व यादव दीर्घ निःश्वास सोडीत उभे राहिले.

याप्रमाणें सर्व मुकाट्यानें बसले असतां प्रहार करणाऱ्यांतील श्रेष्ठ व वारंवार निःश्वास

सोडणाऱ्या कृष्णास विप्रथु म्हणाला, "हे पुरुष श्रेष्ठा, तूं असा येथें चिंतामग्न होऊन कां राहिला आहेस ? आम्ही सर्व यादव तुझ्या बाहुबलावरच आपले प्राण ठेवून स्वस्थ आहों. हे कृष्णा, आम्हीं सर्वांनीं तुझाच आश्रय केला आहे. तुझ्याच प्रभावानें आमचे योग्य विभाग आम्हांला सर्वप्रकारें प्राप्त आहेत. बलवान् इंद्रही आमच्याप्रमाणेंच जयापजयाचा भार तुझ्यावर ठेवून सुखानें निःशंक निजतो. असें असतां, तूंच चिंतातुर झालास याला काय म्हणावें ? आम्ही सर्वही तुझे ज्ञाति अगाध शोकसागरांत बुडालों आहों. यास्तव, हे महापराक्रमी देवा, तूंच त्या बुडणारांस वर काढ. असा चिंताविष्ट होऊन बोलत कां नाहींस? हे माधवा, व्यर्थ चिंता करणें तुला योग्य नाहीं." याप्रमाणें त्यांचें बोलणें ऐकल्यावर कृष्ण बराच वेळ पुष्कळसे दीर्घ सुस्कारे सोडून तो वाक्पटु बृहस्पतीप्रमाणें स्वतः असें वचन बोलला.—

श्रीकृष्ण म्हणालाः—हे विप्रथो, याच कार्याचे चिंतनेनें मी असा विवंचनेंत पडलों आहें. पण, या कार्याविषयीं पुष्कळ विचार करूनही मला योग्य उपाय सुचत नाहीं. तुम्हीही मला तेंच सांगत आहां. पण, मला कांहींच उत्तर सुचत नाहीं. यासाठीं मी आतां सर्व यादवमंडळीसमक्ष माझा मतलब सांगतों. हे यादवांनो, तुम्ही सर्व मी चिंतायुक्त कसा झालों आहें तें ऐकून घ्या. वीर अनिरुद्धाला कोणींसें हरण करून नेल्यामुळें पृथ्वींतील सर्व राजे आमच्या सर्व बांधवांसह आम्हांस असमर्थ असें मानतील. पूर्वीं शाल्वानें आपल्या अहुक राजाला असेंच हरण करून नेलें होतें. पण अति दारुण युद्ध करून आपण त्याला परत आणिलें. आमच्या बालक प्रद्युम्नालाही असेंच शंबरानें हरण करून नेलें होतें. पण युद्धांत शत्रूचा नाश करून तो रुक्मिणीपुत्र स्वतःच परत आला. पण, आजची ही गोष्ट त्याहूनही अतिशय कष्टकर आहे. प्रद्युम्नपुत्र कोठें नेला ? हे मनुष्यश्रेष्ठांनो, ( असा प्रसंग मजवर यावा ) अशा प्रकारचे कांहीं दोष मजकडून घडल्याचें तर मला कांहीं आठवत नाहीं. राखेनें भरलेला हा पाय ज्यानें माझ्या मस्तकावर ठेवण्याचा प्रयत्न केला असेल, त्याचें परिवारासह जीवित मी रणांत हरण करीन. कृष्णानें असें म्हटलें असतां, सात्यकि बोलला, "कृष्णा, अनिरुद्धाला शोधण्याकरितां दूत पाठीव. पर्वत, वनप्रदेश वगैरे सर्वत्र सर्वपृथ्वीभर त्यांना शोध करण्यास लाव." तें ऐकून व हंसून[1] कृष्ण अहुकास म्हणालाः—"राजन्, आंतर व बाह्य चारांस आज्ञा करा."

वैशंपायन सांगतातः—केशवाचें हें वचन ऐकून आहुकानें मोठ्या त्वरेनें अनिरुद्धास शोधण्याकारितां दूत पाठविले. तेव्हां यशस्वी राजाकडून आज्ञा केले गेलेले ते दूत त्वरेनें निघाले. त्या महात्म्या राजानें घोडे व रथ हेरांबाबरोबर दिले होते. स्वराज्यांतील नगरग्रामादिकांत आणि परराष्ट्रांत व अरण्यादि बाह्य प्रदेशीं, चोहोंकडे त्याला शोधा अशी त्यानें त्यांस आज्ञा केली होती. "वेळूचीं बेटें जेथें पुष्कळ असतील अशा अरण्यांत, वेलींच्या जाळ्यांनीं भरलेल्या प्रदेशीं, रैवतक व ऋक्षवान् पर्वत इत्यादि स्थानीं, सत्वर घोड्यांवरून जाऊन कृष्णपौत्राला हुडका. तेथील एकेक उद्यान व अरण्य शोधा. उद्यानांतूनही निर्भयपणें सर्वतः फिरून पहा. हजारों घोडे व अनेक रथ यांवर आरूढ होऊन व त्वरेनें जाऊन तुम्ही त्या यदुनंदनाला हुडका" अशी राजाज्ञा होतांच सेनापति अनाधृष्टि कोणतेंही काम बिनचूक करणाऱ्या अच्युत

१ सर्वज्ञ कृष्णाला प्राकृताप्रमाणें हे उपाय करण्याचें ऐकून हंसू आलें.

कृष्णास भीतभीतच म्हणालाः—" हे प्रभो कृष्णा, माझें म्हणणें तुला रुचेल तर ऐक. फार दिवसांपासून तुला हें सांगावें असें माझे मनांत आहे. असिलोमा, पुलोमा, निसुंद, नरक यांस तूं मारलेंस. सौभ, शाल्व, मैंद, द्विविद, मोठा थोरला हयग्रीव इत्यादिकांस त्यांच्या सर्व अनुयायांसह तूं मारिलेंस. देवांकरितां तें तसलें अति घोर युद्ध झालें, त्या समयीं तूं अशांचा निःपात केलास. हे गोविंदा, प्रत्येक रणामध्यें तूं हीं अशा प्रकारचीं सर्व कर्में केलीं आहेस. तुला पाठबळाची कांहीं अपेक्षा नसते. हे कृष्णा, तूं पारिजातहरणसमयीं जें मोठें कर्म केलेंस तें परिणामतःही अति दुष्कर होतें, यांत संशय नाहीं. त्या वेळीं ऐरावताच्या मस्तकावर बसलेल्या युद्धनिपुण इंद्राला तूं बाहुवीर्यानें जिंकिलेंस, यामुळें त्यानें तुझ्याशीं वैर करणें निःसंशय साहजिक आहे व तो त्या वैराबद्दलचा सूडही त्यानें तसाच मोठा घ्यावा हें उघड आहे, यास्तव इंद्रानें स्वतः अनिरुद्धाला हरण करून नेलें असावें. वैराचा बदला घेण्याची शक्ति दुसऱ्या कोणामध्यें दिसत नाहीं.'

हें त्याचें बोलणें ऐकून नागासारखा श्वास सोडणारा धीमान् कृष्ण बलाढ्य अनाधृष्टीस म्हणला, 'सेनापते, बाबा, असें भलतेंच बोलूं नको. असें होणें शक्य नाहीं. देव असलीं क्षुद्र कर्में करीत नसतात. ते अकृतज्ञ, निर्बल, गर्वित व बालिश नाहींत. शिवाय दानवांस मारण्याविषयीं मी जो मोठा यत्न करीत असतों तो देवांकरितांच असतो. त्यांचें प्रिय करण्याकरितां मी त्या महाबलाढ्य उन्मत्तांला रणांत मारतों. एवंच, मी देवपरायण, देवांचे ठायीं आपलें मन ठेवणारा, देवांचाच भक्त व त्यांचेंच प्रिय करण्यांत निरत आहें. तेव्हां मी अशा प्रकारचा आहें हें जाणूनही ते माझें अप्रिय कसें करतील. ? ते सदा अक्षुद्र, सत्यनिष्ठ, व भक्तांवर दया करणार आहेत. यास्तव त्यांच्या हातून आमचें अनिष्ट होणें शक्य नाहीं. तूं बालिशपणानें हें बोलत आहेस. कदाचित् एकाद्या कुलटेनें अनिरुद्धाला हरून नेलें असेल. बाकी हें काम महेंद्र किंवा इतर कोणी देव यांचे हातून होणें शक्य नाहीं.'

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें अद्भुत कर्में करणारा कृष्ण विचार करूं लागला असतां, त्याचें तें भाषण ऐकून मुद्देसूद भाषण करण्यांत पटाईत असलेला अक्रुर मधुर वाणीनें म्हणाला, 'प्रभो, इंद्राचें जें कार्य तेंच आमचें कार्य, व आमचें जें कार्य तेंच इंद्राचें कार्य, हा ठरावच झालेला आहे. देव आम्हांला संरक्ष्य आहेत व आम्हीं देवांना संरक्ष्य आहों. देवांकरितांच आम्ही मनुष्यत्वास प्राप्त झालों आहों.' अक्रूराच्या या अशा प्रकारच्या वचनांनीं प्रेरित झालेला मधुसूदन स्निग्ध व गंभीरवाणीनें पुनः म्हणाला, "या प्रद्युम्नपुत्राला देव, गंधर्व, यक्ष, राक्षस इत्यादिकांनीं कोणींही नेलेलें नाहीं. तर त्या महायशस्वी वीराला कोणी जारिणी स्त्रीनें नेलें असावें, असा माझा तर्क होतो. दैत्य व दानव यांच्या स्त्रिया कुलटा व कपटविद्येंत निपुण असतात. त्यांनींच त्याला नेलें आहे, यांत कांहीं संशय नाहीं. कारण त्याला इतर कोणापासूनही भय नाहीं."

वैशंपायन सांगतातः—यादवमंडळींत जें घडलें होतें, तें तत्वतः जाणून महात्म्या कृष्णानें असें भाषण केलें. तेव्हां सूत, मागध व बंदी यांचा सर्वांस हर्ष देणारा मधुर घोष माधवाच्या गृहांत ऐकूं येऊं लागला. असो. इतक्यांत आहुक राजानें शोध करण्याकरितां पाठविलेले सर्व हेर सर्व दिशांकडून सभाद्वारीं परत आले. व हळू हळू गद्गद वाणीनें असें बोलूं लागलेः—" हे राजा, उद्यानें, गुहा, पर्वत, शून्य शाला, नद्या, सरोवरें इत्यादिकांतील

एकेक स्थळ आम्हीं शंभर वेळां शोधिलें, पण त्यांतील एकाही ठिकाणीं अनिरुद्ध आम्हांला सांपडला नाहीं." दुसरे चार कृष्णापाशीं येऊन म्हणाले, 'हे प्रभो, आम्हीं सर्व देश पाहिले; पण प्रद्युम्नपुत्र आढळला नाहीं. यास्तव, हे यदुनंदना, अनिरुद्धाला हुडकण्याकरितां दुसरी कांहीं युक्ति करण्याची असल्यास आम्हांस सत्वर आज्ञा कर.' नंतर ते सर्वही चार मनांत खिन्न होऊन व डोळ्यांत अश्रु आणून आतां पुढें काय करावें म्हणून आपण वाटाघाट करूं लागले. त्यांतलि कित्येक दांतओंठ चावीत होते व कित्येकांचे डोळे अश्रूंनीं भरले होते. कित्येक भुंवया वर चढवून अर्थसिद्धीचा विचार करीत होते. ते याप्रमाणें अनेक तर्क काढून विचार करीत असतां तेथें 'अनिरुद्ध कोठें आहे ?' म्हणून फार मोठा गवगवा झाला. यादव क्रोधानें एकमेकांकडे पाहूं लागले. त्यांनीं ती रात्र कशी तरी खेदानें घालविली. हे शत्रुनाशक राजा, अनिरुद्धाला कोणीं हरण करून नेलें असावें, असें पुनःपुनः ते म्हणत आहेत तों उजाडलें. इतक्यांत मंगल वाद्यांचे आणि शंखांचे महाध्वनी ऐकून महाबाहु कृष्णाच्या घरांतील सर्व लोक जागे झाले. नंतर लखलखीत उजाडून सूर्य उगवला असतां एकटाच नारद हंसत हंसत सभेंत आला. कृष्णासह तेथें जमलेल्या सर्व यादवांस पाहून त्या देवर्षीनें " जय शब्दानें " माधवाचा गौरव केला. तेव्हां संग्रामांत एरव्हीं दुर्जेय असलेला परंतु सांप्रत खिन्न झालेला कृष्णप्रभु असनावरून उठून नारदास मधुपर्क, व गाय देता झाला. नंतर सुंदर सरपोस घातलेल्या शुभ्र आसनावर सुखानें बसलेला तो मुनि न्यायाचें व मुद्देसूद भाषण करूं लागला.

नारद म्हणाला, 'तुम्हीं असे चिंताविष्ट कां झालां ? निःसंग, विचाररहित, उत्साहहीन, व निर्बलासारखे होऊन कां बसलांत ?" महात्मा नारद असें बोलला असतां, वासुदेव म्हणाला, " भगवन् ऐका. हे सुव्रत ब्रह्मन्, रात्रीं कोणीं आमच्या अनिरुद्धाला हरण करून नेलें, आणि त्यासाठीं आम्ही सर्वही सचिंत चित्तानें बसलों आहों. हे भगवन् मुने, या कामीं जर तुम्हांला कांहीं ऐकून किंवा पाहून बातमी लागली असेल तर मला सांगा. कारण, हे निष्पापा, मला यावेळीं तोच वृत्तांत अतिशय प्रिय आहे." माहात्म्या केशवानें असे सांगितलें असतां नारद हंसून म्हणाला, 'मधुसूदना ऐक. देव व असुर यांच्या युद्धासारखें फार मोठें युद्ध एकाकीं अनिरुद्ध व बाणसुर यांच्यामध्यें झालें. त्या अप्रातिम तेजस्वी बाणाची उषा नामक कन्या आहे. तिच्यासाठीं चित्ररेखा अप्सरेनें येथून अनिरुद्धाला सत्वर हरण करून नेलें. त्यामुळें बलि व इंद्र यांच्याप्रमाणें बाण व प्रद्युम्नपुत्र या दोघांचें तेथें रणांगणांत फार मोठें युद्ध झालें. तें अति अद्भुत व प्रचंड युद्ध आम्हीं या नेत्रांनीं पाहिलें. शेवटीं युद्धांतून परत न फिरणाऱ्या बाणानें भयानें मायेचा आश्रय करून नागपाशांनीं महाबल अनिरुद्धास बांधलें, व हे गरुडध्वजा, त्याचा वध करण्याची आज्ञा दिली. पण, त्याच्या कुभांड नामक मंत्र्यानें बाणाचें निवारण केलें. बाणासुरानें युद्धाचा नाद सोडून संग्रामांत कुमार अनिरुद्धाला सर्पांच्या योगानें जखडून टाकिलें आहे. यास्तव तूं सत्वर उठून यश व विजय मिळव. बाबारे, जयाची इच्छा करणारांनीं आतां स्वतःचे जिवाला जपत बसण्याची ही वेळ नाहीं. कारण, तो अनिरुद्ध वीर बहुतेक गतप्राण झाला असून केवळ धैर्यानें म्हणून प्राणधरून आहे.

वैशंपायन म्हणतातः—याप्रमाणें नारदानें सांगितलें असतां वीर्यवान् कृष्णानें तत्काळ

प्रयाणाची तयारी करण्याची आज्ञा दिली. चंदनानें भरलेल्या लाह्यांचा सर्वतः वर्षाव होत असतांना, तो महाबाहु जनार्दन बाहेर निघाला. नारद म्हणाला, 'हे माधवा, या वेळीं तुला गरुडाचें स्मरण करणें भाग आहे. कारण, हे महाबाहो, दुसऱ्या कोणत्याही वाहनानें शोणितपुराचा मार्ग कंठणें शक्य नाहीं. हे जनार्दना, तुला ज्या दुर्घट मार्गानें जावयाचें आहे त्याचें वर्णन ऐक. प्रद्युम्न जेथें आहे तें शोणितपुर येथून अकरा सहस्र योजनें दूर आहे. तेथें जाणें तर प्रतापी, मनासारखा वेगवान् गरुडच योग्य आहे. यास्तव, हे गोविंदा, त्याला बोलाव. तोच तुला तेथें नेईल व एका मुहूर्ताचे आंत बाणाला दाखवील.'

वैशंपायन म्हणतातः—त्याचें तें वचन ऐकून कृष्णानें गरुडाचे स्मरण केलें. त्याबरोबर तो पक्षिराज त्याच्यापाशीं येऊन हात जोडून उभा राहिला; आणि महात्म्या वासुदेवास प्रणाम करून तो महाबल गरुड मधुर वाणीनें असें सुंदर वचन बोलूं लागलाः— "हे महाबाहो पद्मनाभा, आपण माझें स्मरण कशाकरितां केलेंत? या प्रसंगीं आपलें जें कार्य करावयाचें असेल तें मी स्वतः ऐकण्याची इच्छा करितों. हे प्रभो, पंखांच्या झडपांनीं मी कोणाच्या नगरीचा नाश करूं? कारण, हे गोविंदा, तुझ्या प्रभावानें माझें बल ठाऊक नाहीं असा कोण आहे? हे महाबाहो वीरा, तुझ्या गदेचा वेग व तुझे सुदर्शनापासून निघणारा अग्नि, यांना न जाणणारा असा कोण मूढ आहे कीं, जो तुजपुढें गर्वानें उभा राहून आपला नाश करून घेईल? हे वनमालि, आपला सिंहमुख नांगर आज आपण कोणाचे अंगावर घालणार आहां? आणि, हे प्रभो, कोणाचा देह छिन्नभिन्न होऊन पृथ्वीवर पडणार आहे? हे माधवा, शंखाच्या घोषानें तूं कोणाच्या प्राणांस गुंगविणार आहेस? आज हा कोण सपरिवार यमसदनास जाणार आहे!" बुद्धिमान् गरुडाचे हे प्रश्न ऐकून वासुदेव म्हणाला, "हे वक्त्यांतील श्रेष्ठा, ऐक. बलिपुत्र बाणानें आपल्या शोणितपुरांत उषेकरितां प्रद्युम्नपुत्र अनिरुद्ध याला बांधून ठेविलें आहे. कामपीडित अनिरुद्ध भयंकर विषारी नागांकडून बांधला गेला आहे. हे पक्षिश्रेष्ठा, त्याला सोडविण्याकरितां मीं तुला बोलाविलें. तूं पक्ष्यांमध्यें श्रेष्ठ आहेस. तुझ्यासारखा वेगवान् दुसरा कोणी नाहीं. हे कश्यपपुत्रा, त्या मार्गानें दुसऱ्या कोणालाही जातां येणें शक्य नाहीं. यास्तव, हे वीरा, जेथें प्रद्युम्नपुत्र आहे तेथें मला शीघ्र पोंचव. पुत्राची इच्छा करून, हे गरुडा, तुझी[1] स्नुषा रुक्मवती रडत आहे. तुझ्या कृपेनें बिचारीचा पुत्र तिला मिळो. हे नागनाशका, तूं पूर्वी अमृताचें हरण केलेंस. हे महाभुजा, त्यावेळींच तुझी माझी संगति जमली. तूं माझा ध्वज झालास व सर्व यादव तुझे भक्त आहेत. यास्तव, हे पक्ष्यांच्या देवा, आज मित्रत्व व भक्ति यांस मान दे. तुझ्या वेगासारखा वेग दुसऱ्या कोणाचाही नाहीं. पक्ष्यांत तुझ्यासारखा दुसरा कोणी नाहीं. हे गरुडा, नागभक्षका, मी आपल्या पुण्याची शपथ देऊन सांगत आहें, तुझी आई विनता दासीभावास प्राप्त झाली असतां तूं एकट्यानेंच तिला सोडविलेंस. केवळ पंखांच्या झडपांनेंच तूं रणांत देवांना जिंकलेंस. तूं आपल्या पराक्रमानेंच सर्व देवगणांना पाठीवर घेतलें आहेस. यास्तव चल, आपण आतां अगम्य देशास जाऊं या. तुझ्या साह्यानें माझा विजय होईल. तूं गुरुत्वानें मेरूसारखा आहेस व हलकेपणानें वायूसारखा

१ तूं कश्यपपुत्र असल्यानें माझा भ्राता; व रुक्मीची कन्या वैदर्भी ही प्रद्युम्नाची भार्या असल्यानें तुझी सून होय.

आहेस. भूत, वर्तमान व भविष्य ह्या तिन्ही काळीं पराक्रमामध्यें तुझ्या बरोबरीचा कोणी नाहीं. हे सत्यप्रतिज्ञ, हे महाभागा, हे विनतापुत्र, हे महातेजस्विन्, अनिरुद्धास दाखवून आज तूं माझा साह्यकर्ता हो."

गरुड म्हणाला, 'हें तुझें आजचें सर्वच बोलणें मोठें चमत्कारिक—उलटें—आहे. हे देवा, तुझ्या कृपेनें तर मला सर्वत्र यश आलें. ( असें असतां माझेंच स्तोत्र करतोस. ) हे मधुसूदना, तुझ्या या स्तुतीमुळें मी धन्य व अनुगृहीत झालों आहें. खरें पाहतां मीं तुझी स्तुति करावी; पण, हे महाभुजा, तूंच माझी स्तुति करीत आहेस. तूं देवाध्यक्ष, सुराध्यक्ष, व सर्व इच्छा पूर्णकर्ता आहेस. तुझें दर्शन केव्हांही वायां जात नाहीं. वरार्थी असतील त्यांस तूं वर देतोस. तूं चतुर्भज, चतुर्मूर्ति, चतुर्होत्र नामक यज्ञकर्माचा प्रवर्तक, चारी आश्रमांच्या लोकांचा होमकर्ता[1], चारी पुरुषार्थांचा प्रापक, महाकवि, धनुर्धर, चक्रधर व मोठा शंखधर आहेस. हे प्रभो, तूं पूर्वदेहामध्यें भूमिधर या नांवानें प्रख्यात आहेस. तूं नांगर, मुसळ व चक्र यांस धारण करणारा देवकीचा पुत्र आहेस. तूं चाणूराचें मथन करणारा, किंवा गायींस प्रिय व कंसाचा हंता आहेस. गोवर्धनास धारण करणारा, मल्लांचा शत्रु, मल्लांचा उत्पादक, मल्लांचा आवडता, महामल्ल व महापुरुषही आहेस. तुला ब्राह्मण प्रिय आहेत. तूं ब्राह्मणांचें हित करणारा, विप्रांस जाणणारा, विप्रांस उत्पन्न करणारा, ब्राह्मणभक्त व वरण्यास योग्य असा दामोदर आहेस, म्हणून वर्णिलें आहे. प्रलंबाचें मथन करणारा, केशी दैत्यास मारणारा, दानवांचा अंतक, असिलोम्याचा हंता त्याचप्रमाणें रावणाचा नाश करणारा, बिभीषणाला राज्य देणारा भगवान्, वालीला मारणारा, सुग्रीवाचा राज्यदाता, व तूं बलीच्या राज्याचा नाश करणारा आहेस. रत्नांचें हरण करणारा, स्वतः महारत्नभूत धन्वंतरि रूपानें समुद्राच्या उदरांत उत्पन्न होणारा, व वरुण या नांवानें तूं प्रख्यात आहेस. आपणच नद्यांचा उगम ( मेरु ) आहां. आपण खड्गधर, महाधन्वी व श्रेष्ठ धनुर्धर आहां. दाशार्ह या नांवानें विख्यात, महाधन्वा, धनुप्रिय, व गोविंद या नांवानें प्रख्यात आहेस. हे सुव्रता, तूंच उदधि आहेस. तूंच आकाश, तूंच तम व तूंच समुद्र मंथन करणारा आहेस. बहु फल देणारा स्वर्ग तूंच—तूंच, मोठा स्वर्गचर आहेस. तूंच महामेघ व बीजनिष्पत्ति तूंच आहेस. तूं त्रैलोक्यांत गमन करतोस. तूं क्रोध, लोभ व मनोरथरूप आहेस. तूं कामदाता, कामस्वरूप व धनुर्धर आहेस. सृष्टीला आच्छादित करणारा संवर्तसंज्ञक काल, व मोठा स्थितिकाल तूंच आहेस. हिरण्यगर्भ, रूपज्ञ, रूपवान्, मधुसूदन, ईश, महादेव, व असंख्य गुणयुक्त तूंच आहेस. पण, हे देवा, तूं स्वतः स्तुतीस पात्र असतांना माझी स्तुति करण्याची इच्छा करतोस ! तूं ज्या घोर प्राण्यांकडे क्रूरदृष्टीनें पाहिलेंस त्यांना यमदंड प्राप्त होऊन ते तिर्यग्योनींत व नरकांत जातात. पण ज्या प्राण्यांकडे तूं परमप्रीतीनें पाहिलेंस ते या लोकीं सुख भोगून मरणोत्तर स्वर्गाला गेले आहेत. ( व जातात. ) हे महाबाहो, हा मी तुझ्या आज्ञेंत उभा आहें. असें बोलून 'जय' शब्द करून गरुड केशवास म्हणाला, हे महाबल वीरा, हा मी सज्ज झालों आहें. तूं मजवर आरोहण कर.

तें ऐकून केशवानें त्याला कडकडून आलिंगन दिलें व म्हटलें, " सख्या, शत्रुविनाशार्थ

[1] पहिल्या तीन आश्रमांत तर अग्नींतच होम असतो. संन्यासाश्रमांत जीवात्म्याचा परमात्मांत लय हाच होम. याप्रमाणें चारी होम ईश्वरार्पणच असतात.

तूं हें अर्घ्य घे." असें म्हणून शंख, चक्र, गदा व खड्ग धारण करणाऱ्या जनार्दनानें मोठ्या प्रीतीनें त्याला अर्घ्य दिलें व तो महाबाहु पुरुषोत्तम गरुडावर चढला. त्या बलवान् विजयेच्छूचे केंस काळे असून तो वर्णानेंही काळा होता. चतुर्दंष्ट्र, चतुर्बाहु, चार वेद व सहा अंगें यांस जाणणारा, श्रीवत्सांकित, कमलनयन, उर्ध्वरोमा, मृदुत्वचेनें युक्त, नखें व बोटें सरळ असून, त्याच्या नखांच्या व अंगुलींच्या आंतील भाग लाल होता. त्याचा शब्द स्निग्ध व गंभीर असून बाहू वर्तुळ होते. तो महाबाहु, आजानुबाहु, ताम्रमुख, सिंहासारखा स्पष्ट पराक्रमी व सहस्त्र सूर्यासारखा देदीप्यमान होऊन, प्रकाशमान झाला. भूतांस निर्माण करणारा तो प्रभु विश्वरूपानें भासूं लागला. त्याला वामन अवतारीं संतुष्ट झालेल्या कश्यप प्रजापतीनें अष्टगुण ऐश्वर्य दिलें. तो प्रजापति, साध्य व देव यांमध्यें शाश्वत आहे. सूत, मागध व बंदी आणि महाभाग वेद-वेदांगपारग ऋषि हे दिव्यस्तव करीत आहेत, अशांत तो महाबल कृष्ण द्वारकेंत नगररक्षण कसें करावयाचें तें सांगून जाण्याविषयीं निश्चय करता झाला. तो देव गरुडावर बसला. त्याच्या पाठीमागें हलधरही बसला. बलरामाच्या मागें शत्रूंचें कर्षण करणारा प्रद्युम्नही जाऊन बसला. आणि, "हे महाबाहो, रणांत बाणाला व त्याच्या अनुयायांस जिंक. महासंग्रामांत तुझ्यासमोर उभा रहाण्यास कोणीही समर्थ नाहीं. तुझ्या प्रसादांत निश्चित लक्ष्मी व पराक्रमामध्यें विजय आहे. रणांत सैनिकांसह तूं त्या दैत्येंद्र शत्रूस जिंकशील" अशा सिद्ध व चारण यांचे संघ व महर्षि यांच्या वाणी अंतरिक्षांत सर्व बाजूंनीं ऐकत केशव जावयास निघाला.

# अध्याय एकशें बाविसावा.

—:०:—

## कृष्णाचें रुद्रानुचरांशीं युद्ध.

वैशंपायन सांगतातः—त्यानंतर तुताऱ्या वाजत आहेत, शंख फुंकले जात आहेत, बंदी, मागध व सूत वगैरे भाट अनेक स्तोत्रें गात आहेत, व पुरवासी जन वर मुख[1] करून जयघोष करीत आहेत, अशा थाटांत श्रीकृष्णानें चंद्र, सूर्य किंवा शुक्र यांप्रमाणें तेजस्वी रूप धारण केलें. हे जनमेजया, तुझें देव बरें करो. अशा कृष्णासह गरुड जेव्हां आकाशांत उडाला तेव्हां त्याच्या स्वतेजात कृष्णाचें तेज सामील झाल्यानें त्याला फारच शोभा आली. या वेळीं बाणासुराला मारण्याचा बेत असल्यामुळें त्या कमलनेत्र कृष्णानें पर्वतासारखें विशाल व अष्टभुजांनीं युक्त असें रूप धरिलें. त्याचे उजवेकडील चार हातांत खड्ग, चक्र, गदा व बाण असून डावे बाजूस ढाल, शार्ङ्ग धनुष्य, वज्र[2] व शंख होता. त्या शार्ङ्गधरानें अनंत मस्तकें धारण केलीं. तें पाहून बलरामानेंही[3] अनंत शरीरें धारण केलीं; मग हातीं शुभ्र शस्त्रें घेतलेला व त्या योगानें सुळक्यांच्या कैलास पर्वताप्रमाणें दिसणारा तो बलराम गरुडावर बसला. संग्रामांत पराक्रम करणाऱ्या महाबाहु प्रद्युम्नाचें शरीर महात्म्या सनत्कुमा-

१ वर मुख करण्याचें कारण कृष्ण आकाशमार्गें जात होता.

२ येथें छापील पाठ 'शार्ङ्ग तथा चापं' असा आहे. पण त्यानें तीनच आयुधें होतात. आमचे लेखी पोथीचा पाठ 'शार्ङ्गंच वज्रं च' असा आहे. तोच ग्राह्य वाटला. त्यानें चार आयुधें होतात.

३ मूळांत "संकर्षण" असा शब्द आहे तो कांहीं भाषांतरकारांनीं गुळमुळित ठेविला आहे. परंतु तो शब्द बलराम वाचक आहे. शिवाय "प्रथितो गरुडेनाथ" या ठिकाणीं "आस्थितो गरुडं रामः" असा लेखी पोथी व कलकत्ता प्रत यांचा पाठ आहे, तो अधिक समीचीत आहे.

राच्या शरीरासारखें दिसूं लागलें. असो. पंखांच्या दांडग्या झडपींनीं अनेक पर्वतांस उडवीत व वायूच्या मार्गास प्रतिबंध करीत बलाढ्य गरुड आकाशांतून वेगानें जाऊं लागला. पुढें कांहीं वेळानें वायूपेक्षांही अधिक वेगानें तो पक्षी सिद्ध व चारणसंघांच्या शुभ मार्गांत उतरला. तेव्हां रणामध्यें अप्रतिम असलेल्या कृष्णाला बलराम म्हणाला: "कृष्णा, अकस्मात् आमची अंगकांति अशी मंद कां पडली. आम्हीं सर्व सुवर्णवर्ण झालों आहों यांत कांहीं संशय नाहीं. पण हा प्रकार काय? ह्याचा हेतु आम्हाला सांग. आम्ही मेरूच्या बाजूला आलों आहों कीं काय?"

श्रीभगवान् म्हणाले:—हे शत्रुनाशका, मला वाटतें कीं, बाणासुराचें नगर समीप आहे व त्याच्या रक्षणार्थ जळत असणारा हा अग्नि वर निघाला आहे. आहवनीय अग्नीच्या प्रभेशीं आपला संसर्ग झाल्यानें, हे हलायुधा, आपलें हें वर्णवैरूप्य झालें आहे. श्रीराम ह्मणाला, "मग आम्ही जर इतके जवळ येऊन पोहोंचलों आहों व त्यायोगें असे निस्तेज झालों आहों, तर या प्रसंगीं जें करणें हितकर असेल तें तूं स्वतःच बुद्धीनें कर." श्रीभगवान् म्हणाले, 'गरुडा, प्रस्तुत प्रसंगीं जें काय करणें उचित असेल तें तूंच प्रथम कर. म्हणजे तूं करशील त्या धोरणानें मीही चालेन.' वैशंपायन सांगतात, वासुदेवाचें हें भाषण ऐकून वाटेल तसें रूप धारण करणाऱ्या महाबल गरुडानें आपलें शरीर सहस्रमुख केलें. व तो बलवान् विनतापुत्र त्वरेनें आकाशगंगेपाशीं गेला. आणि तींत बुडी मारून व पुष्कळ पाणी पिऊन बाणाच्या शोणितपुरावर अंतरिक्षांत उभा राहिला. आणि त्या गंगाजलाचा एकसारखा वर्षाव करूं लागला. या त्याच्या उपायानें अग्नि विझाला. बुद्धिमान् गरुडाच्या या युक्तीनें आहवनीय अग्निही शांत झाला. तेव्हां आकाशगंगेच्या जलानें त्याला शांत झालेला पाहून तो पक्षी अतिशय विस्मय पावून म्हणाला: 'अहो, या अग्नीचें केवढें तरी वीर्य! युगांतकालींही हा जळत राहिलेला असतो. बाकी महाबल कृष्ण, बलराम व प्रद्युम्न हे तिघे तिन्ही लोकांस दग्ध करण्यास पुरेसे आहेत, असें मला वाटतें.'

असो; याप्रमाणें तो अग्नि शांत झाल्यावर तो पक्षिराज आपल्या पंखांचा मोठ्या झापाट्यानें भयंकर खडखडाट करीत चालला. तेव्हां रुद्राचे अनुचर अग्नि विचारूं लागले कीं, हे गरुडावर चढलेले भयंकर बहुरूपी तिघे कोण आहेत व येथें कशाकरितां आले आहेत बरें? परंतु त्या डोंगरी अग्नींना या शंकेचा उलगडा होईना. तेव्हां त्यांनीं त्या तीन यादवांशीं संग्राम आरंभिला. ते युद्धास जुंपले तेव्हां त्यांनीं फारच मोठा शब्द केला. तेव्हां गर्जना करणाऱ्या सिंहांच्या महानादासारखा तो नाद ऐकून अंगिरा नामक बुद्धिमान् अग्नीनें आपल्या पुरुषाला आज्ञा केली कीं, जेथें हें युद्ध होत आहे तेथें जा, उशीर लावूं नकोस. व तेथें काय काय चाललें आहे तें सर्व पाहून ये, असें म्हणून त्यानें त्याला त्वरेनें पाठविलें. तेव्हां 'ठीक आहे' असें बोलून तो दूत निघाला. वाटेंत महासंग्रामांत वासुदेवाशीं अग्नि भिडून युद्ध करीत आहे, असें त्यानें पाहिलें. महाबल कल्माष, कुसुम, दहन, शोषण व तपन हे पांच अग्नि स्वाहाकाराच्या विषयामध्यें प्रख्यात आहेत. दुसरे महाभाग आपल्या सैन्यासह व्यवस्थित होते. पिठर, पतग, स्वर्ण, श्वागाध व भ्राज हे पांच स्वाहाकाराच्या आश्रयानें राहणारे अग्नीही युद्ध करीत होते. वषट्काराचा आश्रय करणारे ज्योतिष्टोमाचे दोन अर्ध असे महात्मे, महा-

तेजस्वी दोन अग्नि निकराचें युद्ध करूं लागले. त्या दोन पक्षांचे मध्यभागीं अग्निरथांत बसून व हातांत लखलखीत बाण घेऊन लढणारे अंगिरा महर्षि विशेषच शोभत होते. पण अंगिरा मुनि आपले समोर उभा राहून तीक्ष्ण बाण सोडीत आहे, हें पाहून कृष्ण रागावला व पुनःपुनः विस्मित होऊन जणूं काय हंसतच म्हणाला, " सर्व अग्नीनों, थांबा, असेच उभे रहा. हा मी आतां तुम्हांला भय उत्पन्न करितों. तुम्ही माझ्या अस्त्र-तेजानें जळून दश दिशांस पळून जाल." तें ऐकतांच अंगिरा दीप्त त्रिशूळ घेऊन धांवला. त्या घोर संग्रामांत क्रोधानें तो जणूं काय कृष्णाचे प्राणच घेत आहे असा वाटला. पण यम, सूर्य व अग्नि यांप्रमाणें तेजस्वी असलेल्या अर्धचंद्राकृती बाणांनीं कृष्णानें त्याच्या त्या दीप्त त्रिशूळास तोडलें. नंतर त्या थोर मनाचे देवानें यमतुल्य दीप्त स्थूणाकर्ण बाणानें अंगिरामुनीच्या वक्षःस्थलावर वेध केला. तेव्हां सर्वांग रक्ताचे ओघळांनीं भरून जाऊन तो अंगिरामुनि विव्हळत एकाएकीं निचेष्ट होऊन धरणीवर पडला. बाकीचे चारी ब्रह्मपुत्र अग्नि तत्काल बाणाच्या नगराकडे त्वरेनें धांवले. पश्चात् कृष्णही जेथें बाणासुराचें नगर होतें तेथें आला.

बाणाचें नगर पाहून दुरूनच नारद म्हणाला, 'हे महाबाहो कृष्णा, हें तें शोणितपुर होय. येथें रुद्राणीसह महातेजस्वी रुद्र रहात असे. आणि बाणाचें रक्षण व क्षेम करण्याकरितां कार्तिकस्वामीही सतत रहातो.' नारदाचें हें वचन ऐकून कृष्ण उलट बोलूं लागला. 'हे मुने, क्षणभर स्वतःशीं विचार करून किंवा कोणाला विचारून पहा बरें, कीं बाणाच्या संरक्षणाकरीतां रुद्र येथें प्रकट होईल कीं काय? कारण, तो जर प्रकट होईल तर आम्ही स्वशक्तीनें त्याच्याशीं युद्ध करूं.' असें कृष्ण व नारद जों संभाषण करीत आहेत तों गरुडामुळें शीघ्र गमन करणारे ते[1] एका निमिषांत तेथें येऊन पाहोंचले. नंतर वायुवेगामुळें हाललेला मेघ जसा चंद्रास प्रकट करितो, त्याप्रमाणें कमलनयन कृष्णानें आपला शुभ्र शंख ( बाहेर काढिला व ) ओष्टपुटाशीं लावून जोरानें फुंकला. आणि त्याचे फुंकण्यानें सर्वांस दचकून सोडून तो अद्भुत कर्म करणाऱ्या बाणासुराचे राज्यांत शिरला.

कृष्ण राज्यांत शिरण्याबरोबर शंखांचे नाद व दुंदुभींचें महाध्वनी यांचा पुकार होऊन बाणासुराचीं सैन्यें तत्काळ चोहोंकडे सज्ज होऊं लागलीं. बाणानें भीतीनें अगोदर किंकरांचें सैन्य पुढें पाठविलें. त्यांतून सैनिकांचे हातीं कोटयवधी असंख्य शस्त्रें चमकत होतीं. तें अमोज सैन्य एकत्र जुळल्यामुळें मोठ्या मेघपटलासारखें दिसत होतें. तें काळ्याकुट्ट काजळाच्या ढिगासारखें दिसणारें सैन्य अप्रमेय व अक्षय्य होतें. त्यांतील सर्व दैत्य व दानव व राक्षस यांचे हातीं झगझगीत शस्त्रें होतीं. मुख्य प्रमथगण ( शंकराचे पार्षद ) अव्यय कृष्णाशीं युद्ध करूं लागले. ज्वालायुक्त अग्नीप्रमाणें ज्यांचीं मुखें सर्वतः प्रदीप्त आहेत अशा अतिशय उग्र यक्ष-राक्षस-किन्नरांनीं संग्रामांत त्या चौघांचेंही रक्त प्राशन करण्यास आरंभ केला. तेव्हां त्या सैन्यापाशीं जाऊन महाबल बलराम कृष्णाला म्हणाला, " कृष्णा, अरे महाबाहो कृष्णा, आपल्या बलाचा कसा नाश होत आहे तें पहा. व यांना मोठें भय वाटेल असें कांहीं कर." या प्रकारें धीमान् बलभद्रानें टोंचणी लावल्यामुळें अस्त्रवेत्त्यांतील श्रेष्ठ व अन्तकर्त्या यमाप्रमाणें तेजस्वी अशा कृष्णानें त्यांच्या

[1] कृष्ण, राम, प्रद्युम्न व गरुड.

वधार्थ आग्नेय अस्त्र हातीं घेतलें व त्या अस्त्राच्या तेजानें हिरवें मांस खाणाऱ्या असुरांच्या टोळीस दूर पळवून लावून कृष्ण जेथें तें बाणाचें सैन्य दिसत होतें तेथें सत्वर गेला. त्या सैन्यांतील लोकांच्या हातांत शूल, पट्टे, शक्त्या , ऋष्टी, पिनाक, परिघ इत्यादि आयुधें होतीं. भूपृष्ठावर असलेल्या त्या सैन्यांत शंकराचे प्रमथगणच पुष्कळ होते. पर्वत व मेघ यांच्यासारख्या नानारूप धारण करणाऱ्या भयंकर वाहनावर बसून सर्व योद्धे तेथें टोळीटोळीनें उभे होते. वायूनीं उडविलेल्या मेघांप्रमाणें किंवा दुरवर पसरलेल्या पर्वतांच्या रांगांप्रमाणें दृढ धनुष्यांतीं युक्त असलेल्या पुष्कळ प्रकारच्या सैन्यांनीं त्या स्थलास मोठी शोभा आली होती. मुसळें, तरवारी, शूल, गदा, परिघ यांस हातीं घेऊन सर्वभर धांवणारें तें असंख्येय सैन्य फार शोभत होतें, असो. इतक्यांत बलराम मधुसूदनास म्हणाला:— "कृष्णा, हे महाबाहो मधुसूदना, हें जें सैन्य पुढें दिसत आहे त्याबरोबर मी युद्ध करण्याची इच्छा करीत आहें." त्यावर कृष्ण म्हणाला, 'मलाही अशीच इच्छा झाली आहे कीं, या उत्तम योद्ध्यांसह रणांत दोन हात करावे. मी पूर्वेकडे तोंड करून युद्धास उभा राहतों आणि माझ्या अग्रभागीं गरुड, डाव्या बाजूस प्रद्युम्न व उजव्या बाजूस स्वतः आपण रहा. या घोर महासंग्रामांत एकमेकांचें एकमेकांनीं अवश्य रक्षण करावें.'

वैशंपायन सांगतात:—परस्परांशीं असें संभाषण करणारे ते उत्तम पक्ष्यावर आरूढ झाले. पर्वतशिखरांसारख्या घोर गदा, मुसळ, व नांगर यांच्या योगानें युद्ध करणाऱ्या बलरामाचें रूप त्या वेळीं युगांतीं सर्व भूतांस जाळूं इच्छिणाऱ्या कालाच्या रूपाप्रमाणें भयंकर झालें. युद्धांत कुशल असलेला अतिबली राम शत्रूकडील मोठमोठ्या वीरांना नांगराच्या अग्रानें ओढून मुसळानें चेंचून भूमीवर पाडीत पाडीत रणांत संचार करूं लागला. पुरुषांतील वाघच असा महाबल प्रद्युम्न बाणसमूहांनीं युद्ध करणाऱ्या दानवांना सर्वतः निवारूं लागला. तेलसर काजळाच्या पर्वताप्रमाणें कृष्णवर्ण असा शंख-चक्र-गदा-धारणकर्ता जनार्दन अनेक प्रकारें शंखाचा ध्वनी काढून लढूं लागला. बुद्धिवान् गरुडानें पंखांच्या प्रहारांनीं व नखें व चोंच यांच्या अग्रांनीं फाडून प्रमथादिकांस यमनगरींत पोहोंचविलें. तें प्रचंड पराक्रमी दैत्यसैन्य या प्रकारें कृष्णादिकाकडून झोडलें जाऊन बाणवृष्टीनें व्याकूळ झालें असतां रणांगणीं पराभूत झालें.

तें सैन्य या प्रकारें पराभूत होऊन सर्वतः पळूं लागलें असतां, त्याचे रक्षणाची हांव धरणारा ज्वर पुढें सरसावला. त्याला तीन पाय, तीन शिरें, सहा भुजा व नऊ नेत्र होते. त्या ज्वराचें भस्म हेंच शस्त्र असून तो काल, अंतक अथवा यम यांसारखा उग्र होता. तो ओरडूं लागला असतां त्याचा सहस्र मेघांच्या गडगडाटासारखा महानाद झाला. तो दीर्घ निःश्वास सोडीत व जांभया देत असून त्याचें शरीर निद्रेनें अतिशय व्याप्त झालें होतें. त्याचे दोन्ही डोळे पेंगल्यामुळें मुख व्याकुल दिसत होतें, व तो घुमारत होता. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले होते व नेत्र ग्लानियुक्त झाले होते. आणि भग्न-चित्त झाल्याप्रमाणें श्वास सोडीत तो अतिशय क्रुद्ध होऊन निंदापूर्वक बलरामाला बोलला:—"तूं असा बळामुळें मत्त कां झालास? संग्रामांत आलेल्या मला पहात नाहींस कीं काय? थांब; आतां या रणांतून तूं जिवंत सुटून जाणार नाहींस" असें बोलून हंसत व युगांतींच्या अग्नीसारख्या घोर मुष्टींनीं भय दाखवीत तो

हलायुधावर धांवला. पण त्या संग्रामांत त्वरेनें सहस्रावधि मंडळें घेत फिरणाऱ्या बलरामाचें अवस्थान कोणाला दिसेनासें झालें. तथापि अशांतूनही त्या अप्रतिम तेजस्वी ज्वरानें मोठ्या चलाखीनें भस्म फेंकलें. तें बलरामाच्या पर्वततुल्य शरीरावर जाऊन पडलें. पण तें त्याच्या वक्षःस्थलावर आदळून तेथून मेरु पर्वताच्या शिखरावर उडून गेलें. परंतु तेवढ्यानेंच पेट घेऊन त्या पर्वतशिखराचें विदारण केलें. इकडे थोडेंसें भस्म बलरामाच्या उरःस्थलावर राहिलें होतें, त्यानें त्या कृष्णाग्रजास जाळण्याचा आरंभ केला. तो निःश्वास सोडूं लागला; जांभया देऊं लागला. त्याला अनावर झोंप लोटली. दोन्ही नेत्र जडावले. घेरी करूं लागली. त्याच्या अंगावर रोमांच उठले. नेत्र म्लान झाले व भ्रमिष्टासारखे तो वारंवार सुस्कारे सोडूं लागला. तेव्हां पराजित किंवा किंकर्तव्यतामूढ ( म्हणजे ज्याला आतां पुढें काय करावें हें सुचत नाहीं असा ) बलराम कृष्णास म्हणाला, ' हे कृष्णा महाबाहो, मी जळतों आहें. मला निर्भय कर. अरे बाबा, मी सर्वभर होरपळलों रे होरपळलों. आतां ही आग थंड कशी होईल ? ' अमित तेजस्वी बलराम असें बोलला असतां प्रहार करणारांतील श्रेष्ठ कृष्ण हंसून म्हणाला ' भिऊं नको. ' असें बोलून त्यानें हलायुधाला आलिंगन दिलें. कृष्णानें याप्रमाणें प्रेमानें आलिंगन दिलें असतां बलराम दाहापासून मुक्त झाला. त्याला ज्वररहित करून परम क्रुद्ध झालेला मधुसूदन वासुदेव त्या वेळीं ज्वराला बोलला. ' ज्वरा, ये, ये; मझ्याशीं युद्ध कर. या महासंग्रामांत तुझी जी शक्ति असेल व जें पौरुष असेल तें सर्व तूं मला दाखीव.' याप्रमाणें कृष्ण बोलतांच महाबलवान् ज्वरानें हातांनीं त्याच्यावर जळफळीत बरेंच भस्म फेंकलें. त्यामुळें प्रहार करणांतील श्रेष्ठ कृष्ण-प्रभूचें गात्र घटकाभर पेटलें व कांहीं वेळानें अग्नि आपोआप शांत झाला. त्यानंतर ज्वरानें आपल्या सर्पाकार तीन बाहूंनीं कृष्णाच्या मानेवर व एका मुष्टीनें उरावर प्रहार केला. त्यामुळें त्या महायुद्धांत ज्वर व महाबलाढ्य कृष्ण या दोघां पुरुषसिंहांचा तो परस्पर संप्रहार मोठा तुमुल झाला. पर्वतवार पडणाऱ्या उल्केप्रमाणें त्याचा मोठा ध्वनि होऊं लागला. कृष्ण व ज्वर यांच्या भुजांच्या आघातांनीं तें युद्ध फार दारुण झालें. ते वीर " असें नव्हे; असें मारावें; " असें एकमेकांस प्रहार करितेवेळीं बोलत असतां त्याचा तेथें मोठा ध्वनि होऊं लागला. याप्रमाणें दोन घटका त्या दोघां महात्म्यांचें परस्पर युद्ध झालें. शेवटीं जगाचा क्षय करणाऱ्या शरीरधारी जगत्पतीनें, संग्रामांत विचित्र कनकभूषणें धारण करणाऱ्या व आकाशांत संचार करणाऱ्या ज्वराला आपल्या बाहुबलानें घट्ट आंवळून टाकिलें.

## अध्याय एकशें तेविसावा.

—:०:—

### ज्वर-कृष्ण-संवाद.

वैशंपायन सांगतातः—नंतर हा ज्वर मेलाच असें वाटून त्या शत्रुहंत्या कृष्णानें त्याला आपल्या कवेंतून भूमीवर हापटून दिलें. परंतु कृष्णाचे कवेंतून सुटल्यावर त्या अतुल तेजस्वी कृष्णाचे शरीरास न सोडतां तो त्यांतच घुसला. त्या जाज्वल्य ज्वरानें जोरानें देहांत प्रवेश करितांच कृष्ण अडखळल्यासारखें होऊन भूमीवर सपशेल उलथा पालथा होऊं लागला. कांहीं वेळानें त्या शत्रूंचीं नगरें जिंकणाऱ्या महायोगी तेजस्वी पुरुषोत्तम कृष्णानें आपणास ज्वरानें चीत केलें आहे असें ओळखून, एकीकडे आपण वारंवार जांभया

देत आहे, अशा स्थितींतच धैर्य धरून व महायोग्याला विरुद्ध असा विकार अंगिकारून त्या पूर्व ज्वरास हटविणाऱ्या अशा दुसऱ्या एका घोर अत्युग्र व लोकभयंकर ज्वराला त्यानें निर्माण केलें. या वैष्णव ज्वराचा पराक्रम फारच अवचट होता. कृष्णानें उत्पन्न केलेल्या त्या ज्वरानें पूर्व ज्वराला बलात्कारानें धरून कृष्णाच्या स्वाधीन केलें. तेव्हां हरीनें हर्षानें त्याला पकडलें; व त्याच्यावर अतिशय रागावून त्या बलाढ्य वीर्यवान् वासुदेवानें आपल्या ज्वराकडून त्याला आपल्या शरीरांतून बाहेर घालविलें. तो त्याला भूमीवर आपटून त्याचे शेंकडों तुकडे करण्यास तयार झाला. पण इतक्यांत "हे देवा, माझें परिरक्षण करणें तुला उचित होय" असें पहिला ज्वर ओरडला त्याचप्रमाणें अमित तेजस्वी कृष्णानें त्या ज्वराला फेंकण्याकरितां वर उचललें असतां अंतरिक्षांतून अशरीरिणी वाणी झाली कीं, 'हे यदुहर्षवर्धना महाबाहो कृष्णा, या ज्वराला मारूं नकोस. हे निष्पापा, हा तुला रक्षण करण्यास योग्य आहे.' अशी आकाशवाणी झाली असतां भूत, वर्तमान व भविष्यत् जगाचा परमगुरु जो श्रीहरि त्यानें त्याला स्वतः सोडिलें. तेव्हां तो मुक्त झालेला ज्वर कृष्णाच्या पायांवर मस्तक ठेवून त्यास शरण गेला; आणि त्या हृषीकेशास बोलला, "हे यदुनंदना गोविंदा, माझी विनंती ऐक. हे महाबाहो, माझा जो मनोरथ आहे तो तूं पूर्ण कर. या जगांत मी हा एकच ज्वर असावा; दुसरा असूं नये. तुझा अनुग्रह झाल्यामुळें मी हा वर मागत आहें." देव म्हणाला, 'हे ज्वरा, तुझें भलें होवो. तूं जशी इच्छा करीत आहेस तसें होईल. कारण, वराची इच्छा करणारांस आम्हांला वर अवश्य द्यावा लागतो. तूं तर मला शरण आला आहेस. यास्तव पूर्वीप्रमाणें तूं एकच ज्वर या जगांत रहा. मीं जो हा ज्वर उत्पन्न केला आहे तो माझ्यांतच जिरून जाईल.

वैशंपायन म्हणाले:—महायशस्वी कृष्ण याप्रकारें वर देऊन पुनः तो श्रेष्ठ योद्धा वासुदेव म्हणाला, 'हे ज्वरा, सर्व जातीच्या स्थावर व जंगम सृष्टींत तूं संचार करण्याची रीत मी तुला सांगतों ऐक. माझे आवडीप्रमाणें जर तुला चालणें असेल तर तूं आपले तीन विभाग कर, आणि त्यांतील एकानें चतुष्पाद प्राण्यांचें, व दुसऱ्या भागानें स्थावर प्राण्यांचें सेवन कर. म्हणजे तुझा तिसरा भाग मानुषांमध्यें संचार करूं लागेल. हे ज्वरा, तूं त्रिधाभूत शरीर करून पक्ष्यांमध्यें प्रवृत्त हो. तुझ्या तिसऱ्या भागाचा चतुर्थांश पक्ष्यांचे ठायीं दृढ होईल. एकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक व चातुर्थिक ज्वर हीं या अंशाचीं रूपें होतील. मानुषांमध्येंही चांगला विभाग करून तूं याच भेदानें रहा. बाकीच्या अवशिष्ट जातींमध्येंही तूं कसें रहावयाचें तें मी सांगतों, ऐक. वृक्षांमध्यें कीट रूपानें, पानांचा संकोच करणारा रोग या रूपानें, व पांढरीं पानें करणारा प्रख्यात पांडुपुत्र रोग, अशा तीन रूपांनीं तूं रहा. फळांमध्यें त्यांच्या एका प्रदेशीं गांठ करणारा किंवा त्यांना शुष्क करणारा हो. जलामध्यें शेवाळ; मोरांमध्यें तुरा फोडणारा रोग; पद्मिनी इत्यादिकांमध्यें हिम, व पृथ्वींत उषर होऊन तूं रहा. माझ्या प्रसादानें तूं पर्वतामध्यें गैरिकरूप होशील. गायींमध्यें अपस्मार होऊन खुरकूत रोग होशील. याप्रमाणें तूं बहुरूपीं भूतळीं प्रकट होशील. दर्शन व स्पर्श यांच्या योगानें तूं प्राण्यांचा वध करशील. देवमनुष्यांवांचून तुला दुसरा कोणी सोसूं शकरणार नाहीं.

वैशंपायन म्ह०:—कृष्णाचें वचन ऐकून ज्वराला आनंद झाला. व प्रणाम करून व हात जोडून तो थोडेंसें असें बोलला:—ज्वर म्हणाला, "हे

माधवा, सर्व जातींमध्यें प्रभुत्व देऊन तूं मला धन्य केलें आहेस. हे पुरुषश्रेष्ठा, आणखी कांहीं तुझें वचन पाळण्याची मी इच्छा करीत आहें, यास्तव, हे महाभुज गोविंदा, मी आणखी काय करूं तें सांग. आसुरकुलाचें प्रमथन करणाऱ्या त्रिपुरशत्रु हराकडून मी निर्माण केला गेलों आहें. व आज रणांगणांत तुजकडून जिंकला गेलों आहें. हे देवा, तूं माझा प्रभु आहेस व मी तुझा किंकर आहें. तूं माझें प्रिय केलेंस त्याअर्थी मी धन्य व अनुगृहीत आहें. हे चक्रधरा, मी तुझें कोणतें इष्ट करूं तें सांग." वैशंपायन म्हणतात, ज्वराचें हें वचन ऐकून वासुदेव म्हणाला माझें हें निश्चित वाक्य ऐक. भगवान् ह्मणतातः—"भुजबल हींच ज्यांचीं अस्त्रें आहेत अशा माझा व तुझा या संग्रामांतील पराक्रम मला प्रणाम करून एकाग्रचित्तानें जो पठण करितो, तो नर ज्वरसंतापरहित होईल. भस्मरूपी शस्त्र धारण करणारा, तीन पाय, तीन मस्तकें व नऊ नेत्र यांनीं युक्त सर्व रोगांचा स्वामी असा हा ज्वर संतुष्ट होऊन मला सुख देवो."

वैशंपायन म्हणतातः—साक्षात् महात्म्या कृष्णानें असें म्हटलें असतां ज्वर त्या यदुश्रेष्ठास 'असें होईल,' एवढेंच उलट बोलला. कृष्णापासून याप्रमाणें वर व करार मिळवून हृष्ट झालेला ज्वर कृष्णाला पुनः शिरसा प्रणाम करून रणांतून निघून गेला.

## अध्याय एकशें चोविसावा.

—:०:—

### रुद्र व कृष्ण यांचें युद्ध.

वैशंपायन सांगतातः—त्यानंतर तीन अग्नींसारखे जाज्वल्य ते तिघे सत्वर गरुडावर स्वार होऊन रणांगणीं युद्ध करीत राहिले. गरुडावर बसून व रणांत मोठ्या जोरानें ओरडत त्यांनीं सर्व सैन्यांवर बाणांची वृष्टि केली व त्यांस त्रासवून सोडलें. चक्र व नांगर यांचे प्रहार व बाणांचे वर्षाव यांनीं पीडिलेलें दानवांचें दुरासद महासैन्य अतिशय खवळलें. कृष्णाचे बाणांपासून उद्भवलेला अग्नि गवताच्या ढिगावर पडलेल्या किंवा शुष्क काष्ठानें चेतणाऱ्या अग्नीप्रमाणें अतिशय वृद्धि पावला. त्या समरांगणीं हजारों दानवांस जाळणारा तो युगांत अग्नीसारखा ज्वालावान् अग्नि अतिशय शोभला. आपल्या त्या दीप्त, मोठ्या व नाना शस्त्रांनीं पिडिलेल्या सेनांशीं येऊन बाण तिचें निवारण करण्यासाठीं बोलला कीं, वीरहो, तुम्ही दैत्यवंशांत उत्पन्न झालेले असून क्षुद्राप्रमाणें या महा संग्रामांतून पळ काढितां याला काय म्हणावें ? व तुम्ही इतके भयभीत तरी कसे झालां ? कवच, खड्ग, गदा व प्रास, तरवार, ढाल, व कुऱ्हाड हीं आपलीं आयुधें टाकटाकून तुम्ही असे अंतरिक्षांत पळून कां जातां ? आपली जात, आपला हेतु, व आपणास घडलेला शंकराचा सहवास, या गोष्टींकडे पाहून तरी तुम्हीं पळूं नका. शिवाय, तुम्हांस साहाय करण्यास मी हा तुमच्या पाठीशीं उभा आहें. या प्रकारें बाण त्यांना प्रोत्साहक वाक्य बोलत असतांही तिकडे लक्ष न पुरवितां फार विव्हळ झालेले ते सर्वही वीर रणांतून दूर सरले. तेव्हां त्या रणांत प्रमथगण मात्र अवशिष्ट राहिले. दाणादाण होऊन राहिलेलें तें सैन्य युद्धाविषयीं पुनः विचार करूं लागलें. पण इतक्यांत कुंभांड या नांवाचा बाणाचा सखा व वीर्यवान् अमात्य आपले सैन्याचा मोडा झाला असें पाहून बोललाः—" हा बाण, शंकर, व कार्तिक हे या युद्धांत उभे असतांना तुम्ही असे मोहित होऊन व सर्व सैन्यास टाकून कशाकरितां जांता ? हे दानवश्रेष्ठहो, प्राणांवर उदार होऊन तुम्ही युद्ध करा."

याप्रमाणें कुंभांडाचें वाक्य जरी ते ऐकत होते, तरीही भयानें मूढ होऊन व सुदर्शन चक्रापासून निघणाऱ्या अग्नीचे भीतीनें घाबरून सर्वही जण दश दिशांना पळूं लागले. त्यानंतर अमित तेजस्वी कृष्णानें ह्या सैन्याचा मोड केला. तें पाहून ज्याचे नेत्र लाल झाले आहेत असा शंकर बाणाचें संरक्षण करण्याकरितां सुप्रभ नामक रथावर बसून युद्धास प्रवृत्त झाला. कुमारदेवही अग्नितुल्य रथानें युद्धार्थ निघाला. वीर्यवान् रुद्र नंदीश्वरासहित रथावर बसून दांत ओंठ खात जेथें हरी होता तेथें धांवत गेला. आपल्या खडखडाटानें अंतराळाला ग्रासणारा तो रुद्राचा सिंह जोडलेला रथ मेघमंडलांतून बाहेर पडणाऱ्या पौर्णिमाचंद्राप्रमाणें चमकूं लागला. नंतर नाना रूपें धारण करणाऱ्या व नाना प्रकारच्या आरोळ्या फोडणाऱ्या भयावह सहस्रावधि गणांनीं देवाचा तो रथ वेढला व त्यामुळें त्या रुद्राच्या रथाला फार शोभा आली. त्या गणांतील कित्येक सिंहमुख, कित्येक व्याघ्रमुख, व कित्येक हत्ती, घोडे व उंट यांच्या मुखाचे गण, अतिशय पीडित होऊन रथाशीं लटलट कांपत उभे होते. त्यांतील कित्येक बलाढ्य गणांनीं सर्पांचीं यज्ञोपवीतें घातलीं होतीं. त्यांत कित्येक खर, उंट, व गज यांचीं मुखें असून माना अश्वाप्रमाणें आहेत, असे होते. कित्येक बकऱ्याच्या तोंडांचे, मांजराच्या तोंडांचे व कोंकरांच्या तोंडांचे होते. त्यांतील कित्येक फाटक्या चिंध्या पांघरले होते. कित्येकांनीं शेंड्या ठेविल्या होत्या, कित्येकांनीं जटा राखील्या होत्या. व कित्येकांचे केंस उभारले होते. कित्येक शंख व दुंदुभि यांसारखा ध्वनि करीत नग्नच सर्वतः धांवत होते. त्यांतील थोडेसे गण सौम्यमुख व दिव्य अस्त्रांनीं भूषीत होते. त्यांनीं नानाप्रकारच्या पुष्पांच्या माळा मस्तकावर धारण केल्या होत्या. नाना प्रकारचीं शस्त्रें त्यांच्या हातांत होतीं. त्यांचे परिचर सिंह व व्याघ्र हे असून ते आकृतीनें खुजे व विकट होते. कांहींच्या दाढा फार मोठ्या होत्या, व त्यांतील बळी प्रिय आहे अशा त्या गणांचीं तोंडें रक्तानें भरलीं होतीं. संग्रामाच्या सन्मुख उभे राहून ते सर्व महाशत्रूंचें पूर्णपणें मर्दन करणाऱ्या देवाभोंवतीं लीला करित उभे होते. तेव्हां बिनचूक कार्य करणाऱ्या रुद्राचा तो दिव्य रथ पाहून कृष्ण गरुडावर बसून त्याच्याशीं संग्राम करावयास पुढें आला. त्या वेळीं गरुडारूढ होऊन येत असलेल्या अग्रणी हरीला रुद्रानें रागावून शंभर बाण मारिले. पण याप्रमाणें अचुक कर्में करणाऱ्या हरीनें पीडा दिली असतां क्रुद्ध झालेल्या हरीनें उत्तम पार्जन्य अस्त्र हातीं घेतलें. तेव्हां रुद्र व विष्णु या उभयतांच्या रट्ट्यांत भूमी कांपूं लागली. चारी बाजूंनीं पीडिलेले नाग तोंडें वर करून इतस्ततः फिरूं लागले. जलधारांनीं भिजलेले पर्वत त्या वेळीं धडाधड कोसळले. कित्येकांचीं शिखरें ढांसळून सभोंवार पडलीं. दिशा, उपदिशा, भूमि व आकाश हीं सर्व शंकर व कृष्ण यांच्या झगड्यांत पेटल्यासारखीं दिसूं लागलीं. भूतलावर सर्वतः उल्का पडल्या. ज्यांचें दर्शनही भयप्रद आहे, अशा भालू अशुभ आक्रोश करूं लागल्या. इंद्र घोर नाद व रक्ताचा वर्षाव करूं लागला धूमकेतू आपल्या पुच्छानें बाणासुराच्या सैन्याला झांकून राहिला. वारा जोरानें वाहूं लागला. ग्रह-नक्षत्रादि ज्योति व्याकूळ होऊन अंतरिक्षांतून फिरतनाशा झाल्या. औषधी निस्तेज झाल्या. इतक्यांत त्रिपुरांतक रुद्र युद्ध करावयास उद्युक्त झाला आहे असें जाणून सर्व देवांसह ब्रह्मा तेथें आला. गंधर्व, अप्सरा, यक्ष, विद्याधर, सिद्ध, चारण यांचे संघही त्यांस पहात अंतरिक्षांत उभे राहिले. नंतर विष्णूनें

तें " पार्जन्य " अस्त्र रुद्रावर सोडलें. त्याबरोबर जेथें रुद्र रथावर बसला होता तेथें तें जळत गेलें. तेव्हां नतपर्व शेंकडों बाण जेथें हराचा रथ होता तेथें समंततः पडले. पण इतक्यांत अस्त्रवेत्त्यांतील श्रेष्ठ रुद्र रागावून महाभयंकर आग्नेय अस्त्र सोडता झाला. खरोखर तो एक चमत्कारच झाला. कारण त्या वेळीं त्या चौघांचेही ( कृष्ण, बलराम, प्रद्युम्न व गरुड ) देह चोहों बाजूंनीं छिन्न-भिन्न होऊं लागले. बाणांनीं आच्छादित होऊन अग्निज्वालेंत गुरफटून ते दिसेनातसे झाले. तेव्हां सर्वच वरिष्ठ असुर, हा शत्रु आग्नेयास्त्रानें मेला असें समजून, मोठ्यानें सिंहनाद करूं लागले. पण अस्त्रवेत्त्यांतलि श्रेष्ठ, अज, व प्रतापवान् वासुदेवानें तें अस्त्र सहन करून उलट वारुणास्त्र उचललें. तेव्हां त्या अतितेजस्वी वारुणतेजानें आग्नेयास्त्र शांत झालें. याप्रमाणें संग्रामांत वासुदेवानें रुद्राच्या अस्त्राचें निवारण केलें असतां शंकरानें पैशाच, राक्षस, रौद्र व तसेंच आंगिरस अशीं युगांताग्नीसारखीं चार अस्त्रें सोडिलीं. पण त्यांचें निवारण करून लागलेंच माधवानें आ पसरलेल्या अन्तकासारखें वैष्णव अस्त्र सोडलें. कृष्णानें त्या अस्त्राचा प्रयोग केला असतां सर्व श्रेष्ठ असुर, भूतें, यक्ष, गण, बाणासुराचें सर्व सैन्य घाबरगुंडी होऊन बारावाटा पळत सुटलें. तेव्हां शंकराचे इतके पार्षद असूनही तें सैन्य पराभव पावलें असें पाहून महा असुर बाण मोठ्या त्वरेनें युद्धाकरितां सन्मुख निघाला. वज्रधर इंद्राभोंवतीं ज्याप्रमाणें देवांचा गराडा असतो त्याप्रमाणें त्या बाणासुराभोंवतीं हातीं भयंकर आयुधें घेतलेल्या महाबलाढ्य, घोर, व महारथी, दैत्यवीरांचा गराडा होता.

वैशंपायन ह्मणतातः—महात्म्या ब्राह्मणांनीं जप, होम व औषधी यांच्या योगानें बाणासुराचें [1]स्वस्त्ययन केलें. त्या वेळीं ब्राह्मणांस वस्त्रें, शुभ गाई, फळें, पुष्पें व नाणीं देणारा तो बळीचा पुत्र औदार्यानें कुबेराप्रमाणें शोभूं लागला. ज्यावर सहस्र सूर्य आहेत, अनेक क्षुद्र घंटा आहेत, उत्तम सोन्याचीं रत्नजडित चित्रें आहेत, आणि सहस्र चंद्र व अयुत तारका आहेत, असा त्याचा विस्तीर्ण रथ अग्नीसारखा दीप्त दिसत होता. दानवांनीं आकळलेल्या त्या रथावर बसलेला तो महाभुज धनुर्धारी त्या यदुश्रेष्ठास उलथून पाडण्याची इच्छा करून अतिशयच भयंकर रूप धारण करिता झाला. व वायूचे वेगामुळें वाढलेला व तरंगांनीं उसळणारा जलसागर जसा लोकनाशार्थ सरसावतो त्याचप्रमाणें वीरांच्या रथसंघांमुळें वाढलेला व क्रोधामुळें उसळणारा हा दैत्य-( संघरूप )—सागर कृष्णादिकांचे नाशार्थ निघाला. भयंकर शरीरांच्या योगानें भयभीत होणारीं सैन्यें त्याच्या अग्रभागीं चमकत होतीं. त्यामुळें, हे राजन्, तीं महा रथांत बसलेलीं व उंच धनुष्यें धारण करणारीं सैन्यें वनाप्रमाणेंच दिसत होतीं. व तो अद्भुत बाणासुर आपल्या समुद्रजलांतील वस्तींतून ( समुद्र निकट असलेल्या आपल्या राजधानींतून ) संग्राम पाहण्याचे इच्छेनें बाहेर पडला.

## अध्याय एकशें पंचविसावा.

—:०:—

### हरिहरस्तव.

वैशंपायन सांगतातः—शंकर तर क्रोधानें पेटला होता; परंतु सर्वत्र अंधार दाट पडल्यामुळें नंदी दिसेना, रथ दिसेना, व रुद्रही दिसेना. तेव्हां त्रिपुरांतक शंकरानें रोषानें व

[1] तुझें जाणें सुखावह होवो अशा अर्थाचे मांत्रिक आशीर्वाद वगैरे क्रिया.

बळानें दुप्पट चेतून जाऊन चार तोंडांचा ( चौधारी ) बाण घेतला व तो फेंकण्याचे इच्छेनें त्या त्रिनयनानें धनुष्याशीं जोडला. पण मनांतलें जाणणाऱ्या महात्म्या वासुदेवानें त्या बाणाला ओळखिलें व आपण जृंभणनामक अस्त्र घेतलें; आणि त्याच्या योगानें त्या चपळ महाबळानें शंकरास जांभया द्यावयास लाविलें. ह्याप्रमाणें अस्त्राच्या सामर्थ्यानें शंकर जांभया देतां देतां हातांतील बाण व धनुष्यासह निद्रावश झाला. असुर व राक्षस यांस जिंकणाऱ्या त्या देवाला देहाचीही शुद्ध राहिली नाहीं. आपले हातांत धनुष्य व बाण धरलेले असतांना त्यांचेंही भान न राही इतकी आपणांस झोंप लोटली व जांभयांनीं गर्दी केली हें पाहून रुद्रास फारच आश्चर्य वाटलें. अशांत बलानें उन्मत्त झालेला बाणासुर त्यास पुनःपुनः टोंचणी लावूं लागला. तेव्हां ह्या भूतात्म्या रुद्रानें स्निग्ध व गंभीर वाणीनें सिंहनाद केला. त्या वेळीं महाबल कृष्णानें आपला शंख मोठ्या जोरानें वाजविला. पांचजन्याच्या घोषावरून, व शार्ङ्गधनुष्याच्या टणत्कारावरून तो देव आपले शक्तीचा विकास करीत आहे असें पाहून सर्व भूतें त्रस्त झालीं. इतक्यांत त्या रणांत रुद्राचे पार्षद गणांनीं मायावी युद्धाचा आश्रय करून प्रद्युम्नाला चोहों बाजूंनीं वेढा दिला. पण, त्या वीर्यवान् प्रद्युम्नानें सर्वांना निद्रावश करून त्या रणांत बाणजालानें दानवांचा ध्वंस केला. ( त्यांत जागजागीं महाबलाढ्य प्रमथगणच विशेष होते. ) इतक्यांत जांभया देणाऱ्या शुद्धकर्मवान् महादेवाच्या तोंडांतून जणूं काय दशदिशांस जाळीत असलेल्याप्रमाणें ज्वाला निघाली.

याप्रकारें त्या उभयही महावीरांचे तडाक्यांत सांपडलेली देवी पृथ्वी कांपत कांपत विश्वधात्या ब्रह्मदेवाकडे गेली. पृथ्वी म्हणाली, 'हे देवाधिदेवा महाबाहो, असह्य तेजामुळें मी पीडिलें आहें. कृष्ण व रुद्र यांच्या मारानें दडपली गेल्यामुळें मी पुनः जलमग्न होणार, असें वाटतें. हे पितामह, या असह्य भाराचा कांहीं विचार करा. आणि मी हलकी होऊन स्थावरजंगमास धारण करूं शकेन असा उपाय योजा.' तें ऐकून पितामह त्या काश्यपी[1] देवीस उलट बोलला कीं "कांहीं वेळ तरी धीर धरून अशीच रहा. तूं आतां लवकरच हलकी होशील." वैशंपायन सांगतातः—नंतर भगवान् ब्रह्मा रुद्राकडे पाहून म्हणाला, 'आतां या असुरांचा फन्ना उडणार हें ठरलें आहे. मग आतां त्यांचें रक्षण करून काय होणार? हे महाबाहो, कृष्णाशीं तूं युद्ध करणें शोभत नाहीं. कारण तूं हा कृष्णाशीं युद्ध करीत नाहींस, तर तूं स्वतःचे भिन्नरूपाशीं युद्ध करीत आहेस.' ब्रह्मदेवाचें हें भाषण ऐकून भगवान् अव्यय प्रभु योगसामर्थ्यानें शरीरांत प्रवेश करून सर्व चराचर तीन लोकांस पाहूं लागला. योगात्मा योगामध्यें प्रवेश करून मागच्या वरांविषयीं विचार करूं लागला. द्वारकेमध्यें जें सांगितलें होतें, तें सर्व त्याला आठवलें. त्यामुळें तो देव कांहीं एक उत्तर न

१ येथें 'सचतुर्मुखः' व 'स चतुर्मुखं' असे दोन पाठ आहेत. पहिल्याचा अर्थ—'ब्रह्मदेवासह' शंकर असा होतो. पण ब्रह्मदेव हा शंकराला युद्ध करण्यास सशस्त्र होऊन मदत करीत होता असें दिसत नाहीं. म्हणून आम्हीं दुसरा पाठ घेतला आहे. कलकत्ता पाठही हाच दिसतो.

२ या ठिकाणीं कलकत्ता प्रतींतः—'सृष्टिमन्यां सृजस्वेति तदा दर्पविवृद्धये । शक्तिमन्यां सृजन्नेव तदा दर्पविवृद्धये ॥ असे दोन चरण अधिक आहेत. त्यांचा अर्थ आपला दर्प किंवा दरारा वाढावा म्हणून दुसरी नवी सृष्टिच उत्पन्न करण्याविषयीं बाणासुर शंकरास आग्रह करूं लागला. परंतु, शंकरानें सृष्टीचे ऐवजीं दुसरी एक शक्ति मात्र निर्माण केली' असा आहे.

[1] क्षोणिर्ज्या काश्यपी क्षितिः । असा अमर आहे.

देतां तत्काल युद्धापासून निवृत्त झाला. आपण स्वतः कृष्णाच्या मूळकारणांतच स्थित आहों व त्याचें व आपलें उत्पत्तिस्थान एकच आहे, असा त्याला अनुभव आला. त्याबरोबर रुद्रानें युद्धाविषयींची आपली प्रतिज्ञा सोडली. तो ब्रह्मदेवाला म्हणाला, "भगवान्, मी संग्रामांत कृष्णाशीं लढणार नाहीं. पृथ्वी हलकी होऊं दे." असें बोलल्यावर कृष्ण व रुद्र परस्परांस आलिंगन देऊन परम प्रीतीस प्राप्त झाले. व तो संग्राम सोडून परतले. एकरूप झालेल्या त्या दोघां महायोग्यांस दुसरें कोणी पाहूं शकलें नाहीं. लोकपितामह ब्रह्मा मात्र त्याप्रमाणें त्यांचें ऐक्य करून पहात राहिला. आणि जवळच असलेल्या दीर्घदर्शी नारदासह मार्कंडेय-मुनीस उद्देशून असें विचारूं लागला.

पितामह ह्मणालाः—"हे ब्राह्मणा, मी मंदर पर्वताच्या बाजूवर नलिनिमध्यें रात्रीं स्वप्नांत भव व केशव म्हणजेच हा हर व अच्युत यांस पाहिलें. हराला हरिरूपानें व हरीला हर रूपानें मीं पाहिलें. हर मला शंख-चक्र-गदा-पाणि व पीतांबरधर दिसला. आणि हरि त्रिशूल व पट्टीश यांस धारण करणारा व व्याघ्रचर्म धारण करणारा आहे असें आढळलें. हर गरुडावर बसला आहे व हरि वृषभध्वज आहे असा मला अनुभव आला. हें ब्रह्मन्, हें परम आश्चर्य पाहून मला मोठा विस्मय वाटत आहे. यास्तव, हे सुव्रत भगवन्, याचें तत्त्व मला यथार्थपणें सांग. मार्कंडेय ह्मणालाः—

**मार्कंडेय उवाच ॥ शिवाय विष्णुरूपाय विष्णवे शिवरूपिणे ॥ यथान्तरं पश्यामि तेन तो दिशतः शिवम् ॥ १ ॥ अनादिमध्यनिधनमेतदक्षरमव्ययम् ॥ तदेव प्रवक्ष्यामि रूपं हरिहरात्मकम् ॥ २ ॥ यो विष्णुः सतु वै रुद्रो यो रुद्रः स पितामहः एका मूर्तिस्त्रयो देवा रुद्रविष्णुपितामहाः ॥ ३ ॥ वरादा लोककर्तारो लोकनाथाः स्वयंभुवः ॥ अर्धनारीश्वरास्ते तु व्रतं तीव्रं समास्थिताः ॥ ४ ॥ यथा जले जलं क्षिप्तं जलमेव तु तद्भवेत् ॥ रुद्रं विष्णुः प्रविष्टस्तु तथा रुद्रमयो भवेत् ॥ ५ ॥ अग्निमग्निः प्रविष्टस्तु अग्निरेव यथा भवेत् ॥ तथा विष्णुं प्रविष्टस्तु रुद्रो विष्णुमयो भवेत् ॥ ६ ॥ रुद्रमग्निमयं विद्याद्विष्णुः सोमात्मकः स्मृतः ॥ अग्निषोमात्मकं चैव जगत्स्थावरजंगमम् ॥ ७ ॥ कर्त्तारौ चापहर्तारौ स्थावरस्य चरस्य तु ॥ जगतः शुभकर्त्तारौ प्रभविष्णूमहेश्वरौ ॥ ८ ॥ कर्तृकारणकर्त्तारौ कर्तृकारणकारकौ ॥ भूतभव्यभवौ देवौ नारायणमहेश्वरौ ॥ ९ ॥ एते चैव प्रवर्षन्ति भान्ति वान्ति सृजन्ति च ॥ एतत्परतरं गुह्यं कथितं ते पितामह ॥ १० ॥ यश्चैनं पठते नित्यं यश्चैनं शृणुयान्नरः ॥ प्राप्नोति परमं स्थानं विष्णुरुद्रप्रसादजम् ॥ ११ ॥**

ज्याअर्थीं मी विष्णुरूपीशिवाला व शिवरूपीविष्णूला पाहतों व त्यांच्यामध्यें अंतर मुळींच पहात नाहीं, त्या अर्थीं ते दोघेही माझें कल्याण करोत. आदि, मध्य व अंत यांनीं रहित असें जें अव्यय, अक्षर हरिहरात्मकरूप, तेंच मी तुला सांगतों. जो विष्णु तोच प्रसिद्ध रुद्र व जो रुद्र तोच पितामह. वस्तुतः एकच मूर्ति असतांना रुद्र, विष्णु व पितामह हे तीन देव झाले आहेत. ते वरद, लोककर्ते, लोकनाथ, स्वयंभू, व अर्धनारी-नटेश्वर असून तीव्र व्रताचा आश्रय करून राहिले आहेत. ज्याप्रमाणें जलामध्यें टाकलेलें जल जलच होतें, त्याप्रमाणें रुद्रामध्यें प्रविष्ट झालेला विष्णु रुद्रमय होतो. अग्नीमध्यें प्रविष्ट झालेला अग्नि जसा अग्नि होतो, त्याप्रमाणें विष्णूमध्यें प्रविष्ट झालेला रुद्र विष्णुमय होतो. रुद्र अग्निमय आहे असें जाणावें. विष्णु सोमा-

त्मक आहे असें म्हटलें आहे. हें सर्व स्थावर-जंगम जगत् अग्नीषोमात्मक आहे. ते दोघे स्थावर व चर जगाचे कर्ते, संहर्ते, शुभकर्ते व प्रभावशाली मालक आहेत. कर्ता ( हिरण्यगर्भ ) व कारण ( महाभूतें ) यांचे कर्ते, कर्तृकारणांचे कारक, आणि भूत व भव्य यांस उत्पन्न करणारे, असे हे दोघे नारायणमहेश्वर देव आहेत. हेच ब्रह्मा, विष्णु व रुद्र वर्षाव करितात, प्रकाश पाडतात, ( वायुरूपानें ) वहातात व पृथ्विरूपानें उत्पन्न करितात. हे पितामहा, हें मी तुला फार मोठें गुह्य सांगितलें आहे. जो नर हें नित्य पढतो व ऐकतो त्याला विष्णु व रुद्र यांच्या प्रसादापासून उद्धवणारें परम स्थान प्राप्त होतें.

देवौ हरिहरौ स्तोष्ये ब्रह्मणा सह संगतौ ॥ एतौ च परमौ देवौ जगतः प्रभवाप्ययौ ॥ १२ ॥ रुद्रस्य परमो विष्णुर्विष्णुश्च परमः शिवः ॥ एक एव द्विधाभूतो लोके चरति नित्यशः ॥ १३ ॥ न विना शंकरं विष्णुर्न विना केशवं शिवः ॥ तस्मादेकत्वमायातौ रुद्रोपेन्द्रौ तु तौ पुरा ॥ नमो रुद्राय कृष्णाय नमः संहतचारिणे ॥१४॥ नमः षडर्द्धनेत्राय सद्विनेत्राय वै नमः ॥ नमः पिङ्गलनेत्राय पद्मनेत्राय वै नमः ॥ १५ ॥ नमः कुमारगुरवे प्रद्युम्नगुरवे नमः ॥ नमो धरणीधराय गङ्गाधराय वै नमः ॥ १६ ॥ नमो मयूरपिच्छाय नमः केयूरधारिणे ॥ नमः कपालमालाय वनमालाय वै नमः ॥ १७ ॥ नमस्त्रिशूलहस्ताय चक्रहस्ताय वै नमः ॥ नमः कनकदण्डाय नमस्ते ब्रह्मदण्डिणे ॥ १८ नमश्चर्मनिवासाय नमस्ते पीतवाससे ॥ नमोस्तु लक्ष्मीपतये उमायाः पतये नमः ॥ १९ ॥ नमः खट्वाङ्गधाराय नमो मुशलधारिणे ॥ नमो भस्माङ्गरागाय नमः कृष्णाङ्गधारिणे ॥ २० ॥ नमः श्मशानवासाय नमः सागरवासिने ॥ नमो वृषभवाहाय नमो गरुडवाहिने ॥ २१ ॥ नमस्त्वनेकरूपाय बहुरूपाय वै नमः ॥ नमः प्रलयकर्त्रे च नमस्त्रैलोक्यधारिणे ॥ २२ ॥ नमोस्तु सौम्यरूपाय नमो भैरवरूपिणे ॥ विरूपाक्षाय देवाय नमः सौम्येक्षणाय च ॥ २३ ॥ दक्षयज्ञविनाशाय बलेर्नियमनाय च ॥ नमः पर्वतवासाय नमः सागरवासिने ॥ २४ ॥ नमः सुररिपुघ्नाय त्रिपुरघ्नाय वै नमः ॥ नमोस्तु नरकघ्नाय नमः कामाङ्गनाशिने ॥ २५ ॥ नमस्त्वन्धकनाशाय नमः कैटभनाशिने ॥ नमः सहस्रहस्ताय नमोसंख्येयबाहवे ॥ २६ ॥ नमः सहस्रशीर्षाय बहुशीर्षाय वै नमः ॥ दामोदराय देवाय मुञ्जमेखलिने नमः ॥ २७ ॥ नमस्ते भगवन्विष्णो नमस्ते भगवन् शिव ॥ नमस्ते भगवते देव नमस्ते देवपूजित ॥ २८ ॥ नमस्ते कर्मणां कर्म नमोमितपराक्रम ॥ हृषीकेश नमस्तेस्तु स्वर्णकेश नमोस्तु ते ॥ २९ ॥ इमं स्तवं यो रुद्रस्य विष्णोश्चैव महात्मनः ॥ समेत्य ऋषिभिः सर्वैः स्तुतौ स्तौति महर्षिभिः ॥ ३० ॥ व्यासेन वेदविदुषा नारदेन च धीमता ॥ भारद्वाजेन गर्गेण विश्वामित्रेण वै तथा ॥ ३१ ॥ अगस्त्येन पुलस्त्येन धौम्येन तु महात्मना ॥ य इदं पठते नित्यं स्तोत्रं हरिहरात्मकम् ॥ ३२ ॥ अरोगो बलवांश्चैव जायते नात्र संशयः ॥ श्रियं च लभते नित्यं नच स्वर्गान्निवर्तते ॥ ३३ ॥ अपुत्रो लभते पुत्रं कन्या विन्दति सत्पतिम् ॥ गुर्विणी श्रुणुते यातु वरं पुत्रं प्रसूयते ॥ ३४ ॥ राक्षसाश्च पिशाचाश्च विघ्नानि च विनायकाः ॥ भयं तत्र न कुर्वन्ति यत्रायं पठ्यते स्तवः ॥ ३५ ॥

ब्रह्मदेवासह संगत झालेल्या हरिहरांची मी स्तुति करितों. जगास उत्पन्न करणारे असे हे दोघे परम देव आहेत. शिवाचा परम आप्त विष्णु आहे व विष्णूचा शिव आहे. तो एकच देव द्विधा होऊन लोकांमध्यें नित्य संचार करतो. शंकरावांचून विष्णु नाहीं व विष्णूवांचून शंकर नाहीं व एवढ्यासाठींच पूर्वीं ते दोघे रुद्र व उपेंद्र रूपास प्राप्त झाले. मेळा करून संचार करणाऱ्या कृष्णाला व रुद्राला नमस्कार असो. त्रिनेत्राला व द्विनेत्राला नमस्कार असो. पिंगट नेत्रांच्या शंकराला व कमलनेत्र कृष्णाला नमस्कार असो. कार्तिकस्वामीच्या पित्याला व प्रद्युम्नाच्या पित्यालाही नमस्कार असो. गंगाधराला व धरणीधराला नमस्कार असो. मयूरपिच्छें धारण करणारास व केयूरधारी देवास नमस्कार असो. ज्याच्या हातांत त्रिशूल आहे व ज्यांच्या हातांत चक्र आहे अशा हर व कृष्ण यांना नमस्कार असो. ज्याच्या हातांत सुवर्णदंड आहे व ज्याच्या हातांत ब्रह्मदंड आहे त्यांना नमस्कार असो. चर्म धारण करणाऱ्या व पीतांबर नेसणाऱ्या देवांस नमस्कार असो. उमापतीस व लक्ष्मीपतीस नमस्कार असो. खट्वांगधरास तसाच त्रिशूलधरासही मी प्रणाम करतों. भस्मवर्ण व कृष्णवर्ण अंगांच्या देवांस नमस्कार असो. स्मशानवासी व सागरनिवासी देवांस नमस्कार असो. वृषभवाहनास व गरुडवाहनास नमस्कार असो. भवरूपाला व बहुरूप्याला नमस्कार असो. प्रलय करणाऱ्या व त्रैलोक्याचें धारण करणाऱ्या देवांस नमस्कार असो. भैरवरूप (भयंकर) व सौम्यरूप देवांना मी प्रणाम करतों. विरूपाक्ष देवाला व सौम्यनयनाला नमस्कार असो. दक्षयज्ञाचा ध्वंस करणाऱ्या व बलीचें नियमन करणाऱ्या देवाला नमस्कार असो. त्रिपुरनाशकाला व देवशत्रूंचा विनाश करणाराला नमस्कार असो. कामाच्या शरीरास जाळणाऱ्या व नरकासुराचा ध्वंस करणाऱ्या देवास नमस्कार असो. अंधकासुराला मारणाऱ्या व कैटभाला यमसदनीं धाडणाऱ्या देवास मी वंदन करितों. ज्याला सहस्र, अनंत बाहु आहेत, ज्याला सहस्र किंवा अनेक मस्तकें आहेत; ज्याच्या कटिप्रदेशीं मुंजातृणाची मेखला आहे किंवा उदरभागीं मातेनें बांधलेलें दावें आहे, अशा त्या दोघां देवांस नमस्कार असो. हे भगवन् विष्णो, तुला नमस्कार असो. हे देवा, तुज षड्गुणैश्वर्यसंपन्नाला नमस्कार असो. हे देवपूजिता, तुला मी वंदन करितों. हे कर्माच्या कर्मा, तुला नमस्कार असो; हे अमितपराक्रमी देवा, तुला नमस्कार असो. हे हृषीकेशा, तुला नमस्कार असो. हे स्वर्णकेशा शंकरा, तुला मी प्रणाम करितों.

जो कोणी हा रुद्राचा व महात्म्या विष्णूचा स्तव वेदवेत्ता व्यास, धीमान् नारद, भारद्वाज, गर्ग, विश्वामित्र, अगस्त्य, पुलस्त्य, व महात्मा धौम्य या सर्व महर्षि व ऋषि यांसह स्तुतिसमयीं म्हणतो, व जो हें हरिहरात्मक स्तोत्र नित्य पढतो, तो निरोगी व बलवान् होतो यांत कांहीं संशय नाहीं. त्याला नित्य श्री प्राप्त होते व तो स्वर्गांतून परत फिरत नाहीं. जो अपुत्र असतो त्याला पुत्र प्राप्त होतो, कुमारीला संतति प्राप्त होते, जी गर्भवती स्त्री हें स्तोत्र ऐकते तिला श्रेष्ठ पुत्र होतो. ज्या ठिकाणीं या स्तवाचा पाठ होत असतो, तेथें राक्षस, पिशाचें, विघ्नें व विनायक (बखेडे) भय उत्पन्न करीत नाहींत.

## अध्याय एकशें सव्विसावा.

—:०:—

### बाणासुरवरप्रदान.

जनमेजय विचारितोः—जर शंकर देव व

महात्मा कृष्ण असे दोघेही युद्ध सोडून गेले तर पुनरपि शत्रूंचें अंगावर कांटा आणणारें असें युद्ध कसें झालें?

वैशंपायन सांगतातः—कुंभांडानें आणि-लेल्या रथांत बसलेला गुह, कृष्ण, बलराम व प्रद्युम्न यांच्या अंगावर धांवला. त्यानंतर सूड घेण्याची बुद्धि व रोष यांनीं चेवलेला श्रेष्ठ, कुमार—स्वामी रथावर उभा राहून सिंहनाद करीत रणांगणांत शेंकडों शरांनीं त्यांस वेध करूं लागला. तेव्हां त्या तिघांचीं गात्रें बाणांनीं झांकून गेलीं. आणि ते तीन अग्नींसारखे तिघे अंगावर रक्ताचे ओघळ चालले असतांही, गुहाशीं लढूं लागले. युद्धपद्धति जाणणाऱ्या त्या दीप्ततेजस्वी तीन वीरांनीं वायव्य, आग्नेय व पार्जन्य अशा तीन अत्युत्तम अस्त्रांनीं त्यास भेद केला. पण त्या क्रोधी कुमारानें शैल, वारुण व सावित्र अस्त्रांनीं त्यांस उलट वेध केला. हातीं दीप्त बाणांचा ओघ व दीप्त चाप असतांही त्या महात्म्याच्या शरसमूहास ते तिघे अस्त्रमायांनीं जेव्हां ग्रासून टाकूं लागले, तेव्हां गुह अतिशय रागावून तेजानें जणूं जळूं लागला. मग त्या समर्थ अग्निपुत्रानें दांतओंठ खाऊन रणांत ब्रह्मशिर नामक काळासारखें दुरासद अस्त्र घेतलें. सूर्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे, असें तें अतिशय दुर्धर्ष, व सर्वलोकक्षय-कर ब्रह्मशिर अस्त्र सुटतांच सर्व हाहाःकार करीत समंततः धांवूं लागले. तेव्हां केशी दै-त्याचें मंथन करणाऱ्या वीर्यवान् केशवानें आ-पल्या हातीं चक्र घेतलें. तें सर्व अस्त्रांच्या सामर्थ्याचें निवारण करणारें व घात करणारें होतें. ज्याच्या विरुद्ध चक्र कोणीही धरूं शकत नाहीं अशा त्या महात्म्याचें चक्र लोकां-मध्यें प्रख्यात होतें. ग्रीष्म ऋतु संपल्या-वर वर्षारंभीं मेघांच्या योगानें सूर्याचें मंडळ जसें निष्प्रभ होतें, त्याप्रमाणें त्या सुदर्शनानें ब्रह्मशिरोऽस्त्राला निस्तेज करून सोडलें. तेव्हां तें महातेजस्वी ब्रह्मशिरोऽस्त्र हीनबल व निस्तेज झालें आहे असें पाहून गुहाचे नेत्र क्रोधानें लाल झाले व घृतादि हवीनें चेतलेल्या अग्नीप्रमाणें रणांत तो प्रज्व-लित झाला. त्यानें शत्रूंचा नाश करणारी, जाज्वल्य व दिव्य सुवर्णाची शक्ति घेतली; आणि प्रदीप्त झाल्यामुळेंच महाउल्केसारखी किंवा युगांताग्नीप्रमाणें जिची प्रभा आहे, व घंटांच्या माळांनीं जी व्याप्त आहे असल्या त्या शक्तीला क्रोधानें त्यांच्या अंगांवर फेंकलें; व शत्रूंस कांपविणारा मोठा थोरला सिंह-नादही केला.

असो. याप्रमाणें त्या ब्राह्मणभक्त महा-त्म्यानें त्या वेळीं ती शक्ति फेंकली असतां जिचें मुख प्रदीप्त झालें असल्यामुळें जी गगनांत विकास पावत आहेशी वाटली, अशी ती कृष्णा-च्या वधाची इच्छा करणारी महाशक्ति धांवूं लागली. तेव्हां सर्व देवगणांसह इंद्रही अति-शय खिन्न झाला व त्या प्रज्वलित शक्तीला पाहून ‘ आतां कृष्ण जळाला ’ असें म्हणाला. पण इतक्यांत त्या समीप आलेल्या शक्तीला त्या महासंग्रामांत कृष्णानें नुस्त्या हुंकारानें तुच्छ करून भूमीवर पाडलें. याप्रमाणें त्या महाशक्तीला पाडलें असतां इंद्रासह सर्व देव “ शाबास शाबास, वाहवा ” असा सर्वच सिंहनाद करूं लागले. याप्रकारें देवांनीं असा मोठा कोलाहल चालविला असतां, प्रतापवान् वासुदेवानें रणांत दैत्यांचा अंत करणारें चक्र पुनः घेतलें. व अप्रतिम ओजस्वी कृष्णानें तें फेंकलें असतां त्यावेळीं कुमार-रक्षणार्थ सुंदर रूप धारण करणारी देवी देवाच्या आज्ञेनें, तेथें नग्नच प्रविष्ट झाली. ‘ लंबा ’ असें तिचें नांव असून ती महाभागा देवीचा आठवा भाग आहे. ती विचित्र कनकशक्ति त्या दोघांमध्यें

लगटून उभी राहिली. तेव्हां कुमाराच्या व आपल्या मध्यें देवीला पाहून महाभुज मधुसूदन तोंड फिरवून बोलला, 'दूर हो; एकीकडे हो; तुला धिक्कार असो; मीं शत्रूचा वध करण्याचा निश्चय केला असतां मला असें विघ्न कां करितेस?' वैशंपायन सांगतातः—हे विभो, इतकें कृष्ण बोलला तरीही कुमाराचें रक्षण करण्याचा तिचा हेतु असल्यामुळें कोट्टवीनें वस्त्र घेतलें नाहीं. तेव्हां श्रीभगवान् म्हणाले, 'या गुहाला घेऊन तूं या रणांगणांतून शीघ्र जा कशी. कारण, मी प्रतिपक्षी असतां तूं असें करशील तरच याचें हित होईल.' तरीही ती रणांगणांत उभीच आहे असें पाहून भगवान् इंद्रानुज देव हरीनें आपलें चक्र आंवरलें. देवाधिदेव धीमान् कृष्णानें असें केलें, तेव्हां ती देवी गुहाला घेऊन शंकरासमीप गेली.

इकडे हें असें महाभय उपस्थित झालें असतां व देवीनें कुमाराचें रक्षण केलें असतां बाणासुर तेथें आला. गुह संग्राम सोडून गेला व कृष्णानें रणांगणांतून त्याला जाऊं दिलें, असें पाहून आपण स्वतःच माधवाशीं युद्ध करूं असें बाणासुर चिंतन करूं लागला. परंतु बाणाचें सर्व सैन्य व तत्पक्षीय सर्व भूतयक्षगण भयानें डोळे व्याकूळ करून दशदिशा पळून गेले होते. ज्यामध्यें प्रमथगण पुष्कळ आहेत असलें सैन्य पराभूत झालेलें पाहून महा असुर बाण मोठ्या तांतडीनें युद्धार्थ पुढें यावयास निघाला. वज्रधर इंद्र युद्धार्थ निघाला असतां त्याभोंवतीं ज्याप्रमाणें देवसमुदाय असतो, त्याप्रमाणें तो बाणासुर युद्धार्थ निघाला असतां हातीं भयंकर आयुधें घेतलेला घोर महाहल व महारथ अशा दैत्यवीरांचा समुदाय त्याबरोबर निघाला. शत्रूचा वध होईल असें म्हणणारे पुरोहित व दुसरेही विद्या व शील यांनीं युक्त पोक्त ब्राह्मण जप, मंत्र व औषधि यांच्या योगानें त्याचें "स्वस्त्ययन" करिते झाले. त्यानंतर मंगलवाद्यांचा नाद, दुंदुभींचा ध्वनि व दैत्यांचा सिंहनाद चालू असतांना बाणासुर कृष्णाकडे धांवला. बाण आपल्या नगरांतून बाहेर पडला आहे व युद्धाकरितां उभा आहे असें पाहून कृष्णही गरुडावर आरूढ होऊन त्याच्या सन्मुख गेला. तो अप्रतिम ओजस्वी यदुपुंगव कृष्ण गरुडावर बसून येत आहे असें पाहून व तो सन्मुख येऊन उभा राहिला आहे असें जाणून क्रुद्ध बाण त्या वेगवान् कृष्णास म्हणाला, "थांब, थांब; आज आतां तूं माझ्या पुढून जिवंत परत जाणार नाहींस. व द्वारका आणि द्वारकेंतील तुझे आप्त इष्ट यांना तूं आतां अंतरलासच, असें समज. हे माधवा, आज तूं रणांत माझे हातून पराभव पावून कालप्रेरणेमुळें मरणोन्मुख झालास, म्हणजे रंगांचीं वृक्षाग्रें[1] तुला दिसतील. हे गरुडध्वजा, मी आहें सहस्रभुज व तूं सारा अष्टभुज, मग तूं आज मजबरोबर रणांत कसा टिकाव धरशील? आज मजकडून तूं युद्धांत सबांधव पराभूत झालास आणि या शोणपुरांत मरत पडलास म्हणजे आपली द्वारका आठवशील. नाना प्रहरणांनीं युक्त व नाना प्रकारच्या बाहुभूषणांनीं भूषित असे माझे सहस्रबाहू आज कोटीसंख्य झाले आहेत असें तूं पाहशील." वायुवेगामुळें समुद्रांत उसळणाऱ्या महाघोर लाटांप्रमाणें गर्जना करणाऱ्या त्या बाणासुराचे मुखांतून या प्रकारचे अनेक वाक्यांचे ओघ लोटूं लागले. त्याचे नेत्र रोषावेशामुळें फिरून गेले. व त्यामुळें जगत् दग्ध करूं पाहणारा सूर्यच आकाशांत उगवला आहे काय, असा भास झाला. बाणा-

१ ज्याचा मत्यु जवळ आला त्याला हीं चिन्हें दिसतात.

सुराचें तें अतिशय जोराचें भाषण ऐकून नारद इतके मोठ्यानें हंसला कीं, तेणेंकरून वातावरण फाटतें कीं काय! तो योगपट्टाचा[1] आश्रय सोडून युद्ध पाहण्याच्या इच्छेनें तेथेंच उभा राहिला. तो मुनि कौतुकानें डोळे ताठ उघडून इतस्ततः फिरूं लागला. श्रीकृष्ण म्हणाला, "बाणा, मोहानें अशा गर्जना कां करतोस? शूर गर्जना करीत नसतात. ये, रणांत उभा राहून भीड तरी. तुझ्या गर्जनांनीं काय होणार? हे दैत्या, शब्दांनींच जर युद्धांत जय येता, तर मग तूं असेच असंबद्ध प्रलाप नित्य करीत राहतास तरी चालतें. (पण तसें नाहीं, याकरितां) ये, ये; बाणा, मला जिंक तरी. अथवा माझ्या हातून पराभव पावून दीन व अधोमुख होऊन दीर्घ काल असुरांसह भूतळीं पडून तरी रहा." याप्रमाणें बाणाला बोलून कृष्णानें आपल्या अचुक मर्मभेदी व सत्वर जाणाऱ्या महाशरांनीं अतिशय प्रहार केले. पण, याप्रमाणें कृष्णानें मर्मभेदी बाणांनीं शरिरास छिन्नभिन्न करून सोडलें असतांही तो बाण हंसतच कृष्णावर शरवृष्टि करूं लागला. त्या अतिदारुण युद्धामध्यें जाज्वल्य असलेलीं सर्व आयुधें जणूं काय एकत्र मिळालीं. त्यानंतर परिघ, निस्त्रिंश, गदा, तोमर, शक्ति मुसळें व पट्टे यांच्या योगानें बाणानें कृष्णाला आच्छादित केलें. तो दैत्यश्रेष्ठ आपल्या सहस्र बाहूंच्या गर्वामुळें द्विबाहु कृष्णाशीं केवळ खेळण्यासारखें युद्ध करूं लागला. परंतु, कृष्णानें चपळाईनें जेव्हां त्यावर तोड केली तेव्हां चिडीस जाऊन त्या बलिपुत्रानें, जें प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें तप करून निर्माण केलें असून युद्धांत अप्रतिहत होतें, व सर्व शत्रूंचा तत्काल नाश करी, असें दिव्यास्त्र कृष्णावर सोडिलें. त्याबरोबर सर्व दिग्मंडलें अंधकारानें झांकून गेलीं. त्यांतून त्याच प्रकारचीं सहस्रावधि अतिघोर अस्त्रें सर्व बाजूंनीं प्रकट झालीं. त्यामुळें सर्व जग अंधकारानें आच्छादित होऊन कांहीं एक दिसेनासें झालें. तेव्हां "फार चांगलें, फार उत्तम, शाबास" असें म्हणून दानव बाणाची प्रशंसा करूं लागले. उलट पक्षीं, "हाय, हाय, धिक्, धिक्" असे देवमंडळीचे उद्गार ऐकूं येऊं लागले. त्यानंतर अस्त्र-बल-वेगानें ज्वालायुक्त, अतिशय दारुण-घोररूप, व भयंकर बाणवृष्टया झाल्या. संतापानें जळफळणाऱ्या बाणासुरानें केशवावर हें अस्त्र सोडलें, त्यानेंच वायूचें वाहणें व मेघांचा संचार बंद झाला. त्यानंतर भगवान् मधुसूदनानें महावेगवान् पार्जन्यनामक अस्त्र घेतलें. त्याबरोबर सर्व लोक अंधकार-रहित झाला. बाणाग्नि शांत झाला. व तत्काल सर्व दानवांचे संकल्प फसले. पर्जन्यास्त्र अभिमंत्रित केल्यानें दानवास्त्र शांत झालें. त्यामुळें सर्व देवगण आनंद करूं लागले व हंसूं लागले.

पण हे महाराजा, याप्रमाणें बाणासुराचें तें अस्त्र जेव्हां विफल झालें तेव्हां क्रोधानें बेफाम होऊन जाऊन त्यानें गरुडावर बसलेल्या कृष्णावर कठोरपणें हल्ला केला व पुनरपि मुसल, पट्टे वगैरेच्या योगानें त्यास झांकून टाकिलें. पण शत्रुसूदन केशवानें हंसतच त्याच्या त्या सतत होणाऱ्या सर्व बाणवृष्टीचें तडाक्यानें निवारण केलें. पुढें केशवाच्या शार्ङ्ग धनुष्यापासून सुटलेल्या अशनीतुल्य बाणांच्या धडाक्यानें बाणासुराच्या रथाचे अश्व, ध्वज व पताका यांसह तिळ तिळ तुकडे झाले. त्याचे अंगांतील चिलखत व मस्तकावरील मुकुट यांचे तुकडे उडाले. त्याचें धनुष्य व हस्तावाप ( चामड्याचे हातमोजे ) तुटले.

---

[1] 'योगपट्ट' ह्मणजे योगाभ्यास करितांना गळ्यांत घालितात ती कफनी. तिचा आश्रय सोडून ह्मणजे फलतः 'योगाभ्यास टाकून' असा अर्थ होतो.

अखेर त्या महातेजस्वी केशवानें हंसतच बाणाचे हृदयावर प्रहार केला. पण तेवढाच मर्मी लागून तो अल्पप्राण दैत्य रणांत मूर्छित पडला. बाणासुर मूर्छित झाला आहे, व प्रहारानें सर्व प्रकारें पीडित झाला आहे, असें पाहून श्रेष्ठ प्रासादशृंगावर बसलेला मुनिवर नारद उठून व पाहून खांका वाजवूं लागला व नखें वाजवीत "बरें झालें, ठीक झालें" असें म्हणाला. मीं हा दामोदराचा चमत्कारिक पराक्रम पाहिला व त्यामुळें 'अहाहा, माझा हा जन्म सफळ झाला व जीवित सुजीवित झालें आहे. हे महाबाहो, देवशत्रु बाणासुराला जिंक. ज्याकरितां तूं अवतीर्ण झाला आहेस तें कर्म सफळ कर' याप्रमाणें, त्या वेळीं देवाची स्तुति करून सभोंवार तीक्ष्ण बाणांचा वर्षाव चालू असतां आपले तेजानें आकाश प्रकाशित[1] करीत नारद रणांगणीं फिरूं लागले.

इतक्यांत एकमेकांवर धांवून गेलेल्या त्या दोघां वीरांचे ध्वज युद्ध करूं लागले. देव व दैत्य यांच्या वाहनांचेंही युद्ध सुरू झालें. गरुड व धीमान् मयूर यांचा संग्राम सुरू झाला. मयूर व गरुड असे दोघेही क्रोधानें पंख व चोंची यांच्या प्रहारांनीं आणि पाय व पुढचीं नखें यांच्या योगानें एकमेकांस मारूं लागले. मग रागावलेला गरुड दीप्त तेजस्वी मयूराचें मस्तक आपल्या चोंचींत धरून उडाला व त्या महाबलवानानें त्याला दोन्ही पंखांनीं उचलून प्रहार केले. दोन्ही पायांनीं त्याच्या दोन्ही कुशींवर अनेक आघात करून व त्याला जोरानें पुढें ओढून आणि मागें ढकलून, मूर्च्छित करून, आकाशांतून पडलेल्या सूर्याप्रमाणें खालीं पाडलें. मयूर खालीं पडतांच अति बलवान् बाणही त्याच्या बरोबर भूमीवर कोसळला. व समराविषयीं उद्विग्न होऊन तो आपल्या कार्याविषयीं अशी चिंता करूं लागला. 'अति बलामुळें मत्त होऊन मीं सुहृदांचें वचन ऐकलें नाहीं, त्यामुळें देवदैत्यांच्या समक्ष मी ह्या अतिशय आपत्तींत पडलों आहें.' तेव्हां बाण हा दीनचित्त व रणामध्यें अतिशय विकळ झाला आहे असें जाणून, भगवान् रुद्र बाणाच्या रक्षणाविषयीं उताविळ होऊन कांहीं वेळ विचार करून गंभीर वाणीनें नंदीला म्हणाला: 'नंदिकेश्वरा, तूं हा सिंहयुक्त तेजस्वी रथ घेऊन जेथें बाण रणांत उभा आहे तेथें जा व तो युद्ध करण्यास समर्थ व्हावा म्हणून, हे अनघा, तूं त्याला त्वरित त्याच्यावर[1] बशीव. मी प्रमथगणांमध्यें उभा राहीन. माझें मन आज युद्ध करण्यास घेत नाहीं, यास्तव तूं जाऊन बाणाचें संरक्षण कर.' तेव्हां "बरें आहे" असें म्हणून रथिश्रेष्ठ नंदी जेथें बाणासुर होता तेथें रथानें जाऊन त्याला हळूच म्हणाला: "हे महाबलवान् दैत्या, या रथावर बैस.

१ ( प्रकाशित—या स्थळीं मूळ श्लोक "एवं स्तुत्वा तदा देवं बाणैः सं ( खं ) द्योतयन् शितैः ॥ इतस्ततः संपतद्भिर्नारदोऽव्यचरद्रणे ॥" याचा अर्थ ( कोणी कोणी ) याप्रमाणें देवाची स्तुति करून चकचकीत उडणाऱ्या बाणांनीं आकाशास कृष्ण द्योतित करूं लागला असतां नारद रंगांमध्यें इतस्ततः संचार करूं लागला, असा केला आहे. पण हा अर्थ व्याकरणशुद्ध नाहीं. कारण एक तर कृष्ण हें पद मुळांत नाहीं. शिवाय तें अध्याहृत घेतलें तरीही फुकट आहे. 'कृष्णे खं द्योतयति' असें असेल तर फायदा आहे. पण मुळांत 'द्योतयन्' असेंच प्रथमान्त पद आहे. ह्मणून आम्हीं 'खं द्योतयन्' हाच पाठ स्वीकारून त्याचा अन्वय ( ब्रह्मवर्चस्वी ) नारदाकडे लाविला आहे. नारदाचे तेजानें आकाश प्रकाशित होण्याचा उल्लेख माघकाव्यांतील "पतत्यधोधाम विसारि सर्वतः" या श्लोकांत आहे. इतस्ततः संपतद्भिर्बाणैः या तृतीयेचा निर्वाह सहार्थानें केला आहे. तो विद्वानांस कितपत मान्य होईल न कळे. पण आमच्या मतीला या श्लोकाचा याहून समंजस निर्वाह लागत नाहीं.

१ या श्लोकांत 'वाऽनघ' असाही पाठ आहे, तो घेतल्यास "तूं बाणास रथांत बसव आणि वेळ पडल्यास तूंही युद्धास समर्थच आहेस, असा होईल."

लवकर ये, आणि नंतर या रणांत दानवांचा अंत करणाऱ्या कृष्णाशीं युद्ध कर." तें ऐकतांच बाण बुद्धिमान् महादेवाच्या त्या ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या रथावर चढला. अमित तेजस्वी शंकराच्या रथावर आरूढ होऊन अतिक्रुद्ध झालेल्या वीर्यवान् बाणानें सर्व अस्त्रांचा विघात करणारें व महा भयंकर दीप्त ब्रह्मशिर नामक अस्त्र काढिलें. तेव्हां ब्रह्मशिरोस्त्र प्रदीप्त झालें; तेव्हां सर्व लोक क्षुब्ध झाले. बाकी तें ब्रह्मदेवानें लोकरक्षणाकरितां उत्पन्न केलें होतें. असो; तथापि, कृष्णानें आपल्या चक्रानें त्या अस्त्राचें निवारण केलें व लोकांमध्यें ज्याचें यश प्रख्यात आहे अशा रणांत अप्रतिम असलेल्या वेगवान् बाणास म्हटलें, "बाणा, तुझ्या त्या गप्पा आतां कोठें गेल्या? आतां कां डौल मिरवीत नाहींस? हा मी रणांत उभा आहें. माझ्याशीं युद्ध कर; पुरुष हो. पूर्वीं कार्तवीर्य अर्जुन नामक सहस्र-बाहुयुक्त बलाढ्य क्षत्रिय होता; पण त्याला परशुरामानें द्विबाहु करून सोडलें. त्याप्रमाणें तुझाही हा दर्प बाहूंच्या वीर्यामुळेंच उद्भवला आहे; यास्तव हा पहा मी आतां रणांगणांत हा तुझा दर्प शांतकरितों. मी स्वबाहूनें तुझें आज दर्पशमन करीपर्यंत तूं मात्र उभा रहा. या रणांतून तूं आज माझ्या हातून सुटणार नाहींस."

इतक्यांत तें परम दारुण व दुर्लभ युद्ध पाहून त्या देवासुरांसारख्या युद्धांत नारद आनंदानें नाचूं लागला. तिकडे महात्म्या प्रद्युम्नानें सर्व रुद्रगणांस जिंकलें, तेव्हां युद्धाविषयींचा नाद सोडून ते महादेवाकडे प्राप्त झाले. नंतर ग्रीष्म ऋतूंतील मेघांप्रमाणें सिंहनाद करणाऱ्या चपल कृष्णानें रणांगणीं बाणासुराचा अंत करणारें सहस्र अरांनीं युक्त असलेलें चक्र हातीं घेतलें. सर्व ज्योतींचें जें तेज तसेंच वज्राशनीचें व सुरेशाचें जें तेज तें त्या चक्रावर सर्वतः अवस्थित होतें. गार्हपत्यादि तिन्ही अग्नींचें जें तेज, ब्रह्मचाऱ्याचें जें प्रख्यात ब्रह्मवर्चस तेज व ऋषींचें जें ज्ञानमय तेज-तें त्या चक्रावर स्थित होतें. पतिव्रतांचें तेज, मृग व पक्षी यांचें बल ( तेज ) व सर्व चक्रधरांमध्यें असलेलें तेज त्या चक्रामध्यें होतें. नाग, राक्षस, यक्ष, गंधर्व, अप्सरा व सर्व त्रैलोक्य यांचें जें बल तें त्यांत होतें. अशा सर्व प्रकारच्या तेजानें युक्त असलेलें तें दीप्त चक्र भास्कराप्रमाणें दिसूं लागलें. बाणासुराच्या सन्मुख असल्यामुळें त्या चक्रानें बाणासुराचें तेज आपले शरीरांत आकर्षण करून घेतलें.

इकडे अति तेजस्वी कृष्णानें रणांत अप्रमेय व अकुंठित चक्र उचललें असें पाहून रुद्राणी[1] शिवाला ह्मणाली, "हें त्रैलोक्यांत अजिंक्य असलेलें चक्र कृष्णानें उचललें आहे, यास्तव, हे देवा, त्यानें तें सोडलें नाहीं तोंच बाणासुराचें रक्षण कर." तें वचन ऐकून तो त्रिनेत्र लंबा[2] देवीस म्हणाला, "हे लंबे, देवि, तूं बाणाचें रक्षण करण्याकरितां लौकर जा." तेव्हां योगबलानें ती हिमवानाची कन्या गुप्त झाली, व रणांगणीं भगवान् हातांत चक्र घेऊन उभा आहे, असें पाहून त्यालाच एकटयाला रूप दिसेल अशा रीतीनें त्याच्यापाशीं आली. नंतर अंतर्धान पावून, पुनः वस्त्रांचा त्याग करून ती विजयाधिष्ठात्री

---

१ कलकत्ता व आमची लेखी या प्रतींत 'शिव रुद्राणीला म्हणाला' अशा अर्थाचा पाठ या स्थानीं असून पुढेंही तसेच उलट संबंध आहेत बाणाचे रक्षणाविषयीं दोघांचीही उत्कंठा सारखीच असल्यामुळें कसेंही म्हटलें तरी हानी नाहीं. व एके अर्थीं रुद्र रण सोडून आले होते, तेव्हां त्यानीं स्वतः पुनः जाणें ठीक नव्हतें.

२ 'लंबा' ही पार्वतीचाच अष्टमांशावतार होता. हें याच अध्यायांत मागें सांगितलें आहे.

देवी दिगंबर होऊन बाणाचे रक्षणार्थ वासुदेवाच्या सन्मुख नग्न आली. रुद्राचे संमतीनें ती देवी पुनः आली आहे असें पाहून त्या उभ्या असलेल्या दुसऱ्या[1] लंबेला, कृष्ण असें वचन बोलला:—"क्रोधानें ताम्र-नेत्र झालेली अशी तूं बाणाच्या रक्षणाकरितां तत्पर होऊन पुनरपि रणांत नग्न येऊन उभी आहेस, तरी पण बाणाला मी मारणार यांत काहीं संशय नाहीं." कृष्णानें असें म्हटलें असतां ती देवी पुनः असें बोलली: 'मी तुला जाणतें. तूं भूतमात्रांस उत्पन्न कर्ता, पुरुषोत्तम, महाभाग, महादेव, अनंत, नीलवर्ण, अव्यय, पद्मनाभ, हृषीकेश, व लोकांचें आदिकारण आहेस. हे देवा, रणांत अप्रतिम असलेल्या बाणाला तूं मारणें ठीक नाहीं. बाणाला अभय देऊन तूं मला जीवपु[2]त्रीत्व दे. मीं त्याला वर दिला आहे. त्यामुळें मी याचें पुनरपि रक्षण करण्यास आल्यें. हे माधवा, माझी खटपट विफल करणें तुला उचित नाहीं.'

देवीचें हें वाक्य ऐकून शत्रूंच्या नगरास जिंकणारा कृष्ण उलट तिला म्हणाला, "हे भामिनि, माझें हें खरें भाषण ऐक. बाण सहस्र बाहूंचा गर्व वाहत असून वल्गना करीत असतो. यास्तव मी आज त्याचे हे अनेक बाहू तर छेदणारच; [ आतां तूं या आपल्या पुत्राचें ( भक्ताचें ) प्राणदान मागतेस तर ] त्याला दोन बाहू राखून मी जिवंत ठेवीन व या प्रकारें तूं जीवपुत्री होशील. ( याहून अधिक मला देतां येत नाहीं. ) असें केल्यानें आसुरी दर्पाचा आश्रय करून तो माझ्याशीं पुनः निरोध करणार नाहीं." अचुक कर्म करणाऱ्या कृष्णानें असें भाषण केलें असतां देवी म्हणाली, "( वाटेल तें करा, पण ) हा बाण मला ( जिवंत ) द्या, म्हणजे झालें." याप्रमाणें कार्तिकेयाच्या मातेशीं भाषण करून तो वक्त्यांतील श्रेष्ठ प्रभु समरांत बाणाला म्हणाला, "बाणा, युद्ध कर, युद्ध कर; समरांगणांत अशक्तांप्रमाणें तुमचें रक्षज करण्याकरितां ही देवी नग्न होऊन उभी आहे. बाणा, तिच्या बलावर जिवंत राहणाऱ्या तुझ्या पौरुषाला धिक्कार असो." इतकें बोलून आत्मज्ञ व महाल कृष्णानें डोळे मिटून[1]—ज्या चक्राचे फेंकण्यानें चराचर लोक मोहित होत असतात, व कच्चे मांस खाणारे प्राणी महासंग्रामांत तृप्त होत असतात, असलें तें आपलें श्रेष्ठ चक्र बाणासुरावर सोडिलें. समरांत कोपानें दीप्त झालेल्या गदाधरानें सूर्यप्रभेसारखें तेजस्वी चक्र उचलून त्या अप्रतिम कर्म करणाऱ्या असुरावर सोडलें असतां कृष्णानें आपल्या तेजानें समरांत दानवांचें तेज हरण केलें. त्या श्रीधरानें मोठ्या ओजाचा आश्रय करून चक्रानें बाणाचे बाहू तोडिले. रणांगणांत वासुदेवानें बाणावर सोडलेलें तें विष्णुचक्र अलातचक्राप्रमाणें वेगानें भ्रमण करीत राहिलें. शीघ्रतेमुळें त्याचें स्वरूपही दिसत नसे. त्या चक्रानें रणांत बाणाचे सहस्र बाहू पुनःपुनः पर्यायानें ( म्हणजे, एकदां उजवा व एकदां डावा या क्रमानें ) तोडले. याप्रकारें ज्याच्या शाखा तोडल्या आहेत अशा वृक्षाप्रमाणें बाणाला द्विबाहु करून तें सुदर्शन चक्र पुनः कृष्णाच्या हातांत आलें. वैशंपायन म्हणाला, दैत्यांचा निःपात करणारें तें चक्र आपली कामगिरी

१ दुसऱ्या ह्मणण्याचें कारण 'कार्तीयाच्या रक्षणार्थ, एक लम्बा अशीच नग्न होऊन कृष्णापुढें उभी होती. कांहीं भाषांतरकारांनीं 'कोट्टवी' हें विशेषनाम समजून, लम्बा, रुद्राणी व कोट्टवी 'अशा' तीन बाया आणिल्या आहेत. हा घोटाळा आह्मांस उलगडत नाहीं.

२ जिचा पुत्र जिवंत आहे अशी अवस्था.

१ कर्तव्य प्राप्त असतांही असलें क्रूर कर्म श्रीकृष्णाच्यानें उघडे डोळ्यांनीं करवेना, हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

बजावून कृष्णाचे हातीं परत आलें असतां तिकडे तो हात तुटलेला बाण सर्व शरीर रक्तबंबाळ होऊन व त्यांतून रक्ताचे पाट सुरू होऊन पर्वताप्रमाणें दिसूं लागला. व खून चढून मेघाप्रमाणें नाना प्रकारें गर्जूं लागला. तेव्हां त्याच्या त्या गर्जना ऐकून शत्रुनाशक केशव पुनरपि चक्र फेंकण्याची इच्छा करून बाणाच्या नाशास उद्युक्त झाला. पण, इतक्यांत कुमारासह महादेव ईश्वर जवळ येऊन त्यास असें म्हणालाः—‘ हे महाबाहो, कृष्णा, तूं पुरुषोत्तम आहेस, हें मी जाणतों. तूं मधुकैटभांस मारणारा सनातन देवाधिदेव आहेस. हे देवा, तूं लोकांची गति असून हें जगत् तुझ्यापासून झालें आहे. सुरासुरपन्नगांसह तूं तिन्ही लोकांस अजिंक्य आहेस. यास्तव तूं उचललेलें हें दिव्य चक्र आंवर. हें अनिवार्य, असंहार्य व रणांत शत्रूंना भय देणारें आहे. हे केशिमर्दना, या बाणाला मी अभय दिलें आहे, तें माझें वाक्य वृथा न व्हावें म्हणून तूं त्याला क्षमा कर, असें मी मागतों.’ श्रीकृष्ण म्हणाला, ‘ देवा, बरें आहे. हा बाण जिवंत राहूं दे. हें माझें चक्र मी परत घेतलें. हे महेश्वरा, तुला नमस्कार असो. मला जरी बाणासुरास मारणें होतें तरी तुजप्रीत्यर्थ तें कर्तव्य मीं सोडून दिलें आहे. याकरितां आतां तूं, मला येथून जाण्याची अनुज्ञा द्यावी, हें बरें. असें महादेवास बोलून महोदर कृष्ण तांतडीनें बाणपीडित अनिरुद्ध जेथें होता तेथें आला. कृष्ण गेला हें पाहून नंदी बाणाला त्याचे हिताचें वचन बोलला कीं, ‘हे बाणा, या वेळीं देवाधिदेव शंकर प्रसन्न आहे, याकरितां तूं त्याचे पुढें हो. ’ तें नंदीचें हितकर वाक्य ऐकून बाण त्वरित जावयास निघाला. पण त्याचे हात तुटले आहेत असें पाहून प्रतापी नंदीनें त्याला रथांत घालून जेथें देव होता तेथें नेलें व त्या स्थळीं नंदी पुनः बाणाला म्हणाला, “ बाणा, बाणा, तूं नृत्य कर, म्हणजे तुझें कल्याण होईल. कारण, हा देव, महादेव तुजवर प्रसाद करण्यास तयार झाला आहे.” नंदीच्या उठावणीवरून तो जीवितेच्छु बाणासुर शंकराच्या सन्मुख रक्तानें न्हालेल्या गात्रांनीं नाचूं लागला. तो दानव त्या वेळीं भयानें विवेकशून्य झाला होता. त्यामुळें नंदीच्या वाक्यानें तो अधिकच चेवून वारंवार भयोद्विग्न होऊन नाचत सुटला. तेव्हां बाणाला त्या स्थितींत पाहून भक्तांवर कृपा करणारा महादेव शंकर करुणावश होऊन बोललाः— ( ईश्वर म्हणाला, ) ‘ हे दानवा, तूं माझा आवडता आहेस. याकरितां, हे बाणा, तुझ्या मनाला जो अत्यंत इष्ट वाटत असेल तो वर माग. मी तुजवर अनुग्रह करण्यास सज्ज आहें. ’ बाण म्हणाला, ‘ माझें बोलणें जर मानशील तर, हे विभो, मी सतत अजर व अमर व्हावें असा मला पहिला वर दे.’ महादेव म्हणाला, “ हे बाणा, तूं देवासारखा आहेसः तुला मृत्यु नाहीं. आतां दुसरा वर माग. तूं मला सदैव अनुग्रह करण्यास योग्य आहेस.” बाण म्हणाला, “ हे देवा, मजप्रमाणें जो तुझा भक्त तुजपुढें रुधिरयुक्त, अत्यंत आर्त व व्रणपीडित होऊन नाचेल, त्यास पुत्रप्राप्ति व्हावी. ” शंकर म्हणाले, जे माझे भक्त क्षमा, सत्य व ऋजुता यांनीं युक्त होऊन व निराहार राहून शांत मनानें मजपुढें तुजसारखें नृत्य करतील त्यांस पुत्रप्राप्ति होईल. बाणा, तुझे मनांत तिसरा वर असेल तर तोही माग. मी त्याप्रमाणें करीन. तूं या लोकीं सफलमनोरथ होऊन

१ कलकत्ता प्रतींत या ठिकाणीं हा अध्याय संपवला असून त्याला “ बाण भुजच्छेद ” असें नांव दिलें आहे. एका अर्थी भुजच्छेदासारख्या मोठ्या गोष्टीचा स्वतंत्र अध्याय बांधणें बरेंच न्याय्य दिसतें. बाकी मुंबई प्रतींत हा छेद नाहीं.

रहा. बाण म्हणाला, ‘ हे निष्पापा, चक्राच्या ताडणामुळें मला तीव्र व घोर वेदना होत आहे, तिसऱ्या वरानें शांत होवो. ’ श्री रुद्र म्हणाला, ‘ तथास्तु. तुझें कल्याण होवो. तुला पीडा दुःख देऊं शकणार नाहीं; तुझें गात्र अक्षत व स्वस्थावस्थ होईल. मी तुला चवथा वर देतों, कांहीं इच्छा असल्यास माग. मी तुजविषयीं सदां प्रसाद-सुमुख आहें; विमुख कदापि नाहीं. ’ बाण म्हणाला, “ हे विभो, मी प्रमथगणांच्या वंशजांतील मुख्य व्हावें व महाकाल या नांवानें शाश्वतकाल प्रख्यात असावें. ” वैशंपायन सांगतात, त्यावर देव महेश्वर म्हणाला, ‘ हे बाणा, मी तुला अतिदान देण्यास सिद्ध आहें. याकरितां तूं निर्भय होशील असें करून घे. हे दानवा, तूं बल व पौरुष यांविषयीं प्रख्यात आहेस. मी तुला आणखी पांचवा वर देतों. तुझ्या मनांत जें असेल तें मागून घे. ’ बाण म्हणाला, ‘ हे भवा, देवा, मला विरूपता कधींही येऊं नये. माझा द्विभुज देहही विरूप न दिसावा. ’ श्री हर म्हणाला, “ हे महासुरा, तूं जशी इच्छा करीत आहेस तसें होवो. भक्तांना न देण्याजोगें असें मला कांहींच वाटत नाहीं. ” वैशंपायन सांगतातः—नंतर समीप स्थित असलेल्या बाणाला महादेव म्हणाला, तूं जसें मागितलें आहेस तसें तसें सर्व होईल.

असो; इतकें बोलून गणांनीं वेष्टित असलेला त्रिनेत्र भगावान् सर्व भूतांसमक्ष तेथेंच गुप्त झाला.

## अध्याय एकशें सत्ताविसावा.

—:०:—

### कृष्णाचें अनिरुद्धासह द्वारकेस प्रत्यागमन.

वैशंपायन सांगतातः—याप्रमाणें अनेक वर मिळाल्यामुळें बाण संतुष्टचित्त झाला व महाकालत्व पावून तो रुद्रासह तेथून गेला.

इकडे वासुदेव नारदास बहुत प्रकारें विचारूं लागला कीं, “ हे भगवन्, सर्पबंधनांनीं बांधून ठेविलेला अनिरुद्ध कोठें आहे, तें मला तथ्य ऐकण्याची इच्छा आहे. कारण माझें मन प्रेमानें द्रवलें आहे. अनिरुद्धाला हरण केल्यानें द्वारका नगरी खळबळली आहे. यास्तव, आपण त्याला आतां शीघ्र मुक्त करा. कारण त्या उद्देशानेंच आपण येथें आलों आहों. व त्याचे शत्रु नष्ट झाले आहेत असें आज पाहण्याची आमची इच्छा आहे. हे भगवन्, सुव्रत, तें स्थळ तुला विदित आहे. ” कृष्णाचे अशा प्रश्नावर नारद म्हणाले, ‘ हे माधवा, त्याला नागांनीं बांधून कन्यापुरामध्यें ठेविलें आहे. ’ इतक्यांत, तेथें चित्ररेखा येऊन उभी राहिली व म्हणाली, ‘ हे सत्वसंपन्न महात्म्या, दैत्येंद्र बाणाचें हें अंतःपुर आहे. देवा, यांत तूं निशंकपणें प्रवेश कर. ’ तें ऐकून अनिरुद्धास सोडविण्याकरितां बळराम, गरुड, कृष्ण[1], प्रद्युम्न व नारद हे सर्व त्या अंतःपुरांत शिरले. तेव्हां गरुडास पाहतांच अनिरुद्धाच्या शरिरास वेढून असलेले शररूप महासर्प एकाएकीं त्याचें शरीर सोडून आपल्या मूळच्या बाणरूपानें भूमीवर पडून राहिले. कृष्णानें त्या महायशस्वी अनिरुद्धास पाहिलें व स्पर्श केला. तेव्हां तो प्रद्युम्नपुत्र संतुष्टचित्त होऊन हात जोडून बोलला, ‘ हे देवदेवा, केशवा, तूं युद्धामध्यें सदा जयी आहेस. प्रत्यक्ष इंद्रही तुझ्या सन्मुख उभा राहण्यास समर्थ नाहीं. ’ नंतर महाबल यशस्वी बळरामास महा उदार अनिरुद्धानें नमस्कार केला. बळरामानंतर महात्म्या माधवाला हात जोडून अभिवादन केलें. मग पक्षिश्रेष्ठ महावीर्यवान् गरुडाला प्रणाम केला. नंतर विचित्र बाण धारण कर-

[1] ‘ कृष्ण ’ हा धाकटा म्हणून.

णारा प्रभु मकर-केतू म्हणजे आपला पिता प्रद्युम्न त्यापाशीं जाऊन त्यानें त्यास अभिवादन केलें. त्या वेळीं उषा आपल्या सखीजनांसह आपल्या गृहांत स्थित होती. तिनें पुढें येऊन लाजत लाजत अतिबलढ्य बळराम, अतिशय अजिंक्य वासुदेव, अतिशय गतिमान् गरुड व पुष्प-बाण धारण करणारा प्रद्युम्न, यांस अभिवादन केलें. नंतर इंद्राच्या सांगण्यावरून अति तेजस्वी नारद हंसत वासुदेवापाशीं पुनः आला आणि त्या शत्रुमर्दन कृष्णास प्रोत्साहन देऊन म्हणाला, 'हे गोविंदा, आज तुला अनिरुद्ध भेटल्यानें तुझी भाग्यवृद्धि झाली, हें पाहून मला फार आनंद झाला.' तें ऐकून अनिरुद्धासह सर्वजण नारदांला प्रणाम करून त्यांच्या सभोंवार उभे राहिले. तेव्हां तो देवर्षि आशीर्वादानें सर्वांस संतुष्ट करून कृष्णाला म्हणाला, 'हे समर्था, अनिरुद्धाच्या वीर्यानें जिंकलेल्या उषेशीं वीर्याख्य विवाह आतांच कर. कारण मला एकदां ती जंबूलमालिका म्हणजे वरमायांची मालिका[1] केव्हां पाहीन असें झालें आहे.' नारदाचें हें हास्यजनक वचन ऐकून सर्व हसूं लागले. व कृष्ण म्हणाला, "बरें आहे, तो विधि सत्वर करा, उशीर लावूं नका." इतक्यांत, बा राजा जनमेजया, विवाहाची सामग्री घेऊन कुभांड तेथें आला व कृष्णाला नमस्कार करून बोलला, 'हे महाबाहो, कृष्णा, तूं आम्हांस अभय दे. मी तुला शरण आलों आहें. हे देवेशा प्रसन्न हो. हा मी तुला हात जोडीत आहें.'

कृष्णानें पूर्वींच कुभांडाविषयीं नारदाचे तोंडून ऐकिलें होतें. त्यामुळें त्या महात्म्यास त्यानें अभय दिलें. तेव्हां कृष्ण म्हणाला, "हे सुव्रता कुंभांडा, हे मंत्रिश्रेष्ठा, मी तुजवर प्रसन्न आहें. तुझें सदाचरण मी जाणतों. बाण हा शिवगणांमध्यें गेल्यामुळें, तूं या भूमीचा राष्ट्राधिपति हो. आपले ज्ञातिपक्षानें आणि संपन्न व अति सुखी होऊन तूं अति शांतपणें येथें रहा. हें राज्य मीं तुला दिलें आहे. माझ्या आश्रयाजें तूं दीर्घकाल जिवंत रहा." याप्रमाणें बोलून त्यानें महात्म्या कुंभांडाला राज्य दिलें. नंतर जनार्दनानें अनिरुद्धाचा विवाह केला. तेव्हां भगवान् अग्नि स्वतः तेथें येऊन उभा राहिला. अनिरुद्धाचा तो विवाह शुभ लग्नावर झाला. त्यानंतर अप्सरासमूह कौतुक करण्यास उद्युक्त झाला. आपल्या भार्येसह अनिरुद्धानें स्नान केलें, व अलंकार घातले. तेव्हां गंधर्व मंगल व शुभ वाक्यें गाऊं लागले. त्या विवाहादि कार्याला अप्सरांनीं आपल्या नृत्यांनीं फारच शोभा आणिली. याप्रमाणें अनिरुद्धाचा विवाह उरकून घेऊन तो शत्रुनाशक व शत्रुपुरजेता महाज्ञानी कृष्ण सर्व देवगणांसह देवांना वंद्य अशा रुद्राचा निरोप घेऊन स्वपुरीस जाण्याविषयीं मनांत विचार करूं लागला. तो अरिमर्दन द्वारावतीकडे जावयास निघाला आहे असें पाहून कुंभांड हात जोडून त्याला म्हणाला "बाणासुराच्या गाईचें दूध अमृतासारखें आहे. तें प्याल्यानें पुरुष अति बलाढ्य व दुर्जेय होतो. परंतु, हे माधवा, त्या गाई वरुणाच्या हातीं गेल्या आहेत."

कुंभांडानें असें सांगितलें असतां हरि संतुष्टचित्त झाला. त्यानें वरुणावर जाण्याचें मनांत आणून त्याप्रमाणें निश्चयही केला. नंतर भगवान् ब्रह्मा केशवाच्या उत्कर्षाविषयीं आनंद प्रदर्शित करून स्वभवनांतील महात्म्यांसह ब्रह्मलोकास गेला. इंद्र ब्राह्मणांसह द्वारकेकडे

१ श्रीकृष्णाच्या सहस्रावधि स्त्रिया व इतर सर्वही स्त्रिया या सर्वही वरपक्षाकडील वऱ्हाडणी म्हणजे एक घोळकाच पाहण्यास मिळणार.

चालला, व जयाची इच्छा करणारे सर्व जिकडे कृष्ण तिकडेच जात असतात. आईनें मार्गास लाविली असतां उषाही मयूरवाहनावर बसून आपल्या सख्यांच्या घोळक्यासह द्वारकेकडे चालली. त्यानंतर बलराम, कृष्ण, महाबल प्रद्युम्न, व वीर्यवान् अनिरुद्ध असे चौघे गरुडावर बसले. तेव्हां पक्ष्यांतील श्रेष्ठ व तेजस्वी गरुड वृक्षसमूहांस उपटीत व पृथ्वीलाही कांपवीत निघाला. सर्व दिशा धुंद झाल्या. आकाश धुळीनें झांकून गेलें. गरुड वेगानें जाऊं लागला असतां सूर्यही मंदकिरण झाला. यानंतर ते चौघे पुरुषश्रेष्ठ महा ओजस्वी बाणाला जिंकून व गरुडावर आरूढ होऊन आकाशमार्गानें फार दूरवर जाऊन पश्चिम दिशेकडे निघाले. तिकडे त्या महात्म्यांनीं दिव्य दूध देणाऱ्या गाई पाहिल्या. त्या सहस्रावधि रंगीबेरंगी गाई समुद्रतीरावरील वनांत चरत होत्या. कुंभांडानें दिलेलें गाईंचें वर्णन कृष्णाच्या ध्यानांत होतेंच. त्यामुळें त्या अर्थकुशल व श्रेष्ठप्रहारी कृष्णानें त्या बाणाच्या गाई दृष्टीस पडतांच ओळखल्या, व त्या संपादन करण्याविषयीं त्याचे मनांत आलें. तेव्हां तो अव्यय जगत्कारण गरुडावरूनच म्हणाला:— "हे विनतापुत्रा, जेथें बाणाचें गोधन आहे, तेथें चल. त्याच्या दुधाचें प्राशन केलें असतां प्राण्याला अमृतत्व प्राप्त होत असतें. बाणासुराच्या[१] गाई मजकरितां घेऊन ये, असें सत्यभामेनें मला सांगितलें आहे. कारण त्यांचें दूध प्याल्यामुळें महा असुर जराजीर्ण होत नाहींत. प्राणी जरा टाकून निर्जर होतात. बा गरुडा, सत्यभामेनें मला असें सांगितलें आहे कीं, गोधन आणल्यानें जर दुसऱ्या कामगिरीला अडथळा येत नसेल तर त्या गाई मजकरितां अवश्य आणाव्या. त्यांच्यांनीं अन्य कार्याचा लोप होत असेल तर मात्र गोष्ट निराळी. आतां त्या गाई अनायासें मला आढळल्या आहेत. याकरितां त्या सत्यभामेसाठीं घेऊन चल कसे." गरुड ह्मणाला:— देवा, या गाई जरी आतां आम्हांस दिसत आहेत तरी मी जवळ गेलों म्हणजे मला पाहून त्या सर्वजणी एकाएकीं समुद्रांत शिरतील. तेव्हां याला काय युक्ति करणें ती करावी. असें बोलून गरुडानें पंखांच्या वायूनें समुद्र खळखळून सोडला व नंतर त्यांत प्रवेश केला. पण गरुड वेगानें समुद्रांत शिरला हें पाहून सर्व वरुणगण गडबडून जाऊन कांपूं लागले. त्यानंतर नानाप्रकारचीं आयुधें घेऊन सज्ज झालेलें अतिदुर्जय वारुणसैन्य वासुदेवाच्या समोर आलें. व वरुणाच्या गणांचें गरुडाशीं घोर युद्ध झालें. त्या युद्धांत तें वरुणाचें अजिंक्य सैन्य जेव्हां सर्व बाजूंनीं हजारों अनुयायांसह धांवून येऊन गरुडावर पडूं लागलें, तेव्हां महात्म्या केशवानें त्याचा पराजय केला. तेव्हां त्या केशवाचे प्रहार न साहून ते वारुणगण वरुणालयालाच गेले. सासष्ट सहस्र ( अनेक रथ ) व प्रज्वलित अशीं वारुण शस्त्रें यांसह तें सर्व सैन्य बलाढ्य व शूर बलराम, कृष्ण, प्रद्युम्न, अनिरुद्ध, व गरुड यांनीं विविध तीक्ष्णशरौघांनीं समंततः जर्जर केलें. तेव्हां अचुक काम करणाऱ्या कृष्णानें आपल्या सैन्याचा पराभव केला आहे असें पाहून वरुण अतिशय संतापला व जेथें कृष्ण होता तेथें यावयास निघाला. ऋषि, देव, गंधर्व, अप्सरांचे संघ, हे कृष्णाची बहुत प्रकारें स्तुति करीत आहेत अशांत वरुण समोर दिसला. मस्तकावर सुंदर शुभ्र जलस्राव करणारें असें छत्र धरिलें आहे, असा तो जलपति वरुण अत्यंत क्रुद्ध होऊन

[१] वरुण हा जलपति असल्यानें त्याचा ही निग्राणीच समजावी.

आपलें श्रेष्ठ धनुष्य उचलून व त्याची दोरी ताणून आपले पुत्र, पौत्र व सर्व सैन्यांसह कृष्णासमोर उभा राहून कृष्णाला युद्धार्थ आव्हान करीत असल्याप्रमाणें शंख वाजवून कृष्णावर धांवला. व कोपास चढलेल्या हराप्रमाणें त्यानें त्या कृष्णास बाणजालानें गुरफाटून टाकिलें. तेव्हां महाबल जनार्दनानें पांचजन्य शंख वाजवून बाणजालांनीं सर्व दिशा झांकून टाकिल्या. त्याच्या चकचकीत बाणांच्या योगानें रणांत पिडिलेला वरुण विस्मित झाल्यासारखा कृष्णाशीं लढूं लागला. तेव्हां संग्रामांत उभा असलेल्या वासुदेवानें घोर वैष्णव अस्त्राचें अभिमंत्रण करून त्या बुद्धिमानाच्या सन्मुख असें वाक्य उच्चारलें कीं, " हें शत्रुसंहार करणारें महाघोर वैष्णवास्त्र मीं तुझ्या वधाकरितां उचललें आहे; यास्तव, आतां तूं स्थिर होऊन उभा रहा." त्यानंतर महाबल वरुणदेव उत्तम वैष्णव अस्त्रावर वरुणास्त्राची योजना करून सिंहनाद करूं लागला. त्याच्या त्या अस्त्रापासून पसरणारें जल बाहेर धांवूं लागलें व याप्रकारें तो वरुण त्या वैष्णवास्त्राचें शमन करण्याविषयीं प्रवृत्त झाला. पण त्या वैष्णवास्त्रावर पडणारें तें वरुणजल पुनःपुनः पेट घेई; व त्यामुळें वरुणाचेच अनुयायी भाजत आणि तें महावीर्यवान् वैष्णवास्त्र पुनः पहिल्यासारखें जळत राही. त्यामुळें ते वरुणगण त्याला भिऊन दशदिशांनीं पळूं लागले. पण तें अस्त्र दीप्त झालें आहे असें पाहून वरुण कृष्णाला म्हणाला, ' जी अव्यक्त असूनही जिचीं लक्षणें व्यक्त आहेत अशा त्या तुझ्या पूर्व प्रकृतीला स्मर. आणि, हे महाभागा, तमाचा त्याग कर. त्याच्या योगानें मोहित कसा होतोस? हे महामते योगीश्वरा, तूं नित्य सत्वस्थ होऊन रहा. पंचमहाभूतांच्या आश्रयामुळें उद्भवणारे दोष व अहंकार यांस वर्ज्य कर. या तुझ्या वैष्णवरूपांत मी तुला ज्येष्ठ आहें. तेव्हां मला ज्येष्ठपणास्तव मान देण्याचें सोडून तूं जाळूं पाहणार हें काय? अग्नि अग्नीवरच आपला पराक्रम गाजवीत नाहीं. हे योद्ध्यांतील श्रेष्ठा, कोपाचा त्याग कर. तुझा पराभव करण्यास मी समर्थ नाहीं. कारण, तूं जगाचा उद्भव आहेस. पूर्वीं तूं जी विकारयुक्त प्रकृति निर्माण केली होती ती परिणाम पावणारी आहे. पूर्वधर्माचा आश्रय करून ती जगताचें बीजभावानें युक्त आहे. आग्नेय, वैष्णव, सौम्य, इत्यादि अस्त्रें प्रथमतः या प्रकृतीपासूनच झालीं. तूं हें सर्व जगत् निर्माण केलेंस; तोच तूं माझ्याविषयीं भुलतोस? हे तेजस्विन्, तूं देव, अजेय, शाश्वत, स्वयंभू, भूतांस उत्पन्न करणारा, अक्षर, क्षर, व भावाभावरूप आहेस. माझें रक्षण कर. हे निष्पापा, तुला नमस्कार असो. तूं लोकांचा आदिकर्ता आहेस. तूं हें जगत् अनेकरूप केलें आहेस. हे महा देवा, बालकें जशीं आपल्या खेळण्याशीं खेळत असतात, त्याप्रमाणें तूं जगांतील वस्तूंशीं खेळतोस. मी प्रकृतीचा द्वेष करणारा नाहीं. किंवा प्रकृतीला दूषित करणाराही नाहीं. हे महातेजस्वी पुरुषश्रेष्ठा, अहंकारादि विकार हे प्रकृतीचे भोंवतीं वाढत असतात. अशा विकारांचें शमन करून प्रकृतीला तिचे शुद्ध स्वरूपांत राखण्यास तूंच उद्युक्त होत असतोस. हे निष्पापा, तुझे ठायीं क्रोधादि विकार म्हणून कधीं कधीं दृष्टीस पडतात, ते वास्तविक तुला विकृत करीत नसून जे कोणी धर्म न जाणणारे मंदबुद्धि असतील अशांना मात्र त्या तुझ्या विकारद्वारा तूं बाधा करितोस. ही प्रकृती दोषांमुळें जेव्हां तमोयुक्त होते किंवा रजानें संसृष्ट होते, तेव्हां मोह उत्पन्न होतो. पण तूं पूर्वापर जाणणारा, सर्वज्ञ व ऐश्वर्ययुक्त आहेस असें असून प्रजापतीप्रमाणें स्वतः आम्हां सर्वांस मोहित करितोस,

हें काय?' वरुणाचें हें बोलणें ऐकून लोकपरायण, दुसऱ्याचें मनोगत जाणणारा व सर्व कर्ता कृष्ण प्रसन्नचित्त झाला; आणि हंसत म्हणाला कीं, 'हे भयंकर पराक्रमी वीरा, हा कलह मिटवावा अशी तुझी इच्छा आहे, तर मला गायी दे.' कृष्णानें असें म्हणतांच वाक्पटु वरुण पुनः म्हणाला, 'हे मधुसूदना माझें म्हणणें ऐक. हे देवा, बाणाबरोबर मीं पूर्वीं कांहीं नियम केला होता. तेव्हां एकदां निश्चय केल्यावर तो आतां उगाच विफळ कसा करूं? देवा, तूं सर्व जाणतोसच; जो केलेला नियम मोडतो तो चारित्रापासून भ्रष्ट होतो. व सज्जन त्याची निंदा करितात. हे मधुसूदना, याप्रकारें प्रतिज्ञाभंग करणारा मनुष्य धर्मफलाचा वांटेकरी होत नाहीं, किंवा त्या पाप्याला उत्तमलोकप्राप्तिही होत नाहीं. यास्तव, हे मधुसूदना, तूं प्रसन्न हो, आणि माझे हातून हा धर्मलोप होऊं देऊं नको. व प्रतिज्ञाभंगाचे दोषानें मला लिप्त करूं नको. हे सुंदरनयना, मी जिवंत असतांना गायी देणार नाहीं. मला मारून पाहिजे तर गाई ने. मीं पूर्वीं हीच बाणाशीं प्रतिज्ञा केली आहे. हे मधुसूदना, मीं आपला सत्य नियम तुला सांगितला आहे. हे सुरेश्वरा, हे महाबाहो, तो मिथ्या नव्हे. मी जर तुला अनुग्राह्य वाटत असेन तर माझें रक्षण कर. अथवा गायी नेईन असाच आग्रह असेल तर मला मारून ने.'

वैशंपायन सांगतातः—यादव वंशाची वृद्धी करणाऱ्या कृष्णास वरुणानें असें समजाविलें असतां वरुणाची प्रतिज्ञा अभेद्य आहे हें ध्यानांत आणून गायींविषयीं वाद सोडून तो अर्थकुशल कृष्ण हंसत वरुणाला म्हणाला, 'बाणानें जर अशाच करारावर गायी दिल्या असतील तर मी तुला सोडतों. हे समर्था वरुणा, तूं मजशीं मधूप्रमाणें गोड व मार्मिक असें इतकें अघळपघळ भाषण करीत असतांना मी तुजशीं भलतेंच वर्तन कसें करीन? बा वरुणा, तूं मला खरें तेंच सांगत आहेस हें पाहून मी तुला सोडिला आहे; जा. तुझें प्रिय करण्याकरितांच मीं बाणाच्या गाई सोडल्या, यांत संशय नाहीं. त्यानंतर मंगलवाद्यांचे नाद व दुंदुभींचे महाध्वनी यांचा गजर करीत वरुण अर्घ्य घेऊन आला व त्यानें केशवाचें पूजन केलें. आणि तो देव कुशल व शांतचित्त झाला.

याप्रमाणें वरुणाला अभय देऊन प्रतापवान् वासुदेव, शचीपतीसहवर्तमान द्वारकेकडे निघाला. तेव्हां मरुतांसह देव, साध्यांसह सिद्धचारण, गंधर्व व अप्सरा आणि किन्नर अंतरिक्षांतूनच त्या सर्व भूतांच्या आदिभूत अव्यय भूतेशाच्या मागोमाग जाऊं लागले. आदित्य, वसु, रुद्र, अश्विनीकुमार, यक्ष, राक्षस, विद्याधरगण, व असेच दुसरेही सिद्धचारण कृष्णाचे नगरांत त्याचे विजयाची प्रशंसा करीत त्याच्या मागून जाऊं लागले. महाभाग नारदही द्वारकेकडे निघाला. बाणाचा विजय व वरुणाचें प्रिय पाहून तो प्रसन्न झाला. कैलासशिखरासारख्या उंच व भव्य प्रासादांनीं व शुभ कंदरांनीं युक्त असलेल्या द्वारमालिकायुक्त द्वारकेस दुरूनच पाहून मधुहंता चक्रगदाधर देव पांचजन्याचा गंभीर घोष करून द्वारकापुरांत रहाणाऱ्यांस आगमनाची सूचना देता झाला. देवाच्या यानाचा घोष व पांचजन्याचा ध्वनि ऐकून द्वारकेंतील सर्वांस अतुल हर्ष झाला. पौरजनांनीं दूरवर फेंकलेल्या लाह्या व पूर्ण जलकुंभ यांच्या योगानें त्या सुंदर देवतांच्या द्वारवती नगरीस अधिक शोभा आली. त्या नगरींतील रथाचा मार्ग झाडून स्वच्छ केला असून ती चांगली शोभायुक्त व अनेक रत्नांनीं सुशोभित केली होती. यदुकुलाचे पुरोहित व इतर विप्र अर्घ्य

घेऊन पुढें आले. व नानाप्रकारच्या जय शब्दांनीं माधवाचा सत्कार करूं लागले. गरुडावर बसलेल्या, नील अंजनासारख्या काळ्या व परमश्रीनें युक्त असलेल्या कृष्णाला त्या सर्वांनीं वंदन केलें. ( ब्राह्मणेतर ) तिन्ही वर्णांचे लोक त्या महाबलाचें क्रमानें पूजन करूं लागले. त्या केशिघातक अनंताची पूजा, निरनिराळे धंदे करणारे लोक आपापल्यांतील श्रेष्ठाला पुढें करून, यथाविधी करूं लागले. द्वारकेच्या उपवनांत त्या पुंडरीकाक्षाची स्तुति ऋषि, देव, गंधर्व व चारण चोहों बाजूंनीं करूं लागले. उत्तम दाशार्हगण तें सर्व आश्चर्य पहात राहिले. बाणासुराला जिंकून येणाऱ्या त्या पुरुषोत्तम महादेवाला, आजानुबाहु कृष्णाला पाहून ते सर्व अतिशय आनंदित झाले. यादवांतील महाभाग महारथ कृष्ण परत आला असतां त्या वेळीं द्वारकावासी लोकांच्या तोंडून असे नाना प्रकारचे उद्गार निघूं लागले:— ‘ अतिशय लांबीचा प्रवास करूनही हा गरुड किती सत्वर आला. हा जगत्पिता महाबाहु महावीर्यवान् कृष्ण आमचें रक्षण करणारा व योगक्षेम चालविणारा आहे, यामुळें आम्ही सर्व धन्य व अनुगृहीत आहोंत. गरुडावर बसून अति दुर्जय बाणाला जिंकून हा पुंडरीकाक्ष आमचे मनास आल्हाद देतच जणूं काय आला आहे. ’ द्वारकावासी जन असें बोलत आहेत तोंच ते महारथ वासुदेवाच्या गृहांत प्रविष्ट झाले. त्यानंतर देवांचीं नाना आकारांचीं विमानें आकाशांत सर्व बाजूंनीं संचार करूं लागलीं. हंस, ऋषभ, मृग, नाग, घोडे, सारस, मयूर इत्यादि ज्यांस जोडले आहेत अशीं तीं देदीप्यमान् विमानें सहस्रशः दृग्गोचर होऊं लागलीं. नंतर कृष्ण प्रद्युम्नादि सर्व सहस्रावधि कुमारांस मधुर वाणीनें असें मधुर वचन बोललाः— “ कुमारहो, हे रुद्र, आदित्य, वसू, अश्विनीकुमार, साध्य देव व तसेच दुसरेही उत्तम लोक येथें आहेत, त्यांस क्रमानें वंदन करा. दानवांना भयंकर असलेल्या महा उदार इंद्राला वंदन करा. तुम्ही सर्व मिळून या गणांसह नागवाहन शक्राला प्रणाम करा. आंगिरस भृगूचा आश्रय केलेले हे महाभाग सप्तर्षि आहेत, हे महात्मे ऋषि आहेत, यांना आनंदानें वंदन करा. या चक्रधरास वंदन करा. हे सागरडोह माझें प्रिय करण्याकरितां येथें आले आहेत, यास्तव तुम्ही सर्व यांना वंदन करा. दिशा व उपदिशा यांना क्रमानें प्रणाम करा. वासुकिप्रभृति अति बलाढ्य नाग व गाई यांस क्रमशः माझ्या संतोषाकरितां वंदन करा. यक्ष, राक्षस, किन्नर व नक्षत्रें यांसह ज्योति व तेजोगोल, माझें प्रिय करण्याकरितां आले आहेत, यास्तव क्रमानें त्यांना वंदन करा. ”

वासुदेवाचें हें वचन ऐकून कुमार नम्र होऊन राहिले. त्यांनीं त्या सर्व महात्म्या देवांना क्रमानें प्रणाम केले. त्या सर्व स्वर्गवासी जनांस पाहून पौर विस्मित झाले. आणि त्यांच्या पूजनाकरितां संभार घेऊन ते सत्वर आले. केवढें हो हें महादाश्चर्य ! वासुदेवाचा पूर्ण आश्रय केल्यामुळें आम्हांला या लोकींही असा अलौकिक लाभ झाला, अशी वाणी सहज त्यांच्या तोंडून निघाली. त्यानंतर चंदनपूर्ण गंध-पुष्पांनीं सर्व पौरजन सर्व देवांची पूजा करूं लागले. लाह्या, प्रणाम, धूप, मौन व स्थिरबुद्धि यांचे योगानें सर्व द्वारकावासी जन देवांस पूजूं लागले. नंतर वीर्यवान् इंद्र उग्रसेन, वासुदेव सांब, यदुनंदन, सात्यकि, उल्मुक, महाबल विपृथु, महाभाग अक्रूर, त्याचप्रमाणें निशठ व अंधक या सर्वांस आलिंगन देऊन व त्यांच्या मस्तकांचें अवघ्राण करून सभेमध्यें सर्व यादवांस उद्देशून असें

शुभ वचन बोलला. कीं— ' हा तुमचा यदुनंदन कृष्ण महात्मा कार्तिक व महादेव यांसमक्ष बाणाशीं रणांत लढून त्याला एका क्षणांत जिंकून आपलें यश व पौरुष प्रकट करून आणि त्या बाणाचे सहस्र बाहूंपैकीं दोनच बाहू राखून व तेच उत्कृष्ट शोभतील' से करून आपण द्वारकापुरीस आला आहे. महात्म्या कृष्णाचा जन्म मनुष्यामध्यें ज्याकरितां झाला तेंही कार्य होऊन गेलें आहे. त्यानें आमचा शोक नाहींसा केला आहे, यास्तव आतां तुम्ही मोहांचें[1] मद्य प्या; व प्रीतिपूर्वक रममाण व्हा. कारण या योगानें विषयामध्यें सक्त होणाऱ्या लोकांचा काल मध्यें खंड न पडतां जातो. या महात्म्याच्या बाहूंचा आश्रय केल्यामुळें आम्हांस चिंता उरली नाहीं, याकरितां आपण मोठ्या आनंदानें रममाण होऊं.

दानवान्तक केशवाची अशी स्तुति करून व त्याला विचारून महाभाग पुरंदर सहस्राक्ष सर्व देवगणांनीं आवृत होऊन पुनः लोकवंद्य कृष्णाला आलिंगन देऊन—मरुद्गणांसह स्वर्गाला गेला. महात्मे ऋषीही ' जय जय ' अशा आशीर्वादांनीं त्या महा ओजस्व्यांस प्रसन्न करून स्वस्थानीं गेले. यक्ष, राक्षस व किन्नर हे आल्या मार्गानें परत गेले. इंद्र स्वर्गाला गेला, तेव्हां महाभाग महाबल पद्मनाभ सर्वांस अक्षय्य कुशल विचारूं लागला. तेव्हां आनंदानें किलबिलत सहस्रावधि लोक कृष्णाच्या मुखचंद्राची प्रभा पहावयास आले. कारण, तो निष्पाप त्यांचे भक्तीनें सदा प्रसन्न असे.

याप्रमाणें कृष्ण द्वारकेस येऊन परमश्रीनें युक्त होत्साता यदुगणांसह नाना प्रकारचे सर्व कामार्थ भोगीत रममाण झाला.

[1] मोहाचे फुलांची दारू सर्वप्रसिद्धच आहे.



# अध्याय एकशें अठ्ठाविसावा.

—:०:—

## उषाहरण-समाप्ति.

वैशंपायन सांगतातः—नंतर महातेजस्वी महाबाहु उग्रसेन हर्षानें प्रफुल्लनेत्र होऊन श्रीकृष्णाला म्हणाला, " हे यदुनंदना, असल्या बिकट प्रसंगांतून अनिरुद्ध क्षेमरूप परत आला हें पाहून आमची यादवमंडळी अप्सरांसह चैन करून राहिली आहे. असें जर आहे तर मी म्हणतों कीं, मुख्यतः आपल्या अनिरुद्धाचा मोठा थाटाचा उत्सव करा. महाभाग्यवती उषा ही आपल्या सखिजनानें परिवृत्त होत्साती अनिरुद्धाचे संगतींत परम प्रीतीनें रममाण झाली आहे. आतां त्यांतही असें करा कीं, बाणासुराच्या कुंभाण्डनामक सचिवाची रमणीय कन्या तिचा उषेचे सखिमंडळांत प्रवेश करवा. म्हणजे महाभागा वैदर्भि ( अनिरुद्धाची पूर्व पत्नी ) ही आनंदित होईल. याकरितां ती शुभ कुंभांडकन्या सांबाला द्या. व शोणित नगरांतून आणलेल्या इतर दानवकन्या क्रमानें सर्व यादवकुमारांस द्या. अनिरुद्धाच्या गृहामध्येंच उत्सव प्रवृत्त होऊं दे. तसाच श्रीकृष्णाच्या गृहांतही मंगलोत्सव चालूं द्या. "

आहुकाची अशी आज्ञा झाली असतां त्या श्रीमानाच्या गृहीं शुभ उत्सव सुरू झाला. मदवश झालेल्या स्त्रिया त्या नगरांत वाद्यें वाजवूं लागल्या. दुसऱ्या कांहीं नाचूं लागल्या. व कांहींजणी गाऊं लागल्या. त्यांतील कित्येक अतिशय आनंदित झाल्या. त्या एकमेकींशीं नाना प्रकारच्या गोष्टी बोलूं लागल्या व अनेक वर्णांचीं वस्त्रें धारण करून इतस्ततः क्रीडा करीत सुटल्या. कित्येक मदवश झाल्यामुळें स्वतः एकमेकींच्या सन्मुख गेल्या. हर्षानें नेत्र प्रफुल्ल होऊन कांहींजणी फाशांनीं खेळूं

लागल्या. इतक्यांत आकाश-वाणी झाली कीं, " हे रुक्मिणि, ही मयूररथांत बसलेली व सख्यांनीं युक्त असलेली ( उषा ) देवी रुद्राणीनें पाठविली आहे. यास्तव तिचा स्वीकार कर. हिचें नांव उषा असून ही अत्यंत सुंदर आहे व तुझे कुलांत श्लाघ्य आहे. याकरितां हे भामिनि, ही बाणपुत्री तुझी सून ( नातसून ) म्हणून हिचा स्वीकार कर. " ही वाणी ऐकतांच आचार-मंगलें करून स्त्रियांनीं तिला आपल्यांत घेऊन अनिरुद्धाच्या गृहांत प्रविष्ट केलें. देवकी, रोहिणी, व विदर्भजा, रुक्मिणी, मुख्य गृहांत प्रवेश करून ' मुली, मोठ्या आनंदाची गोष्ट आहे कीं तूं अनिरुद्धाच्या दर्शनानें उत्कर्ष पावत आहेस. ' असें त्या उषेला म्हणाल्या. नंतर मंगलवाद्यांचे घोष चालू असतां सुंदरमुखी अशा श्रेष्ठ सुवासिनींनीं चालीप्रमाणें मंगल क्रिया आरंभिल्या व उषा त्या कुटुंबांत प्रतिष्ठित झाली. ( कायमची जमली. ) आणि मग ती सुंदरी मोठ्या माडीवर राहून वृष्णिश्रेष्ठ अनिरुद्धाचे आश्रयानें स्वर्गतुल्य उपभोगांत रममाण झाली. सुश्रोणि चित्रलेखा ( जी रूपांतर करून आलेली अप्सरा होती ती ) सर्व सखीवर्गास व उषेला विचारून स्वर्गलोकीं गेली.

त्या सर्व सख्या गेल्यावर मायावतीनें प्रथमच बोलावून त्या असुरकन्येला आपल्या येथें नेलें. त्या सुंदर प्रद्युम्नभार्येनें स्नुषेला पाहून वस्त्रें, अन्न, पात्र इत्यादिकांच्या योगानें त्या सुंदरीला आनंदित केलें. त्यानंतर त्या सर्व यादवस्त्रिया चालीप्रमाणें वधू उषेशीं आपल्या धर्मानें वागूं लागल्या.

वैशंपायन सांगतात:—हे कुरुकुलाधारा, विष्णूनें बाणाला संग्रामांत कसें जिंकलें व त्याला जिवंत कसें सोडलें तें सर्व मीं तुला सांगितलें आहे. त्यानंतर कृष्ण यदुगणांनीं परिवेष्टित होऊन द्वारकेंत रममाण झाला. परम आनंदानें युक्त होऊन त्यानें सर्व पृथ्वीचें अनुशासन केलें. हे पृथिवीपते, याप्रमाणें हा विष्णु पृथ्वीवर अवतीर्ण झाला आहे. कारण, तो श्रीमान् प्रभु वृष्णींमध्यें वसुदेवकुलांत देवकीच्या ठायीं उत्पन्न झाला. तूं मला जें विचारीत होतास तें हें असें आहे. नारदाचा प्रश्न निवृत्त झाला असतां मीं हें तुला संक्षेपतः सांगितलें आहे. जनमेजया, या विष्णूच्या माथुर कल्पांतील पूर्वींचे सर्व विस्तृत इतिहास तूं ऐकले आहेस. त्यांच्याविषयींच तुला मोठा संशय होता. वासुदेव हीच परागति आहे व ती मीं तुला सांगितली आहे. कृष्णच सर्व आश्चर्यांचा उत्तम सांठा आहे. त्याहून दुसरें आश्चर्यच नाहीं. हा सर्व धन्यांत धन्य आहे. इतरांस धन्य करणारा व धन्याचें कारण आहे. देव व दैत्य यांमध्यें अच्युताहून अधिक धन्य कोणी नाहीं. आदित्य, वसु, रुद्र, अश्विनीकुमार, वायु, आकाश, भूमि, दिशा, जल, तेज, इत्यादि सर्व हाच आहे. हाच नित्य, धाता, विधाता व संहर्ता आहे. सत्य, धर्म, तप, पितामह ब्रह्मा, नागांतील अनंत, व रुद्रांतील शंकर हा आहे, असें सांगितलें आहे. चराचर जगत् नारायणापासून उत्पन्न झालें आहे. या जनार्दनापासून हें सर्व जगत् उद्भवलें आहे व सर्व जगत् त्या देवेशामध्येंच आहे. यास्तव, हे भरता, त्याला नमस्कार कर. हा सनातन देव सर्व देवांस सतत पूज्य आहे.

राजा, याप्रमाणें मीं तुला बाणाचें युद्ध व केशवाचें माहात्म्य सांगितलें. याच्या केवल श्रवणानेंच अतुल वंशप्रतिष्ठा प्राप्त होते. हें अत्युत्तम बाणयुद्ध, व केशवाचें माहात्म्य जे वाचून ध्यानांत धरितात त्यांना अधर्म शिवत नाहीं. हे जनमेजया, हें विष्णूचें चरित्र मीं प्रश्न करणाऱ्या तुला, हा यज्ञ झाला असतां

पूर्णपणें सांगितलें आहे. राजन्, हें आश्चर्यपर्व जो ध्यानांत ठेवील तो सर्व पापांपासून मुक्त होऊन विष्णुलोकीं जातो. प्रातःकाळीं उठून जो अति शांतचित्तानें हें वाचतो त्याला या लोकीं व परलोकीं दुर्लभ कांहीं नसतें. याचा वाचक ब्राह्मण असल्यास तो सर्ववेदवेत्ता होतो. क्षत्रिय विजयी होतो. वैश्य धनसमृद्ध होतो. व शूद्राचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. त्याचें कांहीं अशुभ होत नाहीं व त्याला दीर्घ आयुष्य प्राप्त होतें.

सौति म्हणालाः—हे द्विजोत्तमांनो, याप्रमाणें वैशंपायनानें सांगितलेला हरिवंश जनमेजय राजा अचल चित्तानें ऐकता झाला. हे शौनका, याप्रमाणें मी तुला सर्व वंश संक्षेपतः व विस्तारपूर्वक सांगितले. आतां आणखी तुला काय ऐकण्याची इच्छा आहे ?

